

चरितं रघुनाथस्य शतकोटिप्रविस्तरम् ।
एकैकमक्षरं पुंसां महापातकनाशनम् ॥
रामरक्षा



# सार्थ श्रीमदध्यात्मरामायण



भाषांतरकार—

## भालचंद्र शंकर देवस्थळी



प्रस्तावनालेखक—

## नरहर गणेश जोशी, एम. ए.




प्रकाशक—

## केशव भिकाजी ढवळे, गिरगांव—मुंबई



विजयादशमी, शके १८५०, सन १९२८


किंमत अडीच रुपये

# भाषांतरकर्त्याचे दोन शब्द.



रामायणींचें निजसार । क्षरीं कोंदलें अक्षर ।
पदपदार्थ चिदचिन्मात्र । परम पवित्र रामकथा ॥
कथेमाजील कथार्थ । सबाह्य कोंदला रघुनाथ ।
ह्याचि ग्रंथींचा परमार्थ । निजात्मस्वार्थ साधका ॥
करूं बैसतां भोजन । ग्रासोग्रासीं रामायण ।
जेवणीं गोड श्रीरामभजन । दावी आपण श्रीराम ॥
चवी चाखतां रसाआंत । रसस्वाद श्रीरघुनाथ ।
करोनि भोजनाचा अंत । रामायणार्थ राम दावी ॥
चाखतां रामायणगोडी । रस रसना रसत्व सांडी ।
दृष्टि दृश्यातें ओसंडी । जोडितां जोडी रामकथा ॥
करूं जातां सुखें शयन । विसरों नेदी रामायण ।
शेज बाज अंथरूण । होय आपण श्रीराम ॥ '

भावार्थरामायण.

संसारात भाबावून गेलेल्या असंख्य जडजीवाच्या उद्धारार्थ ज्यानीं आपले देह अहर्निश झिजविले, आणि आपल्या प्रासादिक वाणीनें आबालवृद्ध स्त्रीपुरुषास ज्ञानामृत पाजून त्यास आत्मविद्येचीं गूढ तत्त्वें सुगम करून दिलीं, असे अनेक ब्रह्मनिष्ठ महर्षि, आणि परमभक्तिपरायण संतकवि आपल्या भरतखंडनामक पुण्यभूमींत जन्मास आले, ही तिची थोरवी वर्णावी तितकी थोडीच होणार आहे. वेद, उपनिषदें इत्यादि केवळ ब्रह्मज्ञानपर ग्रथांचा आणि रामायण, महाभारत, भागवत इत्यादि पुराणग्रंथाचा विचार केला असता, या महर्षींनीं आणि संतकवींनीं आम्हाकरिता जी अध्यात्मज्ञानसंपत्ति साठवून ठेविली आहे, तिच्या तोडीची जगांत इतरत्र कोठेंही आढळून येणार नाहीं, ही गोष्ट निर्विवाद आहे, आणि म्हणूनच भारतभूमि आम्हां आर्यावर्तजनांस पुण्यभूमि वाटावी, यात आश्चर्य नाहीं.

आता वेद, उपनिषदें व इतर शास्त्रग्रंथ ह्यातील सिद्धांत अगर वेदांतप्रतिपादन सामान्य जनतेच्या आटोक्याबाहेरचें असल्यामुळें अर्थातच पुराणग्रंथाची रचना मागाहून करण्यात आली. हीं पुराणें देखील अध्यात्मपरच आहेत, तथापि त्यातील विविध व मनोरंजक कथानकांच्या योगें तीं वेदोपनिषदादि अध्यात्मग्रंथापेक्षा लोकांच्या आदरास विशेष पात्र झालीं हें उघडच आहे. या पुराणग्रंथामध्यें सर्वमान्य म्हणून गणिले जाणारे ग्रंथ म्हणजे रामायण, महाभारत, व भागवत हे होत. महाभारत व भागवत यांत श्रीकृष्णाचें सर्वोत्तम चारित्र्य वर्णिलें असून रामायणांत पुण्यप्रद श्रीरामकथा कथिली आहे. श्रीराम आणि श्रीकृष्ण हे दोघेही अवतारी

पुरुष असल्याकारणाने दोघांचीही चरित्रें आबालवृद्धास वंदनीय आहेत. श्रीकृष्णचरित्रांत अप्रतिम तत्त्वज्ञानामृताचा रसास्वाद घेता येतो, तर रामकथेंत संसारी जनांस प्रतिदिवशीं अनुकरणीय अशा अनंत सद्गुणाचा आदर्श दृग्गोचर होतो. ह्याच कारणामुळें श्रीरामचरित्र कृष्णचरित्रापेक्षा जनताचित्तास अधिक आदरणीय झाले आहे.

रामचरित्र म्हणजे असामान्य लोकाराधन, अतुल सत्त्वनिष्ठा, अद्वितीय पितृभक्ति, अनुपम स्वार्थत्याग, उत्कट बंधुप्रेम, अलौकिक धैर्य, स्वर्गीय पतिप्रेम, दिव्य सतीत्व, इत्यादि बहुमोल व दुर्मिळ सद्गुणाची केवळ खाण होय. ह्याच गुणांनी अनेक संस्कृतप्राकृत कवींच्या वाणीस रामचरित्र हा अत्यंत प्रेमाचा व जिव्हाळ्याचा गायनविषय होऊन त्यायोगें कोट्यवधि जनाचें जीवित अमृतप्राय झाले आहे. वाल्मीकीचे रामायण, अध्यात्मरामायण, भवभूतीचें महावीर-चरित्र व उत्तररामचरित्र, एकनाथी भावार्थरामायण, मोरोपंतकृत १०८ रामायणे, श्रीधरी रामविजय, व दुसरी अनेक रामायणे, रामचरित्राचें माहात्म्य केवढें मोठें आहे, हें उत्तम प्रकारें पटवीत आहेत

रामचरित्राला आधारभूत सर्वमान्य ग्रंथ म्हणजे '**वाल्मीकिरामायण**' असून त्याची ग्रंथसंख्या २४००० श्लोक, इतकी आहे. या वाल्मीकीच्या रामायणानंतरही त्याच्याच आधारें रचलीं गेलेलीं अनेक संस्कृतरामायणें आज प्रसिद्ध असून त्या सर्वांत ब्रह्मांडपुराणांतर्गत '**अध्यात्मरामायणा**'नें अग्रस्थानाचा मान संपादिला आहे. अध्यात्मरामायणांत ठिक-ठिकाणीं श्रीरामकथानकाला अध्यात्माची सुंदर जोड दिली असून ज्ञानाबरोबर भक्तीची सुंदर सांगड घातली आहे. आणि याच गुणामुळें अध्यात्मरामायणाला विशेष मान्यता प्राप्त झाली आहे. पिढ्यानपिढ्या रामायणाचा श्रद्धापूर्वक नित्यशः पाठ करणारीं शेंकडो कुटुंबें महाराष्ट्रात आहेत, यावरूनही या ग्रंथाची लोकप्रियता दिसून येणारी आहे.

अध्यात्मरामायणाचीं आजवर अनेक भाषांतरे झाली असून त्याचा उपयोग त्या त्या परीनें रामायणभक्तास होत आहे. ह्या भाषांतरग्रंथांत प्रामुख्याने उल्लेख करण्यासारखा ग्रंथ म्हटला म्हणजे इ. स. १८९२ त आर्यसेवक छापखान्यात मूळासह छापून प्रसिद्ध केलेला, वेदशास्त्रसंपन्न रा. रा. **गोविंद विष्णु फडके** यांचा '**अध्यात्मरामायणार्थबोध**' हा होय. संस्कृत मूळ, सरळ शास्त्रीय पद्धतीचें भाषांतर, व विद्वत्ताप्रचुर अर्थद्योतक विपुल टीपा यायोगें संस्कृत व प्राकृत अशा उभयविधही वाचकास हा ग्रंथ विशेष संग्राह्य वाटावा, यांत नवल नाही. सांप्रत कित्येक वर्षे हा ग्रंथ दुर्मिळ होऊन भाविक जनास अशा प्रकारच्या ग्रंथाची उणीव अत्यंत भासत होती. ती उणीव भरून काढण्याचें श्रेय अखेर ग्रंथप्रकाशक रा. **केशव भिकाजी ढवळे** यांनीं घेतलें, आणि त्यांच्याच उद्योगाचे दृश्य फल म्हणजे प्रस्तुत भाषांतर होय. धार्मिक ग्रंथप्रकाशनाचे बाबतींत त्यांनी किती अमोल कामगिरी बजाविली आहे, हें महाराष्ट्रवाचकास सांगण्याची आवश्यकता नाहीं. संसारजन्य संकटपरंपरेच्या चरकांत पिळून जाण्याचे अनेक प्रसंग आले

असतां, त्यानीं धर्मग्रंथप्रकाशनद्वारा ज्ञानदानाचें आपलें कार्य चालू ठेविलें, या त्यांच्या वाङ्मयसेवेचें चीज केल्याशिवाय महाराष्ट्र राहणार नाहीं, असा मला पूर्ण भरंवसा आहे.

माझे स्नेही **प्रो. नरहर गणेश जोशी, एम्. ए,** यांनीं माझ्या इच्छेस मान देऊन आपल्या सुदर प्रस्तावनेनें या ग्रंथास सुशोभित केलें, याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहें. अध्यात्मरामायणातील तत्त्वज्ञान वगैरेसंबंधी त्यांनी प्रस्तावनेंत तुलनादृष्टीनें मार्मिक व सविस्तर विवेचन केलें आहे. त्यामुळें अर्थातच कित्येक किरकोळ गोष्टींचा उल्लेख व साहाय्य-कर्त्या मित्रांचें आभारप्रदर्शन, एवढीच कामगिरी मजकडे राहिली आहे.

कित्येक संस्कृत स्फुट काव्यांचीं मराठींत रूपातरें व क्वचित् तुरळक स्वतंत्र पद्यरचना यापलीं-कडे साहित्यक्षेत्रांत माझी मजल आजवर गेली नव्हती. परंतु परमेश्वरकृपेनें अध्यात्मरामायणा-सारख्या धर्मग्रंथाचें भाषांतर करण्याची सुसंधि प्राप्त होऊन मराठी वाङ्मयाची विस्तृत रूपात पुण्यप्रद व यशस्कर सेवा यथाशक्ति करण्याचा योग आला, ही परमभाग्याची गोष्ट होय. हें सर्व रा. **ढवळे** याच्या मजवरील कृपालोभाचें फळ होय, हें उघडच आहे.

या भाषातरांत वर संस्कृत श्लोक, खालीं मराठी भाषांतर, व त्याखालीं टीपा असा क्रम ठेविला आहे. टीपांत अनेक संस्कृतप्राकृत ग्रंथांतून सदृश उतारे घालण्यांत आले आहेत. हे उतारे भगवद्गीता, श्रीमद्भागवत, महाभारत, भावार्थरामायण, मोरोपंतांचें मत्ररामायण, केका-वलि, सदाचार, सोहिरोबानाथकृत सिद्धातसंहिता, ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, तुकाराम महाराजांचे अभग, यांमधून घेतले आहेत. त्यांवरून, विशेषतः भगवद्गीता, भागवत, भारत, यांमधील उताऱ्यांवरून अध्यात्मरामायणाची रचना या वरील ग्रथांनंतर बऱ्याच वर्षांनीं झाली असावी, ह्या अनुमानास बराच पुरावा मिळण्यासारखा आहे.

वर '**अध्यात्मरामायणार्थबोध**' पुस्तकाचा उल्लेख केलाच आहे. त्याचे कर्ते विद्वद्वर्य वे. शा. सं. रा. रा. **फडके**शास्त्री यांनीं भाषांतराचे कामीं अनेक सूचना केल्या, व आपल्या पुस्तकाची प्रतही दिली. या त्यांच्या सहानुभूतिपूर्वक मदतीबद्दल मी त्यांचा ऋणी आहें. तसेंच मुंबईवैभव प्रेसचे म्यानेजर, **भास्कर महादेव सिद्धये** यानीं सदर ग्रंथाचें काम ठरलेल्या मुदतींत ( विजया दशमी ) करून दिल्याबद्दल त्याचाही मी आभारी आहें.

शक्य ती काळजी घेऊनही छपाईचे, नजरचुकीचे, क्वचित् ठिकाणीं अज्ञानजन्यही दोष राहून गेले असण्याचा संभव आहे. तरी सहृदय वाचकांनी असे दोष माझ्या नजरेस आणल्यास मी त्यांचा अत्यंत आभारी होईन.

**भालचंद्र शंकर देवस्थळी.**



# प्रस्तावना.

कल्याणानां निधानं कलिमलमथनं पावनं पावनानाम् ।
पाथेयं यन्मुमुक्षोः सपदि परपदप्राप्तये प्रस्थितस्य ॥
विश्रामस्थानमेकं कविवरवचसां जीवनं सज्जनानाम् ।
बीजं धर्मद्रुमस्य प्रभवतु भवतां भूतये रामनाम ॥

हनूमन्नाटक.

प्रभु श्रीरामचंद्राचें चरित्र सर्वांनीं सर्व बाजूंनी आदरणीय अशाच स्वरूपाचें आहे, यात शका नाहीं. अगदीं लहान वयात विश्वामित्राच्या यज्ञाचें रक्षण करण्याची जबाबदारी अंगावर घेणें, पित्याला अन्यायाचरणाच्या पापांतून वाचविण्यासाठीं हाताशीं आलेले राज्य, अंगावरील वस्त्राला चिकटलेल्या पाचोळ्याप्रमाणे, सहज टाकून देण्यांत अतुल असा स्वार्थत्याग दाखविणें, व कुंभकर्णरावणाना मारून परत आल्यावर ' कुलधनैर्जनः अनुरंजनीयः, ' हें स्वत.चें कुलव्रत पाळण्यासाठीं सीतेचा त्याग करणे, वगैरे श्रीरामचरितांतील गोष्टी लोकांच्या मनावर कायमचा ठसा उमटविणाऱ्या आहेत. श्रीरामरायाचें असलें अलौकिक चरित्र गाण्याकरिता आद्यकवि वाल्मीकींनीं शतकोटिप्रविस्तर रामायण तर लिहिलेंच, परंतु, इतरानीं सुद्धा कोणी त्यांतील अद्भुत कथा गाऊन, तर कोणी सुखकारक गोष्टी तेवढ्याच गाऊन-अद्भुतरामायण, आनंद-रामायण, महारामायण, इत्यादि ग्रथाच्या रचनेनें स्वतःच्या वाणीला पवित्र करून घेतलें आहे. अलीकडील काव्यवाङ्मयात सुद्धा भासभवभूत्यादिकानीं रामकथा नाट्यद्वारा गाऊन, संस्कृत नाट्यवाङ्मय पुनीत केलें. मराठी भाषेमध्येंही मोरोपतानी १०८ वेळा रामकथा गायिली, एक-नाथानीं भावार्थरामायण लिहिलें; तुळशीदासाच्या मधुर रामायणकाव्याने हिंदी भाषा पवित्र झाली. अवतारी पुरुषाचीं चरित्रें निरनिराळ्या तऱ्हेनें पुनःपुन' घोकून घोकून गाण्यात त्यानी केलेलीं लोकोत्तर कृत्यें जनतेच्या डोळ्यांपुढें कित्त्यादाखल सारखीं खेळत राहावीं, एवढाच हेतु असतो, व या चरित्राचे धार्मिक दृष्ट्या समाह करण्याची वहिवाट आपणामध्यें पडली आहे, ती झाली तरी याच हेतूनें होय. परमेश्वराच्या ठिकाणीं भक्तिभाव कसा ठेवावा, त्याच्या चरणीं चित्ताचा लय करण्यास कसें शिकावें, याचा विचार करणारे पौराणिक स्वरूपाचे ग्रथ ( मुख्यतः ११ वा स्कंध ), श्रीभगवद्गीता, व अध्यात्मरामायण हे होत. वज्ञान आबालवृद्धांच्या पुढें नेहमीं राहावें, यांतील ज्ञानामृताची पोई

ठिकठिकाणी उघडली जाऊन भाविक मुमुक्षु जनांना हें अमृत पाजिले जावें, या उद्देशाने या ग्रंथांचीं अनेक मराठी भाषांतरें झालेलीं आहेत. प्रस्तुतचा प्रयत्न अध्यात्मरामायणाचें सरळ व सुबोध भाषातर मुळासकट सुटसुटीत स्वरूपांत लोकाच्या पुढें ठेवण्याच्या उद्देशानें केलेला आहे. अशा तऱ्हेच्या भाषातराच्या प्रस्तावनेंत वर उल्लेखिलेल्या श्रीमद्भागवत, श्रीगीता, व अध्यात्मरामायण या ग्रंथातील तत्त्वविचार साररूपानें व थोड्याशा तुलनेच्या दृष्टीनें, लोकांच्या पुढें माडल्यास तें अध्यात्मरामायणाच्या वाचकाना सोयीचेंच होईल, असें वाटल्या-वरून पुढील चार शब्द लिहिण्याचें योजिले आहे.

'कार्पण्यदोषोपहतस्वभाव' व 'धर्मसंमूढ' झालेल्या अर्जुनाला श्रेयःप्राप्तीचा मार्ग सागण्यासाठीं भगवंतानीं गीता उपदेशिली आहे. पिंडब्रह्माडाचें यथार्थज्ञान करून घेऊन, स्वतःच्या स्वार्थाचे क्षेत्र देहापुरतें, अगर कुटुंबातील माणसापुरतेच मर्यादित न ठेवता, त्याला विश्वव्यापकपणा आणून, आत्मौपम्यबुद्धीनें जगाकडे पहावयाचें, व मनाला सुखाच्या पाशात गुतूं न देता, अगर दुःखाच्या भाराखालीं चिरडूं न देता, मन एक प्रकारे निर्लेप करून, 'नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्तस्वभाव परब्रह्म माझ्या पामर-चित्ताला आकळितां येत नाहीं, म्हणून त्यानेच सगुणस्वरूपानें मजपुढें अवतार घेतला आहे,' अशी निर्गुण सगुण परमेश्वरस्वरूपाची मनाशीं सागड घालून, त्याच्या चरणीं अर्पण करण्याच्या बुद्धीनें प्रवाहपतित कर्मे करीत रहाणे, हेंच भगवद्गीतेचें मुख्य सार होय. निर्लेप मनानें कर्मे करण्याची युक्ति—पारा मारून ज्याप्रमाणें त्याचें रसायन बनवितात, त्याप्रमाणें कर्मांचा, मनुष्याला संसारचक्राच्या जाळ्यांत अडकविणारा बंधनकारक, स्वभाव नाहींसा करून त्या कर्मांनाच आपल्या सेवेला जुंपण्याचा मार्ग—म्हणजे गीतेनें सांगितलेला योग होय. 'स्वतःचे कार्य कर्म, कर्मफळाचा आश्रय न करिता जो करितो तोच योगी, त्यालाच संन्यासी म्हणावें. घरामधील अग्निहोत्र काढून टाकून शिखायज्ञोपवीताचा त्याग केल्यानें किंवा कांहींएक न करितां हातपाय जोडून स्थाणुवत् स्तब्ध बसल्यानें संन्यास सिद्ध होत नाहीं,' असे भगवान् सहाव्या अध्यायाला आरंभ करतांना कंठरवाने सांगतात. निवाऱ्याच्या जागीं ठेविलेल्या दिव्याची ज्योत ज्याप्रमाणे स्थिर राहाते, हालत नाहीं, त्याप्रमाणेच योग्याच्या चित्ताची स्थिति असते. श्रीसमर्थ रामदासस्वामींनीं छाटींत काढून ठेविलेल्या व पुन्हा अंगावर घेतलेल्या हिंवतापाप्रमाणे विषयात गुंतणारें मन ज्याला बाजूला ओढून घेता येतें, व योग्य ठिकाणीं स्वेच्छेनें प्रेरिता येतें, ज्याला यमही साधतो, व नियमही साधतो इंद्रियें ज्याच्या आधीन सेवकासारखीं रहातात, मनांतील सर्व सकल्पाचा न्यास करून मन ज्याला शून्य बनविता येतें, त्याला एक प्रकारें ज्याला अभावरूप बनवितां येतें, तो योगी भगवा कपडा, भगवी छाटी, या अंतरंगाच्या शुद्धीच्या निदर्शक अशा बाह्य खुणा होत. ब्रह्मचाऱ्याला द्विजत्व प्राप्त झाल्याची खूण म्हणजे जसे यज्ञोपवीत, स्त्रियांच्या सौभाग्याची खूण जशी त्याचें मंगलसूत्र, त्याप्रमाणें समतेची खूण अंतरीं बाणल्याचें बाह्य चिह्न म्हणजे भगवा वेष होय. खरा संन्यास मनातील संकल्पाचा आहे.

**काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः.**

असल्या तऱ्हेच्या वचनांत भगवंतांनी हेंच सागितले आहे. या वचनावरील टीकेंत यथार्थ-दीपिकाकार वामनपंडित म्हणतात—

**' काम्यत्याग केलियावरी। संन्यासें आश्रम तदुपरी।**
**तरी काम्या त्यागी त्याची शिखा दोरी। काय खाऊं मागते।"**

पिंडब्रह्मांडाचें यथार्थ ज्ञान झालें तरी लोकसंग्रहाच्या इच्छेनें, लोकांची दिशाभूल होऊं नये म्हणून, या समबुद्धि पुरुषानें देहपातापर्यंत लोकदृष्ट्या व्यावहारिक कर्मे करीत रहावयाचे आहे. कर्मत्यागांतील संकल्पन्यासाचें रहस्य ज्यांच्या गळीं उतरलेलें नाहीं, अशा लोकाची कर्मशून्यता स्वतः उदाहरण घालून देऊन वाढूं न देता, पिशाचाच्या हातात कोलीत देऊन धर्मोच्छेद न करिता, अज्ञजनाना अधिकार प्राप्त होईपर्यंत, स्वतःच्या वर्तनानें त्यांना गोंधळून टाकावयाचे नाहीं, येवढी गोष्ट या समबुद्धि पुरुषानें संभाळावयाची आहे. अशा तऱ्हेनें स्वधर्माचरण निर्हेतुक बुद्धि धरून करीत रहाणें व केलेलें कर्म ईश्वरार्पणबुद्धीनें करणें, हें आम्हांस स्वीकारिता आलेलें गीतेचें तात्पर्य होय. आतां स्वधर्माचरण करीत रहाणें, असें म्हटल्यावर स्वधर्म म्हणजे काय तें पाहणें ओघानें येतें. म्हणून त्याचाही थोडक्यात विचार करूं.

श्रीमच्छंकराचार्यांनी, आपलें गीतेवरील भाष्य लिहितांना धर्माची एक व्याख्या प्रस्ताव-भाष्यामध्यें लिहून ठेविली आहे. शंकराचार्य म्हणतात—

**' जगतः स्थितिकारणं प्राणिनां साक्षादभ्युदयनिःश्रेयसहेतुर्यः स धर्मः। '**

जगताचें पालन ज्याच्यामुळें होतें व जो मानवजातीच्या ऐहिक व पारमार्थिक कल्याणाला कारणीभूत होतो, तो धर्म 'Life is motion' अशी मनुष्याच्या आयुष्याची व्याख्या Ward सारखे पाश्चात्य समाजशास्त्रज्ञ करितात. आपणही समाजाला जगत्–चालणारा, हलणारा, एका निश्चित ध्येयाकडे जाणारा,–असें म्हणून हीच व्याख्या आगाऊ करून ठेविलेली आहे. ईश्वराच्या प्रेरणेनें नियमित तऱ्हेनें निश्चित ध्येय गाठण्यासाठीं भ्रमण करीत असलेलें हें संसारचक्र नीटपणाने फिरत रहावे, हें ईश्वरी कार्य पुढें नीट चालावें, एवढ्यासाठीं मनुष्याने व्यक्तिशः व समाजाचा–मनुष्यसंघाचा–एक घटक, या नात्यानें त्याला करावीं लागणारीं ओघप्राप्त कर्मे करीत रहाणे, हेंच स्वधर्माचे आचरण होय. जन्मतःच बरोबर घेऊन आलेलें ऋणत्रय व्यक्तिशः व संघशः फेडीत रहाणें यालाच स्वधर्माचरण म्हणतात. व्यक्तीनें व्यक्ति म्हणून आचरावयाचा धर्म हा आश्रमधर्म–व्यक्तिधर्म हा आश्रमधर्म–होईल, व संघाने मिळून आचरावयाचा धर्म हा वर्णधर्म–समष्टिधर्म हा वर्णधर्म–होईल. या वर्णधर्मांचें व आश्रमधर्मांचें–वर्णाश्रमधर्मांचें–महत्व लोकाच्या मनावर ठसविण्यासाठीं, वर्णाश्रमधर्म आचरताना कांहीं वेळ आश्रमधर्म वर्णधर्माच्या आड येतो, दोन्ही एकसमयावच्छेदेंकरून साधतां येत नाहींत, अशा वेळीं काय टाकावें, काय घ्यावें, दोन सारख्याच उपकारक गोष्टींपैकीं एक टाकल्याशिवाय

दुसरी हाताला लागत नाहीं, असा प्रसंग आल्यास कोणती टाकावी ? '**सर्वनाः समुत्पन्ने अर्धं त्यजति पण्डितः**' या तत्त्वाचा अवलंब करण्याचा प्रस आल्यास कोणतें अर्ध टाकावें, याचा तारतम्यभाव शिकविण्यासाठीं गीताधर्मा अवतार आहे. प्रत्येक मनुष्यानें वर्णाश्रमधर्माचें आचरण करावें, व ज्या प्रसं या दोहोंत विरोध येईल, तेथे आश्रमधर्म क्षणभर बाजूला ठेवून–सर्वस्वीं टाकून नं वर्णधर्म साभाळावा, ईश्वराच्या प्रेरणेनें चाललेल्या या जगाच्या सुस्थितीसाठीं, न्या कार्यासाठीं–न्याय्य कार्यासाठीं झगडल्यानें समाज सुस्थितींत राहूं शकतो–समाजधारणेसा धारणात्मक धर्म पाळण्यासाठीं, ईश्वरार्पणबुद्धीनें, निर्हेतुक मनानें झटावें, हें गीतेनें सागि आहे. ज्याचें चित्त शुद्ध तो न्याय्य कार्यासाठीं झगडताना कधींच कचरत नाहीं. स्वत.चा क्तिक स्वार्थ त्याच्या मनावर कधींच पगडा बसवीत नसल्याकारणानें शुद्धचित्त माणसा हातून नेहमीं न्याय्यच आचरण होऊ शकते. सर्व भूतांच्या ठिकाणी भगवद्भाव राखून, सर्व हितरहित हें अंतिम ध्येय ठेवून, निर्विकार बुद्धीनें समाजधारणेचें ईश्वरी कार्य त्याच्याच प्रे व त्याच्या चरणीं अर्पण करण्याच्या बुद्धीनें पुढें ढकलीत राहाणे, हेंच गीतेतील कर्मयोग कार्य होय. यात मनाची समता साधणें हें अत्यंत दुर्घट कार्य साधावयाचे आहे. संन्यास ब्रह्मात्मैक्यता मिळवूं इच्छिणाऱ्या पुरुषाला ज्याप्रमाणे शास्त्रकार एक प्रकारचे अनुबंधच सागतात, तशाच स्वरूपाचे अनुबंध कर्मयोगालाही आहेत. खरा सन्यास जसा वाटेव अलबत्या गलबत्याला साध्य होऊ शकत नाहीं, तसाच कर्मयोगही वाटेल त्याला सा असें नाहीं. मंडईतील माळणीनें भाजी विकताना तागडीला झोका न देता इमानानें गि काला माप देणें, गवळ्यानें दुधात पाणी न घालता कोरें दूध विकून सचोटी राखणे, रानें सोन्यांत हीण न मिसळता बावनकशी माल देऊन शहाजोगपणाचा व्यवहार म्हणजे कर्मयोग नव्हे. कर्मयोगाला इतक्या हलक्या पायरीला ओढणें, म्हणजे एव कर्मयोगाच्या रहस्याबद्दल पूर्ण अज्ञान प्रकट करणे होय, किंवा तसें नसेल तर गाची हेटाळणी करण्याच्या उद्देशानें त्याच्या मूलभूत तत्त्वाकडे जाणूनबुजून डोळा करणें, व दाभिकपणानें खोटें अज्ञान पाघरणें होय, असे म्हणावें लागेल. एकदा करून घेतलेले ग्रह काढून टाकून, एकाद्या गोष्टीकडे निर्विकार बुद्धीनें पाहून पातीपणानें खरें खोटें ठरविणें, ही गोष्ट सामान्य व्यवहारात सुद्धां किती कठिण जाते, हें घेतलें, तर कार्य अजीबात खुटवून टाकणारें–कार्याला व्याघात करणारे–राजस ममत्व देणें, ही गोष्ट किती दुर्घट असेल, याची कल्पनाच करणें बरें ! असला दुर्घट कर्मयोग रिताना ईश्वरावर जी निष्ठा ठेवावयाची, तिलाच भक्ति असें म्हणतात. भक्तीच्य व्याख्या पुष्कळ ठिकाणीं आढळतात. परंतु '**या भक्तिः सा परानुरक्तिरी**' '**तदर्पिताखिलाचारता, तद्विस्मरणे परमव्याकुलता च ।**' या नारदानीं व्याख्यात भक्तीचे सर्व रहस्य आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. श्रीरामानुज '**ध्यानं**' '**ध्रुवा स्मृतिः**' या नांवाखालीं उपासना, निदिध्यासन, यांचें वर्णन

'**ध्यानं तु अविच्छिन्नतैलधारावत्स्मृतिसंतानरूपम्**' असले शब्द त्यांच्या ब्रह्म-सूत्रांवरील भाष्यांत '**वाक्यार्थज्ञानोपयोगीनि श्रवणमनननिदिध्यासनानि ।**' या विषयाच्या अनुरोधानें घातलेले आहेत. या व्याख्या पहातांना त्यांचा निष्कर्ष एवढाच निघतो कीं, परमेश्वराचें एकभावाने ध्यान करीत करीत तद्रूप तदाकार तन्मय होणे, म्हणजेच परमेश्वराची भक्ति होय.ज्याच्या त्याच्या धारणासामर्थ्यानुसार परमेश्वरस्वरूप-अनाद्यनंत, चिन्मय,निराकार, निर्गुण परमेश्वर-निरनिराळया व्यक्तीला निरनिराळ्या स्वरूपात प्रतीत होईल. कोणाला भगवान् श्रीविष्णूच्या चरणांवर काळ्या तुळशीच्या मंजिऱ्या वाहून त्याचें ध्यान करावेंसें वाटेल, श्रीशंकराच्या पिंडीवर ताबूस वर्णाचीं कोंवळीं कोंवळीं बिल्वपत्रें वाहून, आम्रमंजिऱ्यानीं त्याची पूजा करण्यांत कोणी तल्लीन होईल, कोणाला श्रीगजाननाच्या मूर्तीवर हिरव्याचार रंगाच्या दूर्वा वाहाव्याशा वाटतील, कोणी महिषासुरमर्दिनीचे भक्त देवीपुढें पशूंचा बळी देण्यात जन्माचें सार्थक मानतील, कोणी गायत्रीपुरश्चरण करून सूर्याचें ध्यान करितील, तर कोणी पंचायतन-स्वरूपानें या पाची जणाची पूजा करितील. कोणी कसल्याही स्वरूपात परमेश्वराचे अस्तित्व मानो, परमेश्वराच्या ठिकाणी प्रेम-आदर-ही गोष्ट सर्व ठिकाणीं सारखी आहे. दुसऱ्यावर प्रेम करणें, म्हणजे एक प्रकारें दुसऱ्यासाठीं स्वतःला विसरणें होय. दुसऱ्यासाठीं स्वतःला विसरणें-स्वत ला परमय बनविणें-ज्याच्यावर भक्ति करावयाची त्याच्यामध्ये जवळ जवळ स्वतःचे रूपातर करणे-ही गोष्ट जितक्या जितक्या अधिक सुलभतेनें मनुष्य करील, तितका तितका त्याच्या प्रेमाचा कस अधिकाधिक मानला जाईल. आपल्या जगातील व्यवहारात मनुष्याला पितापुत्र, मातापुत्र बहिणभाऊ, पतिपत्नी, इत्यादि अनेक प्रकारच्या नात्याच्या सबंधात वागावें लागते, व यामध्ये मायलेंकराचे नाते प्रेमाच्या दृष्टीनें सर्वश्रेष्ठ समजतात, त्याचें कारण झालें तरी हेंच होय. आई मुलाकरिता स्वत.ला जितक्या सुलभतेनें विसरू शकते, तितका बाप मुलासाठीं, बहीण भावासाठीं, भाऊ बहिणीसाठीं, अगर पतिपत्नी परस्परासाठीं विसरू शकत नाहींत. मातेच्या प्रेमात स्वार्थशून्यता ही सर्वांत अधिक आहे, आणि म्हणूनच '**कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति,**' असा उद्गार श्रीमच्छंकराचार्यांना सुद्धा काढावा लागला. तुकाराम, ज्ञानेश्वर इत्यादि भक्तिमार्गाच्या आधुनिक प्रवर्तकानीं पांडुरंगाला 'विठाई माउली' म्हणून संबोधिले आहे, यातले बीज हेंच होय असल्या या भक्तिमार्गाचे-भक्ताचे व देवभक्ताच्या संबंधाचे-वर्णन गीतेमध्यें ठिकठिकाणी व विशेष विस्ताराने बाराव्या आणि नवव्या अध्यायांत आलें आहे. भगवान् म्हणतात.—

**'अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च**
**निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥**
**संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मे भक्तः स मे प्रियः ॥'**

'कोणाचाही द्वेष न करणारा, सर्व प्राणिमात्राशी मित्रभावानें वागणारा, दयाशील अंतःकरणाचा, 'मी, माझें, मला,' या भावना ज्याच्या नष्ट झाल्या, ज्याच्यामधील अहंकारवृत्ति लोपली,

जो सुखदुःखांना एकाच मापानें मोजावयास शिकला, क्षमाशीलवृत्ति ज्याच्या अंतरंगांत बाणली, जो सदाचा संतुष्ट, असंतोष ज्याच्या मनाला कधीं शिवत नाहीं, स्वतःच्या इंद्रियवृत्ति व मन ज्याला ताब्यांत ठेवितां येतात, ज्याचा निश्चय दृढ आहे, व ज्याने आपलें मन व बुद्धि मला वाहिलीं आहेत, असा जो माझा भक्त तो मला प्रिय होय.' बाराव्या अध्यायांत भगवंतानीं श्लोक १३–२० मध्यें भक्ताचे वर्णन दिलें आहे, त्यांतील हा उतारा आहे. नवव्या अध्यायांतही भक्तीचें व भक्ताचें वर्णन आलें असून 'अनन्यभावानें माझी भक्ति करून, माझें चिंतन करून जे लोक माझी उपासना करितात, त्यांच्या योगक्षेमाचा भार मी वाहतो,' असें भगवंतांनीं तेथें सांगितलें आहे. भगवन्नामापाशीं जात नाहीं, गोत नाहीं; दरिद्री नाहीं, श्रीमंत नाहीं; लहान नाही, थोर नाहीं, स्त्री नाहीं, पुरुष नाहीं. एक अंत करणाचा अनन्य-भाव असला म्हणजे–भगवंताला सर्वस्व अर्पण करण्याची बुद्धि असली म्हणजे–त्या अनन्य भक्तापाशीं चारी मुक्ति हात जोडून सेवेला उभ्या रहातात, आणि म्हणूनच संतशिरोमणि महाभगवद्भक्त श्रीतुकाराममहाराज म्हणतात.—

**लागोनियां पायां, विनवितों तुम्हांला । करें टाळी बोला, मुखीं नाम ॥**
**कृष्ण विष्णू हरी गोविंद गोपाळ । मार्ग हा प्रांजळ, वैकुंठींचा ॥'**

साराश, श्रीज्ञानेश्वराच्या भाषेत बोलावयाचे झाल्यास—

**'कां घरिचियां उजेडु करावा । पारिखिया अंधारु पाडावा ।**
**हें नेणेचि गा पांडवा । दीपु जैसा ॥**
**जो खांडावया घाव घाली । कीं लावणी जयानें केली ।**
**दोघां एकचि साउली । वृक्षु दे जैसा ॥**
**नातरी इक्षुदंडु । पाळी तया गोडु ।**
**गाळी तया कडु । नोहेचि जेवीं ॥ ( १२–१९८–२००**
**माधुर्ये चंद्रिका । सरिसी राया रंका ।**
**तैसा जो सकळिकां । भूतां समु ॥ ( १२–२०४ )**

असली साम्यबुद्धि ज्याच्या वृत्तींत उत्पन्न झाली, अर्थात्—

**'कर्मेंद्रियें सुखें । करिती कर्मे अशेखें ।**
**जियें कां वर्णविशेखें । भागा आलीं ॥**
**विधीतें पाळित । निषेधातें गाळित ।**
**मज देऊनी जाळित । कर्मफळें ॥ ( १२–७६,७७ )**

याप्रमाणें विध्युक्त कर्मे करून, निषिद्ध कर्मे टाळून, पुन्हां कर्मफलांपासून जो अलिप्त राहतो, तोच भक्त, तोच योगी, इतकेंच काय पण, श्रीभगवान् म्हणतात—

**'ते तीर्थ, ते क्षेत्र । जगीं तेचि पवित्र ।**
**भक्तिकथेसि मैत्र । जयां पुरुषां ॥**

**आम्ही तयांचें करूं ध्यान। तेचि आमुचें देवतार्चन।**
**तेवांचूनि आन। गोमटें नाहीं॥**
**तयांचें आम्हां व्यसन। तें आमुचें निधिनिधान।**
**किंबहुना समाधान। ते मिळती तैं॥ (११,३५-३७)**
**तयांचिया गुणांचीं लेणीं। लेववूं आपुलिये वाणी।**
**तयांची कीर्ति श्रवणीं। आम्ही लेवूं॥**
**तो पहावा हे डोहळे। म्हणोनि अचक्षूसि मज डोळे।**
**हातींचेनि लीलाकमळें। पूजूं तयातें॥**
**दोंवरी दोनी। भुजा आलों घेउनी।**
**आलिंगावयालागुनी। तयाचें अंग॥ (११,२२-२४)**

असो. श्रीमद्भगवद्गीतेंत भक्ताचें लक्षण जे सांगितलें आहे, त्याचे व गीतेंतील तत्त्वविषयांचें अत्यंत त्रोटक असें विवेचन आतापर्यंत आपण केलें. गीतेनें सांगितलेलीं कर्मयोगाचीं व भक्तीचीं हींच तत्त्वें सांगण्याकरितां श्रीमद्भागवत, अध्यात्मरामायण ( मुख्यत: रामगीता, व निरनिराळ्या प्रसंगीं आलेलीं रामहृदय, वसिष्ठस्तोत्र, शबरीस्तोत्र, अहिल्यास्तोत्र, इत्यादि स्तोत्रें ) इत्यादिकांचा अवतार आहे. तेव्हां विषयाच्या सोयीसाठीं गीतेंतील तत्त्वांचा वरीलप्रमाणें अत्यंत अल्प असा सारांश–पुष्कळास कदाचित् अपुरा वाटणारा सारांश–सांगितल्यावर आतां आपण श्रीमद्भागवत व अध्यात्मरामायण या ग्रंथांकडे वळूं.

श्रीमद्भागवत हा ग्रंथ म्हणजे भगवद्भक्तीच्या माधुरीनें ओथंबलेलें एक अत्यंत रसाळ काव्य आहे. भावाचा भुकेला भगवंत, भक्ताचा आर्तस्वर ऐकताच त्याच्या हांकेला कसा धावतो, अतरींचा भाव शुद्ध असला, म्हणजे कोरड्या खांबांतही परमेश्वर कसा प्रतीत होतो, भगवद्भक्तीनें, शुद्धांतःकरणानें, परमेश्वराच्या मोगल्यावर निष्ठा ठेवल्यानें, परमेश्वर माझा उद्धारच करील असा अंतरंगात दृढ विश्वास बाळगिल्यानें, मनुष्यच तरतो असें नव्हे, तर गजेंद्रासारख्या पशुयोनींतील प्राण्याचाही उद्धार कसा होतो, हें श्रीमद्भागवतांतील निरनिराळ्या कथावरून उत्तम प्रकारें प्रतीत होतें. कौरवपांडवाच्या युद्धाचा एक प्रकारें रुक्ष असा इतिहास गाऊन थकल्याभागल्या वाणीला, भगवंताच्या चरित्रगायनानें प्रेमामृताचा ओलावा आणण्यासाठीं, श्रीनारदमहर्षींच्या उपदेशावरून व्यासानीं भागवतरचना केली. नाथमहाराज म्हणतातः—

**न करितां नाना व्युत्पत्ति। सुगमोपायें ब्रह्मप्राप्ति।**
**अबलें तारावया निश्चितीं। भगवंतें निजभक्ति प्रगट केली॥**
**तें हें राया भागवत जाण। मुख्यत्वें भक्ति प्रधान।**
**भावें करितां भगवद्भजन। अज्ञान जन उद्धरिती॥**
**हें भागवत नव्हे नव्हे। अज्ञानालागिं निजपव्हे।**
**भवाब्धि तरावया भजनभावें। महानाव देवें निर्माण केली॥**

**भागवताचे महानावे । जे रिघाले भजनभावें ।**
**त्यांसि भवभयाचे हेळावे । भजनस्वभावें न लागती ॥१,३१६-१९**

व्यासवाणीच्या सरोवरांत निर्माण झालेल्या भारतपंकजाचा अत्युत्कट गंध म्हणजे जशी श्रीमद्भगवद्गीता, तशीच निगमागमांच्या कल्पतरूवरून पक्क होऊन खालीं गळून पडलेल्या श्रीमद्भागवत या रसाळ अमृतफळाची माधुरी म्हणजे उद्धवगीता–अर्थातच् एकादशस्कंध–ही होय. यातच हंसगीत, भिक्षुगीत, ऐलगीत, यांचा अंतर्भाव होतो. जगात डोळे उघडे ठेवून वागल्यास मनुष्याला प्रत्येक प्राणिमात्रापासून काहींना काहीं तरी शिकण्यासारखें आढळतेंच, हें सागण्याकरितां अवधूताचा इतिहास व त्यानें चोवीस गुरु केल्याची कथा, भागवतांत सांगितली आहे. एकादश स्कंधाच्या दुसऱ्या व तिसऱ्या अध्यायात ऋषभपुत्रांचा व जनकाचा संवाद दिला आहे त्यातील भागवताचीं लक्षणें पहाण्यासारखीं आहेत. श्रीमद्भगवद्गीतेमध्यें दुसऱ्या अध्यायात अर्जुनानें भगवंताला स्थितप्रज्ञाचीं लक्षणे विचारिलीं आहेत, व चवदाव्या अध्यायांत मुमुक्षूनें त्रिगुणातीत कसें व्हावें असा प्रश्न केला आहे. अर्जुन म्हणतोः—

**'स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव ।**
**स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ॥ २–५४**
**कैर्लिंगैस्त्रीन् गुणानेतानतीतो भवति प्रभो ।**
**किमाचारः कथं चैतांस्त्रीन् गुणानतिवर्तते ॥':–१४–२१**

श्रीकृष्णानीं या अर्जुनाच्या प्रश्नाना पुढील उत्तरें दिली आहेत–

**'दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।**
**वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥'**
**'यः सर्वत्रानभिस्नेहः तत्तत्प्राप्य शुभाशुभम् ।**
**नाभिनंदति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥' २,५६–५७**

हें उत्तर स्थितप्रज्ञाच्या बद्दलचें झालें. त्रिगुणातीताबद्दल बोलताना भगवान् म्हणतात—

**'समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकांचनः ।**
**तुल्यप्रियाप्रियो धीरः तुल्यनिंदात्मसंस्तुतिः ॥**
**मानापमानयोस्तुल्यः तुल्यो मित्रारिपक्षयोः ।**
**सर्वारंभपरित्यागी गुणातीतः स उच्यते ॥' १४–२४–२५**

बाराव्या अध्यायातील भक्ताचीं लक्षणें मागें दिलींच आहेत. स्थितप्रज्ञ काय, एकांतभक्त काय, किंवा त्रिगुणातीत काय, तिघानीं चित्ताचें समत्व साधावयाचें आहे. स्थितप्रज्ञानें

**'नाना दुःखीं प्राप्ती । जयासि उद्वेगु नाहीं चित्तीं ।**
**आणि सुखाचिया आर्ति । अडपेजेना ॥**

अशा स्थितींत असलें पाहिजे, तर भगवंताचा अनन्य भक्तही पण—

' तुल्यनिंदास्तुतिर्मौनी संतुष्टो येन केन चित् ' किंवा
' यदृच्छालाभसंतुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः । '

असा असला पाहिजे. भगवद्भक्त, स्थितप्रज्ञ व त्रिगुणातीत याची लक्षणें याप्रमाणें एके ठिकाणीं केलीं, तर त्यावरून असें स्पष्ट दिसते कीं, थोड्याफार शाब्दिक फरकानें एकच लक्षण भगवंतानीं तीन्ही ठिकाणीं सांगितले आहे. समत्व आंगी बाणल्यानेंच बुद्धि शुद्ध होऊं शकते, समत्वानें परमेश्वरभक्ति सुलभ होते, व समत्वाच्या योगानेंच परमेश्वराची गुणमयी माया तरून जाऊन त्रिगुणातीत होता येतें, असा भगवंताचा आशय या ठिकाणीं स्पष्ट दिसतो. आतां, भागवतातील भक्ताचीं लक्षणे पाहिलीं तर तेथेही हेंच दिसून येतें. अर्जुनानें गीतेंत विचारिलेल्या प्रश्नासारखाच प्रश्न या ठिकाणीं जनकाने ऋषभपुत्राना विचारिला आहे. राजा म्हणतो—

' अथ भागवतं ब्रूत यद्धर्मो यादृशो नृणाम् ।
यथा चरति यद्‌ब्रूते यैर्लिंगैर्भगवत्प्रियः ॥ ' ११-२-४४

नाथ म्हणतात—

' विदेह म्हणे स्वामी मुनि । पूर्ण प्राप्ति आकळोनि ।
ते भक्त कैसे वर्तती जनीं । तीं लक्षणें श्रवणीं लेववा मज ॥
त्यांचा कोण धर्म कोण कर्म । कैसे वर्तती भक्तोत्तम ।
हृदयीं धरोनि पुरुषोत्तम । त्यांचें बोलतें वर्म तें कैसें ' ॥ ३३१ ॥

यावर ऋषभपुत्रांपैकी हरि नांवाच्या ऋषीनें राजाच्या प्रश्नाला उत्तर दिलें आहे, तेंही गीतेंतील उत्तरासारखेंच आहे. हरि म्हणतो—

' सर्वभूतेषु यः पश्येद्भगवद्भावमात्मनः ।
भूतानि भगवत्यात्मन्येष भागवतोत्तमः ॥ २-४५
गृहीत्वाऽपींद्रियैरर्थान् यो न द्वेष्टि न हृष्यति ।
विष्णोर्मायामिदं पश्यन् स वै भागवतोत्तमः ॥ २-४८
न कामकर्मबीजानां यस्य चेतसि संभवः ।
वासुदेवैकनिलयः स वै भागवतोत्तमः ॥ ' २-५०

एकनाथ महाराजांच्या भाषेंत सांगावयाचे तर—

' सर्वां भूतीं भगवंत पाहीं । भूतें भगवंताचे ठायीं ।
हें अवघें देखे जो स्वदेहीं । स्वस्वरूपें पाहीं स्वयें होय ॥ ६४४ ॥
तो भक्तांमाजी अतिश्रेष्ठ । तो भागवतांमाजि वरिष्ठ ।
त्यासि उत्तमत्वाचा पाट । अवतार श्रेष्ठ मानिती ॥ ६४५ ॥

जैशा घृताचिया कणिका । घृतेंसीं नव्हेति आणिका ।
तेंवी भूतभौतिकव्यापका । भिन्न देखा कदा नव्हती ॥ ६४७ ॥
इंद्रियें विषयातें सेविती । परी सुखदुःख नुमटे चित्तीं ।
विषय मिथ्यात्वें देखती । ते जाण निश्चितीं उत्तम भक्त ॥ ६५६ ॥
स्वप्नींचें केळें राय भोगे । जागा होऊनी खावों मागे ।
तेणें हातु माखे ना तोंडीं लागे । तेंवी विषयसंगें हरिभक्त ॥ ६५९ ॥
इत्यादि संसारदेहधर्म । ज्यासि स्पर्शो न शके कर्माकर्म ।
मोहो कदापि नव्हेचि भवभ्रम । तो भक्तोत्तम प्रधानत्वें ॥ ६९० ॥
ऐसा जो निष्कामनिष्ठु । तोचि भागवतामाजि श्रेष्ठु ।
त्यासिचि प्रधानत्वें पाटु । जाण तो वरिष्ठु उत्तमत्वें ' ॥ ६९७ ॥

( नाथभागवत, अध्याय २ रा. )

अशा प्रकारें भगवद्भक्ताचे लक्षण सांगून श्रीनाथमहाराजांनीं देवभक्ताच्या प्रेमळ नात्याचें रसाळ विवरण केलें आहे. परतु विस्तारभयास्तव तें सर्व वर्णन न घेता त्यातील चारदोन ओंव्याच येथे घेऊं, नाथ म्हणतातः—

' समूळ देहाभिमान झडे । तो देहीच देवास आवडे ।
ते भक्त जाण वाडेकोडें । लडिवाळे हरीचे ॥ ७११ ॥
जो जिकडे जिकडे जाये । देव निजांगें तेउता ठाये ।
भक्त जेउती वास पाये । देव ते ते होय पदार्थ ॥ ७१३ ॥
त्यांसि झणिं कोणाची दृष्ट लागे । यालागिं देवो त्यापुढें मागें ।
त्याभोंवता सर्वांगें । भक्तीच्या पांगें भुलला असे ॥ ७२४ ॥
निरभिमानाचेनि नांवें । देव निजांगें करी आघवें ।
जेवीं कां तान्हयाचेनि जीवें । जिवेंभावें निजजननी ॥ ७२५ ॥
या काकुळती श्रीअनंतु । ऐक्यभावें करी निजभक्तु ।
मग देवो भक्त दोहींआंतु । देवचि नांदतु स्वानंदें ॥ ७१८ ॥
एवं आपुली आपण भक्ति । करीतसे अनन्यप्रीतीं ।
तेंचि निरूपण वेदांतीं । अद्वैतभक्ति या नांव ' ॥ ७१८ ॥

( नाथभागवत, अध्याय २ रा. )

श्रीमद्भागवतातील भक्तीचे स्वरूप याप्रमाणें आहे. श्रीमद्भगवद्गीता व श्रीमद्भागवत या दोन्हीं ग्रंथांतील भक्तिमार्गाचें स्वरूप जें वर दिलें आहे, त्यावरून हा भक्तिमार्ग आधळा नाहीं, डोळस भक्तिमार्ग आहे, निर्गुणसगुणाचे, परमेश्वराच्या अतर्क्य स्वरूपाचें ज्ञान करून घेण्याचा प्रयत्न झाल्यानंतर, अचिंत्य परब्रह्माचें चिंतन करून करून बुद्धि थकल्यानंतर, श्रांत चित्तानें, श्रद्धेच्या भावनेनें, परमेश्वरचरणीं लीन होण्याचा हा मार्ग आहे, ही गोष्ट स्पष्ट झाली असेलच. श्रीमद्भगवद्गीता व श्रीभागवत यांच्यांतील साम्य दर्शविणाऱ्या दुसऱ्या गोष्टी म्हणजे उद्धवाला

सांगितलेला विभूतियोग, भगवंताच्या मायेचें वर्णन, सृष्ट्युत्पत्तीची प्रक्रिया वगैरे होत. विभूतियोग तर, श्रीकृष्णार्जुनसंवादाचें नांव उच्चारून, तोच विभूतियोग मीं तुला सांगतों, असें सांगून, सांगितलेला आहे. तसेच, शांतिपर्वामध्यें भीष्माचार्यांनीं धर्मराजाला सांगितलेल्या मोक्षधर्माचा अनुवादही भागवतात आहे. श्रीगीतेंत ज्याप्रमाणें कृष्णांनीं अर्जुनाला विचारिलें कीं,

**' कच्चिदेतत् श्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा । '**

त्याचप्रमाणे या ठिकाणीं उद्धवाला एकादशाच्या २९ व्या अध्यायात भगवंतानीं प्रश्न केला कीं,

**' अप्युद्धव त्वया ब्रह्म सखे समवधारितम् ।**
**अपि ते विगतो मोहः शोकश्चापि मनोभवः ' ॥**

गीतेंत अर्जुनाला, त्याचप्रमाणें भागवतात उद्धवालाही पण ' हें गुप्त ज्ञान तूं नास्तिकाला, अभाविकाला, सांगूं नकोस ' असें सांगितलें आहे असो. श्रीमद्भगवद्गीता, व भागवत यातीलच तत्त्वज्ञान व भक्तिमार्ग अध्यात्मरामायणात कसा आला आहे, तें आपण आतां पाहू.

तत्त्वविवेचनाच्या दृष्टीनें अध्यात्मरामायणाचें सार म्हणजे उत्तरकांडाच्या पांचव्या सर्गात वर्णिलेली श्रीरामगीता होय अध्यात्मरामायणाच्या सुरवातीस दिलेले अध्यात्मरामायणमाहात्म्य जो कोणी लक्ष्यपूर्वक वाचील, त्याला रामगीतेचेंच माहात्म्य त्यात अधिक वर्णिलेलें दिसेल

**' सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनंदनः ।**
**पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत् ॥ '**

हें वर्णन ज्याप्रमाणें भगवद्गीतेच्या माहात्म्यात आढळते, तसेच—

**' रामेणोपनिषत्सिंधुमुन्मथ्योत्पादितां मुदा ।**
**लक्ष्मणायार्पितां गीतासुधां पीत्वामरो भवेत् ' ॥–सर्ग १. ४८**

असलें रामगीतेचे वर्णनही अध्यात्मरामायणात दिलेले आहे. रामगीता व उद्धवगीता यासारख्या गीतावर भगवद्गीतेची इतकी दाट छाया पडलेली नजरेस आली म्हणजे भगवद्गीतेच्या लोकप्रियतेची साक्ष पटते, व एक प्रकारचा साभिमान आदर जागृत होतो, यात शंका नाहीं. भगवद्गीता ज्याप्रमाणें श्रीकृष्णानें अर्जुनाला उपदेशिली, व उद्धवगीता ज्याप्रमाणें उद्धवाला उपदेशिली, तशीच रामगीताही पण रामचंद्रांनी लक्ष्मणाला उपदेशिली आहे. ' वर्णाश्रमधर्मानुसार प्राप्त झालेल्या सर्व क्रिया समाप्त करून, ज्ञानप्राप्तीसाठीं सद्गुरूला शरण जावें, म्हणजे सद्गुरु ज्ञानाचा उपदेश करितात, वर्णाश्रमधर्माच्या आचरणानें चित्तशुद्धि व चित्तशुद्धि झाल्यानंतर साधनचतुष्टयसंपत्ति, व नंतर सद्गुरूच्या उपदेशानें अविद्यानाश व तद्द्वारा मोक्ष असा मोक्षमार्ग श्रीरामचंद्रांनीं लक्ष्मणास सांगितला आहे. जगामध्यें जें नानात्व–विविधत्व–अनेकविधत्व दिसतें, तें दिसतें तसें नसतें, व तें दिसते म्हणूनच नाशिवंत, अतएव क्षणिक, अनित्य होय. खरें एकजिनसी परब्रह्मतत्त्व या नश्वर नामरूपांच्या पलीकडे असून तेंचे काय तें नित्य सत्तत्व होय, असा नित्यानित्यवस्तुविवेक

ज्याच्या मनाला झाला, शम, दम, उपरति, तितिक्षा, समाधान व श्रद्धा ही षट्साधनसंपत्ति ज्याला मिळाली, ऐहिक व पारलौकिक सुखोपभोगाविषयीं ज्याचें मन विरक्त आहे, व ज्याला मुमुक्षुत्व म्हणजे मोक्ष मिळविण्याची इच्छा आहे, साराश, साधनचतुष्टय ज्याच्या हातीं आहे, असलीं माणसेंच सद्गुरूपासून ज्ञान मिळविण्याला लायक होत. अंत करणात श्रद्धा नसेल, तर कोणतेंही ज्ञान प्राप्त होणार नाहीं, एवढ्याकरिताच, पूर्वीचे गुरु शिष्याची अनेक प्रकारानीं कसोटी पाहात असत. महाभारतातील गुरुपत्नीला कुंडले आणून देणाऱ्या वेद शिष्याची कथा, उपमन्यूची कथा, वगैरे अनेक गोष्टी याची साक्ष पटवितील. '**तस्माद्गुरुं प्रपद्येत**' हा भागवतातील श्लोक, किंवा

'**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।**
**उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥**'

हा गीतेचा श्लोकही या बाबतींत पाहण्यासारखा आहे. '**सद्गुरुवांचोनी सांपडेना सोय । धरावे ते पाय आधीं त्याचे ।**' असे भगवद्भक्त तुकाराम महाराज यानीं म्हटले असून श्रीज्ञानेश्वर व एकनाथ याच्या काव्यसागराला गुरुभक्तीच्या पूर्णचद्रोदयाचे वेळीं अफाट भरती आलेली दिसते. ज्ञानेश्वरींत गुरुभक्तीच्या जिव्हाळ्याबद्दलचे उद्गार जागोजाग सापडतात. नववा, तेरावा व पंधरावा हे तीन अध्याय पाहिले असता, त्यात याचे भरपूर विवेचन दिसेल. एकनाथानीं अशाच तऱ्हेचें विवेचन केलें आहे असो. यापुढें नवव्या श्लोकामध्यें अज्ञान किंवा अविद्या हेंच ससारबंधनाचे कारण होय, असे सागितले आहे. अविद्या, अध्यास, किंवा अज्ञान हे तीन शब्द एकाच अर्थाचे वाचक आहेत.' अविद्या या शब्दाचा अर्थ श्रीमच्छंकराचार्यानी आपल्या ब्रह्मसूत्रावरील भाष्योपोद्घातात केला आहे. किंबहुना या भाष्यभागाला अध्यासभाष्य असे स्वतंत्र नावच दिलेलें आहे. अध्यासाच्या तीन चार व्याख्या या ठिकाणीं दिल्या आहेत. 'अवस्तुनि वस्त्वारोप' 'अतस्मिन् तद्बुद्धि' किंवा 'स्मृतिरूपः परत्र पूर्वदृष्टावभासः' या त्या व्याख्या होत. उन्हाच्या झळीनें उत्पन्न झालेल्या पाण्याच्या आभासाला खरोखरीचे पाणी मानणें, जे ज्या ठिकाणीं नाहीं, तें त्या ठिकाणीं कल्पिणें, स्फटिकमण्याच्या भाड्यामध्यें हिरवी पाच अगर ताबडें माणिक ठेविलें असता, त्या त्या रत्नाच्या योगानें हिरव्या अगर ताबड्या भासणाऱ्या त्या भांड्याला—खरोखरी तें पाढरें असता—ताबडें अगर हिरवें म्हणणे, याला अध्यास असे म्हणतात. आपल्या समोर उभा असलेला एखादा गवा दृष्टीस पडला म्हणजे पूर्वीं पाहिलेल्या गाईची आठवण होऊन त्या गाईच्या धर्माचा भास गव्याच्या ठिकाणीं होणे व शेवटीं गव्याला गाय मानणे, हा अध्यास होय. '**स्मृतिरूपः परत्र पूर्वदृष्टावभासोऽध्यासः**' या व्याख्येंत श्रीमदाचार्यानीं हेंच सागितले आहे. स्फटिकमण्याजवळ धरिलेलें जास्वदीचें फूल ( जपापुष्प ), शुक्तिरजत, रज्जुसर्प इत्यादि अनेक दृष्टान्तानीं माया, अविद्या, म्हणजे काय, तें आचार्यानीं समजून सागितले आहे. परमतत्त्वाच्या शोधासाठीं मनुष्य जेव्हां प्रयत्न करूं लागतो, तेव्हा तो स्वतःचें अस्तित्व गृहीत धेऊनच चाललेला असतो.

त्संगलब्धया भक्त्या यदा त्वां समुपासते । तदा माया शनैर्याति
ानवं प्रतिपद्यते ॥ ३९ ॥ ततस्त्वज्ज्ञानसंपन्नः सद्गुरुस्तेन लभ्यते ।
ाक्यज्ञानं गुरोर्लब्ध्वा त्वत्प्रसादाद्विमुच्यते ॥४०॥ तस्मात्त्वद्भक्तिहीनानां
कल्पकोटिशतैरपि । न मुक्तिशंका विज्ञानशंका नैव सुखं तथा ॥ ४१ ॥
अतस्त्वत्पादयुगले भक्तिर्मे जन्मजन्मनि । स्यात्त्वद्भक्तिमतां संगोऽविद्या
याभ्यां विनश्यति ॥ ४२ ॥ लोके त्वद्भक्तिनिरतास्त्वद्धर्मामृतवर्षिणः ।
पुनंति लोकमखिलं किं पुनः स्वकुलोद्भवान् ॥ ४३ ॥ नमोऽस्तु जगतां
नाथ नमस्ते भक्तिभावन । नमः कारुणिकानन्त रामचंद्र नमोऽस्तु ते

दुःखप्रवाहापासून तो मुक्त होत नाहीं. ३८ सत्पुरुषांच्या समागमानें तुजविषयीं भक्ति उत्पन्न होऊन जेव्हां लोक तुला भजतात, तेव्हां माया हळूहळू क्षीण होत जाते—त्यांच्यापासून दूर होते. ३९ नंतर तुझ्या स्वरूपाचें यथार्थ ज्ञान असणाऱ्या सद्गुरूची त्या मनुष्याला प्राप्ति होते, आणि तुझ्या प्रसादानें त्या गुरूपासून 'तत्त्वमसि' या महावाक्याचें ज्ञान प्राप्त होऊन तो मुक्त होतो. ४० म्हणून तुझी भक्ति नसणाऱ्यांना शेंकडो कोटि कल्पांतीं तरी मोक्ष मिळेल, ज्ञान मिळेल, किंवा सुख मिळेल, अशी शंका देखील घेऊं नये. ४१ म्हणून जन्मोजन्मीं तुझ्या पदयुगीं माझी भक्ति जडो, आणि तुझ्या भक्तांचा समागम मला घडो. या दोहोंमुळेंच अज्ञान नष्ट होत असतें. ४२ लोकांमध्यें तुझ्या भक्तींत तत्पर आणि तुझ्या धर्मामृताची—तत्त्वज्ञानामृताची—वृष्टि करणारे सर्व जगाला पावन करूं शकतात, मग आपल्या स्वतःच्या वंशजांना ते करितील, यांत सांगायाचें तें काय ? ४३ हे जगन्नाथा ! तुला नमस्कार असो. हे भक्तीनें वश होणाऱ्या ! तुला नमस्कार असो. हे करुणामूर्ते ! हे अनंता ! हे रामचंद्रा ! तुला नमस्कार

१. सत्संगमहिमा —'दूरीकरोति कुमतिं विमलीकरोति चेतश्चिरंतनमघं चुलकीकरोति । भूतेषु किंच करुणां बहुलीकरोति संगः सतां किमु न मंगलमातनोति' ॥—अन्योक्तिविलास. २. 'तें तूं आहेस'—जीवशिवांचें ऐक्य शिकविणारें अद्वयज्ञान. ३. मोरोपंतांनीं केकावलींत असेंच मागणें परमेश्वराकडे मागितलें आहे —' सुसंगति सदा घडो, सुजनवाक्य कानीं पडो। कलंक मतिचा झडो, विषय सर्वथा नावडो, । सदंघ्रिकमलीं दडो, मुरडितां हटानें अडो । वियोग घडतां रडो, मन भवच्चरित्रीं जडो ॥ १. न निश्चय कधीं ढळो, कुजनविघ्नबाधा टळो । न चित्त भजनीं चळो, मति सदुक्तमार्गीं वळो । स्वतत्त्व हृदया कळो, दुरभिमान सारा गळो । पुन्हां न मन हें मळो, दुरित आत्मबोधें जळो ' ॥ २ —केका ११८, ११९.

तेचा प्रश्न असून त्या कर्मांची येथे जरूर नाहीं, असा रामगीतेचा सिद्धांत आहे, व ज्ञान-कर्मांच्या समुच्चयाचा प्रश्नही येथेंच उत्पन्न होतो.

वेदातवाङ्मयाच्या वाचकाना 'ज्ञान,' 'कर्म' व 'ज्ञानकर्मांचा समुच्चय' हे शब्द अतिशय परिचयाचे वाटतील, व या शब्दाचा आजपर्यंत पुष्कळ कीस काढल्यामुळें, यांच्या चर्चेची उपेक्षाही पुष्कळ वेळा करावीशी वाटेल. परंतु, ज्ञानकर्मसमुच्चयवादाचा प्रश्न दिसतो इतका सोपा नाहीं. 'निर्गुण' व 'सगुण' या दोन साध्या सुटसुटीत शब्दाच्या उच्चाराबरोबर ज्याप्रमाणें ब्रह्माड डोळ्यापुढें उभें रहातें, 'कवि' व 'काव्य' या दोन अक्षरी शब्दात ज्याप्रमाणें सारस्वताचें विश्वरूप साठविलेलें दिसते, तद्वत्, ज्ञानकर्मांच्या समुच्चयाच्या वादांत, 'ज्ञान' व 'कर्म' या शब्दात हिंदी तत्त्वज्ञानाचा इतिहास साठविलेला दिसतो. ब्राह्मणग्रंथ व उपनिषदें यांच्या काळापासून हा वाद चालत आलेला आहे. परमेश्वर-स्वरूपाचे यथार्थज्ञान झाल्यानंतर कर्मठपणाचें बंड–श्रौतकर्मांचा आचार–तसाच चालू ठेवावा कीं काय, हा या ठिकाणीं वादाचा मुद्दा आहे. या वादाच्या इतिहासाचें अवलोकन करण्याचें हें स्थळ नव्हे. कारण याचा विचार साकल्यानें करावयाचा झाल्यास श्रुतिकालीन–उपनिषत्कालीन–ज्ञानकर्मसमुच्चयवाद, श्रौतधर्म श्रौतस्मार्तधर्म झाल्यानतर त्याला आलेले स्वरूप, व श्रौतस्मार्तधर्म श्रुतिस्मृतिपुराणोक्त धर्म झाल्यानंतरची या वादाची स्थिति, असे याचे तीन भाग पाडावे लागतील, व त्या त्या कालातील निरनिराळे उद्बोधक ग्रंथ घेऊन त्यावरून याचा इतिहास बाधावा लागेल. अर्थात्च, एकाद्या ग्रंथाच्या लहानशा प्रस्तावनेंत ही गोष्ट करता येणें शक्य नाहीं. त्याला स्वतंत्र ग्रंथच पाहिजे. असो.

श्रीरामगीतेनें हा ज्ञानकर्मसमुच्चयवादाचा प्रश्न ज्या तऱ्हेनें पुढें माडला आहे, ती पद्धति व त्यावरून निश्चित होणारे त्या वादाचें तत्कालीन स्वरूप, याविषयीं एकच शब्द लिहावासा वाटतो. रामगीतेने ज्या पद्धतीनें ज्ञानकर्मसमुच्चयवादाचा विचार केला आहे, ती पद्धति भाष्यकाराच्या पद्धतीप्रमाणें पंडिती थाटाची वाटते. श्लोक ११–१६ व श्लोक २१–२२ पाहिल्यास याची साक्ष पटेल. ११ व्या व १२ व्या श्लोकात समुच्चयवाद्याच्या म्हणण्याचा अनुवाद दिला आहे. वेदप्रामाण्य हें पूर्वपक्षी व सिद्धान्ती या दोघांनाही मान्य असल्यानें वेदानें सागितलेली आज्ञा पाळिलीच पाहिजे, व श्रुति कर्में करण्यास सागते म्हणून कर्में केलीं पाहिजेत, असा पूर्वपक्षाच्या म्हणण्याचा आशय आहे. अशा तऱ्हेची कर्में ज्ञानाला उपकारक होत असून कर्में न केल्यास दोष येतो, असेंही पुढें सागितलें आहे. यावर सिद्धान्त्याचें उत्तर असे कीं, सर्व क्रिया 'मी' 'माझें' अशा प्रकारच्या देहाभिमानानें उत्पन्न होतात, व ज्ञान हें तर 'ज्ञाता' 'ज्ञेय' व 'ज्ञान' या त्रिपुटीच्या नाशानंतर उद्भूत होतें. तेव्हा, ज्ञान व कर्म याचा समुच्चय होणें शक्यच नाहीं विद्येनें जें कार्य होतें, जे 'आत्मज्ञान' होतें, तें ध्रुव म्हणजे कायम टिकणारें आहे. कर्मवाद्याच्या यज्ञानें मिळणारे फळ अध्रुव म्हणजे नश्वर, अनित्य आहे. तेव्हां, विद्या व कर्म यांच्या मूळ स्वभावांत व त्यापासून प्राप्त होणाऱ्या फलात याप्रमाणें अत्यंत

महत्वाचा विरोध असल्यानें त्यांचा समुच्चय होणें शक्य नाहीं. यज्ञकर्मांचें फल अनित्य असतें, याबद्दल भगवद्गीतेंत भगवान् सांगतात—

**' त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयंते ।**
**ते पुण्यमासाद्य सुरेंद्रलोकमश्नंति दिव्यान् दिवि देवभोगान् ॥**
**ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति ।**
**एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभन्ते ॥' ९-२०-२१**

भगवंतांनीं यज्ञकर्मांचे आचरण करणारांना 'त्रैविद्य' व श्रौतकर्माला 'त्रयीधर्म' अशी नावें दिलीं आहेत. भगवद्गीतेंतील अशा शब्दप्रयोगावरून श्रीकृष्णाचा कटाक्ष ज्याप्रमाणें 'देव सोडोनीयां देउळा भजती,' अशा प्रकारचें कर्मठपणाचें फाजील वाढलेलें बंड मोडण्याकडे दिसतो, तसलाच प्रकार रामगीतेतही आहे. मात्र रामगीतेच्या विवेचनावर भाष्यकारांच्या लेखनाची छाया पडलेली दिसते. याचें एक प्रत्यंतर रामगीतेचा २२ वा श्लोक मननपूर्वक वाचल्यास मिळणारें आहे. हा श्लोक वाचताच वाचकाला—

**' न कर्मब्रह्ममीमांसयोरैकशास्त्र्यम् । जिज्ञास्यफलभेदात् ।**
**इह तु भूतं ब्रह्म जिज्ञास्यं तत्र भव्यश्च धर्मो जिज्ञास्यः ॥ '**

या ब्रह्मसूत्रशांकरभाष्यातील वाक्याची आठवण झाल्यावाचून राहात नाहीं. यज्ञकर्मांच्या आचरणापासून उत्पन्न होणारा धर्म हा 'भव्य'–पुढें होणारा–आहे, त्याचें स्वरूप निश्चित ठरावयाचें आहे. म्हणजे, मीमांसकाचा धर्म कर्मानें अस्तित्वांत यावयाचा असून तो कसा होईल, कसा असेल, याचा विचार त्याना करावयाचा आहे. 'अथातो धर्मजिज्ञासा' म्हणताना हा अर्थ त्याना अभिप्रेत आहे. उलट पक्षीं वेदान्त्याचें परब्रह्म 'परिनिष्ठित' स्वरूपाचे असून नित्य शुद्ध बुद्ध मुक्तस्वभाव असें आहे. त्याला अगोदरच अस्तित्वांत असलेल्या, त्याच्या विचाराची अपेक्षा न ठेवताच ज्याचे स्वरूप अगोदरच निश्चित झालेलें आहे, अशा ब्रह्मस्वरूपाची ओळख पटवून घ्यावयाची आहे. मीमासकाला होणाराची कल्पना बाधावयाची असून वेदान्त्याला असलेल्याची ओळख पटवून घ्यावयाची आहे. खेरीज या दोन शास्त्रांच्या फलश्रुतींतही मोठा फरक आहे. तो असा की 'कर्ममीमासा' शास्त्राचें फल जे स्वर्गादि लोकाची प्राप्ति तें फल अनित्य–संपणारें–असून 'ब्रह्ममीमासाशास्त्राचें फल नित्य–निश्चित स्वरूपाचें–आहे, हा भाष्यकारांच्या म्हणण्याचा आशय होय. हाच युक्तिवाद रामगीतेनें

**' विद्यासमत्वेन तु दर्शितस्त्वया क्रतुर्न दृष्टान्त उदाहृतः समः ।**
**फलैः पृथक्त्वाद्बहुकारकैः क्रतुः संसाध्यते ज्ञानमतो विपर्ययम् ॥'**

इत्यादि श्लोकात अंगिकारिला आहे. '**ननु स्वतंत्रा ध्रुवकार्यकारिणी विद्या न किंचिन्मनसाप्यपेक्षते**' हा श्लोकार्ध ज्ञानाचें फल नित्य आहे असें सांगतो. '**न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनैके अमृतत्वमानशुः ।**' व '**एतावदरे खल्वमृतं**' या तैत्तिरीय व वाजसनेयि श्रुतींचा प्रत्यक्ष उद्धार या ठिकाणीं केला

आहे. असला प्रकार या तऱ्हेच्या इतर ग्रंथांतून दिसत नाहीं. असो. ब्राह्मणग्रंथांनतू वर्णिलेलें यज्ञयागादि कर्मकांड बळावून, एक वेळ मानसिक शुद्धि नसली तरी चालेल, पण कर्माच्या तंत्राचा बडेजाव पाळलाच पाहिजे, असल्या तऱ्हेचें एक प्रकारचें यांत्रिक स्वरूप जेव्हां त्याला आलें, त्या वेळी उपनिषदाचें विचारयुग पुढें येऊन ज्या आचाराच्या योगानें विचाराला चालना मिळत नाहीं, विचाराचे उद्बोधन, परिपोषण होत नाहीं, तो आचार आम्हांला नको, आचार–कर्म–विचाराचा परिपोष करण्यासाठीं–मनःशुद्धीसाठीं–आहे, असें म्हणणारे तत्त्वज्ञ पुढें येऊं लागले. येथेंच तडजोडीचा प्रश्न येऊं शकतो, व केवळ ज्ञानवादी व केवळ कर्मवादी याच्या तडजोडीला ज्ञानकर्मसमुच्चयाचें स्वरूप येऊं शकतें हा ज्ञानकर्मसमुच्चयाचा प्रश्न वरपासून खालपर्यंत एकाच स्वरूपांत चालत आलेला आहे, व तो तसाच अध्यात्मरामायणांत प्रतीत झालेला दिसतो श्रौतकर्माची ज्ञानाला जरूर नाहीं, असें जरी याप्रमाणें श्रीरामगीतेनें सांगितलें असलें, तरी व्यावहारिक कर्मासंबंधानें मात्र श्रीरामचंद्रांनीं निराळे उद्गार काढले आहेत, त्याकडे आपलें लक्ष वेधणें जरूर आहे. अयोध्याकांडाच्या ४ थ्या सर्गांत रामाच्या राज्यत्यागानें लक्ष्मणाला सात्त्विक संताप आला, असें सांगितलें आहे, व त्या ठिकाणीं लक्ष्मण म्हणतो —

> 'उन्मत्तं भ्रान्तमनसं कैकेयीवशवर्तिनम्।
> बद्ध्वा निहन्मि भरतं तद्बंधून्मातुलानपि॥'
>
> (अयो० ४.१५.)

लक्ष्मणाच्या या सात्त्विक संतापाचें श्रीरामचंद्रांनी कौतुक केलें आहे, व त्याला उपदेश करतांना खालील उद्गार काढले आहेत —

> 'बुद्ध्यादिभ्यो बहिः सर्वमनुवर्तस्व मा खिदः।
> भुंजन्प्रारब्धमखिलं सुखं वा दुःखमेव वा॥ ४१॥
> प्रवाहपतितः कार्यं कुर्वन्नपि न लिप्यसे।
> बाह्ये सर्वत्र कर्तृत्वमावहन्नपि राघव॥ ४२॥
> अंत शुद्धस्वभावस्त्वं लिप्यसे न च कर्मभिः॥'

या उद्गारांचें भाषांतर पुढें पुस्तकाचीं तीं तीं पानें काढून पाहिल्यास सांपडेलच. उत्तरकांडांतही अशाच तऱ्हेचा एक प्रसंग आहे. तापसाच्या वेषानें आलेल्या काळाला दिलेल्या वचनाप्रमाणें लक्ष्मणाचा त्याग करण्याचे वेळीं श्रीरामचंद्राला गुरुजनांनीं, '**त्यजाशु लक्ष्मणं राम मा प्रतिज्ञां त्यज प्रभो। प्रतिज्ञाते परित्यक्ते धर्मो भवति निष्फलः**' असला उपदेश करून लक्ष्मणाचा त्याग करण्यास सांगितलें आहे. यावरून, व्यावहारिक कर्मासंबंधानें श्रीरामचंद्राची दृष्टि काय स्वरूपाची होती, याची स्पष्ट कल्पना येईल. वेदांतमार्गानें राष्ट्रांत पंगूपणा आणिला, असा एक अविचारी आक्षेप या मार्गावर नेहमीं आणण्यांत येत असतो. परंतु, उघड्या डोळ्यांनीं अध्यात्मग्रंथ वाचणारांना हा आक्षेप फोल आहे, हें तेव्हांच

कळून येईल. जगत्कारणवादाच्या दृष्टीनें–अध्यात्म बोलतांना–सर्व जगत् एकच एक एकाजिनसी परब्रह्मापासून उत्पन्न झालेलें आहे असें म्हटल्यानें, किंवा ज्ञानप्राप्तीला कर्मठपणाची जरूर नाहीं, असें म्हटल्यानें, Theology व Thought Development यांचा परस्परसंबंध काय, याबद्दल वाद घालीत बसल्यानें व्यावहारिक कर्मांत पंगुता कोठें व कशी येते, हें त्या आक्षेपकाचे त्यांचे त्यासच माहीत ! ज्ञानप्राप्तीला कर्मांची जरूर नाहीं, ज्ञान व श्रौतकर्म याचा समुच्चय होत नाहीं, असें म्हणून सुद्धां व्यावहारिक कर्में करीत राहावें, अशा अर्थाचा उपदेश–निष्कामबुद्धीनें करीत रहावें, एवढी पुस्ती त्याला जोडून, या ग्रंथात केलेला आढळतो. असो. याप्रमाणें ब्रह्मचिंतनानें आत्मज्ञान झाल्यानंतर ध्यानमग्न होऊन समाधिसुख मिळविण्यासाठीं प्रणवाचें ध्यान करावें असे सांगितलें आहे. ॐ हें अक्षर हाच प्रणव व याची उपासना म्हणजे प्रणवोपासना होय. उपनिषदामध्यें या प्रणवोपासनेला उद्गीथविद्या असे नाव असून छांदोग्योपनिषदाच्या प्रारंभीं '**ॐ इति एतदक्षरमुद्गीथमुपासीत।**' असलें बरेंच विस्तृत वर्णन आले असून पंचविध व सप्तविध सामाचेंही वर्णन त्यात आहे. उपनिषदाच्या मागून श्रीमद्भगवद्गीतेनेंही '**ॐ इत्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन्।**' असा ॐकारस्वरूप परब्रह्माचा उल्लेख केला आहे, परतु ॐ काराची अ उ व म् ही व्युत्पत्ति मात्र ब्रह्माविष्णुमहेश या देवतात्रयीची कल्पना उद्भूत झाल्यानंतरची आहे, व रामगीतेनें दिलेलें ॐकार वर्णन अर्थात्‌च या आधुनिक पद्धतीचे आहे. श्लोक ४९–५०–५१ या श्लोकांत पुरुषाचे विश्व, तैजस आणि प्राज्ञ असे तीन विभाग कल्पिले आहेत, व या तीन अवस्था क्रमाक्रमानें एकाहून एक चढत्या होत असे म्हटलें आहे. विश्वपुरुषाला तैजस पुरुषात विलीन करावें, तैजस पुरुषाला प्राज्ञ पुरुषात विलीन करावें, साधकाच्या या तीन पायऱ्याचा क्रमाक्रमानें वरच्या वरच्या पायरींत लय करावा, व शेवटीं आत्मभानाचा–देहभानाचा, अहंकाराचा लय–त्या चिद्घन परमात्मस्वरूपात करावा. अशा तऱ्हेनें ज्याचा आपपरभाव नष्ट झाला, जो स्वानंदसुखाच्या समाधींत डोलूं लागला, व या स्थितींत पोहोचल्यावर अहंभाना–( Consciousness of Self ) सकट सगळ्यालाच विसरला, तोच विमुक्त, त्यालाच मोक्ष मिळाला, व तोच खळमळ जाळून अंतर्बाह्य जळत राहणाऱ्या दिव्याप्रमाणें अहेतुकपणे स्वात्मबोधाचा प्रकाश जगाला देत असतो. या तऱ्हेचा समाधियोग ज्याला साधला, ज्यानें आपल्या इंद्रियांचे सर्व व्यापार आपल्या ताब्यात ठेविले, व आपले सर्व शत्रू जिंकिले, त्यालाच माझें ज्ञान होऊ शकतें, त्यालाच मी दृश्य होतों, असें म्हणून श्रीरामचद्रानीं आत्मानात्मविवेकाच्या द्वारें प्राप्त होणाऱ्या ज्ञानाचे पर्यवसान डोळस भक्तींत आणून ठेविलें आहे. '**न मिळो खावया न वाढो संतान। परि हा नारायण कृपा करो**' किंवा '**जळो ते जाणीव, जळो ते शहाणीव**' अशा शब्दांनीं तुकाराम महाराजानीं ज्या भक्तिमार्गाचें वर्णन केलें, किंवा—

> '**भक्तिप्रेमावीण ज्ञान नको देवा। अभिमान नित्य नवा तयामाजी**
> **प्रेमसुख देई, प्रेमसुख देई। प्रेमेंवीण नाहीं समाधान**'. ॥

असें श्रीएकनाथमहाराज ज्याबद्दल म्हणतात, त्याच प्रकारच्या डोळस भक्तिमार्गांत अखेर ज्ञानाचे पर्यवसान करून दाखविलें आहे.

**‘ नाहं वेदैर्न तपसा न दानेन न च इज्यया ।**
**शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ॥**
**भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।**
**ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ॥ ’**

या वचनात श्रीभगवंतानीं हेंच सांगितलें आहे. असो. एवढा वेळपर्यंत श्रीमद्भगवद्गीता, अध्यात्मरामायण व श्रीमद्भागवत यातील ज्ञान, कर्म व भक्तियोगाचें विवरण आपण केलें. आतां अध्यात्मरामायण या ग्रंथाबद्दल असे सामान्य चार शब्द लिहून ही प्रस्तावना सपवूं.

अध्यात्मरामायण हा ग्रंथ शकरपार्वतींच्या संवादाच्या रूपानें लिहिलेला आहे. ‘ भक्तियोग हें जरी परमेश्वरप्राप्तीचे अत्युच्च साधन असले, तरी परमेश्वरस्वरूपाचे वर्णन अनेकांनी अनेक प्रकारानीं केलेलें असल्यामुळे, त्याचा निश्चय होत नाही, तेव्हा परमेश्वराचें खरें स्वरूप मला सागा, ’ असा पार्वतीनें शकराना प्रश्न विचारला आहे, व त्यावरून पुढें अध्यात्मरामायण शंकरानीं सागितले आहे. श्रीरामचरित्राची कथा वर्णिताना निरनिराळ्या कवींनी त्यातले प्रसंग निरनिराळ्या तऱ्हेनें वर्णिले आहेत. परंतु, अध्यात्मरामायणातील कथाभाग मूळ वाल्मीकीरामायणाला धरूनच सागितलेला आहे. उदाहरणार्थ, दशरथानें केलेल्या पुत्रकामेष्टि यज्ञामध्यें अग्नीनें दिलेला पुरोडाश कौसल्या, सुमित्रा व कैकेयी याच्यामध्यें वाटून दिल्याचा प्रसंग घ्या. श्रीएकनाथमहाराजानीं भावार्थरामायणमध्ये हा प्रसग निराळ्या तऱ्हेनें सागितला आहे. ‘ मी राजाची आवडती राणी, तेव्हा ज्येष्ठ भाग मला मिळाला पाहिजे, ’ असा हट्ट घेऊन कैकेयी रुसून बसली. या रुसव्याच्या प्रकारात कैकेयीच्या हातातला पिंड घारीनें झडपून नेला. तेव्हा, कौसल्या व सुमित्रा या दोघींनीं आपापल्या वाट्यातला अर्धा अर्धा भाग देऊन तिची समजूत केली, असली कथा भावार्थरामायणामध्यें आहे इतरत्रही कैकेयीलाच चरुभाग दिल्याची कथा आढळते. वाल्मीकिरामायणात हा भाग दिलेला नसून शिवरामायण नावाच्या ग्रंथावरून तो आपण घेतला असे नाथानीं बालकाडाच्या चौथ्या अध्यायाच्या प्रारभीं सागितले आहे. ( बालकाड सर्ग. ३. १०. ११ १२ ) परंतु, अध्यात्मरामायणात मात्र कौसल्या व कैकेयी याणीं अर्धा अर्धा चरुभाग सुमित्रेला दिला अशी कथा आहे.

**‘ वसिष्ठऋष्यशृंगाभ्यां अनुज्ञातौ ददौ हविः ।**
**कौसल्यायै सकैकेय्यै अर्धमर्धं प्रयत्नतः ॥**
**ततः सुमित्रा संप्राप्ता जगृध्नुः पौत्रिकं चरुम् ।**
**कौसल्या तु स्वभागार्धं ददौ तस्यै मुदान्विता ॥**
**कैकेयी च स्वभागार्धं ददौ प्रीतिसमन्विता । ’**

गोष्ट मूळ वाल्मीकिरामायणाला धरून आहे तसेंच, कौसल्येच्या पोटीं राम, सुमित्रेच्या

पोटीं लक्ष्मण, कैकेयीच्या पोटीं भरत शत्रुघ्न असे चार अवतार झाले अशी कथा इतरत्र आढळते परंतु, अध्यात्मरामायणात

'कैकेयी चाथ भरतमसूत कमलेक्षणा ।
सुमित्रायां यमौ जातौ पूर्णेंदुसदृशाननौ ॥' (बालकांड ३. १८)

अशी कथा आहे. तीही मूळाला सोडून नाहीं. याच्यापुढें जाऊन

'लक्ष्मणो रामचंद्रेण शत्रुघ्नो भरतेन च ।
द्वंद्वीभूय चरन्तौ तौ पायसांशानुसारतः ।' (बाल० ३ ४२)

असे रामलक्ष्मणाच्या प्रेमभावाचें विशिष्ट काव्यमय कारण अध्यात्मरामायणात दिलें आहे. असो. याच्यापुढें अयोध्याकांडात श्रीरामाला यौवराज्याभिषेक करण्याचे वेळीं दशरथानें काढिलेला उद्गार ध्यानात ठेवण्यासारखा आहे. दशरथ म्हणतोः—

'भरतो मातुलं द्रष्टुं गतः शत्रुघ्नसंयुतः ।
अभिषेक्ष्ये श्व एवाशु भवांस्तच्चानुमोदताम् ॥' (अयोध्या. सर्ग २. श्लो. ४).

रामाला राज्यभिषेक करिताना दशरथाला भरताची भीति वाटत होती, त्याच्या मनांत काहीं तरी डाचत होतें, असें दिसतें. श्रीमद्वाल्मीकिरामायणांत याचा मूळ सबंध सापडतो. त्या ठिकाणीं श्रीराम भरताला म्हणतो.

पुरा भ्रातः पिता नः स मातरं ते समुद्वहन् ।
मातामहं समाश्रौषीत् राज्यशुल्कम्... ' ॥

यावरून विषयलुब्ध व स्त्रीजित दशरथानें कैकेयीच्या पुत्राला राज्य देण्याचें वचन दिलें होतें, व तें पाळल्यास कौसल्येच्या—पट्टराणीच्या—पुत्राचा राज्यावरचा योग्य, न्याय्य हक्क टाळल्यासारखा होतो, म्हणून भरताच्या गैरहजिरींत झटपट राज्याभिषेक उरकण्याची दशरथानें घाई केलेली दिसते. दशरथाच्या स्त्रीजितत्वाची कल्पना कौसल्येला चागलीच होती, व भरताच्या साठीं रामाचा राज्यावरला न्याय्य हक्क तो बाजूला ठेवील, अशी तिला भीति वाटत होती.

'कैकेयीवशगः किं तु कामुकः किं करिष्यति ।
इति व्याकुलचित्ता सा दुर्गां देवीमपूजयत् ॥' अयोध्या० सर्ग-२-४३.

असा याबद्दलचा उल्लेख अध्यात्मरामायणात आहे. दशरथानें कैकेयीशीं लग्न लावताना राज्यशुल्काचे वचन दिलें होतें, ही गोष्ट लक्षात घेतल्यास या एकंदर प्रकाराला निराळाच रंग येऊं पाहतो, व मत्स्यगंधेला राज्यशुल्काचें वचन देऊन भीष्माचार्यांच्या पदरीं आजन्म ब्रह्मचर्य बांधणाऱ्या शंतनूची या ठिकाणीं आठवण होते, व श्रीरामचंद्राच्या पितृभक्तीच्या चित्राबरोबर भीष्माचार्यांची पितृभक्ति डोळ्यांसमोर उभी राहते. पितृभक्तीचें वर्णन करिताना रामचंद्र म्हणतात—

'पित्रर्थे जीवितं दास्ये पिबेयं विषमुल्बणम् ।
सीतां त्यक्ष्येऽथ कौसल्यां राज्यं चापि त्यजाम्यहं ॥

**अनाज्ञप्तोऽपि कुरुते पितुः कार्यं स उत्तमः ।**
**उक्तः करोति यः पुत्रः स मध्यम उदाहृतः ॥**
**उक्तोऽपि कुरुते नैव स पुत्रो मल उच्यते ॥**' पृ. ९७-९८ पहा.

पुढेंमागे मिळणाऱ्या राज्यावर मी हक्क सागणार नाही, असें पित्याकरिता म्हणणारे भीष्माचार्य व बाप आपण होऊन देत असलेल्या, व जवळजवळ प्रत्यक्ष प्राप्त झालेल्या, राज्याचा त्याग करणारा प्रभु रामराय, तसेच राज्यावर बसणार नाहीं म्हणणारे भीष्माचार्य, व राज्यावरून प्रत्यक्ष खाली उतरणारा भगवान् रामचंद्र, या दोघाच्या पितृभक्तीपैकीं अधिक उदात्त पितृभक्ति कोणाची हें ठरवितां येणे कठिण आहे. आकाशस्थ गुरुशुक्राच्या मधील अतर शेकडों मैलानीं मोजता येण्यासारखे असलें, तरी सामान्य माणसाच्या नजरेला ज्याप्रमाणें ते दोघे जसे सारखेच दिसतात, त्याप्रमाणेंच रामभीष्मांची स्थिति होय. आपणांसारख्या पामरानी दोघानाही सारख्याच भक्तिभावानें वंदन करावयास पाहिजे. असो.

अध्यात्मरामायणातील रामकथा वाचल्यानंतर डोळ्यात भरण्यासारखा आणखी एक रामकथेसबंधाचा मुद्दा म्हणजे रामचद्राच्या राज्यत्यागानें लक्ष्मणाला आलेला सात्त्विक सताप हा होय. या गोष्टीचा उल्लेख वर आलेलाच आहे. ' मी स्त्रीजित, विषयलुब्ध आहे, तेव्हा माझ्या वचनाचा अपमान करून सुद्धा, रामा, तूं राज्यावर बैस, ' असें दशरथानें रामास म्हटल्याचा दाखला इतरत्र नाहीं. अध्यात्मरामायणात मात्र—

**' स्त्रीजितं भ्रान्तहृदयं उन्मार्गपरिवर्तिनं ।**
**निगृह्य मां गृहाणेदं राज्यं पापं न तद्भवेत् ।**'(अयो० ३,६९.पृ० ९९)

असे वचन दशरथाच्या तोंडीं आहे. लक्ष्मणाच्या तोंडी वाल्मीकिरामायणात सात्त्विक सतापाचीं वाक्यें नाहींत, तरी तशाच अर्थाचा उद्गार वाल्मीकिऋषींनी जाबालि नावाच्या एका ऋषिपुत्राकडून त्याच प्रसंगी काढविला आहे. यानंतरचा रामकथेंतील महत्वाचा प्रसंग म्हणजे वालिवध हा होय हाही प्रसंग अध्यत्मरामायणांत मूळ रामायणाप्रमाणेंच वर्णिलेला आहे. वालिवध करितांना रामचंद्राचें वर्तन न्याय्य झालें की अन्याय्य झालें, या प्रश्नाचा विचार करीत बसण्याचें हें स्थळ नव्हे तथापि—

**' अधर्मकारिणं हत्वा, सद्धर्मं पालयाम्यहम् ।**
**दुहिता भगिनी भ्रातुर्भार्या चैव तथा स्नुषा ॥**
**समा यो रमते तासां एकामपि विमूढधीः ।**
**पातकी स तु विज्ञेयो वध्यो राजर्षिभिः सदा ॥**
**त्वं तु भ्रातुर्कनिष्ठस्य भार्यायां रमसे बलात् ।**
**अतो मया धर्मविदा हतोऽसि वनगोचर ॥'**

असेच याचें मुळाप्रमाणें अध्यात्मरामायणातही समर्थन केलेले आढळतें. रामवालींचा या ठिकाणचा संवाद बराच मोठा असून तो पुढें भाषातरात २६७-२६८-२६९ या पृष्ठावर सांपडेल.

श्रीरामचंद्राच्या चरित्रातील प्रत्येक महत्वाची गोष्ट धर्मरक्षण करून अधर्माचा नायनाट करण्यासाठी आहे. '**परित्राणाय साधूनां, विनाशाय च दुष्कृताम्**' हेंच रामचंद्राचें अवतारकार्य होय, हें वाचकांच्या डोळ्यांसमोर एकसारखें खेळत राहावें अशाच तऱ्हेनें अध्यात्मरामायणाची रचना आहे. बालकाडातील रामहृदय स्तोत्रापासून तों तहत उत्तरकाडात कौसल्येला श्रीरामचंद्रांनीं तत्त्वज्ञान सागितले आहे, तेथपर्यंत रामचंद्राचीं निरनिराळ्या माणसानीं केलेलीं स्तोत्रे जागोजाग विखुरलेलीं आढळतात, व हीं स्तोत्रें जागोजाग आलेल्या सृष्ट्युत्पत्तीच्या प्रक्रियेचा रुक्षपणा घालवितात, आणि त्यामध्यें एक प्रकारचा गोडवेपणा आणतात, यात शंका नाहीं. असो. श्रीमद्भागवतातील कृष्णकथा गाइली गेल्यानंतर अध्यात्मरामायणाच्या द्वारें रामकथा गाइली गेली असावी, असें भासविणाऱ्या काहीं गोष्टी अध्यात्मरामायणात आढळतात. यापैकीं एक प्रामुख्याने नजरेस येणारी गोष्ट म्हणजे श्रीरामचद्राच्या बाललीलाचें वर्णन ही होय. पुढें ३५ व्या पृष्ठावर ( बाल० सर्ग ३. ५२-५७) सागितलेली रामचंद्राच्या खोड्याची कथा श्रीकृष्णांच्या लीलांवरून घेतल्यासारखी वाटते. तसेच श्रीशुकाचार्यांना परीक्षितानें विचारलेला प्रश्न व पार्वतीनें शंकराना विचारलेला प्रश्न यातील साम्यही या दृष्टीनें पाहण्यासारखे आहे. परीक्षित् म्हणतो—

**' नैषातिदुःसहा क्षुन्मांत्यक्तोदमपि बाधते ।**
**पिबन्तं त्वन्मुखांभोजच्युतं हरिकथामृतम् ॥ '**

तसेंच पार्वती म्हणते—

**' त्वन्मुखाद्गलितं रामतत्त्वामृतरसायनम् ।**
**पिबन्त्या मे मनो देव न तृप्यति भवापहम् ॥**

( बाल० सर्ग २. २, पृ० २३ )

अध्यात्मरामायणात एकादशीव्रताचा उल्लेखही अरण्यकाडात सापडतो –

**' मद्भक्तसंगो मत्सेवा मद्भक्तानां निरंतरम् ।**
**एकादश्युपवासादि मम पर्वानुमोदनम् ॥**

( अरण्य० सर्ग ४. ४८, पृ० २०० )

बालकाडाच्या तिसऱ्या सर्गातील श्लोक ४४-५० यामधील वर्णन वाचले म्हणजे बाणभट्टाच्या कादंबरीतील अनपतत्यमुळें विव्हल झालेल्या तारापीडाची आठवण होते. स्वतःच्या पोटीं मूल नाहीं, याबद्दल विषाद मानून शोक करीत बसलेल्या विलासवतीचे सांत्वन करितांना ' कदा न खलु प्रेक्षिष्ये ' अशा शब्दांनी प्रत्येक वाक्याचा आरंभ करून भावी अपत्याच्या बाललीलाचें मधुर कल्पनाचित्र तारापीडानें रंगविलें आहे. कपाळावर बाधलेलें

-सोन्याचें पिंपळपान, त्याच्या मोत्यांचें तेज, गळ्यांतील रत्नहारामध्यें शोभणारें वाघनख, जेऊं घालण्यासाठीं हाका मारिल्या तरी हें अचपळ पोर येत नाहीं, तेव्हां त्याला धरून आण म्हणून त्याच्या आईला सांगणें, इत्यादिगोष्टी बाणभट्टानें बहारदार रीतीनें सांगितल्या आहेत अंगणामध्यें रांगणाऱ्या मुलाच्या बाललीलेचेंही वर्णन बाणभट्टाच्या वर्णनांत आढळते. '**स्मितवक्त्राल्पदशनं**' हें पद '**आलक्ष्यदन्तमुकुलाननिमित्तहासैः**' या कालिदासोक्तीची आठवण करून देतें. अध्यात्मरामायणाचा काव्यदृष्ट्या विचार करण्याचें हें स्थळ नव्हे. किंबहुना, हा ग्रंथ रचण्याचा हेतु लक्षात घेतां, तसें करणे अप्रयोजकपणाचेंही होईल. तरी पण या दृष्टीनें किष्किंधाकांडाच्या आरंभीं दिलेलें पंपासरोवराचें वर्णन, विशेषत. सज्जनांच्या मनासारखें स्वच्छ असें त्याच्या पाण्याचें वर्णन अशासारखीं काव्य-स्थलेंही पण या ग्रंथात सापडतात, एवढें जातां जातां नमूद करून ठेवण्यास हरकत नाहीं.

**तवांघ्रिपूजानिर्माल्यतुलसीमालया विभो ।**
**स्पर्धते वक्षसि पदं लब्धापि श्रीः सपत्निवत् ।**

( बाल० स० २, १९ पृ० २६ )

व '**अनुग्रहाख्यहृत्स्थेंदुसूचकस्मितचंद्रकः ॥**' हीं स्थलेंहीं वरच्या स्थळांच्या जोडीस बसविण्यासारखीं आहेत. असो. आतापर्यंतच्या एकंदर विवेचनावरून अध्यात्म-रामायण हा ग्रंथ मूळ वाल्मीकिरामायणाच्या आधारे, मुख्यतः वेदान्त व भक्ति यांची सांगड घालण्याकरितां, गीतेच्या व श्रीमद्भागवताच्या धर्तीवर लिहिलेला आहे हें स्पष्ट होईलच आणि एवढ्याचसाठीं श्रीमद्भगवद्गीतेंतील तत्त्वें विशेष विस्ताराने सांगून, तींच तत्त्वें भागवत व अध्यात्मरामायणात कशीं आलीं हें दाखविण्याचा, व तद्द्वारा अध्यात्मरामायणातील तत्त्वें सांगण्याचा क्रम या प्रस्तावनेंत अंगिकारला आहे रावणानें सीतेचा अपहार केला, तो सुद्धां विरोधभक्तीने श्रीरामचंद्राचें ध्यान करण्या करितां केला असें वर्णन या ग्रंथात पुष्कळ ठिकाणीं आढळतें. श्रीकृष्ण, श्रीरामचंद्र इत्यादि महाभागाच्या अवतारांचें रहस्य, साधूंचे रक्षण व दुष्टांचें निर्दाळण, धर्माचे पालन व अधर्माचें उच्चाटन हेंच असल्यानें त्याच्या चारित्र्याला एक प्रकारचें उज्ज्वलत्व येतें. पितृसुखा-साठीं-सत्यपालनासाठीं—राज्यत्याग, धर्मवर्धनासाठीं वालिवध, रावणवध, व प्रजानुरंजनाचे व्रत पाळण्यासाठीं शेवटीं सीतात्याग हे श्रीरामचंद्राच्या चरित्रातील अत्यंत महत्वाचे प्रसंग होत, व या प्रत्येक प्रसंगीं '**बीजं धर्मद्रुमस्य**' ही स्वतःची विरुदावली रामचंद्रांनीं सार्थ केली आहे. रामचंद्राच्या चरित्राचें पठन व त्यांतील महनीय सिद्धांतांचें मनन या गोष्टींचा जितका जितका अधिक प्रसार होईल, तितका तितका आपल्या समाजाचा भाग्यकाळ जवळ जवळ येत जाईल, यांत तिलप्रायही संशय नाहीं.

याप्रमाणें अध्यात्मरामायणांतील तत्त्वविचारांबद्दल जें कांहीं म्हणतां येण्यासारखें होतें तें सांगून संपलें. आता, शेवटीं आभारप्रदर्शनाचें गोड कार्य करून ही प्रस्तावना संपवूं. तत्त्वज्ञानात्मक ग्रंथांना सामान्यतःच बाजारांत मागणी कमी असते, व लघुकथा, कादंबऱ्या, निरनिराळ्या प्रकारच्या माला यांच्याइतका या ग्रंथाचा खप होऊं शकत नाहीं. ही स्थिति सर्व जगभर जरी सारखी असली तरी दरिद्री महाराष्ट्राच्या, राजाश्रयाच्या अभावीं पोरक्या बनलेल्या मराठीला ती फारच जाणवते. **वासुदेवशास्त्री खरे** यांना ऐतिहासिक कागदपत्रे शोधून छापण्याच्या कार्यांत उभा जन्म दारिद्र्यात काढावा लागला. प्रसिद्ध इतिहाससंशोधक राजवाडे याची स्थिति तर सर्वविश्रुतच आहे. अगदीं अलीकडील उदाहरणें घेतलीं तरी सुद्धां असे दिसतें कीं, 'रत्नाकर,' 'विविधज्ञानविस्तार' अशासारखीं भारदस्त मासिके आतबट्टयानें चालविलीं जात आहेत, व चटोर गोष्टींच्या नीरस भाषांतरांनीं भरलेल्या मालांचा सुकाळ झालेला दिसत आहे. जनाच्या अभिरुचीला असले घाणेरडें वळण लागलेलें असतांही '**विनाश्रयं न शोभन्ते पण्डिता वनिता लताः,**' ही म्हण ध्यानांत असताही धार्मिक ग्रंथ प्रकाशित करण्याचें फार खर्चाचें व म्हणूनच जिकिरीचें कार्य मुंबईचे रा० **केशव भिकाजी ढवळे,** यानीं धर्मप्रेमानें प्रेरित होऊन पतकरिलें आहे. आजपर्यंत ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, दासबोध इत्यादि ग्रंथ यानीं भाषातरासह प्रसिद्ध केलेले असून, ते आजपर्यंत कोणींही विकले नाहींत, इतक्या स्वस्त किंमतीस—केवळ धार्मिक वाङ्मयाचा प्रसार व्हावा या इच्छेनें—विकले आहेत. महाराष्ट्रानें या त्याच्या कामगिरीबद्दल त्याचे उतराई होणें, व त्यांच्या या ग्रंथप्रकाशनकार्यास त्याना मदत करणे, हें त्याचे कर्तव्य होय. प्रस्तुतचें अध्यात्मरामायणाचें भाषातर हें याच परमार्थग्रंथमालेचे पुष्प आहे. हें भाषातर महाराष्ट्राच्या परिचयाचे वे शा सं. **भालचंद्र शंकर देवस्थळी** यानीं लिहिलें आहे. निर्णयसागर छापखान्यानें छापून प्रसिद्ध केलेलें 'एकनाथी भावार्थरामायण,' 'यक्षसंदेश,' 'तिलकस्तवराजा'सारखीं लहान लहान स्फुट काव्ये याच्या द्वारें शास्त्रीबोवाचा महाराष्ट्राला परिचय झालेलाच आहे. तेव्हां भाषातराबद्दल निराळें लिहिण्याची जरूर नाहीं. शास्त्रीबोवा हाच व्यवसाय आज कित्येक वर्षें करीत आहेत. प्रस्तुत प्रस्तावनेच्या द्वारें श्रीरामसेवा करण्याचा सुयोग त्यांच्याच परिचयामुळे आला, याबद्दल लेखक शास्त्रीबोवाचा मी अत्यंत आभारी आहे. अशाच तऱ्हेची वाङ्मयसेवा शास्त्रीबोवाच्या हातून अधिकाधिक घडो, व रा० **ढवळे** यांना धार्मिक ग्रंथप्रकाशनाचे कार्य अशाच अविरत तऱ्हेनें चालू ठेवण्याचे सामर्थ्य तो दयाघन प्रभु देवो, अशी त्याची प्रार्थना करून, व '**येथ न्यून तें परतें। अधिक तें सरतें। करोनि घ्यावें हें तुमतें। विनवीतसें॥**' अशी ज्ञानेश्वरांच्या भाषेंत अधिकारी वाचकाची विनवणी करून ही लांबलेली प्रस्तावना येथे संपवितों

ता. २४ सप्टेंबर १९२८
६०१ सदाशिव पेठ, पुणें.

**नरहर गणेश जोशी.**

# अनुक्रमणिका



## अध्यात्मरामायणमाहात्म्य

### ( सर्ग १, पृष्ठें १-११ )

१. मंगलाचरण ( श्लोक १ ), उपोद्घात ( २-८ ), कलियुगमहिमा ( ९-१४ ), अध्यात्मरामायणाचें माहात्म्य ( १५-४१ ), रामहृदयमाहात्म्य ( ४२-४४ ), रामगीता-माहात्म्य ( ४५-५९ ).

---

## बालकांड

### ( सर्ग १-७, पृष्ठें १२-७२ )

१. नमन ( १-२ ), रामायणपाठाचें फल ( ३-५ ), पार्वतीचा प्रश्न ( ६-१५ ), रामहृदयप्रस्तावना ( १६-३१ ), रामहृदय ( ३२-५६ ).

२. रामकथेची प्रस्तावना ( १-५ ), पृथ्वीसह ब्रह्मदेवाचें विष्णूकडे गमन ( ६-१३ ), ब्रह्मदेवाचें विष्णुस्तोत्र ( १४-२४ ), अवतारकथन ( २५-२८ ), देवाना वानर होण्या-विषयीं ब्रह्मदेवाची आज्ञा ( २९-३२ ).

३. दशरथाचा पुत्रप्राप्त्यर्थ वासिष्ठाला प्रश्न ( १-३ ), वसिष्ठ पुत्रकामेष्टि करवितो ( ४-१२ ), कौसल्येच्या पोटीं रामजन्म ( १३-१८ ), कौसल्येचें विष्णुस्तोत्र ( १९-२९ ), अवताराचें कारण ( ३०-३४ ), बाललीला ( ३५-३७ ), भरत, लक्ष्मण, शत्रुघ्न यांचे जन्म ( ३८-३९ ), पुत्रांचें नामकरण ( ४०-४१ ), बालपण ( ४२-५९ ), उपनयन, अध्ययन व नित्यक्रम ( ६०-६६ ).

४. विश्वामित्रागमन व रामाची मागणी ( १-८ ), वसिष्ठाच्या संमतीनें विश्वामित्र राम-लक्ष्मणांना नेतो ( ९-२७ ), त्राटिकावध ( २८-३२ ), रामाला अस्त्रविद्यादान ( ३३ ).

५. सिद्धाश्रमीं आगमन ( १-३ ), मारीचसुबाहुवध ( ४-१० ), विदेहदेशाला प्रयाण ( ११-१४ ), गौतमाश्रमीं राम येतो, तेथील वृत्तांत ( १५-३५ ), अहल्योद्धार ( ३६-४२ ), अहल्याकृत स्तवन ( ४३-६५ ).

६. मिथिलेला जातांना नाविकाकडून अडथळा ( १-२ ), नाविकाचा भाव ( ३-४ ), मिथिलेंत रामागमन ( ५-७ ), जनकाकडून सत्कार ( ८-१७ ), शिवचापभंग (१८-२८)

सीतास्वयंवर ( २९-३२ ), दशरथागमन ( ३३-४४ ), चौघां बंधूंचे विवाह ( ४५-५७ ), सीतेचा वृत्तांत ( ५८-६९ ), जनककृत रामस्तुति ( ७०-७५ ), सीता व राम यांची अयोध्येला पाठवणी ( ७६-८२ ).

७. परशुरामदर्शन व त्याचें भाषण ( १-१४ ), रामाचें भोंगळवाणा उत्तर (१५-१९), परशुरामाचा वृत्तांत ( २०-२८ ), परशुरामकृत रामस्तव ( २९-४५ ), रामाज्ञेनें परशुराम महेंद्र पर्वतावर जातो ( ४६-५० ), अयोध्येला आगमन ( ५१-५७ ).

---

## अयोध्याकांड

### ( सर्ग १-९, पृष्ठें ७३-१७१ )

१. नारदागमन व त्याचा सत्कार ( १-८ ), नारदकृत स्तव ( ९-३१ ), नारदागमनाचें कारण ( ३२-३५ ), रामाचें आश्वासन ( ३६-४१ ).

२. राज्याभिषेकाची तयारी ( १-१५ ), राममंदिरीं वसिष्ठागमन ( १६-२१ ), वसिष्ठाची प्रार्थना ( २२-३६ ), राम लक्ष्मणाला अभिषेकाची वार्ता सांगतो ( ३७-३८ ) दशरथ अभिषेकाचें वसिष्ठाशीं ठरवितो ( ३९ ), मातांचा आनंद ( ४०-४३ ), आकाशवाणी ( ४४-४५ ), मंथरेच्या अंगांत संचार व कैकेयीची कानउघाडणी ( ४६-७५ ), कैकेयी मंथरेच्या सांगण्याप्रमाणें वागते ( ७६-८३ ).

३. कैकेयीला दुःखित पाहून दशरथाची दीनवाणी स्थिति ( १-१४ ), कैकेयी देऊं केलेले वर मागते ( १५-२२ ), दशरथ घाबरून विनवणी करितो ( २३-२९ ), कैकेयी हट्ट सोडीत नाहीं ( ३०-३२ ), दशरथाची दुःखस्थिति ( ३३-३४ ), लोकांची उत्कंठा ( ३५-४१ ), सुमंत्र राजाकडे जातो ( ४२-४६ ), दशरथ सुमंत्राकरवीं रामाला आणवितो ( ४७-५१ ), दशरथ मूर्च्छित होतो ( ५२-५३ ), कैकेयी सर्व वृत्तांत रामाला सांगते ( ५४-५८ ), राम तिचें म्हणणें मान्य करितो ( ५९-६२ ), कैकेयी रामाला वनवास व भरताला राज्य मागून घेते ( ६३-६६ ), दशरथ रामाला भेटतो व त्याचा शोक (६७-७२), रामाचें आश्वासन (७३-७६), कौसल्या व सीता यांची भेट (७७-८०).

४. राम कौसल्येला भेटतो (१-६), कौसल्येचें आवेशयुक्त भाषण ( ७-१३ ), लक्ष्मणाचा संताप ( १४-१७ ), राम लक्ष्मणास उपदेश करितो ( १८-४३ ), कौसल्येचें सांत्वन ( ४४-४८ ), कौसल्येचा आशीर्वाद ( ४९-५० ), लक्ष्मणाचा व सीतेचा रामाबरोबर जाण्याचा निश्चय ( ५१-६३ ), राम अरण्याचें भयंकर स्वरूप सांगतो ( ६४-७० ), सीतेचा निर्धार ( ७१-७९ ), जातांना सीतेने केलेला दानधर्म ( ८०-८४ ), राम, सीता, लक्ष्मण दशरथाकडे जातात ( ८५-८७ ).

५. नागरिकांचे दुःखाचे उद्गार ( १–९ ), वामदेव मुनि सांत्वन करितात (१०–२९ राम हाच विष्णु होय, अशी वामदेवाच्या सांगण्यावरून त्यांची खात्री होते ( ३०–३२ ), सीतेसह राम कैकेयीकडे जातो व निरोप घेतो ( ३३–४२ ), वनाला प्रयाण (४३-४५), पौरांचा रामाला परतविण्याचा प्रयत्न, दशरथाची मूर्च्छा ( ४६–५० ), तमसा नदीवर वास ( ५१–५२ ), युक्तीनें पौरांना परतविलें ( ५३–५८ ), शृंगवेर पुराजवळ गुहाची भेट ( ५९–६३ ), गुह रामाला राज्य अर्पण करितो (६४–६७), राम गुहाची समजूत घालतो (६८–६९), वटाच्या चिकानें जटा बांधणें व पर्णशय्येवर निजणें ( ७०–७३ ).

६. गुहाचा लक्ष्मणाशीं संवाद ( १–१५ ), नौकेंत बसून गंगा पार जातात ( १६–२३ ), गुहाला राम परतवितो ( २४–२७ ), भरद्वाजाश्रमीं आगमन व सत्कार ( २८–३६ ), भरद्वाजानें केलेली रामस्तुति ( ३७–३९ ), भरद्वाजाचा निरोप घेऊन वाल्मीकीच्या आश्रमीं आगमन ( ४०–५१ ), वाल्मीकीनें केलेला रामस्तव ( ५२–६४ ), वाल्मीकींचा वृत्तात ( ६५–८८ ), रामाची चित्रकूटीं वस्ती ( ८९–९२ ).

७. सुमंत्र परत येऊन दशरथाला भेटतो ( १–२ ), दशरथाचा शोक ( ३–५ ), सुमंत्र सर्व हकीकत सांगतो ( ६–१४ ), कौसल्येचें टोंचून बोलणें ( १५–१७ ), शापाची आठवण व श्रावणकथा ( १८–४५ ), पुनः शोक व मृत्यु ( ४६–४८ ), वसिष्ठ भरताला आणवितो ( ४९–५८ ), कैकेयीकडून सर्व वृत्तांत कळतो ( ५९–७७ ), भरताचा शोक व संताप ( ७८–८१ ), कौसल्येला भरत भेटतो, ( ८२–९१ ), वसिष्ठाचा बोध (९२–१०८), दशरथाची उत्तरक्रिया (१०९–११३), रामामागून जाण्याचा निश्चय (११४)

८. भरताला राज्यदान, त्याचे उद्गार ( १–११ ), भरत, माता, वसिष्ठ वगैरे रामाकडे जातात ( १२–१४ ), गुहाची भेट ( १५–३८ ), गंगा उतरून भरद्वाजाश्रमीं आगमन व दोघांचा संवाद ( ३९–५८ ), भरत चित्रकूटीं जातो ( ५९–६६ ).

९. भरतभेट ( १–१२ ), पित्याच्या मृत्यूची वार्ता समजून राम शोक करितो ( १३–२१ ), राज्य स्वीकारण्याविषयीं भरताची रामाला प्रार्थना ( २२–२६ ), राम भरताची समजूत घालतो ( २७–३८ ), भरताचा निश्चय ( ३९–४० ), वसिष्ठाचा भरताला उपदेश ( ४१–४७ ), भरत रामपादुका घेऊन अयोध्येला निघतो ( ४८–५४ ), कैकेयी रामाची क्षमा मागते ( ५५–६२ ), कैकेयीला रामाचा उपदेश ( ६३–६८ ), भरत रामपादुका सिंहासनीं ठेवून राज्य करितो ( ६९–७५ ), राम अत्रीच्या आश्रमीं येतो ( ७६–८३ ), सीता अनसूया यांची भेट ( ८४–९० ), अत्रि रामाची स्तुति करितो ( ९१–९२ ).

## अरण्यकांड

### ( सर्ग १-१०, पृष्ठें १७१-२४७ )

१. राम नदी उतरून अरण्यांत जातो ( १-१६ ), विराध राक्षसाची भेट, रामाहातीं त्याचा वध ( १७-३३ ), देवगंधर्वांचा आनंद ( ३४-३५ ), विराध, एक शापभ्रष्ट गंधर्व ( ३६-३८ ), विराधानें केलेली रामस्तुति ( ३९-४२ ), रामाचें विराधाला वरदान ( ४३-४६ ).

२. राम, लक्ष्मण व सीता यांची शरभंगाश्रमाला भेट ( १-४ ), रामाला तपश्चर्येचें फळ अर्पून शरभंग चितारोहण करितो ( ५-६ ), शरभंग रामाची स्तुति करितो ( ७-११ ), दंडकारण्यवासी मुनींचें रामस्तवन ( १२-१७ ), मुनिवर्नें पाहून राक्षसवधाची रामप्रतिज्ञा ( १८-२२ ), सुतीक्ष्णाच्या आश्रमीं रामागमन ( २३-२६ ), सुतीक्ष्णानें केलेली रामस्तुति ( २७-३४ ), राम सुतीक्ष्णाची प्रशंसा करितो ( ३५-३९ ), राम अगस्त्याश्रमीं जाण्याला निघतो ( ४०-४१ ).

३. सुतीक्ष्णासह रामाचें अगस्त्याश्रमीं आगमन ( १-९ ), अगस्त्य व राम यांची भेट, अगस्त्यकृत रामस्तव ( १०-४४ ), अगस्त्य रामाला धनुष्य, भाते व खड्ग देतो व पंचवटींत राहण्यास सांगतो ( ४५-५० ).

४. जटायूची भेट ( १-७ ), पंचवटींत रामाचें राहाणें ( ८-१५ ), लक्ष्मणाला रामाचा उपदेश ( १६-५५ ).

५. शूर्पणखा कामपीडित होऊन रामाकडे येते ( १-११ ), राम तिला लक्ष्मणाकडे पाठवितो ( १२-१५ ), ती पुनः रामाकडे येते, रामाज्ञेनें लक्ष्मणाहातीं तिची विटंबना (१६-२०), खर व अनेक राक्षस रामावर चालून येतात, त्यांचा वध ( २१-३५ ), सीतेचा आनंद ( ३६-३७ ), शूर्पणखा रावणाकडे जाते व रामाची हकीकत सांगते ( ३८-५६ ), रावणाचें चिंतन ( ५७-६१ ).

६. रावण मारीचाकडे जातो ( १-२ ), मारीचाची ध्यानावस्था ( ३ ), रावणाला कुशलप्रश्न ( ४-६ ), रावण रामाची कथा सांगून साह्य मागतो ( ७-१४ ), मारीचाचा रावणास बोध ( १५-२९ ), रावणाचें प्रत्युत्तर ( ३०-३५ ), रामाहातीं मरण पसंत करून मारीच सुवर्णमृग होतो ( ३६-४१ ).

७. रामाच्या आज्ञेनें सीता अग्नींत गुप्त होते, व मायिक सीता बाहेर ठेवितो ( १-४ ), रामाकडे क्रीडार्थ सुवर्णमृगाची तिची मागणी ( ५-६ ), लक्ष्मणाला सीतेच्या रक्षणार्थ ठेवून राम सुवर्णमृगामागें जातो ( ७-१४ ), मृगाला मायावी राक्षस जाणून राम त्यावर बाण टाकितो ( १५-१७ ), रामाच्या आवाजांत 'मेलों' म्हणून मारीच

ओरडतो, त्याला सद्गति मिळते ( १८–२५ ), राम सीतेच्या काळजीनें मागें परततो ( २६–२७ ), रामाच्या शोधार्थ लक्ष्मण जात नाहीं, म्हणून सीता त्याजवर रागावते ( २८–३५ ), सीतेला वनदेवतांच्या स्वाधीन करून लक्ष्मण रामामागें जातो ( ३६–३७ ), रावण भिक्षुवेषानें रामाश्रमीं येतो, सीतेचा व त्याचा संवाद ( ३८–४९ ), रावण सीतेला घेऊन जातो, सीतेचा शोक ( ५०–५३ ), जटायु व रावणाचें युद्ध, जटायु घायाळ होऊन पडतो ( ५४–५८ ), शोकग्रस्त सीतेला रावण आकाशमार्गानें नेतो ( ५९–६१ ), खालीं पांच वानरांना पाहून सीता दागिने टाकिते. ( ६२–६३ ) सीतेला अशोक वनांत राम ठेवितो ( ६४–६६ ).

८. राम लक्ष्मणाला येतांना पाहून मनांत विचार करितो. ( १–८ ), तो लक्ष्मणावर रागावतो ( ९–१४ ), रामाचा सीतेकरितां शोक ( १५–२१ ), लक्ष्मणासह सीतेचा शोध ( २२–२३ ), जटायूची भेट व रामाला प्रार्थना ( २४–३६ ), जटायूची उत्तर-क्रिया ( ३७–४० ), जटायूला दिव्यस्वरूप प्राप्ति, त्यानें केलेली रामस्तुति ( ४१–५३ ), रामाची प्रसन्नता व जटायूला विष्णुपदप्राप्ति ( ५४–५६ ).

९. कबंधाचें दर्शन, रामलक्ष्मण त्याचे बाहु छेदून टाकितात ( १–९ ), कबंधाचा वृत्तांत, त्याची रामास प्रार्थना ( १०–२७ ), कबंधाचे दहनानंतर त्या शरीरांतून गंधर्वपुरुष प्रकट होतो व रामाची स्तुति करितो ( २८–५४ ), कबंधाला स्वर्लोकप्राप्ति ( ५५–५६ ).

१०. राम शबरीच्या आश्रमाला येतो ( १–४ ), शबरीचा वृत्तांत ( ५–१९ ), रामाचा तिला उपदेश ( २०–३३ ), शबरी सीतेची वार्ता सांगते ( ३४–३९ ), शबरीचा अग्निप्रवेश व तिला मुक्तिप्राप्ति ( ४०–४२ ), भक्तीचे माहात्म्य ( ४३–४४ ).

---

## किष्किंधाकांड

### ( सर्ग १–९, पृष्ठें १४८–३२५. )

१. राम पंपासरोवरावर येतो ( १–६ ), सुग्रीवाला रामदर्शन होतें, तो भयानें मारुतीला शोध घेण्याला पाठवितो ( ७–१० ), मारुति बटुरूपानें येतो व युक्तीनें रामलक्ष्मणांना सुग्रीवाला भेटवितो ( ११–२९ ), राम व सुग्रीव यांची मैत्री जडते ( ३०–३३ ), लक्ष्मण सुग्रीवाला रामवृत्तांत सांगतो, सुग्रीव सीतेच्या शोधाचे कामीं साहाय्य करण्याचें कबूल करितो ( ३४–३६ ), शोकग्रस्त सीतेनें दागिने खालीं टाकल्याचें व आपण ते गुहेंत ठेवल्याचें सुग्रीव सांगतो ( ३७–३९ ), दागिने वक्षःस्थलावर ठेवून राम शोक करितो ( ४०–४१ ), लक्ष्मण रामाचें सांत्वन करितो, सुग्रीव जानकीचा शोध लावण्याची व रावणाचा वध करण्याची प्रतिज्ञा करितो ( ४२–४३ ), रामसुग्रीवांचें अग्निसाक्षिक आलिंगन ( ४४–४५ ),

सुग्रीवाचा वृत्तांत ( ४६–५७ ), वालीला मारण्याची रामाची प्रतिज्ञा ( ५८–५९ ) वालीचा पराक्रम व त्याला मिळालेला शाप सुग्रीव रामाला सांगतो ( ६०–६९ ), राम दुंदुभीचें शरीर पायानें झुगारून देतो व सात तालांचा बाणानें भेद करितो ( ७०–७५ ), सुग्रीव रामाची स्तुति करितो ( ७६–९३ ).

२. राम ' वालीला युद्धास बोलाव ', म्हणून सुग्रीवाला सांगतो ( १–४ ), सुग्रीवाचें आह्वान, वालिसुग्रीवांचें युद्ध ( ५–९ ), सुग्रीवाचा पराजय, त्याची करुणापूर्वक रामाला विनवणी ( १०–१२ ), राम ओळखीकरितां सुग्रीवाच्या अंगावर चिह्न करितो, वालीला पुनः युद्धाला आह्वान ( १३–१९ ), तारा वालीला प्रार्थनापूर्वक युद्धाला जाऊं नका, म्हणून सांगते ( २०–२१ ), वाली तारेची समजूत घालतो ( २२–२४ ), तारा पुनः कारणे सांगून अडथळा करते ( २५–३३ ), वाली तिचें सांत्वन करितो ( ३४–४० ), वालि-सुग्रीवांचें पुनः युद्ध, रामबाणानें वाली पडतो ( ४१–४७ ), वाली अग्रभागीं रामाला पाहून त्याची निंदा करितो ( ४८–५८ ), रामाचें वालीला उत्तर ( ५९–६३ ), वाली रामाला शरण येतो, व सद्गति मिळवितो ( ६४–७१ ).

३. तारेला वालिवधाची वार्ता कळते, तिचा शोक ( १–११ ), राम तिचें सांत्वन करितो ( १२–३५ ), तारा जीवन्मुक्त होते ( ३६–३७ ), सुग्रीवाचा अज्ञाननाश ( ३८–३९ ), वालीचें उत्तरकार्य ( ४०–४३ ), राम सुग्रीवाची समजूत घालतो, राम त्याला राज्याभिषेक व अंगदाला यौवराज्याभिषेक करवितो ( ४४–५२ ), रामाचें प्रस्रवण पर्वतावर गमन व तेथें राहणें ( ५३–५५ ).

४. प्रस्रवण पर्वतावरील रमणीय देखावा ( १–५ ), लक्ष्मणास राम कर्मोपासना सांगतो ( ६–४१ ), रामाची सीताविषयक चिंता, सुग्रीवाची मारुतीकडून कानउघाडणी ( ४२–४८ ), सुग्रीवाज्ञेनें मारुति सर्वत्र दूत पाठवितो ( ४९–५४ ).

५. रामाचा शोक ( १–१० ), लक्ष्मण रामाज्ञेनें किष्किंधेला जातो ( ११–१५ ), रामाचें सत्यस्वरूप ( १६–२५ ), क्रोधसंतप्त लक्ष्मणाला अंगद भेटतो ( २६–२९ ), अंगद लक्ष्मण आल्याचे सुग्रीवाला कळवितो ( ३०–३२ ), अंगद व मारुति यांना सुग्रीव लक्ष्मणाकडे पाठवितो, लक्ष्मण सुग्रीवाच्या वाड्यांत येतो ( ३३–४० ), तारा लक्ष्मणाचें सांत्वन करिते ( ४१–४८ ), लक्ष्मण सुग्रीवाला भेटतो, व त्याची कानउघाडणी करितो, मारुति लक्ष्मणाचें सांत्वन करितो ( ४९–५६ ), सुग्रीव लक्ष्मणाचा सत्कार करितो, व रामाला भेटण्यास जातो ( ५७–६२ ).

६. राम व सुग्रीव यांची भेट ( १–४ ), सुग्रीव आपल्या वानरसेनेचें वर्णन करितो ( ५–१९ ), रामाज्ञेनें सुग्रीव सीताशोधार्थ सर्वत्र वानर पाठवितो ( २०–२७ ), राम मारुतीजवळ अंगठी देतो ( २८–२९ ), मारुति व इतर वानर गुहेंत शिरतात ( ३०–३९ ),

गुहेंत योगिनीची भेट, मारुति आपला वृत्तांत योगिनीला सांगतो, व तीहि आपली हकीकत त्याला कळविते ( ४०–५७ ), वानर गुहेच्या बाहेर येतात, योगिनी रामाकडे येते, व त्याचा स्तव करिते ( ५८–८२ ), राम बदरीवनांत तिला पाठवितो, तिला मुक्ति मिळते ( ८३–८४ ).

७. सीता न सापडल्यामुळें वानरांची निराशा, अंगदाचा शोक ( १–९ ), मारुति अंगदाची समजूत घालतो ( १०–२२ ), वानर महेंद्रपर्वतावर व तेथून समुद्रतीरावर जातात ( २३–२५ ), वानर मरण्यास सिद्ध होतात ( २६–२८ ), संपातीची भेट, वानर भयभीत होतात ( २९–३३ ), वानराच्या तोंडून जटायूचें नांव ऐकून संपाति त्यांची चौकशी करितो, अंगद त्याला सर्व वृत्तात कळवितो ( ३४–४६ ), संपाति जटायूच्या वार्तेनें आनंदतो, तो लंका, अशोकवन यांची माहिती वानरांना सागतो ( ४७–५६ ).

८. सपाति आपली व जटायूची कथा सांगतो ( १–५३ ), लंकेचा मार्ग सांगून संपाति जातो ( ५४–५५ ).

९. संपाति गेल्यावर समुद्र तरून जाण्याचें कोणाला सामर्थ्य आहे, याची चौकशी वानर करितात ( १–७ ), प्रत्येकाच्या बळाची विचारणा ( ८–१४ ), जांबवान् मारुतीचे नांव सुचवितो ( १५–२० ), मारुतीला स्फुरण चढतें ( २१–२४ ), जांबवान् मारुतीला आशीर्वाद देतो, मारुतीचें प्रचंड रूप ( २५–२८ ).

---

## सुंदरकांड

### ( सर्ग १–५ पृष्ठें ३२६–३७० )

१. मारुतीची उडी ( १–७ ), त्याची शक्ति कसोटीला लावण्याकरितां देव सुरसेला पाठवितात ( ८–१३ ), मारुति व सुरसा यांचा संवाद, मारुति तिच्या तोंडांत जाऊन बाहेर येतो ( १४–२४ ), तो आकाशमार्गानें जात असता समुद्राच्या सांगण्यावरून मैनाक त्याला आपल्या शिखरावर विश्राति घेण्यास सांगतो, मारुति त्याला स्पर्श करून पुढें जातो ( २५–३३ ), सिंहिकेचा वध ( ३४–३८ ), मारुति त्रिकूट पर्वतावर येतो ( ३९–४१ ), तो सूक्ष्मरूपानें लंकेंत प्रवेश करितो ( ४२–४३ ), लंकिनी मारुतीला अडविते, मारुति तिजवर मुष्टिप्रहार करितो, ती सीतेची माहिती सांगते ( ४४–५७ ), सीता व रावण यांचे डोळे एकाच वेळीं स्फुरण पावतात ( ५८ ).

२. सूक्ष्म रूपांत मारुति अशोकवनिकेंत येतो ( १–३ ), अशोकवन व तेथील शिंशपा वृक्ष ( ४–१० ), मारुतीला सीतादर्शन, तो लपून राहतो ( ११–१३ ), रावणाला मारुति पाहातो, रावण रामाची निंदा सीतेला ऐकवितो ( १४–३० ), सीता रावणाची निर्भर्त्सना करिते ( ३१–३६ ), रावण सीतेच्या अंगावर धांवून जातो, मंदोदरी निवारण

करिते ( ३७–३९ ), रावणाच्या सांगण्यावरून राक्षसिणी सीतेला छळतात ( ४०–४७ ), त्रिजटा राक्षसिणींचा प्रतिकार करिते ( ४८–५४ ), सीता दुःखानें गळफांस घेण्याचा विचार करिते ( ५५–५७ ).

३. मारुति सीतेला ऐकूं जाईल अशा आवाजांत रामचरित्र गातो ( १–१५ ), सीतेला आनंद होतो, मारुति सीतेपुढें येऊन वंदन करितो व आंगठी देतो ( १६–३६ ), सीता मारुतीची प्रशंसा करिते, सीता खुणेची वस्तु चूडामणि देते, व खुणेची गोष्ट म्हणून काककथा सांगते ( ३७–६० ), मारुति तिला आश्वासन देतो, व प्रचंड रूप धारण करितो ( ६१–६४ ), सीता आनंदित होऊन मारुतीला निरोप देतें, मारुति फळे खातो व अशोकवनिका निर्वृक्ष करितो ( ६५–७१ ), राक्षसिणी मारुतीला पाहातात, व रावणाला त्यानें केलेली नासाडी कळवितात ( ७२–७७ ), रावण मारुतीवर अनेक राक्षस, सेनापति व मंत्री पाठवितो, त्यांचें मारुति पीठ करितो ( ७८–८५ ), रावणपुत्र अक्षाचा वध ( ८६–८८ ), रावण इंद्रजिताला मारुतीवर पाठवितो, इंद्रजित् मारुतीला बांधून घेऊन जातो ( ८९–१०० ).

४. मारुतीला बांधून सभेंत आणितात ( १–४ ), रावणाच्या सांगण्यावरून प्रहस्त मारुतीला त्याची हकीकत विचारितो ( ५–६ ), मारुति रावणाला उपदेश करितो ( ७–२५ ), रावण संतापतो ( २६–२८ ), मारुति क्रुद्ध होतो, वानराचे तुकडे करण्यास रावण सांगतो, बिभीषण त्याचें निवारण करितो ( २९–३३ ), मारुतीच्या शेपटीवर तेल ओतून आग लावितात ( ३४–३८ ), सूक्ष्म रूप धरून मारुति बंधनमुक्त होतो, पुनः पर्वतरूप धारण करून शेपटानें लंकादहन करितो ( ३९–४५ ), अग्नि वायूचा मित्र असल्यामुळे व नामस्मरणामुळें शेपटी जळत नाहीं ( ४६–४७ ).

५. मारुति सीतेचा निरोप घेऊन निघतो ( १–११ ), मारुतीला पाहून वानर आनंदित होतात ( १२–१४ ), ते रामसुग्रीवाना भेटण्याला निघतात, मधुवनांत मद्यपान करितात ( १५–२२ ), दधिवक्त्र सुग्रीवाकडे कागाळी नेतो ( २३–२५ ), मारुतीनें सीताशोध लावल्याची सुग्रीवाची खात्री होते, सुग्रीव वानरांना जवळ बोलावितो ( २६–३५ ), रामाला मारुति सीतेचें वृत्त सांगतो ( ३६–५८ ), राम मारुतीचे आभार मानितो ( ५९–६० ), मारुतीची योग्यता ( ६१–६४ ).

---

## युद्धकांड

### ( सर्ग १–१६, पृष्ठें ३७१–५१८ )

१. राम मारुतीची प्रशंसा करितो ( १–५ ), समुद्र कसा तरावा, याविषयीं रामाला काळजी ( ६–७ ), सुग्रीव वानरवीरांची प्रशंसा करितो ( ८–१३ ), राम मारुतीला लंकेचें

स्वरूप विचारितो, मारुति सांगतो ( १४–२६ ), सर्वांस घेऊन राम निघतो (२७–३३), सैन्य कोठेंही न थांबतां समुद्रावर येतें, तेथें तळ देतात ( ३४–४५ ), समुद्र पाहून सर्व खिन्न होतात ( ४५–४८ ), रामाचा सीतेकरितां मायावी शोक ( ४९–५४ ).

२. मारुतीच्या पराक्रमानें रावण लज्जित होतो ( १–५ ), रावणसभेंतील विचार, राक्षस रावणाला उत्तेजन देतात ( ६–१२ ), कुंभकर्णाची मसलत ( १३–१८ ), इंद्रजित् लढाई-वर जाण्यास अनुज्ञा मागतो (१९), विभीषणाचा उपदेश ( २०–२६ ), रावण विभीषणाला धिक्कारितो ( २७–३१ ), विभीषणाचा पुनः उपदेश, रावणाचा त्याग व रामाकडे जाणें ( ३२–४५ ).

३. विभीषण चार मंत्र्यांसह रामाकडे येतो ( १–५ ), सुग्रीवाची विभीषणविषयक शंका ( ६–९ ), राम सुग्रीवाची समजूत करून विभीषणाला जवळ आणवितो (१०–१३), रामाला विभीषण भेटतो, सुग्रीव रामाची स्तुति करितो ( १४–३२ ), राम प्रसन्न होतो, विभीषण भक्ति व ज्ञान मागतो (३३–३७), भक्तांच्या हृदयांत आपण सदैव राहातों म्हणून सांगून विभीषणाला राम राज्याभिषेक करवितो ( ३८–४६ ), सुग्रीव विभीषणाशीं मैत्री करितो ( ४७–४८ ), रावणाकडून शुक येऊन फितुरीचा प्रयत्न ( ४९–५२ ), वानर त्याजवर धांवतात, राम निवारण करितो ( ५३–५५ ), शुकाकडे सुग्रीवाचा निरोप, शुकाला बांधतात ( ५६–५८ ), शार्दूलाच्या सांगण्यावरून रावणाला चिंता ( ५९–६० ), राम समुद्रावर संतापतो ( ६१–६७ ), समुद्र रामाला शरण येतो, त्यानें केलेली रामाची स्तुति ( ६८–७८ ), रामाचा अमोघ बाण, आभीरांचा नाश ( ७९–८३ ), नळानें सेतु बांधावा, म्हणून समुद्राचा सल्ला, नल सेतु बांधतो ( ८४–८७ ).

४. रामेश्वराची स्थापना ( १–४ ), राम सेतु ओलांडून सुवेळ पर्वताला वेढा घालतो ( ५–८ ), पर्वतावरून लंका पाहातात ( ९–१३ ), शुक रावणाला निरोप सांगून उपदेश करितो ( १४–५६ ).

५. शुकावर रागावून रावण त्याला घालवून देतो ( १–४ ), शुकाचा वृत्तांत ( ५–२४ ), माल्यवान् लंकेंतील अपशकुन सांगतो व रामाला शरण जाण्याचा उपदेश करितो ( २५–३६ ), माल्यवानाचा धिक्कार ( ३७–४० ), रावणाची राक्षसास युद्धास जाण्याची आज्ञा, राम बाण टाकून दहाही मुकुटांचा छेद करितो ( ४१–४४ ), रावण लाजतो, तो प्रहस्तादि-कांना रामावर पाठवितो, राक्षस वेशीजवळ येतात ( ४५–४८ ), वानरांचा लंकेला वेढा ( ४९–५६ ), तुमुल युद्ध, रावणसैन्याचा चौथा भाग राहतो ( ५७–६४ ), इंद्रजित् चालून येतो, वानर युद्धात पडतात, द्रोणगिरि आणण्याला राम मारुतीला पाठवितो ( ६५–७३ ), मारुति द्रोणाचल आणितो, वानर उठतात, रावण भितो ( ७४–७५ ), सर्व सेनापतींना युद्धावर पाठवितो, ते वानरसेनेचा नाश करितात ( ७६–८२ ), रामशक्ति अंगांत शिरून वानर बलाढ्य होतात ( ८३–८६ ).

६. रावण युद्धाला येतो, मयशक्ति विभीषणावर टाकतो, ती लक्ष्मणाला लागते ( १–१० ), रावणाच्या वक्षावर मारुति प्रहार करितो, रावणाची दुर्दशा ( ११–१४ ), मारुति लक्ष्मणाला रामाकडे आणतो, शक्ति रावणाच्या रथावर जाते, रावण रामावर धांवून येतो, रामरावणांचें प्रथम युद्ध ( १५–३० ), रामाज्ञेनें मारुति ओषधि आणण्यास जातो ( ३१–३४ ), लक्ष्मणाला अडथळा करण्याकरितां रावण कालनेमीची योजना करितो ( ३५–४१ ), कालनेमीचा उपदेश ( ४२–६३ ).

७. कालनेमीवर रावण संतापतो, कालनेमी रावणाला वश होतो ( १–४ ), कालनेमीचें तपोवन ( ५–११ ), मारुति पाणी मागतो, हनुमंताशीं कालनेमीचे कपटी भाषण ( १२–१७ ), मारुति मायावी बटूबरोबर पाण्यावर जातो, महामाया मकरी मारुतीला गिळूं लागते, मारुति तिला मारितो, मकरी अप्सरारूपांत प्रकट होते ( १८–२४ ), धान्यमाली कालनेमीचा वृत्तांत सांगते, मारुति कालनेमीचा वध करितो ( २५–३२ ), मारुति ओषधी घेऊन येतो, व लक्ष्मण शुद्धीवर येतो ( ३२–३८ ), मारुतीची प्रशंसा करून राम परत युद्धाला जातो, रावण रामबाणानें विद्ध होतो, तो अनरण्याची कथा असुरांना सांगतो ( ३९–४७ ), रावण कुंभकर्णाला उठवून आणवितो, रावण त्याला सर्व वृत्त सांगतो ( ४८–५९ ), कुंभकर्णाचा उपदेश ( ६०–७० ).

८. कुंभकर्णावर रावण संतापतो (१–२), कुंभकर्ण लढाईवर जातो, वानर भयभीत होतात (३–८), विभीषण त्याला भेटून आपली कथा सांगतो (९-१२), कुंभकर्ण विभीषणाला आलिंगन देऊन निरोप देतो (१३–१६), कुंभकर्ण वानरांचा चुराडा करितो, राम संतापतो, राम व कुंभकर्ण यांचें युद्ध, कुंभकर्णाचा वध ( १७–२८ ), देवगंधर्वांची रामावर पुष्पवृष्टि (२९–३०), नारद येतो व रामाची स्तुति करितो ( ३१–५२ ), रावणाचा शोक, इंद्रजित् सांत्वन करितो व निकुंभिलेंत होम आरंभितो ( ५३–५९ ), विभीषण होमवार्ता रामाला कळवितो, व आपल्याबरोबर रणीं लक्ष्मणास पाठविण्याची प्रार्थना करितो ( ६०–६८ ).

९. राम विभीषणाबरोबर लक्ष्मणास पाठवितो ( १–६ ), लक्ष्मणाचा उत्साह ( ७–९ ), अनेक राक्षस, जांबवंत, हनुमान्, त्यामागून जातात ( १०–११ ), विभीषणाच्या सांगण्यावरून इंद्रजितावर लक्ष्मण बाणवृष्टि करितो ( १२–१७ ), वानरांचें व राक्षसांचें तुमुल युद्ध होतें ( १८–१९ ), इंद्रजित् होम टाकून लक्ष्मणावर धांवून येतो, विभीषणाला पाहून त्याची निर्भर्त्सना करितो ( २०–२४ ), लक्ष्मण व इंद्रजित् परस्परांवर बाण टाकतात, इंद्रजिताचें कवच फाटतें ( २५–३४ ), लक्ष्मणाचें कवच खालीं पडतें, अनिश्चित स्वरूपांत लढाई (३५–३८), लक्ष्मण इंद्रजिताचे धनुष्य रथ, घोडे यांचा नाश करितो, इंद्रजितही दुसरें धनुष्य घेऊन वानरांची दाणादाण करितो ( ३९–४३ ), लक्ष्मण ऐंद्रास्त्राची योजना करितो, इंद्रजिताचा वध ( ४४–४७ ), देवांचा व वानरांचा आनंद, राम लक्ष्म-

णाची प्रशंसा करितो ( ४८–५७ ), रावण पुत्रवध ऐकून मूर्च्छित होतो, संतापानें सीतेला मारण्याला जातो ( ५८–६१ ), सुपार्श्व रावणाचा प्रतिकार करितो ( ६२–६८ ).

१०. उरलेल्या राक्षसांस घेऊन रावण रामावर जातो, व रामाचा बाण लागून लंकेला जातो ( १–३ ), तो शुक्राचार्यांची भेट घेतो ( ४–६ ), शुक्राचार्य होम करण्यास सांगतो, विभीषण ती वार्ता रामास कळवितो, सरमा होमस्थान दाखविते ( ७–१८ ), होमाचा विध्वंस ( १९–२३ ), मंदोदरीची विटंबना व तिचा शोक ( २४–३२ ), अनुष्ठान सोडून रावण मंदोदरीचें सांत्वन करितो ( ३२–४३ ), मंदोदरीचें भाषण ( ४४–५४ ), रावण आपला उद्देश कळवितो ( ५५–६० ).

११. रावण युद्धाला निघतो, मारुति त्याच्याशीं लढतो ( १–८ ), रावणाच्या मुष्टिप्रहारानें मारुति मूर्च्छित होतो, सावध होऊन पुनः लढाई, रामरावणांचें भयंकर युद्ध ( ९–१७ ), इंद्र मातलीबरोबर रथ पाठवितो ( १८–२३ ), अस्त्रावर अस्त्रें टाकून भयंकर युद्ध ( २४–३४ ), राम विह्वल झाल्याचें पाहून देवादिकांना खेद वाटतो, राम इंद्रधनुष्या-सारखें धनुष्य घेऊन रावणावर बाण सोडतो व त्याचीं मस्तकें तोडितो (३५–४६), मस्तकें पुनः जडतात, नाभिस्थानचें अमृत अग्न्यस्त्रानें सुकविण्याची मसलत विभीषण देतो, राम रावणाच्या नाभीचा छेद करितो ( ४७–५५ ), मुख्य शीर्ष व दोन बाहू यानीं रावण लढतो, ब्रह्मास्त्र सोडण्याची सूचना मातलि देतो ( ५६–६३ ), राम निर्वाणींचा बाण सोडतो, रावण गत-प्राण होतो ( ६४–७३ ), राक्षस पळत सुटतात, वानर आनंदीआनंद करितात ( ७४–७७ ), रावणाच्या शरीरांतून तेज निघून रामरूपीं मिळतें, देव आश्चर्य करितात ( ७८–८२ ), रावणाची विरोधभक्ति ( ८३–८६ ), नारदाची प्रार्थना ( ८७–८८ ).

१२. राम सर्वांचे आभार मानितो ( १–३ ), मंदोदरी, विभीषण यांचा शोक (४–६), लक्ष्मणाकडून विभीषणाचें सांत्वन ( ७–२८ ), विभीषण रामाकडे येतो, राम त्याजकडून उत्तरकार्य करवितो ( २९–३९ ), विभीषण स्त्रियांना लंकेत पाठवितो, सर्वत्र आनंद, विभीषणाला राज्याभिषेक ( ४०–४६ ), विभीषण नजराणे घेऊन रामाकडे येतो, रामाला आनंद होतो, सुग्रीवाचे राम आभार मानितो ( ४७–५० ), मारुतीला सीतेकडे पाठवितो, राम सीतेला भेटतो ( ५१–५६ ), मारुति रामाचें भाषण तिला कळवितो ( ५७–५९ ), जानकीचें भाषण मारुति रामाला कळवितो, जानकीला आणविण्याविषयीं राम विभीषणाला सांगतो, सीता येते ( ६०–७५ ), राम तिला अभद्र शब्द बोलतो, सीता दिव्य करिते ( ७६–८३ ).

१३. सर्व देव येऊन रामाची स्तुति करितात ( १–९ ), ब्रह्मदेवाचें स्तवन ( १०–१८ ), अग्नि सीतेसह प्रकट होतो, राम सीतेचा स्वीकार करितो ( १९–२२ ), इंद्र रामाची स्तुति करितो ( २३–३२ ), पार्वतीसह शंकर रामाला भेटतात (३३–३४), दशरथभेट (३५–३७), रामाच्या आज्ञेनें इंद्र मेलेल्या वानरांना जीवंत करितो ( ३८–३९ ), मंगलस्नान करून अयो-

ध्येस जाण्याची विनंति विभीषण करितो, रामाच्या आज्ञेनें विभीषण वानरांचा सत्कार करितो ( ४०–४६ ), सर्वांना निरोप देऊन राम पुष्पक विमानांत सीतेसह बसतो ( ४७–५२ ), ' आम्ही अयोध्येला येणार ' म्हणून सर्व सांगतात, रामाच्या अनुज्ञेनें सर्व पुष्पकांत बसतात ( ५३-५७ ), पुष्पक विमान चालूं लागतें ( ५८–६० ).

१४. मार्गांतील देखावे रामसीतेला दाखवितो, भरद्वाजाश्रमीं येतात ( १–१५ ), राम भरताची, आर्यांची वगैरे चौकशी करितो, भरद्वाज सर्वांचें कुशल कळवितो ( १६–१८ ), भरद्वाजाची रामस्तुति व सत्कार ( १९–३७ ), राम भरताकडे मारुतीला पाठवितो ( ३८–४५ ), मारुति गुहाला भेटतो, नंतर नंदिग्रामाला जातो, भरताची भेट ( ४६–५४ ), मारुति भरताला रामवार्ता सांगतो ( ५५–५७ ), भरताचा आनंद, तो नगर शृंगारतो, सगळे लोक रामदर्शनार्थ निघतात ( ५८–७५ ), विमान दिसूं लागतें, रामाची भेट, राम भरताला मांडीवर घेतो ( ७६–८४ ), भरत व शत्रुघ्न सर्वांना भेटतात ( ८५–९१ ), राम आर्यांना भेटतो, भरत रामाला सर्वस्व अर्पण करितो ( ९२–९६ ), भरताश्रमीं राम जातो, पुष्पकाला कुबेराकडे पाठवितो, व गुरु वसिष्ठाकडे जाऊन बसतो ( ९७–१०० ).

१५. राम राज्य स्वीकारितो, त्याचें मंगलस्नान ( १–११ ), सीतेला अलंकार घालून राजस्त्रिया सजवितात, रथांत राम आरूढ होतो ( १२–१५ ), सर्व अयोध्येस निघतात, रामाचा नगरप्रवेश ( १६–२९ ), राम कौसल्येला व इतर मातांना वंदन करितो ( ३० ), रामाज्ञेनें भरत सर्वांना मंदिरें राहण्यास देतो, भरत चतुःसिंधूंचे जल आणवितो ( ३१–३६ ), रामराज्याभिषेकसमारंभ ( ३७–४९ ), पार्वतीसह शंकर रामस्तुति करितो ( ५०–६३ ), इंद्रकृत स्तुति ( ६४–६५ ), पितर, यक्ष, गंधर्व इत्यादिकांची रामस्तुति ( ६६–७२ ), देव वगैरे परत जातात, सर्वत्र आनंदीआनंद ( ७३–७५ ).

१६. रामराज्यांत सर्वत्र आबादानी, तो सर्वांस देणग्या देतो ( १–११ ), मारुतीला वरदान ( १२–१७ ), गुह रामाला भेटतो, राम त्याला भूषणें, राज्य देतो, सुग्रीवादिकांचा सत्कार करितो, विभीषण लंकेला जातो ( १८–२४ ), राम उत्तम प्रकारें राज्य करितो, लक्ष्मणाला यौवराज्याभिषेक, राम दहा हजार वर्षें राज्य करितो ( २५–३३ ), रामायणमाहात्म्य ( ३६–४८ ).

---

## उत्तरकांड

### ( सर्ग १–९, पृष्ठें ५१९–६०९ )

१. राज्याभिषेकानंतरचें रामवृत्त पार्वती विचारिते ( १–४ ), अगस्त्य वगैरे मुनि अभिनंदनार्थ येतात ( ५–१९ ), इंद्रजिताच्या विशेष प्रशंसेचें कारण राम विचारितो,

अगस्त्य रावणाची कुलकथा सांगतो, रावणाचीं मातापितरें, बंधु, बहिणी वगैरे हकीकत ( २०-६३ ).

२. अगस्त्य पुढील रावणकुलकथा सांगतात, तिघां भावांची तपश्चर्या ( १-११ ), ब्रह्मदेव प्रसन्न होऊन त्यापासून वरप्राप्ति ( १२-२३ ), सुमाली येऊन कुबेराकडून लंका घेण्याचा उपदेश करितो ( २४-३२ ), कुबेराला लंकेंतून रावण घालवितो, कुबेर अलकेंत शंकराच्या आश्रयानें राहातो ( ३३-३७ ), रावणाला राक्षसांकडून लंकेंत अभिषेक, तिघांचे विवाह ( ३८-४३ ), इंद्रजिताचा जन्म, कुंभकर्णाला निद्रेकरिता गुहेची योजना ( ४४-४६ ), ब्राह्मणादिकांना रावणापासून त्रास, कुबेर कानउघाडणी करितो, रावण कुबेरनगरीवर चालून जाऊन पुष्पक विमान हरण करितो ( ४७-४९ ), इंद्रजित् इंद्राला जिंकून त्याला बांधून आणितो ( ५०-५३ ), ब्रह्मदेव इंद्राला सोडवितो, रावणाचा पराक्रम, नंदिकेश्वराचा शाप, रावणाची फजिती, वालीशीं मैत्री करून रावण राज्य करितो ( ५४-६० ), अगस्त्यकृत रामस्तुति ( ६१-७७ ).

३. वाली व सुग्रीव यांची अगस्त्य जन्मकथा सांगतो ( १-२७ ), सीताहरणाची कथा अगस्त्य सांगतो, विरोधभक्तीचा रावणनिश्चय ( २८-५९ ).

४. नारद मुनि रावणाला भेटतात, अत्यंत बलवान् लोक कोठें आहेत, म्हणून रावण विचारितो, नारद श्वेतद्वीपांत जाण्यास सांगतो ( १-४ ), मंत्र्यांबरोबर रावण श्वेतद्वीपाला जातो, तेथील बायकांकडून विटंबना करितात ( ५-८ ) विष्णूच्या हातीं मरण यावें ह्या बुद्धीनें रावण सीताहरण करितो (९-११), रामाची स्तुति करून अगस्त्य जातो (१२-१३), संसारी पुरुषाप्रमाणें राम वागतो, रामराज्यवर्णन ( १४-२३ ), राम शूद्रकाला मारून ब्राह्मणपुत्राला सजीव करितो, व सर्वत्र शिवलिंगें स्थापितो ( २४-२७ ), राम व सीता यांचें गुणवर्णन ( २८-३१ ), सीतेची रामाला प्रार्थना ( ३२-४० ), रामाचें उत्तर, सीतेसंबंधी दूतवार्ता, सीतात्याग ( ४१-५९ ), वाल्मीकीच्या, आश्रमात सीतेचें राहाणें ( ६०-६२ ) रामाची विरक्तता ( ६३ ).

५. लक्ष्मणाला रामाचा उपदेश—रामगीता ( १-६२ ).

६. च्यवनादि मुनि रामाकडे येऊन लवणापासून रक्षण करण्यास सांगतात ( १-१० ), त्यांना अभय देऊन लवणावर राम शत्रुघ्नाला पाठवितो, लवणाचा वध ( ११-२५ ), वाल्मीकीच्या आश्रमांत कुशलवजन्म, मुलांचे गुण ( २६-३३ ), राम अश्वमेध करितो, कुशलवांना घेऊन वाल्मीकि तेथें येतो ( ३४-३६ ), कुशाला ज्ञानोपदेश ( ३७-५६ ).

७. मुलांच्या तोंडून रामायण ऐकून रामाला आनंद होतो ( १-१२ ), राम दहा सहस्र द्रव्य देतो, मुलें घेत नाहींत, ते सीतेचे पुत्र आहेत, असें जाणून राम वाल्मीकीला आणवितो, यज्ञमंडपांत वाल्मीकीबरोबर सीता येते(१३-२६),वाल्मीकीचें रामाला उद्देशून भाषण(२७-३३),

रामाचें भाषण, ब्रह्मदेवादिक देवांचें आगमन, सीतेचें भाषण, सीतेचें भूगर्भांत शिरणें(३४-४८), राम सीतेबद्दल शोक करितो, कुशलवांना घेऊन राम अयोध्येला येतो, कौसल्येला रामाचा उपदेश ( ४९-८२ ), तिन्ही मातांना सद्गति ( ८३-८४ ).

८. भरत रामाज्ञेनें गंधर्व देशांतील दुष्ट गंधर्वांचा वध करितो, भरतपुत्र व लक्ष्मणपुत्र यांचे राज्याभिषेक (१-८), ऋषिवेषधारी कालाचें आगमन, त्याचा सत्कार(९-१६),एकांतांत तिसरा आल्यास त्याच्या वधाचा करार, ब्रह्मदेवाचा निरोप व रामाचें उत्तर ( १७-३९ ), दुर्वासमुनीचें आगमन, लक्ष्मणाची इकडे आड तिकडे विहीर अशी स्थिति, 'सर्व नाशापेक्षां स्वतःचा नाश होणें बरें,' असा त्याचा निश्चय, लक्ष्मणाचें रामाला भेटणें ( ४०-४७ ), दुर्वास मुनीचें कार्य ( ४८-५१ ), रामाला आपल्या प्रतिज्ञेची आठवण होते, राम मंत्र्यांचा सल्ला घेतो, लक्ष्मणाचा त्याग ( ५२-६६ ), लक्ष्मण सरयू नदीवर जातो, प्राणवायूचा निषेध करितो, इंद्र स्वर्गलोकीं घेऊन जातो, देव पूजा करितात ( ६७-७१ ).

९. लक्ष्मण गेल्यावर रामाच्या मनाची स्थिति, रामाचा पुढील उद्देश, लक्ष्मणामागून जाण्याचा निश्चय, भरताचा शोक, प्रजांची रामावरील भक्ति ( १-१४ ), कुशलवांना राज्यांवर पाठवितो, शत्रुघ्नाकडे दूत जातात, पुत्रांना राज्यांवर बसवून शत्रुघ्न येतो ( १५-२४), शत्रुघ्नाचा निर्धार, बिभीषण, वानर, राक्षस वगैरे सर्वांचा रामाबरोबर जाण्याचा निश्चय ( २५-३१ ), मारुति जांबवंत यांना शेवटच्या आज्ञा ( ३२-३६ ), राम नगराबाहेर निघतो, त्याचेबरोबर सर्व प्रजा निघतात, सरयूनदीवर राम येतो, आकाशांत देव येतात, ब्रह्मदेवकृत प्रार्थना ( ३७-५५ ), अवतारसमाप्ति, रामाचें ब्रह्मदेवाला सांगणें, रामभक्तांचे सरयूंत देहत्याग, ग्रंथमाहात्म्य ( ५६-७३ ).

( अनुक्रमणिका समाप्त. )

---

## दुरुस्ती.

**प्रस्तावना**—पेज २१ ओळ ३ री. '**नाहमस्मीति**' याच्या पुढें व '**प्रतीयात**' याच्यापूर्वी **यदि हि नात्मास्तित्वप्रतीतिः स्यात्सर्वो लोको नाहमस्मीति**' असे शब्द वाचावे.

पृष्ठ ११८, श्लोक ३७, भाषांतर—' त्यावर रामानें तिच्या अंगावरील वस्त्र काढून घेतलें, आणि तिला वल्कलें नेसविलीं. ' याऐवजीं ' त्यावर रामानें ( तिच्या हातांतील ) तें वस्त्र ( वल्कल ) आपल्या हातांत घेऊन तिला तें नेसविलें, ' असें वाचावें.

॥ श्रीरामसमर्थ ॥

श्री शके १८६१ प्रमाथीनाम संवत्सर श्रावण शुक्ल द्वितीया गुरुवासरे प्रारंभः

सन 1939 आगस्ट ता. 17 ,,

श्रावण शुद्ध एकादशी शुक्रवार वरमहालक्ष्मी
(श्रीसीतास्वयंवर)

आश्विन शुद्ध पौर्णिमा शुक्रवार

सन 1940. अक्टोबर ता. 27 ,,

श्रीराम पट्टाभिषेक

आवृत्ती. 1 ली

श्री शके १८६३, वृषनाम संवत्सर
आषाढ शुक्ल एकादशी शनिवार.
सन 1941. जुलै ता. 5 श्रीरामपट्टाभिषेक.
आवृत्ती "2 री



नमो भगवते वासुदेवाय

॥ श्रीराम जयराम जयजयराम ॥



दक्षिणे लक्ष्मणो यस्य वामे च जनकात्मजा ।
पुरतो मारुतिर्यस्य तं वंदे रघुनंदनम् ॥



# श्रीरामचंद्रार्पणमस्तु ।



## आर्या

श्रीरामा गुणधामा ! भक्तजनोल्हास राघवा राया !,
वाराया भूतापा, अवतरसि भवीं जनांस ताराया ॥ १ ॥

राजमणे करुणाघन ! चरितें तव कंठ, गहिंवरें दाटे
वाटे गावें, कीं तें दावील जनांस मुक्तिचे वाटे ॥ २ ॥

मधु मधुर, सिता मधुरहि, त्याहुनि तव नामकीर्तनश्रवण,
श्रवण रमात तिथें मम, अष्टांगीं नमुनि ते नकोत वण ॥ ३ ॥

जगदीशा श्रीशा ! तव पदकंजीं चित्त नित्य लोभावें,
भाव त्वत्पद अर्चुनि भक्तजनीं यश मदीय शोभावें ॥ ४ ॥

यम नियम तप न जाणें, जाणें रामा ! त्वदीय ते चरण,
स्मरणें तव नामाच्या संतत होइल भवाब्धिचें तरण ॥ ५ ॥

जय जय दशमुखकंदन ! रघुनंदन ! वंदनासि जे करिती,
दुरितौघ सकल हरिती, कीर्तिसवें मुक्तिला सुखें वरिती ॥ ६ ॥

यत्नशतें रघुवीरा ! दास्य घडे, दे अशी मला सेवा
हेवा कथाश्रवणीं तो, वितरीं मज शीघ्र भक्तिचा ठेवा ॥ ७ ॥

राजेंद्रा दाशरथे ! सजलों तव सख्य तें करायासी,
आयासीं प्राणधना वंचीन समस्त, उद्धरीं यासी ॥ ८ ॥

मम मीतूंपण गेलें, दृश्यद्रष्ट्रादि भेद तो नाहीं,
पाहीं आत्मनिवेदन, सामर्थ्य न मज वदावया कांहीं ॥ ९ ॥

भा. शं. दे.



श्री.

# सार्थ श्रीमदध्यात्मरामायण.

## अध्यात्मरामायणमाहात्म्य.

### सर्ग १ ला.

**श्रीः ॥ अप्रमेयत्रयातीतनिर्मलज्ञानमूर्तये । मनोगिरां विदूराय दक्षिणामूर्तये नमः ॥ १ ॥ ॥ सूत उवाच ॥ कदाचिन्नारदो योगी परानुग्रहवांछया । पर्यटन्सकलाँल्लोकान्सत्यलोकमुपागमत् ॥ २ ॥ तत्र दृष्ट्वा मूर्ति-**

प्रमाणातीत अशा तिघांच्या–माया, जीव व ईश्वर यांच्या–पलीकडे असणाऱ्या, निर्मल–विषयरूप मलविवर्जित–आत्मस्वरूपज्ञान हेंच शरीर धारण करणाऱ्या आणि वाणी आणि मन यांना अगोचर अशा दक्षिणामूर्तीला नमस्कार असो. १ ( कोणी एक वेळी ) सूत ( शौनकादि ऋषींना ) म्हणाला, “ एकदां योगसंपन्न नारदमुनि लोकांवर अनुग्रह करावा या इच्छेनें स्वर्ग, मृत्यु, पाताळ या लोकांत फिरत असतां सत्यलोकाप्रत–ब्रह्मलोकाप्रत–प्राप्त झाला. २ तेथें, ज्याच्या सभोंवती देहधारी वेद

१ ज्याचे प्रमाण काढता येत नाहीं अशा, प्रमाणापलीकडे गेलेल्या प्रत्यक्ष, अनुमान उपमान, शब्द, अर्थापत्ति आणि अनुपलब्धि हीं कोणत्याही विषयाच्या ज्ञानाचीं प्रमाणे होत २ विषयमलरहित विषय-शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे विषयरूपी मल ज्यांत नाहीत असे ( निर्विषय आत्मस्वरूपज्ञान ) ३. दक्षिणामूर्ति म्हणून शंकराचा एक अवतार होऊन गेला त्यासंबंधी शंकराचार्यविरचित दक्षिणामूर्ति स्तोत्र प्रसिद्ध आहे दक्षिणामूर्तीचें वर्णन पुढीलप्रमाणें केलेलें आढळून येतें —‘ चित्रं वटतरोर्मूले वृद्धाः शिष्या गुरुर्युवा । गुरोस्तु मौनं व्याख्यानं शिष्यास्तुच्छिन्नसंशयाः ’ ॥ ४ सूत हा एक पौराणिक ऋषि असून तो व्यासशिष्य होता ५. देवर्षि ब्रह्मपुत्र नारद हे पूर्ण ब्रह्मचारी, मोठे तत्त्ववेत्ते, परमभागवतोत्तम, महायोगी, अज्ञानी जीवास उपदेश करून सन्मार्गास लावणारे, असे महापुरुष होते ६. सामान्यत स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ असे तीन लोक समजले जातात. परंतु वर्णक्रमाने भूर्लोक, भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक, जनोलोक, तपोलोक आणि सत्यलोक ( ब्रह्मलोक ) असे पृथ्वीपासून एकावर एक असे सात लोक असून खालीं पृथ्वीपासून एकाखालीं एक असे अतल, वितल, सुतल रसातल, तलातल, महातल आणि पाताल या नावाचे सात लोक आहेत

मद्भिश्छंदोभिः परिवेष्टितम् । बालार्कप्रभया सम्यग्भासयंतं सभागृहम् ॥३॥ मार्कंडेयादिमुनिभिः स्तूयमानं मुहुर्मुहुः । सर्वार्थगोचरज्ञानं सरस्वत्या समन्वितम् ॥ ४ ॥ चतुर्मुखं जगन्नाथं भक्ताभीष्टफलप्रदम् । प्रणम्य दंडवद्भक्त्या तुष्टाव मुनिपुंगवः ॥ ५ ॥ संतुष्टस्तं मुनिं प्राह स्वयंभूर्वैष्णवोत्तमम् । किं प्रष्टुकामस्त्वमसि तद्वदिष्यामि ते मुने ॥ ६ ॥ इत्याकर्ण्य वचस्तस्य मुनिर्ब्रह्माणमब्रवीत् । त्वत्तः श्रुतं मया सर्वं पूर्वमेव शुभाशुभम् ॥ ७ ॥ इदानीमेकमेवास्ति श्रोतव्यं सुरसत्तम । तद्रहस्यमपि ब्रूहि यदि तेऽनुग्रहो मयि ॥ ८ ॥ प्राप्ते कलियुगे घोरे नराः पुण्यविवर्जिताः । दुराचाररताः सर्वे सत्यवार्तापराङ्मुखाः ॥ ९ ॥ परापवादनिरताः परद्र-

बसले आहेत, ज्याच्या कोमल सूर्यबिंबसमान अंगकांतीनें सर्व सभागृह सुशोभित झालें आहे, मार्कंडेयादि मुनि ज्याची वरचेवर स्तुति करीत आहेत, ज्याला भूत-भविष्यवर्तमान सर्व गोष्टींचें ज्ञान आहे, ज्यासन्निध सरस्वती—विद्यादेवी—अधिष्ठित झाली आहे, व जो भक्तांचे इच्छित मनोरथ परिपूर्ण करणारा त्रैलोक्याधीश, त्या चतुर्मुख ब्रह्मदेवाला मुनिश्रेष्ठ नारद भक्तिपूर्वक साष्टांग नमस्कार घालून त्याची स्तुति करिता झाला. ३,४,५ तेव्हां ब्रह्मदेव संतुष्ट होऊन त्या परम विष्णुभक्त नारदाला बोलला, 'मुने—नारदा ! तुझ्या मनांत जें कांहीं विचारावयाचें आहे, तें विचार, तें मी तुला सांगतों. ' ६ हें त्याचें ( ब्रह्मदेवाचें ) भाषण ऐकून मुनि त्याला म्हणाला, ' चांगलें काय, वाईट काय, हें सर्व मी आपणापासून पूर्वींच ऐकिलें आहे. ७ हे देवश्रेष्ठा ! आपणापासून आतां मला एकच गोष्ट ऐकावयाची आहे. मजवर आपली कृपा असल्यास ती गोष्ट अत्यंत गुप्त असली तरी मला आपण सांगावी. ८ भयंकर असें कलियुग प्राप्त झालें असतां लोक पुण्यापासून च्युत होतील, दुराचारांचे ठायीं आसक्त होतील, आणि सत्य गोष्टींकडे पाठ फिरवितील. ९ परनिंदा, परद्रव्याभिलाष,

१ ब्रह्मदेव हा त्रिमूर्तींपैकीं पहिला असून सृष्टीचें कर्तृत्व त्याजकडे आहे. त्याची उत्पत्ति विष्णूच्या नाभिकमलापासून झाली असून त्याला चार मुखें आहेत. हीं चार मुखें म्हणजे चार वेद होत. ब्रह्मदेवाचें हंस हें वाहन आहे. २. अध्यात्मरामायणातील कलियुगविषयक वर्णनासारखीं इतरत्रहि संस्कृतात व प्राकृतात वर्णनें आढळतात. त्यांपैकीं खालील काही वाचनीय आहेत —( १ ) 'कलियुगाचे मुळे । झाले धर्माचें वाटोळे ॥ १ पलंगीं बैसवुनी राणी । मातेहातीं आणवि पाणी ॥ २ स्त्रिये पाटावाची चोळी । माता अखंड चिंध्या गाळी ॥ ३ ऐसा कलियुगाचा महिमा । म्हणे विष्णुदास नामा' ॥ ४ ॥—नामदेव. ( २ ) 'कलि प्रवर्तेल दारुण ।

व्याभिलाषिणः । परस्त्रीसक्तमनसः परहिंसापरायणाः ॥ १० ॥ देहा-
त्मदृष्टयो मूढा नास्तिकाः पशुबुद्धयः । मातापितृकृतद्वेषाः स्त्रीदेवाः काम-
किंकराः ॥ ११ ॥ विप्रा लोभग्रहग्रस्ता वेदविक्रयजीविनः । धनार्जना-
र्थमभ्यस्तविद्या मदविमोहिताः ॥ १२ ॥ त्यक्तस्वजातिकर्माणः प्रायशः

परस्त्रीवासना आणि परहिंसा ह्या गोष्टी त्यांच्या अत्यंत आवडीच्या होतील.१० ते देहालाच आत्मा मानूं लागतील, तेणेंकरून सर्वत्र मूर्खपण वाढेल; ते नास्तिक होतील, पशूंप्रमाणें त्यांच्या बुद्धीची स्थिति होईल; ते आईबापांचा द्वेष करितील, स्त्रीलाच देव समजतील आणि कामाचे दास होऊन राहतील. ११ ब्राह्मण द्रव्याकरितांच विद्या संपादन करितील, आणि त्या विद्येच्या मदानें धुंद व लोभग्रस्त होऊन वेदांचाही विक्रय करून निर्वाह करितील. १२ ते आपल्या जातीचे कर्म

एकरूप होतील चारी वर्ण । कोणी कोणाचा विटाळ न मानून । यथासुखे वर्तती ॥ २०, ११७ विप्र वेदमंत्र त्यजून । करितील शूद्राचे आचरण । स्त्रिया पुरुषास छळून । जारकर्मी रत होती ॥ ११८ परदारा आणि परधन । यालागी होतील अनर्थ पूर्ण । एकमेकाचे घेतील प्राण । असत्य पूर्ण वर्तेल ' ॥ ६३,११४–पाडवप्रताप ( ३ ) 'न देवे देवत्व कपटपटवस्तापसजना जनो मिथ्यावादी विरलतरवृष्टिर्जलधर । प्रसगो नीचानामवनिपतयो दुष्टमनसो जना भ्रष्टा नष्टा अहह ! कलिकाल प्रभवति ' ॥–कलिमहिमा, सुभाषितरत्नभाडागार

१ लोकाना असें वाटेल की देहाबरोबर आत्मा नाहीसा झाला, मग अर्थातच पुण्य किंवा पाप याचे फल मेल्यावर मिळायाचे नाही मग वाटेल तसे वागायाला काहीच हरकत नाही देहालाच आत्मा मानून देहाभिमान वाढविल्यानें मनुष्याची स्थिति कशी होते, त्याचें वर्णन एकनाथानी केलें आहे, तें असे –'देहभोगी मुख्य गोडी । स्त्रीभोगाची अति आवडी । सर्वस्व वेंचोन जोडी । आणी रोकडी योषिता ॥ ९, ३०२ स्त्री हाता धरिता देख । वाढे प्रपंचाचें थोर दु ख । गृह पाहिजे आवश्यक । भोगार्थ देख स्त्रियेच्या ॥ ३०३ देहासी द्यावया सुख । शतधा वाढवी दु ख । देहाभिमानें जन मूर्ख । वृथाभिलाष वाढवी ॥ ३०८ देहसुखाचिया चाडा । पडे परगृहाचे खोडा । दारागृहलोभे केला वेडा । न देखे निजस्वार्थ ' ॥ ३०९–एकनाथी भागवत. २ ब्राह्मण कसा असावा –'जात्या कुलेन वृत्तेन स्वाध्यायेन श्रुतेन च । एभिर्युक्तो हि यस्तिष्ठेन्नित्य स द्विज उच्यते' ॥ याच्या उलट सध्याच्या ब्राह्मणस्थितीचे वर्णन श्रीसमर्थ दासबोधात करितात–'ब्राह्मण बुद्धीपासून चेवले । आचारापासून भ्रष्टले । गुरुत्व सांडून जाले । शिष्य शिष्याचे ॥ १४,८,३० हें ब्राह्मणास कळेना । त्याची वृत्तिच वळेना । मिथ्या अभिमान गळेना । मूर्खपणाचा ॥ ३५ आताचे ब्राह्मणी काय केलें । अन्न मिळेना ऐसे जाले । तुम्हा बहुतांचे प्रचीतीस आलें । किंवा नाही ' ॥ ३९.

परवंचकाः । क्षत्रियाश्च तथा वैश्याः स्वधर्मत्यागशीलिनः ॥ १३ ॥
तद्वच्छूद्राश्च ये केचिद्ब्राह्मणाचारतत्पराः । स्त्रियश्च प्रायशो भ्रष्टा भर्त्रव-
ज्ञाननिर्भयाः । श्वशुरद्रोहकारिण्यो भविष्यन्ति न संशयः ॥ १४ ॥
एतेषां नष्टबुद्धीनां परलोकः कथं भवेत् । इति चिंताकुलं चित्तं जायते
मम संततम् ॥ १५ ॥ लघूपायेन येनैषां परलोकगतिर्भवेत् । तमुपाय-
मुपाख्याहि सर्वं वेत्ति यतो भवान् ॥ १६ ॥ इत्यृषेर्वाक्यमाकर्ण्य प्रत्यु-
वाचांबुजासनः । साधु पृष्टं त्वया साधो वक्ष्ये तच्छृणु सादरम् ॥ १७ ॥
पुरा त्रिपुरहंतारं पार्वती भक्तवत्सला । श्रीरामतत्त्वं जिज्ञासुः पप्रच्छ
विनयान्विता ॥ १८ ॥ प्रियायै गिरिशस्तस्यै गूढं व्याख्यातवान्स्वयम् ।

सोडून बहुधा दुसऱ्यांला फसविणारे असे होतील. क्षत्रिय आणि वैश्यही आपआपला धर्म सोडण्यास प्रवृत्त होतील. १३ त्याचप्रमाणें शूद्रही ब्राह्मणांचे आचार पाळण्यांत तत्पर राहतील. स्त्रिया तर बहुधा भ्रष्ट होऊन निश्शंकपणें पतींचा अपमान करितील. सासूसासऱ्यांचाही द्वेष करणाऱ्या त्या होतील, यांत शंका नाही. १४ या नष्टबुद्धि लोकांना परलोकाची प्राप्ति कशी होईल, या चिंतेनें माझें मन सर्वदा अगदीं व्याकुळ होऊन गेलें आहे. १५ ज्या अर्थी आपणाला सर्व कांहीं ठाऊक आहे, त्या अर्थी ज्या एकाद्या सोप्या उपायानें यांना परलोकप्राप्ति होईल, तो आपण सांगावा.’ १६ हें त्या ऋषीचें–नारदाचें–भाषण ऐकून ब्रह्मदेव त्याला म्हणाला, ‘साधो–नारदा! तूं फार चांगली गोष्ट विचारली; आतां मी उत्तर देतों. तें आदरानें ऐक. १७ पूर्वी एकदां भक्तवत्सल पार्वती श्रीरामाचें यथार्थस्वरूप जाणण्याची इच्छा करून तसा प्रश्न त्रिपुरासुराला मारणाऱ्या शंकराला नम्रतापूर्वक विचारती झाली. १८ तेव्हां शंकरांनी त्या आपल्या प्रियपत्नीला आजवर गुप्त अशा ‘ अध्यात्म-

१. राम–‘रमन्त योगिनोऽनन्त सत्यानन्द चिदात्मनि । इति रामपदेनासौ परब्रह्माभिधीयते ’ २ पूर्वकाळीं त्रिपुर नावाचा एक दैत्य होता आपल्या राजधानीच्या सभोवती तीन अजस्र तट घातल्यामुळे तो देवास अजिंक्य झाला होता देवाचें त्याच्यापुढें कांहींच चालेना तेव्हां नारदाच्या सल्लयानें ते शंकराला शरण गेले. शंकरानें त्रिपुरासुराचा नाश करून देवास संकटापासून मुक्त केलें. हा विजय शंकरांनी कार्तिक पौर्णिमेच्या दिवशी मिळविला त्या स्मरणार्थ त्रिपुरी पौर्णिमा हा उत्सव पाळण्यात येतो

पुराणोत्तममध्यात्मरामायणमिति स्मृतम् ॥ १९ ॥ तत्पार्वती जगद्धात्री पूजयित्वा दिवानिशम् । आलोचयंती स्वानंदमग्ना तिष्ठति सांप्रतम् ॥ २० ॥ प्रचरिष्यति तल्लोके प्राण्यदृष्टवशाद्यदा । तस्याध्ययनमात्रेण जना यास्यंति सद्गतिम् ॥ २१ ॥ तावद्विजृंभते पापं ब्रह्महत्यापुरःसरम् । यावज्जगति नाध्यात्मरामायणमुदेष्यति ॥ २२ ॥ तावत्कलिमहोत्साहो निःशंकं संप्रवर्तते । यावज्जगति नाध्यात्मरामायणमुदेष्यति ॥ २३ ॥ तावद्यमभटाः शूराः संचरिष्यंति निर्भयाः । यावज्जगति नाध्यात्मरामायणमुदेष्यति ॥ २४ ॥ तावत्सर्वाणि शास्त्राणि विवदंते परस्परम् । तावत्स्वरूपं रामस्य दुर्बोधं महतामपि । यावज्जगति नाध्यात्मरामायणमुदेष्यति ॥ २५ ॥ अध्यात्मरामायणसंकीर्तनश्रवणादिजम् । फलं वक्तुं न शक्नोमि कार्त्स्न्येन मुनिसत्तम ॥ २६ ॥ तथाऽपि तस्य माहात्म्यं वक्ष्ये किंचित्तवानघ । शृणु चित्तं समाधाय शिवेनोक्तं पुरा

रामायण ' या नांवानें प्रसिद्ध असलेल्या एका उत्तम पुराणग्रंथाचा स्वतः उपदेश केला. १९ त्या–अध्यात्मरामायण–ग्रंथाचें रात्रंदिवस पूजन व मनन करणारी जगन्माता पार्वती सांप्रत आत्मस्वरूपांत रममाण होऊन राहिली आहे. २० प्राण्यांच्या सुदैवानें जेव्हां त्या ग्रंथाचा प्रसार लोकांमध्यें होईल, तेव्हां त्याच्या अध्ययनानेंच केवळ लोक सद्गतीला जातील. २१ जोंपर्यंत जगामध्यें अध्यात्मरामायण उदय पावलें नाही, तोंपर्यंत ब्रह्महत्यादि पापें वाढत जातील. २२ जोंपर्यंत जगामध्यें अध्यात्मरामायण उदयाला आलें नाही, तोंपर्यंत कलियुगाचा महिमा वाढत जाणार, यांत संशय नाहीं. २३ जोंपर्यंत जगतीतलावर अध्यात्मरामायणाचा प्रचार सुरू झाला नाही, तोंपर्यंत यमाचे शूर योद्धे निर्भयपणें फिरतील. २४ जोंपर्यंत पृथ्वीवर अध्यात्मरामायणप्रवृत्ति होणार नाही, तोंपर्यंत सगळीं शास्त्रें परस्परांशी वाद करीत राहतील, आणि श्रीरामाचें सत्यस्वरूप मोठमोठ्यांनाही समजण्यास कठीण असें राहील. २५ हे मुनिश्रेष्ठा ! अध्यात्मरामायणाचें सकीर्तन, श्रवण, इत्यादिकांचें फल यथार्थ रीतीनें वर्णन करण्यास मी असमर्थ आहें. २६ असें आहे तरी. हे निष्पाप मने ! त्याचें

१. अंतःकरणात राहणाऱ्या रामाची प्राप्ति करून देणार.

मम ॥ २७ ॥ अध्यात्मरामायणतः श्लोकं श्लोकार्धमेव वा । यः पठेद्भक्तिसंयुक्तः स पापान्मुच्यते क्षणात् ॥ २८ ॥ यस्तु प्रत्यहमध्यात्मरामायणमनन्यधीः । यथाशक्ति वदेद्भक्त्या स जीवन्मुक्त उच्यते ॥ २९ ॥ यो भक्त्याऽर्चयतेऽध्यात्मरामायणमतंद्रितः । दिनेदिनेऽश्वमेधस्य फलं तस्य भवेन्मुने ॥ ३० ॥ यदृच्छयापि योऽध्यात्मरामायणमनादरात् । अन्यतः शृणुयान्मर्त्यः सोऽपि मुच्येत पातकात् ॥ ३१ ॥ नमस्करोति योऽध्यात्मरामायणमदूरतः । सर्वदेवार्चनफलं स प्राप्नोति न संशयः ॥ ३२ ॥ लिखित्वा पुस्तकेऽध्यात्मरामायणमशेषतः । यो दद्याद्रामभक्तेभ्यस्तस्य

थोडेसे माहात्म्य तुला सागतो. हें पूर्वी मला शिवानें सांगितलें. तें चित्त लावून ऐक २७ जो मनुष्य अध्यात्मरामायणातील एक श्लोक अथवा अर्ध श्लोक भक्तिपूर्वक वाचील, तो एका क्षणात पापापासून मुक्त होईल. २८ जो मनुष्य प्रत्येक दिवशी एकनिष्ठतेनें भक्तिपूर्वक अध्यात्मरामायणाचें पठण करितो, तो जीवन्मुक्त म्हटला जातो. २९ हे मुने ! जो निरलसपणे अध्यात्मरामायणाचें भक्तिपुरस्सर पूजन करितो, त्यास प्रत्येक दिवशी अश्वमेध यज्ञाचें फल प्राप्त होतें. ३० जो मनुष्य दुसऱ्याच्या तोंडून सहज, अनादरपूर्वक का होईना, अध्यात्मरामायणाचें श्रवण करील, तो देखील पापमुक्त होईल. ३१ जो मनुष्य अध्यात्मरामायणाला जवळ जाऊन नमस्कार करितो, त्याला सर्व देवांची पूजा केल्याचें फळ मिळतें यात संशय नाही. ३२ जो कोणी अध्यात्मरामायण ग्रंथ पूर्णपणे लिहून

१ शिव त्रिमूर्तीपैकी शिव हा तिसरा असून सृष्टीच्या संहाराचें कर्तृत्व याजकडे आहे. शिव म्हणजे मंगलरूप 'शिवमिच्छन् मनुष्याणां तस्माद्देव शिव स्मृत' –महाभारत रुद्राध्याय- २ भक्ताविषयी परमेश्वराची वत्सलता किती थोर आहे त्याचे वर्णन तुकारामांनी पुढील अभंगात केलें आहे –'भाविकाचें काज अंगें देव करी । काढी धर्माघरीं उच्छिष्ट तें ॥ १ उच्छिष्ट तीं फळें खाया भिल्लटीचीं । आवडी तयाची मोठी देवा ॥ २ काय देवा घरीं न मिळेचि अन्न । मागे भाजीपान द्रौपदीसी ॥ ३ अर्जुनाचीं घोडीं धुतलीं अनंतें । संकटें बहुतें निवारिलीं ॥ ४ तुका म्हणे ऐसा आवडती लडिवाळ । जाणिवेचें काळें तोंड देवा' ॥ ५ –तुकाराम ३ 'निद्रादौ जागरस्यान्ते यो भाव उपजायते । तं भावं भावयन् राम जीवन्मुक्त सदा भवेत्'– निद्रेच्या आरंभीं अगर जागृतस्थितीचे अंतीं जी स्थिति असते, तीत नेहमीं असणारा मनुष्य 'जीवन्मुक्त' होय. ४ वैदिककालीं हा अश्वमेध यज्ञ संततिप्राप्त्यर्थ राजे लोक करीत असत. पुढें सार्वभौमपददर्शक म्हणून हा यज्ञ करण्यात येऊं लागला

पुण्यफलं शृणु ॥ ३३ ॥ अधीतेषु च वेदेषु शास्त्रेषु व्याकृतेषु च ।
यत्फलं दुर्लभं लोके तत्फलं तस्य संभवेत् ॥ ३४ ॥ एकादशीदिने-
ऽध्यात्मरामायणमुपोषितः। यो रामभक्तः सदसि व्याकरोति नरोत्तमः ।
तस्य पुण्यफलं वक्ष्ये शृणु वैष्णवसत्तम ॥ ३५ ॥ प्रत्यक्षरं तु गायत्री-
पुरश्चर्याफलं भवेत् । उपवासव्रतं कृत्वा श्रीरामनवमीदिने ॥ ३६ ॥
रात्रौ जागरितोऽध्यात्मरामायणमनन्यधीः । यः पठेच्छृणुयाद्वापि तस्य
पुण्यं वदाम्यहम् ॥ ३७ ॥ कुरुक्षेत्रादिनिखिलपुण्यतीर्थेष्वनेकशः ।
आत्मतुल्यं धनं सूर्यग्रहणे सर्वतोमुखे ॥ ३८ ॥ विप्रेभ्यो व्यासतुल्येभ्यो

रामभक्तांना देईल, त्याला प्राप्त होणारें पुण्यफल ऐक. ३३ (चारी) वेद[1] अध्ययन करून आणि ( सहाही ) शास्त्रांचें[2] व्याख्यान करून जे फळ लोकांमध्यें मिळायाला कठीण, तें फल त्याला सुलभ होतें. ३४ हे विष्णुभक्तोत्तमा—नारदा ! जो नरश्रेष्ठ रामाचा भक्त होत्साता एकादशीच्या[3] दिवशी उपोषण करून सभेमध्यें अध्यात्मरामायणाचें प्रवचन करितो, त्यास मिळणारें पुण्यफल आतां ऐक. ३५ अशा मनुष्याला प्रत्यक्ष-राबद्दल गायत्रीपुरश्चरणाचें[4] फल प्राप्त होईल. आतां रामनवमीच्या दिवशी उपवासव्रत धारण करून आणि रात्री जागरण करून एकचित्तानें अध्यात्मरामायणाचें पठण अगर श्रवण करील, त्यास कोणतें फल लाधेल तें सांगतों. ३६,३७ कुरुक्षेत्रादि[5] समस्त पुण्यतीर्थांच्या ठिकाणी सूर्यग्रहणसमयी पाण्यांत उभा राहून व्यासांसारख्या[6] ब्राह्मणांना

१ ऋग्वेद यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद असे चार वेद २ सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, मीमांसा आणि वेदांत हीं सहा शास्त्रे किंवा दर्शनें होत ३ कृष्ण व शुक्ल पक्षांतील अकरावी तिथि एकादशी या नावाच्या देवतेप्रीत्यर्थ या दिवशी वैष्णव व शैवही उपोषण करितात एकादशीची कथा अशी आहे की, पूर्वी कुंभ नावाच्या दैत्याचा मृदुमान्य नावाचा मुलगा होता त्यानें शंकराकडून आपण अमर व्हावें असा वर मिळविला. पुढें त्याला सर्व देव भिऊन पर्वतगुहेंत दडून बसले. त्यास त्यामुळें जेवण मिळालें नाहीं, आणि उपोषण घडलें तेथे त्याच्या एकवटलेल्या श्वासापासून एक शक्ति उत्पन्न झाली तिनें त्या मृदुमान्य दैत्याचा नाश केला हीच देवी एकादशी होय. ४ गायत्री मंत्राची चोवीस अक्षरें आहेत त्या प्रत्येक अक्षरी एक लक्ष जप, अशा रीतीनें चोवीस लक्ष जप केल्यानें गायत्रीपुरश्चरण होतें ५ कुरुक्षेत्र—पांडवकौरवांमध्ये झालेल्या युद्धाची रणभूमि. ६. व्यास हा एक प्रख्यात ऋषि होऊन गेला. हा सत्यवतीस कौमार्यावस्थेंत पराशरऋषीपासून झालेला पुत्र होय. ह्यानें अठरा पुराणें, अठरा उपपुराणें, भारत इत्यादि ग्रंथ लिहिले

दत्त्वा यत्फलमश्नुते । तत्फलं संभवेत्तस्य सत्यं सत्यं न संशयः ॥ ३९ ॥ यो गायते मुदाऽध्यात्मरामायणमहर्निशम् । आज्ञां तस्य प्रतीक्षंते देवा इंद्रपुरोगमाः ॥ ४० ॥ पठन्प्रत्यहमध्यात्मरामायणमनुव्रतः । यद्यत्करोति तत्कर्म ततः कोटिगुणं भवेत् ॥ ४१ ॥ तत्र श्रीरामहृदयं यः पठेत्सुसमाहितः । स ब्रह्मघ्नोऽपि पूतात्मा त्रिभिरेव दिनैर्भवेत् ॥ ४२ ॥ श्रीरामहृदयं यस्तु हनूमत्प्रतिमांतिके । त्रिः पठेत्प्रत्यहं मौनी स सर्वेप्सितभाग्भवेत् ॥ ४३ ॥ पठन् श्रीरामहृदयं तुलस्यश्वत्थयोर्यदि । प्रत्यक्षरं प्रकुर्वीत ब्रह्महत्यां निवर्तयेत् ॥ ४४ ॥ श्रीरामगीतामाहात्म्यं कृत्स्नं जानाति शंकरः । तदर्धं गिरिजा वेत्ति तदर्धं वेद्म्यहं मुने ॥ ४५ ॥ तत्ते किंचित्प्रवक्ष्यामि कृत्स्नं वक्तुं न शक्यते । यज्ज्ञात्वा तत्क्षणाल्लोकश्चित्तशुद्धिमवाप्नुयात् ॥ ४६ ॥ श्रीरामगीता यत्पापं न नाशयति नारद ।

आपल्या भारंभार अनेकवार धन देतो, अशा मनुष्यास जें फळ मिळतें, तेंच फल त्या मनुष्यास—अध्यात्मरामायणाचें पठण अगर श्रवण करणाऱ्यास—मिळेल, यांत तिळमात्र संशय नाही. ३८,३९ जो कोणी आनंदानें अहोरात्र अध्यात्मरामायणाचें गायन करितो, त्याची आज्ञा इंद्रादिक[1] देव मोठ्या तत्परतेनें पाळतात. ४० प्रत्येक दिवशी अध्यात्मरामायणाचें भक्तिपुरस्सर पठण करणारा मनुष्य जें जें कर्म करितो, त्याचें त्याला कोटि पटीनें फल मिळतें. ४१ अध्यात्मरामायणांतील 'रामहृदया'चें स्थिरचित्तानें जो पठण करील, तो ब्रह्महत्या करणारा असला, तरीही केवळ तीनच दिवसांत त्या पापापासून शुद्ध होईल. ४२ जो कोणी मारुतीच्या[2] मूर्तीजवळ मौन धारण करून प्रत्येक दिवशीं रामहृदयाचें तीन वेळां पठण करील, त्याच्या सर्व कामना तृप्त होतील. ४३ तुळस अथवा अश्वत्थ वृक्ष यांना प्रदक्षिणा करीत जो रामहृदयाचें पठण करील, त्याच्या प्रत्येक अक्षराला ब्रह्महत्येचें पाप नाहीसें होईल. ४४ हे मुने! श्रीरामगीतेचें माहात्म्य पूर्णपणें जाणणार एक शंकरच होत. त्याचे अर्ध्यांनें पार्वती जाणते, आणि ती जाणते त्याचे अर्ध्यानें मी जाणतों. ४५ जें थोडेंसें मला ठाऊक आहे तें सांगतों. पूर्णपणें मला कांही तें सांगतां येणार नाहीं. हें जाणल्यानें मनुष्याची चित्तशुद्धि तत्काल होईल. ४६ हे नारदा! श्रीराम-

१. इंद्र—देवाचा अधिपति व पर्जन्यदेवता. याचें आयुध वज्र असून सोमरस हें याचें आवडतें अन्न आहे. २. मारुति हा एक प्रख्यात वानरवीर असून परम रामभक्त होता.

तन्न नश्यति तीर्थाद्यैर्लोके क्वापि कदाचन । तन्न पश्याम्यहं लोके मार्ग-
माणोऽपि सर्वदा ॥ ४७ ॥ रामेणोपनिषत्सिंधुमुन्मथ्योत्पादितां मुदा ।
लक्ष्मणायार्पितां गीतासुधां पीत्वाऽमरो भवेत् ॥ ४८ ॥ जमदग्निसुतः
पूर्वं कार्तवीर्यवधेच्छया । धनुर्विद्यामभ्यसितुं महेशस्यांतिके वसन् ॥ ४९ ॥

गीतेच्या योगानें ज्या पातकाचा नाश होत नाही, तें पाप ह्या पृथ्वीवरील कोणत्याही तीर्थादिकांनी नाहीसें होणार नाही. मी सदोदित शोध करीत असतांही रामगीतेसारखी पाप हरण करणारी वस्तु आजवर मला सांपडली नाहीं. ४७ श्रीरामानें उपनिषं-द्रूपी सागराचें मंथन करून त्यांतून काढलेलें गीतारूपी अमृत आनंदानें लक्ष्मणाला दिलें. ह्या अमृताचें प्राशन ज्या मनुष्याला घडेल, तो अमर होईल. ४८ पूर्वी जमदग्निऋषीचा मुलगा–परशुराम–कार्तवीर्य राजाच्या वधाच्या इच्छेनें धनुर्विद्येचा अभ्यास करण्याकरितां म्हणून महादेवाजवळ राहिला होता. ४९

१ मुख्य उपनिषदें –' ईश–केन–कठ–प्रश्न–मुंड–माडूक्य–तित्तिर । ऐतरेयं च छांदोग्यं बृहदारण्यकं तथा ' ही दशोपनिषदे होत उपनिषद्–गुरूच्या जवळ बसून मिळविलेले ज्ञान.
२. जमदग्नि व परशुराम –हे पितापुत्र होते जमदग्नि हा भृगुवशात झालेला असून त्याच्या बापाचे नाव ऋचीक होतें जमदग्नि अत्यंत धर्मनिष्ठ व परम वेदविद्याप्रवीण होता त्याची बायको रेणुका ही असून तिजपासून त्याला पाच मुलें झालीं होती. एकदा ती स्नानाला गेली असता गंधर्वांचे एक जोडपें मोठ्या प्रेमानें जलक्रीडा करीत असताना तिच्या नजरेला पडले. तें पाहून आपणालाही तसेच सुख प्राप्त व्हावे असे अपवित्र विचार तिच्या मनात उत्पन्न झाले व अशा स्थितीत ती घरी आली ती तिची तेजोहीन अपवित्र मुद्रा पाहून त्या जात्याच तापट ऋषीनें आपल्या मुलास तिचा शिरच्छेद करण्याची आज्ञा केली परंतु वडील चार पुत्रानीं हें मातृवधाचे क्रूर कृत्य करण्याचें नाकारलें परंतु कनिष्ठ पुत्र परशुराम याने ती बापाची आज्ञा शिरसा मान्य करून आपल्या कुऱ्हाडीनें आपल्या आईचे मस्तक तोडिले. त्या कृत्यानें जमदग्नीस संतोष झाला व त्याने परशुरामास इच्छित वर मागण्यास सांगितलें मातृवत्सल परशुरामाने आई पुन्हा जीवंत व्हावी म्हणून वर मागितला जमदग्नीनें पुत्राचे म्हणणे मान्य केले, आणि रेणुका जीवंत उठली पुढें काही काळानंतर कार्तवीर्य राजा त्या आश्रमास आला, आणि त्याने ऋषीच्या सर्व गाई नेल्या या वेळी परशुराम घरी नव्हता. तो आला तेव्हा सर्व वृत्तांत त्याला समजला त्यावरून कार्तवीर्याशी लढून परशुरामानें त्याला ठार मारिले ही हकीगत कार्तवीर्याच्या पुत्रास समजताच ते आश्रमास आले आणि जमदग्नीला तेथे एकटाच पाहून त्यानी त्याला ठार मारिले ह्याचा सूड म्हणून परशुरामानें एकवीस वेळा पृथ्वी नि क्षत्रिय केली.

**अधीयमानां पार्वत्या रामगीतां प्रयत्नतः । श्रुत्वा गृहीत्वाऽऽशु पठन्नारायणकलामगात् ॥ ५० ॥ ब्रह्महत्यादिपापानां निष्कृतिं यदि वांछति । रामगीतां मासमात्रं पठित्वा मुच्यते नरः ॥ ५१ ॥ दुष्प्रतिग्रहदुर्भोज्यदुरालापादिसंभवम् । पापं यत्तत्कीर्तनेन रामगीता विनाशयेत् ॥ ५२ ॥ शालग्रामशिलाग्रे च तुलस्यश्वत्थसन्निधौ । यतीनां पुरतस्तद्वद्रामगीतां पठेत्तु यः ॥ ५३ ॥ स तत्फलमवाप्नोति यद्वाचोऽपि न गोचरम् । रामगीतां पठन्भक्त्या यः श्राद्धे भोजयेद्विजान् ॥ ५४ ॥ तस्य ते पितरः सर्वे यांति विष्णोः परं पदम् । एकादश्यां निराहारो नियतो द्वादशीदिने ॥ ५५ ॥ स्थित्वाऽगस्त्यतरोर्मूले रामगीतां पठेत्तु यः । स एव राघवः साक्षात्सर्वदेवैश्च पूज्यते ॥ ५६ ॥ विना दानं विना ध्यानं विना तीर्थावगाहनम् । रामगीतां नरोऽधीत्य तदनंतफलं लभेत् ॥ ५७ ॥ बहुना किमिहोक्तेन शृणु नारद तत्त्वतः । श्रुतिस्मृतिपुराणेतिहासागम-**

तेथें पार्वतीकडून पठण केल्या जाणाऱ्या रामगीतेचें प्रयत्नपूर्वक श्रवण करून त्यानें ती–रामगीता–मुखोद्गत करून घेतली, आणि (रामगीतेचें) पठण करणारा तो तत्काल नारायणस्वरूपाला जाऊन मिळाला. ५० ब्रह्महत्या वगैरे पापांपासून मुक्त व्हावें, अशी इच्छा जो कोणी करितो, तो मनुष्य केवळ एक महिना रामगीतेचें पठण केल्यानें मुक्त होतो. ५१ दुष्ट दानाचा स्वीकार, अभक्ष्याचें भक्षण, दुःशब्दांचा उच्चार यांचे योगानें जें पाप उत्पन्न होतें, तें रामगीतेचे पठनाचे योगेंकरून नाहींसें होतें. ५२ शाळग्रामशिलेचे अग्रभागीं, तुळशीच्या आणि अश्वत्थाचे जवळ, तसेंच संन्याशांच्या पुढें रामगीता वाचतो, त्याला प्राप्त होणारें फल वाणीलाही वर्णन करिता येण्यासारखें नाहीं. श्राद्धसमयीं रामगीतेचें भक्तिपुरस्सर पठण करीत जो ब्राह्मणभोजन घालतो, त्याचे ते सर्व पितर विष्णूच्या उत्तम पदाला जातात. त्याचप्रमाणें एकादशीच्या दिवशीं उपवास करून आणि द्वादशीला व्रतस्थ राहून अगस्त्यवृक्षाच्या मुळावर रामगीतेचें पठण करितो, तो साक्षात् रामच म्हणून सर्व देवांकडून पूजिला जातो. ५३,५४,५५,५६ दान, ध्यान, तीर्थस्नान हीं केल्यावांचूनही रामगीतेच्या पठणानें ती अनंत वेळां केल्याचें फळ मनुष्याला मिळतें. ५७ नारदा ! ह्यासंबंधीं पुष्कळ सांगून काय करावयाचें

**शतानि च । अर्हति नाल्पामध्यात्मरामायणकलामपि ॥ ५८ ॥ अध्यात्मरामचरितस्य मुनीश्वराय माहात्म्यमेतदुदितं कमलासनेन । यः श्रद्धया पठति वा शृणुयात्स मर्त्यः प्राप्नोति विष्णुपदवीं सुरपूज्यमानः ॥ ५९ ॥ इति श्रीब्रह्मांडपुराणे उत्तरखंडे अध्यात्मरामायणमाहात्म्यकथनं नाम प्रथमः सर्गः ॥ १ ॥**

आहे ? खरोखर एकच सांगतों तें ऐक. श्रुति[1], स्मृति[2], पुराणें[3], इतिहास आणि शेंकडों शास्त्रें ही सगळीं अध्यात्मरामायणाच्या एका लहानशा भागाच्या देखील योग्यतेची होणार नाहीत. ५८ हें अध्यात्मरामायणाचें माहात्म्य कमलासन ब्रह्मदेवानें मुनिश्रेष्ठ नारदाला सांगितलें, जो मनुष्य ह्याचें पठण किंवा श्रवण भक्तिपूर्वक करील, तो देवांनाही पूज्य होऊन अंती विष्णुपदाला प्राप्त होईल." ५९



१. श्रुति=गुरुमुखें ऐकलेलें, यावरून वेदास 'श्रुति' हें नाव पडलें श्रुति-वेद-ईश्वरप्रणीत आहेत, असे मानितात २ स्मृति=श्रुतीच्या आधारें ऋषिप्रणीत, मनुस्मृति वगैरे ग्रंथ ३ पुराणें अठरा आहेत. ही महर्षि व्यासानी रचिली आहेत अठरा पुराणांची नावें—१ मत्स्य, २ मार्कंडेय, ३ भागवत, ४ भविष्योत्तर, ५ ब्रह्म, ६ ब्रह्मांड, ७ ब्रह्मवैवर्त, ८ वामन, ९ वायु, १० विष्णु, ११ वराह, १२ नारद, १३ लिंग, १४ पद्म, १५ अग्नि, १६ कूर्म, १७ स्कंद, १८ गारुड.

# अथ बालकांडप्रारंभः ॥



## सर्ग १ ला.

यः पृथ्वीभरवारणाय दिविजैः संप्रार्थितश्चिन्मयः संजातः पृथिवीतले रविकुले मायामनुष्योऽव्ययः। निश्चक्रं हतराक्षसः पुनरगाद्ब्रह्मत्वमाद्यं स्थिरां कीर्तिं पापहरां विधाय जगतां तं जानकीशं भजे ॥ १ ॥
विश्वोद्भवस्थितिलयादिषु हेतुमेकं मायाश्रयं विगतमायमचिंत्यमूर्तिम्। आनंदसांद्रममलं निजबोधरूपं सीतापतिं विदिततत्त्वमहं नमामि ॥ २ ॥

देवांनी पृथ्वीचा भार निवारण करण्याविषयीं प्रार्थना केल्यामुळें पृथ्वीतलावर सूर्यवंशामध्यें मायेनें[3] मनुष्यावतार धारण करून राक्षसांचा समूळ नाश करणारा, आणि जगाचें पाप हरणारा अशी शाश्वत कीर्ति संपादून पुनः मूळ ब्रह्मस्वरूपीं गमन करणारा असा जो ज्ञानस्वरूपी आणि निर्विकार जानकीश–रामचंद्र–त्याचें मी भजन करितों. १ जगाच्या उत्पत्ति, पालन, नाश वगैरे स्थितींचें जो एकच कारण, जो मायेचा आधार, ज्यावर मायेची शक्ति चालत नाहीं, ज्याच्या स्वरूपाचें बरोबर चिंतन करणें शक्य नाहीं, अशा त्या आनंदपूर्ण, निर्मल, स्वतःच ज्ञानस्वरूपी आणि स्वस्वरूप जाणणाऱ्या सीतापति रामचंद्राला मी नमस्कार

१ जो पृथ्वीभरवारणार्थ मरुतीं संप्रार्थिला चिन्मय,। मायावी पृथिवीतलीं रविकुलीं जो जन्म घे अव्यय, ॥ पावे राक्षस ते वधूनि अवघे ब्रह्मत्वही आद्य जे,। कीर्ती पापहरा महीं स्थिर करी त्या जानकीशा भज ॥–समश्लोकी (स्वकृत) २ गंगा व गंडकी या नद्यांच्या मध्यें जो प्रदेश आहे, तेथें कोसलवंशाचे क्षत्रिय लोक राहत असत, ते आपणास रविवंशी–सूर्यवंशी म्हणून घेत असत ३. अघटितघटनकर्तृत्वशक्तीने माया=मूलप्रकृति जीमध्यें सच्चिदानंद ब्रह्माचें प्रतिबिंब आहे व जीमध्यें सत्त्व, रज, तम हे गुण सारख्या मानानें आहेत, ती प्रकृति ह्या प्रकृतीचे माया आणि अविद्या असे दोन प्रकार आहेत जीमध्यें शुद्ध सत्त्वगुण अधिक असतो, ती माया आणि जीमध्यें तो सत्त्वगुण इतर गुणांनी गढूळ झालेला असतो, ती अविद्या मायेमध्ये प्रतिबिंबित जो चिदात्मा तो ईश्वर, व अविद्येंत प्रतिबिंबित जो चिदात्मा तो जीव होय ४ सीतापति मिथिलादेशचा प्रख्यात राजा जनक नावाचा होता. तो यज्ञासाठीं जमीन नांगरीत असतां नांगराच्या तासांत त्याला मुलगी सांपडली ती सीता किंवा जानकी या नावानें प्रसिद्ध झाली.

पठंति ये नित्यमनन्यचेतसः शृण्वंति चाध्यात्मिकसंज्ञितं शुभम् । रामायणं सर्वपुराणसंमतं निर्धूतपापा हरिमेव यांति ते ॥ ३ ॥ अध्यात्मरामायणमेव नित्यं पठेद्यदीच्छेद्भवबंधमुक्तिम् । गवां सहस्रायुतकोटिदानात्फलं लभेद्यः शृणुयात्स नित्यम् ॥ ४ ॥ पुरारिगिरिसंभूता श्रीरामार्णवसंगता । अध्यात्मरामगंगेयं पुनाति भुवनत्रयम् ॥ ५ ॥ कैलासाग्रे कदाचिद्रविशतविमले मंदिरे रत्नपीठे संविष्टं ध्याननिष्ठं त्रिनयनमभयं सेवितं सिद्धसंघैः । देवी वामांकसंस्था गिरिवरतनया पार्वती भक्तिनम्रा प्राहेदं देवमीशं सकलमलहरं वाक्यमानंदकंदम् ॥६॥ ॥पार्वत्युवाच॥ नमोऽस्तु ते देव जगन्निवास सर्वात्मदृक् त्वं परमेश्वरोऽसि । पृच्छामि तत्त्वं पुरुषोत्तमस्य सनातनं त्वं च सनातनोऽसि ॥७॥ गोप्यं यदत्यंतमनन्य-

करितों. २ जे सदासर्वकाळ एकचित्त होऊन 'अध्यात्म' नांवाचें सर्व पुराणांना संमत आणि कल्याणकारक असें रामायण वाचितात, आणि श्रवण करितात, त्यांची पापें नाहींशीं होऊन ते हरिपदाला जाऊन पोंचतात. ३ जर मनुष्याला भवबंधनातून सुटावें अशी इच्छा असेल, तर त्यानें नित्य अध्यात्मरामायणाचेंच पठण करावें. जो सर्वदा रामायणाचें श्रवण करील, त्याला, सहस्रायुतकोटि गोप्रदानांचे फलाहूनही अधिक फळ मिळेल. ४ त्रिपुरासुरघाती शंकररूपी पर्वतापासून उगम पावलेली आणि श्रीरामरूपी समुद्राला मिळणारी ही अध्यात्मरामायणरूपी गंगा त्रिभुवनाला पवित्र करणारी आहे. ५ कोणी एके वेळी त्रिनयन शंकर डाव्या मांडीवर पार्वतीला घेऊन कैलासपर्वताच्या मस्तकावर शेंकडो सूर्यांप्रमाणें तेजानें शोभणाऱ्या आपल्या मंदिरांत रत्नसिंहासनावर बसले होते. सिद्धांचे अनेक समुदाय त्यांची सेवा करीत होते. अशा वेळी त्या नित्यानंदांत मग्न असणाऱ्या, सर्वपापनाशक, निर्भय शंकराला भक्तीनें नम्र अशी पार्वती म्हणाली, ६ 'हे जगन्निवासा! विश्वाला आत्मरूपानें पाहणारा तूं परमेश्वर आहेस. तुला नमस्कार करित्यें. तूं अविनाशी आहेस, म्हणून त्या सनातन पुरुषोत्तमाचें—परब्रह्माचें—सत्यस्वरूप काय आहे तें मी तुला विचारित्यें. ७ हें सत्यस्वरूप अत्यंत गुप्त. दुसऱ्याला सांग नये. असें

१. अयुत—दशसहस्र सहस्रगुणित दशसहस्रकोटी. २. कैलास=हिमालयाचें एक शिखर. येथें शंकर आणि कुबेर यांची वसतिस्थानें असल्याचें प्रसिद्ध आहे. ३. बुद्धिमत्तादि गुणांत देवाखालोखाल व मनुष्यापेक्षा श्रेष्ठ अशी एक योनि

वाच्यं वदंति भक्तेषु महानुभावाः । तदप्यहोऽहं तव देव भक्ता प्रियोऽसि मे त्वं वद यत्तु पृष्टम् ॥ ८ ॥ ज्ञानं सविज्ञानमथानुभक्ति वैराग्ययुक्तं च मितं विभास्वत् । जानाम्यहं योषिदपि त्वदुक्तं यथा तथा ब्रूहि तरंति येन ॥ ९ ॥ पृच्छामि चान्यच्च परं रहस्यं तदेव चाग्रे वद वारिजाक्ष । श्रीरामचंद्रेऽखिललोकसारे भक्तिर्दृढा नौर्भवति प्रसिद्धा ॥ १० ॥ भक्तिः प्रसिद्धा भवमोक्षणाय नान्यत्ततः साधनमस्ति किंचित् । तथापि हृत्संशय-बंधनं मे विभेत्तुमर्हस्यमलोक्तिभिस्त्वम् ॥ ११ ॥ वदंति रामं परमेकमाद्यं निरस्तमायागुणसंप्रवाहम् । भजंति चाहर्निशमप्रमत्ताः परं पदं यांति तथैव

आहे, तरी महासमर्थ असे साधुपुरुष आपल्या भक्तांना सांगत असतात. देवा ! मी तुमची भक्त आहें, त्याचप्रमाणें तुम्ही मला प्रिय आहां, तर मी विचारिलें आहे तें मला सांगा. ८ मी स्त्री आहें, म्हणून जेणेंकरून जीव संसारसमुद्र तरून जातात, त्या भक्ति, वैराग्य, यांनी युक्त, आणि अनुभव आणून देणाऱ्या ब्रह्मज्ञानाचा मला थोडक्यांत समजेल, अशा रीतीनें उपदेश करा. ९ कमलनयना शंकरा ! आणखी एक दुसरी गुप्त गोष्ट विचारितें तीच मला प्रथम सांगा. सर्व लोकांमध्यें केवळ साग्भूत अशा श्रीरामचंद्राचे ठिकाणी दृढ भक्ति ठेवणें हीच संसारसमुद्र तरून जाण्याची प्रसिद्ध नौका होय. १० संसार तरून जाण्यास भक्ति हेंच मुख्य साधन होय त्याहून दुसरें असें काहीच साधन नाही. तथापि माझ्या मनांतील संशयाची गाठ तुम्ही आपल्या निर्मल भाषणाच्या योगेंकरून उकलण्यास समर्थ आहांत. ११ जे कोणी राम हा सर्वांत श्रेष्ठ, त्याच्या स्वरूपीं भेद

१ ‘ भक्तिपंथ बहु सोपा । पुण्य नागवे पापा । येणे जाणे खेपा । येणेंचि एक खंडनी ’ ॥—तुकाराम—२. वैराग्याविषयीं ज्ञानेश्वराच्या पुढील ओंव्या वाचनीय आहेत — ‘ वमिलिया अन्ना । लाळ न घोंटी जवि रसना । का अग न सूये आलिंगना । प्रेताचिये ॥ विष खाणें नागवे । जळत घरीं न रिघवे । व्याघ्रविवरा न वचवे । वस्ति जेवी ॥ धडाडीत लोहरसीं । उडी न घालवे जैशी । न करवे उशी । अजगराची ॥ अर्जुना तेणे पाडें । जयासी विषयवार्ता नावडे । नेदी इंद्रियांचेनि तोंडें । काहींचि जावों ॥ तें हें विषयवैराग्य । आत्मलाभाचें भाग्य । येणे ब्रह्मानंदा योग्य । होती जीव ’ ॥—ज्ञानेश्वरी १३.

सिद्धाः॥ १२ ॥ वदंति केचित्परमोऽपि रामः स्वाविद्यया संवृतमात्म-
संज्ञम् । जानाति नात्मानमतः परेण संबोधितो वेद परात्मतत्त्वम् ॥१३॥
यदि स्म जानाति कुतो विलापः सीताकृतेऽनेन कृतः परेण । जानाति
नैवं यदि केन सेव्यः समो हि सर्वैरपि जीवजातैः ॥ १४ ॥ अत्रोत्तरं
किं विदितं भवद्भिस्तद्ब्रूत मे संशयभेदि वाक्यम् ॥१५॥ ॥ श्रीमहादेव
उवाच ॥ धन्यासि भक्तासि परात्मनस्त्वं यज्ज्ञातुमिच्छा तव राम-
तत्त्वम् । पुरा न केनाप्यभिचोदितोऽहं वक्तुं रहस्यं परमं निगूढम् ॥१६॥
त्वयाऽद्य भक्त्या परिनोदितोऽहं वक्ष्ये नमस्कृत्य रघूत्तमं ते । रामः
परात्मा प्रकृतेरनादिरानंद एकः पुरुषोत्तमो हि ॥ १७ ॥ स्वमायया
कृत्स्नमिदं हि सृष्ट्वा नभोवदंतर्बहिरास्थितो यः । सर्वांतरस्थोऽपि निगूढ

नाही, तो सर्वांचा आदि, त्यानें मायेच्या गुणपरंपरेच्या ओघाचा[1] निरास केला आहे असें सांगतात, आणि सावधानतेनें रात्रंदिवस त्याचें भजन करितात, ते त्याच भक्तीच्या योगेंकरून ज्ञानी होऊन परमपदाला ( मोक्षाला ) पावतात. १२ कोणी म्हणतात कीं ' राम श्रेष्ठ खरा, तथापि ब्रह्मसंज्ञक स्वतांचें स्वरूप आपल्याच मायेनें वेष्टिलें आहे, ही गोष्ट तो जाणत नव्हता. म्हणून दुसऱ्यानें—वसिष्ठानें—त्याला उपदेश केल्यावरून तो श्रेष्ठ अशा स्वतःच्या ईश्वरस्वरूपाला जाणता झाला. १३ जर त्याला हें (स्वस्वरूपाचें) ज्ञान होतें, तर त्या श्रेष्ठ पुरुषानें सीतेसाठीं शोक केला तो काय म्हणून ? जर ज्ञान नव्हतें असें म्हणावें, तर सर्व जीवसमुदायांसारखीच त्याची योग्यता होऊन मग त्याची सेवा तरी कोण करणार ?' १४ ह्याचें उत्तर म्हणून जें कांहीं आपणांला ठाऊक असेल, व ज्या भाषणानें माझा संशय नाहीसा होईल, तें आपण मला सांगावें. ' १५ श्रीमहादेव म्हणाले, ' ज्या अर्थी ब्रह्मरूपरामतत्त्व जाणण्याची तुला इच्छा झाली आहे, त्या अर्थी तूं धन्य आहेस, तूं परमेश्वराची भक्त आहेस. हें अत्यंत गूढ असें रहस्य सांगण्याविषयी कोणीही पूर्वी मला प्रश्न केला नाही. १६ तूं आज मला भक्तिपूर्वक विचारिलेंस, म्हणून मी त्या रघुश्रेष्ठाला नमस्कार करून तुला सांगतों. श्रीराम हा परमात्मा असून त्याला मायेचा कांहींच संबंध नाहीं. तो अनादि, आनंदरूप, आणि पुरुषोत्तम ( सर्व जीवांमध्यें श्रेष्ठ ) आहे. १७ आपल्या मायेनें हें सर्व जग निर्माण करून

१ मायेच्या मुळें होणारा काम, क्रोध, आदिकरून धर्मांचा निरास—नाश.

आत्मा स्वमायया सृष्टमिदं विचष्टे ॥ १८ ॥ जगंति नित्यं परितो भ्रमंति यत्सन्निधौ चुंबकलोहवद्धि । एतन्न जानंति विमूढचित्ताः स्वाविद्यया संवृतमानसा ये ॥ १९ ॥ स्वाज्ञानमप्यात्मनि शुद्धबुद्धे स्वारोपयंतीह निरस्तमाये । संसारमेवानुसरंति ते वै पुत्रादिसक्ताः पुरुकर्मयुक्ताः ॥२०॥ जानंति नैवं हृदये स्थितं वै चामीकरं कंठगतं यथाऽज्ञाः । यथाऽप्रकाशो न तु विद्यते रवौ ज्योतिःस्वभावे परमेश्वरे तथा । विशुद्धविज्ञानघने रघूत्तमेऽविद्या कथं स्यात्परतः परात्मनि ॥ २१ ॥ यथा हि चाक्ष्णा

आकाशाप्रमाणें त्याच्या आंत बाहेर राहणारा, सर्वांच्या अंतरी राहत असूनही गुप्त होत्साता आपल्या मायेनें उत्पन्न झालेल्या सृष्टीकडे पाहत आहे. १८ ज्याप्रमाणें लोहचुंबकाच्या सान्निध्यानें लोखंडाला चलन मिळत असतें, त्याचप्रमाणें ह्याच्या जवळ अनंत ब्रह्मांडें चारी बाजूंनी फिरत आहेत. परंतु मूढ अंतःकरणाच्या मनुष्यांना त्यांच्या अंतःकरणावर मायेचें आवरण पडलें असल्याकारणानें—हें समजत नाही. १९ पुत्रादिकांच्या ठायी आसक्त झालेले आणि अनेक कर्मांत गुंतलेले अज्ञानी लोक त्या निर्मल, ज्ञानमय, मायेपासून अलिप्त अशा परमेश्वररूपी रामचंद्राचे ठिकाणी स्वतांचें अज्ञान लादितात, आणि संसारांतच वरचेवर पडतात. २० देहभानावर नसतां स्वतःच्या गळ्यांतील सुवर्णालंकाराची आठवण नसते, त्याचप्रमाणें ह्या लोकांना हृदयांत असणाऱ्या रामाचें ज्ञान नसतें. ज्याप्रमाणें तेजोमय सूर्याचे ठिकाणी अंधकार असणें शक्य नाहीं, त्याचप्रमाणें निर्मल आणि प्रत्यक्ष ब्रह्मज्ञानस्वरूप श्रेष्ठांहूनही श्रेष्ठ अशा परमसमर्थ रघूत्तमाच्या ठिकाणीं अज्ञान कोठून असणार ? २१

१ माया सृष्टि उत्पन्न करिते, तो कांहीं करीत नाही तो केवळ द्रष्टा आहे यासबंधी ज्ञानेश्वरानीं खुबीदार वर्णन केले आहे –' अगा नगर हें रायें केलें । या म्हणण्या साचपण कीर आलें । परी निरुतें पहातां काय सिणले । रायाचे हात ? ॥ जैसी रायें अधिष्ठिली प्रजा । व्यापारे आपुलालिया काजा । तैसा प्रकृतिसंग माझा । येर करणे ते इयेचें ॥ पाहें पां पूर्ण चंद्राचिये भेटी । समुद्रीं अपार भरतें दाटी । तेथ चंद्रासि काय किरीटी । उपखा पडे ॥ जड परी जवळिका । लोह चळे तरी चळो कां । तरी कवण शीण भ्रामका । सन्निधानाचा ॥ किंबहुना यापरी । मी निजप्रकृति अंगीकारीं । आणि भूतसृष्टि एकसरी । प्रसवोंचि लागे ॥ जैसा दीप ठेविला परिवरीं ॥ कवणातें नियमी ना निवारी । आणि कवण कवणिये व्यापारीं । राहाटे तेंहि नेणे ॥ तो जैसा का साक्षिभूतु । गृहव्यापारप्रवृत्तिहेतु ॥ तैसा भूतकर्मी अनासक्तु । मी भूतीं ' असे ॥ ज्ञानेश्वरी, अध्याय ९

भ्रमता गृहादिकं विनष्टदृष्टेर्भ्रमतीव दृश्यते । तथैव देहेंद्रियकर्तुरात्मनः कृतं परेऽध्यस्य जनो विमुह्यति ॥२२॥ नाहो न रात्रिः सवितुर्यथा भवेत्प्रकाशरूपाव्यभिचारतः क्वचित् । ज्ञानं तथाऽज्ञानमिदं द्वयं हरौ रामे कथं स्थास्यति शुद्धचिद्धने ॥२३॥ तस्मात्परानंदमये रघूत्तमे विज्ञानरूपे हि न विद्यते तमः । अज्ञानसाक्षिण्यरविंदलोचने मायाश्रयत्वान्न हि मोहकारणम् ॥ २४ ॥ अत्र ते कथयिष्यामि रहस्यमपि दुर्लभम् । सीताराममरुत्सूनुसंवादं मोक्षसाधनम् ॥ २५ ॥ पुरा रामायणे रामो रावणं देवकंटकम् । हत्वा रणे रणश्लाघी सपुत्रबलवाहनम् ॥ २६ ॥ सीतया सह सुग्रीवलक्ष्म-

ज्याप्रमाणें मनुष्याला आपल्या भोंवती फिरून दृष्टि फिरली असतां घर वगैरे सर्वच फिरत आहे असें वाटतें, त्याचप्रमाणें शरीर, इंद्रियें यांचे ठिकाणीं राहून अंतःकरणाकडून केलें जाणारें कर्म आत्म्यावर आरोपल्याकारणानें प्राणी मोह पावतो. २२ सूर्याचें प्रकाशरूप कधींच नाहीसें होणारें नसल्यामुळें त्याच्या ठिकाणी दिवस आणि रात्र ही जशीं नाहींत, त्याचप्रमाणें भक्तांचीं संकटें हरण करणाऱ्या, शुद्ध ज्ञानानें परिपूर्ण असलेल्या श्रीरामाचे ठायीं ज्ञान आणि अज्ञान हीं दोन्ही कशीं राहूं शकतील ? २३ म्हणून परम आनंदरूपी, विज्ञानरूप–निर्विकल्प ज्ञानस्वरूप–मायेचा केवळ साक्षी अशा कमलनयन रघुश्रेष्ठ श्रीरामचंद्राचे ठिकाणी, तोच मायेचा आश्रय असल्यामुळें, मोह उत्पन्न करणारें अज्ञान राहत नाहीच. २४ ह्याचविषयीं मोक्षाला साधनभूत आणि ऐकायाला अत्यंत दुर्मिळ असा सीता, रामचंद्र आणि मारुति यांचा गुप्त संवाद मी तुला सांगतों. २५ पूर्वी रामावताराच्या कालीं रणविख्यात श्रीरामचंद्र हा रणांगणावर देवशत्रु रावणाचा, पुत्र सैन्य आणि वाहनें

१. विज्ञान=निर्विकल्पज्ञान. ज्ञानाचे दोन प्रकार आहेत. एक सविकल्पक आणि दुसरें निर्विकल्पक. ज्या ज्ञानामध्ये कांही तरी विषय मनुष्य, पशु, घट, पट वगैरे असतो तें सविकल्पक ज्ञान, आणि ज्यामध्ये कोणताही विषय नसतो तें निर्विकल्पक ज्ञान, अनुभवज्ञान.
२. रावण हा विश्रवा व कैकसी याचा पुत्र. हा विश्रवा पुलस्त्यऋषीचा पुत्र. त्याला देववर्णिनी व कैकसी अशा दोन स्त्रिया होत्या, व पहिलीपासून कुबेर व दुसरीपासून रावण, कुंभकर्ण, बिभीषण व शूर्पणखा अशीं चार अपत्ये झालीं. रावण हा ब्रह्मदेवाच्या वराने नरवानर सोडून बाकी सर्वांस अवध्य होता. पुढें रावणापासून देवाना अत्यंत त्रास होऊं लागला. तेव्हां परमेश्वरानें रामावतार घेऊन रावणाचा नाश केला. ह्या कामीं त्याला सुग्रीव, मारुति वगैरे वानरवीरांचे अत्यंत साह्य झाले.

णाभ्यां समन्वितः । अयोध्यामगमद्रामो हनूमत्प्रमुखैर्वृतः ॥२७॥ अभि-
षिक्तः परिवृतो वसिष्ठाद्यैर्महात्मभिः । सिंहासने समासीनः कोटिसूर्य-
समप्रभः ॥ २८ ॥ दृष्ट्वा तदा हनूमंतं प्रांजलिं पुरतः स्थितम् । कृतकार्यं
निराकांक्षं ज्ञानापेक्षं महामतिम् ॥ २९ ॥ रामः सीतामुवाचेदं ब्रूहि तत्त्वं
हनूमते । निष्कल्मषोऽयं ज्ञानस्य पात्रं नो नित्यभक्तिमान् ॥ ३० ॥
तथेति जानकी प्राह तत्त्वं रामस्य निश्चितम् । हनूमते प्रपन्नाय सीता
लोकविमोहिनी ॥३१॥ रामं विद्धि परं ब्रह्म सच्चिदानंदमद्वयम् । सर्वो-
पाधिविनिर्मुक्तं सत्तामात्रमगोचरम् ॥ ३२ ॥ आनंदं निर्मलं शांतं निर्वि-

या सर्वांसह नाश करून सुग्रीव, लक्ष्मण, त्याचप्रमाणें हनुमान् वगैरे मंडळीसह अयोध्येला गेला. २६, २७ तेथें वसिष्ठ वगैरे मोठमोठ्या ऋषींकडून अभिषेक केला गेल्यावर कोटिसूर्याप्रमाणें कांतीनें विराजमान रामचंद्र सर्व मंडळींनी वेष्टित होऊन सिंहासनावर बसला होता. २८ तेव्हां, ज्यानें आपली अनेक कार्यें तडीस नेली आहेत, ज्याला दुसरी कशाचीही इच्छा नसून केवळ ज्ञानाचीच इच्छा आहे, अशा त्या महाबुद्धिमान हनुमंताला हात जोडून पुढें उभा राहिलेला पाहून, राम सीतेला म्हणाला, '( सीते ! ) ह्या हनुमंताला तूं सत्स्वरूपाचा उपदेश कर. हा निष्पाप असून आम्हा दोघांचाही नित्यभक्त असल्याकारणानें ज्ञानोपदेशाला पात्र आहे.' २९, ३० त्यावर लोकांच्या मनाला मोहविणारी सीता ( ती मायेचाच अवतार असल्यामुळें ) 'होय, सांगतें' असें म्हणून शरण आलेल्या मारुतीला श्रीरामाचें सत्य स्वरूप समजेल अशा रीतीनें सांगती झाली. ३१ सीता म्हणाली, 'सच्चिदानंद, अर्थात् ज्याला त्रिकालींही बाधा नाहीं, ज्ञान आणि आनंद हींच ज्याचीं रूपें, ज्याच्या ठिकाणीं द्वैत नाहीं, ज्याच्या ठिकाणीं कोणताही उपाधि-धर्म किंवा गुण नाहीं, सत्तारूपानें जें सर्वत्र असणारें, कोणत्याही इंद्रियाला अगोचर-न समजणारें-असें जें ब्रह्म तेंच रामाचें स्वरूप होय. त्याचप्रमाणें तो श्रीराम आनंदरूपी. निर्दोष. शांत-

१ [illegible] केसरी नावाच्या वानराच्या पत्नीनें महादेवाची आराधना [illegible] अनुग्रहानें तिला पुत्र झाला, तो हनुमंत-मारुति-होय. कडकडीत [illegible] बनला होता. क्रोधायमान झाला असतां हनुमंत रुद्राप्रमाणें [illegible] दिसे व त्याच्या पराक्रमापुढें महान् वीराचें तेज फिकें पडे, म्हणून त्याला रुद्राचा [illegible] असें मानण्यात आलें असावें. ३. सूर्यवंशी राजांची राजधानी. हें नगर सरयू नदीचे [illegible] आहे. त्या ठिकाणीं रामाचे हातून घडलेल्या सर्व कृत्यांचें वर्णन अयोध्याकांडात आलें आहे. ४ सूर्यवंशी राजांचा कुलोपाध्याय.

कारं निरंजनम् । सर्वव्यापिनमात्मानं स्वप्रकाशमकल्मषम् ॥ ३३ ॥ मां विद्धि मूलप्रकृतिं सर्गस्थित्यंतकारिणीम् । तस्य सन्निधिमात्रेण सृजामी-दमतंद्रिता ॥ ३४ ॥ तत्सान्निध्यान्मया सृष्टं तस्मिन्नारोप्यतेऽबुधैः । अयो-ध्यानगरे जन्म रघुवंशेऽतिनिर्मले ॥ ३५ ॥ विश्वामित्रसहायत्वं मखसंरक्षणं ततः । अहल्याशापशमनं चापभंगो महेशितुः ॥ ३६ ॥ मत्पाणिग्रहणं पश्चाद्भार्गवस्य मदक्षयः । अयोध्यानगरे वासो मया द्वादशवार्षिकः ॥३७॥ दंडकारण्यगमनं विराधवध एव च । मायामारीचमरणं मायासीताहृति स्तथा ॥ ३८ ॥ जटायुषो मोक्षलाभः कबंधस्य तथैव च । शबर्याः पूजनं पश्चात्सुग्रीवेण समागमः ॥ ३९ ॥ वालिनश्च वधः पश्चात्सीतान्वेषणमेव च । सेतुबंधश्च जलधौ लंकायाश्च निरोधनम् ॥ ४० ॥ रावणस्य वधो युद्धे

स्वरूप, निर्विकार, अज्ञानरहित, सर्वव्यापी, सर्वप्रेरक, स्वयंप्रकाश आणि पापरहित आहे असें जाण. ३२,३३ उत्पत्ति, स्थिति आणि लय करणारी आदिमाया मी आहें असें जाण. त्याच्याच केवळ सान्निध्यानें हें जग मी मोठ्या दक्षतेनें निर्माण करितें. ३४ हें जग मजकडून निर्माण झालें आहे, तरी अज्ञानी लोक हें सर्व कर्तृत्व त्याच्या सांनिध्यामुळें रामावर आरोपितात. अयोध्यानगरीत अतिशुद्ध रघुवंशांत जन्म घेणें, विश्वामित्राला मदत करणे, यज्ञरक्षण करणें, नंतर अहल्येला शापमुक्त करणें, महासामर्थ्यवंत शंकराच्या धनुष्याचा भंग करणें, माझें पाणिग्रहण करणें, पुढें परशुरामाचा गर्व हरणें, अयोध्यानगरीत मजसहवर्तमान बारा वर्षे राहणें, दंडकारण्यांत जाणें, विराध राक्षसाला मारणें, तसेंच कपटी मारीचाचें मरण, कपटानें निर्मिलेल्या सीतेचें हरण, जटायूला आणि कबंध राक्षसाला मोक्षाचा लाभ, शबरीनें केलेली पूजा, सुग्रीवाशी मैत्री, वालीचा वध, सीतेचा शोध, समुद्रावर

१ दंडकारण्य–दक्षिणेंत नर्मदा आणि गोदावरी यामधील प्रदेश हा रामाचे वेळा निर्जन होता २ विराध, मारीच, हे राक्षस असून रामाच्या हातून मृत्यु पावले. यांचीं वर्णनें पुढें रामायणात त्या त्या स्थलीं आलीं आहेत ३. हा पक्षिराज रामाचा परमभक्त होता सीतेला रावण पळवून नेत असता तिच्या आरोळ्या ऐकून हा धांवून आला व रावणाशीं निकरानें लढला त्या युद्धात भयंकर जखम होऊन हा पडला. तथापि राम येईपर्यंत तसाच जीव धरून राहिला. पुढें रामाची भेट झाल्यावर सीतेचा वृत्तांत रामाला सांगून त्यानें प्राण सोडला ४. शबरी ही भिल्लीण असून परम रामभक्त होती ५. हा वानराधिपति असून सुग्रीवाचा वडील बंधु होता. रामानें त्याचा वध करून त्याचें राज्य सुग्रीवाला दिलें

सपुत्रस्य दुरात्मनः । विभीषणे राज्यदानं पुष्पकेण मया सह ॥ ४१ ॥
अयोध्यागमनं पश्चाद्राज्ये रामाभिषेचनम् । एवमादीनि कर्माणि मयैवाच-
रितान्यपि । आरोपयंति रामेऽस्मिन्निर्विकारेऽखिलात्मनि ॥ ४२ ॥ रामो न
गच्छति न तिष्ठति नानुशोचत्याकांक्षते त्यजति नो न करोति किंचित् ।
आनंदमूर्तिरचलः परिणामहीनो मायागुणाननुगतो हि तथा विभाति ॥ ४३ ॥
॥ श्रीमहादेव उवाच ॥ ततो रामः स्वयं प्राह हनूमंतमुपस्थितम् । शृणु
तत्त्वं प्रवक्ष्यामि ह्यात्मानात्मपरात्मनाम् ॥ ४४ ॥ आकाशस्य यथा भेद-
स्त्रिविधो दृश्यते महान् । जलाशये महाकाशस्तदवच्छिन्न एव हि । प्रति-
बिंबाख्यमपरं दृश्यते त्रिविधं नभः ॥ ४५ ॥ बुद्ध्यवच्छिन्नचैतन्यमेकं पूर्ण-
मथापरम् । आभासस्त्वपरं बिंबभूतमेवं त्रिधा चितिः ॥ ४६ ॥ साभासबुद्धेः

सेतु बांधणें, लंकेला वेढा घालणें, युद्धांत दुष्ट रावणाचा पुत्रासह वध करणें, बिभी-
षणाला राज्यदान, मजसह पुष्पकांत बसून अयोध्येला येणें, आणि नंतर राज्याभिषेक,
वगैरे सर्व गोष्टी मजकडूनच घडल्या आहेत. तथापि त्या सर्वांतर्यामी व निर्विकार
श्रीरामाच्या ठायीं त्यांचें कर्तृत्व लोक आरोपितात ३५,३६,३७,३८,३९,४०,४१,४२
श्रीराम चालत नाहीं, उभा राहत नाहीं, कसलाही शोक करीत नाहीं, कोणतीही
वस्तु इच्छीत नाहीं, काहीही टाकीत नाहीं किंवा काहीही करीत नाहीं, तो आनंदरूप
आहे, त्याचें रूप ढळत नाहीं, व त्या रूपांत बदलही होत नाहीं, परंतु मायानिर्मित पदा-
र्थांना रामचंद्र हा आधार असल्यामुळें तो तसा—सृष्टिरूप—भासतो.' ४३ महादेव म्हणाला,
'नंतर राम जवळ येऊन ठेपलेल्या मारुतीला स्वतः होऊन म्हणाला, '(मारुते!)
मी तुला आत्मा, अनात्मा आणि परात्मा अर्थात् ईश्वर, जीव आणि शुद्ध चैतन्य यांचें
तत्त्व काय आहे तें सांगतो, ऐक. ४४ ज्याप्रमाणें आकाशाचें मोठें आकाश, जलाश-
[illegible] जलाशयानें मर्यादित झालेले आकाश, आणि (पाण्यांत) प्रतिबिंबित
आकाश असे तीन भेद आपणाला दिसतात, त्याचप्रमाणें बुद्धिरूपी उपाधीनें युक्त चैतन्य
(ईश्वर), प्रतिबिंबरूपी चैतन्य (जीव), आणि तिसरें बिंबभूत—आधारभूत—शुद्ध
चैतन्य, असे चैतन्याचे तीन भेद आहेत. ४५,४६ चैतन्याच्या आभासानें—प्रतिबिंबानें

१ बिभीषण हा रावणाचा कनिष्ठ बंधु रावणाच्या दुष्ट कृत्यांनी रावणाचा पक्ष सोडून हा
रामास येऊन मिळाला आणि पुढें रावणाचा वध केल्यावर रामानें लंकेचें राज्य याला दिलें. २ येथे
जलाशय, याचा रूढ अर्थ न घेतां यौगिक अर्थ जलपात्र—घट—असा घ्यावा

कर्तृत्वमविच्छिन्नेऽविकारिणि । साक्षिण्यारोप्यते भ्रांत्या जीवत्वं च तथाऽबुधैः ॥ ४७ ॥ आभासस्तु मृषाबुद्धिरविद्याकार्यमुच्यते । अविच्छिन्नं तु तद्ब्रह्म विच्छेदस्तु विकल्पतः ॥ ४८ ॥ अवच्छिन्नस्य पूर्णेन एकत्वं प्रतिपाद्यते । तत्त्वमस्यादिवाक्यैश्च साभासस्याहमस्तथा ॥ ४९ ॥ ऐक्यज्ञानं यदोत्पन्नं महावाक्येन चात्मनोः । तदाऽविद्या स्वकार्यैश्च नश्यत्येव न संशयः ॥ ५० ॥ एतद्विज्ञाय मद्भक्तो मद्भावायोपपद्यते । मद्भक्तिविमुखानां हि शास्त्रगर्तेषु मुह्यताम् । न ज्ञानं न च मोक्षः स्यात्तेषां जन्मशतैरपि ॥ ५१ ॥ इदं रहस्यं हृदयं ममात्मनो मयैव साक्षात्कथितं

युक्त अशा अंतःकरणाचें कर्तृत्व आणि जीवत्व देखील अज्ञानी लोकांकडून भ्रांतीनें मर्यादारहित आणि अविकारी अशा साक्षिभूत चैतन्याचे ठिकाणी आरोपिलें जातें. ४७ आभास–प्रतिबिंब–हें मिथ्याज्ञान होय, तें अविद्येनें–अज्ञानानें–उत्पन्न होतें असें म्हटलें आहे. ब्रह्म हें भेदरहित आहे, त्याच्या ठिकाणीं भेद दिसून येतो तो भ्रमानें होय ४८ अशा त्या चैतन्याचे ठायीं भेद उत्पन्न झाला असतां आभासयुक्त–प्रतिबिंबयुक्त जीवाचें 'तत्त्वमसि'–तें तूं आहेस–इत्यादि वाक्यांनी शुद्ध चैतन्याशीं ऐक्य प्रतिपादिलें जातें. ४९ जीव आणि ईश्वर यांचें 'तत्त्वमसि' इत्यादि वाक्यांच्या योगानें ऐक्य आहे, असें ज्ञान झालें असतां अविद्या–अज्ञान–आपल्या कार्यासह तत्क्षणीं नाहीशी होते, यात संशय नाही. ५० हें जाणल्यानें माझा भक्त माझ्या स्वरूपाला प्राप्त होतो. परंतु जे माझी भक्ति न करितां शास्त्ररूपी खड्ड्यांत मोहवश होऊन पडतात–शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें कर्म करीत राहतात–त्यांना शेंकडो जन्म घेऊनही ज्ञान होणार नाही, व मोक्षही मिळणार नाही. ५१ हे निष्पापा ( मारुते )! माझ्या स्वरूपासंबंधी गुप्त तत्त्व–रामहृदय–मी तुला सांगितलें

१. ब्रह्मस्वरूपाची अभेदस्थिति —'जे एक आतबाहेरी । जे एक जवळदुरी । जे एकवांचूनि परी । दुजी नाहीं ॥ १३, ९१५ ॥ बाल्यादि तिन्ही वयसां । काया एकचि जैसी । तैसें आदिस्थितिप्रासीं । अखड जे ॥ २२ ॥ सायंप्रातर्मध्याह्न । होतां जाता दिनमान । जैसें का गगन । पालटेना ॥ २३ ॥ जे देखिलियाचि सर्वे । दृश्य, द्रष्टा हें आघवें । एकवट कालवे । सामरस्यें' ॥ ३६ ॥—ज्ञानेश्वरी. २. जीवाचें ईश्वराशीं ऐक्य'–'तेंवि मजसी एकवट । जे ज्ञानें झाले चोखट । तया पुनरावृत्तीची वाट । मोडली गा ॥ १५, ३२० ॥ जैसें पाणियावरी वेगळ । तळपता दिसती कल्लोळ । एरवीं तरी निखिळ । पाणीच तें. ॥ ३२ ॥ कां सुवर्णाहुनि आनें । लेणीं गमती भिन्नें । मग पाहिजे तंव सोनें । अवघेंचि तें' ॥ ३३ ॥—ज्ञानेश्वरी.

तवानघ । मद्भक्तिहीनाय शठाय न त्वया दातव्यमैन्द्रादपि राज्यतोऽधिकम् ॥ ५२ ॥ ॥ श्रीमहादेव उवाच ॥ एतत्तेऽभिहितं देवि श्रीरामहृदयं मया । अतिगुह्यतमं हृद्यं पवित्रं पापशोधनम् ॥ ५३ ॥ साक्षाद्रामेण कथितं सर्ववेदांतसंग्रहम् । यः पठेत्सततं भक्त्या स मुक्तो नात्र संशयः ॥ ५४ ॥ ब्रह्महत्यादिपापानि बहुजन्मार्जितान्यपि । नश्यंत्येव न संदेहो रामस्य वचनं यथा ॥ ५५ ॥ योऽतिभ्रष्टोऽतिपापी परधनपरदारेषु नित्योद्यतो वा स्तेयी ब्रह्मघ्नमातापितृवधनिरतो योगिवृंदापकारी । यः संपूज्याभिरामं पठति च हृदयं रामचंद्रस्य भक्त्या योगींद्रैरप्यलभ्यं पदमिह लभते सर्वदेवैः स पूज्यम् ॥ ५६ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे बालकांडे श्रीरामहृदयं नाम प्रथमः सर्गः ॥ १ ॥

आहे. त्याची योग्यता इंद्राच्या राज्यापेक्षां देखील अधिक आहे, तरी ज्याची भक्ति माझ्या ठिकाणी नाही, अशा कपट्याला ह्याचा उपदेश त्वां करूं नये." ५२ शंकर म्हणाले, 'हे देवि पार्वति! अत्यंत गुह्य, मनोहर आणि पापविनाशक असें हें रामहृदय तुला मी सांगितलें आहे. ५३ साक्षात् रामानें सांगितलेल्या वेदांतांतील सर्वसिद्धांतसाराचें-रामहृदयाचें-जो भक्तिपूर्वक पठण करील, तो मुक्त होईल यांत संशय नाही. ५४ याच्या पठनानें अनेक जन्मांमध्यें संपादन केलेलीं ब्रह्महत्यादि पापें देखील निश्चयानें नाशास जातील यांत संशय नाही, असें श्रीरामाचें वचन आहे. ५५ अत्यंत भ्रष्ट, अतिपापी, परस्त्री अथवा परधन हरण्यांत नित्य गुंतलेला, चोरी करणारा, ब्रह्महत्या अथवा मातापितरांचा वध करणारा, साधूंना अपकार करणारा, कोणीही असो, तो जर ह्या सुंदर रामहृदयाचें पूजन करून पाठ करील, तर मोठ्या योग्यांनाही अलभ्य आणि सर्व देवांना पूज्य, अशा पदाला जाईल.' ५६

**बालकांड, प्रथम सर्ग समाप्त.**

१ समानार्थक श्लोक —'कल्याणाना निधानं कलिमलमथनं पावनं पावनाना । पाथेयं यन्मुमुक्षो सपदि परपदप्राप्तये प्रस्थितस्य ॥ विश्रामस्थानमेकं कविवरवचसा जीवनं सज्जनाना । बीजं धर्मद्रुमस्य प्रभवतु भवता भूतये **रामनाम**' ॥–हनुमन्नाटक.

## बालकांड, सर्ग २ रा.

॥ पार्वत्युवाच ॥ धन्यास्म्यनुगृहीतास्मि कृतार्थास्मि जगत्प्रभो। विच्छिन्नो मेऽतिसंदेहग्रंथिर्भवदनुग्रहात् ॥ १ ॥ त्वन्मुखाद्गलितं रामतत्त्वामृतरसायनम्। पिबंत्या मे मनो देव न तृप्यति भवापहम् ॥ २ ॥ श्रीरामस्य कथा त्वत्तः श्रुता संक्षेपतो मया। इदानीं श्रोतुमिच्छामि विस्तरेण स्फुटाक्षरम् ॥ ३ ॥ ॥ श्रीमहादेव उवाच ॥ शृणु देवि प्रवक्ष्यामि गुह्याद्गुह्यतरं महत्। अध्यात्मरामचरितं रामेणोक्तं पुरा मम ॥ ४ ॥ तदद्य कथयिष्यामि शृणु तापत्रयापहम्। यच्छ्रुत्वा मुच्यते जंतुरज्ञानोत्थमहाभयात् । प्राप्नोति परमामृद्धिं दीर्घायुः पुत्रसंततिम् ॥ ५ ॥ भूमिर्भारेण मग्ना दशवदनमुखाशेषरक्षोगणानां धृत्वा

पार्वती म्हणाली, 'हे जगत्प्रभो ! मी धन्य आहें, आपण मजवर मोठाच अनुग्रह केला आहे. आज मी कृतकृत्य झाल्य आहें. आपल्या कृपेनें माझ्या अंतःकरणांतील मोठी संशयरूपी गांठ सुटली आहे. १ देवा ! आपल्या मुखांतून निघालेल्या रामतत्त्वरूपी संसारतापहरण करणाऱ्या अमृतसमान गोड रसायनाचें प्राशन करून माझे मनाची तृप्ति होत नाही. २ श्रीरामचंद्राची कथा मी आपल्या तोंडून थोडक्यांत ऐकिली, परंतु आतां विस्तारपूर्वक आणि सुबोध रीतीनें ती कथा ऐकावी अशी माझी इच्छा आहे.' ३ महादेव म्हणाला, 'देवि ( पार्वति ) ! ऐक, गुह्याहूनही अत्यंत गुह्य असें हें 'अध्यात्मरामचरित' रामचंद्रानेंच पूर्वी मला सांगितलें आहे, आणि तें मी तुला सांगतों. ४ तापत्रयाचें निर्मूलन करणारें असें तें रामचरित्र आज मी तुला सांगतो, ऐक. हें ऐकल्यानें अज्ञानामुळें उत्पन्न झालेल्या महाभयापासून—संसारभयापासून—सुटून प्राणी थोर ऐश्वर्य, दीर्घ आयुष्य आणि पुत्रसंतति हीं प्राप्त करून घेतो. ५ रावणप्रमुख सर्व दैत्यसमुदायाच्या

१. आध्यात्मिक, आधिभौतिक आणि आधिदैविक—' नाना चिंतेची काजळी। नाना दुःखे चित्त पोळी। व्याधीवाचूनि तळमळी। या नाव आध्यात्मिक ॥ सर्व भूतांचेनि संयोगें। सुखदुःख उपजो लागे। ताप होता मन भंगे। या नाव आधिभौतिक ॥ शुभाशुभ कर्माने जना। देहांतीं यमयातना। स्वर्ग नर्क भोग नाना। या नाव आधिदैविक ' ॥—दासबोध.

गोरूपमादौ दिविजमुनिजनैः साकमब्जासनस्य । गत्वा लोकं रुदंती व्यसनमुपगतं ब्रह्मणे प्राह सर्वं ब्रह्मा ध्यात्वा मुहूर्तं सकलमपि* हृदावेदशेषात्मकत्वात् ॥ ६ ॥ तस्मात्क्षीरसमुद्रतीरमगमद्ब्रह्माथ देवैर्वृतो देव्या चाखिललोकहृत्स्थमजरं सर्वज्ञमीशं हरिम् । अस्तौषीच्छ्रुतिसिद्धनिर्मलपदैः स्तोत्रैः पुराणोद्भवैर्भक्त्या गद्गदया गिरातिविमलैरानंदबाष्पैर्वृतः ॥ ७ ॥ ततः स्फुरत्सहस्रांशुसहस्रसदृशप्रभः । आविरासीद्धरिः प्राच्यां दिशां व्यपनयंस्तमः ॥ ८ ॥ कथंचिद्दृष्टवान्ब्रह्मा दुर्दर्शमकृतात्मनाम् । इंद्रनीलप्रतीकाशं स्मितास्यं पद्मलोचनम् ॥ ९ ॥ किरीटहारकेयूरकुंडलैः कटकादिभिः । विभ्राजमानं श्रीवत्सकौस्तुभप्रभयान्वितम्

भारान पाडलला पृथ्वी प्रथमतः गोरूप धारण करून देवांना व मुनिजनांना बरोबर घेऊन ब्रह्मलोकाला गेली आणि रडत आपल्यावर आलेलें सर्व संकट ब्रह्मदेवाला सांगती झाली. ब्रह्मदेवानें क्षणभर ध्यान केलें आणि सकल जग त्याचेंच स्वरूप असल्यामुळें, सर्व गोष्टी त्याच्या मनांत तत्काळ आल्या. ६ नंतर तेथून सर्व देव आणि पृथ्वी यांसहवर्तमान ब्रह्मदेव क्षीरसमुद्राच्या तीरी गेला. तेथें अत्यंत स्वच्छ आनंदाश्रू डोळयांतून वाहत आहेत अशा स्थितीत, प्रेमामुळें गहिंवरून आलेल्या वाणीनें, वेदांमध्यें प्रतिपादलेलीं पवित्र नांवें ज्यांत आली आहेत, अशा पुराणांत असलेल्या स्तुतिपर वाक्यांनीं सर्व प्राण्यांच्या अंतर्यामीं राहणाऱ्या, ज्याला जरा नाहीं, जो सर्वज्ञ आणि सर्वसामर्थ्यवान् आहे, अशा विष्णूची स्तुति त्यानें केली. ७ तेव्हां हजारों देदीप्यमान सूर्याप्रमाणें तेजानें शोभणारा, आणि त्या तेजानें सकल दिशांचा अंधकार दूर करणारा भगवान् विष्णु पूर्व दिशेला प्रगट झाला. ८ इंद्रियें स्वाधीन नसणाऱ्यांना ज्याचें दर्शन अत्यंत दुर्लभ, अशा त्या विष्णूचें दर्शन ब्रह्मदेवाला मोठ्या प्रयासानें झालें. त्या भगवान् विष्णूचा इंद्रनीलाप्रमाणें श्यामवर्ण होता; मुखावर हास्य विकसित झालें होतें; त्याचे नेत्र कमलसमान होते; किरीट, हार, बाहुभूषणें, कुंडलें, कडीं वगैरें अलंकारांनी तो विशेषच शोभत होता; श्रीवत्स आणि कौस्तुभ

१. ' यस्माद्विश्वमिदं सर्वं तस्य शक्त्या महात्मनः । तस्मादेवोच्यते विष्णुर्विशधातोः प्रवेशनात् ' ॥ त्याचप्रमाणे ' एको विष्णुर्महद्भूतं पृथग्भूतान्यनेकशः । त्रीँल्लोकान् व्याप्य भूतात्मा भुंक्ते विश्वभुगव्ययः ' ॥ या वचनावरून विष्णूचे महत्व कां तें दिसून येतें. २. समानार्थक उतारा–' दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता । यदि भा सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः ॥ ' ११. १२. भ. गीता.

॥ १० ॥ स्तुवद्भिः सनकाद्यैश्च पार्षदैः परिवेष्टितम् । शंखचक्रगदापद्म-
वनमालाविराजितम् ॥ ११ ॥ स्वर्णयज्ञोपवीतेन स्वर्णवर्णांबरेण च ।
श्रिया भूम्या च सहितं गरुडोपरि संस्थितम् ॥ १२ ॥ हर्षगद्गदया
वाचा स्तोतुं समुपचक्रमे ॥ १३ ॥ ॥ ब्रह्मोवाच ॥ नतोऽस्मि ते
पदं देव प्राणबुद्धींद्रियात्मभिः । यच्चिंत्यते कर्मपाशाद्धृदि नित्यं मुमुक्षुभिः
॥ १४ ॥ मायया गुणमय्या त्वं सृजस्यवसि लुंपसि । जगत्तेन न ते
लेप आनंदानुभवात्मनः ॥ १५ ॥ तथा शुद्धिर्न दुष्टानां दानाध्ययन-
कर्मभिः । शुद्धात्मता ते यशसि सदा भक्तिमतां यथा ॥ १६ ॥ अत-
स्तवांघ्रिर्मे दृष्टश्चित्तदोषापनुत्तये । सद्योंऽतर्हृदये नित्यं मुनिभिः सात्व-

यांचें तेज त्याच्या शरीरावर अत्यंत झळकत होतें; सभोंवती सनकादिक मंडळी व सेवकगण जमून स्तुति करीत होते, शंख, चक्र, गदा, कमल आणि वनमाला ह्यांचे योगेंकरून त्याला मनोहर शोभा आली होती; त्यानें सुवर्णाचें यज्ञोपवीत व सुवर्णाप्रमाणें तेजस्वी पीतांबर धारण केला होता, लक्ष्मी[1] आणि भूमि या दोघींना घेऊन तो गरुडावर बसला होता, अशा त्या विष्णूची सद्गदित होऊन आनंदानें स्तुति करण्यास ब्रह्मदेवानें आरंभ केला. ९,१०,११, १२, १३ ब्रह्मदेव म्हणाला,' पंच-प्राण, बुद्धि, दशेंद्रियें[2] आणि मन यांच्या योगेंकरून मी तुमच्या चरणांचे ठायीं नम्र झालों आहें. कर्मपाशापासून मुक्त होऊं इच्छिणारे ह्याच तुमच्या चरणांचें अंतः-करणांत नित्य ध्यान करीत असतात. १४ आपण आपल्या सत्त्व, रज, तम या त्रिगुणात्मक मायेच्या योगानें जगाची उत्पत्ति, पालन व संहार करितां. परंतु त्यामुळें, आनंदानुभव हेंच आपलें स्वरूप असल्यामुळें, आपणाला अभिमान होत नाहीं. १५ आपल्या यशाचें श्रवण अगर कीर्तन यांवर भक्ति ठेवल्यानें जशी शुद्धता प्राप्त होते, तशी शुद्धता मलिन अंतःकरणांच्या लोकांनीं कितीही दानें, वेदपाठ आणि यज्ञकर्मे केलीं तरी त्यांना प्राप्त होत नाहीं. १६ म्हणून शांत मनाचे मुनि ज्या आपल्या चरणांचें अंतःकरणांत ध्यान करितात, त्यांचें आज मला दर्शन झालें. या

१ समुद्रमंथन करून लक्ष्मी निघाली असता सुरासुरमुनींपैकीं कोणाला माळ घालावी, असा विचार तिला पडला असता विष्णूखेरीज इतर सर्व देवामध्यें कांहींना कांहीं दोष तिला आढळून आला. शेवटीं सर्वगुणसंपन्न अशा, आणि स्वत विषयीं ( लक्ष्मीविषयीं ) निरपेक्ष अशा विष्णूलाच तिनें वरिलें २. दशेंद्रियें:—ज्ञानेंद्रियें–' श्रोत्रं त्वक् चक्षुषी जिह्वा नासिका चैव पंचमी ।' कर्मेंद्रियें–' पायूपस्थ हस्तपादं वाक् चैव दशमी स्मृता ' ॥

**तैर्वृतः ॥ १७ ॥ ब्रह्माद्यैः स्वार्थसिद्ध्यर्थमस्माभिः पूर्वसेवितः । अपरोक्षानुभूत्यर्थं ज्ञानिभिर्हृदि भावितः ॥ १८ ॥ तवांघ्रिपूजानिर्माल्यतुलसीमाल्यया विभो । स्पर्धते वक्षसि पदं लब्ध्वापि श्रीः सपत्निवत् ॥ १९ ॥ अतस्त्वत्पादभक्तेषु तव भक्तिः श्रियोऽधिका । भक्तिमेवाभिवांछंति त्वद्भक्ताः सारवेदिनः ॥ २० ॥ अतस्त्वत्पादकमले भक्तिरेव सदाऽस्तु मे । संसारामयतप्तानां भेषजं भक्तिरेव ते ॥ २१ ॥ इति ब्रुवंतं ब्रह्माणं बभाषे भगवान् हरिः । किं करोमीति तं वेधाः प्रत्युवाचातिहर्षितः ॥ २२ ॥ भगवन् रावणो नाम पौलस्त्यतनयो महान् । राक्षसानामधिपतिर्मद्दत्तवरदर्पितः ॥ २३ ॥ त्रिलोकीं लोकपालांश्च बाधते विश्वबाधकः । मानुषेण मृतिस्तस्य मया कल्याण कल्पिता ॥ २४ ॥**

योगानें माझे अंतःकरणदोष दूर होवोत. १७ स्वतःची कार्यसिद्धि व्हावी, म्हणून आम्ही ब्रह्मादिक देवांनी आपल्या चरणांचें पूर्वीच सेवन केलें आहे, व त्यांचेंच ब्रह्मानंदाच्या प्रत्यक्षानुभवासाठीं ज्ञानी लोक हृदयांत ध्यान करितात. १८ हे विभो ! लक्ष्मी आपल्या वक्षःस्थलावर स्थल मिळवूनही, आपल्या चरणपूजेंतील निर्माल्यरूप तुळशीच्या माळेशी सवतीसारखी स्पर्धा करिते. १९ आपल्या चरणांची भक्ति करणाऱ्यांवर लक्ष्मीहूनही आपली अधिक प्रीति आहे, म्हणून तत्त्ववेत्ते असे भक्त आपल्या भक्तीचीच इच्छा करितात. २० म्हणून आपल्या पदकमलाचे ठायीं सर्वदा माझी भक्ति असो. संसाररूपी[1] रोगानें पीडित झालेल्या लोकांना औषध म्हटलें म्हणजे आपली भक्तिच होय.' २१ असें बोलणाऱ्या ब्रह्मदेवाला भगवान् श्रीविष्णु म्हणाला, 'मी काय केलें पाहिजे ?' त्यावर अत्यंत हर्षित होऊन ब्रह्मदेव म्हणाला, २२ 'हे भगवन् ! विश्वाला पीडित करणारा, पौलस्त्य ऋषीचा महापराक्रमी मुलगा आणि राक्षसांचा राजा रावण मी दिलेल्या वरानें उन्मत्त होऊन त्रैलोक्याला आणि दिक्पाळांना[2] उपद्रव देत आहे. महाभाग विष्णो ! त्याचा मृत्यु मनुष्याकडून होईल असें मी

१. संसाराला रोग, नदी, कूप, समुद्र, अरण्य, सर्प, अंधकार अशा अनेक उपमा कवींनी दिल्या आहेत. २. हे आठ आहेतः—'ऐन्द्रो वह्निः पितृपति ( यम ) नैर्ऋतो वरुणो मरुत् । कुबेर ईशः पतयः पूर्वादीना दिशा क्रमात्' ॥ अमरकोश

अतस्त्वं मानुषो भूत्वा जहि देवरिपुं प्रभो ॥ ॥ श्रीभगवानुवाच ॥ कश्यपस्य वरो दत्तस्तपसा तोषितेन मे ॥ २५ ॥ याचितः पुत्रभावाय तथेत्यंगीकृतं मया । स इदानीं दशरथो भूत्वा तिष्ठति भूतले ॥ २६ ॥ तस्याहं पुत्रतामेत्य कौसल्यायां शुभे दिने । चतुर्धात्मानमेवाहं सृजामीतरयोः पृथक् ॥ २७ ॥ योगमायापि सीतेति जनकस्य गृहे तदा । उत्पत्स्यते तया सार्धं सर्वं संपादयाम्यहम् ॥ २८ ॥ इत्युक्त्वांऽतर्दधे विष्णुर्ब्रह्मा देवानथाब्रवीत् ॥ ॥ ब्रह्मोवाच ॥ विष्णुर्मानुषरूपेण भविष्यति रघोः कुले ॥ २९ ॥ यूयं सृजध्वं सर्वेऽपि वानरेष्वंशसंभवान् । विष्णोः सहायं कुरुत यावत्स्थास्यति भूतले ॥ ३० ॥ इति देवान्समादिश्य समाश्वास्य च मेदिनीम् । ययौ ब्रह्मा स्वभवनं विज्वरः सुखमास्थितः ॥ ३१ ॥ देवाश्च सर्वे हरिरूपधारिणः स्थिताः सहायार्थ-

योजिलें आहे. २३,२४ हे प्रभो! असें आहे म्हणून, आपण मनुष्यरूप धारण करून त्या देवाच्या शत्रूला ठार करावें.' त्यावर श्रीभगवान् विष्णु म्हणाला, 'कश्यपाच्या तपश्चर्येनें संतुष्ट होऊन मी त्याला वर दिला होता. २५ मी त्याचा पुत्र व्हावें, असा त्यानें वर मागितला आणि 'तसें होईल' असें म्हणून मी त्याचा स्वीकार केला. सांप्रत तो—कश्यप—दशरथ होऊन पृथ्वीवर राहत आहे. २६ त्याचें पुत्रत्व स्वीकारून कौसल्या आणि त्याच्या इतर दोन स्त्रिया यांचे पोटीं मी वेगवेगळे चार अवतार धारण करीन. २७ माझी योगमाया देखील 'सीता' म्हणून जनकाच्या घरीं तेव्हा जन्म घेईल. तिजसहवर्तमान मी सर्व गोष्टी पूर्ण करीन.' २८ असें म्हणून विष्णु अंतर्धान पावल्यावर ब्रह्मदेव देवांना बोलला. ब्रह्मदेव म्हणाला, 'विष्णु मनुष्यरूपानें रघूच्या कुलांत जन्माला येणार आहेत. २९ तुम्ही सर्वांनीही वानरामध्यें आपापले अंशावतार उत्पन्न करावे. आणि जोंपर्यंत भूतलावर विष्णु राहतील, तोंपर्यंत त्यांचें साहाय्य तुम्ही करावें.' ३० याप्रमाणें देवांना आज्ञा करून आणि पृथ्वीला धीर देऊन काळजींतून सुटलेला ब्रह्मदेव आपल्या स्थानीं गेला व सुखानें राहिला. ३१ सर्व देव युद्ध करणाऱ्या महापराक्रमी वानरांची रूपें घेऊन, पर्वत

१ हा एक प्रख्यात ऋषि होऊन गेला त्याला अदिति आणि दिति अशा दोन स्त्रिया होत्या. अदितीचे ते देव व दितीचे ते दैत्य. २ रघुवंशातील एक प्रख्यात राजा हा अजाचा पुत्र व रामाचा बाप याची राजधानी अयोध्या

मितस्ततो हरेः । महाबलाः पर्वतवृक्षयोधिनः प्रतीक्षमाणा भगवंतमीश्वरम् ॥ ३२ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे बालकांडे द्वितीयः सर्गः ॥ २ ॥

## बालकांड, सर्ग तिसरा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ अथ राजा दशरथः श्रीमान्सत्यपरायणः । अयोध्याधिपतिर्वीरः सर्वलोकेषु विश्रुतः ॥ १ ॥ सोऽनपत्यत्वदुःखेन पीडितो गुरुमेकदा । वसिष्ठं स्वकुलाचार्यमभिवाद्येदमब्रवीत् ॥ २ ॥ स्वामिन्पुत्राः कथं मे स्युः सर्वलक्षणलक्षिताः । पुत्रहीनस्य मे राज्यं सर्वं दुःखाय कल्पते ॥ ३ ॥ ततोऽब्रवीद्वसिष्ठस्तं भविष्यंति सुतास्तव । चत्वारः सत्त्वसंपन्ना लोकपाला इवापराः ॥ ४ ॥ शांताभर्तारमानीय ऋष्यशृङ्गं तपोधनम् । अस्माभिः सहितः पुत्रकामेष्टिं शीघ्रमाचर ॥ ५ ॥ तथेति

आणि वृक्ष हीच शस्त्रें धारण करून, भगवान् ईश्वराला—विष्णूला—साहाय्य करण्यासाठीं म्हणून त्याची वाट पाहत वेगवेगळ्या ठिकाणी राहिले. ३२

**बालकांड, दुसरा सर्ग समाप्त.**

श्रीशंकर म्हणाला, ‘ जगतीतलावर सर्वत्र प्रसिद्धी पावलेला, वीर्यशाली, सत्यपरायण आणि श्रीमान् असा दशरथ नांवाचा अयोध्येचा राजा होऊन गेला. १ पोटीं संतान नाहीं या दुःखानें पीडित होत्साता एकदा स्वकुलोपाध्याय वसिष्ठमुनीला वंदन करून तो म्हणाला, २ ‘ महाराज ! सर्व शुभलक्षणांनी युक्त असे पुत्र मला कसे प्राप्त होतील ? पुत्राच्या अभावीं मला माझें सर्व राज्य दुःखाला कारण होत आहे. ’ ३ तेव्हां वसिष्ठ त्याला म्हणाला, ‘ हे राजा ! दुसरे इंद्रादि लोकपालच कीं काय असे तुला सद्गुणसंपन्न चार पुत्र होतील. ४ शांतेचा[1] पति जो तपोधन ऋष्यशृंग त्याला आणवून आम्हांसहवर्तमान लवकर पुत्रकामेष्टि यज्ञ कर.’ ५ ‘होय, करतों,’

१. शांता नावाची दशरथाला मुलगी होती. ती लहानपणापासून लोमपाद नांवाच्या राजाच्या येथे होती. पुढें ती ऋष्यशृंगऋषीची पत्नी झाली. हा ऋष्यशृंग विभांडक ऋषीचा पुत्र होता. तो हरिणीपासून जन्मला असून त्याच्या मस्तकावर एक लहानसें शृंग होतें, म्हणून त्याचें नाव ऋष्यशृग असें पडले, अशी पौराणिक कथा आहे. हा मोठा तपस्वी होता.

मुनिमानीय मंत्रिभिः सहितः शुचिः । यज्ञकर्म समारेभे मुनिभिर्वीतकल्मषैः ॥ ६ ॥ श्रद्धया हूयमानेऽग्नौ तप्तजांबूनदप्रभः । पायसं स्वर्णपात्रस्थं गृहीत्वोवाच हव्यवाट् ॥ ७ ॥ गृहाण पायसं दिव्यं पुत्रीयं देवनिर्मितम् । लप्स्यसे परमात्मानं पुत्रत्वेन न संशयः ॥ ८ ॥ इत्युक्त्वा पायसं दत्वा राज्ञे सोंऽतर्दधेऽनलः । ववंदे मुनिशार्दूलौ राजा लब्धमनोरथः ॥ ९ ॥ वसिष्ठऋष्यशृंगाभ्यामनुज्ञातो ददौ हविः । कौसल्यायै सकैकेय्यै अर्धमर्धं प्रयत्नतः ॥ १० ॥ ततः सुमित्रा संप्राप्ता जगृध्नुः पौत्रिकं चरुम् । कौसल्या तु स्वभागार्धं ददौ तस्यै मुदान्विता ॥ ११ ॥ कैकेयी च स्वभागार्धं ददौ प्रीतिसमन्विता । उपभुज्य चरुं सर्वाः स्त्रियो गर्भसमन्विताः ॥ १२ ॥ देवता इव रेजुस्ताः स्वभासा राजमंदिरे । दशमे मासि कौसल्या सुषुवे पुत्रमद्भुतम् ॥ १३ ॥ मधुमासे सिते पक्षे

असे दशरथ बोलला व मंत्रिमंडळासह जाऊन त्या मुनीला—ऋष्यशृंगाला—त्यानं आणविलें आणि शुद्ध होऊन अनेक पुण्यशील मुनीसह यज्ञकर्म आरंभिलें. ६ श्रद्धापूर्वक अग्नीत होम केला असतां तापलेल्या सुवर्णाप्रमाणें कांतिमान् अग्नि सुवर्णपात्रांत पायस घेऊन प्रगट झाला, आणि बोलला, ७ 'देवांनी निर्माण केलेला, आणि पुत्रप्राप्तीचें साधन असा हा दिव्य पायस घे. म्हणजे परमेश्वरच पुत्ररूपानें तुझे पोटीं येईल, यांत संशय नाहीं.' ८ असें म्हणून तो अग्नि राजाला पायस देऊन गुप्त झाला आणि राजा आपले मनोरथ पूर्ण झाले असें मानून त्या दोघां—वसिष्ठ व ऋष्यशृंग—मुनिश्रेष्ठांना वंदन करिता झाला. ९ नंतर वसिष्ठ आणि ऋष्यशृंग यांचें अनुमोदन घेऊन त्या होमद्रव्याचे—पायसाचे—सारखे दोन भाग करून कौसल्या व कैकेयी या दोन राण्यांना ते देता झाला. १० मग त्या पुत्रदायक चरूचा आपणालाही लाभ व्हावा, अशी इच्छा करून सुमित्रा तेथें आली. तेव्हां कौसल्येनें आपल्या भागांतील निम्मे भाग मोठ्या आनंदानें तिला—सुमित्रेला—दिला. ११ कैकेयीनेंही प्रेमयुक्त अंतःकरणानें आपल्या भागांतील निम्मे भाग तिला दिला. नंतर त्या सर्व स्त्रिया तें पायसान्न खाऊन गर्भ धारण करत्या झाल्या. १२ अशा रीतीनें राजवाड्यांत त्या तीनही स्त्रिया आपल्या दिव्य कांतीनें देवतांप्रमाणें शोभत्या झाल्या. मग दहाव्या मासी कौसल्या अद्भुत पुत्राला जन्म देती झाली. १३ हा जन्म चैत्र महिन्यांत, शुक्लपक्षामध्यें,

**नवम्यां कर्कटे शुभे । पुनर्वस्वृक्षसहिते उच्चस्थे ग्रहपंचके ॥ १४ ॥ मेषं पूषणि संप्राप्ते पुष्पवृष्टिसमाकुले । आविरासीज्जगन्नाथः परमात्मा सनातनः ॥ १५ ॥ नीलोत्पलदलश्यामः पीतवासाश्चतुर्भुजः । जलजारुणनेत्रांतः स्फुरत्कुंडलमंडितः ॥ १६ ॥ सहस्रार्कप्रतीकाशः किरीटी कुंचितालकः । शंखचक्रगदापद्मवनमालाविराजितः ॥ १७ ॥ अनुग्रहाख्यहृत्स्थेंदुसूचकस्मितचंद्रिकः । करुणारससंपूर्णविशालोत्पललोचनः । श्रीवत्सहारकेयूरनूपुरादिविभूषणः ॥ १८ ॥ दृष्ट्वा तं परमात्मानं कौसल्या विस्मयाकुला । हर्षाश्रुपूर्णनयना नत्वा प्रांजलिरब्रवीत् ॥ १९ ॥ ॥ कौसल्योवाच ॥ देवदेव नमस्तेऽस्तु शंखचक्रगदाधर । परमात्माऽच्यु-**

नवमी तिथीला, पुनर्वसुयुक्त शुभकारक कर्कलग्नीं पांचं ग्रह उच्च स्थानी असता झाला. १४ त्या वेळी सूर्य मेष राशीला होता, व पुष्पवृष्टि एकसारखी होत होती अशा रीतीनें जन्ममरणरहित जगन्नाथ परमात्मा प्रगट झाला. १५ नीलकमलाच्या पानाप्रमाणें श्यामवर्णाची, पीतांबरधारी, चतुर्भुज, नेत्रांचे उपांतभागीं कमलासमान तांबूस वर्णाची, देदीप्यमान कुंडलांनी शोभणारी अशी ती मूर्ति होती. १६ त्या मूर्तीचें तेज हजारों सूर्यांप्रमाणें असून मस्तकावर किरीट धारण केलेला होता. केश कुरळे होते. चारी हातांतील शंख, चक्र, गदा, कमल आणि कंठांतील वनमाला यांयोगेंकरून त्या मूर्तीला विशेषच शोभा आली होती. १७ त्या मूर्तीची हास्यमुद्रा होती, त्यामुळें तें हास्य नसून चित्तांतील भक्तांवरील अनुग्रहरूपी चंद्राचें चांदणेंच की काय असें वाटत होतें. कमलासारखे विशालनेत्र दयारूपी रसानें भरलेले होते, आणि श्रीवत्स, हार, पैंजणें इत्यादि भूषणें त्या शरीरावर विलसत होतीं. १८ त्या परमात्म्याला पाहून कौसल्या आश्चर्यचकित होऊन गेली, हर्षाश्रूंनीं तिचे डोळे भरून आले. तिनें नमस्कार करून व हात जोडून बोलण्यास आरंभ केला. १९ कौसल्या म्हणाली, 'शंख, चक्र, गदा धारण करणाऱ्या देवदेवा ! तुला नमस्कार असो. तूं परमात्मा, स्वस्वरूपापासून कधींही च्युत न होणारा, असा आहेस. तुझ्या गुणाना अंत

१. पाच ग्रह म्हणजे रवि, मंगळ, गुरु, शुक्र आणि शनि, हे होत व त्यांचीं उच्चस्थानें क्रमानें म्हटलीं म्हणजे मेष, मकर, कर्क, मीन आणि तूळ राशि हीं होत.

तोऽनंतः पूर्णस्त्वं पुरुषोत्तमः ॥ २० ॥ वदंत्यगोचरं वाचा बुद्ध्यादीनामतींद्रियम् । त्वां वेदवादिनः सत्तामात्रं ज्ञानैकविग्रहम् ॥ २१ ॥ त्वमेव मायया विश्वं सृजस्यवसि हंसि च । सत्त्वादिगुणसंयुक्तस्तुय एवामलः सदा ॥ २२ ॥ करोषीव न कर्ता त्वं गच्छसीव न गच्छसि । शृणोषि न शृणोषीव पश्यसीव न पश्यसि ॥ २३ ॥ अप्राणो ह्यमनाः शुद्ध इत्यादि श्रुतिरब्रवीत् । समः सर्वेषु भूतेषु तिष्ठन्नपि न लक्ष्यसे ॥ २४ ॥ अज्ञानध्वांतचित्तानां व्यक्त एव सुमेधसाम् । जठरे तव दृश्यंते ब्रह्मांडाः परमाणवः ॥ २५ ॥ त्वं ममोदरसंभूत इति

नाहीं, सर्वत्र व्यापून राहिलेला असा तूं पुरुषोत्तम आहेस. २० वेदवेत्ते म्हणतात कीं, 'तूं वाणीला आणि बुद्ध्यादिकांना न समजणारा असा आहेस.' सत्ता हेंच तुझें रूप, व ज्ञान हेंच तुझें शरीर आहे. २१ तूंच एकटा सत्त्वादि गुणांनी युक्त होत्साता मायेच्या योगेंकरून विश्वाची उत्पत्ति, पालन आणि संहार करतोस. तरीही तूं सदा चवथाच—ब्रह्मा, विष्णु, महेश यांहून वेगळाच, मायादोषरहित असा आहेस. २२ तूं क्रिया करतोस, गमन करितोस, ऐकतोस, पहातोस असें दिसतें, तरी तूं कांहींच करीत नाहींस, गमन करीत नाहींस, ऐकत नाहींस, कीं पाहत नाहींस. २३ वेदांनी असें म्हटलें आहे कीं, 'तूं आत्मस्वरूपी आहेस, त्या आत्मस्वरूपी प्राणही नाहीं व मनही नाहीं तें शुद्ध आहे.' तूं सर्व भूतांचे ठिकाणीं समदृष्टि असूनही, अज्ञानरूपी अंधकाराचें आवरण असलेल्यांना समजला जात नाहींस. ज्ञानी पुरुषांना मात्र तूं स्पष्टपणें अनुभवाला येतोस, तुझ्या उदरांत सारीं ब्रह्मांडें परमाणूंप्रमाणें दिसतात. २४,२५ हे रघूत्तमा ! तूं माझ्या उदरीं आल्यानें जगात

१ पुरुषोत्तम कोणाला म्हणावें तें गीतेंत खालीलप्रमाणें वर्णिलें आहे.—'यस्मात् क्षरमतीतोहमक्षरादपि चोत्तम । अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः' ॥ २. कृष्णावतारीं एकदा कृष्णानें माती खाल्ली, अशा कागाळी आल्यावरून यशोदेनें त्याला तोंड उघडण्याला सांगितलें त्या वेळेस त्याच्या तोंडांत तिला सर्व सृष्टि दिसली, अशी पौराणिक कथा आहे. त्या कथेला अनुसरून भगवंताच्या पोटांत अनेक ब्रह्मांडें सांठविलीं गेल्याचें अनेक कवींनीं वर्णिलें आहे. (१) 'अजांडशतकोटि ज्या उदरिं सर्वदा नांदवा' ॥ केकावलि १७. (२) 'किडे उंबराच्या फळामाजि पोटीं । असे अंडकोटींमध्ये जीव कोटी' ॥ वामन, ब्रह्मस्तुति ३६. (३) 'अनंत ब्रह्मांडें ज्याचे पोटीं । तो हा सांवळा जगजेठी' ॥—अमृतराय.

लोकान्विडंबसे । भक्तेषु पारवश्यं ते दृष्टं मेऽद्य रघूत्तम ॥ २६ ॥ संसारसागरे मग्ना पतिपुत्रधनादिषु । भ्रमामि मायया तेऽद्य पादमूलमुपागता ॥ २७ ॥ देव तद्रूपमेतन्मे सदा तिष्ठतु मानसे । आवृणोतु न मां माया तव विश्वविमोहिनी ॥ २८ ॥ उपसंहर विश्वात्मन्नदो रूपमलौकिकम् । दर्शयस्व महानंद बालभावं सुकोमलम् ॥ २९ ॥ ललितालिंगनालापैस्तरिष्याम्युत्कटं तमः ॥ ॥ श्रीभगवानुवाच ॥ यद्यदिष्टं तवास्त्यंब तत्तद्भवतु नान्यथा ॥ ३० ॥ अहं तु ब्रह्मणा पूर्वं भूमेर्भारापनुत्तये । प्रार्थितो रावणं हंतुं मानुषत्वमुपागतः ॥ ३१ ॥ त्वया दशरथेनाहं तपसाऽऽराधितः पुरा । मत्पुत्रत्वाभिकांक्षिण्या तथा कृतमनिंदिते ॥ ३२ ॥ रूपमेतत्त्वया दृष्टं प्राक्तनं तपसः फलम् । मद्दर्शनं विमोक्षाय कल्पते ह्यन्यदुर्लभम् ॥ ३३ ॥ संवादमावयोर्यस्तु पठेद्वा शृणुयादपि ।

प्रसिद्ध करीत आहेस. यावरून भक्तांच्या ठिकाणीं तुझी असलेली परवशता आज मला दिसून आली आहे. २६ संसारसमुद्रांत पति, पुत्र, द्रव्य इत्यादिकांमध्यें मग्न होत्साती मी तुझ्या मायेच्या योगानें भ्रमण करीत आहें. आज मी तुझ्या पायांच्या जवळ प्राप्त झालें आहें. २७ हे देवा ! हें तुझें स्वरूप सर्वदा माझ्या अंतःकरणांत राहूं दे. जगाला मोह घालणारी तुझी माया मला कधींही मोह न घालो. २८ हे विश्वात्म्या ! हें तुझें अलौकिक रूप आतां आंवरून धर. हे महानंदरूपा! अतिशय कोमल असें बालरूप धारण कर आणि तें मला दाखीव. २९ तुझ्याशी प्रेमयुक्त भाषण आणि आलिंगन यांच्या योगें अज्ञानांधकार मी तरून जाईन.' श्रीभगवान् म्हणाला, 'आई ! तुला जें जें इष्ट आहे, तें तें सर्व होईल, विपरीत कांहींही होणार नाहीं. ३० पूर्वी पृथ्वीचा भार हरण करण्यास्तव रावणाला मारावें, म्हणून ब्रह्मदेवानें माझी प्रार्थना केली होती, आणि म्हणूनच मी मनुष्यरूप धारण करून आलों आहें. ३१ हे अनिंदिते !—कोठेंही नांव ठेवण्यास जागा नाहीं अशा कौसल्ये ! मी तुमच्या पोटीं यावें अशी इच्छा धारण करून तूं आणि दशरथानें पूर्वी तपस्या करून मला संतुष्ट केलें, आणि मींही तसें केलें—तुमचे मनोरथ पूर्ण केले. ३२ हें माझें रूप तुझ्या दृष्टीस पडलें, हें तुझ्या पूर्वजन्मींच्या तपाचें फल होय. हें दुसऱ्याला मिळणें शक्य नाहीं. माझें दर्शन मोक्षप्राप्तीला मिळवून देणारें आहे. ३३ जो कोणी हा आम्हां दोघांचा

स याति मम सारूप्यं मरणे मत्स्मृतिं लभेत् ॥ ३४ ॥ इत्युक्त्वा मातरं रामो बालो भूत्वा रुरोद ह । बालत्वेऽपींद्रनीलाभो विशालाक्षोऽतिसुंदरः ॥ ३५ ॥ बालारुणप्रतीकाशो लालिताखिललोकपः । अथ राजा दशरथः श्रुत्वा पुत्रोद्भवोत्सवम् । आनंदार्णवमग्नोऽसावाययौ गुरुणा सह ॥३६॥ रामं राजीवपत्राक्षं दृष्ट्वा हर्षाश्रुसंप्लुतः । गुरुणा जातकर्माणि कर्तव्यानि चकार सः ॥ ३७ ॥ कैकेयी चाथ भरतमसूत कमलेक्षणा । सुमित्रायां यमौ जातौ पूर्णेंदुसदृशाननौ ॥ ३८ ॥ तदा ग्रामसहस्राणि ब्राह्मणेभ्यो मुदा ददौ । सुवर्णानि च रत्नानि वासांसि सुरभीः शुभाः ॥ ३९ ॥ यस्मिन् रमंते मुनयो विद्ययाऽज्ञानविप्लवे । तं गुरुः प्राह रामेति रमणाद्राम इत्यपि ॥४०॥ भरणाद्भरतो नाम लक्ष्मणं लक्षणान्वितम् । शत्रुघ्नं

संवाद पाठ करील किंवा ऐकेल, त्याला मुक्ति[1] मिळून मरणकाळीं माझें स्मरण होईल.' ३४ असें मातेला बोलून आणि बालरूप धारण करून रामानें रडण्यास प्रारंभ केला. त्या बालपणांत देखील त्याची कांति इंद्रनीलमण्याप्रमाणें होती. त्याचे डोळे विशाल होते. त्याचें स्वरूप अत्यंत सुंदर होतें. नूतन उगवलेल्या सूर्याप्रमाणें तो शोभत होता. त्याला पाहून इंद्रादि सकल लोकपालांना आनंद झाला. पुढें दशरथ राजा, पुत्रजन्माची आनंदवार्ता ऐकून आनंदसागरांत मग्न होत्साता, गुरु वसिष्ठाला घेऊन रामाला पाहण्याला आला. ३५, ३६ कमलपत्राप्रमाणें डोळे असणाऱ्या त्या रामाला पाहून आनंदाश्रूंनीं दशरथाचे डोळे भरून आले. त्यानें गुरूकरवीं—वसिष्ठाकरवीं—जातक वगैरे कर्तव्य असे सर्व संस्कार करविले. ३७ इतक्यांत कमलनयना कैकेयी भरत नांवाच्या पुत्राला जन्म देती झाली, आणि सुमित्रेला पूर्णचंद्राप्रमाणें मुखें धारण करणारी अशी दोन जुळीं मुलें झालीं. ३८ तेव्हां (दशरथानें) आनंदानें ब्राह्मणांना हजारों गांव दान दिले, त्याचप्रमाणें सोन्याचे अलंकार, रत्नें, वस्त्रें आणि चांगल्या गाईही दिल्या. ३९ ज्ञानाच्या योगें अज्ञानाचा नाश केल्यानंतर ज्याच्या ठिकाणीं मुनिजन रममाण होतात, असा तो (वडील मुलगा) सर्वांना रमविणारा असल्यामुळें गुरूनें—वसिष्ठानें—त्याचें नांव राम असें ठेविलें. ४० सर्वांचें भरण—पोषण करणाऱ्या अर्थानें (दुसऱ्या मुलाचें) भरत असें नांव ठेविलें (तिसऱ्याला) चांगल्या लक्षणांनीं युक्त म्हणून लक्ष्मण असें नांव दिलें,

१ मुक्तीचे प्रकार चार आहेत:—सलोकता, समीपता, स्वरूपता व सायुज्यता.

**शत्रुहंतारमेवं गुरुरभाषत ॥ ४१ ॥ लक्ष्मणो रामचंद्रेण शत्रुघ्नो भरतेन च । द्वंद्वीभूय चरंतौ तौ पायसांशानुसारतः ॥ ४२ ॥ रामस्तु लक्ष्मणेनाथ विचरन्बाललीलया । रमयामास पितरौ चेष्टितैर्मुग्धभाषितैः ॥४३॥ भाले स्वर्णमयाश्वत्थपर्णमुक्ताफलप्रभम् । कंठे रत्नमणिव्रातमध्यद्वीपिनखांचितम् ॥ ४४ ॥ कर्णयोः स्वर्णसंपन्नरत्नार्जुनशलाटुकम् । सिंजानमणिमंजीरकटिसूत्रांगदैर्वृतम् ॥ ४५ ॥ स्मितवक्त्राल्पदशनमिंद्रनीलमणिप्रभम् । अंगणे रिंगमाणं तं तर्णकाननु सर्वतः । दृष्ट्वा दशरथो राजा कौसल्या मुमुदे तदा ॥ ४६ ॥ भोक्ष्यमाणो दशरथो राममेहीति चासकृत्। आह्वयत्यतिहर्षेण प्रेम्णा नायाति लीलया ॥ ४७ ॥ आनयेति च**

आणें ( चवथ्याला ) शत्रूचा हन्ता—वध करणारा म्हणून शत्रुघ्न असें नांव याजलें. ४१ पायसांतील अंशाच्या अनुरोधनें लक्ष्मण रामचंद्राच्या समागमांत व शत्रुघ्न भरताच्या समागमांत, असे ते जोडीजोडीनें फिरत असत. ४२ लक्ष्मणासहवर्तमान सर्वत्र फिरणारा राम आपल्या बाललीलांनी, नानाविध चेष्टांनी, आणि बोबड्या भाषणांनी मातापितरांस रमविता झाला. ४३ त्याचे मस्तकाचे ठिकाणीं सोन्याचें पिंपळपान बांधलें होतें, त्याला मोत्यें लावलीं होती, त्यांची कांति त्याच्या शरीरावर झळकत होती. कंठामध्यें रत्नांचा व मोत्यांचा हार असून त्यामध्यें वाघनख घातलें होत, त्यामुळें त्याला विशेषच शोभा आली होती. ४४ कानांमध्यें अर्जुनवृक्षाच्या फळासारखे सोन्यांत मढविलेल्या रत्नांचे डूल होते. पायांतील आणि कमरेंतील घागऱ्या, त्याचप्रमाणें हातांतील बाहुभूषणें यांतील रत्नें खुळखुळ वाजत असत. ४५ त्याच्या हास्ययुक्त मुखांत लहान लहान दांत दिसत होते त्याची अंगकांति इंद्रनील मण्याप्रमाणें होती. अंगणामध्यें वासरांच्या मागून चारी बाजूंनी त्याला रांगताना पाहून दशरथ राजा व कौसल्या यांना अत्यानंद होत असे. ४६ दशरथ जेवीत असतांना वारंवार रामाला 'ये ये' म्हणून अतिहर्षानें बोलावीत असे. परंतु खेळण्याच्या नादांत तो येत नसे. ४७ अशा वेळीं 'त्याला घेऊन ये' म्हणून

१. पायसाचे विभाग केले, तेव्हां सुमित्रा तेथें नव्हती. ती आली तेव्हा कौसल्येनें आणि कैकेयीनें आपापल्या भागातून अर्धा अर्धा भाग तिला दिला. याप्रमाणें सुमित्रेला दोन भाग मिळून दोन पुत्र झाले. कौसल्येच्या भागापासून झाला, तो लक्ष्मण रामाचा अनुचर झाला, व कैकेयीच्या भागापासून झाला, तो शत्रुघ्न भरताचा अनुचर झाला.

कौसल्यामाह सा सस्मिता सुतम् । धावत्यपि न शक्नोति स्प्रष्टुं योगि-
मनोगतिम् ॥ ४८ ॥ प्रहसन्स्वयमायाति कर्दमांकितपाणिना । किंचिद्-
गृहीत्वा कवलं पुनरेव पलायते ॥ ४९ ॥ कौसल्या जननी तस्य मासि
मासि प्रकुर्वती । वायनानि विचित्राणि समलंकृत्य राघवम् ॥ ५० ॥
अपूपान्मोदकान्कृत्वा कर्णशष्कुलिकास्तथा । कर्णपूरांश्च विविधान् वर्ष-
वृद्धौ च वायनम् ॥५१॥ गृहकृत्यं तया त्यक्तं तस्य चापल्यकारणात् ।
एकदा रघुनाथोऽसौ गतो मातरमंतिके ॥ ५२ ॥ भोजनं देहि मे मातर्न
श्रुतं कार्यसक्तया । ततः क्रोधेन भांडानि लगुडेनाहनत्तदा ॥ ५३ ॥
शिक्यस्थं पातयामास गव्यं च नवनीतकम् । लक्ष्मणाय ददौ रामो
भरताय यथाक्रमम् ॥ ५४ ॥ शत्रुघ्नाय ददौ पश्चाद्दधि दुग्धं तथैव च ।
सूदेन कथिते मात्रे हास्यं कृत्वा प्रधावति ॥ ५५ ॥ आगतां तां विलो-
क्याथ ततः सर्वैः पलायितम् । कौसल्या धावमानापि प्रस्खलंती पदे

राजा कौसल्येला सांगत असे, आणि ती हासत हासत त्याच्या मागे धावत जात असे; परंतु योग्यांनाच केवळ योगसाधनानें आकळला जाणारा तो परमात्मा तिच्या हातीं लागत नसे ४८ केव्हां केव्हां हंसत चिखलानें भरलेल्या हातांनीं स्वतःच होऊन तो येत असे आणि एखादा घांस घेऊन पळून जात असे. ४९ त्याची आई कौसल्या प्रत्येक महिन्याला वाढदिवशी त्याला नटवून वेगवेगळ्या प्रकारचीं वायनें देत असे. ५० अशा वाढदिवशी कधीं अनरसे, कधीं मोदक, कधीं करंज्या, कधीं कान्हवले करून ती वायनें देत असे. ५१ त्याच्या अतिचपळपणामुळें घरांतील काम तिनें सोडून दिलें होतें. कोणी एके वेळीं हा रघुनाथ—श्रीराम—आईजवळ गेला आणि तिला म्हणाला ‘ आई ! मला जेवायाला घाल. ’ परंतु ती कांहीं कामांत गुंतली असल्यामुळें तिला तें ऐकूं आलें नाहीं. त्यामुळें क्रोधानें लांकूड घेऊन त्यानें भांडीं फोडली, शिंक्यांवरचें दहीं, दूध, लोणी पाडलें, आणि प्रथमतः लक्ष्मणाला तें देऊन नंतर भरताला आणि मग शत्रुघ्नाला देता झाला. स्वैंपाक्यानें आईला—कौसल्येला—ही गोष्ट सांगतांच राम हांसून पळूं लागला. ५२, ५३, ५४, ५५ नंतर आई आली असें पाहतांच ती सगळीं मुलें पळालीं. कौसल्या त्यांच्या मागें

१. ५१ ते ५८ श्लोकापर्यंत केलेलें रामाच्या बालपणच्या क्रीडाचें वर्णन वाचून भागवतादि पुराणांत वर्णिलेल्या यशोदागृहींच्या कृष्णाच्या बाललीलाची आठवण झाल्यावांचून राहत नाहीं.

पदे ॥ ५६ ॥ रघुनाथं करे धृत्वा किंचिन्नोवाच भामिनी । बालभावं समाश्रित्य मंदं मंदं रुरोद ह ॥ ५७ ॥ ते सर्वे लालिता मात्रा गाढमालिंग्य यत्नतः । एवमानंदसंदोहजगदानंदकारकः ॥ ५८ ॥ मायाबालवपुर्धृत्वा रमयामास दंपती । अथ कालेन ते सर्वे कौमारं प्रतिपेदिरे ॥५९॥ उपनीता वसिष्ठेन सर्वविद्याविशारदाः । धनुर्वेदे च निरताः सर्वशास्त्रार्थवेदिनः ॥ ६० ॥ बभूवुर्जगतां नाथा लीलया नररूपिणः । लक्ष्मणस्तु सदा राममनुगच्छति सादरम् ॥ ६१ ॥ सेव्यसेवकभावेन शत्रुघ्नो भरतं तथा । रामश्चापधरो नित्यं तूणीबाणान्वितः प्रभुः ॥ ६२ ॥ अश्वारूढो वनं याति मृगयायै सलक्ष्मणः । हत्वा दुष्टमृगान्सर्वान्पित्रे सर्वं न्यवेदयत्

धावता धावता पावलापावली अडखळूं लागली ५६ राम सांपडल्यावर तिनें त्याला हातीं धरिलें, तरी त्याला काहीच बोलली नाहीं. परंतु राम बालभावाचा आविर्भाव आणून हळूहळू रडूं लागला ५७ तेव्हा कौसल्येनें त्या सर्वांना घट्ट पोटाशीं धरून यत्नपूर्वक समजाविलें. अशा रीतीनें आनंदाचा प्रत्यक्ष ठेवाच असा सर्व जगाला आनंद देणारा तो श्रीरामचंद्र मायेच्या योगानें बालरूप धारण करून त्या दोघांना—दशरथ व कौसल्या यांना—रमविता झाला. नंतर कालेंकरून तीं सर्व मुलें कौमार्यावस्थेला येऊन पोंचलीं. ५८,५९ वसिष्ठाकडून उपनयन-संस्कार करविल्यावर ते चौघेही सर्व विद्यांमध्यें निष्णात झाले. धनुर्वेदाची यांना विशेष आवड लागली. सर्व शास्त्रांतील तत्त्वार्थ त्यांना उत्तम प्रकारें कळूं लागले ६० लीलेकरून त्यांनी नररूप धारण केलीं होतीं, तरी ते वस्तुतः सर्व जगाचे नाथच होते. लक्ष्मण सर्वदा रामाच्या मागून आदरपूर्वक जात असे. ६१ त्याचप्रमाणें भरत हा धनी, आणि मी सेवक, हा भाव मनांत ठेवून शत्रुघ्न भरताच्या पाठीमागें सर्वदा असे. राम धनुष्य व बाणयुक्त भाता धारण करून लक्ष्मणासहवर्तमान घोड्यावर बसून शिकारीला जात असे, व तेथें दुष्ट पशूंना ठार मारून घरीं आल्यावर तें सर्व बापाला अर्पण करीत असे. ६२,६३

१ जन्मापासून सात वर्षांच्या आंतील वय. २ मौंजीबंधनसंस्कार हा संस्कार ब्राह्मणाचा आठव्या वर्षी, राजांचा अकराव्या वर्षी व वैश्याचा बाराव्या वर्षी करण्यात येतो 'गर्भाष्टमेऽब्दे कुर्वीत ब्राह्मणस्योपनायनम्। गर्भादेकादशे राज्ञो गर्भात्तु द्वादशे विशः'. ३. चौदा विद्या-—'षडंगमिश्रिता वेदा धर्मशास्त्रं पुराणकम्। मीमांसा तर्कमपि च एता विद्याश्चतुर्दश'॥ ४. धनुर्वेद-धनुर्विद्या हा चार उपवेदांपैकीं एक आहे

॥ ६३ ॥ प्रातरुत्थाय सुस्नातः पितरावभिवाद्य च । पौरकार्याणि सर्वाणि करोति विनयान्वितः ॥ ६४ ॥ बंधुभिः सहितो नित्यं भुक्त्वा मुनिभिरन्वहम् । धर्मशास्त्ररहस्यानि शृणोति व्याकरोति च ॥६५॥ एवं परात्मा मनुजावतारो मनुष्यलोकाननुसृत्य सर्वम् । चक्रेऽविकारी परिणामहीनो विचार्यमाणे न करोति किंचित् ॥ ६६ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे बालकांडे ततीयः सर्गः ॥ ३ ॥

## बालकांड, सर्ग चवथा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ कदाचित्कौशिकोऽभ्यागादयोध्यां ज्वलनप्रभः । द्रष्टुं रामं परात्मानं जातं ज्ञात्वा स्वमायया ॥ १ ॥ दृष्ट्वा दश-

श्रीराम पहाटेला उठून आणि स्नान करून प्रथमतः आईबापाना वंदन करी आणि नंतर सर्व पौरकार्य करण्याकरिता मोठ्या विनयपूर्वक बसत असे. ६४ बंधुसहवर्तमान प्रत्येक दिवशीं अनेक मुनींना बरोबर घेऊन जेवायाचें आणि नंतर धर्मशास्त्रातील रहस्यांचें श्रवण व विवरण करायाचें, असा त्याचा नित्याचा प्रघात होता. ६५ अशा प्रकारें मनुष्याचा अवतार घेऊन, ज्याला विकारही नाहीं व नाशही नाहीं, अशा त्या परात्म श्रीरामानें मनुष्याप्रमाणें वागून सर्व प्रकारच्या लीला केल्या. वास्तविक विचार केला असतां तो कांहींच करीत नाहीं. ६६

**बालकांड, तिसरा सर्ग समाप्त**

महादेव म्हणाला, "( हे पार्वति ! ) एकदां अग्नीसारखा तेजस्वी विश्वामित्र ऋषि, परमेश्वर आपल्याच मायेनें राम अवतार धारण करून ( पृथ्वीवर ) उत्पन्न झाला आहे, हें जाणून त्याला भेटण्याकरिता म्हणून अयोध्येला आला. १ त्याला पाहून

१. विश्वामित्र हा एक प्रसिद्ध ऋषि होऊन गेला तो जातीनें क्षत्रिय असून कान्यकुब्ज देशाचा राजा होता. एकदा शिकारीच्या निमित्तानें फिरत असतां हा वसिष्ठाच्या आश्रमाला आला. तेथें इच्छित मनोरथ पुरविणारी कामधेनु पाहून तिचा अभिलाष त्याला झाला. कामधेनुप्रीत्यर्थ वाटेल तें देण्यास विश्वामित्र तयार झाला, परंतु वसिष्ठ कांहीं कबूल होईना. शेवटीं बळजबरीनें तिला नेण्याचा निश्चय त्यानें केला. परंतु त्यातही त्याचाच पराजय झाला. तेव्हां ब्रह्मतेजापुढें क्षात्रतेज टिकणारें नाहीं, हें लक्ष्यात आणून ती शक्ति मिळविण्याकरिता त्यानें उग्र तपश्चर्या केली, आणि शेवटीं आपणांस ऋषि, राजर्षि, महर्षि आणि ब्रह्मर्षि म्हणवून घेतलें.

रथां राजा प्रत्युत्थायाचिरेण तु । वसिष्ठेन समागम्य पूजयित्वा यथा-
विधि ॥ २ ॥ अभिवाद्य मुनिं राजा प्रांजलिर्भक्तिनम्रधीः । कृतार्थोऽ-
स्मि मुनींद्राहं त्वदागमनकारणात् ॥ ३ ॥ त्वद्विधा यद्गृहं यांति तत्रैवा-
यांति संपदः । यदर्थमागतोऽसि त्वं ब्रूहि सत्यं करोमि तत् ॥ ४ ॥
विश्वामित्रोऽपि तं प्रीतः प्रत्युवाच महामतिः । अहं पर्वणि संप्राप्ते दृष्ट्वा
यष्टुं सुरान्पितॄन् ॥ ५ ॥ यदाऽरभे तदा दैत्या विघ्नं कुर्वंति नित्यशः ।
मारीचश्च सुबाहुश्चापरे चानुचरास्तयोः ॥ ६ ॥ अतस्तयोर्वधार्थाय ज्येष्ठं
रामं प्रयच्छ मे । लक्ष्मणेन सह भ्रात्रा तव श्रेयो भविष्यति ॥ ७ ॥
वसिष्ठेन समामंत्र्य दीयतां यदि रोचते । पप्रच्छ गुरुमेकांते राजा
चिंतापरायणः ॥ ८ ॥ किं करोमि गुरो रामं त्यक्तुं नोत्सहते मनः ।
बहुवर्षसहस्रांते कष्टेनोत्पादिताः सुताः ॥ ९ ॥ चत्वारोऽमरतुल्यास्ते

दशरथ तावडतोब उठला, आणि वसिष्ठाच्या विचारें त्याची यथाविधि त्यानें आदर-
पूर्वक पूजा केली. २ हात जोडून राजानें मुनीला वंदन केलें, आणि भक्तीनें विश्वा-
मित्राच्या चरणी नम्र होऊन त्याला ( म्हणाला ), 'हे मुनिश्रेष्ठा! आपण आल्या-
कारणानें मी आज धन्य झालों आहें. ३ आपल्या सारखे ( थोर ) ज्या म्हणून घरी
जातात, तेथेंच सर्व संपत्ति प्राप्त होतात. आपण ज्या कार्याकरितां आलां आहां, तें
सांगा मी तें खरोखर करीन.' ४ त्यावर तो महाबुद्धिवान् विश्वामित्र ऋषि संतुष्ट
झाला आणि म्हणाला, 'पौर्णिमा आणि अमावास्या हे पर्वकाळ आले असतां जेव्हां
जेव्हां देवांना आणि पितरांना उद्देशून यज्ञकर्माला आरंभ करितों, तेव्हां तेव्हां दैत्य
मदोदित त्यामध्यें विघ्न करीत असतात. असे दैत्य म्हणजे मारीच, सुबाहु आणि
इतर त्यांचे सेवक हे होत. ५, ६ म्हणून त्या दोघाच्या वधाकरितां तुझा ज्येष्ठ(पुत्र)
राम व त्याच्या बरोबर बंधु लक्ष्मण त्या दोघांना मला दे. त्यांत तुझें कल्याण होणार
आहे. ७ वसिष्ठाचा विचार घेऊन तुला योग्य वाटल्यास तसें कर.' हें ऐकून राजा
दशरथाला मोठी काळजी लागली. नंतर त्यानें एकांतात वसिष्ठाची भेट घेतली आणि त्याला
—वसिष्ठाला—म्हणाला, ८ 'गुरो! काय करूं? माझें मन रामाला देण्याला धजत नाही.
कित्येक वर्षसहस्रानंतर हे मुलगे मोठ्या कष्टानं मला झाले आहेत. ९ हे माझे चार मुलगे

१ मारीच आणि सुबाहु हे दोन राक्षसबंधु होते

तेषां रामोऽतिवल्लभः । रामस्त्वितो गच्छति चेन्न जीवामि कथंचन॥१०॥
प्रत्याख्यातो यदि मुनिः शापं दास्यत्यसंशयः । कथं श्रेयो भवेन्मह्य-
मसत्यं चापि न स्पृशेत् ॥ ११ ॥ ॥ वसिष्ठ उवाच ॥ शृणु राजन्दे-
वगुह्यं गोपनीयं प्रयत्नतः । रामो न मानुषो जातः परमात्मा सनातनः
॥ १२ ॥ भूमेर्भारावताराय ब्रह्मणा प्रार्थितः पुरा । स एव जातो भवने
कौसल्यायां तवानघ ॥ १३ ॥ त्वं तु प्रजापतिः पूर्वं कश्यपो ब्रह्मणः
सुतः । कौसल्या चादितिर्देवमाता पूर्वं यशस्विनी । भवंतौ तप उग्रं वै
तेपाथे बहुवत्सरम् ॥ १४ ॥ अग्राम्यविषयौ विष्णुपूजाध्यानैकतत्परौ ।
तदा प्रसन्नो भगवान्वरदो भक्तवत्सलः ॥ १५ ॥ वृणीष्व वरमित्युक्ते
त्वं मे पुत्रो भवामल । इति त्वया याचितोऽसौ भगवान्भूतभावनः ॥
॥ १६ ॥ तथेत्युक्त्वाऽद्य पुत्रस्ते जातो रामः स एव हि । शेष-

प्रत्यक्ष देवांसारखे आहेत, त्यापेकी राम तर मला अत्यंत आवडता आहे. राम येथून जाईल, तर कांही केलें, तरी मी जीवंत रहाणार नाही. १० मुनीचें–विश्वामित्राचें–म्हणणें नाकबूल केलें, तर तो शाप देईल, यांत संशय नाही. तर काय केलें असतां माझें कल्याण होईल, आणि मला असत्य भाषणाचा स्पर्श होणार नाही बरें ?' ११ वसिष्ठ म्हणाला, 'राजा ! अत्यंत प्रयत्नपूर्वक गुप्त ठेवण्यासारखी अशी एक देवांची गुप्त गोष्ट तुला सागतों. राम हा मनुष्य नव्हे. तर हा जन्ममरणरहित साक्षात् परमात्माच होय. १२ हे निष्पाप ( राजा ) ! पूर्वी ब्रह्मदेवानें पृथ्वीचा भार दूर करण्याकरितां ह्याची प्रार्थना केली होती, आणि म्हणूनच हा तुझ्या घरीं कौसल्येच्या पोटीं आला आहे. १३ तूं पूर्वी ब्रह्मदेवाचा पुत्र कश्यप नांवाचा प्रजापति होतास व कौसल्या ही त्या वेळीं कीर्तिशाली अशी देवाची माता अदिति होती. १४ तुम्ही दोघांनीं निंद्य विषयांचा–ग्राम्य सुखाचा–त्याग करून विष्णूची आराधना आणि ध्यान यांत एकसारखे रममाण होऊन अनेक वर्षे भयंकर तप केलें. १५ त्या वेळी वरदायक असा भक्तवत्सल भगवान् प्रसन्न होऊन 'वर माग' असें म्हणाला, आणि 'हे निर्मलस्वरूपा, तूंच माझा पुत्र हो,' असा वर त्या जगाच्या सृष्टिस्थितिसंहार करणाऱ्याकडून तू मागून घेतला. १६ 'होय, तसें होईल,' असें म्हणून सध्यां तोच परमात्मा रामरूपानें तुझा पुत्र झाला आहे, आणि हे राजा ! शेष लक्ष्मणरूपानें

स्तु लक्ष्मणो राजन् राममेवान्वपद्यत ॥ १७ ॥ जातौ भरतशत्रुघ्नौ
शंखचक्रगदाभृतः । योगमायापि सीतेति जाता जनकनंदिनी ॥ १८ ॥
विश्वामित्रोऽपि रामाय तां योजयितुमागतः । एतद्गुह्यतमं राजन्न वक्त-
व्यं कदाचन ॥ १९ ॥ अतः प्रीतेन मनसा पूजयित्वाऽथ कौशिकम् । प्रेषयस्व
रमानाथं राघवं सहलक्ष्मणम् ॥ २० ॥ वसिष्ठेनैवमुक्तस्तु राजा दशरथ-
स्तदा । कृतकृत्यमिवात्मानं मेने प्रमुदितांतरः ॥ २१ ॥ आहूय रामरामेति
लक्ष्मणेति च सादरम् । आलिंग्य मूर्ध्न्यवघ्राय कौशिकाय समर्पयत् ॥ २२ ॥
ततोऽतिहृष्टो भगवान्विश्वामित्रः प्रतापवान् । आशीर्भिरभिनंद्याथ आगतौ
रामलक्ष्मणौ ॥ २३ ॥ गृहीत्वा चापतूणीरबाणखड्गधरौ ययौ । किंचि-
द्देशमतिक्रम्य राममाहूय भक्तितः ॥ २४ ॥ ददौ बलां चातिबलां विद्ये

रामामागून आला आहे. १७ भरतशत्रुघ्न देखील त्या शंखचक्रगदा धारण कर-
णाऱ्या ईश्वरापासूनच झाले आहेत ( भरत चक्राचा, व शत्रुघ्न गरुडाचा अवतार
होत ) योगमाया तर जनकाची[१] कन्या होऊन सीता या नावाने अवतीर्ण झाली
आहे १८ आणि विश्वामित्र मुनि तिच्याशीं रामाचा संबंध जोडण्याकरितां आला आहे.
हे राजा ! ही अत्यंत गुप्त गोष्ट आहे, केव्हांही कोठें बोलण्यासारखी नाहीं. १९ आतां
विश्वामित्र ऋषीची संतुष्टांत:करणानें पूजा करून लक्ष्मणासहवर्तमान लक्ष्मीपति
राघवाला त्याजबरोबर पाठीव. २० अशा रीतीनें वसिष्ठानें सांगितल्यावर दशरथ राजा
मनांत अत्यंत संतुष्ट झाला, आणि आपण आज कृतार्थ झालों असें मानिता झाला. २१
त्यानें आदरपूर्वक त्या दोघा मुलांना 'रामा ! रामा ! लक्ष्मणा !' म्हणून जवळ
बोलाविलें आणि मस्तकाचे ठिकाणी अवघ्राण करून—हुंगून—त्या दोघांनाही
कौशिकाच्या—विश्वामित्राच्या—स्वाधीन केलें २२ महासमर्थ विश्वामित्रानें राजाला
अनेक आशीर्वाद देऊन त्याचें अभिनंदन केल्यावर धनुष्य, बाण आणि खड्ग धारण
करणारे रामलक्ष्मण तेथें आले त्यांना बरोबर घेऊन कांहीं मार्गक्रमण केल्यावर
भक्तिपूर्वक रामाला जवळ बोलावून त्याला बला[२] आणि अतिबला ह्या नांवाच्या

१ जनक हा विदेह देशाचा मिथिला नगराचा राजा होता. हा सीतेचा पिता होय. तो आपली
निरभिमानवृत्ति, महाज्ञान आणि परम पावित्र्य यावरून प्रसिद्ध आहे. सीतेचा रामाकडून
त्याग झाल्यावर तो अत्यंत वैराग्यशील झाला, तेव्हांपासून त्याला 'विदेही' नाव पडलें.
२ बला, अतिबला यांविषयीं असें म्हटलें आहे —'गृहाण द्वे इमे विद्ये बलामतिबला तथा ।

द्वे देवनिर्मिते । ययोर्ग्रहणमात्रेण क्षुत्क्षामादि न जायते ॥ २५ ॥ तत उत्तीर्य गंगां ते ताटकावनमागमन् । विश्वामित्रस्तदा प्राह रामं सत्यपराक्रमम् ॥ २६ ॥ अत्रास्ति ताटका नाम राक्षसी कामरूपिणी । बाधते लोकमखिलं जहि तामविचारयन् ॥ २७ ॥ तथेति धनुरादाय सगुणं रघुनंदनः । टंकारमकरोत्तेन शब्देनापूरयद्वनम् ॥ २८ ॥ तच्छ्रुत्वाऽसहमाना सा ताटका घोररूपिणी । क्रोधसंमूर्च्छिता राममभिदुद्राव मेघवत् ॥२९॥ तामेकेन शरेणाशु ताडयामास वक्षसि । पपात विपिने घोरा वमंती रुधिरं बहु ॥ ३० ॥ ततोऽतिसुंदरी यक्षी सर्वाभरणभूषिता । शापा-

देवांनी निर्माण केलेल्या दोन विद्या विश्वामित्र देता झाला. ह्या दोन विद्या प्राप्त होतांच क्षुधेची पीडा वगैरे होत नसते. २३,२४,२५ नंतर ते सर्व गंगा उतरून ताटकेच्या अरण्यांत प्राप्त झाले. तेथें ज्याचा पराक्रम कधींही व्यर्थ जात नाहीं, अशा त्या रामाला त्या वेळीं विश्वामित्र बोलला २६ '( रामा ! ) येथें ताटका नांवाची, इच्छेस येईल तसें रूप धारण करणारी, राक्षसी आहे. ही सर्व लोकांना पीडा देत असते, तर कांहीएक विचार न करतां तिचा वध कर.' २७ त्यावर 'होय, तसें करितों,' असें म्हणून रामानें धनुष्यावर दोरी चढवून, त्याचा टणत्कार केला, आणि त्या शब्दानें तें सर्व अरण्य दणाणून सोडलें. २८ तो शब्द तिला सहन न होऊन, घोर रूप धारण करणारी ती क्रोधानें मूर्च्छित होऊन मेघाप्रमाणें गर्जना करीत रामावर धांवून आली. २९ तिला एकाच शरानें वक्षःस्थलावर रामानें प्रहार करतांच ती तत्काळ भडभडां रक्त ओकून त्या अरण्यांत पडली. ३० नंतर शापामुळें पिशाचयोनीप्रत गेलेली. पण आतां रामाच्या कृपेनें मुक्त झालेली. अशी ती आंगावर

न ते श्रमो जरा वाऽप्या भविता नागंवकृतम् ॥ न च सुप्तं प्रमत्तं वा धर्षयिष्यंति नैर्ऋता । न च ते सदृशो राम वीर्येणान्यो भविष्यति ॥ सदेवनरनागेषु लोकेष्विह पुमांस्त्रिषु । न सौभाग्ये न दाक्षिण्ये न बुद्धिश्रुतिपौरुषे ॥ नोत्तरे प्रतिपत्तव्ये त्वत्तुल्यो वा भविष्यति । एतद्विद्याद्वयं प्राप्य यशश्चाव्ययमाप्स्यसि ॥ बलामतिबला चैव ज्ञानविज्ञानमातरौ । क्षुत्पिपासे च ते राम नात्यर्थं पीडयिष्यतः ॥ जयश्च दुर्गकांतारप्रदेशेष्वटवीषु च । सारता त्रिषु लोकेषु गमिष्यसि च राघव' ॥—रामायण

१. ताटका ही सुकेतूची मुलगी व मारीचाची आई होती अगस्त्याच्या शापामुळें तिला राक्षसत्व प्राप्त झालें होतें तिच्यावर शस्त्र उचलण्यास प्रथमतः राम नाखुष होता, परंतु विश्वामित्रानें त्याचे संशयनिरसन केल्यावर त्यानें तिचा वध केला.

न्पिशाचतां प्राप्ता मुक्ता रामप्रसादतः ॥ ३१ ॥ नत्वा रामं परिक्रम्य गता रामाज्ञया दिवम् ॥३२॥ ततोऽतिहृष्टः परिरभ्य रामं मूर्धन्यवघ्राय विचिन्त्य किंचित । सर्वास्त्रजालं सरहस्यमंत्रं प्रीत्याऽभिरामाय ददौ मुनीन्द्रः ॥ ३३ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे बालकांडे चतुर्थः सर्गः ॥ ४ ॥

## बालकांड, सर्ग पांचवा.

श्रीमहादेव उवाच ॥ तत्र कामाश्रमे रम्ये कानने मुनिसंकुले । उषित्वा रजनीमेकां प्रभाते प्रस्थितः शनैः ॥ १ ॥ सिद्धाश्रमं गताः सर्वे सिद्धचारणसेवितम् । विश्वामित्रेण संदिष्टा मुनयस्तन्निवासिनः ॥२॥ पूजां च महतीं चक्रू रामलक्ष्मणयोर्द्रुतम् । श्रीरामः कौशिकं प्राह मुने दीक्षां प्रवि-

सर्व अलंकार घालून विभूषित हास्यमुखी यक्षिणीरूपे रामापुढें प्रगट झाली. तिने रामाला वंदन केलें, त्याला प्रदक्षिणा घातली, आणि त्याची आज्ञा घेऊन ती स्वर्गाला जाती झाली. ३१,३२ तव्हा त्या मुनिश्रेष्ठ विश्वामित्रानें अत्यंत आनंदित होऊन रामाला आलिंगन दिलें, मस्तकाच्या ठिकाणी हुंगिलें आणि कांही विचार करून रहस्यमंत्रासह सर्व अस्त्रविद्येचा उपदेश त्याला केला." ३३

**बालकांड, चवथा सर्ग समाप्त**

श्रीमहादेव म्हणाले, " ( पार्वति ! ) जेथें ताटकेचा वध झाला, तें रमणीय अरण्य ' कामाश्रम ' ह्या नावानें प्रसिद्ध आहे. तें अनेक मुनींचें वसतिस्थान आहे. या ठिकाणी ते तिघे जण एक रात्रभर राहून प्रभातकाळी हळूहळू पुढें जाण्यास निघाले. १ पुढें ते सिद्ध, चारण वगैरे देवयोनींनी वसतिस्थान केलेल्या अशा ' सिद्धाश्रम ' नामक विश्वामित्राच्या आश्रमाला येऊन पोंचले. तेथें राहणाऱ्या मुनींनी विश्वामित्राची आज्ञा होताच रामलक्ष्मणाचा तत्काल मोठा आदरसत्कार केला. मग श्रीराम विश्वामित्राला म्हणाला, ' मुने ' आतां आपण यज्ञदीक्षा धारण

१ प्रत्येक अस्त्राला कांहीना कांही रहस्य-गुप्त-मंत्र असावयाचाच. ते गुप्त मंत्रही विश्वामित्रानें शिकविले. २ ह्या सिद्धाश्रमाला ' वामनाश्रम ' असेंही नाव होतें.

श्यताम् ॥ ३ ॥ दर्शयस्व महाभाग कुतस्तौ राक्षसाधमौ । तथेत्युक्तो मुनिर्यष्टुमारेभे मुनिभिः सह ॥ ४ ॥ मध्याह्ने ददृशाते तौ राक्षसौ कामरूपिणौ । मारीचश्च सुबाहुश्च वर्षंतौ रुधिरास्थिनी ॥ ५ ॥ रामोऽपि धनुरादाय द्वौ बाणौ संदधे सुधीः । आकर्णांतं समाकृष्य विससर्ज तयोः पृथक् ॥ ६ ॥ तयोरेकस्तु मारीचं भ्रामयन् शतयोजनम् । पातयामास जलधौ तदद्भुतमिवाभवत् ॥ ७ ॥ द्वितीयोऽग्निमयो बाणः सुबाहुमजयत्क्षणात् । अपरे लक्ष्मणेनाशु हतास्तदनुयायिनः ॥ ८ ॥ पुष्पौघैराकिरन्देवा राघवं सहलक्ष्मणम् । देवदुंदुभयो नेदुस्तुष्टुवुः सिद्धचारणाः ॥ ९ ॥ विश्वामित्रस्तु संपूज्य पूजार्हं रघुनंदनम् । अंके निवेश्य चालिंग्य भक्त्या बाष्पाकुलेक्षणः ॥ १० ॥ भोजयित्वा सह भ्रात्रा रामं पक्कफलादिभिः । पुराणवाक्यैर्मधुरैर्निनाय दिवसत्रयम् ॥ ११ ॥ चतुर्थेऽहनि संप्राप्ते कौशिको राममब्रवीत् । रामराम महायज्ञं द्रष्टुं गच्छामहे वयम्

करावी. २, ३ हे महाभाग ! ते दोघे राक्षसाधम कोठें आहेत, ते मला दाखवा.' 'बरें आहे' असें म्हणून विश्वामित्रानें ऋषीसहवर्तमान यज्ञास आरंभ केला. ४ मध्यान्हसमयीं इच्छेनुसार शरीर धारण करणारे ते दोघे राक्षस—मारीच आणि सुबाहु—दिसले. ते रक्त आणि हाडें यांचा वर्षाव करीत होते. ५ इतक्यांत बुद्धिमान् रामानें धनुष्य घेऊन त्याला दोन बाण जोडले, आणि कर्णापर्यंत धनुष्याची दोरी ओढून ते बाण त्या दोघांवर वेगवेगळे सोडले. ६ त्यांपैकीं एका बाणानें मारीचाला शंभर योजनें—चारशें कोस—फिरवून शेवटीं समुद्रांत नेऊन टाकिलें हीं गोष्ट सर्वांस अत्यद्भुत अशी वाटली. ७ दुसऱ्या अग्निरूपी बाणानें एका क्षणांत सुबाहूला जिंकून टाकिलें, इतक्यांत इतरांना— या दोघांच्या सेवकांना— लक्ष्मणानें ठार केलें. ८ देवांनीं लक्ष्मणासह श्रीरामावर पुष्पवृष्टि केली. देवदुंदुभि वाजूं लागून सिद्धचारणांनीं त्या दोघांची स्तुति केली. ९ विश्वामित्राचे डोळे आनंदाश्रूंनीं भरून आले; त्यानें त्या पूज्य श्रीरामाची मोठ्या प्रेमानें पूजा केली, त्याला मांडीवर बसविलें आणि त्याचें चुंबन घेतलें. १० पक्क फळें वगैरे रामाला व लक्ष्मणाला खायाला त्यानें दिलीं आणि गोड अशा नाना प्रकारच्या पुराणांतील गोष्टी सांगून तेथें तीन दिवस घालविले. ११ चवथा दिवस प्राप्त झाल्यावर विश्वामित्र रामाला म्हणाला, 'रामा ! रामा ! आपण आतां महात्मा जन-

॥ १२ ॥ विदेहराजनगरे जनकस्य महात्मनः । तत्र माहेश्वरं चापमस्ति न्यस्तं पिनाकिना ॥ १३ ॥ द्रक्ष्यसि त्वं महासत्त्वं पूज्यसे जनकेन च । इत्युक्त्वा मुनिभिस्ताभ्यां ययौ गंगासमीपगम् ॥ १४ ॥ गौतमस्याश्रमं पुण्यं यत्राहल्यास्थिता तपः । दिव्यपुष्पफलोपेतपादपैः परिवेष्टितम् ॥१५॥ मृगपक्षिगणैर्हीनं नानाजंतुविवर्जितम् । दृष्ट्वोवाच मुनिं श्रीमान् रामो राजीवलोचनः ॥ १६ ॥ कस्यैतदाश्रमपदं भाति भास्वच्छुभं महत् । पत्रपुष्पफलैर्युक्तं जंतुभिः परिवर्जितम् ॥ १७ ॥ आह्लादयति मे चेतो भगवन् ब्रूहि तत्त्वतः ॥ १८ ॥ ॥ विश्वामित्र उवाच ॥ शृणु राम पुरा वृत्तं गौतमो लोकविश्रुतः । सर्वधर्मभृतां श्रेष्ठस्तपसाराधयन् हरिम् ॥ १९ ॥ तस्मै ब्रह्मा ददौ कन्यामहल्यां लोकसुंदरीम् । ब्रह्मचर्येण संतुष्टः शुश्रूषणपरायणाम् ॥ २० ॥ तया सार्धमिहावात्सीद्गौतमस्तपतां

कान्या विदेहदेशाच्या राजधानीला जाऊं या. तेथें एक मोठा यज्ञसमारंभ पाहण्याला आपणाला सांपडेल. तेथें शंकरानें आपलें 'माहेश्वर' नांवाचें धनुष्य ठेविलें आहे. १२, १३ तें प्रचंड धनुष्य तेथें तुझ्या दृष्टीला पडेल, जनकाकडूनही तुझा चांगला सत्कार होईल' असें म्हणून विश्वामित्र त्या रामलक्ष्मणांना व ऋषि-समुदायाला बरोबर घेऊन गंगेच्या तीरावर असलेल्या गौतमाच्या आश्रमाला आला. या ठिकाणीं अहल्या तप करीत राहिली होती. त्या आश्रमासभोंवतीं पवित्र फलांनीं युक्त असे अनेक दिव्य वृक्ष होते. १४, १५ तेथें पशुपक्षी, त्याचप्रमाणें अनेक प्रकारचे जीवजंतु कोणीही नाहींत, हें पाहून त्या कमलनयन श्रीरामानें विश्वामित्र मुनीला विचारिलें, १६ 'हें पवित्र, सुंदर आणि विस्तीर्ण असें आश्रमस्थान कोणाचें आहे? पत्रपुष्पफलांनीं युक्त, तरी जीवजंतूंनीं टाकलेलें असें हें आश्रमस्थान आहे! १७ भगवन्! हें स्थान पाहून माझ्या अंतःकरणाला आनंद होत आहे, तर येथील इत्थंभूत वृत्तांत आपण मला सांगावा.' १८ विश्वा-मित्र म्हणाला, 'रामा! पूर्वीचा वृत्तांत तुला सांगतों, ऐक. आपल्या तपाच्या योगें-करून परमेश्वराची आराधना करणारा, आणि धर्माचरणानें वागणाऱ्या सर्व लोकांत श्रेष्ठ असा गौतम नांवाचा एक जगत्प्रसिद्ध मुनि आहे. १९ त्याच्या ब्रह्मचर्य व्रतानें संतुष्ट होऊन ब्रह्मदेवानें आपली परम रूपवती अहल्या नांवाची कन्या त्याला दिली. ती त्याच्या सेवेंत सर्वदा दक्ष असे. २० तिच्या सहवर्तमान तो तपस्विश्रेष्ठ

वरः । शक्रस्तु तां धर्षयितुमंतरं प्रेप्सुरन्वहम् ॥ २१ ॥ कदाचिन्मुनिवेषेण गौतमे निर्गते गृहात् । धर्षयित्वाऽथ निरगात्त्वरितं मुनिरप्यगात् ॥ २२ ॥ दृष्ट्वा यांतं स्वरूपेण मुनिः परमकोपनः । पप्रच्छ कस्त्वं दुष्टात्मन्मम रूपधरोऽधमः ॥ २३ ॥ सत्यं ब्रूहि न चेद्भस्म करिष्यामि न संशयः । सोऽब्रवीद्देवराजोऽहं पाहि मां कामकिंकरम् ॥२४॥ कृतं जुगुप्सितं कर्म मया कुत्सितचेतसा । गौतमः क्रोधताम्राक्षः शशाप दिविजाधिपम् ॥ २५ ॥ योनिलंपट दुष्टात्मन्सहस्रभगवा-

गौतम येथेच राहत असे. इद्राच्या मनांत तिचें पातिव्रत्याचा भंग करण्याचें येऊन तो प्रतिदिवशी तशी वेळ पाहत होता. २१ एकदा गौतम आश्रमांतून बाहेर गेला असतां, त्याचा वेष धारण करून इंद्र तेथें आला, आणि अहल्येच्या पातिव्रत्याचा भंग करून लागलाच तेथून निघून गेला. इतक्यांत गौतममुनि येऊन ठेपला. २२ आपलेच रूप घेऊन येणाऱ्या त्याला—इंद्राला—पाहून मुनीला अत्यंत क्रोध आला, आणि त्यानें विचारिलें, ‘ हे दुष्टा ! माझें रूप धारण करणारा तूं कोण अधम आहेस, खरें बोल. नाही तर तुला भस्म करीन, यात संशय नाही. ’ त्यावर तो पुरुष म्हणाला, ‘ मी देवाचा राजा इंद्र आहें, मी कामाचा दास—कामाधीन—झालों होतों, माझें आपण रक्षण करावें. २३,२४ मी दुष्टहृदयाचा असल्याकारणानें माझे हातून हे निंद्यकर्म घडलें आहे. ’ गौतमानें क्रोधानें लाल डोळे करून इद्राला शाप दिला. २५ ‘ दुष्टा ! ज्या अर्थी इतका भगलंपट तूं झालास, त्या अर्थी तुझ्या

१ अहल्या, गौतम व इद्र —वेदात देवाचें वर्णन सर्वदा निष्कलंक असल्याचें, त्याचप्रमाणे इंद्र हा सर्वांस सन्मार्ग दाखविणारा असल्यामुळें गौतमादि ऋषींनीं त्याची स्तुति केल्याचें आढळून येतें, तर पुराणात इंद्र हा अहल्येचें पातिव्रत्य भ्रष्ट करणारा, अतिशय कपटी असा वर्णिलेला आढळतो या परस्परविरुद्ध वर्णनाचा मेळ कित्येक वैदिक पंडितांनी सुंदर रीतीने घातला आहे. त्याप्रमाणें अहल्या-रात्र, गौतम-चंद्र, जार—वयोहानि करणारा, आणि इंद्र-सूर्य, असे अर्थ घेतल्यानें अहल्या—रात्र—ही गौतमाची—चद्राची—स्त्री असून तिच्या आयुष्याचा नाश इंद्राच्या—सूर्याच्या—आगमनानें होतो, असा भावार्थ स्पष्ट होतो —वैदिकधर्मस्वरूप —दुसरे कित्येक अहल्या शब्दाचा अर्थ न नांगरलेली जमीन असा घेऊन ‘ इंद्रानें गौतम भार्या भोगिली ’ म्हणजे गौतम ऋषीच्या न नांगरलेल्या जमिनीवर इंद्रानें मेघवृष्टि केली, असा अर्थ करितात

न्भव । गत्वा तं देवराजानं प्रविश्य स्वाश्रमं द्रुतम् ॥ २६ ॥
दृष्ट्वाहल्यां वेपमानां प्रांजलिं गौतमोऽब्रवीत् । दुष्टे त्वं तिष्ठ दुर्वृत्ते शिला-
यामाश्रमे मम ॥ २७ ॥ निराहारा दिवारात्रं तपः परममास्थिता ।
आतपानिलवर्षादिसहिष्णुः परमेश्वरम् ॥ २८ ॥ ध्यायंती राममेकाग्र-
मनसा हृदि संस्थितम् । नानाजंतुविहीनोऽयमाश्रमो मे भविष्यति ॥२९॥
एवं वर्षसहस्रेषु ह्यनेकेषु गतेषु च । रामो दाशरथिः श्रीमानागमिष्यति
सानुजः ॥३०॥ यदा त्वदाश्रयशिलां पादाभ्यामाक्रमिष्यति । तदैव धूत-
पापा त्वं रामं संपूज्य भक्तितः ॥३१॥ परिक्रम्य नमस्कृत्य स्तुत्वा शापा-
द्विमोक्ष्यसे । पूर्ववन्मम शुश्रूषां करिष्यसि यथासुखम् ॥ ३२ ॥ इत्युक्त्वा
गौतमः प्रागाद्धिमवंतं नगोत्तमम् । तदाप्रभृत्यहल्या भूतानामदृश्या स्वाश्रमे

शरीरावर सहस्र भगं उत्पन्न होतील.' असा त्या देवराजाला–इंद्राला–शाप देऊन तो गौतम मुनि तत्काल आश्रमात शिरला. २६ तेथें हात जोडून आपल्यापुढे कांपत उभी राहिलेल्या अहल्येला पाहून गौतम म्हणाला, 'दुष्टे दुराचरणी स्त्रिये ! आता तू माझ्या आश्रमात शिळेवर गुप्तरूपानें उभी रहा २७ रात्रंदिवस निराहार करून, तीव्र तप आचरून, ऊन, वारा पाऊस इत्यादिकांची बाधा सोसून एकाग्र मनानें अंतःकरणांत रामाचें ध्यान करीत येथें रहा. आजपासून या माझ्या आश्रमातील सर्व जीवजंतु नाहींसे होतील. २८, २९ अशा प्रकारें हजारों वर्षें गेल्यावर श्रीराम आपल्या बंधूसहवर्तमान या आश्रमात येईल ३० तुला आधारभूत अशा या शिळेचें जेव्हा तो राम आपल्या चरणानी आक्रमण करील–वरून जाईल–तेव्हा तूं तत्काल पापमुक्त होशील त्या काळी तूं रामाचें भक्तिपूर्वक पूजन करिशील, ३१ त्याला प्रदक्षिणा घालशील आणि नमस्कार करून त्याची स्तुति करिशील तेणेकरून तं शापापासून मुक्त होशील, आणि पूर्ववत् आनंदानें माझी शुश्रूषा करिशील ३२ असें बोलून गौतम मुनि पर्वतश्रेष्ठ अशा हिमालयपर्वतावर निघून गेला. तेव्हापासून हे रघुश्रेष्ठा ! ती अहल्या सर्व प्राण्यांना अदृश्य झाली असून आपल्या पुण्य आश्रमामध्यें वायुभक्षण करून कडकडीत तप

१ समानार्थक उतारा —– जव भेटती रामचरण । तंव करावें रामस्मरण । रामनामापरते आन । प्राणांतीं जाण असेना ॥ १४-८४ रामनामाचिया आवृत्ती। जळती पापाचिया पंक्ती । शिळारूप । तुझी लोपेल मती । तरी राम चित्तीं न विसंबें ॥ ८५–भावार्थरामायण.

शुभे ॥ ३३ ॥ तव पादरजःस्पर्शं कांक्षते पवनाशना । आस्तेऽद्यापि रघुश्रेष्ठ तपो दुष्करमास्थिता ॥ ३४ ॥ पावयस्व मुनेर्भार्यामहल्यां ब्रह्मणः सुताम् । इत्युक्त्वा राघवं हस्ते गृहीत्वा मुनिपुंगवः ॥ ३५ ॥ दर्शयामास चाहल्यामुग्रेण तपसा स्थिताम् । रामः शिलां पदा स्पृष्ट्वा तां चापश्यत्तपोधनाम् ॥ ३६ ॥ ननाम राघवोऽहल्यां रामोऽहमिति चाब्रवीत् । ततो दृष्ट्वा रघुश्रेष्ठं पीतकौशेयवाससम् ॥ ३७ ॥ चतुर्भुजं शंखचक्रगदापंकजधारिणम् । धनुर्बाणधरं रामं लक्ष्मणेन समन्वितम् ॥ ३८ ॥ स्मितवक्त्रं पद्मनेत्रं श्रीवत्सांकितवक्षसम् । नीलमाणिक्यसंकाशं द्योतयंतं दिशो दश ॥ ३९ ॥ दृष्ट्वा रामं रमानाथं हर्षविस्फारितेक्षणा । गौतमस्य वचः स्मृत्वा ज्ञात्वा नारायणं वरम् ॥ ४० ॥ संपूज्य विधि-

आचरीत तुझ्या पादरजःस्पर्शाची इच्छा करीत अजून राहिली आहे. ३३, ३४ आतां ब्रह्मदेवाची कन्या आणि गौतममुनाची पत्नी अशा या अहल्येची शुद्धि कर,' असें म्हणून त्या मुनिश्रेष्ठ विश्वामित्रानें रामाला हातीं धरिलें, ३५ आणि उग्र तपश्चर्या करीत बसलेली अहल्या–शिळा–त्याला दाखविली. रामानें शिळेला पायानें स्पर्श केला, तोंच ती महातपस्विनी अहल्या त्याच्या नजरेस पडली. ३६ रामानें अहल्येला प्रणाम केला, आणि 'मी राम आहें' असें तिला सांगितलें. त्या वेळी प्रथमतः तो रघुश्रेष्ठ राम चतुर्भुज, शंख, चक्र, गदा आणि कमल धारण करणारा, पीतांबरधारी, असा तिला दिसला; आणि लगेच त्याला दोन हात असून त्यांमध्यें धनुष्यबाण धारण करणारा आणि लक्ष्मणानें युक्त अशा स्वरूपांत तो तिच्या दृष्टीस पडला. ३७, ३८ त्याच्या मुखावर हास्य झळकत होतें, डोळे कमळाप्रमाणें शोभत होते, वक्षःस्थळावर श्रीवत्स चिह्न दिसत होतें, आणि इंद्रनीलमण्याप्रमाणें त्याच्या अंगकांतीनें दाही दिशा प्रकाशित झाल्या होत्या. ३९ अशा त्या रमापति रामाला पाहून अहल्येचे डोळे आनंदानें भरून आले, आणि गौतममुनीच्या भाषणाचें स्मरण होऊन तिनें ओळखिलें कीं, 'हा प्रत्यक्ष परमात्मा नारायण आहे.' ४० तिनें यथाविधि रामाचें पजन केलें. तिच्या

१. 'आहल्योद्धार' काव्यात वामनपंडितांनी अध्यात्मपर सुंदर रूपक केलें आहे—'अहंकार इंद्र प्रियात्मत्व दावा । रमे बुद्धिशीं तै अहल्या वदावी ॥ शिळा देह जो मी गमें ज्या मतीतें । जगीं उद्धरू तो पदें राम तीतें.' ॥

ब्रह्मामयादिभिरनिंदिता। हर्षाश्रुजलनेत्रांता दंडवत्प्रणिपत्य सा ॥ ४१ ॥ उत्थाय च पुनर्दृष्ट्वा रामं राजीवलोचनम् । पुलकांकितसर्वांगा गिरा गद्गदयेलत ॥ ४२ ॥ ॥ अहल्योवाच ॥ अहो कृतार्थोऽस्मि जगन्निवास ते पादाब्जसंलग्नरजःकणादहम् । स्पृशामि यत्पद्मजशंकरादिभिर्विमृग्यते रंधितमानसैः सदा ॥ ४३ ॥ अहो विचित्रं तव राम चेष्टितं मनुष्यभावेन विमोहितं जगत् । चलस्यजस्रं चरणादिवर्जितः संपूर्ण आनंदमयोऽतिमायिकः ॥ ४४ ॥ यत्पादपंकजपरागपवित्रगात्रा भागीरथी भवविरिंचिमुखान्पुनाति । साक्षात्स एव मम दृग्विषयो यदास्ते किं वर्ण्यते मम पुराकृतभागधेयम् ॥ ४५ ॥ मर्त्यावतारे मनजाकृतिं

डोळ्यांतून आनंदाश्रु वाहूं लागले. तिनें रामाला दंडवत् प्रणाम केला. ४१ नंतर ती उठून उभी राहिली, आणि त्या कमलनयन रामाला पुनः पाहती झाली. तिच्या सर्वांगावर रोमांच उभे राहिले आणि तिचा कंठ दाटून आला. तिनें स्तुति करण्यास आरंभ केला. ४२ अहल्या म्हणाली, ‘ हे जगन्निवासा रामा ! तुझ्या चरणकमलरजःकणाच्या स्पर्शानें मी आज कृतकृत्य झाल्यें आहें. ब्रह्मदेव, शंकर वगैरे देव, अंतःकरणात कांहीं काळजी उत्पन्न झाली असतां जिचा शोध करीत असतात, त्याच तुझ्या पायधुळीचा आज मला स्पर्श झाला आहे. ४३ हे रामा ! तुझें चरित्र किती विचित्र आहे म्हणून सांगूं ? तूं मनुष्यरूप घेऊन सर्व जगाला विमोहित करून टाकिलें आहेस, तुला पाय वगैरे नाहीत, तरीही तूं जगांत नित्य फिरत असतोस. तूं आनंदस्वरूप आहेस. तूं अतिमायावी आहेस. ४४ ज्याच्या पदकमलसंबंधी धुळीनें पवित्र झालेला भागीरथीचा प्रवाह, शंकर, ब्रह्मदेव इत्यादिकांना पवित्र करितो, तोच तूं आज प्रत्यक्ष माझ्या दृष्टीस पडला आहेस, त्या अर्थी माझें पूर्वजन्मार्जित भाग्य किती आहे म्हणून सांगूं ? ४५ रामनांवानें मनुष्यदेह

१ भगवंताच्या चरणरजाचा महिमा अनेक कवींनीं वर्णिला आहेः—( १ ) ‘ पदाब्जरज जे तुझ्र, सकलपावनाधार ते । ’—केका २. ( २ ) ‘ तुझ्या बहुत शोधिले अघनिधी पदाच्या रजें, न तें अनृत, वर्णिती बुधजनीं सदाचार जे ’ ॥—केका ३. ( ३ ) ‘ यत्पादपांसुर्बहुजन्मकृच्छ्रतो धृतात्मभिर्योगिभिरप्यगम्य ’ ।—भागवत. ( ४ ) ‘ पायवणी शिरीं धरिलें शिवें । तो जगानें घेत उठिला जीवें । त्यामी राख लाविली जीवेंभावें । शेखीं नागवा भवे स्मशानी ॥ ८ ॥ ऐसें पायाचें करणें । शिवासी उरों नेदी शिवपणें । मा जीवासि कैंचें जीवें जिणे । मानितें मानणे उरों नेदी ’ ॥ ९ ॥—एकनाथी भागवत.

हरिं रामाभिधेयं रमणीयदेहिनम् । धनुर्धरं पद्मविशाललोचनं भजामि नित्यं न परान्भजिष्ये ॥४६॥ यत्पादपंकजरजः श्रुतिभिर्विमृग्यं यन्नाभिपंकजभवः कमलासनश्च । यन्नामसाररसिको भगवान्पुरारिस्तं रामचंद्रमनिशं हृदि भावयामि ॥ ४७ ॥ यस्यावतारचरितानि विरिंचिलोके गायंति नारदमुखा भवपद्मजाद्याः । आनंदजाश्रुपरिषिक्तकुचाग्रसीमा वागीश्वरी च तमहं शरणं प्रपद्ये ॥ ४८ ॥ सोऽयं परात्मा पुरुषः पुराण एष स्वयंज्योतिरनंत आद्यः । मायातनुं लोकविमोहनीयां धत्ते परानुग्रह एष रामः ॥ ४९ ॥ अयं हि विश्वोद्भवसंयमानामेकः स्वमायागुणबिंबितो यः । विरिंचिविष्ण्वीश्वरनाम-भेदान्धत्ते स्वतंत्रः परिपूर्ण आत्मा ॥ ५० ॥ नमोऽस्तु ते राम तवांघ्रिपंकजं

धारण करून तूं हरि मृत्युलोकी आला आहेस. तुझी मूर्ति रमणीय आहे. कमलासारखे तुझे विशाल नेत्र असून तूं धनुर्धारी आहेस. अशा तुला मी भजतें, दुसऱ्या कोणालाही मी भजणार नाही. ४६ ज्याच्या पदकमलरजाचा शोध श्रुति—वेद—करीत असतात, ज्याच्या नाभिकमलापासून ब्रह्मदेव उत्पन्न झाला आहे, ज्याच्या नांवाच्या तत्त्वाची गोडी भगवान् शंकर जाणतो, अशा श्रीरामचंद्राचें मी सदैव हृदयांत ध्यान करितें. ४७ ज्याची अवतारचरित्रें सत्यलोकामध्यें नारदादि साधु आणि शंकर, ब्रह्मदेव वगैरे गातात, ज्याचें गुणगायन करितांना वाग्देवी सरस्वतीच्या नेत्रांतून आनंदाश्रू वाहूं लागून तिचे स्तनाग्रभाग भिजून जातात, अशा त्या रामाला मी आज शरण जात आहें. ४८ हा राम सर्वांचा अंतर्यामी, पुराणपुरुष असून स्वतः प्रकाशरूपी आहे; ह्याला अंत नसून हा आदिकारण आहे. लोकांना मोह उत्पन्न करणारें मायास्वरूप धारण करून हा येथें—पृथ्वीतलावर—लोकांवर कृपा करण्याकरितांच प्राप्त झाला आहे. ४९ हा आपल्या मायेच्या सत्त्व, रज, तम ह्या गुणांनी प्रतिबिंबित होऊन ब्रह्मा, विष्णु, शंकर अशीं निरनिराळीं नांवें धारण करितो आणि स्वेच्छेनें जगाची उत्पत्ति, पालन आणि संहार करितो. हा सर्वव्यापक, सर्वांचा अंतर्यामी असा आहे. ५० हे रामा! तुला आणि तुझ्या पदकमलाला नमस्कार असो. हें तुझें चरणकमल लक्ष्मीनें प्रेमानें

१. हालाहल विष प्राशन केल्यानं झालेला संताप दूर करण्याकरितां शंकरांनीं चंद्राला आणि गंगेला मस्तकीं धारण केलें, तरी त्याचा तो दाह नाहींसा झाला नाहीं. शेवटीं सतत रामनाम जपानें तो ताप नाहींसा झाला, तेव्हांपासून शंकरांना रामनामाची गोडी लागली.

२. लक्ष्मीला भगवच्चरणसेवेची गोडी किती होती तें पहाः—' निरभिमान होऊनि जाण । करीतसे चरणसेवन । पायींच्या पद्माचें तेज गहन । प्रकाशमान देखिलें ॥ अष्टनिधी हातीं होते

श्रिया धृतं वक्षसि लालितं प्रियात् । आक्रांतमेकेन जगत्त्रयं पुरा ध्येयं मुनीन्द्रैरभिमानवर्जितैः ॥ ५१ ॥ जगतामादिभूतस्त्वं जगत्त्वं जगदाश्रयः । सर्वभूतेष्वसंयुक्त एको भाति भवान्परः ॥ ५२ ॥ ओंकारवाच्यस्त्वं राम वाचामविषयः पुमान् । वाच्यवाचकभेदेन भवानेव जगन्मयः ॥ ५३ ॥ कार्यकारणकर्तृत्वफलसाधनभेदतः । एको विभासि राम त्वं मायया बहुरूपया ॥ ५४ ॥ त्वन्मायामोहितधियस्त्वां न जानंति तत्त्वतः । मानुषं त्वाभिमन्यंते मायिनं परमेश्वरम् ॥ ५५ ॥ आकाशवत्त्वं सर्वत्र बहिरंतर्गतोऽमलः । असंगो ह्यचलो नित्यः शुद्धो बुद्धः सदव्ययः ॥ ५६ ॥ योषि-

वक्षःस्थलावर धरून कुरवाळिलें आहे, ह्यानें एकट्यानें सारें त्रिभुवन व्यापून टाकलें आहे, आणि पूर्वकाली मोठमोठ्या मुनींना अभिमानरहित होऊन ह्याचेंच ध्यान करावेंसें वाटत असे. ५१ तूं जगाचें आदिकारण आहेस, तूंच जग आहेस, आणि तूंच जगाला आधार आहेस. कोणत्याही भूताशीं तुझा संबंध नाहीं, तूं एकाच स्वरूपानें सर्वत्र भासत आहेस ५२ हे रामा ! तूं ओंकारानें[1] ब्रह्मविष्णुमहेशरूप असा वर्णिलेला आहेस. तूं वाणीनें वर्णन करण्याजोगा नाहींस. तूं वाच्यवाचकभेदानें[2]–नामरूपभेदानें–जगत्स्वरूपी नटला आहेस. ५३ कार्य[3], कारण, कर्तृत्व, फल आणि साधनें या भेदांनीं तूं वेगवेगळा भासत आहेस. मायेच्या योगेंकरून अनेक रूपें तूं धारण केलीं आहेस, तरी रामा ! तूं एकच आहेस ५४ तुझ्या मायेनें बुद्धीला मोह होऊन, लोक मायेला स्वाधीन ठेवणाऱ्या तुला–परमेश्वराला–खरेपणानें ओळखीत नाहींत, आणि तुला मनुष्य समजतात ५५ तूं आकाशाप्रमाणें सर्वत्र आंतबाहेर व्यापून राहिला आहेस तूं अमल–दोषरहित–आहेस. तूं कोणाशींही संबंध न ठेवणारा, कांहींही न करणारा, सनातन, शुद्ध, ज्ञानस्वरूप, सत्तारूपी आणि नाशरहित असा आहेस ५६ हे

[illegible] टाकी पद्मनेत्र । हें देखोनि समुद्रात्मजा चोज । विस्मित सहज मग झाली ॥ महालक्ष्मी म्हणे हा रत्नें । व्यर्थचि जतन केलीं जाण । नेणता चरणाचें महिमान । धरिला अभिमान उगाचि ॥—महीपतिकृत कथासारामृत.

१. ओंकार=अ+उ+म् अ म्हणजे विष्णु, उ म्हणजे शंकर, आणि म् ह्मणजे ब्रह्मदेव. २ वाच्य–प्रतिपादन करण्याचा विषय, आणि वाचक–प्रतिपादन करणारा. नाम हें वाचक आणि रूप हें वाच्य होय ३ कार्य–महत्तत्त्व, अहंकार, वगैरे, कारण–मूलप्रकृति; कर्तृत्व–कर्तेपणा फल–स्वर्ग, नरक वगैरे, साधनें–यज्ञयागादि.

न्मूढाऽहमज्ञा ते तत्त्वं जाने कथं विभो। तस्मात्ते शतशो राम नमस्कुर्यामनन्यधीः ॥ ५७ ॥ देव मे यत्र कुत्रापि स्थिताया अपि सर्वदा। त्वत्पादकमले सक्ता भक्तिरेव सदाऽस्तु मे ॥ ५८ ॥ नमस्ते पुरुषाध्यक्ष नमस्ते भक्तवत्सल। नमस्तेऽस्तु हृषीकेश नारायण नमोऽस्तु ते ॥ ५९ ॥ भवभयहरमेकं भानुकोटिप्रकाशं करधृतशरचापं कालमेघावभासम्। कनकरुचिरवस्त्रं रत्नवत्कुंडलाढ्यं कमलविशदनेत्रं सानुज राममीडे ॥ ६० ॥ स्तुत्वैवं पुरुषं साक्षाद्राघवं पुरतः स्थितम्। परिक्रम्य प्रणम्याशु सानुज्ञाता ययौ पतिम् ॥ ६१ ॥ अहल्यया कृतं स्तोत्रं यः पठेद्भक्तिसंयुतः। स मुच्यतेऽखिलैः पापैः परं ब्रह्माधिगच्छति ॥ ६२ ॥

विभो! मी मृढ, अज्ञ अशी स्त्री आहें, तुझें सत्यस्वरूप मी कसें जाणणार? म्हणून हे रामा! अनन्य बुद्धीनें मी तुला शतशः प्रणाम करीत आहें. ५७ हे देवा! मी कोठेंही असल्यें, तरी सदोदित तुझ्या पदकमलाचे ठिकाणीच माझी भक्ति जडलेली राहो. ५८ हे पुरुषाध्यक्षा,[1] तुला नमस्कार असो. हे भक्तवत्सला! तुला नमस्कार असो. हे हृषीकेशा![2] तुला नमस्कार असो. हे नारायणा![3] तुला नमस्कार असो. ५९ जो एकच संसारभय दूर करण्यास समर्थ आहे, ज्याचें कोटि सूर्याप्रमाणें तेज आहे, ज्यानें बाण व धनुष्य हातांत धारण केलें आहे, ज्याची कांति कृष्णमेघासमान आहे, सुवर्णाचें सुंदर वस्त्र ज्यानें परिधान केलें आहे, रत्नजडित कुंडलें ज्यानें धारण केलीं आहेत, ज्याचे नेत्र कमलासमान विशाल आहेत, अशा कनिष्ठ बंधूसहित रामाची मी स्तुति[4] करित्यें. ६० अशा रीतीनें रामस्वरूपानें प्रत्यक्ष पुढें उभा राहिलेल्या परमेश्वराची स्तुति करून अहल्येनें त्याला प्रदक्षिणा घातली आणि नमस्कार करून त्याच्या अनुज्ञेनें पतीकडे जाती झाली. ६१ अहल्येनें केलेल्या स्तोत्राचें जो भक्तिपूर्वक पठण करील, तो सर्व पापांपासून मुक्त होऊन परब्रह्मस्वरूपाला प्राप्त होईल. ६२

१. सर्व जीवाचा साक्षी अशा २ सर्व इंद्रियें स्वाधीन ठेवणाऱ्या! हृषीक—इंद्रियें, त्याचा ईश-स्वाधीन ठेवणारा. ३. नारायण=जीवसमूहांत राहणारा. नराणां समूहः नारम् नारं अयनं यस्य स नारायण. ४ सदृश उतारा.—'ध्यायेदाजानुबाहुं धृतशरधनुषं बद्धपद्मासनस्थं, पीतं वासो वसानं नवकमलदलस्पर्धिनेत्रं प्रसन्नम्। वामांकारूढसीतामुखकमलमिलल्लोचनं नीरदाभं नानालंकारदीप्तं दधतमुरुजटामंडलं रामचंद्रम्'॥—रामरक्षा.

पुत्रार्थं पठेद्भक्त्या रामं हृदि निधाय च । संवत्सरेण लभते वंध्या अपि सुपुत्रकम् ॥ ६३ ॥ सर्वान्कामानवाप्नोति रामचंद्रप्रसादतः ॥ ६४ ॥ ब्रह्मघ्नो गुरुतल्पगोऽपि पुरुषः स्तेयी सुरापोऽपि वा मातृभ्रातृविहिंसकोऽपि सततं भोगैकबद्धातुरः । नित्यं स्तोत्रमिदं जपन् रघुपतिं भक्त्या हृदिस्थं स्मरन् ध्यायन्मुक्तिमुपैति किं पुनरसौ स्वाचारयुक्तो नरः ॥ ६५ ॥ इति श्रीम० उमामहेश्वरसं० बाल० अहल्योद्धरणं नाम पंचमः सर्गः ॥५॥

## बालकांड, सर्ग सहावा.

॥ सूत उवाच ॥ विश्वामित्रोऽथ तं प्राह राघवं सहलक्ष्मणम् ॥ गच्छामो वत्स मिथिलां जनकेनाभिपालिताम् ॥ १ ॥ दृष्ट्वा क्रतुवरं पश्चादयोध्यां गंतुमर्हसि । इत्युक्त्वा प्रययौ गंगामुत्तर्तुं सहराघवः । तस्मिन्काले नाविकेन निषिद्धो रघुनंदनः ॥२॥ ॥ नाविक उवाच ॥

पुत्रादि संततीकरिता वांझेनें जरी रामचंद्राला अंतःकरणांत ठेवून या स्तोत्राचा पाठ केला, तरी देखील संवत्सरानें तिला सुपुत्र होईल, आणि रामचंद्राच्या कृपेनें तिचे सर्व मनोरथ परिपूर्ण होतील ६३, ६४ मनुष्य ब्रह्महत्या करणारा असो, गुरुस्त्रीगमनी असो, चोरी करणारा असो, मद्यपी असो, आई किंवा बापाचा वध करणारा असो, भोगांतच सर्वदा आसक्त असणारा असो, रोगानें आतुर झालेला असो, तो जर भक्तिपरस्पर हृदयांत राहणाऱ्या रघुपतीचें—श्रीरामाचें—स्मरण व ध्यान करून ह्या स्तोत्राचा नित्य जप करील, तर त्याला देखील मुक्ति प्राप्त होईल, मग धर्माचरणी मनुष्य ह्या जपानें मुक्ति पावेल हें वेगळें सांगायाला कशाला पाहिजे ? ” ६५

**बालकांड, पांचवा सर्ग समाप्त**

सूत म्हणाला, “ नंतर विश्वामित्र लक्ष्मणासह रामाला म्हणाला, ‘ वत्सा ! जनक राजा राज्य करीत असतां, त्या मिथिला नगरीला आतां आपण जाऊं. १ तेथें होणारा मोठा यज्ञसमारंभ पाहून नंतर तुम्ही अयोध्येला जावें.’ असें बोलून राम-लक्ष्मणासह गंगा उतरून पलीकडे जाण्याकरितां तीरावर येतात, तोंच नावाड्यानें रामाला नावेंत बसण्याला अडथळा केला २ नावाडी म्हणाला, ‘ महाराज, मी

क्षालयामि तव पादपंकजं नाथ दारुदृषदोः किमंतरम् । मानुषीकरण-
चूर्णमस्ति ते पादयोरिति कथा प्रथीयसी ॥ ३ ॥ पादांबुजं ते विमलं
हि कृत्वा पश्चात्परं तीरमहं नयामि । नोचेत्तरी सद्युवती मलेन स्याच्चे-
द्विभो विद्धि कुटुंबहानिः ॥ ४ ॥ इत्युक्त्वा क्षालितौ पादौ परं तीरं
ततो गताः । कौशिको रघुनाथेन सहितो मिथिलां ययौ ॥ ५ ॥ विदे-
हस्य पुरं प्रातर्ऋषिवाटं समाविशत् । प्राप्तं कौशिकमाकर्ण्य जनकोऽति-
मुदान्वितः ॥ ६ ॥ पूजाद्रव्याणि संगृह्य सोपाध्यायः समाययौ । दंड-
वत्प्रणिपत्याह पूजयामास कौशिकम् ॥ ७ ॥ पप्रच्छ राघवौ दृष्ट्वा सर्व-
लक्षणसंयुतौ । द्योतयंतौ दिशः सर्वाश्चंद्रसूर्याविवापरौ ॥ ८ ॥ कस्यैतौ
नरशार्दूलौ पुत्रौ देवसुतोपमौ । मनःप्रीतिकरौ मेऽद्य नरनारायणाविव

तुमचें चरणकमल आधी क्षालन करून स्वच्छ करितों. लांकूड आणि पाषाण यांत काय बरें भेद आहे ? तुमच्या पायांच्या ठायीं दगडाला मनुष्य करणारें चूर्ण आहे ही गोष्ट प्रसिद्ध आहे. ३ तुमचें पदकमलाचें प्रथमतः प्रक्षालन करून नंतर तुम्हांला पैलतीराला नेतों. नाहीतर तुमच्या पायांच्या धुळीनें माझ्या नौकेची एखादी सुंदर स्त्री होईल. मग देवा ! ( निर्वाहसाधन जाऊन ) माझ्या कुटुंबाची हानि होईल, हें ध्यानांत घ्या ' । ४ असें म्हणून त्या नावाड्यानें रामाचे पाय धुतले आणि मग नावेंत बसून ती सर्व मंडळी पैलतीराला गेली. नंतर विश्वामित्र रामाला घेऊन मिथिला नगरीला जाता झाला. ५ तेथें प्रातःकाली पांचल्यावर ऋषींकरितां राखून ठेविलेल्या ठिकाणीं ते उतरले. कौशिक—विश्वामित्र—आला आहे, असें ऐकून जनकाला अत्यानंद झाला. ६ तो पूजेची सामग्री घेऊन उपाध्यायासह तेथें आला, आणि साष्टांग नमस्कार करून त्यानें विश्वामित्र ऋषीची पूजा केली. ७ आणि सर्व दिशा उज्ज्वलित करणारे दुसरे चंद्रसूर्यच की काय, अशा त्या सर्व लक्षणयुक्त रामलक्ष्मणांना पाहून विचारिलें, ' मनुष्यांत श्रेष्ठ, देवांच्या मुलांसारखे, सर्वांच्या मनाला संतोषविणारे असे हे कोणाचे मुलगे बरें ? प्रत्यक्ष नरनारायणच आज प्राप्त

१. दगड आणि लाकूड यांत विशेषसा फरक नसल्यामुळे, रामाच्या पदरजस्पर्शानें शिळेची स्त्री—अहल्या—झाली, तद्वतच त्याच्या पदधूलीनें आपल्या नौकेचीही स्त्री झाल्यास आपली थोर हानि होईल, म्हणून अहल्याख्यानाला अनुलक्षून नावाड्याचें रामाला हें सांगणें आहे.
२. नरनारायण=कृष्णार्जुन नर—अर्जुन व नारायण कृष्ण. नरनारायण नावांचे दोन प्रख्यात

॥ ९ ॥ प्रत्युवाच मुनिः प्रीतो हर्षयन् जनकं तदा । पुत्रौ दशरथस्यैतौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ ॥ १० ॥ मखसंरक्षणार्थाय मयानीतौ पितुः पुरात् । आगच्छन् राघवो मार्गे ताटकां विश्वघातिनीम् ॥ ११ ॥ शरेणैकेन हतवान्नोदितो मेऽनिविक्रमः । ततो ममाश्रमं गत्वा मम यज्ञविहिंसकान् ॥ १२ ॥ सुबाहुप्रमुखान्हत्वा मारीचं सागरेऽक्षिपत् । ततो गंगातटे पुण्ये गौतमस्याश्रमे शुभे ॥ १३ ॥ गत्वा तत्र शिलारूपा गौतमस्य वधूः स्थिता । पादपंकजसंस्पर्शात्कृत्वा मानुषरूपिणी ॥ १४ ॥ दृष्ट्वाऽहल्यां नमस्कृत्य तया सम्यक्सपूजितः । इदानीं द्रष्टुकामस्ते गृहे माहेश्वरं धनुः ॥ १५ ॥ पूजितं राजभिः सर्वैर्दृष्टमित्यनुशुश्रुवे । अतो दर्शय राजेंद्र शैवं चापमनुत्तमम् ॥ दृष्ट्वायोध्यां जिगमिषुः पितरं द्रष्टुमिच्छति ॥ १६ ॥

झाले आहेत की काय, असें मला वाटत आहे.' ८, ९ त्यावर मुनाला —विश्वामित्राला—संतोष होऊन तो जनकाला म्हणाला ' हे दोघे रामलक्ष्मण बंधु असून दशरथाचे मुलगे आहेत. १० पित्याच्या नगरातून यज्ञरक्षणाकरितां मी यांना आणिलें आहे. या महापराक्रमी रामानें वाटेंत येता येता साऱ्या विश्वाला उपद्रव देणाऱ्या ताटकेचा माझ्या सांगण्यावरून एकाच बाणानें वध केला. नंतर माझ्या आश्रमात आल्यावर माझ्या यज्ञाचा नाश करणाऱ्या सुबाहु वगैरे राक्षसांना मारून मारीचाला समुद्रात यानें फेंकून दिलें. नंतर गंगेच्या तीरावर गौतममुनीच्या पुण्याश्रमाला जाऊन तेथें शिलारूपानें राहणाऱ्या गौतमाच्या स्त्रीला चरणकमलाच्या स्पर्शानें मनुष्यस्वरूपाला प्राप्त करून दिलें. ११–१४ अहल्येला पाहून रामानें तिला वंदन केलें, तिनेंही त्याची उत्तम प्रकारें पूजा केली. सांप्रत तुझ्या घरी असलेलें शंकराचें धनुष्य पाहण्याची त्याची इच्छा आहे. १५ तें धनुष्य तुझ्या येथें पूजन ठेविलें असून, त्याचें दर्शन सर्व राजांनी घेतलें आहे, असें ऐकण्यांत आलें आहे; म्हणून हे राजश्रेष्ठा ! तें अत्युत्तम शंकराचें धनुष्य याला दाखीव. तें पाहून मग पित्याला भेटण्याला अयोध्येला जावें अशी याची इच्छा आहे. १६ मनीच्या

शाप अगस्त्याचेही आठलें. हिमालयपर्वतावर ते खडतर तपश्चर्या करीत असता इंद्राला भीति उत्पन्न होऊन त्यानें त्याच्या विलोभनाकरिता अनेक अप्सरा पाठविल्या, परंतु नारायणाने आपल्या मांडीवरील पुष्पापासून एक उर्वशीनामक स्त्री निर्माण केली तिच्या सौंदर्यापुढें त्या सर्व अप्सरा लज्जित होऊन निघून गेल्या.—विक्रमोर्वशीय.

इत्युक्तो मुनिना राजा पूजार्हाविति पूजया । पूजयामास धर्मज्ञो विधि-
दृष्टेन कर्मणा ॥ १७ ॥ ततः संप्रेषयामास मंत्रिणं बुद्धिमत्तरम् । ॥ जनक
उवाच ॥ शीघ्रमानय विश्वेशचापं रामाय दर्शय ॥ १८ ॥ ततो गते
मंत्रिवरे राजा कौशिकमब्रवीत् ॥ यदि रामो धनुर्धृत्वा कोट्यामारापये-
द्गुणम् ॥ १९ ॥ तदा मयाऽत्मजा सीता दीयते राघवाय हि । तथेति
कौशिकोऽप्याह रामं संवीक्ष्य सस्मितम् ॥ २० ॥ शीघ्रं दर्शय चापाग्र्यं
रामायामिततेजसे । एवं ब्रुवति मौनीश आगताश्चापवाहकाः ॥ २१ ॥
चापं गृहीत्वा बलिनः पंचसाहस्रसंख्यकाः । घंटाशतसमायुक्तं मणिव-
ज्रादिभूषितम् ॥ २२ ॥ दर्शयामास रामाय मंत्री मंत्रयतां वरः । दृष्ट्वा
रामः प्रहृष्टात्मा बध्वा परिकरं दृढम् ॥ २३ ॥ गृहीत्वा वाम हस्तेन

तोंडून हें ऐकिल्यावर ते दोघेही—रामलक्ष्मण—पूजेस पात्र आहेत, असें जाणून शास्त्रोक्त पद्धतीनें त्या धर्मज्ञ राजानें दोघांची पूजा केली. १७ त्यानें आपल्या बुद्धिमान् प्रधानाला ( धनुष्य आणण्याला ) पाठवून दिलें. जनक म्हणाला, 'शंकराचें धनुष्य लवकर आणून रामाला दाखवा.' १८ नतर तो मुख्य प्रधान गेला असतां राजा विश्वामित्राला म्हणाला, 'जर राम धनुष्य हातीं घेऊन त्याच्या कोटीवर दोरी चढवील, तर मी माझी कन्या सीता त्याला देईन.' रामाकडे पाहून हंसत हंसत विश्वामित्रानें 'बरें आहे' असें म्हटलें. १९, २० नंतर 'या महाप्रभावशाली रामाला तें चांप लवकर दाखव,' असें मुनिश्रेष्ठ विश्वामित्र सांगत आहे, तोंच पांचसहस्र बळकट चापवाहक तें धनुष्य घेऊन तेथें आले. त्या चापाला शेंकडों घंटा लावल्या होत्या, व रत्नें आणि हिरे जडवून तें सुशोभित केलें होतें. २१, २२ पुढें मंत्रिवर्गामध्यें श्रेष्ठ अशा त्या प्रधानानें रामाला तें धनुष्य दाखविल्यावर रामाला अत्यंत आनंद झाला. त्यानें कास मारून डाव्या हातानें तें धनुष्य सहज तोलून

१. या शिवचापाचें एकनाथानीं पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहेः—'शिवाचें शिवचाप अपूर्व । तें केंवि उचलूं शकती जीव । तेथें अधिष्ठाने वसे शिव । चापीं जडभाव शिवशक्तीं ॥ कोदंडाचा निजभावार्थ । शिवहस्तें मी अति पुनीत । श्रीरामहस्तें परममुक्त । होईन निश्चित स्वयंवरीं ॥ राम सदा शिवातें ध्याय । शिव वंदी श्रीरामपाय । तेणें चापाचें जडत्व जाय । पुष्पप्राय तें झालें' ॥—भावार्थरामायण.

चम् ॥ २४ ॥ कार्तवीर्यं पितृहणं यदर्थं तपसः श्रमः । ततस्त्रिःसप्तकृत्वस्त्वं हत्वा क्षत्रियमंडलम् ॥ २५ ॥ कृत्स्नां भूमिं कश्यपाय दत्त्वा शांतिमुपावह । त्रेतामुखे दाशरथिर्भूत्वा रामोऽहमव्ययः ॥ २६ ॥ उत्पत्स्ये परया शक्त्या तदा द्रक्ष्यसि मां ततः । मत्तेजः पुनरादास्ये त्वयि दत्तं मया पुरा ॥ २७ ॥ तदा तपश्चरँल्लोके तिष्ठ त्वं ब्रह्मणो दिनम् । इत्युक्त्वांतर्दधे देवस्तथा सर्वं कृतं मया ॥ २८ ॥ स एव विष्णुस्त्वं राम जातोऽसि ब्रह्मणार्थितः ; मयि स्थितं तु त्वत्तेजस्त्वयैव पुनराहृतम् ॥ २९ ॥ अद्य मे सफलं जन्म प्रतीतोऽसि मम प्रभो । ब्रह्मादिभिरलभ्यस्त्वं प्रकृतेः पारगो मतः ॥ ३० ॥ त्वयि जन्मादिषड्भावा न संत्यज्ञानसंभवाः । निर्विकारोऽसि पूर्णस्त्वं गमनादिविवर्जितः

श्रम घेतलेस, तें तुझें थोर तप फळाला आलें आहे. माझ्या चैतन्यरूप अंशानें तूं युक्त होशील, तुझ्या बापाला ठार मारणाऱ्या हैहयकुलांतील श्रेष्ठ पुरुषाचा ( कार्तवीर्याचा ) वध कर, आणि नंतर एकवीस वेळां क्षत्रियांचा नाश कर, २४,२५ आणि सर्व भूमि कश्यपाला दे. मग तुझ्या मनाला शांति मिळेल. मी तर अव्यय—उत्पत्त्यादि विकाररहित आहें, तरी त्रेतायुगाच्या आरंभीं दाशरथिरामरूपानें जन्माला येणार आहें, तेव्हां त्या माझ्या रूपांत तुजमध्यें मी ठेविलेल्या शक्तीहून अधिक शक्ति दिसून येईल. तेव्हां मी तुला पूर्वीं दिलेलें माझें तेज परत घेईन. २६,२७ त्यापुढें तूं ब्रह्मदेवाचा एक दिवस भरपर्यंत तप करीत पृथ्वीवर रहा.' असें सांगून देव गुप्त झाला. त्याच्या सांगण्याप्रमाणें मी सर्व केलें आहे. २८ हे रामा ! ब्रह्मदेवाच्या प्रार्थनेवरून अवतार घेणारा तो विष्णुच तूं आहेस. माझ्या ठिकाणी असलेलें तुझें तेज तूंच आतां परत घेतलें आहेस. २९ हे प्रभो ! आज माझें जन्म सफल झालें, कारण, मायेच्याही पलीकडे असल्यामुळें ब्रह्मादिकांनाही अलभ्य असा जो तूं, तो माझ्या दृष्टीस पडला आहेस. ३० अज्ञानापासून उत्पन्न होणारे सहा भाव तुझ्या ठिकाणी नाहींत, तुझ्या ठिकाणी कोणताही विकार नाहीं, तूं ( ज्ञानानें ) पूर्ण आहेस, गमनादि कोणतीही

१. कृत, त्रेता, द्वापर आणि कलि यांपैकीं दुसरें युग त्रेतायुगाचीं वर्षे १२९६००० सांगितलीं आहेत. २. ब्रह्मदेवाचा एक दिवस—चार सहस्र युग. ३. सहा भाव ( अवस्था ) ( १ ) जायते—उत्पन्न होतो, ( २ ) अस्ति—असतो, (३) वर्धते—वाढतो ( ४ ) विपरिणमते—पूर्णत्वाला येतो ( ५ ) अपक्षीयते—क्षीण होऊं लागतो ( ६ ) नश्यति—नाश पावतें

ब्रवीन्मुनिं राजा सर्वशास्त्रविशारदः ॥ ३२ ॥ भो कौशिक मुनिश्रेष्ठ पत्रं प्रेषय सत्वरम् । राजा दशरथः शीघ्रमागच्छतु सपुत्रकः ॥ ३३ ॥ विवाहार्थं कुमाराणां सदारः सहमंत्रिभिः । तथेति प्रेषयामास दूतांस्त्वरितविक्रमान् ॥ ३४ ॥ ते गत्वा राजशार्दूलं रामश्रेयो न्यवेदयन् । श्रुत्वा रामकृतं राजा हर्षेण महताप्लुतः ॥ ३५ ॥ मिथिलागमनार्थाय त्वरयामास मंत्रिणः । गच्छंतु मिथिलां सर्वे गजाश्वरथपत्तयः ॥ ३६ ॥ रथमानय मे शीघ्रं गच्छाम्यद्यैव मा चिरम् । वसिष्ठस्त्वग्रतो यातु सदारः सहितोऽग्निभिः ॥३७॥ राममातॄः समादाय मुनिर्मे भगवान् गुरुः । एवं प्रस्थाप्य सकलं राजर्षिर्विपुलं रथम् ॥ ३८ ॥ महत्या सेनया सार्धमारुह्य त्वरितो ययौ । आगतं राघवं श्रुत्वा राजा हर्षसमाकुलः ॥ ३९ ॥ प्रत्युज्जगाम जनकः शतानंदपुरोधसा । यथोक्तपूजया पूज्यं पूजयामास

विभूषित अशा रामाला पाहून आनंदित झाल्या. तेव्हां सर्व शास्त्रांत निष्णात असा तो राजा—जनक—विश्वामित्राला म्हणाला ३१, ३२ 'अहो मुनिश्रेष्ठ विश्वामित्र ! दशरथ राजा आपले पुत्र, स्त्रिया आणि प्रधान यांसहवर्तमान कुमारांच्या विवाहासाठीं लवकर आला पाहिजे, तरी त्याला आपण लवकर पत्र पाठवावें.' 'बरें आहे' असें म्हणून जलद गतीनें जाणारे दूत विश्वामित्रानें पाठविले. ३३,३४ त्यांनीं अयोध्येला जाऊन त्या राजश्रेष्ठाला—दशरथाला—रामाच्या भाग्योदयाचा तो वृत्तांत सांगितला. रामाच्या हातून घडलेली ( धनुर्भंगाची ) गोष्ट ऐकून राजाला फार आनंद झाला. ३५ त्यानें मिथिला नगरीला लवकर निघण्याला आपल्या मंत्र्यांना घाई केली. तो म्हणाला, 'हत्ती, घोडे, रथ, पायदळ हीं सर्व मिथिलेला जावोत. ३६ माझा रथ लवकर आणा. आजच मी निघणार. विलंब नको. वसिष्ठ निजपत्नी अरुंधतीला आणि अग्नी घेऊन पुढें जावोत. ३७ ज्ञानसंपन्न गुरु वसिष्ठ राममातांनाही आपल्याबरोबर घेऊन जावोत. अशा रीतीनें सर्वांना पुढें पाठवून आपण स्वतः एका मोठ्या रथांत बसून आपल्या प्रचंड सेनेसह तो राजा—दशरथ—लागलाच निघाला. 'दशरथ आला आहे' असें समजतांच राजा जनकाला—मोठा आनंद झाला. ३८,३९ आपल्या शतानंद पुरोहिताला बरोबर घेऊन तो दशरथाला सामोरा गेला. आणि त्या पूज्य दशरथाची सत्कारपूर्वक

१. कौसल्या, सुमित्रा, कैकेयी, यांना. २. हा गौतमाला अहल्येच्या पोटीं झालेला पुत्र होय.

सत्कृतम् ॥ ४० ॥ रामस्तु लक्ष्मणेनाशु ववंदे चरणौ पितुः । ततो हृष्टो दशरथो रामं वचनमब्रवीत् ॥ ४१ ॥ दिष्ट्या पश्यामि ते राम मुखं फुल्लांबुजोपमम् । मुनेरनुग्रहात्सर्वं संपन्नं मम शोभनम् ॥ ४२ ॥ इत्युक्त्वाघ्राय मूर्धानमालिंग्य च पुनः पुनः । हर्षेण महताऽऽविष्टो ब्रह्मानंदं गतो यथा ॥ ४३ ॥ ततो जनकराजेन मंदिरे सन्निवेशितः । शोभने सर्वभोगाढ्ये सदारः ससुतः सुखी ॥ ४४ ॥ ततः शुभे दिने लग्ने सुमुहूर्ते रघूत्तमम् । आनयामास धर्मज्ञो रामं सभ्रातृकं तदा ॥ ४५ ॥ रत्नस्तंभसुविस्तारे सुविताने सुतोरणे । मंडपे सर्वशोभाढ्ये मुक्तापुष्पफलान्विते ॥ ४६ ॥ वेदविद्भिः सुसंबाधे ब्राह्मणैः स्वर्णभूषितैः । सुवासिनीभिः परितो निष्ककंठीभिरावृते ॥ ४७ ॥ भेरीदुंदुभिनिर्घोषैर्गीतनृत्यैः समाकुले । दिव्यरत्नांचिते स्वर्णपीठे रामं न्यवेशयत् ॥ ४८ ॥ वसिष्ठं

त्यानें यथाविधि पूजा केली. ४० रामलक्ष्मणानी तत्काल पित्याच्या चरणांला वंदन केलें. दशरथाला आनंद झाला आणि तो रामाला बोलला, ४१ ‘ रामा ! प्रफुल्लित कमलासमान तुझें मुख पाहून आज मला थोर आनंद होत आहे. ( विश्वामित्र ) मुनीच्या अनुग्रहामुळेंच ह्या सर्व मंगल गोष्टी घडून आल्या आहेत.’ ४२ असें म्हणून त्यानें रामाला मस्तकाच्या ठिकाणी हुंगिलें आणि त्याला पुनः पुनः आलिंगन दिलें. ब्रह्मानंदात विलीन झाल्याप्रमाणें तो आनंदमग्न झाला. ४३ नंतर जनकराजानें सर्व उपभोग्य पदार्थांनीं भरलेल्या एका सुंदर मंदिरांत राण्या आणि पुत्र यासह त्या सुखसंपन्न राजा दशरथाला उतरविलें. ४४ मग त्या धर्मज्ञ जनकानें शुभ दिवशीं, शुभलग्नीं, शुभ मुहूर्तीं ( चौघां ) भावांसह त्या रघुश्रेष्ठ रामाला बोलावून आणिलें. ४५ त्यानें विवाहाकरितां मोठा विस्तीर्ण मंडप उभारिला होता. त्याला रत्नांचे खांब दिले असून सुंदर छत लाविलें होतें. त्याचप्रमाणें मंगल तोरणें बांधून मोत्यें, फळें आणि फुलें लावून सर्व प्रकारची शोभा आणिली होती. ४६ तेथें अंगावर सुवर्णाचे अलंकार घालून वैदिक ब्राह्मणांची गर्दी झाली होती. सुवासिनी स्त्रियाही स्वर्णभूषणें कंठात घालून मंडपांत सर्वत्र अधिष्ठित झाल्या होत्या. ४७ नगारे, दुंदुभि यांचे घोषांनी आणि गीतनृत्यांनी दुमदुमून गेलेल्या त्या मंडपांत दिव्य रत्नांनीं जडित अशा सुवर्णाच्या सिंहासनावर ( जनकानें ) रामाला बसविलें.

कौशिकं चैव शतानंदः पुरोहितः । यथाक्रमं पूजयित्वा रामस्योभयपा
र्श्वयोः ॥ ४९ ॥ स्थापयित्वा स तत्राग्निं ज्वालयित्वा यथाविधि
सीतामानीय शोभाढ्यां नानारत्नविभूषिताम् ॥ ५० ॥ सभार्यो जनकः
प्रायाद्रामं राजीवलोचनम् । पादौ प्रक्षाल्य विधिवत्तदपो मूर्ध्न्यधारयत्
॥ ५१ ॥ या धृता मूर्ध्नि शर्वेण ब्रह्मणा मुनिभिः सदा । ततः सीतां
करे धृत्वा साक्षतोदकपूर्वकम् ॥ ५२ ॥ रामाय प्रददौ प्रीत्या पाणि-
ग्रहविधानतः । सीता कमलपत्राक्षी स्वर्णमुक्तादिभूषिता ॥ ५३ ॥
दीयते मे सुता तुभ्यं प्रीतो भव रघूत्तम । इति प्रीतेन मनसा सीतां
रामकरेऽर्पयन् ॥ ५४ ॥ मुमोद जनको लक्ष्मीं क्षीराब्धिरिव विष्णवे ।

४८ शतानंद पुरोहितानें वसिष्ठाला आणि विश्वामित्राला रामाच्या दोहों बाजूंला बसवून अनुक्रमें त्यांची पूजा केली. ४९ मग जनकानें भार्येसह तेथें अग्नीची स्थापना केली, आणि यथाविधि होम झाल्यावर तो नानारत्नभूषणांनीं सुशोभित अशा सीतेला आणविता झाला. मग कमलनयन रामाकडे जाऊन त्यानें यथाविधि त्याचे पाय धुतले आणि तें उदक मस्तकावर धारण केलें. ५०,५१ हें उदक शंकरानें, ब्रह्मदेवानें आणि अनेक मुनींनी मस्तकावर धरिलें आहे. नंतर सीतेला हातीं धरून आणि अक्षतायुक्त उदक रामाच्या हातावर देऊन संतोषानें पाणिग्रहणविधीप्रमाणें ती—सीता—रामाला देता झाला. त्या वेळीं 'ही माझी मुलगी सीता मी तुला देत आहें, हिचे नेत्र कमलपत्रासमान आहेत; सोन्यामोत्यांचे भूषणांनीं ही सुशोभित झाली आहे. हे रघूत्तमा! संतुष्ट हो,' असें म्हणून संतुष्ट मनानें (जनकानें) सीता रामाच्या हातीं दिली. ५२, ५३, ५४ लक्ष्मी विष्णूला दिल्यानें क्षीरसागराला जसा आनंद झाला, तसाच आनंद ह्या वेळीं जनकाला झाला. पुढें त्यानें आपली औरस

१. क्षीरसागर—दुग्धसमुद्र. याचे मथन होऊन त्यांतून चतुर्दश रत्नें निघालीं, त्यांपकीं लक्ष्मी ही एक होय. म्हणून क्षीरसागर हा लक्ष्मीचा पिता. अनेक सुरासुरमुनी लक्ष्मीनें आपणास वरावें अशी उत्कट इच्छा करित असता त्यांतून सर्वगुणसंपन्न व दोषरहित अशा विष्णूच्याच गळ्यांत लक्ष्मीनें माळ घातली तें पाहून तिच्या पित्याला क्षीरसागराला धन्यता वाटली. 'जेथें जेथे सुश्रुततपइज्यादीष्ट्य गुण जना दिसती, । तेथें तेथें पाहे बहुधा दोषासि ती अनादि सती ॥ ऐसा विचार करिता श्री श्रीपुरुषोत्तमासि पाहूनी, । चित्तीं म्हणे, सुमंगळ वर हाचि, न अन्य धन्य याहूनी' ॥—अमृतमथन.

ऊर्मिला चोरसीं कन्यां लक्ष्मणाय ददौ मुदा ॥ ५५ ॥ तथैव श्रुत-
कीर्ति च मांडवीं भ्रातृकन्यके । भरताय ददावेकां शत्रुघ्नायापरां ददौ
॥ ५६ ॥ चत्वारो दारसंपन्ना भ्रातरः शुभलक्षणाः । विरेजुः प्रभया
सर्वे लोकपाला इवापरे ॥ ५७ ॥ ततोऽब्रवीद्वसिष्ठाय विश्वामित्राय
मैथिलः । जनकः स्वसुतोदंतं नारदेनाभिभाषितम् ॥ ५८ ॥ यज्ञभूमि-
विशुद्ध्यर्थं कर्षतो लांगलेन मे । सीतामुखात्समुत्पन्ना कन्यका शुभ-
लक्षणा ॥ ५९ ॥ तामद्राक्षमहं प्रीत्या पुत्रिकाभावभाविताम् । अर्पिता
प्रियभार्यायै शरच्चंद्रनिभानना ॥ ६० ॥ एकदा नारदोऽभ्यागाद्विविक्ते
मयि संस्थिते । रणयन्महतीं वीणां गायन्नारायणं विभुम् ॥ ६१ ॥
पूजितः सुखमासीनो मामुवाच सुखान्वितः । शृणुष्व वचनं गुह्यं तवा-
भ्युदयकारणम् ॥ ६२ ॥ परमात्मा हृषीकेशो भक्तानुग्रहकाम्यया ।
देवकार्यार्थसिद्ध्यर्थं रावणस्य वधाय च ॥ ६३ ॥ जातो राम इति

मुलगी ऊर्मिला परम आनंदानें लक्ष्मणाला दिली. ५५ त्याचप्रमाणें आपल्या भावाच्या दोन मुली, मांडवी आणि श्रुतकीर्ति ह्या नांवाच्या होत्या, त्यापैकी एक—मांडवी—भरताला व दुसरी—श्रुतकीर्ति—शत्रुघ्नाला देता झाला. ५६ अशा रीतीनें ते शुभलक्षणसंपन्न चौघे बंधु विवाहित झाल्यावर आपल्या तेजानें दुसरे लोकपा[1]लच कीं काय असे शोभले. ५७ नंतर त्या मिथिलाधिप जनकानें वसिष्ठाला आणि विश्वामित्राला नारद मुनीनें सांगितलेली आपल्या कन्येची—सीतेची—हकीकत निवेदन केली. ५८ तो म्हणाला, ' यज्ञभूमि शुद्ध करण्याकरितां मी नांगरानें नांगरीत असतां फाळानें पडलेल्या रेघेंतून एक शुभ लक्षणाची मुलगी बाहेर निघाली. ५९ तिला प्रेमपूर्वक आपल्या कन्येसारखीच मानून मी माझ्या प्रिय पत्नीच्या स्वाधीन केलें. ६० पुढें कोणी एके वेळीं मी एकांतांत असतां नारदमुनि आपली 'महती ' नांवाची वीणा वाजवीत आणि प्रभु नारायणाचे गुण गात मजकडे आला. ६१ माझी पूजा घेऊन संतुष्ट मनानें स्वस्थ बसला असतां मुनि मला म्हणाला, ' मी कांहीं गुह्य गोष्ट सांगणार आहें, ती एक तुझ्याच अभ्युदयाला ती कारण होणार आहे. ६२ परमात्मा हृषीकेश भक्तांवर अनुग्रह करण्याच्या इच्छेनें, त्याचप्रमाणें देवांची कार्यसिद्धि

[1] चार प्रमुख दिशांचे चार दिक्पाल—इंद्र, वरुण, यम आणि सोम.

ख्यातो मायामानुषवेषधृक् । आस्ते दाशरथिर्भूत्वा चतुर्धा परमेश्वरः ॥ ६४ ॥ योगमायाऽपि सीतेति जाता वै तव वेश्मनि । अतस्त्वं राघवायैव देहि सीतां प्रयत्नतः ॥ ६५ ॥ नान्येभ्यः पूर्वभार्यैषा रामस्य परमात्मनः । इत्युक्त्वा प्रययौ देवगतिं देवमुनिस्तदा ॥ ६६ ॥ तदारभ्य मया सीता विष्णोर्लक्ष्मीर्विभाव्यते । कथं मया राघवाय दीयते जानकी शुभा ॥ ६७ ॥ इति चिंतासमाविष्टः कार्यमेकमचिंतयम् । मत्पितामहगेहे तु न्यासभूतमिदं धनुः ॥ ६८ ॥ ईश्वरेण पुरा क्षिप्तं पुरदाहादनंतरम् । धनुरेतत्पणं कार्यमिति चिंत्य कृतं तथा ॥ ६९ ॥ सीतापाणिग्रहार्थाय सर्वेषां माननाशनम् । त्वत्प्रसादान्मुनिश्रेष्ठ रामो राजीवलोचनः ॥ ७० ॥ आगतोऽत्र धनुर्द्रष्टुं फलितो मे मनोरथः । अद्य मे सफलं जन्म राम त्वां सह सीतया ॥ ७१ ॥ एकासनस्थं पश्यामि भ्राजमानं रविं यथा । त्वत्पादांबुधरो ब्रह्मा सृष्टिचक्रप्रवर्तकः

आणि रावणवध करण्याकरिता राम नांवानें पृथ्वीवर जन्माला आला आहे. मायेनें मनुष्यरूप धारण करणारा तो परमेश्वर दशरथाचे पोटीं चार रूपानी अवतरला आहे. ६३,६४ योगमाया देखील सीता या नांवानें तुझ्या घरी जन्माला आली आहे. म्हणून तूं प्रयत्नपूर्वक सीता रामाला दे. ६५ दुसऱ्या कोणाला नको. ही त्या रामरूप परमात्म्याची पूर्वभार्या—योगमाया—आहे.' असं बोलून तो देवर्षि—नारद—स्वर्गलोकाला निघून गेला. ६६ तेव्हापासून ही सीता म्हणजे विष्णूची लक्ष्मीच होय, असें मी समजत आहें. आतां ही सुलक्षणी जानकी रामाला कशा रीतीनें देतां येईल, या चिंतेंत मी पडलों असतां एक उपाय मला सुचला. हें धनुष्य माझ्या आजाच्या वेळेपासून ठेव म्हणून आमच्या घरी शंकरानें ठेवलेलें आहे. ६७,६८ पूर्वी त्रिपुरासुराची पुरें शंकराकडून जाळली गेल्यानंतर लगेच हें आमच्याकडे ठेवण्यांत आलें. आणि सीतास्वयंवर प्रसंगी या धनुष्याचा पण लावावा असें ठरवून मी तसें केलें. ६९ हें धनुष्य सीतेच्या पाणिग्रहणाकरितां आलेल्या सर्वांचा गर्व दूर करण्यास कारण झालें आहे. हे मुनिश्रेष्ठा ! आपल्या प्रसादानें हा कमलनयन राम धनुष्य पाहण्याकरितां म्हणून येथें आला व माझा मनोरथ सफळ झाला. हे रामा ! सूर्याप्रमाणें देदीप्यमान अशा तुला सीतेसहवर्तमान एकासनावर बसलेला पाहून आज माझें जन्माचें सार्थक झालें आहे. सृष्टिचक्र चालविणारा ब्रह्मदेव तुझें चरणोदक मस्तकीं

॥ ७२ ॥ बलिस्त्वत्पादसलिलं धृत्वाऽभूद्दिविजाधिपः । त्वत्पादपांसु-
संस्पर्शादहल्या भर्तृशापतः ॥ ७३ ॥ सद्य एव विनिर्मुक्ता कोऽन्यस्त्व-
त्ताऽधिरक्षिता ॥ ७४ ॥ यत्पादपंकजपरागसुरागयोगिवृंदैर्जितं भवभयं
जितकालचक्रैः । यन्नामकीर्तनपरा जितदुःखशोका देवास्तमेव शरणं
सततं प्रपद्ये ॥ ७५ ॥ इति स्तुत्वा नृपः प्रादाद्राघवाय महात्मने ।
दीनारगणां कोटिशतं रथानामयुतं तदा ॥ ७६ ॥ अश्वानां नियुतं
प्रादाद्गजानां षट्शतं तथा । पत्तीनां लक्षमेकं तु दासीनां त्रिशतं ददौ
॥ ७७ ॥ दिव्यांबराणि हारांश्च मुक्तारत्नमयोज्ज्वलान् । सीतायै
जनकः प्रादात्प्रीत्या दुहितृवत्सलः ॥ ७८ ॥ वसिष्ठादीन्सुसंपूज्य भरतं
लक्ष्मणं तथा । पूजयित्वा यथान्यायं तथा दशरथं नृपम् ॥ ७९ ॥

धारण करिता. ७०,७१,७२ बलीनें तुझें चरणतीर्थ मस्तकीं धारण केलें, म्हणूनच त्याला इंद्रपदाची प्राप्ति झाली. तुझ्या चरणरजाच्या संस्पर्शानें अहल्या पातिशापापासून तत्काळ मुक्त झाली. तुझ्याहून मोठा असा दुसरा रक्षण कर्ता कोण आहे ? ७३,७४ ज्याच्या चरणकमलावर अत्यंत प्रेम ठेवून, कालचक्रालाही स्वाधीन ठेवणार योगिजन संसारभयाचा पाडाव करण्यास समर्थ झाले, त्याचप्रमाणें ज्याच्या नामसंकीर्तनानें देव आपलीं दु.खें आणि शोक दूर करूं शकले, त्याला-रामचंद्राला-मी शरण आहें ' ७५ अशी रामाची स्तुति करून जनकराजानें त्या महात्म्या राघवाला त्या वेळीं शंभर कोटी दीनार, दहा सहस्र रथ, दहा लक्ष घोडे, सहाशें हत्ती, एक लक्ष पायदळ आणि तीनशें दासी दिल्या ७६, ७७ कन्येवर त्याचें फार प्रेम असल्यामुळें त्यानें सीतेला सुंदर सुंदर उंची वस्त्रें आणि मोत्यांचे आणि रत्नांचे तेजस्वी हार, प्रेमपुरस्सर दिले. ७८ वसिष्ठादिकांची उत्तम पूजा करून भरत, लक्ष्मण आणि राजा दशरथ ह्यांचा त्यानें यथायोग्य सत्कार केला. ७९

१ पूर्वकाळी बलि म्हणून एक विख्यात चक्रवर्ती राजा होऊन गेला. तो विष्णुभक्त प्रल्हादाचा पुत्र होता तो अत्यंत सदाचरणी असून त्याची दातृत्वकीर्ति दिगंतरीं पसरली होती ' एष दानवदैत्यानामग्रणीः कीर्तिवर्धन । अजैषीदजया माया सीदन्नपि न मुह्यति ' ॥- भागवत २. चित्तवृत्तिनिरोध करणारें, योगानें एकाग्रता साधून परमेश्वराचे ध्यानांत रत होतात ते योगी. योगाचे प्रकार अनेक आहेत

प्रस्थापयामास नृपो राजानं रघुसत्तमम् । सीतामालिंग्य रुदतीं मातरः साश्रुलोचनाः ॥ ८० ॥ श्वश्रूशुश्रूषणपरा नित्यं राममनुव्रता । पातिव्रत्यमुपालंब्य तिष्ठ वत्से यथासुखम् ॥ ८१ ॥ प्रयाणकाले रघुनंदनस्य भेरीमृदंगानकतूर्यघोषः । स्वर्वासिभेरीघनतूर्यशब्दैः संमूर्च्छितो भूतभयंकरोऽभूत् ॥ ८२ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे बालकांडे षष्ठः सर्गः ॥ ६ ॥

## बालकांड, सातवा सर्ग.



॥ सूत उवाच ॥ अथ गच्छति श्रीरामे मैथिलाद्योजनत्रयम् । निमित्तान्यतिघोराणि ददर्श नृपसत्तमः ॥ १ ॥ नत्वा वसिष्ठं पप्रच्छ किमिदं मुनिपुंगव । निमित्तानीह दृश्यंते

आणि अशा रीतीने त्या रघुकुलश्रेष्ठ राजाची बोळवण केली. ( सासरी जातांना ) सीतेला रडूं कोसळलें, तिच्या मातांच्याही डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. तरीही त्यांनी तिला आलिंगून उपदेश केला. ८० ( त्या म्हणाल्या ) 'वत्से' सासूची नीट शुश्रूषा करीत जा, रामाच्या सेवेंत नित्य तत्पर रहा, आणि पातिव्रत्यधर्माचें पालन करून नित्य सुखांत रहा.' ८१ रामचंद्राचे प्रयाणकाळी नगारे, मृदंग, आनक, शिंगें इत्यादि वाद्यांचा एकच घोष झाला. त्यांतच स्वर्गातील ( देवादिकांनीं ) वाजविलेल्या भेरी, झांजा, तुताऱ्या वगैरेंचा नाद मिळून इतका मोठा गजर झाला कीं, समस्त प्राणिवर्गाला त्याची मोठी भीति वाटली." ८२

**बालकांड, सहावा सर्ग समाप्त.**

सूत म्हणाले, " पुढें श्रीराम मिथिला नगरी सोडून तीन योजनें—बारा कोस—चालून गेले नसतील, तोंच त्या नृपश्रेष्ठ दशरथ राजाला अति भयंकर असे विपरीत शकुन होऊं लागले. १ त्यावर वसिष्ठाला नमन करून 'हे मुनिश्रेष्ठा ! चारी बाजूंला

१. सदृश उतारा:—' शुश्रूषस्व गुरून् कुरु प्रियसखीवृत्तिं सपत्नीजने । भर्तुर्विप्रकृतापि रोषणतया मा स्म प्रतीपं गमः ॥ भूयिष्ठं भव दक्षिणा परिजने भाग्येष्वनुत्सेकिनी । यान्त्येवं गृहिणीपदं युवतयो वामाः कुलस्याधयः ' ॥—शाकुंतल ४.

विषमाणि समंततः ॥ २ ॥ वसिष्ठस्तमथ प्राह भयमागाम सूच्यते ।
पुनरप्यभयं तेऽद्य शीघ्रमेव भविष्यति ॥ ३ ॥ मृगाः प्रदक्षिणं यांति
पश्य त्वां शुभसूचकाः । इत्येवं वदतस्तस्य ववौ घोरतरोऽनिलः ॥ ४ ॥
मुष्णंश्चक्षूंपि सर्वेषां पांसुवृष्टिभिरर्दयन् । ततो व्रजन्ददर्शाग्रे तेजोराशिमु-
पस्थितम् ॥ ५ ॥ कोटिसूर्यप्रतीकाशं विद्युत्पुंजसमप्रभम् । तेजोराशिं
ददर्शाथ जामदग्न्यं प्रतापवान् ॥ ६ ॥ नीलमेघनिभं प्रांशुं जटामंडल-
मंडितम् । धनुः परशुपाणिं च साक्षात्कालमिवांतकम् ॥ ७ ॥ कार्तवी-
र्यांतकं रामं दृप्तक्षत्रियमर्दनम् । प्राप्तं दशरथस्याग्रे कालमृत्युमिवापरम्

अशुभ चिन्हं दिसत आहेत, तरी हें काय आहे ? ’ असें त्यानें विचारिलें. २ तेव्हां वसिष्ठ म्हणाले, ‘ पुढें कांही तरी संकट येणार त्याची ही आगाऊ सूचना आहे ! तरीही आज हें तुझें भय लवकरच निघून जाणार आहे. ३ हे पहा हरिण तुझ्या उजवीकडून जात आहेत, त्यावरून ते तुझें कल्याण सुचवीत आहेत.’ असें तो वसिष्ठ बोलत आहे, तोंच भयंकर वारा वाहूं लागला ४ त्यामळें सर्वांस अत्यंत कष्ट झाले. त्यातच धुळीची जणु वृष्टिच होऊन कोणालाही दिसेनासें झालें. अशा स्थितींत पुढें जात असतां आपल्यापुढें एक तेजोराशिच येत आहे कीं काय असें ( दशरथाच्या ) दृष्टीस पडलें. ५ नंतर तेथेंच प्रभेनें विजेच्या गोळ्याप्रमाणें किंवा कोटिसूर्यांसमान शोभणाऱ्या अशा तेजःपुंज जमदग्निपुत्राला–परशुरामाला –तो प्रतापशाली–दशरथ–पाहता झाला. ६ त्याची अंगकांति कृष्णवर्ण मेघा-प्रमाण होती त्याची उंची फार होती. मस्तकावर जटाभार शोभत होता आणि हातांत धनुष्य आणि परशु हीं आयुधें होतीं. त्याला पाहून सर्वांचा संहार करणारा हा मूर्तिमंत मृत्युच कीं काय असा भास होत होता. ७ कार्तवीर्याचा अंत करणारा व उन्मत्त क्षत्रियांचा नाश करणारा आणि दुसरा कालच कीं काय, असा भासणारा

१ या अशुभ चिन्हांचें वर्णन पुढीलप्रमाणे एकनाथांनी केलें आहे –‘ राजा वसिष्ठ सकळ जन । समारंभें समगमान । चालती सुखसंपन्न । तों पुढें अपशकुन देखती ॥ सव्य जाताति पै रासभ । अपसव्य जाती वायस । मयूरें गाळिती पीस । सर्प मुंगुस भांडती ॥ भालुवा भुंकिती सन्मुख । पक्षी करकरिती अभिमुख । युद्ध होईल अचुक । थोर धुकधुक रामास ॥–भावार्थरामायण २ त्या वेळचें परशुरामाचें वर्णन कालिदासानें केलें आहे तें असें – ‘ तेजसः सपदि राशिरुत्थितः, प्रादुरास किल वाहिनीमुखे । यः प्रमृज्य नयनानि सैनिकाः लक्षणीयपुरुषाकृतिश्चिरात् ’ ॥

॥ ८ ॥ त दृष्ट्वा भयसंत्रस्तो राजा दशरथस्तदा । अर्घ्यादिपूजां विस्मृत्य त्राहि त्राहीति चाब्रवीत् ॥ ९ ॥ दंडवत्प्रणिपत्याह पुत्रप्राणं प्रयच्छ मे । इति ब्रुवंतं राजानमनादृत्य रघूत्तमम् ॥ १० ॥ उवाच निष्ठुरं वाक्यं क्रोधात्प्रचलितेंद्रियः । त्वं राम इति नाम्ना मे चरसि क्षत्रियाधम ॥ ११ ॥ द्वंद्वयुद्धं प्रयच्छाशु यदि त्वं क्षत्रियोऽसि वै । पुराणं जर्जरं चापं भंक्त्वा त्वं कत्थसे मुधा ॥ १२ ॥ अस्मिंस्तु वैष्णवे चाप आरोपयसि चेद्गुणम् । तदा युद्धं त्वया सार्धं करोमि रघुवंशज ॥ १३ ॥ नो चेत्सर्वान्हनिष्यामि क्षत्रियांतकरो ह्यहम् । इति ब्रुवति वै तस्मिंश्चचाल वसुधा भृशम् ॥ १४ ॥ अंधकारो बभूवाथ सर्वेषामपि चक्षुषाम् । रामो दाशरथिर्वीरो वीक्ष्य तं भार्गवं रुषा ॥ १५ ॥ धनुराच्छिद्य तद्धस्तादारोप्य गुणमंजसा । तूणीराद्बाणमादाय संधायाकृष्य वीर्यवान्

तो भार्गवराम दशरथाच्या पुढें येऊन ठेपला. ८ त्याला पाहून दशरथ राजा भयभीत होऊन गेला आणि अर्घ्यादिकांनीं करावयाची पूजा विसरून 'जीवदान द्या, जीवदान द्या' असें बोलूं लागला. ९ साष्टांग नमस्कार घालून 'माझ्या पुत्रांना प्राणदान द्या,' असें बोलणाऱ्या त्या रघुश्रेष्ठ राजाचा—दशरथाचा—अवमान करून (रामाला) कठोर भाषण बोलण्यास परशुरामानें आरंभ केला. त्या वेळीं त्याचें सर्वांग क्रोधानें थर थर कांपत होतें. तो म्हणाला, 'क्षत्रियाधमा ! तूं माझें 'राम' हें नांव धारण करून पृथ्वीवर फिरत आहेस. १०, ११ जर तूं खरोखर क्षत्रिय असशील, तर माझ्याशी द्वंद्वयुद्धाला तयार हो. आधींच जुनें आणि जीर्ण असें धनुष्य मोडून तूं व्यर्थ आपली बढाई सांगत आहेस. १२ हे रघुकुलोद्भवा ! तूं ह्या वैष्णव धनुष्यावर दोरी चढविलीस, तरच मी तुझ्याबरोबर युद्ध करीन. १३ नाहींतर मी सर्वांचा वध करीन. मी तर क्षत्रियांचा संहार करणारा आहें.' परशुराम असें बोलत असतां पृथ्वी अत्यंत कांपूं लागली, १४ आणि सर्वांच्या डोळ्यांपुढें अंधारी आली. इकडे दाशरथिरामानें त्या भार्गवरामाकडे क्रोधानें पाहिलें, १५ आणि त्याच्या—परशुरामाच्या—हातांतून तें धनुष्य हिसकावून

१. अर्घ्य.—'आप. क्षीरं कुशाग्रं च दधि सर्पिः सतंडुलम् । यवः सिद्धार्थकश्चैव अष्टांगोऽर्घः प्रकीर्तित' ॥ २. साष्टांग—अष्टांगांनीं युक्तः—'जानुभ्यां च तथा पद्भ्यां पाणिभ्यामुरसा धिया । शिरसा वचसा दृष्ट्या प्रणामोऽष्टांग ईरितः' ॥

॥ १६ ॥ उवाच भार्गवं रामं शृणु ब्रह्मन्वचो मम । लक्ष्यं दर्शय
बाणस्य ह्यमोघो मम सायकः ॥ १७ ॥ लोकान्पादयुगं वापि वद शीघ्रं
ममाज्ञया । अयं लोकः परो वाथ त्वया गंतुं न शक्यते ॥ १८ ॥ एवं
त्वां हि प्रकर्तव्यं वद शीघ्रं ममाज्ञया । एवं वदति श्रीरामे भार्गवो
विकृताननः ॥ १९ ॥ संस्मरन्पूर्ववृत्तांतमिदं वचनमब्रवीत् । राम राम
महाबाहो जाने त्वां परमेश्वरम् ॥ २० ॥ पुराणपुरुषं विष्णुं जगत्सर्ग-
लयोद्भवम् । बाल्येऽहं तपसा विष्णुमाराधयितुमंजसा ॥ २१ ॥ चक्र-
तीर्थं शुभं गत्वा तपसा विष्णुमन्वहम् । अतोषयं महात्मानं नारायणम-
नन्यधीः ॥ २२ ॥ ततः प्रसन्नो देवेशः शंखचक्रगदाधरः । उवाच मां
रघुश्रेष्ठ प्रसन्नमुखपंकजः ॥ २३ ॥ ॥ श्रीभगवानुवाच ॥ उत्तिष्ठ
तपसो ब्रह्मन्फलितं ते तपो महत् । मच्चिदंशेन युक्तस्त्वं जहि हैहयपुंग-

घेऊन त्याच्यावर त्यानें सहज दोरी चढविली, आणि भात्यांतून बाण काढून तो जोडून दोरी ओढली नंतर तो वीर्यशाली–राम–परशुरामाला म्हणाला, 'हे ब्राह्मणा ! माझें बोलणें ऐक. माझा बाण अमोघ–कधींही व्यर्थ न जाणारा–असा आहे. तरी ह्याचा कशावर नेम धरूं तें ठिकाण दाखव. १६,१७ मी तुला आज्ञा करीत आहे, बोल लवकर. मी तुझी परलोकगति बंद करूं, की पायांची गति बंद करूं ? असें केल्यानें तुला परलोकीं जातां येणार नाहीं, किंवा ह्या लोकींही फिरतां येणार नाहीं. तुला असेंच केलें पाहिजे. माझ्या आज्ञेनुसार काय तें लवकर सांग.' श्रीराम याप्रमाणें बोलत आहे, तोंच परशुरामाचें तोंड अगदीं उतरलें. १८, १९ आपल्या पूर्ववृत्तांताची आठवण होऊन तो म्हणाला, 'हे महापराक्रमी आनंददायक रामा ! तूं परमेश्वर आहेस हें मी ओळखतों. २० तूं पुराण[1] पुरुष आहेस; जगाची उत्पत्ति, संहार आणि स्थिति करणारा विष्णु[2] तूंच आहेस; ( लहानपणीं ) यथायोग्य तपश्चर्या करून विष्णूची आराधना करण्याकरितां पुण्यकारक अशा चक्रतीर्थी जाऊन तेथें प्रत्येक दिवशीं अनन्यभक्तीनें तपश्चर्या करून त्या महात्मा नारायणाला मी संतुष्ट केलें. २१,२२ नंतर हे रघुश्रेष्ठा ! तो शंखचक्रगदाधारी देवाधिदेव मजवर प्रसन्न झाला त्याचें मुखकमल प्रसन्न दिसत होतें. २३ भगवान्[3] ( नारायण ) म्हणाला 'हे ब्राह्मणा ! ऊठ. तप पुरे कर. ज्याकरितां तूं हे तपाचे

१ सर्व शरीरांत वास करणारा. पुरे–देहे शेते स पुरुषः. २. सगळें विश्व व्यापणारा. ३. ऐश्वर्यवान्. भग–ऐश्वर्य

वम् ॥ २४ ॥ कार्तवीर्यं पितृहणं यदर्थं तपसः श्रमः । ततस्त्रिःसप्तकृत्वस्त्वं हत्वा क्षत्रियमंडलम् ॥ २५ ॥ कृत्स्नां भूमिं कश्यपाय दत्त्वा शांतिमुपावह । त्रेतामुखे दाशरथिर्भूत्वा रामोऽहमव्ययः ॥ २६ ॥ उत्पत्स्ये परया शक्त्या तदा द्रक्ष्यसि मां ततः । मत्तेजः पुनरादास्ये त्वयि दत्तं मया पुरा ॥ २७ ॥ तदा तपश्चर्ँल्लोके तिष्ठ त्वं ब्रह्मणो दिनम् । इत्युक्त्वांतर्दधे देवस्तथा सर्वं कृतं मया ॥ २८ ॥ स एव विष्णुस्त्वं राम जातोऽसि ब्रह्मणार्थितः । मयि स्थितं तु त्वत्तेजस्त्वयैव पुनराहृतम् ॥ २९ ॥ अद्य मे सफलं जन्म प्रतीतोऽसि मम प्रभो । ब्रह्मादिभिरलभ्यस्त्वं प्रकृतेः पारगो मतः ॥ ३० ॥ त्वयि जन्मादिषड्भावा न संत्यज्ञानसंभवाः । निर्विकारोऽसि पूर्णस्त्वं गमनादिविवर्जितः

श्रम घेतलेस, तें तुझें थोर तप फळाला आलें आहे. माझ्या चैतन्यरूप अंशानें तूं युक्त होशील, तुझ्या बापाला ठार मारणाऱ्या हैहयकुलांतील श्रेष्ठ पुरुषाचा ( कार्तवीर्याचा ) वध कर, आणि नंतर एकवीस वेळां क्षत्रियांचा नाश कर, २४,२५ आणि सर्व भूमि कश्यपाला दे. मग तुझ्या मनाला शांति मिळेल. मी तर अव्यय—उत्पत्त्यादि विकाररहित आहें, तरी त्रेतायुगाच्या आरंभीं दाशरथिरामरूपानें जन्माला येणार आहें, तेव्हां त्या माझ्या रूपांत तुजमध्यें मीं ठेविलेल्या शक्तीहून अधिक शक्ति दिसून येईल. तेव्हां मी तुला पूर्वीं दिलेलें माझें तेज परत घेईन. २६,२७ त्यापुढें तूं ब्रह्मदेवाचा एक दिवस भरपर्यंत तप करीत पृथ्वीवर रहा.' असें सांगून देव गुप्त झाला. त्याच्या सांगण्याप्रमाणें मी सर्व केलें आहे. २८ हे रामा ! ब्रह्मदेवाच्या प्रार्थनेवरून अवतार घेणारा तो विष्णुच तूं आहेस. माझ्या ठिकाणीं असलेलें तुझें तेज तूंच आतां परत घेतलें आहेस. २९ हे प्रभो ! आज माझें जन्म सफल झालें, कारण, मायेच्याही पलीकडे असल्यामुळें ब्रह्मादिकांनाही अलभ्य असा जो तूं, तो माझ्या दृष्टीस पडला आहेस. ३० अज्ञानापासून उत्पन्न होणारे सहा भाव तुझ्या ठिकाणीं नाहींत, तुझ्या ठिकाणीं कोणताही विकार नाहीं, तूं ( ज्ञानानें ) पूर्ण आहेस, गमनादि कोणतीही

१. कृत, त्रेता, द्वापर आणि कलि यांपैकीं दुसरें युग त्रेतायुगाचीं वर्षे १२९६००० सांगितलीं आहेत. २. ब्रह्मदेवाचा एक दिवस—चार सहस्र युगें. ३. सहा भाव ( अवस्था ) ( १ ) जायते—उत्पन्न होतो, ( २ ) अस्ति—असतो, (३) वर्धते—वाढतो ( ४ ) विपरिणमते—पूर्णत्वाला येतो ( ५ ) अपक्षीयते—क्षीण होऊं लागतो ( ६ ) नश्यति—नाश पावतो

॥ ३१ ॥ यथा जले फेनजालं धूमो वह्नौ तथा त्वयि । त्वदाधारा
त्वद्विषया माया कार्यं सृजत्यहो ॥ ३२ ॥ यावन्मायावृता लोकास्तावत्त्वां
न विजानते । अविचारितसिद्धैषाऽविद्या विद्याविरोधिनी ॥ ३३ ॥
अविद्याकृतदेहादिसंघाते प्रतिबिंबिता । चिच्छक्तिर्जीवलोकेऽस्मिन् जीव
इत्यभिधीयते ॥ ३४ ॥ यावद्देहमनःप्राणबुद्ध्यादिष्वभिमानवान् ।
तावत्कर्तृत्वभोक्तृत्वसुखदुःखादिभाग्भवेत् ॥ ३५ ॥ आत्मनः संसृति-
र्नास्ति बुद्धेर्ज्ञानं न जात्विति । अविवेकाद्द्वयं युंक्त्वा संसारीति प्रवर्तते
॥ ३६ ॥ जडस्य चिन्समायोगाच्चित्त्वं भूयाच्चितेस्तथा । जडसंगाज्जडत्वं
हि जलाग्न्योर्मेलनं यथा ॥ ३७ ॥ यावत्त्वत्पादभक्तानां संगसौख्यं
न विंदति । तावत्संसारदुःखौघान्न निवर्तेन्नरः सदा ॥ ३८ ॥

क्रिया तुझ्या ठिकाणी नाही. ३१ ज्याप्रमाणें उदकावर फेसाचें जाळें असतें, किंवा अग्नीवर धूर असतो, त्याचप्रमाणें तुझाच आधार असलेली, तुजसंबंधीं माया ही कार्यें उत्पन्न करीत असते. ३२ जोंपर्यंत लोक मायेनें व्यापलेले आहेत, तोंपर्यंत ते तुला जाणणार नाहीत. ही अविद्या (शास्त्रज्ञांकडून) विचार होण्याच्या पूर्वी फार प्राचीन कालापासून सिद्ध आहे—अनादि आहे. ही ज्ञानाला विरोध करणारी आहे. ३३ अज्ञानामुळें उत्पन्न झालेल्या देहादिसमूहांत प्रतिबिंबित असलेली ज्ञानशक्ति या जीवलोकांत 'जीव' म्हणून म्हटली जाते. ३४ जोंपर्यंत जीवाला देह, मन, प्राण, बुद्धि, ह्यांचे ठिकाणी अभिमान असतो, तोंपर्यंत त्याला कर्तृत्व, भोक्तृत्व, सुख, दुःख ही भोगावी लागतात. ३५ आत्म्याला संसार नाहीं, आणि बुद्धीला ज्ञान नाही, ती अचेतन आहे. पण अविचारानें हा—जीव—त्या दोघांना जोडून—दोहोंबद्दल अभिमान धारण करून—मी 'संसारी' म्हणून व्यवहार करितो. ३६ चैतन्याच्या समागमानें जड पदार्थावर चैतन्याचे धर्म होतात, त्याचप्रमाणें चैतन्यावरही जडाचे समागमानें जडाचे धर्म होतात. ह्याला उदाहरण म्हणजे जल आणि अग्नि यांचा संयोग हें होय. ३७ जोंपर्यंत मनुष्याला तुझ्या पायांची सेवा करणाऱ्या भक्तजनांच्या संगतीचा लाभ मिळत नाही, तोंपर्यंत संसाराच्या

१ सदृश उतारा—'धूमेनाव्रियते वह्निर्यथादर्शो मलेन च । यथोल्बेनावृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम्'—भ. गीता ३. २ उदक जड असताही अग्नीच्या समागमानें विद्युल्लतेच्या रूपानें प्रकाश पावूं लागतें व विद्युल्लतेचा प्रकाश उदकाच्या समागमात आपलें स्वरूप टाकतो—अप्रकाश होतो.

त्संगलब्धया भक्त्या यदा त्वां समुपासते । तदा माया शनैर्याति ानवं प्रतिपद्यते ॥ ३९ ॥ ततस्त्वज्ज्ञानसंपन्नः सद्गुरुस्तेन लभ्यते । ाक्यज्ञानं गुरोर्लब्ध्वा त्वत्प्रसादाद्विमुच्यते ॥४०॥ तस्मात्त्वद्भक्तिहीनानां कल्पकोटिशतैरपि । न मुक्तिशंका विज्ञानशंका नैव सुखं तथा ॥ ४१ ॥ अतस्त्वत्पादयुगले भक्तिर्मे जन्मजन्मानि । स्यात्त्वद्भक्तिमतां संगोऽविद्या याभ्यां विनश्यति ॥ ४२ ॥ लोके त्वद्भक्तिनिरतास्त्वद्धर्मामृतवर्षिणः । पुनंति लोकमखिलं किं पुनः स्वकुलोद्भवान् ॥ ४३ ॥ नमोऽस्तु जगतां नाथ नमस्ते भक्तिभावन । नमः कारुणिकानन्त रामचंद्र नमोऽस्तु ते

दुःखप्रवाहापासून तो मुक्त होत नाहीं. ३८ सत्पुरुषांच्या समागमानें तुजविषयीं भक्ति उत्पन्न होऊन जेव्हां लोक तुला भजतात, तेव्हां माया हळूहळू क्षीण होत जाते—त्यांच्यापासून दूर होते. ३९ नंतर तुझ्या स्वरूपाचें यथार्थ ज्ञान असणाऱ्या सद्गुरूची त्या मनुष्याला प्राप्ति होते, आणि तुझ्या प्रसादानें त्या गुरूपासून 'तत्त्वमसि' या महावाक्याचें ज्ञान प्राप्त होऊन तो मुक्त होतो. ४० म्हणून तुझी भक्ति नसणाऱ्यांना शेंकडो कोटि कल्पांतीं तरी मोक्ष मिळेल, ज्ञान मिळेल, किंवा सुख मिळेल, अशी शंका देखील घेऊं नये. ४१ म्हणून जन्मोजन्मीं तुझ्या पदयुगीं माझी भक्ति जडो, आणि तुझ्या भक्तांचा समागम मला घडो. या दोहोंमुळेंच अज्ञान नष्ट होत असतें. ४२ लोकांमध्यें तुझ्या भक्तींत तत्पर आणि तुझ्या धर्मामृताची—तत्त्वज्ञानामृताची—वृष्टि करणारे सर्व जगाला पावन करूं शकतात, मग आपल्या स्वतःच्या वंशजांना ते करितील, यांत सांगायाचें तें काय ? ४३ हे जगन्नाथा ! तुला नमस्कार असो. हे भक्तीनें वश होणाऱ्या ! तुला नमस्कार असो. हे करुणामूर्ते ! हे अनंता ! हे रामचंद्रा ! तुला नमस्कार

१. सत्संगमहिमा –'दूरीकरोति कुमतिं विमलीकरोति चेतश्चिरंतनमघं चुलुकीकरोति । भूतेषु किंच करुणां बहुलीकरोति सङ्गः सतां किमुत मंगलमातनोति' ॥–अन्योक्तिविलास. २. 'तें तूं आहेस'–जीवशिवांचें ऐक्य शिकविणारें अद्वयज्ञान. ३. मोरोपंतांनीं केकावलींत असेंच मागणें परमेश्वराकडे मागितलें आहे —'सुसंगति सदा घडो, सुजनवाक्य कानीं पडो। कलंक मतिचा झडो, विषय सर्वथा नावडो, । सदंघ्रिकमलीं दडो, मुरडितां हटानें अडो । वियोग घडतां रडो, मन भवच्चरित्रीं जडो ॥ १. न निश्चय कधीं ढळो, कुजनविघ्नबाधा टळो । न चित्त भजनीं चळो, मति सदुक्तमार्गीं वळो । स्वतत्त्व हृदया कळो, दुरभिमान सारा गळो । पुन्हां न मन हें मळो, दुरित आत्मबोधें जळो' ॥ २ –केका ११८, ११९.

॥ ४४ ॥ देव यद्यत्कृतं पुण्यं मया लोकजिगीषया । तत्सर्वं तव बाणाय
भूयाद्राम नमोऽस्तु ते ॥ ४५ ॥ ततः प्रसन्नो भगवान् श्रीरामः करु-
णामयः । प्रसन्नोऽस्मि तव ब्रह्मन्यत्ते मनसि वर्तते ॥ ४६ ॥ दास्ये
तदखिलं कामं मा कुरुष्वात्र संशयम् । ततः प्रीतेन मनसा भार्गवो
राममब्रवीत् ॥ ४७ ॥ यदि मेऽनुग्रहो राम तवास्ति मधुसूदन । त्वद्भ-
क्तसंगस्त्वत्पादे दृढा भक्तिः सदाऽस्तु ते ॥ ४८ ॥ स्तोत्रमेतत्पठेद्यस्तु
भक्तिहीनोऽपि सर्वदा । त्वद्भक्तिस्तस्य विज्ञानं भूयादंते स्मृतिस्तव
॥ ४९ ॥ तथेति राघवेणोक्तः परिक्रम्य प्रणम्य तम् । पूजितस्तदनु-
ज्ञातो महेंद्राचलमन्वगात् ॥ ५० ॥ राजा दशरथो हृष्टो रामं मृतमिवा-
गतम् । आलिंग्यालिंग्य हर्षेण नेत्राभ्यां जलमुत्सृजत् ॥ ५१ ॥ ततः

असो. ४४ देवा ! लोकांना जिंकण्याच्या इच्छेनें जें जें पुण्य मी केलें असेल, तें तें सर्व तुझ्या बाणाला होवो !—बाणानें नाशाला जावो ! हे रामा ! तुला नमस्कार असो !' ४५ नंतर करुणामय भगवान् श्रीराम प्रसन्न होऊन म्हणाला, 'ब्राह्मणा ! मी तुला प्रसन्न आहें. तुझ्या मनात जें कांहीं आहे, तें सर्व मी तुला देईन. ह्यासंबंधीं संशय धरूं नकोस' नंतर संतुष्ट अंतःकरणानें परशुराम रामाला म्हणाला, ४६, ४७ 'हे मधुसूदना रामा ! तुझी जर मजवर कृपा असेल, तर तुझ्या भक्ताचा समागम आणि तुझ्या चरणीं दृढ भक्ति हीं सर्वदा मला असोत. ४८ जो कोणी, मग तो भक्तिहीन का असेना, हें स्तोत्र सदा पठण करील, त्याला तुझी भक्ति, विज्ञान आणि अंतकालीं तुझें स्मरण हीं प्राप्त होवोत. ४९ रामानें 'बरें आहे,' असें म्हणून त्या परशुरामाची पूजा केली, आणि त्याला जाण्याला अनुज्ञा दिली. मग परशुरामानें रामाला प्रदक्षिणा घातली आणि त्याला नमस्कार केला. मग परशुराम रामाच्या अनुज्ञेनें महेंद्र पर्वतावर निघून गेला. ५० इकडे दशरथ राजाला रामाचा पुनर्जन्म झाल्यासारखे वाटून हर्ष झाला. आनंदानें त्यानें रामाला वरचेवर आलिंगन दिलें. त्याच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. ५१ नंतर स्वस्थचित्त

१ मधु नांवाचा एक दैत्य होता त्याचा वध विष्णूनें केला आहे. २ 'राघवोऽपि चरणौ तपोनिधेः । क्षम्यतामिति वदन् समस्पृशत् ॥ निर्जितेषु तरसा तरस्विना शत्रुषु प्रणतिरेव कीर्तये ॥—रघुवंश.

प्रीतेन मनसा स्वस्थचित्तः पुरं ययौ । रामलक्ष्मणशत्रुघ्नभरता देवसंमेताः ॥ ५२ ॥ स्वां स्वां भार्यामुपादाय रेमिरे स्वस्वमंदिरे । मातापितृभ्यां संहृष्टो रामः सीतासमन्वितः ॥ ५३ ॥ रेमे वैकुंठभवने श्रिया सह यथा हरिः । युधाजिन्नाम कैकेयीभ्राता भरतमातुलः ॥ ५४ ॥ भरतं नेतुमागच्छत्स्वराज्यं प्रीतिसंयुतः । प्रेषयामास भरतं राजा स्नेहसमन्वितः ॥ ५५ ॥ शत्रुघ्नं चापि संपूज्य युधाजितमरिंदमः । कौसल्या शुशुभे देवी रामेण सह सीतया । देवमातेव पौलोम्या शच्या शक्रेण शोभना ॥ ५६ ॥ साकेते लोकनाथप्रथितगुणगणो लोकसंगीतकीर्तिः ।

होऊन संतुष्ट अंतःकरणानें आपल्या पुराला—अयोध्येला—तो जाता झाला. तेथें देवासारखे ते राम, लक्ष्मण, शत्रुघ्न आणि भरत आपापल्या पत्नीला घेऊन आपापल्या मंदिरांत आनंदानें राहूं लागले. लक्ष्मीच्या संगतीत ज्याप्रमाणें विष्णु वैकुंठांत आनंदात असतो, त्याचप्रमाणें मातापितरांकडून सर्वदा संतुष्ट ठेवलेला श्रीराम सीतेच्या संगतीत (अयोध्येंत) आनंदानें राहूं लागला. पुढें युधाजित् नांवाचा कैकेयीचा बंधु आणि भरताचा मामा प्रेमानें भरताला आपल्या राज्यात नेण्यासाठी आला. त्यावर त्या शत्रुनाशन राजा (दशरथा)नें स्नेहयुक्त अंतःकरणानें युधाजिताचा आदरसत्कार करून भरताला आणि शत्रुघ्नाला त्याजबरोबर पाठविलें. ज्याप्रमाणें देवांची माता—अदिति—इंद्रइंद्राणीसह शोभते, त्याचप्रमाणें ती भाग्यवती कौसल्या राम आणि सीता यांच्या सान्निध्यांत शोभूं लागली. ५२,५३,५४,५५,५६ लोकनाथ इंद्रादिकानी ज्याचे गुण ( गाऊन ) प्रसिद्ध केले आहेत, पृथ्वीवरील लोकांनी ज्याची कीर्ति गाइली आहे, ज्याची मूर्ति पाहिल्यानें सर्व जनसमहाला आनंदाचें भरतें येतें, ज्याला विकार म्हणून कोणताच नाही, ज्याच्या ऐश्वर्याला मर्यादा नाही, जो नित्य मायेचा निरास करूनही मायेच्या कार्यास अनुसरत आहे, असा सर्व जगाचा चालक,

१ सर्व विश्वाचा चालक ईश्वर —' तो विश्वश्रियेचा भर्ता । मीचि गा येथ पंडुसुता । मी गोसावी समस्ता । त्रैलोक्याचा ॥ आकाशें सर्वत्र वसावें । वायूनें नावभरी उगें नसावें । पावकें दाहावें । वर्षावें जळें ॥ पर्वतीं बैसका न सडावी । समुद्रीं रेखा नोलांडावी । पृथ्वीया भूतें वाहावीं । हे आज्ञा माझी ' ॥ ज्ञानेश्वरी

श्रीरामः सीतयास्तेऽखिलजननिकरानंदसंदोहमूर्तिः ॥ नित्यश्रीर्निर्विकारो निरवधिविभवो नित्यमायानिरासो। मायाकार्यानुसारी मनुज इव सदा भाति देवोऽखिलेशः ॥ ५७ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे बालकांडे सप्तमः सर्गः ॥ ७ ॥

**अध्यात्मबालकांडे च सर्गाः सप्तैव शंभुना। दिष्टाः षष्ट्युत्तरात्रिंशच्छ्लोका मोक्षप्रदा नृणाम् ॥ ३६० ॥ अयं कांडः समाप्तः।**

देव असूनही मनुष्याप्रमाणे भासणारा तो श्रीराम सीतेसह अयोध्यानगरींत राहूं लागला." ५७ ह्या अध्यात्मरामायणाच्या बालकांडांत शंकरांनीं सातच सर्ग सांगितले आहेत, व ह्यांत एकंदर तीनशें साठ श्लोक आहेत. ह्यांचे योगाने मनुष्याला मोक्षप्राप्ति होते.

**सर्ग सातवा समाप्त**

**बालकांड समाप्त.**



# अथ अयोध्याकांडप्रारंभः ॥



## सर्ग १ ला.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ एकदा सुखमासीनं रामं स्वांतःपुराजिरे । सर्वाभरणसंपन्नं रत्नसिंहासने स्थितम् ॥ १ ॥ नीलोत्पलदलश्यामं कौस्तुभामुक्तकंधरम् । सीतया रत्नदंडेन चामरेणाथ वीजितम् ॥ २ ॥ विनोदयंतं तांबूलचर्वणादिभिरादरात् । नारदोऽवतरद्द्रष्टुमंबराद्यत्र राघवः ॥ ३ ॥ शुद्धस्फटिकसंकाशः शरच्चंद्र इवामलः । अतर्कितमुपायातो नारदो दिव्यदर्शनः ॥ ४ ॥ तं दृष्ट्वा सहसोत्थाय रामः प्रीत्या कृतांजलिः । ननाम शिरसा भूमौ सीतया सह भक्तिमान् ॥ ५ ॥ उवाच नारदं रामः प्रीत्या परमया युतः । संसारिणां मुनिश्रेष्ठ

श्रीमहादेव म्हणाला "( पार्वति, ) एकदां राम आपल्या अंतःपुरांत अंगावर सर्व दागिने घालून रत्नसिंहासनावर बसला होता. १ त्याची अंगकांति नील कमलाच्या पानासारखी श्यामवर्ण असून गळ्यांत कौस्तुभमणि शोभत होता. रत्नांच्या दांड्याची चवरी घेऊन सीता त्याला वारा घालीत होती. २ आदरपूर्वक तांबूलभक्षण वगैरे प्रकारांनीं त्याचा ( सीतेशीं ) विनोद चालला होता; अशा वेळीं राम बसला होता, त्या ठिकाणीं त्याला भेटण्याकरितां म्हणून आकाशांतून नारदमुनि खालीं उतरला. ३ त्याचें—नारदाचें—शरीर शुद्ध स्फटिकासारखें किंवा शरत्कालच्या चंद्राप्रमाणें निर्मल होतें. असा तो दिव्यस्वरूपी नारद कोणाच्याही ध्यानीं मनीं नसतां तेथें आला. ४ त्याला आलेला पाहून श्रीराम सीतेसह एकदम उठला, आणि प्रेमपुरस्सर हात जोडून त्यानें त्या ऋषीला साष्टांग प्रणाम केला. ५ रामानें नारदाला अत्यंत प्रेमानें म्हटलें, 'अहो मुनिश्रेष्ठ ! ज्यांचीं मनें विषयांत पराकाष्ठेचीं आसक्त झालेलीं आहेत, अशा

१. हा समुद्रमंथन करून काढलेल्या चतुर्दश रत्नांपैकीं एक होय. विष्णूनें मोठ्या आवडीनें त्याला वक्षःस्थलावर धारण केलें आहे. २. नारद शब्दाची व्युत्पत्ति अशी आहेः—' नरस्य धर्मो नारं, तत् ददाति स नारदः'. ३. शरत्काल—आश्विन व कार्तिक ह्या दोन महिन्यांचा काल.

दुर्लभं तव दर्शनम् । अस्माकं विषयासक्तचेतसां नितरां मुने ॥ ६ ॥
अवाप्तं मे पूर्वजन्मकृतपुण्यमहोदयैः । संसारिणापि हि मुने लभ्यते
सत्समागमः ॥ ७ ॥ अतस्त्वद्दर्शनादेव कृतार्थोऽस्मि मुनीश्वर । किं
कार्यं ते मया कार्यं ब्रूहि तत्करवाणि भोः ॥ ८ ॥ अथ तं नारदोऽप्याह
राघवं भक्तवत्सलम् । किं मोहयसि मां राम वाक्यैर्लोकानुसारिभिः
॥ ९ ॥ संसार्यहमिति प्रोक्तं सत्यमेतत्त्वया विभो । जगतामादिभूता
या सा माया गृहिणी तव ॥ १० ॥ त्वत्सन्निकर्षाज्जायंते तस्या ब्रह्मा-
दयः प्रजाः । त्वदाज्ञया सदा भाति माया या त्रिगुणात्मिका ॥ ११ ॥
सूतेऽजस्रं शुक्लकृष्णलोहिताः सर्वदा प्रजाः । लोकत्रयमहागेहे गृहस्थ-

आम्हासारख्या संसारी माणसांना आपले दर्शन म्हटले म्हणजे दुर्लभ होय. ६ माझीं पूर्वजन्मार्जित सारीं पुण्यें आज फळास आलीं आहेत, कारण ( मला ) संसाऱ्याला सत्समागम घडत आहे. ७ म्हणून हे मुनीश्वरा ! आपल्या दर्शनानें मी कृतकृत्य झालों आहें. आपलें कोणतें कार्य मजकडून होण्यासारखें आहे, तें आपण सांगावें, मी तें करितों.' ८ त्यावर नारदमुनि त्या भक्तवत्सल रामाला म्हणाला, 'सामान्य मनुष्याप्रमाणें भाषण करून तूं मला कां बरें मोहवीत आहेस ? ९ हे विभो ! 'मी संसारी आहें' असें तूं म्हटलेंस, तें बरोबर आहे. सर्व जगाची आदिकारण जी माया ती तुझी पत्नी आहे. १० तिच्या ठिकाणी तुझ्याच आश्रयानें ब्रह्मादिक प्रजा निर्माण होतात. ती त्रिगुणात्मक माया सदोदित तुझ्याच आधारानें भासत असते. ११ ती माया सर्वदा शुक्ल-पांढऱ्या, कृष्ण-काळ्या आणि रक्त-तांबड्या, अशा वर्णांच्या प्रजा प्रसवते. तं त्रैलोक्यरूपी भव्य गृहांत राहणारा

१. संसाऱ्याला सत्समागम.—( पद ) 'सज्जनसेवा या संसारी ॥ ध्रु० ॥ संतांची बहु आवडि हरिला । तोचि भवांबुधि तारी ॥ १ त्याचे पदरज अंगीं धरितो । होत असे कैवारी ॥ २ सत्संगासी स्वर्ग तुलेना । अमृत तयावरि वारी' ॥ ३—अमृतराय.
२. माया-प्रकृति ही पुरुषाची—परमेश्वराची पत्नी असून तीच सर्व सृष्टीची घडामोड करिते, पुरुष कांहींच करीत नाहीं, हें ज्ञानेश्वराच्या खालील ओव्यावरून उत्तम प्रकारें दिसून येत आहे —' तरी माझी हे गृहिणी । अनादि तरुणी । अनिर्वाच्य गुणी । अविद्या हे ॥ पैं माझेनिचि अंगें । पहुडल्या हे जागे । आणि सत्तासभोगें । गुर्विणी होय ॥ नाना देह अवयवीं । नामाचीं लेणी लेववी । मोहस्तन्यें वाढवी । नित्य नवें ॥ हें एकोलतें चराचर । अविवारित सुंदर । प्रसवोनि थोर । थोरावली '' ॥ ज्ञानेश्वरी १४.

स्त्वमुदाहृतः ॥ १२ ॥ त्वं विष्णुर्जानकी लक्ष्मीः शिवस्त्वं जानकी शिवा । ब्रह्मा त्व जानकी वाणी सूर्यस्त्वं जानकी प्रभा ॥ १३ ॥ भवान् शशांकः सीता तु रोहिणी शुभलक्षणा । शक्रस्त्वमेव पौलोमी सीता स्वाहाऽनलो भवान् ॥ १४ ॥ यमस्त्वं कालरूपश्च सीता संयमिनी प्रभो । निर्ऋतिस्त्वं जगन्नाथ तामसी जानकी शुभा ॥१५॥ राम त्वमेव वरुणो भार्गवी जानकी शुभा । वायुस्त्वं राम सीता तु सदागतिरितीरिता ॥१६॥ कुबेरस्त्वं राम सीता सर्वसंपत्प्रकीर्तिता । रुद्राणी जानकी प्रोक्ता रुद्रस्त्वं लोकनाशकृत् ॥ १७ ॥ लोके स्त्रीवाचकं यावत्तत्सर्वं जानकी शुभा । पुन्नामवाचकं यावत्तत्सर्वं त्वं हि राघव ॥ १८ ॥ तस्माल्लोकत्रये देव युवाभ्यां नास्ति किंचन ॥ १९ ॥ त्वदाभासोदिता-

गृहस्थ असें म्हटलें आहे. १२ तूं विष्णु, आणि जानकी लक्ष्मी; तूं शिव आणि जानकी पार्वती; तूं ब्रह्मदेव, आणि जानकी सरस्वती, तूं सूर्य, आणि जानकी प्रभा होय. १३ तूं चंद्र आणि जानकी शुभलक्षणा रोहिणी; तूं इंद्र, आणि जानकी पौलोमी–इंद्राणी–आहे. त्याचप्रमाणें तूं अग्नि, आणि जानकी स्वाहा होय. १४ हे प्रभो ! तूं कालस्वरूपी यम असून जानकी म्हणजे त्याची संयमिनी–नियमन करणारी शक्ति–होय. हे जगन्नाथा ! तूं निर्ऋति[1] असून कल्याणी जानकी ती तामसी होय. १५ रामा ! तूंच वरुण आणि शुभरूपा जानकी भार्गवी होय. तसेंच हे रामा ! तूं वायु आणि जानकी सदागति–सतत गतिरूप शक्ति–अशी सांगितली आहे. १६ हे रामा ! तूं कुबेर आणि जानकी सर्व संपत्ति म्हणून म्हटली गेली आहे तूं सर्व लोकांचा संहार करणारा रुद्र–शंकर–आणि जानकी रुद्राणी म्हणून वर्णिली आहे. १७ जगामध्यें स्त्रीवाचक–स्त्रीलिंगी–म्हणून ज्या कांही वस्तु आहेत, त्या सर्व ही शुभलक्षणा जानकी होय; त्याचप्रमाणें पुल्लिंगी जितके म्हणून पदार्थ आहेत, ते सर्व हे राघवा ! तूंच होस. १८ म्हणून हे देवा ! लोकत्रयामध्यें तुम्हां दोघांपलीकडे कांहींही वेगळें म्हणून नाहीं. १९ तुझ्या मायेच्या[2] योगानें

१. नैर्ऋत्यदिशचा आधिपति. २. ब्रह्मावर आभासानें जें अज्ञान उत्पन्न होतें ती माया किंवा अविद्या होय.

ज्ञानमव्याकृतमितीर्यते । तस्मान्महांस्ततः सूत्रं लिंगं सर्वात्मकं ततः ॥ २० ॥ अहंकारश्च बुद्धिश्च पंचप्राणेंद्रियाणि च । लिंगमित्युच्यते प्राज्ञैर्जन्ममृत्युसुखादिमत् ॥ २१ ॥ स एव जीवसंज्ञश्च लोके भाति जगन्मयः । अवाच्यानाद्यविद्यैव कारणोपाधिरुच्यते ॥ २२ ॥ स्थूलं सूक्ष्मं कारणाख्यमुपाधित्रितयं चितेः । एतैर्विशिष्टो जीवः स्याद्वियुक्तः परमेश्वरः ॥ २३ ॥ जाग्रत्स्वप्नसुषुप्त्याख्या संसृतिर्या प्रवर्तते । तस्या विलक्षणः साक्षी चिन्मात्रस्त्वं रघूत्तम ॥ २४ ॥ त्वत्त एव जगज्जातं त्वयि सर्वं प्रतिष्ठितम् । त्वय्येव लीयते कृत्स्नं तस्मात्त्वं सर्वकारणम् ॥ २५ ॥ रज्जावहिमिवात्मानं जीवं ज्ञात्वा भयं भवेत् । परात्माहमिति

उत्पन्न झालले अज्ञान ' अव्याकृत ' म्हणून म्हटलं जातं. त्या अव्याकृतापासून महान्–महत्तत्त्व, महत्तत्त्वापासून सूत्र–अहंकार, आणि त्या अहंकारापासून सर्व कार्यात्मक लिंगदेह उत्पन्न होतो. २० अहंकार, बुद्धि, पंचप्राण आणि ( दश ) इंद्रियें यांनाच शहाणे लोक लिंगदेह म्हणतात, आणि या लिंगदेहालाच जन्म, मृत्यु, सुख, दुःख वगैरे विकार होतात. २१ या लिंगदेहालाच जीव ही संज्ञा आहे, आणि जगामध्यें तोच जगत्स्वरूपी–समष्टिरूप–भासतो. अनिर्वाच्य आणि अनादि अशी अविद्यारूपी उपाधि तीच त्याचें कारण होय. २२ मूळ चैतन्यस्वरूपाला स्थूल, सूक्ष्म आणि कारण अशा तीन प्रकारच्या उपाधि आहेत. ह्या उपाधींनीं युक्त चैतन्याला ' जीव ' म्हणतात, व यांहीं विरहित चैतन्याला ' परमेश्वर ' म्हणतात. २३ संसृति–संसार–ही तीन नांवाखालीं गणिली जाते. ती तीन नांवें म्हणजे जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति हीं होत. हे रघूत्तमा ! तूं या संसृतीहून वेगळा असून तिला प्रत्यक्ष पाहणारा असा आहेस. २४ हें सर्व जग तुझ्यापासून निर्माण झालें आहे, तुझ्या ठिकाणीं राहिलें आहे, आणि तुझ्या ठिकाणींच लय पावतें. म्हणून तूं ह्या सर्व सृष्टीचें कारण आहेस. २५ दोरीला साप मानल्यानें जसें भय वाटतें. तसेंच

१. स्पष्ट न समजणार (प्रकृति). २. याला बुद्धि असेही म्हणतात. ही येथे दिलेली सृष्टीची उत्पत्ति साख्यमतानुसार आहे. ३. ' बुद्धिकर्मेंद्रियप्राणपंचकैर्मनसा धिया । शरीरं सप्तदशभिः सूक्ष्मं तल्लिंगमुच्यते ' ॥–पंचदशी. ४. विशिष्ट धर्म किंवा संबंध. ५. स्थूल–विराट् स्वरूप, सूक्ष्म–लिंगदेह, कारण–अंतर्यामी ईश्वर. ६. गाढ झोंपेची स्थिति. ७. ' सर्वं जगदिदं त्वत्तो जायते, सर्वं जगदिदं त्वत्तस्तिष्ठति, सर्वं जगदिदं त्वयि लयमेष्यति '॥–गणपत्यथर्वशीर्ष. ८. यालाच रज्जुसर्पन्याय म्हणतात.

ज्ञात्वा भयदुःखैर्विमुच्यते ॥ २६ ॥ चिन्मात्रज्योतिषा सर्वाः सर्वदेहेषु बुद्धयः । त्वया यस्मात्प्रकाश्यंते सर्वस्यात्मा ततो भवान् ॥ २७ ॥ अज्ञानान्न्यस्यते सर्वं त्वयि रज्जौ भुजंगवत् । त्वज्ज्ञानाल्लीयते सर्वं तस्माज्ज्ञानं सदाभ्यसेत्[1] ॥ २८ ॥ त्वत्पादभक्तियुक्तानां विज्ञानं भवति क्रमात् । तस्मात्त्वद्भक्तियुक्ता ये मुक्तिभाजस्त एव हि ॥ २९ ॥ अहं त्वद्भक्तभक्तानां तद्भक्तानां च किंकरः । अतो मामनुगृह्णीष्व मोहयस्व न मां प्रभो ॥ ३० ॥ त्वन्नाभिकमलोत्पन्नो ब्रह्मा मे जनकः प्रभो । अतस्तवाहं पौत्रोऽस्मि भक्तं मां पाहि राघव ॥ ३१ ॥ इत्युक्त्वा बहुशो नत्वा स्वानंदाश्रुपरिप्लुतः । उवाच वचनं राम ब्रह्मणा नोदितोऽस्म्यहम् ॥ ३२ ॥ रावणस्य वधार्थाय जातोऽसि रघुसत्तम । इदानीं राज्यर-

आत्म्याला जीव मानल्यानें भय वाटतें; परंतु मीच परात्मा आहें, असें जाणल्यानें प्राणी भयापासून आणि दुःखापासून मुक्त होतो. २६ ज्ञानरूप तेजानें सर्व शरीरांत सर्व बुद्धि तुझ्याकडून प्रकाशिल्या जातात, आणि म्हणून तूंच सर्वांचा आत्मा आहेस. २७ अज्ञानामुळें जसा दोरीवर सर्पाचा आरोप केला जातो, तसाच तुजवर सर्व जगाचा आरोप अज्ञानामुळें केला जातो. परंतु तुझें ज्ञान झालें असतां हें सर्व प्रपंचमय अज्ञान लयाला जातें. म्हणून सर्वदा ज्ञानाचा अभ्यास करावा. २८ तुझ्या चरणांची भक्ति करणाऱ्यांना क्रमानें विज्ञान—प्रत्यक्षज्ञान—होत असतें. म्हणून तुझी भक्ति करणाऱ्यांनाच मुक्तीची—मोक्षाची—प्राप्ति होते. २९ मी केवळ तुझ्या भक्तांचाच नव्हे, तर तुझ्या भक्तांच्या भक्तांचाही सेवक आहें; म्हणून हे प्रभो ! मजवर कृपा कर, आणि मला मोहांत घालूं नकोस. ३० तुझ्या नाभिकमलापासून उत्पन्न झालेला ब्रह्मदेव हा माझा पिता होय. तेव्हां हे राघवा ! मी तुझा नातू आहें. मज भक्ताचें रक्षण कर. ३१ असें बोलून आणि अनेकवार नमस्कार करून डोळ्यांतून आनंदाश्रू गळत आहेत, अशा स्थितींत तो—नारद—बोलला, ' रामा ! मला ब्रह्मदेवानें पाठविलें आहे. ३२ हे रघुसत्तमा ! रावणाच्या वधाकरितां तूं अवतरला

१. ज्ञानाची महतीः—' यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात् कुरुतेऽर्जुन । ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात् कुरुते तथा ' ॥—भगवद्गीता ४.

क्षार्थं पिता त्वामभिषेक्ष्यति ॥ ३३ ॥ यदि राज्याभिसंसक्तो रावणं न
हनिष्यसि । प्रतिज्ञा ते कृता राम भूभारहरणाय वै ॥ ३४ ॥ तत्सत्यं
कुरु राजेंद्र सत्यसंधस्त्वमेव हि । श्रुत्वैतद्गदितं रामो नारदं प्राह सस्मि-
तम् ॥ ३५ ॥ शृणु नारद मे किंचिद्विद्यतेऽविदितं क्वचित् । प्रतिज्ञातं
च यत्पूर्वं करिष्ये तन्न संशयः ॥ ३६ ॥ किंतु कालानुरोधेन तत्तत्प्रा-
रब्धसंक्षयात् । हरिष्ये सर्वभूभारं क्रमेणासुरमंडलम् ॥ ३७ ॥ रावणस्य
विनाशार्थं श्वो गंता दंडकाननम् । चतुर्दश समास्तत्र ह्युषित्वा मुनिवेष-
धृक् ॥ ३८ ॥ सीतामिषेण तं दुष्टं सकुलं नाशयाम्यहम् । एवं रामे
प्रतिज्ञाते नारदः प्रमुमोद ह ॥ ३९ ॥ प्रदक्षिणत्रयं कृत्वा दंडवत्प्र-
णिपत्य तम् । अनुज्ञातश्च रामेण ययौ देवगतिं मुनिः ॥ ४० ॥
संवादं पठति शृणोति संस्मरेद्वा यो नित्यं मुनिवररामयोः स भक्त्या ।

आहेस. आतां राज्यरक्षणाकरितां म्हणून तुझा बाप–दशरथ–तुला अभिषेक करणार आहे. ३३ जर तूं राज्याच्या ठिकाणी आसक्त होऊन राहशील, तर तुझेकडून रावण-वध होणार नाही. हे रामा ! भूभार हरण करण्याची तूं प्रतिज्ञा केली आहेस. ३४ हे राजेंद्रा ! ती प्रतिज्ञा सत्य कर, कारण, तूं सत्यप्रतिज्ञ आहेस.' हें ऐकून नारदाला राम हंसत हंसत म्हणाला, ३५ 'हे नारदा ! एक. मला समजत नाहीं, असें कोठें तरी कांहीं आहे काय ? मी पूर्वी जी कांहीं प्रतिज्ञा केली आहे, त्याप्रमाणें सर्व कांहीं करणार आहें, यांत संशय नाहीं. ३६ परंतु कालानुसार दैत्यांच्या प्रारब्धकर्मांचा[1] जसजसा क्षय होईल, तसतसा मी क्रमानें त्यांचा नाश करीन, व पृथ्वीचा भार उतरून टाकीन. ३७ रावणाच्या नाशाकरितां मी उद्यां दंडकारण्यांत जाणार आहें. तेथें मुनिवेष धारण करून चौदा वर्षे राहीन, ३८ आणि सीतेच्या मिषानें त्या दुष्टाचा कुलासह नाश करीन.' असें रामानें प्रतिज्ञापूर्वक सांगितलें, तेव्हां नारदाला अत्यंत आनंद झाला. ३९ त्यानें रामाला तीन प्रदक्षिणा घातल्या, साष्टांग नमस्कार केला, आणि रामाची अनुज्ञा घेऊन तो स्वर्गलोकाच्या मार्गाला लागला. ४० जो कोणी श्रेष्ठ नारदमुनीच्या

१. कर्मांचे तीन प्रकार–संचित, क्रियमाण आणि प्रारब्ध.

संप्राप्नोत्यमरसुदुर्लभं विमोक्षं कैवल्यं विरतिपुरःसरं क्रमेण ॥ ४१ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अयोध्याकांडे प्रथमः सर्गः ॥ १ ॥

## अयोध्याकांड, सर्ग दुसरा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ अथ राजा दशरथः कदाचिद्रहसि स्थितः । वसिष्ठं स्वकुलाचार्यमाहूयेदमभाषत ॥ १ ॥ भगवन् राममखिलाः प्रशंसंति मुहुर्मुहुः । पौराश्च निगमा वृद्धा मंत्रिणश्च विशेषतः ॥ २ ॥ ततः सर्वगुणोपेतं रामं राजीवलोचनम् । ज्येष्ठं राज्येऽभिषेक्ष्यामि वृद्धोऽहं मुनिपुंगव ॥ ३ ॥ भरतो मातुलं द्रष्टुं गतः शत्रुघ्नसंयुतः । अभिषेक्ष्ये श्व एवाशु भवांस्तच्चानुमोदताम् ॥ ४ ॥ संभाराः संभ्रियंतां च गच्छ मंत्रय राघवम् । उच्छ्रीयंतां पताकाश्च नानावर्णाः समंततः

आणि रामाच्या या संवादाचें नित्य भक्तिपूर्वक पठण, श्रवण अगर मनन करील, त्याला क्रमानें वैराग्यपूर्वक, देवांनाही दुर्लभ असा, मोक्ष प्राप्त होईल." ४१

**अयोध्याकांड, प्रथम सर्ग समाप्त.**

श्रीमहादेव म्हणाला. "( पार्वति ! ) पुढें कोणी एके वेळीं दशरथ राजा एकांतीं बसला असतां स्वकुलगुरु वसिष्ठमुनि याला बोलावून आणून म्हणाला, १ 'भगवन्! सर्व नगरवासी जन, व्यापारी मंडळी, आणि विशेषेंकरून वृद्ध वृद्ध मंत्री हे रामाची सारखी स्तुति करीत आहेत. २ म्हणून हे मुनिश्रेष्ठा ! त्या सर्वगुणसंपन्न कमलनयन रामाला, तो ज्येष्ठ पुत्र असल्यामुळें राज्याभिषेक करितों. मी आता वृद्ध झालों आहें. ३ शत्रुघ्नाला घेऊन भरत मामाला भेटण्याकरितां गेला आहे, तर उद्यांच सकाळीं लवकर अभिषेक करावा, असें मी इच्छितों. तर आपण या गोष्टीस अनुमोदन द्यावें. ४ आपण सर्व साहित्य जमवावें, तसेंच रामाकडे जाऊन त्याला हें कळवावें.

१ पठण, श्रवण, मनन हे नवविधा भक्तीचेच प्रकार होत. नवविधा भक्ति.– 'श्रवणं, कीर्तनं, विष्णोः स्मरणं, पादसेवनम्, । अर्चनं, वंदनं, दास्य, सख्यमात्मनिवेदनम्' ॥

॥ ५ ॥ तोरणानि विचित्राणि स्वर्णमुक्तामयानि वै । आहूय मंत्रिणं राजा सुमंत्रं मंत्रिसत्तमम् ॥ ६ ॥ आज्ञापयति यद्यत्त्वां मुनिस्तत्तत्समानय । यौवराज्येऽभिषेक्ष्यामि श्वोभूते रघुनंदनम् ॥ ७ ॥ तथेति हर्षात्स मुनिं किं करोमीत्यभाषत । तमुवाच महातेजा वसिष्ठो ज्ञानिनां वरः ॥ ८ ॥ श्वः प्रभाते मध्यकक्षे कन्यकाः स्वर्णभूषिताः । तिष्ठंतु षोडश गजाः स्वर्णरत्नादिभूषिताः ॥ ९ ॥ चतुर्दंतः समायातु ऐरावतकुलोद्भवः । नानातीर्थोदकैः पूर्णाः स्वर्णकुंभाः सहस्रशः ॥ १० ॥ स्थाप्यंतां नव वैयाघ्रचर्माणि त्रीणि वानय । श्वेतच्छत्रं रत्नदंडं मुक्तामणिविराजितम् ॥ ११ ॥ दिव्यमाल्यानि वस्त्राणि दिव्यान्याभरणानि च । मुनयः सत्कृतास्तत्र तिष्ठंतु कुशपाणयः ॥ १२ ॥ नर्तक्यो वारमुख्याश्च गायका वेणुकास्तथा । नानावादित्रकुशला वादयंतु नृपांगणे ॥ १३ ॥ हस्त्यश्वरथपादाता बहिस्तिष्ठंत सायुधाः । नगरे

अनेक वर्णांच्या पताका चारी बाजूंला उभाराव्या, ५ आणि सोन्याचीं आणि मोत्यांची चित्रविचित्र तोरणें सर्वत्र बांधावी.' त्यानें मुख्य मंत्री सुमंत्र याला बोलावून आणून 'वसिष्ठ आज्ञा करील, तें तें सर्व त्याला दे; उद्यांचा दिवस उगवतांच मी रघुनंदनाला अभिषेक करणार आहें,' असें सांगितलें. ६, ७ 'बरें आहे' असें म्हणून तो सुमंत्र 'मी काय करावें' म्हणून मुनीला—वसिष्ठाला—विचारिता झाला. त्यावर तो महातेजस्वी ज्ञानिश्रेष्ठ मुनि वसिष्ठ म्हणाला, ८ 'उद्यां सकाळीं मधल्या दालनांत अंगावर सोन्याचे दागिने घालून सोळा कन्यकांनीं उभें रहावें. ऐरावताच्या[1] कुळांत जन्मलेला चार दांतांचा हत्ती सोन्याच्या आणि रत्नांच्या अलंकारांनीं सजवून तेथें आणावा. वेगवेगळ्या तीर्थोदकांनीं पूर्ण असे हजारों स्वर्णकलश आणवावे. नऊ किंवा तीन व्याघ्रांबरें[2] आणावीं. रत्नांची दांडी असलेलें व मोत्यांनीं आणि रत्नांनीं सुशोभित केलेलें पांढरें छत्र, त्याचप्रमाणें उत्तम फुलें, वस्त्रें आणि दागिने सिद्ध करून ठेवावे. सत्कार केले गेलेले मुनिजन हातांत दर्भ घेऊन त्या स्थानीं राहोत. ९, १०, ११, १२ कलावंतिणी, मुख्य मुख्य वारांगना, गवई, मुरली वाजविणारे, तसेंच दुसरे अनेक वाजंत्री राजांगणांत वाजवीत बसोत. १३ हत्ती, घोडे, रथ आणि पायदळ हें सर्व चतरंग सैन्य आपापल्या

१. ऐरावत—इंद्राचा हत्ती. हा क्षीरसागरातून निघालेल्या चतुर्दश रत्नांपैकीं एक होय. इराः—आप, इरावान्-समुद्रः, तस्मादुत्पन्नः ऐरावतः. २. वाघांचा कातडीं.

यानि तिष्ठंति देवतायतनानि च ॥ १४ ॥ तेषु प्रवर्ततां पूजा नानाबलिभिरावृता । राजानः शीघ्रमायांतु नानोपायनपाणयः ॥ १५ ॥ इत्यादिश्य मुनिः श्रीमान् सुमंत्रं नृपमंत्रिणम् । स्वयं जगाम भवनं राघवस्यातिशोभनम् ॥ १६ ॥ रथमारुह्य भगवान्वसिष्ठो मुनिसत्तमः । त्रीणि कक्षाण्यतिक्रम्य रथात्क्षितिमवातरत् ॥ १७ ॥ अंतः प्रविश्य भवनं स्वाचार्यत्वादवारितः । गुरुमागतमाज्ञाय रामस्तूर्णं कृतांजलिः ॥ १८ ॥ प्रत्युद्गम्य नमस्कृत्य दंडवद्भक्तिसंयुतः । स्वर्णपात्रेण पानीयमानिनायाशु जानकी ॥ १९ ॥ रत्नासने समावेश्य पादौ प्रक्षाल्य भक्तितः । तदपः शिरसा धृत्वा सीतया सह राघवः ॥ २० ॥ धन्योऽस्मीत्यब्रवीद्रामस्तव पादांबुधारणात् । श्रीरामेणैवमुक्तस्तु प्रहसन्मुनिरब्रवीत् ॥ २१ ॥ त्वत्पादसलिलं धृत्वा धन्योऽभूद्गिरिजापतिः । ब्रह्मापि मत्पिता ते हि पादतीर्थहताशुभः ॥ २२ ॥ इदानीं

शस्त्रांसह बाहेर उभें असावें. नगरामध्यें जी जी देवालयें असतील, त्यांतून देवतांना इष्ट बलि दिले जाऊन पूजा चालू रहाव्या. राजे अनेक प्रकारचे नजराणे घेऊन लवकर येवोत. १४, १५ त्या श्रेष्ठ वसिष्ठ मुनीनें राजाच्या सुमंत्र प्रधानाला अशी आज्ञा देऊन नंतर तो रामाच्या अत्यंत रमणीय मंदिरांत स्वतः गेला. १६ भगवान् मुनिश्रेष्ठ वसिष्ठ रथांत बसला आणि मंदिराचे तीन चौक ओलांडून आंत आल्यावर रथांतून खालीं उतरला. १७ वसिष्ठ रामाचा कुलगुरु असल्याकारणानें त्याला कोणींही प्रतिबंध केला नाहीं. तो अंतःपुरांत राम होता तेथें गेला. गुरु आले आहेत, असें कळतांच रामानें तत्काळ हात जोडून १८ आणि सामोरा जाऊन भक्तिपुरस्सर गुरूला साष्टांग नमस्कार घातला. इतक्यांत जानकीनें सुवर्णपात्रांतून पाणी आणिलें. १९ रामानें वसिष्ठास रत्नासनावर बसविलें, भक्तिपूर्वक त्याचे पाय धुतले, आणि त्याचें पादोदक सीतेसह मस्तकीं धारण केलें २० व म्हटलें, 'आपलें चरणतीर्थ धारण केल्यामुळें आज मी कृतार्थ झालों आहें.' श्रीरामाचें हें भाषण ऐकून वसिष्ठ मुनि हंसून म्हणाला, २१ 'रामा! गिरिजापति शंकर तुझ्या चरणांचें तीर्थ (मस्तकीं) धारण करून धन्य झाला. माझा पिता ब्रह्मदेवही तुझ्या पादोदकानेंच निष्पाप झाला.

भाषसे यत्त्वं लोकानामुपदेशकृत् । जानामि त्वां परात्मानं लक्ष्म्या
संजातमीश्वरम् ॥ २३ ॥ देवकार्यार्थसिद्ध्यर्थं भक्तानां भक्तिसिद्धये ।
रावणस्य वधार्थाय जातं जानामि राघव ॥ २४ ॥ तथापि देवकार्यार्थं
गुह्यं नोद्घाटयाम्यहम् । यथा त्वं मायया सर्वं करोषि रघुनंदन ॥२५॥
तथैवानुविधास्येऽहं शिष्यस्त्वं गुरुरप्यहम् । गुरुर्गुरूणां त्वं देव पितॄणां
त्वं पितामहः ॥ २६ ॥ अंतर्यामी जगद्यात्रावाहकस्त्वमगोचरः । शुद्ध-
सत्त्वमयं देहं धृत्वा स्वाधीनसंभवम् ॥ २७ ॥ मनुष्य इव लोकेऽस्मिन्
भासि त्वं योगमायया । पौरोहित्यमहं जाने विगर्ह्यं दूष्यजीवनम् ॥२८॥
इक्ष्वाकूणां कुले रामः परमात्मा जनिष्यते । इति ज्ञातं मया पूर्वं ब्रह्मणा

२२ ( रामा ! ) आतां तूं जे बोलत आहेस, ते लोकांना उपदेश म्हणून बोलत आहेस. तूं प्रत्यक्ष परमात्माच येथें लक्ष्मीसह अवतरला आहेस, हें मी जाणतों. २३ देवकार्य सफल व्हावें, त्याचप्रमाणें भक्तांची भक्ति सिद्धीस जावी, म्हणून हे राघवा ! रावणवध योजून तूं अवतरला आहेस, हें मी जाणतों. २४ तरी देवकार्यसिद्ध्यर्थ मी ही गुह्य गोष्ट उघडकीस आणीत नाही. ज्या अर्थी हे रघुनंदना ! तूं हें सर्व मायेनें करीत आहेस, त्या अर्थी मीही तसेंच आचरण करीन. तूं जसा माझा शिष्य झाला आहेस, तसाच मीही तुझा गुरु झालों आहें. हे देवा ! तूं गुरूंचा गुरु व पितरांचा पितामह आहेस. २५, २६ तूं सर्वांच्या अंतर्यामीं राहणारा असून जगाची परंपरा चालविणारा तूंच आहेस. तूंच इंद्रियांना न समजणारा असा आहेस. शुद्धसत्त्वगुणात्मक शरीर तूं धारण केलें आहेस. जन्म घेणें ही गोष्ट तुझ्या स्वाधीन आहे. २७ योगमायेच्या मुळें तूं ह्या लोकांस मनुष्या-सारखा भासतोस. पौरोहित्यानें उपजीविका करण्यांत दोष आहे हें मी जाणतों. २८ पण इक्ष्वाकूंच्या कुलांत परमात्मा रामरूपानें जन्म घेणार आहे. असें ब्रह्मदेवानें पूर्वी

१ 'आचार्यदेवो भव', 'गुरुदेवो भव' या वाक्याना अनुसरून प्रत्येक मनुष्यानें गुरूचे ठिकाणी आपल्याप्रमाणेच अत्यंत आदरभाव ठेवावा, हा उपदेश लोकाना करावा म्हणून. २ हा श्लोक वाचून गीता, अध्याय १० यातील 'पितॄणामर्यमा', 'महर्षीणां भृगुः', 'मुनीनां व्यासः', 'कवीनां उशना कविः', इत्यादि वाक्याची आठवण होते. ३. 'सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टः' गीता १५, १५. ४. इक्ष्वाकू हा प्रख्यात राजा अयोध्येच्या सूर्यवंशी राजाचा पूर्वज होय. हा वैवस्वत मनूचा मुलगा होताः-'क्षुवतस्तु मनोर्जज्ञ इक्ष्वाकुर्घ्राणतः सुतः'. —भागवत.

कथितं पुरा ॥ २९ ॥ ततोऽहमाशया राम तव संबंधकांक्षया । अकार्षं गर्हितमपि तवाचार्यत्वसिद्धये ॥ ३० ॥ ततो मनोरथो मेऽद्य फलितो रघुनंदन । त्वदधीना महामाया सर्वलोकैकमोहिनी ॥ ३१ ॥ मां यथा मोहयेन्नैव तथा कुरु रघूद्वह । गुरुनिष्कृतिकामस्त्वं यदि देह्येतदेव मे ॥ ३२ ॥ प्रसंगात्सर्वमप्युक्तं न वाच्यं कुत्रचिन्मया । राज्ञा दशरथेनाहं प्रेषितोऽस्मि रघूद्वह ॥ ३३ ॥ त्वामामंत्रयितुं राज्ये श्वोऽभिषेक्ष्यति राघव । अद्य त्वं सीतया सार्धमुपवासं यथाविधि ॥ ३४ ॥ कृत्वा शुचिर्भूमिशायी भव राम जितेंद्रियः । गच्छामि राजसान्निध्यं त्वं तु प्रातर्गमिष्यसि ॥ ३५ ॥ इत्युक्त्वा रथमारुह्य ययौ राजगुरुर्द्रुतम् । रामोऽपि लक्ष्मणं दृष्ट्वा प्रहसन्निदमब्रवीत् ॥ ३६ ॥ सौमित्रे यौवराज्ये मे श्वोऽभिषेको भविष्यति । निमित्तमात्रमेवाहं कर्ता भोक्ता त्वमेव हि ॥ ३७ ॥ मम त्वं हि बहिःप्राणो नात्र कार्या विचारणा ।

सांगितलेले मला आधींच कळले होते. २९ म्हणून हे रामा ! तुझ्याशी संबंध घडून तुझा गुरु व्हावें, ही आशा ठेवून तें निंद्यही पौरोहित्य मी केलें. ३० हे रघुनंदना ! तो माझा मनोरथ आज परिपूर्ण झाला आहे. सर्व लोकांना एकटीच मोह घालणारी महामाया तुझ्या स्वाधीन आहे. ३१ हे रघुश्रेष्ठा ! ती जेणेंकरून मला किमपीही मोह घालणार नाही, असें कर. गुरूचा उपकार फेडावा, अशी तुझी इच्छा असल्यास एवढेंच दे. ३२ प्रसंग आला म्हणून मी हें सर्व बोललों. वस्तुतः हें मीं कोठेंही बोलावें असें नाही. हे रघूद्वहा ! राजा दशरथानें मला तुजकडे पाठविलें आहे. ३३ हे राघवा ! इतक्याचकरितां की तुला तो उद्यां राज्याभिषेक करणार हें तुला कळवावें. आज तूं सीतेसह यथाविधि उपवास कर, आणि पवित्र होत्साता इंद्रियनिरोध करून भूमीवर शयन कर. मी आतां राजाकडे जातों. तूं सकाळीं जाशीलच.' ३४ ३५ असें बोलून तो राजगुरु वसिष्ठ रथावर चढला आणि शीघ्र निघून गेला. रामही लक्ष्मणाला पाहून हंसत म्हणाला, ३६ ' लक्ष्मणा ! उद्यां मला यौवराज्यविषयक अभिषेक होणार आहे. ह्या सर्व गोष्टींना मी केवळ निमित्त आहें. वस्तुतः त्या करणारा व भोगणारा तूंच आहेस. ३७ तूं तर माझा बाहेरील प्राण आहेस, ह्याबद्दल संशय घेण्याचें कारण नाही. ' यानंतर वसिष्ठानें जसें सांगितलें होतें. तसें-

१. मी परमात्मा असून तू भोक्ता म्हणजे जीव आहेस, असा रामाच्या भाषणाचा भाव. कारण राम विष्णु असून लक्ष्मण हा शेषावतार देहाभिमानी आहे.

ततो वसिष्ठेन यथा भाषितं तत्तथाकरोत् ॥ ३८ ॥ वसिष्ठोऽपि नृपं गत्वा कृतं सर्वं न्यवेदयत् । वसिष्ठस्य पुरो राज्ञा ह्युक्तं रामाभिषेचनम् ॥ ३९ ॥ यदा तदैव नगरे श्रुत्वा कश्चित्पुमान् जगौ । कौसल्यायै राममात्रे सुमित्रायै तथैव च ॥ ४० ॥ श्रुत्वा ते हर्षसंपूर्णे ददतुर्हारमुत्तमम् । तस्मै ततः प्रीतमनाः कौसल्या पुत्रवत्सला ॥ ४१ ॥ लक्ष्मीं पर्यचरद्देवीं रामस्यार्थप्रसिद्धये । सत्यवादी दशरथः करोत्येव प्रतिश्रुतम् ॥ ४२ ॥ कैकेयीवशगः किंतु कामुकः किं करिष्यति । इति व्याकुलचित्ता सा दुर्गां देवीमपूजयत् ॥ ४३ ॥ एतस्मिन्नंतरे देवा देवीं वाणीमचोदयन् । गच्छ देवि भुवो लोकमयोध्यायां प्रयत्नतः ॥ ४४ ॥ रामाभिषेकविघ्नार्थं यतस्व ब्रह्मवाक्यतः । मंथरां प्रविशस्वादौ कैकेयीं च ततः परम् ॥ ४५ ॥ ततो विघ्ने समुत्पन्ने पुनरेहि

सर्व रामाने केले. ३८ वसिष्ठहा राजाकडे जाऊन त्याला आपण काय काय केलें तें सर्व सांगता झाला. नंतर वसिष्ठापुढें राजानें रामाच्या अभिषेकाचें बोलणें सुरू केलें. त्या वेळी नगरांतील कोणी पुरुषानें तें ऐकून रामाची आई कौसल्या व सुमित्रा यांना ती गोष्ट कळविली. ३९,४० ती गोष्ट ऐकून त्या दोघींनाही पराकाष्ठेचा आनंद झाला, व त्यांनीं त्या पुरुषाला उत्तम हार बक्षिस दिला. नंतर ती पुत्रवत्सल कौसल्या संतुष्ट अंतःकरणानें रामाचें कार्य सिद्धीस जाण्यासाठी लक्ष्मीदेवीची पूजा करिती झाली. ४१,४२ दशरथ सत्यवादी आहे, तो जी जी प्रतिज्ञा करितो, तीप्रमाणें तो वागतो, तथापि तो कामुक असून कैकेयीच्या आधीन असल्यामुळें काय करील कोण जाणे, अशा विचारांनी तिचें चित्त व्याकुळ होऊन ( संकटनिवारणार्थ ) तिनें दुर्गादेवीची आराधना केली. ४३ इतक्यांत देवांनी वाग्देवीला—सरस्वतीला—प्रेरणा केली की, ' हे देवि ! तूं प्रयत्नपूर्वक भूलोकी अयोध्येला जा, ४४ आणि ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून रामाच्या अभिषेकांत विघ्न आणण्याचा यत्न कर. प्रथमतः मंथरेच्या शरीरांत व नंतर कैकेयीच्या शरीरांत तूं प्रवेश कर. ४५ हे कल्याणि ! तेथें विघ्न उपस्थित झाल्यावर तूं पुनः स्वर्गलोकाला ये.' ' बरें आहे ' असें म्हणून वाग्देवीनें

१. ' कोसलदेशे भवा ' कौसल्या—दशरथाची ज्येष्ठ पत्नी. २. कैकेयी—' केकय ' देशच्या राजाची कन्या. ३. कैकेयीची दासी.

दिवं शुभे । तथेत्युक्त्वा तथा चक्रे प्रविवेशाथ मंथराम् ॥ ४६ ॥ सापि कुब्जा त्रिवक्रा तु प्रासादाग्रमथारुहत् । नगरं परितो दृष्ट्वा सर्वतः समलंकृतम् ॥ ४७ ॥ नानातोरणसंबाधं पताकाभिरलंकृतम् । सर्वोत्सवसमायुक्तं विस्मिता पुनरागमत् ॥ ४८ ॥ धात्रीं पप्रच्छ मातः किं नगरं समलंकृतम् । नानोत्सवसमायुक्ता कौसल्या चातिहर्षिता ॥ ४९ ॥ ददाति विप्रमुख्येभ्यो वस्त्राणि विविधानि च । तामुवाच तदा धात्री रामचंद्राभिषेचनम् ॥ ५० ॥ श्वो भविष्यति तेनाद्य सर्वतोऽलंकृतं पुरम् । तच्छ्रुत्वा त्वरितं गत्वा कैकेयीं वाक्यमब्रवीत् ॥५१॥ पर्यंकस्थां विशालाक्षीमेकांते पर्यवस्थिताम् । किं शेषे दुर्भगे मूढे महद्भयमुपस्थितम् ॥ ५२ ॥ न जानीषेऽतिसौंदर्यमानिनी मत्तगामिनी

तसें केलें, आणि मंथरेच्या शरीरांत प्रवेश केला. ४६ ती मंथरा म्हणजे खुजी, तीन ठिकाणी वाकडी अशी होती. ती राजवाड्याच्या गच्चीवर चढली, तों तिला सर्व नगर चारी बाजूंनीं शृंगारलेलें असें दिसलें. ४७ ( शहरात ) नानाप्रकारची तोरणें बांधलीं आहेत, पताकांनीं शोभा आणली आहे, सर्व प्रकारचे उत्सव चालले आहेत, असें पाहून तिला विस्मय वाटला, आणि ती खाली उतरली. ४८ तिनें आपल्या आईला विचारिलें, ' आई ! आज हें नगर काय म्हणून शृंगारलें आहे ? आज कौसल्या अनेक उत्सवांत दंग झाली आहे, ती अत्यंत हर्षित दिसत आहे, ४९ त्रिद्वान् विद्वान् ब्राह्मणांना ती नानाविध वस्त्रें देत आहे ( हें काय बरें आहे ? ) '. त्यावर त्या मातेनें सांगितलें, ' रामाला उद्यां राज्याभिषेक होणार असल्यामुळें सर्व नगर अलंकृत केलें गेलें आहे. ' हें ऐकतांच ती ( मंथरा ) ताबडतोब कैकेयीकडे गेली. ती विशालनयना कैकेयी ह्या वेळी एकांतांत पलंगावर बसली होती. ( मंथरा ) तिला म्हणाली, ' हे हतभाग्ये ! हे मूर्खे ! निजून काय राहिली आहेस ? मोठें संकट तुजवर येऊन ठेपलें आहे ! तुला आपल्या सौंदर्याचा मोठा अभिमान

४ कंबरेंत, छातींत आणि कठात. ५ सदृश उतारा:—' उत्तिष्ठ मूढे शयनं जहाहि भयं महद् घोरमुपस्थित त्वाम् । उपप्लुतं दु खशतैः सुखार्हा नात्मानमद्याप्यवबुध्यसे त्वम् ॥ १ मय्येव रक्तो वचसि स्थितो मे पतिः सदैवेति वृथा किमर्थम् । विकत्थसे मानिनि मंदबुद्धे धूर्तेन राज्ञा बत वंचितासि ॥ २ नित्यमेत्य तव मंदिरं पतिः सस्मितं च मधुरं च भाषते । त्वं च चाटुवचनैः प्रतारिता शुद्धभाव इति वेत्स्यमुं शठम् ' ॥ ३.

वरद्वयं वृणीष्व त्वमेवं राजाऽवदत्स्वयम् । त्वयोक्तो वरदो राजन्यदि दत्तं वरद्वयम् ॥ ७१ ॥ त्वय्येव तिष्ठतु चिरं न्यासभूतं ममानघ । यदा मेऽवसरो भूयात्तदा देहि वरद्वयम् ॥ ७२ ॥ तथेत्युक्त्वा स्वयं राजा मंदिरं व्रज सुव्रते । त्वत्तः श्रुतं मया पूर्वमिदानीं स्मृतिमागतम् ॥ ७३ ॥ अतः शीघ्रं प्रविश्याद्य क्रोधागारं रुषान्विता । विमुच्य सर्वाभरणं सर्वतो विनिकीर्य च । भूमावेव शयाना त्वं तूष्णीमातिष्ठ भामिनि ॥ ७४ ॥ यावत्सत्यं प्रतिज्ञाय राजाऽभीष्टं करोति ते । श्रुत्वा त्रिवक्रयोक्तं तत्तदा केकयनंदिनी ॥ ७५ ॥ तथ्यमेवाखिलं मेने दुःसंगाहितविभ्रमा । तामाह कैकेयी दुष्टा कुतस्ते बुद्धिरीदृशी ॥ ७६ ॥ एवं त्वां बुद्धिसंपन्नां न जाने वक्रसुंदरि । भरतो यदि राजा मे भविष्यति सुतः प्रियः ॥ ७७ ॥

देण्यास तयार आहे. ७० दोन वर माग,' असे महाराज स्वतः म्हणाले. त्यावर तूं म्हटलेंस, 'राजन् ! ज्या अर्थी आपण मला दोन वर दिले आहेत, त्या अर्थी ते चिरकाल माझी ठेव म्हणून आपल्याकडेच राहोत. आपण निष्पाप आहां. जेव्हां प्रसंग येईल, तेव्हां आपण मला ते दोन वर द्यावे.' ७१, ७२ त्यावर 'बरें आहे, तूं आता मंदिरांत जा,' असें महाराजांनीं म्हटलें. हें मी तुझ्याच तोंडून ऐकिलें होतें, तें मला आता आठवलें. ७३ म्हणूनें तूं आतां क्रोध धारण कर, आणि क्रुद्ध होऊन सर्व दागिने अंगावरून काढून सर्वत्र फेंकून दे. हे सुंदरि ! भूमीवर निजून रहा. राजा प्रतिज्ञा करून तुझी इच्छित गोष्ट घडवून आणीपर्यंत तूं मौन धरून रहा. त्या कुबडीनें सांगितलेलें ऐकून, तें सर्व खरें असें कैकेयीला वाटलें. त्या दुष्टेच्या संगतीनें तिच्या मनाला भ्रम झाला. ती दुष्ट कैकेयी तिला—मंथरेला—म्हणाली, '( मंथरे ! ) कोठून तुला एवढी बुद्धि प्राप्त झाली ? ७४, ७५, ७६ तूं शरीरानें कुबडी दिसतेस, तरी खरोखर तूं सुंदर आहेस ! तूं एवढी बुद्धिसंपन्न आहेस, असें मला वाटलें नव्हतें. माझा प्रियपुत्र भरत जर राजा होईल. ७७

१. याच प्रसंगाचें एकनाथांनी पुढीलप्रमाणे वर्णन केलें आहे:—' साडोनिया दिव्याभरणासी । मुक्तकेश मळिणवासी । तुवा रिघावें प्रायोपवेशीं । वरद्वयासी मागावया ॥ १८ राजा येईल तुजपाशीं । मुख न दाखवावें त्यासी । काहीं न बोलावें तयासीं । अति निश्चयेंसीं क्षोभवावें ॥ १९ राजा देईल सुवर्णमेरू । अथवा रत्नाचा सागरू । तें तूं न करींच अंगीकारू । वरदविचारू साडोनी ॥ १२० भा. रामायण, अयोध्याकांड ३.

ग्रामान् शतं प्रदास्यामि मम त्वं प्राणवल्लभा । इत्युक्त्वा कोपभवनं प्रविश्य सहसा रुषा ॥ ७८ ॥ विमुच्य सर्वाभरणं परिकीर्य समंततः । भूमौ शयाना मलिना मलिनांबरधारिणी ॥ ७९ ॥ प्रोवाच शृणु मे कुब्जे यावद्रामो वनं व्रजेत् । प्राणांस्त्यक्ष्येऽथ वा वक्रे शयिष्ये तावदेव हि ॥ ८० ॥ निश्चयं कुरु कल्याणि कल्याणं ते भविष्यति । इत्युक्त्वा प्रययौ कुब्जा गृह साऽपि तथाऽकरोत् ॥ ८१ ॥ धीरोऽत्यंतदयान्वितोऽपि सुगुणाचारान्वितो वाऽथवा नीतिज्ञो विधिवाददेशिकपरो विद्याविवेकोऽथवा । दुष्टानामतिपापभावितधियां संगं सदा चेद्व्रजेत्तद्बुद्ध्या परिभावितो व्रजति तत्साम्यं क्रमेण स्फुटम् ॥ ८२ ॥ अतः संगः परित्याज्यो दुष्टानां सर्वदैव हि । दुःसंगी च्यवते स्वार्थाद्यथेयं राजकन्यका ॥ ८३ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादेऽयोध्याकांडे द्वितीयः सर्गः ॥ २ ॥

तर तुला मी शंभर गांवें देईन. तूं मला प्राणासारखी प्रिय वाटतेस. ' ७८ असें म्हणून कैकेयी एकदम क्रोधाला चढली. तिनें अंगावरील सर्व अलंकार काढून जिकडे तिकडे फेंकून दिले. मलिन वेष धारण करून आणि जमिनीवर निजून मलिन होत्साती ती ( मंथरेला ) म्हणाली, ' वक्रे ! राम वनाला जाईपर्यंत मी अशीच निजून राहीन; नाहीतर प्राण देईन, हा माझा निश्चय आहे. हे कल्याणि ! तुझें कल्याण होईल. ' असें कैकेयी बोलल्यावर ती कुबडी घरी गेली आणि कैकेयी तसेंच करीत राहिली. ७९, ८०, ८१ मनुष्य कितीही शहाणा असो, अत्यंत दयाळू असो, सद्गुणी व सदाचारी असो, नीतिज्ञ असो, शास्त्र शिकविणाऱ्या गुरूची एकनिष्ठपणें सेवा करणारा असो, यथार्थ ज्ञानी—ब्रह्मज्ञानी—असो, बुद्धीवर पापाचा दृढ संस्कार झालेल्या दुष्टांची त्याला संगति घडेल, तर त्याच्या बुद्धीचा भ्रंश होऊन हळू हळू तो त्या दुष्टासारखाच दुष्ट बनेल, हें उघड आहे. ८२ म्हणून सर्वदा दुष्टांचा संग वर्ज करावा. दुष्टसंगती करणारा मनुष्य हा ह्या राजकन्येप्रमाणें—कैकेयीप्रमाणें—स्वार्थाला मुकावयाचाच. ८३

**अयोध्याकांड, दुसरा सर्ग समाप्त.**

## अयोध्याकांड, सर्ग तिसरा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ ततो दशरथो राजा रामाभ्युदयकारणात् । आदिश्य मंत्रिप्रकृतीः सानंदो गृहमाविशत् ॥ १ ॥ तत्राद्दष्ट्वा प्रियां राजा किमेतदिति विह्वलः । या पुरा मंदिरं तस्याः प्रविष्टे मयि शोभना ॥ २ ॥ हसंती मामुपायाति सा किं नैवाद्य दृश्यते । इत्यात्मन्येव संचिंत्य मनसाऽतिविदूयता ॥ ३ ॥ पप्रच्छ दासीनिकरं कुतो वः स्वामिनी शुभा । नायाति मां यथापूर्वं मत्प्रिया प्रियदर्शना ॥ ४ ॥ ता ऊचुः क्रोधभवनं प्रविष्टा नैव विद्महे । कारणं तत्र देव त्वं गत्वा निश्चेतुमर्हसि ॥ ५ ॥ इत्युक्तो भयसंत्रस्तो राजा तस्याः समीपगः । उपविश्य शनैर्देहं स्पृशन्वै पाणिनाब्रवीत् ॥ ६ ॥ किं शेषे वसुधापृष्ठे पर्यंकादीन् विहाय च । मां त्वं खेदयसे भीरु यतो मां नावभाषसे ॥ ७ ॥ अलंकारं परित्यज्य भूमौ मलिनवाससा । किमर्थं ब्रूहि सकलं

श्रीमहादेव म्हणाला, " नंतर दशरथ राजाने रामाच्या ( राज्यारोहण ) महोत्सवाप्रीत्यर्थ मंत्रिजन आणि प्रधानमंडळी यांना आज्ञा दिली आणि आनंदित होत्साता तो घरीं आला. १ तेथें त्याला त्याची प्रियभार्या—कैकेयी—कोठें दिसेना, तेव्हां ' हें काय बरें ' असा विचार त्याच्या मनांत उत्पन्न होऊन तो विव्हल झाला. ' मी मंदिरांत आल्याबरोबर जी सुंदरी हंसतहंसत मला सामोरी यावयाची, ती आज कां बरें दिसत नाही ? ' असा मनाशी विचार करून खिन्न मनानें त्यानें दासीना विचारिलें, ' तुमची दैवशाली स्वामिनी कोठें आहे ? जिला पाहून मला आनंद व्हावयाचा, ती माझी प्रिया आज नेहमींप्रमाणें मजजवळ कां बरें येत नाही ? ' २,३,४ त्या म्हणाल्या, ' महाराज ! त्या आज फार रागावल्या आहेत. त्याचें कारण काय, तें आम्हांला माहीत नाहीं. आपणच स्वत: जाऊन तें समजावून घ्यावें हें योग्य आहे. ' ५ असें ( दासींनीं ) सांगतांच ( दशरथ ) राजा अत्यंत भयभीत झाला, आणि तिच्या जवळ जाऊन बसला. तिच्या शरीरावरून हळूहळू हात फिरवीत तो तिला म्हणाला, ६ ' मंचक, इत्यादिकाचा त्याग करून जमिनीवर अशी कां बरें निजली आहेस ? हे भित्र्ये ! तूं माझ्याशीं बोलत नाहींस, यामुळें मला फार दुःख होत आहे. ७ अलंकार टाकून व मलिन वस्त्र धारण करून

विधास्ये तव वांछितम् ॥ ८ ॥ को वा तवाहितं कर्ता नारी वा पुरुषोऽपि वा । स मे दंड्यश्च वध्यश्च भविष्यति न संशयः ॥ ९ ॥ ब्रूहि देवि यथा प्रीतिस्तदवश्यं ममाग्रतः । तदिदानीं साधयिष्ये सुदुर्लभमपि क्षणात् ॥ १० ॥ जानासि त्वं मम स्वांतं प्रियं मां स्ववशे स्थितम् । तथापि मां खेदयसे वृथा तव परिश्रमः ॥ ११ ॥ ब्रूहि कं धनिनं कुर्यां दरिद्रं ते प्रियंकरम् । धनिनं क्षणमात्रेण निर्धनं च तवाहितम् ॥ १२ ॥ ब्रूहि कं वा वधिष्यामि वधार्हो वा विमोक्ष्यते । किमत्र बहुनोक्तेन प्राणान्दास्यामि ते प्रिये ॥ १३ ॥ मम प्राणात्प्रियतरो रामो राजीवलोचनः । तस्योपरि शपे ब्रूहि त्वद्धितं तत्करोम्यहम् ॥ १४ ॥

जमिनीवर ( पडून राहिली ) आहेस, तें कां बरें ? सर्व कांहीं मला सांग. तुझ्या सर्व इच्छा मी परिपूर्ण करीन. ८ तुझा अपराध कोणीं केला आहे तें सांग. तो पुरुष असो, अथवा स्त्री असो, त्याला मी दंड करीन, देहांत शिक्षाही देईन, यासंबंधी शंका धरूं नको. ९ हे देवि ! जें कांही तुला इष्ट असेल तें माझ्यापुढें अवश्य सांग. ती गोष्ट कितीही दुर्लभ असली, तरी एका क्षणांत साध्य करून देईन. १० तुला माझें मन ठाऊक आहे; मी तुजवर प्रेम करितों, मी तुझ्या आधीन आहें, हेंही तूं जाणत आहेस. असें असूनही तूं मला विनाकारण खेद देण्याचा श्रम करीत आहेस. ११ तुझें प्रिय करणाऱ्या कोणा दरिद्राला श्रीमंत करूं, किंवा तुझा अपकार करणाऱ्या कोणा श्रीमंताला निर्धन करूं? सांग! १२ कोणाचा वध करूं ? किंवा वधाला योग्य असूनही कोणाला सोडूं, सांग. विशेष काय सांगूं ? प्रिये ! तुझ्याकरितां मी प्राणही देईन. १३ कमलनयन राम मला प्राणाहूनही प्रिय आहे. त्याची शपथ घेऊन मी सांगतों की. तला जें

१ श्लोक ८-१४ याचें एकनाथाचे पुढील ओंव्यातील वर्णनाशीं किती मजेदार सादृश्य आहे, तें लक्ष्यात घेण्यासारखें आहे:-' देखोनि कैकेयीची अवस्था । परम दु ख झालें दशरथा । तुज काय कोणे केलें आता । तें तत्त्वता मज सागे ॥ तुज कोणे लाविला हात । त्याचा समूळ करीन घात । तुज बोलती जे विरुद्धार्थ । जिव्हा सदंत छेदीन त्याची ॥ ज्यासी म्हणसी करा समर्थ । गजात लक्ष्मी देईन तेथ । करावे म्हणसी ज्यासी निर्मुक्त । बंधनिर्मुक्त करीन मी ॥ राजा बोले प्रीतियुक्त । 'सागें तुझें मनोगत । तें मी करीन समस्त । तुज का अत्यंत कोप आला ॥ तुझी मज प्रीति पूर्ण । जे मागसी तें देईन जाण । वाहतों श्रीरामाची आण । परम प्रमाण हें माझें ' ॥ भावार्थरामायण, अयो० ४

इति ब्रुवाणं राजानं शपंतं राघवोपरि । शनैर्विमृज्य नेत्रे सा राजानं प्रत्य-
भाषत ॥ १५ ॥ यदि सत्यप्रतिज्ञोऽसि शपथं कुरुषे यदि । याञ्चां मे
सफलां कर्तुं शीघ्रमेव त्वमर्हसि ॥१६॥ पूर्वं देवासुरे युद्धे मया त्वं परिर-
क्षितः । तदा वरद्वयं दत्तं त्वया मे तुष्टचेतसा ॥ १७ ॥ तद्द्वयं न्यासभूतं मे
स्थापितं त्वयि सुव्रत । तत्रैकेन वरेणाशु भरतं मे प्रियं सुतम् ॥ १८ ॥
एभिः संभृतसंभारैर्यौवराज्येऽभिषेचय । अपरेण वरेणाशु रामो गच्छतु
दंडकान् ॥ १९ ॥ मुनिवेषधरः श्रीमान् जटावल्कलभूषणः चतुर्दश
समास्तत्र कंदमूलफलाशनः ॥ २० ॥ पुनरायातु तस्यांते वने वा
तिष्ठतु स्वयम् । प्रभाते गच्छतु वनं रामो राजीवलोचनः ॥ २१ ॥
यदि किंचिद्विलंबेत प्राणांस्त्यक्ष्ये तवाग्रतः । भव सत्यप्रतिज्ञस्त्वमेतदेव
मम प्रियम् ॥ २२ ॥ श्रुत्वैतद्दारुणं वाक्यं कैकेय्या रोमहर्षणम् । निप-

कांहीं प्रिय असेल तें मी करितों'. १४ रामाची शपथ घेऊन राजा बोलत आहे, हें पाहून कैकेयीनें हळूहळू आपले डोळे पुसले आणि ती राजाला म्हणाली, १५ '(महाराज !) जर आपण सत्यप्रतिज्ञ आहां, व जर आपण शपथ वाहण्यास तयार आहां, तर मी याचना करणार आहें, ती आपण शीघ्र परिपूर्ण करावी. १६ पूर्वी देव आणि दैत्य यांमध्यें युद्ध सुरू झालें असतां मीं आपलें रक्षण केलें. तेव्हां आपण संतुष्ट होऊन मला दोन वर दिले होते. १७ ते आपल्याकडे ठेव म्हणून मी ठेविले आहेत. आपण तर सत्यव्रती आहां. तरी त्यांपैकीं एका वरानें माझ्या प्रिय पुत्राला –भरताला– या जमविलेल्या साहित्यानें आपण तावडतोब यौवराज्याचा अभिषेक करावा, आणि दुसऱ्या वरानें रामानें तत्काल दंडकारण्याला जावें. १८,१९ मुनिवेष धारण करून जटा आणि वल्कलें ह्या अलंकारांनीं त्यानें शरीर भूषवावें, कन्द, मूल, फलें खावीं, आणि चौदा वर्षें तेथें रहावें. २० त्या काळा-नंतर–चौदा वर्षांनंतर–तो पुनः येवो, अगर तेथेंच राहो. कमलनयन राम उद्यां सकाळींच वनाला जावो. २१ या कामीं थोडा जरी विलंब त्याजकडून झाला, तर मी आपल्यापुढें प्राण देईन. आपण आपली प्रतिज्ञा सत्य करून दाखवावी, हेंच मला प्रिय आहे.' २२ अंगावर कांटा उभें करणारें असें हें कैकेयीचें भयंकर भाषण ऐकतांच वज्राच्या प्रहारानें पर्वत कोसळून पडावा, त्याप्रमाणें तो राजा–दशरथ ( मूर्च्छा

पात महीपालो वज्राहत इवाचलः ॥ २३ ॥ शनैरुन्मील्य नयने विमृज्य परया भिया । दुःस्वप्नो वा मया दृष्टो ह्यथवा चित्तविभ्रमः ॥ २४ ॥ इत्यालोक्य पुरः पत्नीं व्याघ्रीमिव पुरः स्थिताम् । किमिदं भाषसे भद्रे मम प्राणहरं वचः ॥ २५ ॥ रामः कमपराधं ते कृतवान्कमलेक्षणः । ममाग्रे राघवगुणान्वर्णयस्यनिशं शुभान् ॥ २६ ॥ कौसल्यां मां समं पश्यन् शुश्रूषां कुरुते सदा । इति ब्रुवंती त्वं पूर्वमिदानीं भाषसेऽन्यथा ॥ २७ ॥ राज्यं गृहाण पुत्राय रामस्तिष्ठतु मंदिरे । अनुगृह्णीष्व मां वामे रामान्नास्ति भयं तव ॥ २८ ॥ इत्युक्त्वाऽश्रुपरीताक्षः पादयोर्निपपात ह । कैकेयी प्रत्युवाचेदं साऽपि रक्तांतलोचना ॥ २९ ॥ राजेंद्र किं त्वं भ्रांतोऽसि उक्तं तद्भाषसेऽन्यथा । मिथ्या करोषि चेत्स्वीयं

येऊन) जमिनीवर पडला. २३ कांही वेळाने शुद्धीवर येऊन त्याने डोळे उघडिले, आणि कैकेयीच्या परम भीतीनें डोळयांतील अश्रू पुसले. ह्या वेळी त्याला वाटलें, 'मला कांही दुष्ट स्वप्न पडलें नाही ना ? अथवा माझ्या चित्ताला कांहीं भ्रम तर झाला नसेल ना ? २४ असा विचार (दशरथ) करीत आहे, तोंच वाघिणीप्रमाणें पुढें बसलेली पत्नी त्याच्या दृष्टीस पडली. तो तिला म्हणाला, 'हे कल्याणि ! माझे प्राण हरण करणारें असें हें भाषण कां बरें करीत आहेस ? २५ कमलनयन रामानें तुझा कोणता अपराध केला आहे ? तूं तर माझेपुढें सर्वदा त्याच्या सद्गुणांचें वर्णन करीत असतेस. २६ 'कौसल्येला आणि मला, दोघींनाही सारख्याच मानून हा राम माझी नित्य सेवा करीत असतो,' असें पूर्वी तूंच बोलत होतीस, आणि आतां उलट बोलत आहेस हे कसें? २७ तुझ्या पुत्राकरितां राज्य घे, पण रामाला मंदिरांत राहूं दे. हे सुंदरि ! एवढी तरी कृपा मजवर कर रामापासून तुला कोणत्याही प्रकारची भीति नाही '२८ असें म्हणून (तो राजा) कैकेयीच्या पायां पडला. त्याचे डोळे आसवांनी भरून आले होते. क्रोधानें डोळे लाल करून ती (राजाला) म्हणाली, २९ 'राजेंद्रा ! आपणाला भ्रांति तर झाली नाही ना ? पूर्वी आपण बोललां, त्याच्या उलट आतां बोलतां ! आपलें वचन असत्य कराल, तर आपणाला

१ समानार्थक वर्णनः—'रामें काय केला अपराध । त्यावरी तुझा दुर्धर क्रोध । दंडकारण्य अति विरुद्ध । भापनिबंध वनवासा ॥ कौसल्येपरीस अधिक । श्रीराम तुझा नित्य सेवक । सेवा करानी अवंचक । त्यासी तू दुःख देवो पाहसी ॥ श्रीरामीं तुझी कृपा पूर्ण । तेथें अत्यंत कठिणपण । धरावया तुज काय कारण । अतिदारुण निर्दयत्वें ॥—भा. रामायण, अयो० ४

भाषितं नरको भवेत् ॥ ३० ॥ वनं न गच्छेद्यदि रामचंद्रः प्रभात-
कालेऽजिनचीरयुक्तः । उद्बंधनं वा विषभक्षणं वा कृत्वा मरिष्ये पुरत-
स्तवाहम् ॥ ३१ ॥ सत्यप्रतिज्ञोऽहमितीह लोके विडंबसे सर्वसभांतरेषु ।
रामोपरि त्वं शपथं च कृत्वा मिथ्याप्रतिज्ञो नरकं प्रयाहि ॥ ३२ ॥
इत्युक्तः प्रियया दीनो मग्नो दुःखार्णवे नृपः । मूर्च्छितः पतितो भूमौ
विसंज्ञो मृतको यथा ॥ ३३ ॥ एवं रात्रिर्गता तस्य दुःखात्संवत्सरो-
पमा । अरुणोदयकाले तु बंदिनो गायका जगुः ॥ ३४ ॥ निवारयित्वा
तान् सर्वान्कैकेयी रोषमास्थिता । ततः प्रभातसमये मध्यकक्षमुपस्थिताः
॥ ३५ ॥ ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्या ऋषयः कन्यकास्तथा । छत्रं च
चामरं दिव्यं गजो वाजी तथैव च ॥ ३६ ॥ अन्याश्च वारमुख्या याः
पौरजानपदास्तथा । वसिष्ठेन यथाऽऽज्ञप्तं तत्सर्वं तत्र संस्थितम् ॥ ३७ ॥
स्त्रियो बालाश्च वृद्धाश्च रात्रौ निद्रां न लेभिरे । कदा द्रक्ष्यामहे रामं

नरकाची प्राप्ति होईल. ३० उद्यां प्रभातकाली हरिणाचे चर्म आणि वल्कलें परिधान करून रामचंद्र वनाला गेला नाहीं, तर गळफांस लावून घेऊन अगर विष भक्षण करून मी आपल्या पुढें मरेन! ३१ आपण सत्यप्रतिज्ञ म्हणून ह्या लोकीं सर्व सभांमधून प्रौढी मिरवितां, आपण आतां रामाची शपथही वाहिली, आणि इतक्यांत आपली प्रतिज्ञा खोटी करीत आहां, तरी आपण नरकास जाणार.' ३२ पत्नीनें—कैकेयीनें—असें म्हटल्या-वर तो राजा अगदीं दीन होऊन गेला. त्याला दुःखसमुद्रात बुडाल्यासारखें झालें. तो मूर्च्छित होऊन जमिनीवर पडला त्याची स्थिति अचेतन प्रेताप्रमाणें झाली. ३३ ती रात्र दुःखामुळें त्याला वर्षाप्रमाणें वाटली. अरुणोदय होण्याचे वेळीं बंदिजन[१] गाऊं लागले. ३४ पण क्रुद्ध झालेल्या कैकेयीनें त्या सर्वांचें तें गाणें बंद केलें. नंतर सूर्योदय होतांच मधल्या दालनांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, ऋषि, त्याचप्रमाणें अनेक कन्यका आल्या. छत्र, चामर, दिव्य हत्ती, घोडा हींही येऊन पोंचलीं. ३५, ३६ शिवाय मुख्य मुख्य वारांगना[२], नगरवासी व देशांतील सर्व लोक तेथें जमा झाले. वसिष्ठानं जशी आज्ञा केली होती, त्याप्रमाणें सर्व सिद्धता झाली. ३७ बायका, मुलें, वृद्ध या कोणांलाही रात्रीं झोंप आली नाहीं. 'पीतांबर धारण करणारा.

१. स्तुतिपाठक, भाट. २. वारयुवती—अनेकांची स्त्री, वेश्या. ( वार—समुदाय, जमाव. )

पीतकौशेयवाससम् ॥ ३८ ॥ सर्वाभरणसंपन्नं किरीटकटकोज्ज्वलम् । कौस्तुभाभरणं श्यामं कंदर्पशतसुंदरम् ॥ ३९ ॥ अभिषिक्तं समायातं गजारूढं स्मिताननम् । श्वेतच्छत्रधरं तत्र लक्ष्मणं लक्षणान्वितम् ॥४०॥ रामं कदा वा क्ष्यामः प्रभातं वा कदा भवेत् । इत्युत्सुकधियः सर्वे बभूवुः पुरवासिनः ॥ ४१ ॥ नेदानीमुत्थितो राजा किमर्थं चेति चिंतयन् । सुमंत्रः शनकैः प्रायाद्यत्र राजाऽवतिष्ठते ॥ ४२ ॥ वर्धयन् जयशब्देन प्रणमन्शिरसा नृपम् । अतिखिन्नं नृपं दृष्ट्वा कैकेयीं समपृच्छत ॥ ४३ ॥ देवि कैकेयि वर्धस्व किं राजा दृश्यतेऽन्यथा। तमाह कैकेयी राजा रात्रौ निद्रां न लब्धवान् ॥ ४४ ॥ राम रामेति रामेति राममेवानुचिंतयन् । प्रजागरेण वै राजा ह्यस्वस्थ इव लक्ष्यते । राममानय शीघ्रं त्वं राजा द्रष्टुमिहेच्छति ॥ ४५ ॥ सुमंत्र उवाच ॥ अश्रुत्वा

सर्वालंकारांनी अलंकृत झालेला, किरीटकटकांनी अत्यंत शोभणारा, वक्षःस्थलीं कौस्तुभ वाहणारा, सौंदर्यानें शेंकडो मदनांनाही लाजविणारा असा तो श्यामवर्ण राम अभिषिक्त झाल्यावर हत्तीवर बसून हंसतमुख येतांना, केव्हां आमच्या दृष्टीस पडेल ! श्वेत छत्र धरणाऱ्या सुलक्षण लक्ष्मणाला केव्हां आम्ही पाहूं ! प्रभातसमय केव्हां होईल, आणि केव्हां एकदां आम्ही रामाला पाहून घेऊं !' अशी एकच उत्कंठा सर्व नगरवासी जनांना लागून राहिली. ३८, ३९, ४०, ४१ इकडे 'अद्यापि महाराज कां उठले नाहीत,' असा विचार करीत दशरथ राजा होता तेथें सुमंत्र हळू हळू गेला, ४२ आणि 'महाराजांचा जयजयकार असो' असें म्हणून त्यानें राजाला शिरसा प्रणिपात केला. परंतु राजाला अत्यंत खिन्न पाहून तो कैकेयीला म्हणाला,४३ 'देवि कैकेयि ! तुझा विजय असो; आज महाराज नेहमीसारखे कां बरें दिसत नाहींत ?' त्यावर कैकेयी म्हणाली, 'राजांला रात्रीं झोंप आली नाहीं. ४४ 'राम, राम, राम' म्हणत महाराज रामाचेंच चिंतन करीत असल्यामुळें त्यांना जाग्रण होऊन ते अस्वस्थ झाल्यासारखे दिसत आहेत. तूं रामाला लवकर ( येथें ) घेऊन ये. राजांची त्याला भेटण्याची इच्छा आहे.' ४५ सुमंत्र म्हणाला. 'राणीसाहेब !

१ किरीट–मुकुट; कटकें–कडीं (हातातील). २. दशरथाचा मंत्री–प्रधान.

राजवचनं कथं गच्छामि भामिनि । तच्छ्रुत्वा मंत्रिणो वाक्यं राजा मंत्रिणमब्रवीत् ॥ ४६ ॥ सुमंत्र रामं द्रक्ष्यामि शीघ्रमानय सुंदरम् । इत्युक्तस्त्वरितं गत्वा सुमंत्रो राममंदिरम् ॥ ४७ ॥ अवारितः प्रविष्टोऽयं त्वरितं राममब्रवीत् । शीघ्रमागच्छ भद्रं ते राम राजीवलोचन ॥ ४८ ॥ पितुर्गेहं मया सार्धं राजा त्वां द्रष्टुमिच्छति । इत्युक्तो रथमारुह्य सम्भ्रमात्त्वरितो ययौ ॥ ४९ ॥ रामः सारथिना सार्धं लक्ष्मणेन समन्वितः । मध्यकक्षे वसिष्ठादीन् पश्यन्नेव त्वरान्वितः ॥ ५० ॥ पितुः समीपं संगम्य ननाम चरणौ पितुः । राममालिंगितुं राजा समुत्थाय ससंभ्रमः ॥ ५१ ॥ बाहू प्रसार्य रामेति दुःखान्मध्ये पपात ह । हाहेति रामस्तं शीघ्रमालिंग्यांके न्यवेशयत् ॥ ५२ ॥ राजानं मूर्च्छितं दृष्ट्वा चुक्रुशुः सर्वयोषितः । किमर्थं रोदनमिति वसिष्ठोऽपि समाविशत् ॥ ५३ ॥ रामः पप्रच्छ किमिदं राज्ञो दुःखस्य कारणम् । एवं पृच्छति

महाराजांचा हुकूम घेतल्याशिवाय मी कसा जाऊं ? ' हे त्या सुमंत्र मंत्र्याचें भाषण ऐकून राजा त्याला म्हणाला, ४६ ' सुमंत्रा ! त्या सुंदर श्रीरामाला पाहण्याची मला इच्छा आहे; तर त्याला लवकर घेऊन ये. ' हें ऐकून सुमंत्र ताबडतोब रामाच्या मंदिरी गेला. ४७ तेथें जाण्याला त्याला प्रतिबंध नसल्यामुळें तो त्वरित रामाकडे गेला व त्याला म्हणाला, ' कमलनयन रामा ! तुझें कल्याण असो ! ४८ माझ्याबरोबर पित्याच्या महालीं ये. तुला भेटण्याची त्यांना फार इच्छा आहे. ' (सुमंत्रानें) असें सांगितल्यावर राम तत्काल रथांत बसून त्वरेनें निघाला. ४९ सारथि व लक्ष्मण यांसहवर्तमान राम निघाला, तो मधल्या दालनांत आला. तेथें वसिष्ठ वगैरे मंडळी त्याच्या दृष्टीस पडली. त्यांस पाहिलेंसें करून तो अतित्वरा करून पित्याच्या जवळ आला आणि त्यानें त्याच्या चरणांस वंदन केलें. दशरथ राजाही रामाला आलिंगन देण्याकरिता त्वरेनें उठून उभा राहिला. ५०, ५१ ' रामा ! ' म्हणून हाक मारून त्यानें बाहू पसरिले, तोंच तो दुःखातिशयानें मध्येंच पडला ! ' हा ! हा ! ' म्हणून त्वरित पुढें होऊन रामानें त्याला—दशरथ राजाला—धरिलें आणि मांडीवर घेतलें. ५२ राजाला मूर्च्छा आल्याचें पाहून सर्व स्त्रिया रडूं लागल्या. ' कशाबद्दल रडारड आहे, ' म्हणून वसिष्ठही आंत आला. ५३ रामानें विचारलें; ' महाराजांना आज एवढें दुःख

**रामे सा कैकेयी राममब्रवीत् ॥ ५४ ॥ त्वमेव कारणं ह्यत्र राज्ञो**
**दुःखोपशांतये । किंचित्कार्यं त्वया राम कर्तव्यं नृपतेर्हितम् ॥ ५५ ॥**
**कुरु सत्यप्रतिज्ञस्त्वं राजानं सत्यवादिनम् । राज्ञा वरद्वयं दत्तं मम**
**संतुष्टचेतसा ॥ ५६ ॥ त्वदधीनं तु तत्सर्वं वक्तुं त्वां लज्जते नृपः ।**
**सत्यपाशेन संबद्धं पितरं त्रातुमर्हसि ॥ ५७ ॥ पुत्रशब्देन चैतद्धि नर-**
**कात्त्रायते पिता । रामस्तयोदितं श्रुत्वा शूलेनाभिहतो यथा ॥ ५८ ॥**
**व्यथितः कैकयीं प्राह किं मामेवं प्रभाषसे । पित्रर्थे जीवितं दास्ये**
**पिबेयं विषमुल्बणम् ॥ ५९ ॥ सीतां त्यक्ष्येऽथ कौसल्यां राज्यं चापि**
**त्यजाम्यहम् । अनाज्ञप्तोऽपि कुरुते पितुः कार्यं स उत्तमः ॥ ६० ॥ उक्तः**

झालें आहे, त्याचें कारण काय ? ' असें राम विचारीत आहे, तोंच कैकेयी रामाला
म्हणाली, ५४ ' हे रामा ! ह्या सगळ्याला तूंच कारण आहेस. राजांच्या दुःखाची
शांति करण्याकरितां तुला एक काम करणे आवश्यक आहे. त्यापासून त्यांचें हित आहे.
५५ तूं सत्यप्रतिज्ञ आहेस; तरी राजेही सत्यवादी होतील, असें कर. राजांनीं संतुष्ट
अंतःकरणानें पूर्वी एकदां मला दोन वर दिले आहेत. ५६ त्यांची पूर्तता करणें
हें सर्व तुझ्या हातीं आहे. तुला सांगण्याला महाराजांना लाज वाटत आहे. सत्यरूप
पाशानें बद्ध झालेल्या आपल्या पित्यास त्यांतून मुक्त करणें तुला योग्य आहे. ५७ पुत्र
शब्दाचा हाच अर्थ आहे कीं, तो पुन्नामक नरकापासून (पित्याचें) रक्षण करितो. '
तिचें—कैकेयीचें—भाषण ऐकून रामाला शूलाचा प्रहार लागल्याप्रमाणें झालें. ५८ तो
व्यथित होऊन कैकेयीला म्हणाला, ' (माते !) तूं मला असें काय सांगत आहेस ?
बापाकरितां मी प्राण टाकीन, तीव्र असें विषही प्राशन करीन, ५९ सीतेला टाकीन,
कौसल्येचाही त्याग करीन, राज्यत्याग तर आतांच करितों ! आज्ञेच्या पूर्वींच जो
बापाचें काम करितो, तो ' उत्तम पुत्र ' होय. ६० सांगितल्यावर जो पित्याचें

१. ' प्रियं त्वामप्रियं वक्तुं वाणी नास्य प्रवर्तते । तदवश्यं त्वया कार्यं यदनेन श्रुतं मम ॥ एष मह्यं वरं दत्वा पुरा मामभिपूज्य च । पश्चात्संतप्यते राजा यथान्यः प्राकृतस्तथा' ॥—भा. रामायण.
२. ' अहं हि वचनाद्राज्ञः पतेयमपि पावके । भक्षयेयं विषं तीक्ष्णं मज्जेयमपि चार्णवे ॥ —भा. रामायण ३. उत्तम पुत्र—' पिता गुरु, पिता देवो । पितृसेवे शरीर जावो । ऐसा ज्याचा निश्चयभावो । तो एक धन्य सुपुत्र ' ॥—मुक्तेश्वर.

करोति यः पुत्रः स मध्यम उदाहृतः । उक्तोऽपि कुरुते नैव स पुत्रो मल उच्यते ॥ ६१ ॥ अतः करोमि तत्सर्वं यन्मामाह पिता मम । सत्यं सत्यं करोम्येव रामो द्विर्नाभिभाषते ॥ ६२ ॥ इति रामप्रतिज्ञां सा श्रुत्वा वक्तुं प्रचक्रमे । राम त्वदभिषेकार्थं संभाराः संभृताश्च ये ॥ ६३ ॥ तैरेव भरतोऽवश्यमभिषेच्यः प्रियो मम । अपरेण वरेणाशु चीरवासा जटाधरः ॥ ६४ ॥ वनं प्रयाहि शीघ्रं त्वमद्यैव पितुराज्ञया । चतुर्दश समास्तत्र वस मुन्यन्नभोजनः ॥ ६५ ॥ एतदेव पितुस्तेऽद्य कार्यं त्वं कर्तुमर्हसि । राजा तु लज्जते वक्तुं त्वामेवं रघुनंदन ॥ ६६ ॥ ॥ श्रीराम उवाच ॥ भरतस्यैव राज्यं स्यादहं गच्छामि दंडकान् । किंतु राजा न वक्तीह मां न जानेऽत्र कारणम् ॥ ६७ ॥ श्रुत्वैतद्रामवचनं दृष्ट्वा रामं पुरः स्थितम् । प्राह राजा दशरथो दुःखितो दुःखितं वचः ॥६८॥

काम करितो त्याला 'मध्यम पुत्र' असें म्हणतात; आणि सांगितलें असतांही जो करीत नाहीं, तो पुत्र म्हणजे केवळ 'आईबापांचा मल' होय असें म्हटलें आहे. ६१ म्हणून माझा पिता मला जें कांहीं सांगेल, तें सर्व मी करणार आहें. खरोखर, खरोखरच मी तें करणार. राम कधीही आतां एक व मग दुसरें, असें बोलत नसतो'. ६२ ही रामाची प्रतिज्ञा ऐकून ती (कैकेयी) बोलली, 'रामा! तुला अभिषेक करण्याकरितां म्हणून जें कांहीं साहित्य सिद्ध केलें आहे, त्यानेंच माझ्या प्रिय भरताला अभिषेक अवश्य केला जावा (हा एक वर झाला). दुसऱ्या वरानें रामा! तूं वल्कलें परिधान करावीं, जटा धारण कराव्या आणि आजच वडिलांच्या आज्ञेनें शीघ्र वनाला निघून जावें, आणि मुनि खातात तें अन्न खाऊन तेथें चौदा वर्षें राहावें. ६३, ६४, ६५ हेंच वडिलांचें कार्य आज तूं करणें योग्य आहे. हे रघुनंदना! हें तुला सांगायाला महाराजांना लाज वाटत आहे.' ६६ श्रीराम म्हणाला, 'भरतच राज्य करो, मी दंडकारण्याला जातों. परंतु महाराज आज कांहींच बोलत नाहींत, याचें कारण समजत नाहीं'! ६७ हें रामाचें भाषण ऐकून व राम आपल्यापुढें आहे. हें पाहून तो दुःखित दशरथ राजा अत्यंत दीनपणें बोलला ६८

१. 'मातुरुच्चार एव सः' हितोपदेश. २. 'नियुक्तो गुरुणा पित्रा नृपेण च हितेन च । तद् ब्रूहि वचनं देवि राज्ञो यदभिकाङ्क्षितम् । प्रतिजाने करिष्येऽहं रामो द्विर्नाभिभाषते' ॥—वा. रामायण.

स्त्रीजितं भ्रांतहृदयमुन्मार्गपरिवार्तिनम् । निगृह्य मां गृहाणेदं राज्यं पापं न तद्भवेत् ॥ ६९ ॥ एवं चेदनृतं नैव मां स्पृशेद्रघुनंदन । इत्युक्त्वा दुःखसंतप्तो विललाप नृपस्तदा ॥ ७० ॥ हा राम हा जगन्नाथ हा मम प्राणवल्लभ । मां विसृज्य कथं घोरं विपिनं गंतुमर्हसि ॥ ७१ ॥ इति रामं समालिंग्य मुक्तकंठो रुरोद ह । विमृज्य नयने रामः पितुः सजलपाणिना ॥ ७२ ॥ आश्वासयामास नृपं शनैः स नयकोविदः । किमत्र दुःखेन विभो राज्यं शासतु मेऽनुजः ॥ ७३ ॥ अहं प्रतिज्ञां निस्तीर्य पुनर्यास्यामि ते पुरम् । राज्यात्कोटिगुणं सौख्यं मम राजन्वने सतः ॥ ७४ ॥ त्वत्सत्यपालनं देवकार्यं चापि भविष्यति । कैकेय्याश्च प्रियो राजन्वनवासो महागुरुः ॥ ७५ ॥ इदानीं गंतुमिच्छामि व्येतु मातुश्च हृज्ज्वरः । संभाराश्चोपहीयंतामभिषेकार्थमाहृताः ॥ ७६ ॥ मातरं

'(रामा!) मी बाइलबुद्ध्या आहे, माझ्या मनाला भ्रम झाला आहे, मी भलत्याच मार्गानें चाललों आहें; मला बंदीत टाकून तूं या राज्याचा स्वीकार कर. यांत तुला कांहींही पाप लागणार नाहीं. ६९ हे रघुनंदना! असें तूं केल्यानें मला असत्याचा डाग लागणार नाहीं.' असें म्हणून तो दुःखसंतप्त राजा तेव्हां विलाप करूं लागला. ७० 'हा रामा! हा जगन्नाथा! हा माझ्या प्राणप्रिया! मला टाकून घोर अरण्यांत जाणें तुला कसें योग्य वाटतें!' ७१ असें म्हणून त्यानें—दशरथानें—रामाला दृढ आलिंगन दिलें आणि तो ओकसाबोकशीं रडूं लागला. रामानें आपल्या हातानें पित्याचे डोळे पाण्यानें धुऊन काढिले ७२ नंतर तो नीतिनिपुण (राम) हळू हळू राजाचें सांत्वन करीत त्याला म्हणाला, महाराज! दुःख करण्याचें काय कारण आहे? माझा धाकटा बंधु राज्य करो. ७३ मी प्रतिज्ञा पुरी करून आपल्या राजधानीला परत येईन. राजन्! राज्यसुखाच्या कोटिपटीनें मला वनांत राहून सुख होईल. ७४ असें केल्यानें आपल्या सत्याचें पालन होईल; शिवाय देवकार्यही होईल. माझा अति कठिण वनवास कैकेयीलाही इष्टच वाटत आहे. ७५ आतांच जावें अशी माझी इच्छा आहे. आईचा—कैकेयीचा—हृदयसंताप (अशानें तरी) दूर होवो. अभिषेकाकरितां जमविलेलें सामानही आतां ठेवून द्यावें. ७६ माझ्या मातेला—कौसल्येला—आश्वासन देऊन व

च समाश्वास्य अनुनीय च जानकीम् । आगत्य पादौ वंदित्वा तव यास्ये सुखं वनम् ॥ ७७ ॥ इत्युक्त्वा तु परिक्रम्य मातरं द्रष्टुमाययौ । कौसल्याऽपि हरेः पूजां कुरुते रामकारणात् ॥ ७८ ॥ होमं च कारयामास ब्राह्मणेभ्यो ददौ धनम् । ध्यायते विष्णुमेकाग्रमनसा मौनमास्थिता ॥ ७९ ॥ अंतःस्थमेकं घनचित्प्रकाशं निरस्तसर्वातिशयस्वरूपम् । विष्णुं सदानंदमयं हृदब्जे सा भावयंती न ददर्श रामम् ॥ ८० ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहे० अयोध्याकांडे तृतीयः सर्गः ॥ ३ ॥

## अयोध्याकांड, सर्ग चवथा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ ततः सुमित्रा दृष्ट्वैनं रामं राज्ञीं ससंभ्रमा । कौसल्यां बोधयामास रामोऽयं समुपस्थितः ॥ १ ॥ श्रुत्वैव रामनामैषा बहिर्दृष्टिप्रवाहिता । रामं दृष्ट्वा विशालाक्षमालिंग्यांके

सीतेची समजूत घालून मी येतों, मग आपल्या चरणांना वंदन करून मी सुखानें वनाला जाईन.' ७७ असें बोलून रामानें पित्याला प्रदक्षिणा घातली व आईला—कौसल्येला—भेटण्याकरितां तो गेला. ह्या वेळीं रामाकरितांच कौसल्या विष्णुपूजा करीत बसली होती. ७८ तिनें ब्राह्मणांकडून होम करविला, व त्यांना धन दिलें. मौन धारण करून ती एकाग्रमनानें विष्णूचें चिंतन करीत होती. ७९ सर्वांतर्यामीं राहणारा, अद्वितीय, पूर्णज्ञानरूपी प्रकाशानें भरलेला, सर्व भेदभावांपासून दूर असणारा, नित्यानंदरूप, अशा त्या विष्णूला हृदयकमळांत ठेवून त्याचें ध्यान करीत असणाऱ्या कौसल्येला राम पुढें उभा असतांही दिसला नाहीं. ८० ”

**अयोध्याकांड, सर्ग तिसरा समाप्त.**

श्रीमहादेव म्हणाला, “इतक्यांत सुमित्रेनें रामाला पाहून तो आल्याचें वृत्त लगबगीनें जाऊन राणी कौसल्येला कळविलें. १ रामाचें नांव ऐकतांच तिनें बहिर्मुख दृष्टीनें

१. श्रीमान् विष्णु आनंदमय । ध्याता वृत्ति जाहली तन्मय । तेणें सन्निध ठेला तनय । भान नाहीं तयाचें ॥ '—अध्यात्मरामकथा.

न्यवेशयत् ॥ २ ॥ मूर्ध्न्यवघ्राय पस्पर्श गात्रं नीलोत्पलच्छवि । भुंक्ष्व पुत्रेति च प्राह मिष्टमन्नं क्षुधार्दितः ॥ ३ ॥ रामः प्राह न मे मातर्भोजनावसरः कुतः । दंडकागमने शीघ्रं मम कालोऽद्य निश्चितः ॥ ४ ॥ कैकेयीवरदानेन सत्यसंधः पिता मम । भरताय ददौ राज्यं ममाप्यारण्यमुत्तमम् ॥ ५ ॥ चतुर्दश समास्तत्र ह्युषित्वा मुनिवेषधृक् । आगमिष्ये पुनः शीघ्रं न चिंतां कर्तुमर्हसि ॥ ६ ॥ तच्छ्रुत्वा सहसोद्विग्ना मूर्च्छिता पुनरुत्थिता । आह रामं सुदुःखार्ता दुःखसागरसंप्लुता ॥ ७ ॥ यदि राम वनं सत्यं यासि चेन्नय मामपि । त्वद्विहीना क्षणार्धं वा जीवितं धारये कथम् ॥ ८ ॥ यथा गौर्बालकं वत्सं त्यक्त्वा तिष्ठेन्न कुत्रचित् । तथैव त्वां न शक्नोमि त्यक्तुं प्राणात्प्रियं सुतम् ॥ ९ ॥ भरताय प्रसन्नश्चेद्राज्यं राजा प्रयच्छतु । किमर्थं वनवासाय त्वामाज्ञापयति प्रियम् ॥ १० ॥ कैकेय्या वरदो राजा सर्वस्वं वा प्रयच्छतु । त्वया किमप

रामाकडे पाहिलें व त्याला मांडीवर बसविलें. २ त्याचें मस्तक हुंगून निळ्या कमळाप्रमाणें शोभणाऱ्या त्याच्या शरीरावरून तिनें हात फिरविला आणि त्याला म्हटलें 'पुत्रा! तूं भुकेनें पीडित आहेस. कांहीं गोड अन्न खा.' ३ राम म्हणाला, 'आई! मला आतां भोजनाला अवकाश म्हणून नाहींच. कारण मी आज ताबडतोब दंडकारण्यांत जावें असें निश्चित ठरलें आहे. ४ माझ्या सत्यप्रतिज्ञ पित्यानें कैकेयीला दिलेल्या वरदानाला अनुसरून भरताला राज्य आणि मला उत्तम असा अरण्यवास दिला आहे. ५ मुनिवेष धारण करून चौदा वर्षे तेथें राहिल्यावर मी पुनः त्वरित येईन. तूं काळजी करूं नये.' ६ तें ऐकून एकाएकी उद्विग्न होऊन कौसल्या मूर्च्छित होऊन पडली. कांहीं वेळानें पुनः सावध होऊन उठल्यावर दुःखसागरांत बुडालेली ती अत्यंत दुःखी कौसल्या रामाला म्हणाली, ७ 'रामा! जर तूं खरोखरच वनाला जाणार असशील, तर मलाही तेथें ने. तुझ्यावांचून अर्धा क्षण तरी माझ्यानें जीवंत कसें राहावेल? ८ गाय जशी वत्साला टाकून कोठेंही राहूं शकत नाहीं, त्याचप्रमाणें प्राणापेक्षांही प्रिय असलेल्या तुला पुत्राला सोडून मी राहूं शकणार नाहीं. ९ महाराज प्रसन्न असतील, तर खुशाल भरताला राज्य देवोत, परंतु तूं त्यांना अत्यंत प्रिय असतांना, तुला वनवासाला जाण्याची आज्ञा करितात, याचें काय बरें कारण? १० कैकेयीला राजांनीं वर दिला असल्यास त्यांनीं तिला सर्वस्व द्यावें,

राद्धं हि कैकेय्या वा नृपस्य वा ॥ ११ ॥ पिता गुरुर्यथा राम तवाह-
मधिका ततः । पित्राज्ञप्तो वनं गंतुं वारयेयमहं सुतम् ॥ १२ ॥ यदि
गच्छसि मद्वाक्यमुल्लंघ्य नृपवाक्यतः । तदा प्राणान्परित्यज्य गच्छामि
यमसादनम् ॥ १३ ॥ लक्ष्मणोऽपि ततः श्रुत्वा कौसल्यावचनं रुषा ।
उवाच राघवं वीक्ष्य दहन्निव जगत्रयम् ॥ १४ ॥ उन्मत्तं भ्रांतमनसं
कैकेयीवशवर्तिनम् । बद्ध्वा निहन्मि भरतं तद्बंधून्मातुलानपि ॥ १५ ॥
अद्य पश्यंतु मे शौर्यं लोकान्प्रदहतः पुरा । राम त्वमभिषेकाय कुरु
यत्नमरिंदम ॥ १६ ॥ धनुष्पाणिरहं तत्र निहन्यां विघ्नकारिणः । इति
ब्रुवंतं सौमित्रिमालिंग्य रघुनंदनः ॥ १७ ॥ शूरोऽसि रघुशार्दूल ममात्यं-

परंतु तूं कैकेयीचा अथवा राजाचा असा काय अपराध केला आहेस ? ( की तूं वनाला जावें. ) ११ पिता गुरु म्हणून तुला पूज्य आहे, पण मी तुला त्याच्याहूनही अधिक पूज्य आहें. जरी तुला पित्यानें वनाला जाण्याची आज्ञा केली आहे, तरी मी तुला–माझ्या मुलाला–नको जाऊं म्हणून निवारण करणार. १२ माझ्या आज्ञेचें उल्लंघन करून राजाज्ञेनें तूं ( वनाला ) जाशील, तर मी तत्काळ प्राणांचा त्याग करून यमसदनाला जाईन.' १३ कौसल्येचें भाषण ऐकून लक्ष्मण देखील अत्यंत क्रोधाविष्ट झाला. त्या वेळीं हा त्रैलोक्याचें दहनच करीत आहे की काय असा भास झाला. त्यानें रामाकडे पाहून म्हटलें, १४ 'रामा ! हा भरत उन्मत्त झाला आहे, याच्या मनाला भ्रांति झाली आहे, हा कैकेयीच्या तंत्रानें वागणारा आहे. म्हणून मी त्याला, त्याच्या बंधुंना–साह्यकर्त्यांना–आणि मातुलांना बांधून मारून टाकितों. १५ पूर्वी प्रलयकालीं लोकांचें दहन करणाऱ्या शंकरानें जसें शौर्य दाखविलें, तसेंच माझें शौर्य आज लोकांनी पहावें. हे शत्रुनाशना रामा ! तूं स्वतःच्या राज्याभिषेकाचा यत्न कर. १६ जे जे ह्या कामी विघ्न करण्यास पुढें येतील, त्या त्या सर्वांना मी ठार करीन. हातांत धनुष्य घेऊन मी तयार आहें.' असें लक्ष्मण बोलत असतां रघुनंदन रामानें त्याला आलिंगन दिलें. १७ आणि ( म्हटलें ) 'हे रघुकुल-

१. मातेचें महिमान —' कौसल्या बोल आपण । ऐके श्रीरामा सावधान । सांगेन मातेचें महिमान । अति गहन वेदोक्त ॥ गर्भधारणपोषणेसीं । मातेसी गुरुत्व विशेषीं । पृथ्वीपरीस मातेसीं । पूज्यत्वेंसी गौरव ॥ पिता जालिया पतित । पुत्रें त्यागावा निश्चित । माता जालिया पतित । पूज्यत्व शास्त्रार्थ प्रतिपादी ॥ पुत्र जालिया सन्यासी । अवश्य त्यागावें पितयासी । भिक्षा मागोनि मातेसी । पोसावें संन्यासविधीं शास्त्रार्थे ' ॥–भा. रामायण, अयोध्याकांड ६.

तद्धिते रतः । जानामि सर्वं ते सत्यं किंतु तत्समयो नहि ॥ १८ ॥ यदिदं दृश्यते सर्वं राज्यं देहादिकं च यत् । यदि सत्यं भवेत्तत्र आयासः सफलश्च ते ॥१९॥ भोगा मेघवितानस्थविद्युल्लेखेव चंचलाः । आयुरप्यग्निसंतप्तलोहस्थजलबिंदुवत् ॥२०॥ यथा व्यालगलस्थोऽपि भेको दंशानपेक्षते । तथा कालाहिना ग्रस्तो लोको भोगानशाश्वतान् ॥ २१ ॥ करोति दुःखेन हि कर्मतंत्रं शरीरभोगार्थमहर्निशं नरः । देहस्तु भिन्नः पुरुषात्समीक्ष्यते को वात्र भोगः पुरुषेण भुज्यते ॥ २२ ॥ पितृमातृसुतभ्रातृदारबंध्वादिसंगमः । प्रपायामिव जंतूनां नद्यां काष्ठौघवच्चलः

श्रेष्ठा ! तूं शूर आहेस, माझें अत्यंत हित करण्यांत तत्पर आहेस; तूं म्हणतोस तें सर्व खरें आहे हें मी जाणतों; परंतु तसें करण्याचा हा समय नाहीं. १८ हें राज्य, हा देह वगैरे जें कांहीं सर्व दिसत आहे, तें जर सत्य असतें, तर त्यासंबंधीं प्रयत्न सफल झाला असता. १९ हे भोग मेघमंडळावर चमकणाऱ्या विजेप्रमाणें चंचल आहेत. आणि आयुष्य अग्नीनें तापलेल्या लोखंडी पत्र्यावरील पाण्याच्या थेंबाप्रमाणें ( क्षणभंगुर ) आहे. २० ज्याप्रमाणें सापाच्या तोंडांत सांपडलेलाही बेडूक माशा खाण्याची इच्छा करितो, त्याप्रमाणें कालरूपी सर्पाच्या दाढेंत सांपडला असतांही, मनुष्य नश्वर भोगांची इच्छा करितो. २१ शरीरभोग मिळावे, म्हणून मनुष्य रात्रदिवस कष्ट सोसून कर्मकटकटी करीत असतो; परंतु देहच जर पुरुषाहून–आत्म्याहून–भिन्न आहे, असें दिसतें, तर मग या भोगांपैकीं कोणता भोग त्या पुरुषाला भोगायाला मिळतो ? २२ जसे पाणपोईवर ( पाणी पिण्यासाठीं ) अनेक लोक क्षणमात्र जमतात, त्याचप्रमाणें बाप, आई, पुत्र, बंधु, बायका, सोयरे धायरे यांचा समागम होय. वाहत्या नदींत काष्ठांचा आणि प्रवाहाचा संबंध जसा चंचल असतो. तसाच प्राण्यांचा समागम आहे. २३

१. भोगा मेघवितानमध्यविलसत्सौदामिनीचंचला ' ॥—वैराग्यशतक, भर्तृहरि. २. ' संतप्तायसि संस्थितस्य पयसो नामाऽपि न श्रूयते ' ॥—भर्तृहरि, नीतिशतक. मराठी भाषांतरः—' तोयाचें परि नावही न उरते संतप्त लोहांतरीं ' ॥—वामन. ३. ' सर्पें जैसा आकंठ गिळिला । बेडूक नेणोन आपणाला । कीटक लागती जे जे मुखाला । ते ते सेवूनि डोलतो ॥ '–अध्यात्मरामकथा. ४ समानार्थक उतारा:–(१) 'यथा काष्ठं च काष्ठं च समेयातां महोदधौ । समेत्य च व्यपेयाता तद्वद्भूतसमागमः ' ॥ ( २ ) ' पथि संगतमेवैतद्भ्राता माता पिता सखा ॥ हितोपदेशः '

॥ २३ ॥ छायेव लक्ष्मीश्चपला प्रतीता तारुण्यमंबूर्मिवदध्रुवं च । स्वप्नोपमं स्त्रीसुखमायुरल्पं तथापि जंतोरभिमान एषः ॥ २४ ॥ संसृतिः स्वप्नसदृशी सदा रोगादिसंकुला । गंधर्वनगरप्रख्या मूढस्तामनुवर्तते ॥ २५ ॥ आयुष्यं क्षीयते यस्मादादित्यस्य गतागतैः । दृष्ट्वाऽन्येषां जरामृत्यू कथंचिन्नैव बुध्यते ॥ २६ ॥ स एव दिवसः सैव रात्रिरित्येव मूढधीः । भोगाननुपतत्येव कालवेगं न पश्यति ॥ २७ ॥ प्रतिक्षणं क्षरत्येतदायुरामघटांबुवत् । सपत्ना इव रोगौघाः शरीरं प्रहरंत्यहो ॥ २८ ॥ जरा व्याघ्रीव पुरतस्तर्जयंत्यवतिष्ठते । मृत्युः सहैव यात्येष समयं संप्रतीक्षते ॥२९॥ देहेऽहंभावमापन्नो राजाहं लोकविश्रुतः । इत्य-

लक्ष्मी छायेप्रमाणें चंचल असून तारुण्य हें पाण्याच्या लाटांप्रमाणें अस्थिर आहे; स्त्रीसुख स्वप्नासारखें असून आयुष्य फारच थोडें आहे, ही गोष्ट सर्वांच्या अनुभवास येत असूनही प्राणी अभिमान वाहतो. २४ हा संसार स्वप्नाप्रमाणें असून रोगादिकांनी सदा व्यापलेला आहे. म्हणून त्याला 'गंधर्वनगर' हें नांव आहे. तरीही मूढ जन अशा संसारांत आनंद मानून राहतात ! २५ सूर्याच्या अस्तोदयांनी आयुष्य सारखें क्षीण होत चाललें आहे, त्यामुळें लोक जरा आणि मरण हीं पावत आहेत; हें मनुष्य डोळ्यांपुढें पाहत असूनही उमजत नाहीं. २६ कालचाच दिवस आज आहे, गेली तीच रात्र सांप्रत आहे, असें समजून मनुष्य भोग भोगण्यांत आसक्त होतो, कालाचा वेग त्याच्या लक्ष्यांत येत नाही. २७ प्रत्येक क्षणी आपलें आयुष्य कच्च्या घड्यांतील जलाप्रमाणें क्षीण होत आहे. रोगांचे समुदाय शत्रूंप्रमाणें शरीरावर सारखे प्रहार करीत आहेत. २८ जरा–वृद्धावस्था–वाघिणीप्रमाणें भय दाखवीत पुढें उभी राहिली आहे ! मृत्यु जन्मतःच आपल्याबरोबर असून वेळ केव्हां भरते, म्हणून वाट पाहत आहे. २९ देहाचा अभिमान धरून प्राणी मी राजा आहे, मी लोकप्रसिद्ध आहें, इत्यादि कांहीं तरी

१. आकाशात ढग आलीं असता घोडे, उंट, हत्ती वगैरे निरनिराळे आकार दिसतात हे आकार वरचेवर बदलत असतात. ह्या आकृतींच्या समुदायाला 'गंधर्वनगर' म्हणतात. देहाची क्षणभंगुरता दाखवितांना गंधर्वनगरीची उपमा कवि देत असतात —'तडित्सु शरदभ्रेषु गंधर्वनगरेषु च । स्थैर्यं येन विनिर्णीतं स विश्वसितु विग्रहे' ॥—योगवासिष्ठ. २. 'जातमेवान्तकोऽन्ताय जरा चान्वेति देहिनम् । अनुषक्ता द्वयेनैते भावाः स्थावरजंगमाः' ॥

स्मिन्मनुते जंतुः कृमिविड्भस्मसंज्ञिते ॥ ३० ॥ त्वगस्थिमांसविण्मूत्र-
रेतोरक्तादिसंयुतः । विकारी परिणामी च देह आत्मा कथं वद ॥ ३१ ॥
यमास्थाय भवाँल्लोकं दग्धुमिच्छसि लक्ष्मण । देहाभिमानिनः सर्वे दोषाः
प्रादुर्भवंति हि ॥ ३२ ॥ देहोऽहमिति या बुद्धिरविद्या सा प्रकीर्तिता ।
नाहं देहश्चिदात्मेति बुद्धिर्विद्येति भण्यते ॥ ३३ ॥ अविद्या संसृतेर्हेतुर्विद्या
तस्या निवर्तिका । तस्माद्यत्नः सदा कार्यो विद्याभ्यासे मुमुक्षुभिः ॥
कामक्रोधादयस्तत्र शत्रवः शत्रुसूदन ॥ ३४ ॥ तत्रापि क्रोध एवालं
मोक्षविघ्नाय सर्वदा । येनाविष्टः पुमान्हंति पितृभ्रातृसुहृत्सखीन् ॥३५॥

मानीत असतो, वस्तुतः ह्या शरीराला किडे, विष्ठा, भस्म ह्यांपैकीं कांहीं तरी नांव देणें वाजवी आहे. ३० हा देह त्वचा, हाडें, मांस, विष्ठा, मूत्र, रेत, रक्त इत्यादिकांनीं युक्त आहे; हा विकारी–नानाविकार पावणारा– निरानिराळ्या अवस्था पावणारा आहे; तो (निर्विकार व परिणामहीन) आत्मा कसा होऊं शकेल ? सांग. ३१ आणि अशा या देहाचा अभिमान धरून तूं लोकांना जाळू इच्छित आहेस ! देहाभिमानानेंच मनुष्याच्या हातून सर्व प्रकारचे दोष घडत असतात. ' देह हाच मी ' अशी जी बुद्धि तिलाच अविद्या असें म्हणत असतात. ३२ ' मी देह नसून ज्ञानस्वरूप आहें, ' अशी जी बुद्धि तीच ' विद्या ' म्हटली आहे. अविद्या-अज्ञान-हीच संसाराचें मूळ कारण होय. विद्या-ज्ञान-त्या संसाराला दूर करिते. ३३ म्हणून मुमुक्षूंनीं ज्ञानाच्या अभ्यासाचे कामी नेहमी प्रयत्न करावा. हे शत्रुनाशना (लक्ष्मणा) ! ह्या कार्यांत–मोक्षप्राप्तिमार्गांत–कामक्रोधादि हे शत्रु आहेत. ३४ त्यांतही मोक्षाचे कामी विघ्न करण्यास एकटा क्रोधच नेहमी पुरे आहे त्यानें व्याप्त होऊन मनुष्य बाप, भाऊ, आप्त, मित्र इत्यादिकांचा नाश करण्यास प्रवृत्त होतो. ३५

१. शरीर कुजून गेलें म्हणजे किडे होतात, हिंस्र प्राण्याकडून खाल्लें गेलें असता त्याची विष्ठा होते, आणि जाळलें म्हणजे त्याचें भस्म होतें २. मुमुक्षु–मोक्षाची इच्छा करणारे. ३. काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर, असे षड्रिपु ४. (१) ' क्रोधात् भवति संमोहः संमोहात् स्मृतिविभ्रमः । स्मृतिभ्रंशाद् बुद्धिनाशो बुद्धिनाशात् प्रणश्यति ' ॥–भ. गी (२) क्रोधाचें वर्णन भावार्थरामायणांत एकनाथांनीं केलें आहे, तें असें —' क्रोध पित्यापुत्रातें बाधी । क्रोध स्त्रीपुरुषांसी विरोधी । क्रोध पित्याची प्रीति छेदी । क्रोध त्रिशुद्धीं अनर्थ ॥ क्रोध निजज्ञाना निर्दाळी । क्रोध तपातें छळी । क्रोध स्वार्थाची करी होळी । क्रोध महाबळी अनर्थी ॥ क्रोध सहकारी कामासी । शेखीं क्रोध आलिया काम नाशी । क्रोध विवेकातें ग्रासी । तो तुजपासीं अतिक्रोध ' ॥–अयोध्याकांड.

क्रोधमूलो मनस्तापः क्रोधः संसारबंधनम् । धर्मक्षयकरः क्रोधस्तस्मा-
त्क्रोधं परित्यज ॥ ३६ ॥ क्रोध एष महान् शत्रुस्तृष्णा वैतरणी नदी ।
संतोषो नंदनवनं शांतिरेव हि कामधुक् ॥ ३७ ॥ तस्मात्क्षांतिं भज-
स्वाद्य शत्रुरेवं भवेन्न ते । देहेंद्रियमनःप्राणबुद्ध्यादिभ्यो विलक्षणः
॥ ३८ ॥ आत्मा शुद्धः स्वयंज्योतिरविकारी निराकृतिः । यावद्देहेंद्रि-
यप्राणैर्भिन्नत्वं नात्मनो विदुः ॥ ३९ ॥ तावत्संसारदुःखौघैः पीड्यंते
मृत्युसंयुताः । तस्मात्त्वं सर्वदा भिन्नमात्मानं हृदि भावय ॥ ४० ॥
बुद्ध्यादिभ्यो बहिः सर्वमनुवर्तस्व मा खिदः । भुंजन्प्रारब्धमखिलं सुखं
वा दुःखमेव वा ॥ ४१ ॥ प्रवाहपतितः कार्यं कुर्वन्नपि न लिप्यसे ।
बाह्ये सर्वत्र कर्तृत्वमावहन्नपि राघव ॥ ४२ ॥ अंतःशुद्धस्वभावस्त्वं

मनस्ताप होण्याला कारण क्रोध होय. त्या क्रोधामुळेच मनुष्य संसारांत बंधन पावतो. क्रोध हा धर्माचा क्षय करणारा आहे. म्हणून ( हे लक्ष्मणा ! ) क्रोधाचा त्याग कर ३६ क्रोध हा एक मोठा शत्रु आहे, आणि तृष्णा-भोगादिकांची इच्छा-ही वैतरणी[1] नदी आहे. ( त्याचप्रमाणें ) संतोष हें नंदनवन आणि शांति ही कामधेनु होय. ३७ म्हणून तूं क्षांति-क्षमा-धारण कर, असें केल्यानें तुला कोणीच शत्रु होणार नाही. आत्मा हा देह, इंद्रियें, मन, प्राण, बुद्धि, या सर्वांहून वेगळा आहे. तो शुद्ध, स्वयप्रकाश, विकार नाही व आकार नाही असा आहे. जोंपर्यंत देह, इंद्रियें, प्राण यांहून आत्मा भिन्न आहे, हें समजत नसतें, तोंपर्यंतच मृत्यूची भीति घेऊन संसारांतील दुःखांनीं प्राणी पीडित होतात म्हणून तूं नेहमीं आत्मा शरीरादिकांहून भिन्न आहे, अशी भावना मनांत ठेव. ३८ ३९ ४० बुद्ध्यादिकांहून आपण भिन्न आहों, असें मानून सर्व बाह्य व्यवहार करीत जा. त्याबद्दल खेद मानूं नकोस. प्रारब्धानें जीं सुखदुःखें भोगावी लागतील ती भोगीत जा. ४१ अशा रीतीनें संसारप्रवाहांत पडून कर्में करीत राहिलास, तरीही त्या कर्मांनीं तूं लिप्त होणार नाहीस.[2] बाहेरून सर्व कार्यांत कर्तृत्व तुजकडे असलें, तरी हे राघवा—लक्ष्मणा ! तुझें अंतःकरण शुद्ध असल्यास

१. नरकनदी. ही यमाच्या नगराजवळ असून पू, रक्त इत्यादि घाणेरड्या पदार्थांनीं भरलेली आहे. २. ‘ योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेंद्रियः । सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ’॥ भ. गीता ५, ७.

लिप्यसे न च कर्मभिः । एतन्मयोदितं कृत्स्नं हृदि भावय सर्वदा ॥४३॥ संसारदुःखैरखिलैर्बाध्यसे न कदाचन । त्वमप्यंब मयादिष्टं हृदि भावय नित्यदा ॥ ४४ ॥ समागमं प्रतीक्षस्व न दुःखैः पीड्यसे चिरम् । न सदैकत्र संवासः कर्ममार्गानुवर्तिनाम् ॥ ४५ ॥ यथा प्रवाहपतितप्लवानां सरितां तथा । चतुर्दशसमा संख्या क्षणार्धमिव जायते ॥ ४६ ॥ अनुमन्यस्व मामंब दुःखं संत्यज्य दूरतः । एवं चेत्सुखसंवासो भविष्यति वने मम ॥ ४७ ॥ इत्युक्त्वा दंडवन्मातुः पादयोरपतच्चिरम् । उत्थाप्यांके समावेश्य आशीर्भिरभिनंदयत् ॥ ४८ ॥ सर्वे देवाः सगंधर्वा ब्रह्मविष्णुशिवादयः । रक्षंतु त्वां सदा यांतं तिष्ठंतं निद्रया युतम् ॥ ४९ ॥ इति प्रस्थापयामास समालिंग्य पुनः पुनः । लक्ष्मणोऽपि तदा रामं नत्वा हर्षाश्रुगद्गदः ॥ ५० ॥ आह राम मर्मांतस्थः

त्या कर्मांचा लेप तुला कधींही होणार नाही. हें मी सांगितलेलें सर्व नेहमीं हृदयांत ठेव, ४२, ४३ ( असें केल्यानें ) कितीही संसारदुःखें तुजवर आली, तरी त्यांपासून तुला बाधा म्हणून होणार नाहीं. माते ! तूंही मीं सांगितलेलें सर्व सदोदित मनांत वागव. ४४ माझ्या फिरून येण्याची वाट पाहत रहा, तुला फार वेळ दुःख भोगावें लागणार नाही. या कर्मलोकांत पडलेल्या प्राण्यांची नित्य संगति राहणें शक्य नाही. ४५ नदीप्रवाहांत एकत्रित झालेल्या नौकांचें चिरकाल एकत्र राहणें शक्य नाहीं ( तसेंच हें आहे ). चौदा वर्षें ही संख्या ( मोठी असली तरी ) अर्ध्या क्षणाप्रमाणें हां हां म्हणतां निघून जाईल. ४६ आई ! मला ( जाण्यास ) अनुमोदन दे, आणि दुःख दूर सार. असें तूं केल्यानें माझा वनवास मला सुखाचा होईल.' ४७ असें बोलून आईच्या पायांवर लोटांगण घालून तशा स्थितीत राम बराच वेळ राहिला. ( कौसल्येनें ) त्याला उचलून मांडीवर घेतलें आणि आशीर्वाद देऊन त्याला गौरविलें. ४८ ( ती म्हणाली ) 'ब्रह्मा, विष्णु, महेशादि सर्व देव आणि गंधर्व प्रवासांत चालतांना, उभा असतांना, नीज घेतांना, तुझें सर्वदा रक्षण करोत.' ४९ असें म्हणून आणि पुनः पुनः आलिंगन देऊन तिनें रामाला निरोप दिला. लक्ष्मणानेंही रामाला वंदन केलें. त्याच्या डोळ्यांतून आनंदाश्रू वाहूं लागले, आणि गळा दाटून आला. ५० तो म्हणाला, ' रामा !

संशयोऽयं त्वया हृतः। यास्यामि पृष्ठतो राम सेवां कर्तुं तदादिश ॥५१॥ अनुगृह्णीष्व मां राम नोचेत्प्राणांस्त्यजाम्यहम्। तथेति राघवोऽप्याह लक्ष्मणं याहि मा चिरम् ॥ ५२ ॥ प्रतस्थे तां समाधातुं गतः सीतापतिर्विभुः। आगतं पतिमालोक्य सीता सुस्मितभाषिणी ॥ ५३ ॥ स्वर्णपात्रस्थसलिलैः पादौ प्रक्षाल्य भक्तितः। पप्रच्छ पतिमालोक्य देव किं सेनया विना ॥ ५४ ॥ आगतोऽसि गतः कुत्र श्वेतच्छत्रं च ते कुतः। वादित्राणि न वाद्यंते किरीटादिविवर्जितः ॥ ५५ ॥ सामंतराजसहितः संभ्रमान्नागतोऽसि किम् । इति स्म सीतया पृष्टो रामः सस्मितमब्रवीत् ॥ ५६ ॥ राज्ञा मे दंडकारण्ये राज्यं दत्तं शुभेऽखिलम् । अतस्तत्पालनार्थाय शीघ्रं यास्यामि भामिनि ॥ ५७ ॥ अद्यैव यास्यामि वनं त्वं तु श्वश्रूसमीपगा। शुश्रूषां कुरु मे मातुर्न मिथ्यावादिनो वयम् ॥ ५८ ॥

माझ्या मनातील संशय तू दूर केला आहेस. तरी रामा ! तुझी सेवा करण्याकरितां म्हणून मी तुझ्या बरोबर येतों. मला परवानगी दे. ५१ रामा ! एवढी मजवर कृपा कर. नाही तर मी प्राण ठेवणार नाही. श्रीरामही 'ठीक आहे, चल मजबरोबर, उशीर करूं नको,' असें म्हणाला. ५२ नंतर तो प्रभु सीतापति तेथून सीतेचें समाधान करण्यासाठीं ( तिच्या मंदिराकडे ) निघाला. पति आल्याचें पाहून सुवर्णपात्रांतील उदकानें तिनें भक्तिपूर्वक रामाचे पाय धुतले, आणि हंसत हंसत पतीकडे पाहून मधुर शब्दांनी त्याला विचारिलें, 'महाराज ! सेना बरोबर घेतल्याशिवाय एकटे कसे आलां ? आपण कोठें गेलां होतां ? आपलें शुभ्र छत्र[1] कोठें आहे ? वाद्यें वाजत नाहीत, किरीटादि राजचिह्नेंही आपल्या अंगावर दिसत नाहींत, हें कसें ? ५३, ५४, ५५ मांडलिक राजांसमवेत मोठ्या थाटानें कां आलां नाही ? ' हा सीतेचा प्रश्न ऐकून हंसत हंसत राम म्हणाला, ५६ 'हे कल्याणि ! राजानें दंडकारण्यांतील सर्व राज्य मला ( आज ) दिलें आहे ! त्याच्या पालनाकरितां हे सुंदरि ! मी तिकडे त्वरित जात आहें. ५७ आजच मी वनाला जाणार आहें, तरी तूं आपल्या सासूजवळ राहून तिची—माझ्या मातेची—शुश्रूषा कर. आम्ही कधींही खोटें बोलत नसतों.' ५८

१. शुभ्र छत्र हें सिंहासनाधिष्ठित राजाचें एक चिह्न आहे छत्र व दोन चवऱ्या ही मुख्य राजचिह्नें गणिलीं जातात. 'अदेयमासीत् त्रयमेव भूपते: शशिप्रभं छत्रमुभे च चामरे' ॥— रघुवंश ३, १६.

इति ब्रुवंतं श्रीरामं सीता भीताऽब्रवीद्वचः । किमर्थं वनराज्यं ते पित्रा दत्तं महात्मना ॥ ५९ ॥ तामाह रामः कैकेय्यै राजा प्रीतो वरं ददौ । भरताय ददौ राज्यं वनवासं ममानघे ॥ ६० ॥ चतुर्दश समास्तत्र वासो मे किल याचितः । तया देव्या ददौ राजा सत्यवादी दयापरः ॥ ६१ ॥ अतः शीघ्रं गमिष्यामि मा विघ्नं कुरु भामिनि । श्रुत्वा तद्रामवचनं जानकी प्रीतिसंयुता ॥ ६२ ॥ अहमग्रे गमिष्यामि वनं पश्चात्त्वमेष्यसि । इत्याह मां विना गन्तुं तव राघव नोचितम् ॥ ६३ ॥ तामाह राघवः प्रीतः स्वप्रियां प्रियवादिनीम् । कथं वनं त्वां नेष्येऽहं बहुव्याघ्रमृगाकुलम् ॥ ६४ ॥ राक्षसा घोररूपाश्च सांति मानुषभोजिनः ।

हें रामाचे बोलणें ऐकतांच सीतेला भीति वाटून ती म्हणाली, 'आपल्या महात्मा पित्यांनी आपणाला वनराज्य दिलें तें काय म्हणून?' ५९ राम तिला म्हणाला, 'हे निष्पापे (सीते)! महाराजांनी कैकेयीवर संतुष्ट होऊन तिला वर दिला. त्या वरानें भरताला राज्य आणि मला वनवास त्यांनी दिला आहे. ६० मी चवदा वर्षे वनामध्य रहावें अशी याचना तिनें महाराजांकडे केली, आणि महाराज दयाळू आणि सत्यवादी असल्यामुळें त्यांनी तें कैकेयी देवीचें मागणें मान्य केलें. ६१ हे सुंदरि! मी लवकर जाणार आहें, तरी मला तूं विघ्न करूं नकोस.' हें रामाचें भाषण ऐकून सीता प्रेमपूर्वक म्हणाली, ६२ 'हे राघवा! मी वनाला आपल्यापुढें निघणार, आपण माझ्या मागाहून यावें, मला घेतल्यावांचून आपण जाणें आपणाला उचित नाहीं.' ६३ मधुरभाषिणी प्रिय सीतेचें भाषण ऐकून रामाला आनंद वाटला व तो तिला म्हणाला, 'अनेक[1] व्याघ्र व पशूंनी गजबजलेल्या अरण्यांत तुला मी कसा नेऊं? ६४ तेथें मनुष्यभक्षक आणि भयंकर रूपाचे राक्षस असतात!

१ समानार्थक वर्णन.—'सीते यथा त्वा वक्ष्यामि तथा कार्यं त्वयाबले । वने दोषा हि बहवो वसतस्तान्निबोध मे ॥ गिरिनिर्झरसंभूता गिरिनिर्दरिवासिनाम् । सिंहाना निनदा दुःखाः श्रोतु दुःखमतो वनम् ॥ लताकंटकसंकीर्णा कृकवाकूपनादिता । निरपाश्च सुदुःखाश्च मार्गा दुःखमतो वनम् ॥ सुप्यते पर्णशय्यासु स्वय भग्नासु भूतले । रात्रिषु श्रमखिन्नेन तस्माद् दुःखमतो वनम् ॥ अहोरात्रं च संतोषः कर्तव्यो नियतात्मना । फलैर्वृक्षावपतितैः सीते दुःखमतो वनम् ॥ उपवासश्च कर्तव्यो यथाप्राणेन मैथिलि । जटाभारश्च कर्तव्यो वल्कलांबरधारणम्' ॥ —वा. रामायण.

सिंहव्याघ्रवराहाश्च संचरंति समंततः ॥ ६५ ॥ कट्वम्लफलमूलानि भोजनार्थं सुमध्यमे । अपूपानि व्यंजनानि विद्यंते न कदाचन ॥ ६६ ॥ काले काले फलं वाऽपि विद्यते कुत्र सुंदरि । मार्गो न दृश्यते क्वापि शर्कराकंटकान्वितः ॥ ६७ ॥ गुहागह्वरसंबाधं झिल्लीदंशादिभिर्युतम् । एवं बहुविधं दोषं वनं दंडकसंज्ञितम् ॥ ६८ ॥ पादचारेण गंतव्यं शीतवातातपादिमत् । राक्षसादीन्वने दृष्ट्वा जीवितं हास्यसेऽचिरात् ॥ ६९ ॥ तस्माद्भद्रे गृहे तिष्ठ शीघ्रं द्रक्ष्यसि मां पुनः । रामस्य वचनं श्रुत्वा सीता दुःखसमन्विता ॥ ७० ॥ प्रत्युवाच स्फुरद्वक्त्रा किंचित्कोपसमन्विता । कथं मामिच्छसे त्यक्तुं धर्मपत्नीं पतिव्रताम् ॥ ७१ ॥ त्वदनन्यामदोषां मां धर्मज्ञोऽसि दयापरः । त्वत्समीपे स्थितां राम को वा मां धर्षयेद्वने ॥ ७२ ॥ फलमूलादिकं यद्यत्तव भुक्तावशेषितम् । तदेवामृततुल्यं मे तेन तुष्टा रमाम्यहम् ॥ ७३ ॥ त्वया सह

चारी बाजूनी सिंह, व्याघ्र डुकरें फिरत असतात! ६५ सुंदरि! तेथें भोजन म्हणजे कडू, आंबट अशीं फळें आणि मुळं यांचें होय. पुऱ्या, भाज्या, चटण्या, वगैरे कधींहि मिळणें शक्य नाहीं. ६६ कांते! तीं फळेंही कधींतरी क्वचित् स्थलीं मिळाली तर मिळतात. सर्वत्र खडे, कांटे पसरले असल्यामुळें कोठें कोठें रस्ता सांपडत नाहीं. ६७ तेथें गुहा, दऱ्या यांत रहावें लागत असल्यामळ आणि रानमाशा, डांस, वगैरे अनेक जंतु असल्यामुळें हें दंडका नांवाच अरण्य म्हटलें म्हणजे त्यांत अनेक प्रकारचे दोष आहेत. ६८ तेथें पायींच प्रवास केला पाहिजे; थंडी, वारा, ऊन सोसलें पाहिजे; तूं तर राक्षसादिकांना पाहून तत्काळ प्राण सोडशील. ६९ म्हणून हे कल्याणि, तूं घरीं रहा; लवकरच तुझी माझी भेट पुनः होईल.' हें रामाचें भाषण ऐकून सीतेला दुःख झालें. ७० थोडासा क्रोध आल्यामुळें तिचे ओंठ फुरफुरूं लागले. तिनें उत्तर दिलें, 'मी आपली पतिनिष्ठ धर्मपत्नी आहें, मला आपल्याशिवाय दुसरा कोणाचाही आश्रय नाहीं; मी निर्दोष आहें; असें असतां मला सोडून जाण्याची इच्छा आपण कां करितां? आपण धर्मज्ञ आणि दयापर आहां. आपण रानामध्यें मजजवळ असतां मला कोण त्रास देणार? ७१, ७२ फळें, मुळें आपण खाऊन त्यांपैकीं जें कांहीं शिल्लक राहील, तें मला अमृतासारखें गोड वाटेल. त्यानेंच केवळ माझा संतोष होऊन मी आनंदांत राहीन. ७३

चरंत्या मे कुशाः काशाश्च कंटकाः । पुष्पास्तरणतुल्या मे भविष्यंति न संशयः ॥ ७४ ॥ अहं त्वां क्लेशये नैव भवेयं कार्यसाधिनी । बाल्ये मां वीक्ष्य कश्चिद्वै ज्योतिःशास्त्रविशारदः ॥७५॥ प्राह ते विपिने वासः पत्या सह भविष्यति । सत्यवादी द्विजो भूयाद्गमिष्यामि त्वया सह ॥ ७६ ॥ अन्यत्किंचित्प्रवक्ष्यामि श्रुत्वा मां नय काननम् । रामायणानि बहुशः श्रुतानि बहुभिर्द्विजैः ॥ ७७ ॥ सीतां विना वनं रामो गतः किं कुत्राचिद्वद । अतस्त्वया गमिष्यामि सर्वथा त्वत्सहायिनी ॥ ७८ ॥ यदि गच्छसि मां त्यक्त्वा प्राणांस्त्यक्ष्यामि तेऽग्रतः । इति तं निश्चयं ज्ञात्वा सीताया रघुनंदनः ॥ ७९ ॥ अब्रवीद्देवि गच्छ त्वं वनं शीघ्रं मया सह । अरुंधत्यै प्रयच्छाशु हारानाभरणानि च ॥ ८० ॥ ब्राह्मणेभ्यो धनं सर्वं दत्त्वा गच्छामहे वनम् । इत्युक्त्वा लक्ष्मणेनाशु द्विजानाहूय भक्तितः ॥ ८१ ॥ ददौ गवां वृंदशतं धनानि वस्त्राणि दिव्यानि

आपल्याबरोबर फिरत असतां गवत, दर्भ, कांटे मला पुष्पशय्येप्रमाणे वाटतील, यांत संशय नाही. ७४ मी आपणाला कोणत्याही प्रकारें क्लेश देणार नाही; आपली कार्यसाधिका होईन. बालपणीं मला पाहून कोणी एका निष्णात ज्योतिष्यानें सांगितलें आहे कीं, 'तुला पतीसह अरण्यवास घडणार आहे.' त्या ब्राह्मणाचें वचन सत्य होऊं द्या. मी आपल्याबरोबर येतें ७५, ७६ आणखीही एक गोष्ट मी आपणाला सांगणार आहें; ती ऐकून तरी मला आपण वनाला न्यावें. आपण ब्राह्मणांच्या मुखानें अनेक रामायणें ऐकिलीं असतील. ७७ त्यांत सीतेवांचून राम वनाला गेले, असें कुठें तरी वर्णन असल्यास आपण सांगावें म्हणून सर्वप्रकारें आपली सहायिनी होऊन मी आपल्याबरोबर येत्यें. ७८ जर मला टाकून आपण जाल, तर आपल्यापुढें मी प्राणत्याग करीन!' सीतेचा असा निश्चय जाणून तो रघुनंदन राम म्हणाला, 'देवि! तर मग चल लवकर माझ्याबरोबर वनाला. तुझे हार आणि इतर अलंकार शीघ्र अरुंधतीला देऊन टाक. ७९, ८० आपलें सर्व धन ब्राह्मणांना देऊन आपण वनाला जाऊं. असें बोलून लक्ष्मणाकरवीं रामानें भक्तिपूर्वक कुटुंबवत्सल, विद्वान् व सच्छील अशा ब्राह्मणांस बोलावून आणिलं, आणि मोठ्या आमंदानें त्यांस शेंकडो गाईंचे कळप, विपुल धन, दिव्य वस्त्रें आणि अलं-

विभूषणानि । कुटुंबवद्भ्यः श्रुतशीलवद्भ्यो मुदा द्विजेभ्यो रघुवंशकेतुः ॥८२॥ अरुंधत्यै ददौ सीता मुख्यान्याभरणानि च । रामो मातुः सेवकेभ्यो ददौ धनमनेकधा ॥८३॥ स्वकांतःपुरवासिभ्यः सेवकेभ्यस्तथैव च । पौरजानपदेभ्यश्च ब्राह्मणेभ्यः सहस्रशः ॥ ८४ ॥ लक्ष्मणोऽपि सुमित्रां तु कौसल्यायै समर्पयत् । धनुष्पाणिः समागत्य रामस्याग्रे व्यवस्थितः ॥८५॥ रामः सीता लक्ष्मणश्च जग्मुः सर्वे नृपालयम् ॥ ८६ ॥ श्रीरामः सह सीतया नृपपथे गच्छन् शनैः सानुजः पौरान् जानपदान्कुतूहलदृशः सानंदमुद्वीक्षयन् । श्यामः कामसहस्रसुंदरवपुः कान्त्या दिशो भासयन्पादन्यासपवित्रिताऽखिलजगत्प्रापालयं तत्पितुः ॥ ८७ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अयोध्याकांडे चतुर्थः सर्गः ॥ ४ ॥

कार त्या रघुकुलश्रेष्ठानें दिले. ८१, ८२ आपले मुख्य मुख्य अलंकार सीतेनें अरुंधतीला दिले. रामानेंही आपल्या मातेच्या सेवकांना, अंतःपुरांत राहणाऱ्या नोकरांना, त्याचप्रमाणें नगरांतील व देशांतील लोकांना आणि हजारों ब्राह्मणाना अनेक प्रकारच्या देणग्या दिल्या. ८३,८४ लक्ष्मणानें सुमित्रेला कौसल्येच्या स्वाधीन केलें, व हातांत धनुष्य घेऊन रामापुढे येऊन उभा राहिला. ८५ नंतर राम, सीता आणि लक्ष्मण राजमंदिराकडे जाण्याला निघाली. ८६ अशा रीतीनें हजारों मदनांप्रमाणें सुंदर, स्वतेजानें सर्व दिशांना उज्ज्वलित करणारा, पादन्यासानें सकल जगास पवित्रित करणारा तो श्यामवर्ण राम, सीता व लक्ष्मण यांसहवर्तमान कौतुकदृष्टीने आपणाकडे पाहणाऱ्या नगरवासी व राष्ट्रवासी लोकांकडे आनंदानें पाहत पाहत राजमार्गानें हळूहळू पित्याच्या मंदिरीं येऊन पोंचला. ८७

**अयोध्याकांड, चवथा सर्ग समाप्त.**

## अयोध्याकांड, सर्ग पांचवा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ आयांतं नागरा दृष्ट्वा मार्गे रामं सजानकिम् । लक्ष्मणेन समं वीक्ष्य ऊचुः सर्वे परस्परम् ॥ १ ॥ कैकेय्या वरदानादि श्रुत्वा दुःखसमावृताः । बत राजा दशरथः सत्यसंधं प्रियं सुतम् ॥ २ ॥ स्त्रीहेतोरत्यजत्कामी तस्य सत्यवता कुतः । कैकेयी वा कथं दुष्टा रामं सत्यं प्रियंकरम् ॥ ३ ॥ विवासयामास कथं क्रूरकर्माऽतिमूढधीः । हे जना नात्र वस्तव्यं गच्छामोऽद्यैव काननम् ॥ ४ ॥ यत्र रामः सभार्यश्च सानुजो गंतुमिच्छति । पश्यंतु जानकीं सर्वे पादचारेण गच्छतीम् ॥ ५ ॥ पुंभिः कदाचिद्दृष्टा वा जानकी लोकसुंदरी । साऽपि पादेन गच्छंती जनसंघेष्वनावृता ॥ ६ ॥ रामोऽपि पादचारेण गजाश्वादिविवर्जितः । गच्छति द्रक्ष्यथ विभुं सर्वलोकैकसुंदरम् ॥ ७ ॥

श्रीमहादेव म्हणाला, "कैकेयीला दिलेल्या वरांची गोष्ट ऐकून नगरवासी जनांना अत्यंत दुःख झालें. लक्ष्मण व जानकी यांसहवर्तमान मार्गावरून जाणाऱ्या रामाला पाहून ते आपसांत बोलूं लागले, 'हाय हाय! या विषयासक्त दशरथ राजानें केवळ बायकोकरितां सत्यप्रतिज्ञ आणि प्रिय पुत्राचा त्याग केला, यांत (राजाचा) सत्यपणा काय दिसून आला? ही कैकेयी तरी कशी इतकी दुष्ट की, हिच्या बुद्धीला मोह होऊन प्रिय करणाऱ्या व सत्यसंध रामाला वनवासाला धाडावयाचें दुष्ट कर्म करण्याला प्रवृत्त झाली! लोकहो! आतां येथें राहूं नका. आपण आजच्या आज वनाला जाऊं. १, २, ३, ४ ज्या अरण्यांत भार्येला व बंधूला घेऊन राम जात आहे, तिकडेच आपण जाऊं. सर्व लोकहो! पहा! ही जानकी पायीं जात आहे. ५ त्रैलोक्यसुंदरी जानकी (आजपर्यंत) कधीं पुरुषाचे दृष्टीस पडली होती काय? पण तीच आज सर्व लोकांसमोरून उघडी पायीं चालली आहे. ६ सर्व लोकांत एकच सुंदर असा रामचंद्र हत्ती, घोडे इत्यादि न घेतां पायींच चालत आहे तो

१. 'राम चालता राजविदीं । सवे दाटली जनाची मादी । कैकेयीची दुष्ट बुद्धी । राजा निर्बुद्धि का आयके ॥ रथ गज चतुरंग श्रेणी । राम गजरें जात प्रतिदिनी । तो श्रीराम आजि अनवाणी । जातो चरणीं वनवासा ॥ सीता सुकुमार महासती । इंद्रादि देव पाहों न शकती । तेही चरणीं चालता क्षितीं । लोक देखती मार्गस्थ' ॥—भा. रामायण, अयो. ८ १५-१६

राक्षसी कैकयीनाम्नी जाता सर्वविनाशिनी । रामस्यापि भवेद्दुःखं सीतायाः पादयानतः ॥ ८ ॥ बलवान्विधिरेवात्र पुंप्रयत्नो हि दुर्बलः । इति दुःखाकुले वृंदे साधूनां मुनिपुंगवः ॥ ९ ॥ अब्रवीद्वामदेवोऽथ साधूनां संघमध्यगः । मानुशोचथ रामं वा सीतां वा वच्मि तत्त्वतः ॥ १० ॥ एष रामः परो विष्णुरादिनारायणः स्मृतः । एषा सा जानकी लक्ष्मीर्योगमायेति विश्रुता ॥ ११ ॥ असौ शेषस्तमन्वेति लक्ष्मणाख्यश्च सांप्रतम् । एष मायागुणैर्युक्तस्तत्तदाकारवानिव ॥ १२ ॥ एष एव रजोयुक्तो ब्रह्माऽभूद्विश्वभावनः । सत्वाविष्टस्तथा विष्णुस्त्रिजगत्प्रतिपालकः ॥ १३ ॥ एष रुद्रस्तामसोऽन्ते जगत्प्रलयकारणम् । एष मत्स्यः पुरा भूत्वा भक्तं वैवस्वतं मनुम् ॥ १४ ॥ नाव्यारोप्य लयस्यांतं

पहा ! ७ सर्वांचा नाश करण्याकरितां ही कैकयी नांवाची कोणीतरी राक्षसीण जन्मली आहे ! सीतेला पायी चालतांना पाहून रामाला सुद्धां दुःख होत असेल. ८ अशा वेळी दैवच बलवान् आहे, पुरुषप्रयत्न दुर्बल आहे, असेंच म्हटलें पाहिजे.[१] अशा रीतीनें सज्जनसमुदाय दुःखानें व्याकुल झाला असतां, त्यांत असलेल्या मुनिश्रेष्ठ वामदेवानें म्हटलें, ' लोकहो ! राम किंवा सीता यांच्या संबंधानें शोक करूं नका. या सर्व गोष्टींचें रहस्य मी सांगतों ९, १० हा राम प्रत्यक्ष आदिनारायण विष्णु आहे, व सीता ही ' योगमाया ' नांवानें प्रसिद्ध असलेली लक्ष्मी आहे. ११ लक्ष्मण नांवाचा त्या ( रामा ) मागून जाणारा हा शेष आहे. हा ( राम ) मायेच्या गुणांनी युक्त असला म्हणजे निरनिराळ्या स्वरूपांनी जगाला दृश्यमान होतो. १२ रजोगुणानें युक्त असला म्हणजे त्याला सृष्टिकर्ता ' ब्रह्मदेव ' असें म्हणतात. सत्वगुणानें युक्त असला म्हणजे तो त्रैलोक्याचें पालन करणारा ' विष्णु ' अशी संज्ञा पावतो, १३ व तमोगुणानें वेष्टित झाला म्हणजे शेवटी जगाचा नाश करणारा ' रुद्र ' म्हटला जातो. हाच राम पूर्वी माशाचें रूप घेऊन वैवस्वत मनु नांवाच्या आपल्या भक्ताला नौकेंत

१ ' विधिरहो बलवानिति मे मति '—हितोपदेश २. रजोगुण, सत्वगुण आणि तमोगुण मिळून त्रिगुणात्मक माया बऱ्यावाईट कार्यांचे ठिकाणीं प्रवृत्ति हा रजोगुण, ज्ञान किंवा जाणीव हा सत्वगुण, आणि अज्ञान अगर नेणीव हा तमोगुण. ३ शंकर. ४ मत्स्यावतार घेऊन मत्स्यावतार हा विष्णूच्या दहा अवतारांपैकी पहिला होय. मत्स्य, कूर्म, वराह ( डुकर ), नृसिंह, वामन, परशुराम, राम, कृष्ण, बौद्ध आणि कलकी मिळून दशावतार होत. ५ वैवस्वत मनु हा सातवा मनु असून चालू युगाचा स्वामी आहे.

पालयामास राघवः । समुद्रमथने पूर्वं मंदरे सुतलं गते ॥ १५ ॥
अधारयत्स्वपृष्ठेऽद्रिं कूर्मरूपी रघूत्तमः । मही रसातलं याता प्रलये
सूकरोऽभवत् ॥ १६ ॥ तोलयामास दंष्ट्राग्रे तां क्षोणीं रघुनंदनः ।
नारसिंहं वपुः कृत्वा प्रल्हादवरदः पुरा ॥ १७ ॥ त्रैलोक्यकंटकं रक्षः
पाटयामास तन्नखैः । पुत्रराज्यं हृतं दृष्ट्वा ह्यदित्या याचितः पुरा ॥ १८ ॥
वामनत्वमुपागम्य याञ्चया चाहरत्पुनः । दुष्टक्षत्रियभूभारनिवृत्त्यै भार्ग-
वोऽभवत् ॥ १९ ॥ स एव जगतां नाथ इदानीं रामतां गतः । रावणा-

बसवून प्रलयकालचा शेवट होईपर्यंत त्याचें रक्षण करिता झाला. हाच राम-चंद्र समुद्रमंथनाचे वेळी, मंदर[1]पर्वत सुतलांत—पाताळांत—गेला असतां, कांसवाचे रूपानें त्या पर्वताला आपले पाठीवर धारण करिता झाला. प्रलयकाली पृथ्वी रसातळाला गेली असता हाच सूकर होऊन १४,१५,१६ आपल्या दाढेच्या टोकावर तिला तोलून धरिता झाला. पुढें प्रल्हादाला[2] वर देण्याकरितां नरसिंहरूप धरून त्रैलोक्याला कांट्याप्रमाणें त्रास देणाऱ्या राक्षसाला ( हिरण्यकशिपूला ) नखांनी विदारण करिता झाला. (पुढें) आपल्या पुत्राचें—इंद्राचें—राज्य गेलेलें पाहून अदितीनें प्रार्थना केल्यावर वामनरूपानें प्रकट होऊन आणि भिक्षा मागून तें राज्य पुनः मिळविता झाला. नंतर दुष्ट क्षत्रिय भूमीला भार झाले, तेव्हा तो भार हरण करण्याकरितां भार्गव—परशुराम—अवतार घेता झाला. १७, १८, १९ तोच आतां रामरूपानें अव-

१. मंदर हा एक पर्वत असून समुद्रमंथनाचे वेळी देवदैत्यानी त्याचा रवी म्हणून उपयोग केला होता २ प्रह्लाद हा हिरण्यकशिपुनामक दैत्याचा पुत्र हा मोठा विष्णुभक्त होता. आपला पुत्र आपल्या शत्रूच्या पक्षाने वागतो, हें पाहून हिरण्यकशिपूस प्रह्लाद अत्यंत अप्रिय झाला. हिरण्यकशिपूनें त्याला भयंकर छळिले, तरी त्याने विष्णुभक्ति सोडली नाही एकदां ' ज्या विष्णूचें तूं रात्रंदिवस भजन करितोस, तो तुला कसा वाचवितो, तें पहातों ' असे हिरण्यकशिपु बोलला त्यास ' विष्णु स्थिर, चर, काष्ठ, पाषाण या सर्वांत भरून उरला आहे. तोच माझे रक्षण करील, ' असे प्रह्लादानें उत्तर दिलें. त्यावर ' तुझा विष्णु या समोरच्या खांबात आहे काय ? ' असें म्हणून हिरण्यकशिपूनें त्या खांबावर लाथ मारिली त्याबरोबर त्या खांबातून सिंहाप्रमाणें भयंकर व उग्र अशी व्यक्ति बाहेर पडली तोच नृसिंह होय त्याने हिरण्यकशिपूला मांडीवर आडवें घेतलें व नखानी त्याचे पोट फाडून ठार केलें. हा दिवस वैशाख शुद्ध १४ होय.

दीनि रक्षांसि कोटिशो निहनिष्यति ॥ २० ॥ मानुषेणैव मरणं तस्य दृष्टं दुरात्मनः । राज्ञा दशरथेनापि तपसाराधितो हरिः ॥ २१ ॥ पुत्रत्वाकांक्षया विष्णोस्तदा पुत्रोऽभवद्धरिः । स एव विष्णुः श्रीरामो रावणादिवधाय हि ॥ २२ ॥ गंताऽद्यैव वनं रामो लक्ष्मणेन सहायवान् । एषा सीता हरेर्माया सृष्टिस्थित्यंतकारिणी ॥ २३ ॥ राजा वा कैकयी वापि नात्र कारणमण्वपि । पूर्वेद्युर्नारदः प्राह भूभारहरणाय च ॥ २४ ॥ रामोऽप्याह स्वयं साक्षाच्छ्वो गमिष्याम्यहं वनम् । अतो रामं समुद्दिश्य चिंतां त्यजत बालिशाः ॥ २५ ॥ रामरामेति ये नित्यं जपंति मनुजा भुवि । तेषां मृत्युभयादीनि न भवंति कदाचन ॥ २६ ॥ का पुनस्तस्य रामस्य दुःखशंका महात्मनः । रामनाम्नैव मुक्तिः स्यात्कलौ नान्येन केनचित् ॥ २७ ॥ मायामानुषरूपेण विडंबयति

तरला असून रावण आदिकरून कोट्यवधि राक्षसांचा नाश करणार आहे. २० रावण मनुष्याचे हातून मरावयाचा आहे. (तसेंच) दशरथानें तपश्चर्या करून पुत्रप्राप्तीकरितां हरि प्रसन्न करून घेतला असल्यामुळें, त्याच्या पोटीं पुत्ररूपानें आलेला विष्णु तोच हा राम आहे, आणि तो रावणादिकांचा नाश करणार आहे. २१, २२ तो साह्याकरितां लक्ष्मणाला बरोबर घेऊन आज वनांत जाणार आहे. ही सीता सृष्टीची उत्पत्ति, स्थिति आणि लय करणारी माया आहे. २३ राजा दशरथ किंवा कैकेयी यांपैकीं कोणीही या वनवासाचें यत्किंचित् सुद्धां कारण नाहीत. कालच नारदानें भूभार हरण करण्याविषयींचा ( ब्रह्मदेवाचा ) संदेश—निरोप—रामाला सांगितला, २४ व 'मी उद्यांच वनाला जातों,' असें रामानें स्वतः त्याला सांगितलें. म्हणून हे अज्ञान जनहो ! रामाबद्दल तुम्ही अगदीं काळजी करूं नका. २५ जे लोक या जगामध्यें 'राम, राम' असा नित्य जप करितात, त्यांना मृत्यु किंवा इतर कशापासूनही भय बाळगण्याचें केव्हांही कारण नाहीं. २६ मग त्या महात्म्या रामाला दुःख होईल, असें भय बाळगण्याचें काय बरें कारण आहे ? कलियुगामध्यें रामनामानेंच मुक्ति मिळते, त्यावांचून दुसऱ्या कशानेंही मुक्ति मिळत नाहीं २७ मायेनें मनुष्यरूप

१. राममाहात्म्य —' श्री**राम** शरणं समस्तजगतां **राम** विना का गति, **रामेण** प्रतिहन्यते कलिमलो **रामाय** कार्यं नमः । **रामात्** त्रस्यति कालभीमभुजगो **रामस्य** सर्वं वशे, **रामे** भक्तिरखंडिता भवतु मे **राम** त्वमेवाश्रय ॥ '

लोककृत् । भक्तानां भजनार्थाय रावणस्य वधाय च ॥ २८ ॥ राज्ञश्चाभीष्टसिद्ध्यर्थं मानुषं वपुराश्रितः । इत्युक्त्वा विरराभाथ वामदेवो महामुनिः ॥ २९ ॥ श्रुत्वा तेऽपि द्विजाः सर्वे रामं ज्ञात्वा हरिं विभुम् । जहुर्हृत्संशयग्रंथिं राममेवान्वचिंतयन् ॥ ३० ॥ य इदं चिंतयेन्नित्यं रहस्यं रामसीतयोः । तस्य रामे दृढा भक्तिर्भवेद्विज्ञानपूर्विका ॥ ३१ ॥ रहस्यं गोपनीयं वो यूयं वै राघवप्रियाः । इत्युक्त्वा प्रययौ विप्रस्तेऽपि रामं परं विदुः ॥ ३२ ॥ ततो रामः समाविश्य पितृगेहमवारितः । सानुजः सीतया गत्वा कैकेयीमिदमब्रवीत् ॥ ३३ ॥ आगताः स्मो वयं मातस्त्रयस्ते संमतं वनम् । गंतुं कृतधियः शीघ्रमाज्ञापयतु नः पिता ॥ ३४ ॥ इत्युक्ता सहसोत्थाय चीराणि प्रददौ स्वयम् । रामाय लक्ष्मणायाथ

धारण करून हा लोककर्ता ( इतर लोकाचे ) अनुकरण करीत आहे—सामान्य मनुष्याप्रमाणें वागत आहे, तसेंच भक्ताना भजन करण्याला विषय मिळावा, रावणाचा वध व्हावा, आणि दशरथाचें अभीष्ट सिद्धीस जावें, यासाठी यानें मानवशरीर धारण केलें आहे.' इतकें बोलून तो महामुनि विराम पावला. २८,२९ हें त्या मुनीचें भाषण ऐकून 'राम हा परमेश्वर आहे' अशी त्या सर्व द्विजांची[1] दृढ भावना झाली, व त्यांचे मनातील सर्व संशय दूर झाले, व ते त्याचेंच ध्यान करूं लागले. ३० 'जो प्राणी हे सीतेचें व रामाचें रहस्य हृदयांत नित्य धरून ठेवील, त्याला विज्ञान—तत्त्वज्ञान—होऊन त्याची रामावर पूर्ण भक्ति जडेल. ३१ तुम्ही सर्व रामभक्त आहां, तेव्हां हें रहस्य गुप्त ठेवा.' असें पुनः सर्वांना सांगून तो वामदेव मुनि मार्गस्थ झाला, व त्या सर्वांनाही राम परमेश्वर आहे, असें समजून आलें. ३२ नंतर रामचंद्र, सीता व लक्ष्मण यांसह, कोणत्याही प्रकारचा अडथळा न होतां, पित्याच्या मंदिरांत गेला व कैकेयीला म्हणाला, ३३ 'माते! तुझ्या इच्छेप्रमाणें वागण्याचा निश्चय करून मी, लक्ष्मण व सीता अशी तिघें वनवासास जाण्याकरितां आलों आहों, तर आम्हांला पित्याची आज्ञा लवकर मिळावी.' ३४ रामानें असें म्हणतांच कैकेयी एकदम उठली, व राम, लक्ष्मण व सीता या तिघांना वेगवेगळीं वल्कलें[2]

१. द्विज—कांहीं विशिष्ट संस्कारित झालेला ब्राह्मण—'जन्मना ब्राह्मणो ज्ञेयः संस्काराद् द्विज उच्यते ॥' २ झाडाच्या सालीचीं केलेलीं वस्त्रे. वनवासी ऋषि वगैरे ही नेसत असत.

सीतायै च पृथक् पृथक् ॥ ३५ ॥ रामस्तु वस्त्राण्युत्सृज्य वन्यचीराणि पर्यधात् । लक्ष्मणोऽपि तथा चक्रे सीता तन्न विजानती ॥ ३६ ॥ हस्ते गृहीत्वा रामस्य लज्जया मुखमैक्षत । रामो गृहीत्वा तच्चीरमंशुके पर्यवेष्टयत् ॥ ३७ ॥ तद्दृष्ट्वा रुरुदुः सर्वे राजदाराः समंततः । वसिष्ठस्तु तदाकर्ण्य रुदितं भर्त्सयन् रुषा ॥ ३८ ॥ कैकेयीं प्राह दुर्वृत्ते राम एव त्वया वृतः । वनवासाय दुष्टे त्वं सीतायै किं प्रयच्छसि ॥ ३९ ॥ यदि रामं समन्वेति सीता भक्त्या पतिव्रता । दिव्यांबरधरा नित्यं सर्वाभरणभूषिता ॥ ४० ॥ रमयत्वनिशं रामं वनदुःखनिवारिणी । राजा दशरथोऽप्याह सुमंत्रं रथमानय ॥ ४१ ॥ रथमारुह्य गच्छंतु वनं वनचरप्रियाः । इत्युक्त्वा राममालोक्य सीतां चैव सलक्ष्मणम् ॥ ४२ ॥ दुःखान्निपतितो भूमौ रुरोदाश्रुपरिप्लुतः । आरुरोह रथं सीता शीघ्रं रामस्य पश्यतः ॥ ४३ ॥ रामः प्रदक्षिणं कृत्वा पितरं रथमारुहत् । लक्ष्मणः

स्वतः देती झाली. ३५ रामानें ( अंगावर असलेलीं ) वस्त्रें टाकून देऊन तीं वल्कलें धारण केलीं. लक्ष्मणानेंही तसेंच केलें. सीतेला तीं नेसायाची ठाऊक नसल्यामुळें तिनें तीं वल्कलें हातीं घेऊन लज्जेनें रामाच्या मुखाकडे पाहिलें. त्यावर रामानें तिच्या अंगावरील वस्त्र काढून घेतलें आणि तिला वल्कलें नेसविलीं. ३६,३७ तें पाहून आसपास असलेल्या सर्व राजस्त्रिया रडूं लागल्या. तो रडण्याचा स्वर ऐकून वसिष्ठानें रागानें कैकेयीची निर्भर्त्सना करून तिला म्हटलें, ' दुष्टे ! तुला दिलेला वर रामालाच वनवासाला पाठविण्यापुरता होता. मग सीतेला ( ही वल्कलें ) काय म्हणून देत आहेस ? ३८,३९ पतिव्रता सीता भक्तीनें रामाबरोबर जात आहे. तरी तिनें दिव्य वस्त्रें धारण करावीं व अंगावर सर्व अलंकार घालावे, ४० आणि सर्वदा रामाला रमवावें. अशानेंच तिचे हातून रामाचें वनवासदुःख दूर होईल. ' इकडे दशरथ राजा सुमंत्राला म्हणाला, ' रथ घेऊन ये. यांना वनवासी जन प्रिय आहेत, तरी हे वनाला जावोत. ' असें बोलून त्यानें राम, लक्ष्मण व सीता यांकडे पाहिलें. ( तोंच ) तो दुःखानें ( मूर्च्छित होऊन ) जमिनीवर पडला, आणि रडूं लागला. त्याच्या नेत्रांतून सारख्या अश्रुधारा वाहूं लागल्या. इतक्यांत रामाच्या देखत सीता रथांत बसली. ४१,४२,४३ नंतर बापाला प्रदक्षिणा करून राम रथांत बसला.

१. प्रदक्षिणा करणे हा एक वंदनाचा प्रकार आहे. यांत आपल्या डावीकडून आणि देवाच्या उजवीकडून मूर्तीच्या सभोंवती फिरतात. प्रदक्षिण-उजवीनें.

खड्गयुगलं धनुस्तूणीयुगं तथा ॥ ४४ ॥ गृहीत्वा रथमारुह्य नोदया-
मास सारथिम् । तिष्ठ तिष्ठ सुमंत्रेति राजा दशरथोऽब्रवीत् ॥ ४५ ॥
गच्छ गच्छेति रामेण नोदितोऽचोदयद्रथम् । रामे दूरं गते राजा
मूर्च्छितः प्रापतद्भुवि ॥ ४६ ॥ पौरास्तु बालवृद्धाश्च वृद्धा ब्राह्मणस-
त्तमाः । तिष्ठ तिष्ठेति रामेति क्रोशंतो रथमन्वयुः ॥ ४७ ॥ राजा रुदित्वा
सुचिरं मां नयंतु गृहं प्रति । कौसल्याया राममातुरित्याह परिचारकान्
॥ ४८ ॥ किंचित्कालं भवेत्तत्र जीवनं दुःखितस्य मे । अत ऊर्ध्वं न
जीवामि चिरं रामं विना कृतः ॥ ४९ ॥ ततो गृहं प्रविश्यैव कौस-
ल्यायाः पपात ह । मूर्च्छितश्च चिराद्बुद्ध्वा तूष्णीमेवावतस्थिवान् ॥५०॥
रामस्तु तमसातीरं गत्वा तत्रावसत्सुखी । जलं प्राश्य निराहारो वृक्ष-
मूलेऽस्वपद्विभुः ॥ ५१ ॥ सीतया सह धर्मात्मा धनुष्पाणिस्तु लक्ष्मणः ।
पालयामास धर्मज्ञः सुमंत्रेण समन्वितः ॥ ५२ ॥ पौराः सर्वे समागत्य

लक्ष्मणही दोन तरवारी, दोन धनुष्यें आणि दोन भाते घेऊन रथात बसला, व रथ हांकण्यास त्यानें सारथ्यास प्रेरणा केली. इकडे ‘ सुमंत्रा ! थांब, थांब, ’ असें दशरथ बोलला. ४४,४५ त्यावर रामानें ‘ चल, चल, ’ अशी घाई केल्यावरून सुमंत्रानें रथ हाकिला. राम दूर गेलेला पाहून दशरथ मूर्च्छा येऊन जमिनीवर पडला. ४६ ( रामाला जातांना पाहून ) नगरांतील बालवृद्ध जन, थोर थोर लोक, आणि मोठमोठे विद्वान् ब्राह्मण ‘ थांब, थांब, रामा थांब, ’ असें मोठमोठ्यानें ओरडत रथाच्या मागोमाग धांवत सुटले. ४७ बराच वेळ रडल्यावर दशरथ सेवकांना म्हणाला, ‘ मला राममाता कौसल्येच्या मंदिरी घेऊन चला. ’ ४८ या दुःखांत तिच्या मंदिरी मी थोडा वेळ तरी जिवंत राहीन. रामाची माझी ताटातूट झाल्यामुळें मला इतकें दुःख झालें आहे की, यापुढें मी फार दिवस जगणार नाही. ४९ कौसल्येच्या मंदिरांत गेल्यावरही तो पुनः मूर्च्छित झाला. बऱ्याच वेळानें तो शुद्धीवर आला, तरी कांहीही न बोलतां स्वस्थ बसून राहिला. ५० ( इकडे ) राम तमसा नदीच्या कांठी जाऊन तेथें सुखानें राहिला. तेथें कांहींही न खातां, केवळ पाणी पिऊन सीतेसमवेत रामानें झाडाखालीं निद्रा घेतली. येथें तो धर्मज्ञ लक्ष्मण हातांत धनुष्यबाण घेऊन सुमंत्रासमवेत ( आपला धर्मच समजून ) रामाचें व सीतेचें रक्षण करिता झाला. ५१,५२ सर्व नागरिक जन येऊन जवळच राहिले. ‘ आपल्याच्यानें

स्थितास्तस्याविदूरतः । शक्ता रामं पुरं नेतुं नोचेद्गच्छामहे वनम् ॥५३॥ इति निश्चयमाज्ञाय तेषां रामोऽतिविस्मितः । नाहं गच्छामि नगरमेते वै क्लेशभागिनः ॥ ५४ ॥ भविष्यंतीति निश्चित्य सुमंत्रमिदमब्रवीत् । इदानीमेव गच्छामः सुमंत्र रथमानय ॥ ५५ ॥ इत्याज्ञप्तः सुमंत्रोऽपि रथं वाहैरयोजयत् । आरुह्य रामः सीता च लक्ष्मणोऽपि ययुर्द्रुतम् ॥ ५६ ॥ अयोध्याभिमुखं गत्वा किंचिद्दूरं ततो ययुः । तेऽपि राममदृष्ट्वैव प्रातरुत्थाय दुःखिताः ॥ ५७ ॥ रथनेमिगतं मार्गं पश्यंतस्ते पुरं ययुः । हृदि रामं ससीतं ते ध्यायंतस्तस्थुरन्वहम् ॥ ५८ ॥ सुमंत्रोऽपि रथं शीघ्रं नोदयामास सादरम् । स्फीतान् जनपदान्पश्यन् रामः सीतासमन्वितः ॥ ५९ ॥ गंगातीरं समागच्छच्छृंगवेराविदूरतः । गंगां दृष्ट्वा नमस्कृत्य स्नात्वा सानंदमानसः ॥ ६० ॥ शिंशपावृक्षमूले स निषसाद

रामाला नगरांत परत नववल नाहा, तर आपण ( रामाबरोबर ) अरण्यातच राहू,' ५३ असा त्यांचा झालेला निश्चय रामाला समजला, तेव्हां तो आश्चर्यचकित झाला. 'मला आतां नगराला जावयाचें नाहीं, या सर्वांना मात्र ( मजकरितां ) दुःख भोगावें लागत आहे, अशा विचारानें कांहीं निश्चय करून 'सुमंत्रा ! आतांचे आतां आपण पुढें जाऊं, रथ आण,' असें रामानें सुमंत्रास सांगितलें. ५४,५५ ही रामाची आज्ञा ऐकून सुमंत्रानें रथाला घोडे जोडले. राम, लक्ष्मण, सीता ही तिघेंही रथांत बसून तत्काल निघाली. ५६ अयोध्येच्या रस्त्यानें कांहींसें जाऊन तेथून ती ( दुसऱ्याच रस्त्यानें ) दूर निघून गेली. इकडे ते नागरिक जन सकाळीं उठून पाहतात तों, राम तेथें नाहीं, असें त्यांस आढळून आलें; तेव्हां त्यास अत्यंत दुःख झालें. ५७ मार्गावरील रथाची चकारी पाहात पाहात ते अयोध्येस ( परत ) आले, व तेथें सीता आणि राम यांचें सदैव चिंतन करीत राहिले. ५८ इकडे सुमंत्रानें आदरपूर्वक मोठ्या वेगानें रथ चालविला. पुढें राम व सीता तो सुंदर प्रदेश अवलोकन करीत करीत गंगेच्या तीरीं आले. नंतर शृंगवेर[1] नांवाच्या नगराजवळ रामानें गंगेचें दर्शन घेतलें व स्नान केलें. त्या योगानें त्याच्या मनाला फार आनंद वाटला. ५९,६० नंतर तो रघूत्तम ( राम )

१. गंगेच्या काठीं असलेलें या नावाचें शहर. हीं भिल्लांच्या गुहनामक राजाची राजधानी होती. हा गुह रामाचा मोठा मित्र व भक्त होता.

रघूत्तमः। ततो गुहो जनैः श्रुत्वा रामागममहोत्सवम् ॥ ६१ ॥ सखायं स्वामिनं द्रष्टुं हर्षात्तूर्णं समापतत् । फलानि मधुपुष्पादि गृहीत्वा भक्तिसंयुतः ॥ ६२ ॥ रामस्याग्रे विनिक्षिप्य दंडवत्प्रापतद्भुवि। गुहमुत्थाप्य तं तूर्णं राघवः परिपस्वजे ॥ ६३ ॥ संपृष्टकुशलो रामं गुहः प्रांजलिरब्रवीत् । धन्योऽहमद्य मे जन्म नैषादं लोकपावन ॥ ६४ ॥ बभूव परमानंदः स्पृष्ट्वा तेंऽगं रघूत्तम। नैषादराज्यमेतत्ते किंकरस्य रघूत्तम ॥ ६५ ॥ त्वदधीनं वसन्नत्र पालयास्मान् रघूद्वह । आगच्छ यामो नगरं पावनं कुरु मे गृहम् ॥ ६६ ॥ गृहाण फलमूलानि त्वदर्थं संचितानि मे। अनुगृह्णीष्व भगवन् दासस्तेऽहं सुरोत्तम ॥ ६७ ॥ रामस्तमाह सुप्रीतो वचनं शृणु मे सखे। न वेक्ष्यामि गृहं ग्रामं नव

शिंशपा नांवाच्या एका झाडाखाली बसला. नंतर राम आला आहे, ही मोठ्या आनंदाची वार्ता लोकांकडून गुहाला समजली, तव्हां तो भक्तियुक्त अंतःकरणानें फळें, मध, फुलें इत्यादि सामग्री घेऊन मोठ्या आनंदानें आपला मित्र व स्वामी जो राम त्याला भेटण्याकरितां घाईघाईनें आला. ६१,६२ आणलेली भेट रामापुढें ठेवून त्यानें रामाच्या पायांवर लोटांगण घातलें. रामानें त्या गुहाला उठवून सत्वर पोटाशी धरिलें. ६३ कुशलप्रश्न विचारून झाल्यावर गुह हात जोडून रामाला म्हणाला, 'हे लोकपावना रामा! मी भिल्लांच्या कुळांत जन्म घेतला खरा, तरी मी आज धन्य झालों. ६४ तुझ्या अंगस्पर्शानें मला फार आनंद वाटत आहे. रामा! तुझ्या या दासाचें हें भिल्लराज्य तुझेंच आहे. येथें राहून हे रघुश्रेष्ठा! तूं आमचें पालन कर. चल, आपण नगरांत जाऊं. (आपल्या आगमनानें) माझें गृह पवित्र कर. ६५,६६ तुझ्याकरितां जमा केलेलीं ही फळें मूळें स्वीकारून मजवर कृपा कर. हे सुरश्रेष्ठा! मी तुझा दास आहें.' ६७ त्यावर श्रीराम संतुष्ट होऊन त्याला म्हणाला, 'मित्रा! मी काय

१. ह्या गुहाच्या भक्तिभावाचें वर्णन एकनाथानीं फारच सुंदर केलें आहे—'देखता श्रीरामाचे मुख। गुहका झाला परम हरिख। रामें आलिंगिला देख। द्वंद्वदुःख विसरला॥४८॥ विसरला धर्म अधर्म। विसरला अधम उत्तम। सद्भावें देखता श्रीराम। मरणजन्म विसरला॥ ४९ ॥ विसरला कर्म कर्तेपण। विसरलासे मीतूंपण। देखता श्रीरामाचे चरण। समाधान गुहकासी' ॥ ५० ॥—भा. रामायण, अयो. ९.

वर्षाणि पंच च ॥ ६८ ॥ दत्तमन्येन नो भुंजे फलमूलादि किंचन । राज्यं ममैतत्ते सर्वं त्वं सखा मेऽतिवल्लभः ॥ ६९ ॥ वटक्षीरं समानाय्य जटामुकुटमादरात् । बबंध लक्ष्मणेनाथ सहितो रघुनंदनः ॥ ७० ॥ जलमात्रं तु संप्राश्य सीतया सह राघवः । आस्तृतं कुशपर्णाद्यैः शयनं लक्ष्मणेन हि ॥ ७१ ॥ उवास तत्र नगरप्रासादाग्रे यथा पुरा । सुष्वाप तत्र वैदेह्या पर्यंक इव संस्कृते ॥७२॥ ततोऽविदूरे परिगृह्य चापं सबाणतूणीरधनुः स लक्ष्मणः । ररक्ष रामं परितो विपश्यन् गुहेन सार्धं सशरासनेन ॥ ७३ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अयोध्याकांडे पंचमः सर्गः ॥ ५ ॥

## अयोध्याकांड, सर्ग सहावा.



॥ **श्रीमहादेव उवाच** ॥ सुप्तं रामं समालोक्य गुहः सोऽश्रुपरिप्लुतः । लक्ष्मणं प्राह विनयाद्भ्रातः पश्यसि राघवम् ॥ १ ॥ शयानं कुशपत्रौघसंस्तरे सीतया सह । यः शेते स्वर्णपर्यंके स्वास्तीर्णे भवनो-

म्हणता, तें ऐक. चौदा वर्षेंपर्यंत मला घरांत किंवा गावांत प्रवेश करावयाचा नाहीं; ६८ दुसऱ्यानें दिलेली फळेंमूळें इत्यादि कांहींही खावयाचें नाहीं. हें तुझें सर्व राज्य माझेंच आहे. तूं माझा परम मित्र आहेस. ६९ नंतर रामानें वडाचा चीक आणवून आदरपूर्वक आपल्या व लक्ष्मणाच्या जटांचा मुकुट बांधला. ७० तेथें सीता व राम केवळ पाणी पिऊन, दर्भ व वृक्षपर्णें इत्यादिकांनी लक्ष्मणानें तयार केलेल्या शय्येवर ७१ बसली. पूर्वीं ( अयोध्या ) नगरींत असताना राजवाड्याच्या गच्चीवर शृंगारलेल्या पलंगावर जसा सुखानें तो निजत असे, तसाच येथेंही ( श्रीराम ) सीतेसह निजला. ७२ त्यांच्या जवळच लक्ष्मण धनुष्यबाण सज्ज करून आणि चारी बाजूकडे लक्ष्य ठेवून गुहासह रामाचें रक्षण करीत राहिला. ७३ ”

**अयोध्याकांड, सर्ग पांचवा समाप्त.**

श्रीमहादेव म्हणाला, “रामाला झोंपी गेलेला पाहून, गुहाच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले. तो विनयपूर्वक लक्ष्मणाला म्हणाला, ‘ बंधो ! जो आपल्या उत्तम मंदिरांत सुवर्णाच्या पलंगावर, सुंदर शय्येवर निजावयाचा, तोच राम आज सीतेसह दर्भ

त्तम ॥ २ ॥ कैकेयी रामदुःखस्य कारणं विधिना कृता । मंथराबुद्धि-
मास्थाय कैकेयी पापमाचरत् ॥ ३ ॥ तच्छ्रुत्वा लक्ष्मणः प्राह सखे शृणु
वचो मम । कः कस्य हेतुर्दुःखस्य कश्च हेतुः सुखस्य वा ॥४॥ स्वपूर्वा-
र्जितकर्मैव कारणं सुखदुःखयोः ॥५॥ सुखस्य दुःखस्य न कोऽपि दाता परो
ददातीति कुबुद्धिरेषा । अहं करोमीति वृथाऽभिमानः स्वकर्मसूत्रग्रथितो हि
लोकः॥६॥ सुहृन्मित्रार्युदासीनद्वेष्यमध्यस्थबांधवाः। स्वयमेवाचरन्कर्म तथा
तत्र विभाव्यते ॥७॥ सुखं वा यदि वा दुःखं स्वकर्मवशगो नरः । यद्यद्यथागतं
तत्तद्भुक्त्वा स्वस्थमना भवेत् ॥ ८ ॥ न मे भोगागमे वांछा न मे भोगवि-
वर्जने । आगच्छत्वथ मागच्छत्व भोगवशगो भवे ॥९॥ यस्मिन् देशे च

आणि पर्णाच्या शय्येवर निजला आहे, हें तूं पाहातच आहेस. १,२ या रामाच्या दुःखाचें कारण दैवयोगेंकरून कैकेयी झाली आहे; तिनें मंथरेच्या उपदेशानें हें पाप केलें आहे.' ३ तें ऐकून लक्ष्मण म्हणाला, 'मित्रा! माझें भाषण ऐक. कोण कोणाच्या दुःखाचें कारण आहे, अथवा सुखाचेंही कोण कारण आहे? ४ सुखदुःखांचें कारण प्राण्यांचें पूर्वजन्मार्जित कर्मच होय. ५ सुख किंवा दुःख कोणीही देत नाही. दुसरा कोणी ही देतो, असें समजणें ही बुद्धिच खोटी आहे. मी करितों हा अभिमान व्यर्थ आहे. (कारण) सर्व लोक (पूर्वार्जित) आपआपल्या कर्माच्या सूत्रानें बांधलेले आहेत. ६ आपण जसें कर्माचरण केलेलें असतें, तदनुसार आपणाला आप्त, मित्र, शत्रु, उदासीन, द्वेषी, मध्यस्थ, बांधव ठिकठिकाणीं आढळून येतात. ७ मनुष्य हा पूर्णपणें कर्माच्या स्वाधीन असल्यामुळें त्यानें सुख किंवा दुःख जें जें जसें जसें प्राप्त होईल, तें तें तसें तसें भोगून स्वस्थ राहावें. ८ भोग भोगावे अशी मला इच्छा नाहीं, न त्यागावे अशीही इच्छा नाहीं; ते मिळोत अथवा न मिळोत, मी त्यांच्या आधीन कधींही राहणार नाहीं. ९ ज्या स्थळीं किंवा काळीं,

१ 'सुखदुःखयुता सर्वे प्राणिनः पूर्वकर्मणा' ॥-सिद्धांतसंहिता. ॥ २. हा रामायणातील श्लोक वाचून गीतेंतील 'सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु । साधुष्वपि च पापेषु०' ह्या श्लोकाची आठवण झाल्यावाचून रहात नाहीं. ३. समानार्थक उतारा -'सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ । ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि' ॥ भ. गीता २-३८. ४. 'यस्माच्च येन च यथा च यदा च यच्च । यावच्च यत्र च शुभाशुभमात्मकर्म ॥ तस्माच्च तेन च तथा च तदा च तच्च । तावच्च तत्र च विधातृवशादुपैति' ॥-हितोपदेश.

काले च यस्माद्वा येन केन वा । कृतं शुभाशुभं कर्म भोज्यं तत्तत्र नान्यथा ॥ १० ॥ अलं हर्षविषादाभ्यां शुभाशुभफलोदये । विधात्रा विहितं यद्य-त्तदलंघ्यं सुरासुरैः ॥ ११ ॥ सर्वदा सुखदुःखाभ्यां नरः प्रत्यवरुध्यते । शरीरं पुण्यपापाभ्यामुत्पन्नं सुखदुःखवत् ॥ १२ ॥ सुखस्यानंतरं दुःखं दुःखस्यानंतरं सुखम् । द्वयमेतद्धि जंतूनामलंघ्यं दिनरात्रिवत् ॥ १३ ॥ सुख-मध्ये स्थितं दुःखं दुःखमध्ये स्थितं सुखम् । द्वयमन्योन्यसंयुक्तं प्रोच्यते जलपंकवत् ॥ १४ ॥ तस्माद्धैर्येण विद्वांस इष्टानिष्टोपपत्तिषु । न हृष्यंति न मुह्यंति सर्वं मायेति भावनात् ॥ १५ ॥ गुहलक्ष्मणयोरेवं भापतोर्वि-मलं नभः । बभूव रामः सलिलं स्पृष्ट्वा प्रातः समाहितः ॥ १६ ॥ उवाच

ज्यामुळें किंवा ज्या योगानें शुभ किंवा अशुभ कर्म ज्या कोणी केलें असेल, त्याला त्या त्या स्थळीं, त्या त्या काळीं, त्याच त्या रीतीनें, त्याचें फळ भोगावें लागतें; त्यांत कधींही फरक म्हणून व्हावयाचा नाहीं. १० म्हणून शुभ किंवा अशुभ, कशीही फळें प्राप्त झालीं, तरी त्यांबद्दल हर्ष किंवा विषाद मानूं नये. ब्रह्मदेवानें जें कांहीं ठरविलें आहे, तें चुकाविण्याचें सामर्थ्य देवांना नाहीं किंवा दैत्यांनाही नाहीं. ११ मनुष्याचा सदोदित सुखदुःखांशीं संबंध येत असतो. कारण, शरीर हें पुण्य आणि पाप यांपासूनच उत्पन्न झालें असल्यामुळें त्याला सुखदुःखें जडलीं आहेत. १२ सुखांमागून दुःख आणि दुःखामागून सुख हीं दिवसरात्रीप्रमाणें प्राण्यांना कधींही टाळतां येत नाहींत. १३ पाणी व चिखल यांप्रमाणें सुखामध्यें दुःख आणि दुःखामध्यें सुख गुरफटून गेलें आहे, असें म्हटलें आहे. १४ म्हणून विद्वान् लोक अनुकूल काय, किंवा प्रतिकूल काय, कोणत्याही स्थितींत धैर्य धरून, ही सर्व माया आहे, असें समजून आनंदही पावत नाहींत, किंवा मोहही पावत नाहींत. १५ गुह आणि लक्ष्मण या दोघांचा असा संवाद चालला आहे, इतक्यांत उजाडलें, आणि रामानें उदकस्पर्श करून प्रातःकालिक सर्व विधि उरकले. १६ तो गुहाला म्हणाला,

१ 'यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न कांक्षति । शुभाशुभपरित्यागी भक्तिमान् यः स मे प्रियः' ॥ भ. गीता १२, १७. २. सदृशार्थक उतारा:—'कस्यात्यन्तं सुखमुपनतं दुःखमेकान्ततो वा । नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण' ॥—मेघदूत. 'कोणालागीं सतत सुख ये दुःखही त्याप्रमाणें । जाती येती फिरफिरुनि ही चक्रनेमिक्रमानें' ॥—स्वकृत मराठी भाषांतर ३ सदृश वर्णन.—'यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् । नाभिनंदति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता' ॥—गीता २, ५७



श्रीराम, लक्ष्मण व सीता गंगा उतरून जातात ( १२४ )

शीघ्रं सुदृढां नावमानय मे सखे । श्रुत्वा रामस्य वचनं निषादाधिपतिर्गुहः ॥ १७ ॥ स्वयमेव दृढां नावमानिनाय सुलक्षणाम् । स्वामिन्नारुह्यतां नौकां सीतया लक्ष्मणेन च ॥ १८ ॥ वाहये ज्ञातिभिः सार्धमहमेव समाहितः । तथेति राघवः सीतामारोप्य शुभलक्षणाम् ॥१९॥ गुहस्य हस्तावालंब्य स्वयं चारुहदच्युतः । आयुधादीन् समारोप्य लक्ष्मणोऽप्यारुरोह च ॥ २० ॥ गुहस्तान्वाहयामास ज्ञातिभिः सहितः स्वयम् । गंगामध्ये गता गंगां प्रार्थयामास जानकी ॥ २१ ॥ देवि गंगे नमस्तुभ्यं निवृत्ता वनवासतः । रामेण सहिताहं त्वां लक्ष्मणेन च पूजये ॥ २२ ॥ सुरामांसोपहारैश्च नानाबलिभिरादृता । इत्युक्त्वा परकूलं तौ शनैरुत्तीर्य जग्मतुः ॥ २३ ॥ गुहोऽपि राघवं प्राह गमिष्यामि त्वया सह । अनुज्ञां

'मित्रा ! मजकरितां मजबूत अशी नौका लवकर घेऊन ये' हें रामाचें बोलणें ऐकून तो भिल्लांचा राजा गुह स्वतःच एक सुदृढ आणि सुलक्षण नौका घेऊन आला आणि म्हणाला, 'स्वामी ! आपण सीता आणि लक्ष्मण यांसह नौकेवर चढावें. १७,१८ मी स्वतः माझ्या ज्ञातिजनांना बरोबर घेऊन मोठ्या दक्षतेनें नौका चालवितों.' 'ठीक आहे,' असें राम बोलला, आणि त्यानें त्या सुलक्षणी सीतेला नौकेवर चढविलें. १९ नंतर तो अच्युत[1] श्रीराम गुहाचा हात धरून स्वतः नावेवर आरूढ झाला. त्यानंतर आपलीं आयुधें वगैरे चढवून लक्ष्मणही नावेवर चढला. २० आपल्या ज्ञातिवर्गासह गुहानें स्वतः नौका चालविली, अशा रीतीनें गंगेच्या[2] मध्यभागीं आल्यावर जानकीनें गंगेची प्रार्थना केली. २१ 'देवि गंगे ! तुला नमस्कार असो. वनवासाहून परत आल्यें, म्हणजे राम आणि लक्ष्मण यांसहवर्तमान तुझें पूजन करीन. २२ मद्य, मांस, वेगवेगळ्या देणग्या आणि नाना प्रकारचे बलि आदरपूर्वक तुला अर्पण करीन.' असें बोलून सीता व राम हळूहळू नदी उतरून परतीरी गेली. २३ गुहही रामाला म्हणाला, 'हे राजेंद्रा ! मी आपल्याबरोबर येतों: आपण

१ (स्वत च्या आनदस्वरूपापासून) च्युत–भ्रष्ट–न होणारा. २ गगास्मरण तत्काल पापाचें नाश करणारे असल्याचे अनेक पुराणात सागितलें आहे:–' गगा गंगेति यो ब्रूयाद् योजनाना शतैरपि । मुच्यते सर्वपापेभ्यो विष्णुलोकं स गच्छति ' ॥

देहि राजेंद्र नोचेत्प्राणांस्त्यजाम्यहम् ॥२४॥ श्रुत्वा नैषादिवचनं श्रीराम-
स्तमथाब्रवीत् । चतुर्दश समाः स्थित्वा दंडके पुनरप्यहम् ॥ २५ ॥
आयास्याम्युदितं सत्यं नासत्यं रामभाषितम् । इत्युक्त्वालिंग्य तं भक्तं
समाश्वास्य पुनः पुनः ॥ २६ ॥ निवर्तयामास गुहं सोऽपि कृच्छ्राद्ययौ
गृहम् । तत्र मेध्यं मृगं हत्वा पक्त्वा हुत्वा च ते त्रयः ॥ २७ ॥ भुक्त्वा
वृक्षदले सुप्त्वा सुखमासत तां निशाम् । ततो रामस्तु वैदेह्या लक्ष्मणेन
समन्वितः ॥ २८ ॥ भरद्वाजाश्रमपदं गत्वा बहिरुपस्थितः । तत्रैकं बटुकं
दृष्ट्वा रामः प्राह च हे बटो ॥ २९ ॥ रामो दाशरथिः सीतालक्ष्मणाभ्यां
समन्वितः । आस्ते बहिर्वनस्येति ह्युच्यतां मुनिसन्निधौ ॥ ३० ॥ तच्छ्रु-
त्वा सहसा गत्वा पादयोः पतितो मुनेः । स्वामिन् रामः समागत्य
वनाद्बहिरवस्थितः ॥३१॥ सभार्यः सानुजः श्रीमानाह मां देवसन्निभः ।
भरद्वाजाय मुनये ज्ञापयस्व यथोचितम् ॥ ३२ ॥ तच्छ्रुत्वा सहसोत्थाय

मला अनुज्ञा द्यावा, नाहींतर मी प्राण टाकीन. २४ हें त्या गुहाचें भाषण ऐकून राम त्याला म्हणाला, 'चवदा वर्षें दंडकारण्यांत राहून मी पुनः येईन, हें माझें भाषण सत्य समज. रामाचें भाषण कधींही असत्य नसतें.' असें बोलून त्या भक्ताला रामानें पुनः पुनः आलिंगन दिलें आणि त्याचें सांत्वन केलें. २५, २६ ( अशा रीतीनें ) रामानें गुहाला परतविलें आणि तोही मोठ्या संकटानें घरीं गेला. नंतर एक मेध्य–पवित्र–हरिण मारून आणि तो शिजविल्यावर त्याचा होम करून त्या तिघांनीं भोजन केलें. पुढें वृक्षांच्या पानांवर त्या तिघांनीं रात्रीं शयन केलें. नंतर सकाळीं सीता व लक्ष्मण यांस घेऊन राम भरद्वाज मुनीच्या आश्रमाला गेला आणि बाहेर उभा राहिला. तेथें एका ऋषिकुमाराला पाहून राम त्याला म्हणाला, 'हे बटो ! दाशरथि राम सीता व लक्ष्मण यांसह आल्याचें मुनीला जाऊन सांग.' २७,२८,२९,३० तें ऐकून तो मुनिकुमार लागलाच मुनि ( भरद्वाजा ) जवळ गेला आणि त्याच्या पायां पडून ( म्हणाला ) 'स्वामिन् ! राम आला असून बाहेर–तपोवनाच्या आसमंतात् भागीं–उभा आहे. ३१ तो आपली पत्नी व धाकटा बंधु यांसहवर्तमान आला आहे. त्या देवसदृश श्रीरामानें आपण आलों आहों, ही गोष्ट योग्य प्रकारें भरद्वाजमुनींला कळीव' म्हणून मला सांगितलें आहे'. ३२ हें ऐकून तो मुनिश्रेष्ठ भरद्वाज तावडतोब उठला व अर्घ्यपाद्य

भरद्वाजो मुनीश्वरः । गृहीत्वार्घ्यं च पाद्यं च रामसामीप्यमाययौ ॥३३॥
दृष्ट्वा रामं यथान्यायं पूजयित्वा सलक्ष्मणम् । आह मे पर्णशालां भो
राम राजीवलोचन ॥ ३४ ॥ आगच्छ पादरजसा पुनीहि रघुनंदन ।
इत्युक्त्वोटजमानीय सीतया सह राघवौ ॥ ३५ ॥ भक्त्या पुनः पूजि-
यित्वा चकारातिथ्यमुत्तमम् । अद्याहं तपसः पारं गतोऽस्मि तव संग-
मात् ॥ ३६ ॥ ज्ञातं राम तवोदंतं भूतं चागामिकं च यत् । जानामि
त्वां परात्मानं मायया कार्यमानुषम् ॥ ३७ ॥ यदर्थमवतीर्णोऽसि प्रार्थितो
ब्रह्मणा पुरा । यदर्थं वनवासस्ते यत्करिष्यासि वै पुरः ॥३८॥ जानामि
ज्ञानदृष्ट्याहं जातया त्वदुपासनात् । इतः परं त्वां किं वक्ष्ये कृतार्थोऽहं
रघूत्तम ॥ ३९ ॥ यस्त्वां पश्यामि काकुत्स्थं पुरुषं प्रकृतेः परम् । राम-

घेऊन रामाजवळ आला. ३३ रामाचें दर्शन घेऊन त्यानें राम व लक्ष्मण यांचें यथाविधि पूजन केलें आणि तो म्हणाला, 'हे कमललोचना रामा ! माझ्या पर्ण-शालेंत चल, आणि हे रघुनंदना ! ती ( पर्णशाला ) आपल्या पदरजानें पवित्र कर.' असें बोलून रामलक्ष्मणास सीतेसह भरद्वाजानें आपल्या पर्णकुटिकेंत आणिलें, ३४ ३५ आणि भक्तिपूर्वक पुनः त्यांचें पूजन केलें आणि उत्तम प्रकारें त्यांचें आदरा-तिथ्य केलें. भरद्वाज म्हणाला, 'हे रामा ! तुझा समागम घडून आज माझी तपश्चर्या पूर्ण झाली आहे. ३६ रामा ! तुझें सर्व वृत्त—पूर्वी घडलेलें, सांप्रत होत असलेलें व पुढें होणारें—मला कळून आलें आहे. तूं परमात्मा असून मायेनें कांही कार्यास्तव मनुष्यरूप धारण केलें आहेस हें मी जाणतों. ३७ ब्रह्मदेवाच्या प्रार्थनेवरून ज्या कार्यासाठी तू जन्म घेतला आहेस, त्याचप्रमाणें ज्याकरितां तुला वनवास करणें प्राप्त झालें आहे, आणि जें कांही यानंतर तूं करणार आहेस, तें सर्व तुझ्या उपासनेनें प्राप्त झालेल्या ज्ञानदृष्टीनें मी जाणतों. ह्यापेक्षां अधिक तें तुला मी काय सांगणार ? हे रघूत्तमा ! मी कृतकृत्य—धन्य—झालों आहें. ३८,३९ कारण, प्रकृतीहून निराळा असा जो पुरुष तो तूं आहेस. ककुत्स्थ कुळांत

१. एक सुंदर उतारा:—' अद्य न. पितरस्तृप्ता अद्य नः पावितं कुलम् । अद्य नो वंशजाः सर्वे यद्भवान् गृहमागत ' ॥ रामायण. २. ककुद्—बैलाचें वशिंड, त्यावर स्थ म्हणजे बसणारा. पुरंजय म्हणून रघुकुलातील एक राजा अशा रीतीनें बैलाचे वशिंडावर बसून फिरत असे, म्हणून त्याला 'ककुत्स्थ' असे नाव पडले. पुढें त्याचे वंशज काकुत्स्थ या नावानें प्रसिद्ध झाले.

स्तमभिवाद्याह सीतालक्ष्मणसंयुतः ॥ ४० ॥ अनुग्राह्यास्त्वया ब्रह्मन्वयं क्षत्रियबांधवाः । इति संभाष्य तेऽन्योन्यमुषित्वा मुनिसन्निधौ ॥ ४१ ॥ प्रातरुत्थाय यमुनामुत्तीर्य मुनिदारकैः । कृताप्लवेन मुनिना दृष्टमार्गेण राघवः ॥ ४२ ॥ प्रययौ चित्रकूटाद्रिं वाल्मीकेर्यत्र चाश्रमः । गत्वा रामोऽथ वाल्मीकेराश्रमं ऋषिसंकुलम् ॥४३॥ नानामृगद्विजाकीर्णं नित्यपुष्पफलाकुलम् । तत्र दृष्ट्वा समासीनं वाल्मीकिं मुनिसत्तमम् ॥ ४४ ॥ ननाम शिरसा रामो लक्ष्मणेन च सीतया । दृष्ट्वा रामं रमानाथं वाल्मीकिर्लोकसुंदरम् ॥ ४५ ॥ जानकीलक्ष्मणोपेतं जटामुकुटमंडितम् । कंदर्पसदृशाकारं कमनीयांबुजेक्षणम् ॥ ४६ ॥ दृष्ट्वैव सहसोत्तस्थौ विस्मयानिमिषेक्षणः । आलिंग्य परमानंदं रामं हर्षाश्रुलोचनः ॥४७॥ पूजयित्वा

अवतार घेऊन तूं आज मला दर्शन दिलेस.' नंतर सीता आणि लक्ष्मण यांसहवर्तमान रामानें त्या मुनीला वंदन केलें आणि म्हटलें, ४० 'ब्रह्मन्! आम्हां क्षत्रिय[1] बांधवांवर आपला अनुग्रह असावा.' असें परस्परांचें भाषण झालें. (त्या दिवशी) ती तिघें त्या मुनीजवळ राहिली. ४१ सकाळीं उठून स्नान झाल्यावर (भरद्वाज) मुनीनें रामास पुढील मार्ग दाखविला, आणि मार्गदर्शक म्हणून मुनिकुमारही बरोबर दिले. त्यांसह वाल्मीकींचें आश्रमस्थान असलेल्या चित्रकूट पर्वतावर यमुना उतरून राम पोंचला, आणि तेथून पुढें वाल्मीकीच्या आश्रमी आला. त्या ठिकाणी अनेक ऋषि राहत असत, ४२,४३ त्याचप्रमाणें अनेक जातीचे पशु आणि पक्षी, यांची तेथें वसती असून वृक्ष नेहमी फुलें आणि फळें यांनी भरलेले असत. तेथें बसलेला मुनिश्रेष्ठ वाल्मीकि रामाच्या दृष्टीस पडला. ४४ लक्ष्मण आणि सीता यांसह रामानें त्यास साष्टांग नमन केलें. त्या लोकसुंदर, जटामुकुटमंडित, मदनाप्रमाणें सौंदर्यशाली, कमलासमान मनोहर नयन धारण करणाऱ्या रमानाथ रामाला सीता व लक्ष्मण यांसमवेत पाहतांच वाल्मीकि मुनींची दृष्टि आश्चर्यानें स्तिमित—स्तब्ध—झाली. त्यानें तत्काल उठून परमानंदरूप श्रीरामाला, डोळ्यांतून हर्षाश्रु वाहत आहेत, अशा स्थितीत आलिंगन दिलें. ४५,४६,४७ वाल्मीकींनें सर्व जगताला पूज्य अशा त्या श्रीरामाची भक्तीनें अर्घ्या-

१ क्षत्रिय शब्दाची व्युत्पत्ति –' क्षतात् किल त्रायत इत्युदग्रः क्षत्रस्य शब्दो भुवनेषु रूढः '॥–रघुवंश २, ५३.

जगत्पूज्यं भक्त्यार्घ्यादिभिरादृतः । फलमूलैः स मधुरैर्भोजयित्वा च
लालितः ॥ ४८ ॥ राघवः प्रांजलिः प्राह वाल्मीकिं विनयान्वितः । पितु-
राज्ञां पुरस्कृत्य दंडकानागता वयम् ॥ ४९ ॥ भवंतो यदि जानंति किं
वक्ष्यामोऽत्र कारणम् । यत्र मे सुखवासाय भवेत्स्थानं वदस्व तत् ॥५०॥
सीतया सहितः कालं किंचित्तत्र नयाम्यहम् । इत्युक्तो राघवेणासौ
मुनिः सस्मितमब्रवीत् ॥५१॥ त्वमेव सर्वलोकानां निवासस्थानमुत्तमम् ।
तवापि सर्वभूतानि निवाससदनानि हि ॥ ५२ ॥ एवं साधारणं स्थान-
मुक्तं ते रघुनंदन । सीतया सहितस्येति विशेषं पृच्छतस्तव ॥ ५३ ॥
तद्वक्ष्यामि रघुश्रेष्ठ यत्ते नियतमंदिरम् । शान्ताना समदृष्टीनामद्वेष्टॄणां च
जंतुषु । त्वामेव भजतां नित्यं हृदयं तेऽधिमंदिरम् ॥ ५४ ॥ धर्माधर्मा-
न्परित्यज्य त्वामेव भजतोऽनिशम् । सीतया सह ते राम तस्य हृत्सुख-
मंदिरम् ॥ ५५ ॥ त्वन्मंत्रजापको यस्तु त्वामेव शरणं गतः ।

दिकांनी आदरपूर्वक पूजा केली आणि त्याला मधुर अशी फळें आणि मूळें खाव-
यास देऊन त्याचें उत्तम प्रकारें गौरव केलें. ४८ नंतर हात जोडून विनयपूर्वक
राम वाल्मीकीला म्हणाला, ' वडिलांच्या आज्ञेला अनुसरून आम्ही दंडकारण्याला
आलों आहों. ४९ आपण ह्याचें कारण ज्या अर्थी जाणत आहां, त्या अर्थी मी
आणखी काय सांगूं ? मला राहायाला सुखकारक होईल, असें कांहीं स्थान सांगा.
५० सीतेसह तेथें मी कांहीं काल घालवीन.' रामानें असें विचारलें असतां ( वाल्मीकि )
मुनि हांसून म्हणाला, ५१ '( रामा ! ) तूंच सर्व लोकाचें निवासस्थान आहेस,[1]
आणि त्याप्रमाणेंच सर्व भूतें तुझी राहण्याची ठिकाणें आहेत. ५२ हे रघुनंदना ! हें
तुझें सामान्य असें स्थान सांगितलें, परंतु सीतेसह राहण्यास योग्य असें स्थल कोणतें
म्हणून विशेष प्रश्न करीत आहेस, ५३ त्या अर्थी तें सांगतों. हे रघुश्रेष्ठा ! जे शांत
आहेत, ज्यांच्या ठिकाणी भेददृष्टि नाही, जे कोणाही प्राण्याशी द्वेष धरीत नाहीत,
जे सतत तुलाच भजतात, अशांचें हृदय हेंच तुझें निवासस्थान होय. ५४ धर्म्य
काय आणि अधर्म्य काय, ही भावना टाकून तुलाच एकट्याला जो रात्रंदिवस
भजतो, त्याचें हृदय म्हणजेच तुझें सीतेसह राहण्याचें सुखमंदिर होय. ५५ जो

१. परमात्मा सर्वाचें निवासस्थान.–'अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः ।'–भ. गीता.

निर्द्वंद्वो निःस्पृहस्तस्य हृदयं ते सुमंदिरम् ॥५६॥ निरहंकारिणः शांता ये रागद्वेषवर्जिताः । समलोष्टाश्मकनकास्तेषां ते हृदयं गृहम् ॥५७॥ त्वयि दत्तमनोबुद्धिर्यः संतुष्टः सदा भवेत् । त्वयि संत्यक्तकर्मा यस्तन्मनस्ते शुभं गृहम् ॥ ५८ ॥ यो न द्वेष्ट्यप्रियं प्राप्य प्रियं प्राप्य न हृष्यति । सर्वं मायेति निश्चित्य त्वां भजेत्तन्मनो गृहम् ॥ ५९ ॥ षड्भावादिविकारान्यो देहे पश्यति नात्मनि । क्षुत्तृट् सुखं भयं दुःखं प्राणबुद्ध्योर्निरीक्षते ॥ ६० ॥ संसारधर्मैर्निर्मुक्तस्तस्य ते मानसं गृहम् ॥ ६१ ॥ पश्यंति

निर्द्वंद्व होऊन–द्वंद्वभाव सोडून–निरिच्छ होत्साता तुझ्या नामाचा जप करीत तुलाच शरण येतो, त्याचें हृदय हेंच तुझें सुंदर मंदिर होय. ५६ अहंकार, प्रीति, द्वेष, यांचा त्याग करून ज्यांनी शांतता धारण केली, आणि मातीचें ढेंकूळ, दगड किंवा सोनें ह्यांवर समदृष्टि ठेविली, त्यांचें हृदय म्हणजे तुझें गृह होय. ५७ तुझ्या ठिकाणी मन आणि बुद्धि ठेवून जो सदा संतुष्ट राहतो, आणि आपली सर्व कर्में तुला अर्पण करितो, त्याचें मन हेंच तुझें सुंदर गृह आहे. ५८ अप्रिय वस्तूच्या प्राप्तीनें ज्याच्या ठिकाणी द्वेष उत्पन्न होत नाही, तसेंच प्रिय वस्तूच्या लाभानें ज्याला आनंदही होत नाही, तर सर्व माया आहे, असा निश्चय करून जो तुला भजतो, त्याचेंच मन हें तुझें घर आहे. ५९ जे सहा भावें वगैरे विकार केवळ देहाला आहेत, आत्म्याला नाहीत, असें पाहतो, तसेंच क्षुधा, तृषा हे प्राणाचे, आणि सुख, दुःख, भीति हे बुद्धीचे विकार आहेत, (आत्म्याचे नाहीत,) असें जाणतो, तो पुरुष संसाराच्या धर्मापासून मुक्त असतो; त्याचें मानस तुझें गृह होय. ६०, ६१ तूं

१. ५६–५९ श्लोक भगवद्गीतेतील श्लोकाना धरून आहेत, हें दाखविण्याकरिता गीतेंतील ते श्लोक येथे उतरून घेतले आहेत. निर्द्वंद्व –'ज्ञेयः स नित्यसन्यासी यो न द्वेष्टि न कांक्षति । निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बंधात् प्रमुच्यते' ॥ २. 'ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेंद्रियः । युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकांचनः' ॥ ३ 'चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः । बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥' ४. 'न प्रहृष्येत् प्रियं प्राप्य नोद्विजेत् प्राप्य चाप्रियम् ।' ५. सहा भाव–जन्मास येणें, असणे, वाढणें, पूर्ण होणे, क्षीण होणें आणि नाश पावणें.

ये सर्वगुहाशयस्थं त्वां चिद्घनं सत्यमनंतमेकम्। अलेपकं सर्वगतं वरेण्यं तेषां हृदब्जे सह सीतया वस ॥ ६२ ॥ निरंतराभ्यासदृढीकृतात्मनां त्वत्पादसेवापरिनिष्ठितानाम्। त्वन्नामकीर्त्या हतकल्मषाणां सीतासमेतस्य गृहं हृदब्जे ॥ ६३ ॥ राम त्वन्नाममहिमा वर्ण्यते केन वा कथम्। यत्प्रभावादहं राम ब्रह्मर्षित्वमवाप्तवान् ॥ ६४ ॥ अहं पुरा किरातेषु किरातैः सह वर्धितः। जन्ममात्रद्विजत्वं मे शूद्राचाररतः सदा ॥ ६५ ॥ शूद्रायां बहवः पुत्रा उत्पन्ना मेऽजितात्मनः। ततश्चोरैश्च संगम्य चौरोऽहमभवं पुरा ॥ ६६ ॥ धनुर्बाणधरो नित्यं जीवानामंतकोपमः। एकदा मुनयः सप्त दृष्टा महति कानने ॥ ६७ ॥ साक्षान्मया प्रकाशंतो ज्वलनार्कसमप्रभाः। तानन्वधावं लोभेन तेषां सर्वपरिच्छदान् ॥ ६८ ॥

सर्वांच्या बुद्धींत राहणारा आहेस, तूं ज्ञानपूर्ण आहेस, तूं सत्यस्वरूप आहेस, तूं अनंत आहेस, तूं एक-द्वैतरहित-आहेस, तूं अलिप्त आहेस, तूं सर्वत्र भरलेला आहेस, तूं श्रेष्ठ आहेस, अशा दृष्टीनें जे तुला पाहतात, त्यांच्या हृदयकमलीं तूं सीतेसह वास कर. ६२ निरंतर अभ्यासानें ज्यांचीं अंतःकरणें तुझ्या ठिकाणीं दृढ झालीं आहेत, तुझ्या चरणसेवेंत जे रंगले आहेत, तुझ्या नामसंकीर्तनानें ज्यांचीं पापें नष्ट झालीं आहेत, त्यांच्या हृदयकमळांत सीतेसह तुझें गृह आहे. ६३ रामा! तुझा[1] नाममहिमा कोणाला आणि कसा वर्णन करितां येईल बरें? या (तुझ्या नाम) प्रभावानेंच मी ब्रह्मर्षिपदाला प्राप्त झालों आहें ६४ मी पूर्वीं भिल्लांमध्यें भिल्लांच्या संगतीत लहानाचा मोठा झालों. केवळ जन्मानेंच माझ्या ठिकाणीं द्विजत्व-ब्राह्मणत्व-होतें, बाकी माझें सर्व आचरण शूद्रासारखें होतें. ६५ इंद्रियें स्वाधीन न ठेविल्याकारणानें मी एका शूद्र स्त्रीशीं रममाण झालों, आणि तिच्यापासून मला बहुत पुत्र झाले. नंतर मी चोरांमध्यें मिळून लवकरच चोर झालों. ६६ हातांत नित्य धनुष्यबाण धारण केल्यामुळें प्राण्यांना मी मृत्यूसारखा वाटत असें. एकदां एका मोठ्या अरण्यांत प्रत्यक्ष सूर्य किंवा अग्नि यांसारखे, अति देदीप्यमान असे सात मुनि[2] माझे दृष्टीस पडले.

१ रामनाममाहात्म्याचें सुंदर वर्णन -' प्रतिश्वासं सविश्वासं रामं वद दिने दिने। को विश्वासः पुनः श्वास आगमिष्यति वा न वा ॥' २. सप्तर्षि -मरीचि अत्रि अंगिरस पुलस्त्य पुलह, क्रतु आणि वसिष्ठ.

ग्रहीतुकामस्तत्राहं तिष्ठ तिष्ठेति चाब्रवम्। दृष्ट्वा मां मुनयोऽपृच्छन्किमायासि द्विजाधम ॥६९॥ अहं तानब्रवं किंचिदादातुं मुनिसत्तमाः। पुत्रदारादयः संति बहवो मे बुभुक्षिताः ॥ ७० ॥ तेषां संरक्षणार्थाय चरामि गिरि-कानने। ततो मामूचुरव्यग्राः पृच्छ गत्वा कुटुंबकम् ॥ ७१ ॥ यो यो मया प्रतिदिनं क्रियते पापसंचयः। यूयं तद्भागिनः किंवा नेति वेति पृथक्पृथक् ॥ ७२ ॥ वयं स्थास्यामहे तावदागमिष्यसि निश्चयः। तथेत्युक्त्वा गृहं गत्वा मुनिभिर्यदुदीरितम् ॥ ७३ ॥ आपृच्छं पुत्रदा-रादींस्तैरुक्तोऽहं रघूत्तम। पापं तवैव तत्सर्वं वयं तु फलभागिनः ॥७४॥ तच्छ्रुत्वा जातनिर्वेदो विचार्य पुनरागमम्। मुनयो यत्र तिष्ठंति करुणा-पूर्णमानसाः॥७५॥मुनीनां दर्शनादेव शुद्धांतःकरणोऽभवम्। धनुरादीन्परि-त्यज्य दंडवत्पतितोऽस्म्यहम्॥७६॥ रक्षध्वं मां मुनिश्रेष्ठा गच्छंतं निरयार्ण-वम्। इत्यग्रे पतितं दृष्ट्वा मामूचुर्मुनिसत्तमाः ॥७७॥ उत्तिष्ठोत्तिष्ठ भद्रं ते

त्यांची सर्व चीजवस्त हरण करावी ह्या लोभानें मी ( त्यांच्या मागून ) धांवत जाऊन 'थांब, थांब' म्हणून त्यांपैकीं प्रत्येकाला म्हणालों. मला पाहून त्या मुनींनी विचारिलें, 'अरे ब्राह्मणाधमा! तूं कां येत आहेस?' ६७,६८,६९ मी त्यांना म्हणालों, 'मुनिश्रेष्ठ हो! (तुमच्यापासून) कांहीं तरी घ्यावें, ह्याच हेतूनें मी आलों आहें. मला बायकामुलें वगैरे पुष्कळ आहेत. ती बुभुक्षित आहेत. ७० त्यांच्या पोषणासाठीं पर्वतांतून आणि अरण्यांतून मी फिरत आहें.' माझी भीति किंचित्‌ही न वाटून ते म्हणाले, 'जा आणि आपल्या कुटुंबांतील सर्वांना विचार कीं, ७१ मी प्रतिदिवशीं जो जो पापसंचय करीत आहें, त्याचे भागीदार तुम्ही आहां किंवा नाहीं? प्रत्येकाला वेगवेगळें विचार. ७२ तूं येईपर्यंत आम्ही येथेंच राहतों, हें पक्कें समज?' 'बरें आहे,' असें म्हणून मी घरीं गेलों आणि मुनींनी जसें सांगितलें होतें तसें मुलें, बायको, वगैरे सर्वांना विचारिलें. त्यावर हे रघूत्तमा! 'पापाचा धनी तूं, आम्ही केवळ फलभागी आहों,' असें त्या सर्वांनीं सांगितलें. ७३,७४ तें ऐकून मला मोठें दुःख झालें. मी विचार केला आणि ते दयार्द्र अंतःकरणाचे मुनि बसले होते, त्या ठिकाणीं आलों. ७५ त्या मुनींच्या केवळ दर्शनानें माझें अंतःकरण शुद्ध झालें. धनुष्य वगैरे टाकून देऊन मी त्यांना साष्टांग नमस्कार घातला, ७६ (आणि त्यांची विनवणी केली कीं,) 'मुनिश्रेष्ठ हो! नरकसमुद्रांत पडणाऱ्या माझें रक्षण करा.' तेव्हां आपल्यापुढें दंडवत् पडलेल्या मला पाहून ते मुनिश्रेष्ठ म्हणाले, ७७ 'ऊठ, ऊठ.

सफलः सत्समागमः । उपदेक्ष्यामहे तुभ्यं किंचित्तेनैव मोक्ष्यसे । परस्परं समालोच्य दुर्वृत्तोऽयं द्विजाधमः ॥ ७८ ॥ उपेक्ष्य एव सद्वृत्तैस्तथापि शरणं गतः । रक्षणीयः प्रयत्नेन मोक्षमार्गोपदेशतः ॥ ७९ ॥ इत्युक्त्वा राम ते नाम व्यत्यस्ताक्षरपूर्वकम् । एकाग्रमनसाऽत्रैव मरेति जप सर्वदा ॥ ८० ॥ आगच्छामः पुनर्यावत्तावदुक्तं सदा जप । इत्युक्त्वा प्रययुः सर्वे मुनयो दिव्यदर्शनाः ॥ ८१ ॥ अहं यथोपदिष्टं तैस्तथाऽकरवमंजसा । जपन्नेकाग्रमनसा बाह्यं विस्मृतवानहम् ॥ ८२ ॥ एवं बहुतिथे काले गते निश्चलरूपिणः । सर्वसंगविहीनस्य वल्मीकोऽभून्ममोपरि ॥ ८३ ॥ ततो युगसहस्रांते ऋषयः पुनरागमन् । मामूचुर्निष्क्रमस्वेति तच्छ्रुत्वा तूर्णमुत्थितः ॥ ८४ ॥ वल्मीकान्निर्गतश्चाहं नीहारादिव भास्करः । मामप्याहुर्मुनिगणा वाल्मीकिस्त्वं मुनीश्वर ॥ ८५ ॥

तुझें कल्याण असो. तुला घडलेला साधुसमागम सफल झाला आहे तुला थोडासा उपदेश आम्ही करीत आहों, त्याचे योगानें तूं मुक्त होशील.' नंतर त्या मुनींनीं आपसांत विचार करून म्हटलें, 'हा ब्राह्मण दुराचारी व अधम आहे. ७८ वस्तुतः कोणीही सत्पुरुषानें ह्याची उपेक्षाच करणें योग्य आहे, तथापि हा शरण आला आहे, त्या अर्थी मोक्षमार्गाचा उपदेश करून प्रयत्नपूर्वक त्याचें रक्षण करणें योग्य आहे.' ७९ असें आपसांत ठरवून हे रामा! तुझे नांवाचा, उलट्या अक्षरांच्या स्वरूपांत 'मरा' असा एकाग्र मनानें जप करण्याविषयीं त्यांनी सांगितलें, आणि 'आम्ही परतून येऊं, तोंपर्यंत सांगितलेल्या पद्धतीनें तो नित्य करीत जा' असें सांगून ते सर्व दिव्यरूपी मुनि तेथून जाते झाले. ८०,८१ त्यांच्या उपदेशाप्रमाणें मी तत्काल केलें. अशा रीतीनें एकाग्र मनानें जप करीत असतां, अर्थातच बाह्य विषयांची मला विस्मृति झाली. ८२ सर्वसंगपरित्यागपूर्वक शरीराची सर्व हालचाल बंद करून मी राहिलों असतां माझ्या शरीरावर वारूळ वाढलें. ८३ पुढें हजार युगें[1] लोटल्यावर ते ऋषि पुनः परतून आले, आणि मला म्हणाले, 'बाहेर ये' तें ऐकून मी ताबडतोब उठलों, ८४ आणि धुक्यांतून सूर्य बाहेर पडावा, तसा त्या वारुळांतून बाहेर आलों. तेव्हां ते मुनि मला म्हणाले, 'हे मुनीश्वरा! तूं वाल्मीकि झाला आहेस. ८५

१. युग चार आहेत ती कृत, त्रेता, द्वापर आणि काल हीं होत त्यांचीं प्रत्यकीं क्रमाने वर्षे १,७२८,००० १,२९६,०००, ८६४,०००, ४३२,००० अशीं आहेत.

वल्मीकात्संभवो यस्माद्द्वितीयं जन्म तेऽभवत् । इत्युक्त्वा ते ययुर्दिव्यगतिं रघुकुलोत्तम ॥ ८६ ॥ अहं ते राम नाम्नश्च प्रभावादीदृशोऽभवम् । अद्य साक्षात्प्रपश्यामि ससीतं लक्ष्मणेन च ॥ ८७ ॥ रामं राजीवपत्राक्षं त्वां मुक्तो नात्र संशयः । आगच्छ राम भद्रं ते स्थलं वै दर्शयाम्यहम् ॥ ८८ ॥ एवमुक्त्वा मुनिः श्रीमांल्लक्ष्मणेनसमन्वितः । शिष्यैः परिवृतो गत्वा मध्ये पर्वतगंगयोः ॥ ८९ ॥ तत्र शालां सुविस्तीर्णां कारयामास वासभूः । प्राक्पश्चिमं दक्षिणोदक् शोभनं मंदिरद्वयम् ॥ ९० ॥ जानक्या सहितो रामो लक्ष्मणेन समन्वितः । तत्र ते देवसदृशा ह्यवसन् भवनोत्तमे ॥ ९१ ॥ वाल्मीकिना तत्र सुपूजितोऽयं रामः ससीतः सह लक्ष्मणेन । देवैर्मुनींद्रैः सहितो मुदाऽऽस्ते स्वर्गे यथा देवपतिः स शच्या ॥ ९२ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अयोध्याकांडे षष्ठः सर्गः ॥ ६ ॥

तूं वल्मीकापासून—वारुळापासून—उत्पन्न झाला आहस, त्या अर्थी हा तुझा दुसरा जन्म झाला आहे ' असें म्हणून हे रघुकुलोत्तमा ( रामा ) ' ते मुनि दिव्यगतीला—स्वर्गमार्गाला—जाण्याकरितां निघाले ८६ हे रामा ! तुझ्या नामाच्या प्रभावानें मी अशा स्वरूपाला प्राप्त झालों, आणि आज तर सीता आणि लक्ष्मण यांसमवेत कमलनयन अशा तुला रामचंद्राला प्रत्यक्ष पाहत आहें, त्या अर्थी मी आतां मुक्त झालों आहे. रामा ! चल, तुला मी चांगलें स्थळ दाखवितों.' ८७,८८ असें म्हणून तो तेजस्वी मुनि शिष्यांसमवेत राम व लक्ष्मण यांस बरोबर घेऊन पर्वत आणि गंगा यांमधील ( स्थल रामाला दाखविता झाला ). ८९ तेथें जगाचें वासस्थान अशा त्या रामानें एक अत्यंत विस्तीर्ण शाला, त्याचप्रमाणें एक पूर्वपश्चिम आणि एक दक्षिणोत्तर अशीं दोन सुंदर मंदिरें बांधविलीं. ९० जानकी, लक्ष्मण आणि राम अशीं तीं तिघें त्या मंदिरांत देवासारखीं राहूं लागलीं. ९१ तेथें वाल्मीकि सीता आणि लक्ष्मण यांसह रामाची उत्तम रीतीनें पूजा करी. स्वर्गामध्यें सर्व देवासमवेत इंद्राणीसह इंद्र जसा मोठ्या आनंदानें राहतो, तसाच सीतेसह मुनीसमवेत श्रीराम त्या ठिकाणीं राहूं लागला. ९२ ”

**अयोध्याकांड, सर्ग सहावा समाप्त.**

१. मूळांत लक्ष्मणेनसमन्वित असें आहे. त्याचा लक्ष्मणानें युक्त असा अर्थ न करितां लक्ष्मण आणि इन—स्वामी—रामचंद्र, यांसह—लक्ष्मण व रामचंद्र यांसहवर्तमान—असा करावा.

## अयोध्याकांड, सर्ग सातवा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ सुमंत्रोऽपि तदायोध्यां दिनांते प्रविवेश ह ।
वस्त्रेण मुखमाच्छाद्य बाष्पाकुलितलोचनः ॥ १ ॥ बहिरेव रथं स्थाप्य
राजानं द्रष्टुमाययौ । जयशब्देन राजानं स्तुत्वा तं प्रणनाम ह ॥ २ ॥
ततो राजा नमंतं तं सुमंत्रं विह्वलोऽब्रवीत् । सुमंत्र रामः कुत्रास्ते सीतया
लक्ष्मणेन च ॥ ३ ॥ कुत्र त्यक्तस्त्वया रामः किं मां पापिनमब्रवीत् ।
सीता वा लक्ष्मणो वाऽपि निर्दयं मां किमब्रवीत् ॥ ४ ॥ हा राम हा
गुणनिधे हा सीते प्रियवादिनि । दुःखार्णवे निमग्नं मां म्रियमाणं न
पश्यसि ॥ ५ ॥ विलप्यैवं चिरं राजा निमग्नो दुःखसागरे । एवं मंत्री
रुदंतं तं प्रांजलिर्वाक्यमब्रवीत् ॥ ६ ॥ रामः सीता च सौमित्रिर्मया
नीता रथेन ते । शृंगवेरपुराभ्याशे गंगाकूले व्यवस्थिताः ॥ ७ ॥ गुहेन

श्रीमहादेव म्हणाला, "इतक्यांत सुमंत्र संध्याकाळचे वेळी वस्त्राच्छादित मुख करून आणि डोळ्यांतून अश्रू गाळीत, अयोध्यानगरीला परत आला. १ बाहेरच रथ थांबवून राजाला भेटण्याकरितां तो आंत आला, आणि 'महाराजांचा जयजयकार असो,' असें म्हणून त्यानें राजाची ( दशरथाची ) स्तुति केली, आणि त्याला प्रणाम केला. २ सुमंत्र वंदन करीत असतां विव्हल होऊन राजानें त्याला विचारिलें, सुमंत्रा ! सीता आणि लक्ष्मण यांसमवेत राम कोठें आहे ? ३ तूं रामाला कोठें सोडून आलास ? मज पाप्याला तो काय बोलला ? मज निर्दयाला सीता आणि लक्ष्मण काय बोलली ? ४ हा रामा ! हा गुणनिधे ! हे प्रियवादिनी सीते ! दुःखसागरांत बुडून मृत्यु पावणाऱ्या मला तुम्हीं पहात नाही काय ?' ५ अशा प्रकारें सारखा शोक केल्यामुळें तो राजा दुःखसागरांत बुडून गेला. तेव्हा तो ( सुमंत्र ) मंत्री हात जोडून त्या विलाप करणाऱ्या राजाला म्हणाला, ६ '( महाराज ! ) राम, लक्ष्मण आणि सीता ह्यांना मी रथांत बसवून गंगातीरावरील शृंगवेरपुराजवळ नेलें. तेथें ती राहिली. ७ तेथें

१. 'क नु वत्स्यति धर्मात्मा वृक्षमूलमुपाश्रितः । किमुवाच वचो रामः किमुवाच च लक्ष्मणः ॥ सुमंत्र ' वनमासाद्य किमुवाच च मैथिली । आसितं शयितं भुक्तं सूत रामस्य कीर्तय ' ॥— वा. रामायण, अयोध्याकांड १०.

किंचिदानीतं फलमूलादिकं च यत् । स्पृष्ट्वा हस्तेन संप्रीत्या नाग्रहीद्वि-
ससर्ज तत् ॥ ८ ॥ वटक्षीरं समानाय्य गुहेन रघुनंदनः । जटामुकुट-
माबद्ध्य मामाह नृपते स्वयम् ॥९॥ सुमंत्र ब्रूहि राजानं शोकस्तेऽस्तु न
मत्कृते । साकेतादधिकं सौख्यं विपिने नो भविष्यति ॥ १० ॥ मातुर्मे
वंदनं ब्रूहि शोकं त्यजतु मत्कृते । आश्वासयतु राजानं वृद्धं शोकपरि-
प्लुतम् ॥ ११ ॥ सीता चाश्रुपरीताक्षी मामाह नृपसत्तम । दुःखगद्गदया
वाचा रामं किंचिदवेक्षती॥१२॥ साष्टांगं प्रणिपातं मे ब्रूहि श्वश्र्वोः पदाबुजे ।
इति प्ररुदती सीता गता किंचिदवाङ्मुखी ॥ १३ ॥ ततस्तेऽश्रुपरीताक्षा
नावमारुरुहुस्तदा । यावद्गंगां समुत्तीर्य गतास्तावदहं स्थितः ॥ १४ ॥
ततो दुःखेन महता पुनरेवाहमागतः । ततो रुदंती कौसल्या राजानमिद-
मब्रवीत् ॥ १५ ॥ कैकेय्यै प्रियभार्यायै प्रसन्नो दत्तवान्वरम् । त्वं राज्यं
देहि तस्यैव मत्पुत्रः किं विवासितः ॥१६॥ कृत्वा त्वमेव तत्सर्वमिदानीं

गुहानें फलमूलें वगैरे जें कांहीं आणिलें, त्याला रामानें संतोषपूर्वक स्पर्श केला; कांहींही न घेतां त्यानें तसेंच ठेवून दिलें. ८ राजा ! तेथें गुहाकडून वडाचा चीक आणवून त्या रघुनंदनानें आपल्या जटांचा मुकुट बांधला आणि नंतर तो स्वतः मला म्हणाला, ९ 'महाराजांना सांग, की मजकरितां शोक करूं नका. अरण्यामध्यें आम्हांला अयोध्येपेक्षांही अधिक सुख होणार आहे.' १० माझ्या मातेला माझा प्रणाम सांगून तिला कळीव कीं, 'माते ! माझ्याकरितां शोक करूं नकोस, तर दुःखव्याकुल महाराजांचें वृद्धावस्थेंत सांत्वन करीत जा.' ११ हे नृप-श्रेष्ठा ! सीतेनें डोळ्यांत आंसवें आणून रामाकडे किंचित् पाहिलें आणि दुःखामुळें कंठ भरून येऊन ती मला म्हणाली, 'माझ्या सासूबाई आणि माझे श्वशुर यांचे पदकमलीं माझा साष्टांग प्रणिपात सांगा.' असें बोलून ती शोकनिमग्न सीता खालीं तोंड करून चालूं लागली. १२,१३ पुढें डोळ्यांतून अश्रू गाळीत गाळीत ती तिघें नौकेवर चढली. गंगा उतरून पलीकडे जाईपर्यंत मी तेथें होतों. १४ नंतर मोठ्या दुःखानें मी तेथून परतलों.' हें ऐकिल्यावर कौसल्या रडत रडत राजाला म्हणाली, १५ '( महाराज ! ) कैकेयी प्रियपत्नी असल्यामुळें तिला आपण वर दिला. आपण त्याला-भरताला-राज्य द्या. परंतु माझ्या पुत्राला आपण बाहेर-वन-वासाला-घालविलें तें कां बरें ? १६ हें सर्व कांहीं आपणच केलें असून आतां

**किंनु रोदिषि । कौसल्यावचनं श्रुत्वा क्षते स्पृष्ट इवाग्निना ॥ १७ ॥ पुनः शोकाश्रुपूर्णाक्षः कौसल्यामिदमब्रवीत् । दुःखेन म्रियमाणं मां किं पुनर्दुःखयस्यलम् ॥ १८ ॥ इदानीमेव मे प्राणा उत्क्रमिष्यंति निश्चयः । शप्तोऽहं बाल्यभावेन केनचिन्मुनिना पुरा ॥ १९ ॥ पुराहं यौवने दृप्तश्चापबाणधरो निशि । अचरं मृगयासक्तो नद्यास्तीरे महावने ॥ २० ॥ तत्रार्धरात्रसमये मुनिः कश्चित्तृषार्दितः । पिपासार्दितयोः पित्रोर्जलमानेतुमुद्यतः । अपूरयज्जले कुंभं तदा शब्दोऽभवन्महान् ॥ २१ ॥ गजः पिबति पानीयमिति मत्वा महानिशि । बाणं धनुषि संधाय शब्दवेधिनमाक्षिपम् ॥ २२ ॥ हा हतोऽस्मीति तत्राभूच्छब्दो मानुषसूचकः । कस्यापि न कृतो दोषो मया केन हतो विधे ॥ २३ ॥ प्रतीक्षते मां माता च पिता**

कां बरें शोक करितां ?' हें कौसल्येचें भाषण ऐकून क्षतावर अग्नीनें डाग द्यावा, त्याप्रमाणें दशरथाला वाटलें. १७ त्याचे डोळे पुनः दुःखाश्रूंनी भरून आले, आणि तो कौसल्येला बोलला, 'आधींच दुःखामुळें मरणोन्मुख झालेल्या मला आणखी कां दुःख देतेस ? पुरे आतां. १८ आतांच माझे प्राण निघून जाणार आहेत, यांत संशय नाही. बाळपणी माझ्या हातून कांहीं अपराध घडला असतां, कोणी एका मुनीनें मला शाप दिला होता. १९ पूर्वी तारुण्याचे समयीं मी फार उन्मत्तपणें वागत असें. त्यांत मृगयेचा मला फार नाद होता. (एकदां) धनुष्यबाण घेऊन रात्रीच्या वेळीं मी एका मोठ्या अरण्यामध्यें नदीतीरावर फिरत होतों. २० तेथें मध्यरात्रीचे वेळीं कोणी तृषाकुल मुनि, तहानेनें अत्यंत व्याकुल झालेल्या आपल्या मातापितरांसाठीं मोठ्या उत्सुकतेनें पाणी भरीत होता. तो आपला कुंभ–तांब्या–पाण्यानें भरीत असतां पाण्याचा मोठा आवाज झाला. २१ कोणी एखादा हत्ती मध्यरात्री पाणी पीत असावा, असें वाटून, शब्दाच्या धोरणानें अचूक लक्ष्य भेदील, असा बाण मीं धनुष्याला जोडला. २२ इतक्यांत 'हाय हाय ! मेलों रे मेलों ! मी कोणाचाही अपराध केला नाहीं. नशिबा !

१. या मुनीचें नाव श्रावण होतें, व तो जातीनें वैश्य होता २. 'हा हा तात' असा ध्वनी परिसुनी त्याला मनीं भूपती । शोधी कारण तो सशल्य गवसे वेतामधीं मूर्ति ती ॥ पुत्राची मुनिच्या, तिला निरखिता, धैर्यें जरी आगळा, । तोही तत्क्षणि भूमिपाळ हृदयीं चिंता-शरें खोंचला.' ॥–लेलेकृत रघुवंशभाषांतर, सर्ग ९.

च जलकांक्षया । तच्छ्रुत्वा भयसंत्रस्तस्ततोऽहं पौरुषं वचः ॥ २४ ॥
शनैर्गत्वाथ तत्पार्श्वं स्वामिन् दशरथोऽस्म्यहम् । अजानता मया विद्ध-
स्त्रातुमर्हसि मां मुने ॥ २५ ॥ इत्युक्त्वा पादयोस्तस्य पतितो गद्गदा-
क्षरः । तदा मामाह स मुनिर्मा भैषीर्नृपसत्तम ॥ २६ ॥ ब्रह्महत्या
स्पृशेन्न त्वां वैश्योऽहं तपसि स्थितः । पितरौ मां प्रतीक्षेते क्षुत्तृड्भ्यां
परिपीडितौ ॥ २७ ॥ तयोस्त्वमुदकं देहि शीघ्रमेवाविचारयन् । न
चेत्त्वां भस्मसात्कुर्यात्पिता मे यदि कुप्यति ॥ २८ ॥ जलं दत्वा तु
तौ नत्वा कृतं सर्वं निवेदय । शल्यमुद्धर मे देहात्प्राणांस्त्यक्ष्यामि
पीडितः ॥ २९ ॥ इत्युक्तो मुनिना शीघ्रं बाणमुत्पाट्य देहतः । सजलं
कलशं धृत्वा गतोऽहं यत्र दंपती ॥ ३० ॥ अतिवृद्धावंधदृशौ क्षुत्पि-
पासार्दितौ निशि । नायाति सलिलं गृह्य पुत्रः किं वाऽत्र कारणम्

कोणी मला मारिले ? माझे आईबाप उदकाची इच्छा करून माझी वाट पाहत आहेत.' असा कोणीतरी मनुष्य आहे, असें सुचविणारा शब्द तेथून निघाला. हें त्या पुरुषाचें भाषण ऐकून मी अगदी भयभीत होऊन गेलों. २३,२४ पुढें हळू हळू त्याच्या अगदी जवळ जाऊन ( मी त्याला म्हणालों, ) 'स्वामी' मी दशरथ आहें. नकळत माझ्या हातून आपणाला बाण लागला आहे. मुने' आतां आपण माझें रक्षण केलें पाहिजे.' २५ असें बोलताना माझा गळा दाटून आला. मी त्याच्या पायांवर लोटांगण घातलें. तेव्हां तो मुनि मला म्हणाला, 'हे राजश्रेष्ठा ! भिऊं नको. २६ तुला ब्रह्महत्येचें पाप लागणार नाही. कारण, तपश्चर्या करणारा मी वैश्य आहें. क्षुधेनें आणि तृषेनें व्याकुळ होऊन माझे आईबाप माझी वाट पाहत आहेत. २७ तरी विचारात क्षणही न घालवितां त्यांना आधी पाणी नेऊन दे. असें तूं न केल्यास माझा बाप संतापून तुझें भस्म करून टाकील. २८ त्यांना पाणी दे, आणि नमनपूर्वक सर्व ( झालेला वृत्तांत ) कथन कर. मला पीडा होत आहे. माझ्या शरीरातून ( रुतलेलें ) बाणाचें अग्र काढ. म्हणजे मी प्राण सोडीन.' २९ असें त्या मुनीनें सांगितलें असतां त्याच्या देहांतून मीं बाण काढिला, आणि पाण्यानें भरलेला कलश घेऊन तें दंपत्य होतें तेथें गेलों. ३० तीं दोघें अतिवृद्ध आणि आंधळी अशी होती. तसेंच त्या रात्रीं तीं भुकेनें आणि तृषेनें अत्यंत व्याकुळ झाली होती. 'पाणी घेऊन ( अजून ) मुलगा येत नाही,

॥ ३१ ॥ अनन्यगतिकौ वृद्धौ शोच्यौ तृट्परिपीडितौ । आवामुपेक्षते
किंवा भक्तिमानावयोः सुतः ॥ ३२ ॥ इति चिंताव्याकुलौ तौ मत्पा-
दन्यासजं ध्वनिम् । श्रुत्वा प्राह पिता पुत्र किं विलंबः कृतस्त्वया
॥ ३३ ॥ देह्यावयोः सुपानीयं पिब त्वमपि पुत्रक । इत्येवं लपतो-
र्भीत्या सकाशमगमं शनैः ॥ ३४ ॥ पादयोः प्रणिपत्याहमब्रुवं विनया-
न्वितः । नाहं पुत्रस्त्वयोध्याया राजा दशरथोऽस्म्यहम् ॥ ३५ ॥
पापोऽहं मृगयासक्तो रात्रौ मृगविहिंसकः । जलावतारादूरेऽहं स्थित्वा
जलगतं ध्वनिम् ॥ ३६ ॥ श्रुत्वाहं शब्दवेधित्वादेकं बाणमथात्यजम् ।
हतोऽस्मीति ध्वनिं श्रुत्वा भयात्तत्राहमागतः ॥ ३७ ॥ जटा विकीर्य
पतितं दृष्ट्वाहं मुनिदारकम् । भीतो गृहीत्वा तत्पादौ रक्ष रक्षेति चाब्रवम्
॥ ३८ ॥ मा भैषीरिति मां प्राह ब्रह्महत्याभयं न ते । मत्पित्रोः सलिलं

याला काय कारण बरें ? ३१ आम्हांला त्याशिवाय कोणाचाही आधार नाही, आम्ही वृद्ध झालों आहों, काय आमची शोचनीय स्थिति ! आम्ही अत्यंत तृषाक्रांत झालों आहों. तो आमचा भक्तिमान् मुलगा आमची उपेक्षा करीत आहे काय ?' ३२ अशी चिंताग्रस्त होऊन तीं दोघें बसलीं असतां माझ्या पावलांचा आवाज त्यांनी ऐकिला. तो ऐकून ( त्या मुनिपुत्राचा ) बाप म्हणाला, 'पुत्रा ! इतका उशीर कां बरें केलास ? ३३ मुला ! आम्हाला चांगलें पाणी दे, आणि नंतर तूंही पी.' असें तीं बोलत आहेत, इतक्यांत मी हळू हळू त्यांच्या जवळ गेलों. ३४ त्यांच्या पायावर मस्तक ठेवून मी विनयपूर्वक म्हणालों, 'मी आपला पुत्र नाही. मी अयोध्येचा दशरथ राजा आहें. ३५ मी पापी आहें. मृगयासक्त होऊन रात्रीच्या वेळी पाणवठ्यापासून बऱ्याच अंतरावरून पशूंना मारीत असतां, पाण्यांत होणारा आवाज मी ऐकिला. मी शब्दवेधी–शब्दाला अनुसरून अचूक लक्ष्यवेध करणारा–असल्यामुळें एक बाण त्या ठिकाणीं सोडिला. इतक्यांत 'मेलों, रे मेलों,' असा शब्द ऐकून मी भयभीत झालों आणि तेथें गेलों. ३६,३७ तोंच जटा पसरून पडलेला एक मुनिकुमार माझ्या दृष्टीस पडला. भयग्रस्त होऊन मी त्याचे पाय धरिले, आणि 'माझें रक्षण कर, माझें रक्षण कर,' असें मी त्याला बोललों. ३८ 'भिऊं नको, तुला ब्रह्महत्येचें पातक लागणार नाही;

दत्वा नत्वा प्रार्थय जीवितम् ॥ ३९ ॥ इत्युक्तो मुनिना तेन ह्यागतो मुनिहिंसकः । रक्षेतं मां दयायुक्तौ युवां हि शरणागतम् ॥ ४० ॥ इति श्रुत्वा तु दुःखार्तौ विलप्य बहु शोच्य तम् । पतितौ नौ सुतो यत्र नय तत्राविलंबयन् ॥ ४१ ॥ ततो नीतौ सुतो यत्र मया तौ वृद्धदंपती । स्पृष्ट्वा सुतं तौ हस्ताभ्यां बहुशोऽथ विलेपतुः ॥ ४२ ॥ हाहेति क्रंदमानौ तौ पुत्र पुत्रेत्यवोचताम् । जलं देहीति पुत्रेति किमर्थं न ददास्यलम् ॥ ४३ ॥ ततो मामूचतुः शीघ्रं चितिं रचय भूपते । मया तदैव रचिता चितिस्तत्र निवेशिताः । त्रयस्तत्राग्निरुत्सृष्टो दग्धास्ते त्रिदिवं ययुः ॥ ४४ ॥ तत्र वृद्धः पिता प्राह त्वमप्येवं भविष्यसि । पुत्रशोकेन मरणं प्राप्स्यसे वचनान्मम ॥ ४५ ॥ स इदानीं मम प्राप्तः शापकालोऽनिवारितः । इत्युक्त्वा विललापाथ राजा शोक-

माझ्या मातापितराना पाणी दे, आणि नमनपूर्वक जीवदानाची प्रार्थना कर.' ३९ असें त्या मुनीनें मला सांगितल्यावरून मुनिहिंसा करणारा मी आपल्याकडे आलों आहें. मी आपणांला शरण आलों आहें, तरी दयायुक्त होऊन माझें रक्षण करा.' ४० हें ( राजाचें भाषण ) ऐकून त्या दोघानीं दुःखानें व्याकुळ होऊन अतिशय शोक केला. ( दुःखावेगानें ) ती जमिनीवर पडली. शोकग्रस्त होऊन ती मला म्हणाली, 'आमचा मुलगा ज्या ठिकाणी आहे, तेथें आम्हांला त्वरित घेऊन चल.' ४१ नंतर मी त्या वृद्ध जोडप्याला त्यांचा पुत्र होता, त्या ठिकाणी नेलें. आपल्या मुलाच्या शरीराला हस्तस्पर्श करून त्यांनी बहुत शोक केला. ४२ 'हाय हाय !' म्हणून त्यांनी मोठ्यानें आक्रोश केला, आणि म्हणालीं, 'पुत्रा ! पुत्रा ! अरे पुत्रा ! पाणी दे ! आम्हांला पोट भरून पाणी तूं कां बरें देत नाहीस ?' ४३ नंतर ती मला म्हणाली, 'राजा ! आतां लवकर चिता तयार कर.' तेव्हां मी चिता तयार केली, आणि तीवर त्या तिघांना ठेवून अग्नि दिला. अशा रीतीनें अग्नीनें दग्ध होऊन ती स्वर्गाला गेलीं. ४४ त्या ठिकाणी तो वृद्ध पिता मला म्हणाला होता की, 'तुझीही अशीच अवस्था होईल. माझ्या शापानें तुला पुत्रशोकानें मरण येईल.' ४५ ता अनिवार्य शापकाल आज मला प्राप्त झाला आहे'

१ देहान्त तूंहि मजसा निजपुत्रशोकें, रे पावशील अतिवृद्धपणीच देखे, । ऐसे तई तनयशोकशराग्रविद्धे, तत्काल शाप दिधला नृपतीस वृद्धे' ॥–लेलेकृत रघुवंशाचे भाषांतर, सर्ग ९.

समाकुलः ॥ ४६ ॥ हा राम पुत्र हा सीते हा लक्ष्मण गुणाकर । त्वद्वियोगादहं प्राप्तो मृत्युं कैकेयिसंभवम् ॥ ४७ ॥ वदन्नेवं दशरथः प्राणांस्त्यक्त्वा दिवं गतः । कौसल्या च सुमित्रा च तथान्या राजयोषितः ॥ ४८ ॥ चुक्रुशुश्च विलेपुश्च उरस्ताडनपूर्वकम् । वसिष्ठः प्रययौ तत्र प्रातर्मंत्रिभिरावृतः ॥ ४९ ॥ तैलद्रोण्यां दशरथं क्षिप्त्वा दूतानथाब्रवीत् । गच्छत त्वरितं साश्वा युधाजिन्नगरं प्रति ॥ ५० ॥ तत्रास्ते भरतः श्रीमाञ्छत्रुघ्नसहितः प्रभुः । उच्यतां भरतः शीघ्रमागच्छेति ममाज्ञया ॥ ५१ ॥ अयोध्यां प्रति राजानं कैकेयीं चापि पश्यतु । इत्युक्तास्त्वरितं दूता गत्वा भरतमातुलम् ॥ ५२ ॥ युधाजितं प्रणम्योचुर्भरतं सानुजं प्रति । वसिष्ठस्त्वाऽब्रवीद्राजन् भरतः सानुजः प्रभुः ॥ ५३ ॥ शीघ्रमागच्छतु पुरीमयोध्यामविचारयन् । इत्याज्ञप्तोऽथ भरतस्त्वरितं

असें बोलून त्या शोकार्त (दशरथ) राजानें विलाप केला. ४६ 'हा रामा ! हा पुत्रा! हा सीते ! हा गुणाकरा लक्ष्मणा ! तुमच्या वियोगानें मी मृत्यु पावत आहें. ह्याला कारण कैकेयी आहे.' ४७ असें बोलत दशरथ ( राजा ) प्राण सोडून स्वर्गाला गेला. त्या वेळी कौसल्या, सुमित्रा आणि इतर राजपत्न्या यांनी वक्षःस्थलाचे ठिकाणी ताडन करीत आक्रोशपूर्वक मोठा विलाप केला. प्रातःकाळ होतांच वसिष्ठ मंत्रिमंडळास घेऊन तेथें आला. ४८,४९ तेलाच्या डोणींत दशरथाचें प्रेत ठेवून तो ( वसिष्ठ ) दूतांना म्हणाला, ' घोड्यावर बसून युधाजित् राजाच्या नगराला त्वरित जा, ५० तेथें तो सौंदर्यशाली भरत प्रभु शत्रुघ्नासह राहत आहे. माझ्या आज्ञेवरून ' लवकर ये, ' म्हणून त्याला सांगा. ५१ अयोध्येला येऊन राजाचें आणि कैकेयीचेंही दर्शन त्यानें घ्यावें.' असें सांगताच ते दूत त्वरितगतीनें भरताच्या मातुलाकडे आले. ५२ त्यांनी युधाजिताला प्रणाम केला, आणि त्याला म्हणाले, ' महाराज ! भरत आणि त्याचा कनिष्ठ बंधु यांसंबंधानें आपणाला वसिष्ठांनी सांगितलें आहे की, महाप्रभाव भरतानें धाकट्या बंधुसह. विचार करीत न बसतां त्वरित अयोध्येला निघून यावें.' ही आज्ञा

१. दशरथमरण—' राम राम करिता स्मरण । स्वयें दशरथें सोडिला प्राण । मन, बुद्धि, इंद्रियें जाण । रामार्पण तेणें केलीं ॥ मनीं राम, ध्यानीं राम, । नयनीं राम, वदनीं राम, । ऐसा स्मरता राम राम । प्राणोत्क्रमण रायासी ' ॥–भा. रामायण, अयोध्याकांड. २. दुर्गंधि न सुटावी म्हणून तेलाच्या द्रोणींत प्रेत ठेवीत असत.

भयविह्वलः ॥ ५४ ॥ आयर्यौ गुरुणादिष्टः सह दूतैस्तु सानुजः । राज्ञो वा राघवस्यापि दुःखं किंचिदुपस्थितम् ॥ ५५ ॥ इति चिंतापरो मार्गे चिंतयन्नगरं ययौ । नगरं भ्रष्टलक्ष्मीकं जनसंबाधवर्जितम् ॥ ५६ ॥ उत्सवैश्च परित्यक्तं दृष्ट्वा चिंतापरोऽभवत् । प्रविश्य राजभवनं राजलक्ष्मीविवर्जितम् ॥५७॥ अपश्यत्कैकयीं तत्र एकामेवासने स्थिताम् । ननाम शिरसा पादौ मातुर्भक्तिसमन्वितः ॥५८॥ आगतं भरतं दृष्ट्वा कैकेयी प्रेमसंभ्रमात् । उत्थायालिंग्य रभसा स्वांकमारोप्य संस्थिता ॥ ५९ ॥ मूर्ध्न्यवघ्राय पप्रच्छ कुशलं स्वकुलस्य सा । पिता मे कुशली भ्राता माता च शुभलक्षणा ॥६०॥ दिष्ट्या त्वमद्य कुशली मया दृष्टोऽसि पुत्रक । इति पृष्टः स भरतो मात्रा चिंताकुलेंद्रियः ॥६१॥ दूयमानेन मनसा मातरं समपृच्छत ।

ऐकतांच भरत भयविह्वल झाला. ५३,५४ आणि गुरूच्या आज्ञेप्रमाणें कनिष्ठ बंधु आणि ते दूत यांसहवर्तमान त्वरित आला. राजावर किंवा रामावर कांहीतरी अनिष्ट प्रसंग आला असावा, ५५ अशा चिंतेनें वाटेंत विचार करीत करीत तो नगराला आला, तों नगराची सर्व शोभा नष्ट झाली आहे, लोकसमुदाय कोठेंही दिसत नाहीत, सर्व प्रकारचे उत्सव अजीबाद बंद आहेत, अशी स्थिति पाहून त्याला अधिकच काळजी वाटूं लागली. राजवाड्यांत शिरतो तों सर्व मंदिर राजलक्ष्मीचें चिह्न कांहींच नाहीं, अशा स्वरूपांत त्याच्या दृष्टीस पडलें. ५६,५७ तेथें आसनावर बसलेली एकटी कैकेयी त्याच्या दृष्टीस पडली. भक्तियुक्त अंतःकरणानें त्यानें मातेच्या चरणांचे ठिकाणी साष्टांग प्रणिपात केला. ५८ भरत आलेला पाहून कैकेयीनें प्रेमपूर्वक लगबगीनें उठून त्याला आलिंगन दिलें, आणि त्याला मांडीवर घेऊन बसली. ५९ तिनें मुलाचें मस्तक हुंगिलें आणि त्याला आपल्या माहेरची खुशाली विचारली. माझे बाबा, माझा बंधु, माझी सुलक्षणी माता खुशाल आहे ना ? ६० पुत्रा ! मला मोठा आनंद वाटतो, की तूं आज सुखरूप माझ्या दृष्टीला पडलास. आईनें भरताला ह्या सर्व गोष्टी विचारल्या, परंतु त्याची सर्व इंद्रियें चिंताग्रस्त होऊन गेली होती. ६१ खिन्न मनानें त्यानें आईला विचारिलें,

१. समानार्थक वर्णन –' मग भरत वसिष्ठ आणिला जो अयोध्ये । नगर गतधवा तों आणि निर्वीर्य योद्धे ॥ जन मृतसम देखे हेतु कांहीं कळेना । जननिकृत कुचेष्टा बुद्धिनें आकळेना ' ॥—भरतभाव, वामनपंडित.

मातः पिता मे कुत्रास्ते एका त्वमिह संस्थिता ॥ ६२ ॥ त्वया विना न मे तातः कदाचिद्रहसि स्थितः । इदानीं दृश्यते नैव कुत्र तिष्ठति मे वद ॥ ६३ ॥ अदृष्ट्वा पितरं मेऽद्य भयं दुःखं च जायते । अथाह कैकयी पुत्रं किं दुःखेन तवानघ ॥६४॥ या गतिर्धर्मशीलानामश्वमेधादियाजिनाम् । तां गतिं गतवानद्य पिता ते पितृवत्सल ॥ ६५ ॥ तच्छ्रुत्वा निपपातोर्व्यां भरतः शोकविह्वलः । हा तात क्क गतोऽसि त्वं त्यक्त्वा मां वृजिनार्णवे ॥६६॥ असमर्प्यैव रामाय राज्ञे मां क्क गतोऽसि भो । इति विलपितं पुत्रं पतितं मुक्तमूर्धजम् ॥ ६७ ॥ उत्थाप्यामृज्य नयने कैकयी पुत्रमब्रवीत् । समाश्वसिहि भद्रं ते सर्वं संपादितं मया ॥ ६८ ॥ तामाह भरतस्तातो म्रियमाणः किमब्रवीत् । तमाह कैकयी देवी भरतं भयवर्जिता ॥ ६९ ॥ हा राम राम सीतेति लक्ष्मणेति पुनः पुनः । विलपन्नेव सुचिरं देहं त्यक्त्वा दिवं ययौ ॥ ७० ॥ तामाह भरतो हेऽब रामः

‘ आई ! बाबा कोठें आहेत ? तूं एकटीच येथें बसली आहेस हें कसें ? ६२ तुला सोडून बाबा एकातात कधीही बसले नाहीत; ते सांप्रत कोठें दिसत नाहीत, ते कोठें आहेत सांग. ६३ बाबा दिसत नसल्यामुळें मला भीति आणि मोठें दुःख वाटत आहे.’ हें ऐकून कैकेयी पुत्राला–भरताला–म्हणाली, ‘ हे निष्पापा ! तूं दुःख कशाला म्हणून करितोस ? ६४ धर्मानें वागणाऱ्यांना आणि अश्वमेधादि यज्ञ करणाऱ्यांना जी गति मिळते, त्याच गतीला हे पितृवत्सला(भरता) ! तुझे वडील गेले आहेत. ६५ हें ऐकून तो भरत शोकविह्वल होऊन जमिनीवर पडला. हाय हाय ! बाबा ! मला दुःखसमुद्रात टाकून कोठें हो गेलां ? ६६ रामराजाच्या स्वाधीन मला न करितां आपण कोठें हो गेलां ? अशा प्रकारें केश मोकळे सोडून आणि जमिनीवर पडून शोक करणाऱ्या त्या पुत्राला–भरताला–कैकेयीनें उठविलें, आणि त्याचे डोळे पुसून त्याला म्हटलें, ‘ मुला ! धीर धर, तुझ्या सर्व कल्याणाची मी व्यवस्था केली आहे. ’ ६७,६८ तिला भरत म्हणाला, ‘ मरतांना बाबांनीं काय सांगितलें ? ’ त्यावर कैकेयी त्या भरताला निर्भय मनानें म्हणाली, ६९ ‘ हा रामा ! हा रामा ! हा सीते ! हा लक्ष्मणा ! असा विलाप फार वेळ करीत, अखेर देहत्याग करून महाराज स्वर्गाला गेले ’ ७० त्यावर भरत तिला म्हणाला, ‘ आई !

संनिहितो न किम् । तदानीं लक्ष्मणो वापि सीता वा कुत्र ते गताः
॥ ७१ ॥ कैकेय्युवाच ॥ रामस्य यौवराज्यार्थं पित्रा ते संभ्रमः
कृतः । तव राज्यप्रदानाय तदाऽहं विघ्नमाचरम् ॥ ७२ ॥ राज्ञा दत्तं
हि मे पूर्वं वरदेन वरद्वयम् । याचितं तदिदानीं मे तयोरेकेन तेऽखिलम्
॥ ७३ ॥ राज्यं रामस्य चैकेन वनवासो मुनिव्रतम् । ततः सत्यपरो
राजा राज्यं दत्वा तवैव हि ॥ ७४ ॥ रामं संप्रेषयामास वनमेव पिता
तव । सीताप्यनुगता रामं पातिव्रत्यमुपाश्रिता ॥ ७५ ॥ सौभ्रात्रं दर्श-
यन्राममनुयातोऽपि लक्ष्मणः । वनं गतेषु सर्वेषु राजा तानेव चिंतयन्
॥ ७६ ॥ प्रलपन् राम रामेति ममार नृपसत्तमः । इति मातुर्वचः श्रुत्वा
वज्राहत इव द्रुमः ॥ ७७ ॥ पपात भूमौ निःसंज्ञस्तं दृष्ट्वा दुःखिता तदा ।
कैकेयी पुनरप्याह वत्स शोकेन किं तव ॥ ७८ ॥ राज्ये महति संप्राप्ते

(मरणसमयी) महाराजांच्या जवळ राम नव्हता काय ? लक्ष्मण किंवा सीता यांपैकीहीं कोणी जवळ नव्हतें काय ! ती कोठें गेली होतीं ! ७१ कैकेयी म्हणाली, 'रामाला यौवराज्य अर्पण करण्याकरितां तुझ्या वडिलांनीं मोठी तयारी केली होती; पण तुला राज्य मिळावें, म्हणून त्या वेळी मी त्या कामांत विघ्न आणिलें. ७२ पूर्वीं राजांनी वरद होऊन मला दोन वर दिले होते, त्यांची मी या वेळीं मागणी केली. एका वरानें तुला सर्व राज्य मिळावें, आणि दुसऱ्या वरानें मुनिव्रत स्वीकारून रामानें वनवासास जावें (असें मी मागितलें). त्यावरून सत्यव्रत महाराजांनी तुलाच राज्य दिलें. ७३,७४ त्याचप्रमाणें त्या तुझ्या वडिलांनी रामाला वनवासासच पाठविलें. पातिव्रत्याचा स्वीकार करून सीताही रामाच्या मागून गेली, ७५ आणि लक्ष्मणही आपली भ्रातृनिष्ठा किती उत्तम प्रकारची आहे, हें दाखविण्याकरितां रामामागून गेला. हे सर्व वनाला गेले असतां महाराज त्यांचेंच चिंतन करीत, ७६ आणि रामा ! रामा ! असा सारखा विलाप करीत ते नृपश्रेष्ठ निधन पावले.' हें आईचें भाषण ऐकून वज्राघातानें वृक्ष कोसळून पडावा, तसा भरत मूर्च्छित होऊन जमिनीवर पडला. तें पाहून कैकेयीला दुःख झालें, आणि ती म्हणाली, 'वत्सा ! तुला शोक करण्याचें काय कारण बरें ? ७७,७८ एवढें मोठें राज्य प्राप्त झालें असतां

दुःखस्यावसरः कुतः । इति ब्रुवंतीमालोक्य मातरं प्रदहन्निव ॥ ७९ ॥ असंभाष्यासि पापे मे घोरे त्वं भर्तृघातिनी । पापे त्वद्गर्भजातोऽहं पापवानस्मि सांप्रतम् । अहमग्निं प्रवेक्ष्यामि विषं वा भक्षयाम्यहम् ॥ ८० ॥ खड्गेन वाथ चात्मानं हत्वा यामि यमक्षयम् । भर्तृघातिनि दुष्टे त्वं कुंभीपाकं गमिष्यासि ॥ ८१ ॥ इति निर्भर्त्स्य कैकेयीं कौसल्याभवनं ययौ । साऽपि तं भरतं दृष्ट्वा मुक्तकंठा रुरोद ह ॥ ८२ ॥ पादयोः पतितस्तस्या भरतोऽपि तदारुदत् । आलिंग्य भरतं साध्वी राममाता यशस्विनी ॥ ८३ ॥ कृशाऽतिदीनवदना साश्रुनेत्रेदमब्रवीत् । पुत्र त्वयि गते दूरमेवं सर्वमभूदिदम । उक्तं मात्रा श्रुतं सर्वं त्वया ते मातचेष्टितम

दुःखाला जागा तरी कुठें आहे ? ' असें आई ( कैकेयी ) बोलत आहे, तोंच भरतानें मोठ्या (उग्रतेनें) तिच्याकडे पाहिलें. तो तिला जाळीतच आहे कीं काय असा भास झाला. ७९ तो तिला म्हणाला, 'हे पापिणि ! हे दुष्टे ! तूं भाषण करण्याला देखील लायक नाहीस. तूं पतिहत्या करणारी आहेस. हे दुष्टे ! तुझ्या गर्भी माझा जन्म झाल्यामुळें मीही पापी आहें. मी आतां अग्निप्रवेश करितों, किंवा विष खातों, ८० अगर खड्गानें आत्महत्या करून घेऊन यमसदनाला जातों. पतिहत्या करणाऱ्ये दुष्टे ! तूं कुंभीपाक नरकाला जाणार आहेस.' ८१ अशा प्रकारें कैकेयीची निर्भर्त्सना करून ( भरत ) कौसल्येच्या मंदिरीं गेला. भरताला पाहून कौसल्याही गळा काढून मोठमोठ्यानें रडूं लागली. ८२ त्या वेळी भरतही तिच्या पायांवर लोळण घेऊन रडला. त्या कीर्तिशाली पतिव्रता राममातेनें भरताला आलिंगन दिलें. ८३ ती अत्यंत कृश झाली होती. डोळ्यांत आंसवें आणून आणि अति दीन वदन करून ती म्हणाली, ' पुत्रा ! तूं दूर गेला होतास, अशा स्थितीत हें सर्व असें झालें ! तुझ्या आईनें तुला सांगितलें तें सर्व तूं ऐकिलें आहेस. त्या अर्थी आईचें सर्व कृत्य तुला कळून आलेंच

१. ह्या प्रसंगाचे वर्णन वामनपंडितानी फार सुरेख केलें आहे, तें पहा —' जाळील तीतें निजदृष्टिपाते । पाहे असा हालविनाच पाते ॥ म्हणे ' अवो पापिणि पापरूपे ! । जळो तुझें तोंड जडस्वरूपे ' ॥ जाळीन हें तोंडचि जाण आवीं । मुखे जया देशि अनंत आधी ॥ न माय, तूं वैरिण होसि साची । माझे मनीं भाव खरा असाची ' ॥—भरतभाव, वामन.
२. कुंभीपाक या नावाचा एक नरक आहे. त्यात पापी लोकांना कुंभाराच्या भाड्याप्रमाणें भाजून काढीत असतात.

॥ ८४ ॥ पुत्रः सभार्यो वनमेव यातः सलक्ष्मणो मे रघुरामचंद्रः । चीरांबरो बद्धजटाकलापः संत्यज्य मां दुःखसमुद्रमग्नाम् ॥ ८५ ॥ हा राम हा मे रघुवंशनाथ जातोऽसि मे त्वं परतः परात्मा । तथापि दुःखं न जहाति मां वै विधिर्बलीयानिति मे मनीषा ॥८६॥ स एवं भरतो वीक्ष्य विलपंतीं भृशं शुचा । पादौ गृहीत्वा प्राहेदं शृणु मातर्वचो मम ॥८७॥ कैकेय्या यत्कृतं कर्म रामराज्याभिषेचने । अन्यद्वा यदि जानामि सा मया नोदिता यदि ॥८८॥ पापं मेऽस्तु तदा मातर्ब्रह्महत्याशतोद्भवम् । हत्वा वसिष्ठं खड्गेन अरुंधत्या समन्वितम् ॥ ८९ ॥ भूयात्तत्पापमखिलं मम जानामि यद्यहम् । इत्येवं शपथं कृत्वा रुरोद भरतस्तदा ॥ ९० ॥ कौसल्या तमथालिंग्य पुत्र जानामि मा शुचः । एतस्मिन्नंतरे श्रुत्वा भरतस्य समागमम् ॥ ९१ ॥ वसिष्ठो मंत्रिभिः सार्धं प्रययौ राज-

आहे. ८४ माझा पुत्र रघुकुलोत्पन्न रामचंद्र आज दुःखसमुद्रांत बुडालेल्या मला टाकून वनाला गेला आहे. त्याबरोबर त्याची पत्नी ( सीता ), आणि (बंधु) लक्ष्मण, ही गेली आहेत. त्यानें वल्कलें परिधान केली असून मस्तकीं जटाकलाप धारण केला आहे. ८५ हा रामा ! हा रघुकुलाधिपते ! तूं परात्पर परमेश्वर माझ्या पोटीं आला आहेस. असें आहे, तरी दुःख मला सोडून जात नाही. यावरून नशीबच[1] बलवत्तर होय, असें मला वाटतें.' ८६ अशा रीतीनें अत्यंत शोक करणाऱ्या ( कौसल्येला ) पाहून भरतानें तिचे पाय धरिले, आणि म्हटलें, 'माते ! माझें म्हणणें ऐक. ८७ रामाच्या राज्याभिषेकाचे कामीं कैकेयीनें जी कृति केली, त्या संबंधांत अगर दुसऱ्या कोणत्याही संबंधांत मला माहिती असेल, किंवा मी तिला प्रेरणा दिली असेल, ८८ तर हे माते ! शंभर ब्रह्महत्या केल्यानें उद्भवणारें पाप मला लागेल. अरुंधतीसह वसिष्ठाचा तरवारीनें वध केला असतां जें पाप लागावें, तें पाप मला, या संबंधांत कांही माहिती असल्यास, लागो.' अशी शपथ करून भरत त्या वेळीं रडूं लागला. ८९ ९० कौसल्येनें त्याला आलिंगन दिलें, आणि 'पुत्रा ! मला सर्व ठाऊक आहे, शोक करूं नकोस' असें म्हटलें. इतक्यांत भरत आला, असें ऐकून मंत्र्यांना घेऊन वसिष्ठ

१. दैवच बलवत्तर.—' रामातें वनवास ये विधिबळें राज्यच्युती पाडवां, सेवा पाकगृहीं नला, निधनही लंकेश्वरा, यादवा, ॥ पातालीं वसती बली नृपतिला हो वामनाच्या करें, । ईशेच्छाचि बलीयसी ' अनुभवा ये प्रत्यया हें खरें. ' ॥—सुभाषिताजलि.

मंदिरम् । रुदंतं भरतं दृष्ट्वा वसिष्ठः प्राह सादरम् ॥ ९२ ॥ वृद्धो राजा
दशरथो ज्ञानी सत्यपराक्रमः । भुक्त्वा मर्त्यसुखं सर्वमिष्ट्वा विपुलद-
क्षिणैः ॥ ९३ ॥ अश्वमेधादिभिर्यज्ञैर्लब्ध्वा रामं सुतं हरिम् । अंते जगाम
त्रिदिवं देवेंद्रार्धासनं प्रभुः ॥ ९४ ॥ तं शोचसि वृथैव त्वमशोच्यं मोक्ष-
भाजनम् । आत्मा नित्योऽव्ययः शुद्धो जन्मनाशादिवर्जितः ॥ ९५ ॥
शरीरं जडमत्यर्थमपवित्रं विनश्वरम् । विचार्यमाणे शोकस्य नावकाशः
कथंचन ॥ ९६ ॥ पिता वा तनयो वाऽपि यदि मृत्युवशं गतः । मूढा-
स्तमनुशोचंति स्वात्मताडनपूर्वकम् ॥ ९७ ॥ निःसारे खलु संसारे
वियोगो ज्ञानिनां यदा । भवेद्वैराग्यहेतुः स शांतिसौख्यं तनोति च
॥ ९८ ॥ जन्मवान्यदि लोकेऽस्मिंस्तर्हि तं मृत्युरन्वगात । तस्मादपरि-

राजमंदिरांत आला. त्यानें भरताला रडतांना पाहून आदरपूर्वक म्हटलें, ९१,९२ 'वृद्ध दशरथ राजा ज्ञानी आणि सत्यपराक्रमी असा होता. मृत्युलोकींचीं सर्व सुखें त्यानें भोगिलीं. मोठमोठ्या दक्षिणा देऊन अश्वमेधादिक यज्ञांनीं त्यानें ईश्वरआराधना केली. त्यायोगें त्याला साक्षात् हरिच अशा रामपुत्राची प्राप्ति झाली. शेवटीं तो ( दशरथ ) प्रभु स्वर्गलोकाला जाऊन इंद्राच्या अर्धासनाला प्राप्त झाला आहे. ९३,९४ तो मोक्षाला पात्र असल्यामुळें त्याच्याबद्दल शोक करणें योग्य नाहीं, तूं विनाकारण शोक करीत आहेस. कारण, आत्मा नित्य आहे, तो विकाररहित आहे, शुद्ध आहे, त्याला जन्म नाश वगैरे कांहीं नाहीं. ९५ शरीर हें जड असून अत्यंत अपवित्र आहे. तें नाशवत आहे. म्हणून विचार करून पाहिलें असतां शोक करण्यास कारणच नाहीं. ९६ पिता, काय, किंवा पुत्र काय मृत्युवश झाला असतां जे कोणी त्याबद्दल देहताडन करून शोक करितात, ते केवळ मूर्ख होत. ९७ या निस्सार संसारामध्यें ज्ञानी मनुष्याला वियोग सदा वैराग्यप्राप्तीला कारण होत असतो. पुढें तोच ( वियोग ) शांतिसुखही देत असतो. ९८ ज्या अर्थीं प्राणी ह्या लोकांत जन्मास आला आहे, त्या अर्थीं मृत्यु त्याच्या मागें लागलेलाच आहे, म्हणून

१. अशोच्यानन्वशोचस्त्वम् —भ. गीता २, ११. २. समानार्थक वर्णनः— न जायत म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूय । अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ' ॥ भ. गीता २, २०. ३. अपवित्र व नाशवत शरीर –' मासमूत्रपुरीषास्थि-निर्मितेऽस्मिन् कलेवरे । विनश्वरे विहायास्था यश पालय मित्र मे ' ॥--हितोपदेश.

हार्योऽयं मृत्युर्जन्मवतां सदा ॥ ९९ ॥ स्वकर्मवशतः सर्वजंतूनां प्रभवा-
प्ययौ । विजानन्नप्यविद्वान्यः कथं शोचति बांधवान् ॥ १०० ॥ ब्रह्मां-
डकोटयो नष्टाः सृष्टयो बहुशो गताः । शुष्यंति सागराः सर्वे कैवास्था
क्षणजीविते ॥ १ ॥ चलपत्रांतलग्नांबुबिंदुवत्क्षणभंगुरम् । आयुस्त्यज-
त्यवेलायां कस्तत्र प्रत्ययस्तव ॥ २ ॥ देही प्राक्तनदेहोत्थकर्मणा देह-
वान्पुनः । तद्देहोत्थेन च पुनरेवं देहः सदात्मनः ॥ ३ ॥ यथा त्यजति
वै जीर्णं वासो गृह्णाति नूतनम् । तथा जीर्णं परित्यज्य देही देहं पुन-
र्नवम् ॥ ४ ॥ भजत्येव सदा तत्र शोकस्यावसरः कुतः । आत्मा न
म्रियते जातु जायते न च वर्धते ॥ ५ ॥ षड्भावरहितोऽनंतः सत्यप्र-

जन्मास येणाऱ्या माणसांना मृत्यु टाळतांच येत नाही. ९९ सर्व जंतूंना जन्म आणि विनाश हीं त्यांच्या त्यांच्या कर्मानुसार आहेतच. इतकें जो जाणतो, तो अज्ञान असला तरी बांधवांबद्दल कसा बरें शोक करील? १०० आजवर कोट्यवधि ब्रह्मांडें नष्ट झाली आहेत, अनेक सृष्टि नाशास गेल्या आहेत, सर्व समुद्रही शुष्क होऊन जातात, मग या क्षणिक जीविताची आस्था ती काय म्हणून धरायाची? १०१ चंचल पर्णाच्या अग्रभागी लागलेल्या जलबिंदूप्रमाणें आयुष्य हें क्षणभंगुर आहे; प्राण्याला तें अवेळी सोडून जातें, मग त्याजवर तुझा विश्वास कां असावा? १०२ पूर्वजन्मीं केलेल्या कर्माप्रमाणें देही ( जीव ) पुनः देह पावतो. त्या नवीन देहांत कर्मे करावी, तदनुसार पुनः दुसरा देह आत्म्याला प्राप्त होतो. १०३ ज्याप्रमाणें ( कोणी मनुष्य ) जीर्ण वस्त्र टाकून नवीन वस्त्र धारण करितो, त्याचप्रमाणें आत्मा सर्वदा जीर्ण देहाचा त्याग करून नवीन देह धारण करितो, असें असतां त्याबद्दल शोकाला जागा तरी कोठें आहे? आत्मा कधीं मरत नाहीं, कधीं जन्म घेत नाही, किंवा वाढतही नाहीं. १०४, १०५ तो षड्भावरहित आहे;

१. 'जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च । तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि'॥—भ. गीता २,२७.२ 'नलिनीदलगतजलमतितरलं तद्वज्जीवितमतिशयचपलम्' ।—द्वादशपंजरिका स्तोत्र. ३. 'वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरो पराणि । तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही.' ॥—भ. गीता, २,२२.४. षड्भाव.- बालकांड, अध्याय ७, श्लोक ३१ वरील नोट पहा. 'जायते, वर्धते,' इत्यादि.

ज्ञानविग्रहः । आनंदरूपो बुद्ध्यादिसाक्षी लयविवर्जितः ॥ ६ ॥ एक एव परो ह्यात्मा ह्यद्वितीयः समः स्थितः । इत्यात्मानं दृढं ज्ञात्वा त्यक्त्वा शोकं कुरु क्रियाम् ॥ ७ ॥ तैलद्रोण्याः पितुर्देहमुद्धृत्य सचिवैः सह । कृत्यं कुरु यथान्यायमस्माभिः कुलनंदन ॥ ८ ॥ इति संबोधितः साक्षाद्गुरुणा भरतस्तदा । विसृज्याज्ञानजं शोकं चक्रे स विधिवत्क्रियाम् ॥ ९ ॥ गुरुणोक्तप्रकारेण आहिताग्नेर्यथाविधि । संस्कृत्य स पितुर्देहं विधिदृष्टेन कर्मणा ॥ ११० ॥ एकादशेऽहनि प्राप्ते ब्राह्मणान्वेदपारगान् । भोजयामास विधिवच्छतशोऽथ सहस्रशः ॥ ११ ॥ उद्दिश्य पितरं तत्र ब्राह्मणेभ्यो धनं बहु । ददौ गवां सहस्राणि ग्रामान् रत्नांबराणि च ॥ १२ ॥ अवसत्स्वगृहे तत्र राममेवानुचिंतयन् । वसिष्ठेन सह भ्रात्रा मंत्रिभिः परिवारितः ॥ १३ ॥ रामेऽरण्यं प्रयाते सह जनकसुतालक्ष्मणाभ्यां सुघोरं माता मे राक्षसीव प्रदहति हृदयं दर्शनादेव

तो अनंत आहे; सत्यज्ञान—आत्मस्वरूपज्ञान—हेंच त्याचें शरीर आहे; तो आनंदरूप आहे, तो बुद्ध्यादिकांचा साक्षी आहे; तो नाशरहित आहे, १०६ आत्मा एकच, सर्वत्र पूर्णत्वानें भरलेला, द्वैतभावरहित, सत्तारूपानें सारखा राहिलेला, असा आहे. तरी असें आत्मस्वरूप पक्कें जाणून शोक टाकून दे, आणि क्रिया कर. १०७ हे कुलनंदना ! पित्याचा देह तेलाच्या डोणींतून बाहेर काढ व सचिवांच्या आणि आमच्या साह्यानें यथाविधि क्रिया कर.' १०८ याप्रमाणें साक्षात् ( वसिष्ठ ) गुरूनें उपदेश केला असतां अज्ञानापासून उत्पन्न झालेल्या शोकाचा भरतानें त्याग केला, आणि विधीप्रमाणें ( पित्याची ) क्रिया केली. १०९ यथाविधि अग्निहोत्र[1] धारण करणाऱ्याचे क्रियासंस्कार जसे झाले पाहिजेत, तसेच गुरूंनीं सांगितल्याप्रमाणें पित्याच्या शवाचे सर्व संस्कार भरतानें यथाशास्त्र केले. ११० अकरावा दिवस प्राप्त झाला असतां, वेदप्रवीण अशा शेंकडो आणि हजारों ब्राह्मणांना त्यानें यथाविधि भोजन घातलें, १११ आणि पित्याला उद्देशून ब्राह्मणांना पुष्कळ द्रव्य, हजारों गाई, गांवें, रत्नें आणि वस्त्रें दिलीं. ११२ नंतर वसिष्ठ, बंधु—शत्रुघ्न, आणि मंत्रिमंडळी ह्यांसह रामाचें चिंतन करीत तो आपल्या घरीं राहिला. ११३ 'सीता आणि लक्ष्मण यांसह राम घोर वनाला गेला असतां प्रत्यक्ष राक्षसीणच की काय,

१. अग्निहोत्र—'अग्नये होत्रं—होमोऽस्मिन् कर्मणीति अग्निहोत्रम्.'॥

सद्य: । गच्छाम्यारण्यमद्य स्थिरमतिरखिलं दूरतोऽपास्य राज्यं रामं सीतासमेतं स्मितरुचिरमुखं नित्यमेवानुसेवे ॥ ११४ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अयोध्याकांडे सप्तमः सर्गः ॥ ७ ॥

## अयोध्याकांड, सर्ग आठवा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ वसिष्ठो मुनिभिः सार्धं मंत्रिभिः परिवारितः । राज्ञः सभां देवसभासन्निभामविशद्विभुः ॥ १ ॥ तत्रासने समासीनश्चतुर्मुख इवापरः । आनीय भरतं तत्र उपवेश्य सहानुजम् ॥ २ ॥ अब्रवीद्वचनं देशकालोचितमरिंदमम् । वत्स राज्येऽभिषेक्ष्यामस्त्वामद्य पितृशासनात् ॥ ३ ॥ कैकेय्या याचितं राज्यं त्वदर्थे पुरुषर्षभ । सत्यसंधो दशरथः प्रतिज्ञाय ददौ किल ॥ ४ ॥ अभिषेको भवत्वद्य

अशी आई दृष्टीस पडतांच माझ्या हृदयाचा दाह होतो; तरी हें सर्व राज्य दूर टाकून आजच वनास जावें, आणि स्थिरमतीनें सीतेसह शोभणाऱ्या सुहास्यवदन रामाचें नित्य सेवन करीत जावें', असा त्यानें विचार केला. ११४ "

**अयोध्याकांड, सर्ग सातवा समाप्त.**

श्रीमहादेव म्हणाला, " अनेक मुनि आणि मंत्रिजन यांस बरोबर घेऊन भगवान् वसिष्ठ ऋषि राजसभेंत आला. ही सभा देवसभेसारखी[1] वाटत असे. १ तेथें आसनावर बसलेला तो ( वसिष्ठ ) दुसरा चतुर्मुख—ब्रह्मदेवच—कीं काय, असा भास होत होता. त्याने कनिष्ठ बंधूसह भरताला आणवून ( जवळ ) बसविलें, २ आणि त्या शत्रुनिग्रही भरताला देश आणि काल यांना अनुसरून बोलला, 'वत्सा ! तुझ्या वडिलांच्या आज्ञेनुसार आम्ही तुला राज्याभिषेक करणार आहों. ३ हे पुरुषश्रेष्ठा ! तुझ्याकरितां कैकेयीनें राज्य मागून घेतलें आहे, आणि दशरथ राजा सत्यप्रतिज्ञ असल्यामुळें त्यानें तें प्रतिज्ञापूर्वक तुला दिलें आहे. ४ मनींकडून तुला आज

१ इंद्रसभा:—'विस्तीर्णा योजनशतं शतमध्यर्द्धमायता । वैहायसी कामगमा पंचयोजनमुच्छ्रिता' ॥—महाभारत २, ७.

मुनिभिर्मंत्रपूर्वकम् । तच्छ्रुत्वा भरतोऽप्याह मम राज्येन किं मुने ॥ ५ ॥
रामो राजाधिराजश्च वयं तस्यैव किंकराः । श्वः प्रभाते गमिष्यामो
राममानेतुमंजसा ॥६॥ अहं यूयं मातरश्च कैकेयीं राक्षसीं विना । हनिष्या-
म्यधुनैवाहं कैकेयीं मातृगंधिनीम् ॥ ७ ॥ किंतु मां नो रघुश्रेष्ठः स्त्रीहं-
तारं सहिष्यते । तच्छ्वोभूते गमिष्यामि पादचारेण दंडकान् ॥ ८ ॥
शत्रुघ्नसहितस्तूर्णं यूयमायांतु वा न वा । रामो यथा वने यातस्तथाऽहं
वल्कलांबरः ॥ ९ ॥ फलमूलकृताहारः शत्रुघ्नसहितो मुने । भूमिशायी जटा-
धारी यावद्रामो निवर्तते ॥१०॥ इति निश्चित्य भरतस्तूष्णीमेवावतस्थिवान् ।
साधु साध्विति तं सर्वे प्रशशंसुर्मुदान्विताः ॥ ११ ॥ ततः प्रभाते भरतं
गच्छन्तं सर्वसैनिकाः । अनुजग्मुः सुमंत्रेण नोदिताः साश्वकुंजराः ॥१२॥
कौसल्याद्या राजदारा वसिष्ठप्रमुखा द्विजाः । छादयंतो भुवं सर्वे पृष्ठतः

मंत्रपूर्वक अभिषेक होवो.' ते ऐकून भरत म्हणाला, 'मुने! मला राज्य घेऊन काय करावयाचें आहे? ५ राजाधिराज राम आहे, आम्ही त्याचे सेवक आहों. उद्या सकाळी रामाला आणण्याकरितां आपण ताबडतोब जाऊं या. ६ (त्यातही) मी, आपण, आणि त्या राक्षसिणी कैकेयीशिवाय सर्व माता मिळून (जाऊं या). कैकेयीवर मातृत्वाचा केवळ आळ आला आहे ती आई नव्हे. त्या कैके-यीला आतांच मी ठार मारावी, ७ परंतु रघुश्रेष्ठाला—रामाला—हें माझें स्त्रीहत्येचें कृत्य सहन होणार नाही. तरी उद्यांचा दिवस उजाडतांच मी पायी दंडकारण्याला जाणार आहें. ८ माझ्याबरोबर मी शत्रुघ्नाला नेणार आहें, आपण या अथवा येऊं नका. श्रीराम ज्याप्रमाणें वनाला गेला, त्याचप्रमाणें वल्कलांचीं वस्त्रें धारण करून (मी वनाला जाईन). ९ हे मुने! राम येईपर्यंत शत्रुघ्नासह फलमूलांवर निर्वाह करून मी भूमीवर शयन करीन, आणि जटा धारण करीन.' १० असा निश्चय करून भरत स्वस्थ बसला. (तें ऐकून) सर्वांनीं आनंदित होऊन 'उत्तम उत्तम' म्हणून त्याची प्रशंसा केली. ११ नंतर सकाळीं भरत निघाला असतां, घोडे आणि हत्ती यांसह सर्व सैनिक सुमंत्राच्या आज्ञेनें भरताच्या मागून निघाले. १२ कौसल्यादिक राजस्त्रिया आणि वसिष्ठप्रमुख सर्व ब्राह्मण आणि इतर सर्व जन, कोणी दोनी बाजूंनीं, कोणी पुढें, तर कोणी मागें, असे चालूं लागले.

पार्श्वतोऽग्रतः ॥ १३ ॥ शृंगवेरपुरं गत्वा गंगाकूले समंततः । उवास महती सेना शत्रुघ्नपरिचोदिता ॥ १४ ॥ आगतं भरतं श्रुत्वा गुहः शंकितमानसः । महत्या सेनया सार्धमागतो भरतः किल ॥ १५ ॥ पापं कर्तुं न वा याति रामस्याविदितात्मनः । गत्वा तद्धृदयं ज्ञेयं यदि शुद्धस्तरिष्यति ॥ १६ ॥ गंगां नोचेत्समाकृष्य नावस्तिष्ठंतु सायुधाः । ज्ञातयो मे समायत्ताः पश्यंतः सर्वतो दिशम् ॥ १७ ॥ इति सर्वान्समादिश्य गुहो भरतमागतः । उपायनानि संगृह्य विविधानि बहून्यपि ॥ १८ ॥ प्रययौ ज्ञातिभिः सार्धं बहुभिर्विविधायुधैः । निवेद्योपायनान्यग्रे भरतस्य समंततः ॥ १९ ॥ दृष्ट्वा भरतमासीनं सानुजं सह मंत्रिभिः । चीरांबरं घनश्यामं जटामुकुटधारिणम् ॥ २० ॥ राममेवानुशोचंतं

त्यामुळें सर्व पृथ्वी आच्छादून गेली. १३ शृंगवेरपुराला जाऊन तेथें गंगेच्या तीरावर सर्वत्र शत्रुघ्नाच्या आज्ञेनुसार ती मोठी सेना उतरली. १४ भरत आला आहे, असें ऐकून गुहाच्या मनांत शंका उत्पन्न झाली. हा भरत मोठ्या सैन्यानिशी आला आहे. १५ रामाला ज्याची कल्पनाही नाहीं, असा कांही दुष्ट हेतु मनांत धरून हा आला नसेल कशावरून ? आपण जाऊन त्याचा हेतु समजून घ्यावा. त्याचा हेतु शुद्ध असेल, तर तो ( गंगा उतरून ) पलीकडे जाईल. तसें नसेल, तर माझे ज्ञातिबांधवांनीं नावा नदींतून बाहेर काढाव्या, हातांत आयुधें घ्यावी, आणि सर्व दिशांवर नजर ठेवून सिद्ध राहावें.' १६,१७ अशी सर्वांना आज्ञा करून वेगवेगळया आयुधांनीं सज्ज अशा ज्ञातिजनांसह गुह भरताकडे आला. भरताकरितां नानाप्रकारचीं उपायनें-नजराणे-त्यानें बरोबर आणिलीं होती. ती त्यानें भरताच्या पुढें अर्पण केली आणि पाहिलें तों कनिष्ठ बंधु आणि मंत्रिजन यांसह भरत बसलेला आहे, त्यानें वस्त्रांऐवजीं वल्कलें परिधान केली आहेत, आणि मस्तकीं जटांचा मुकुट धारण केला आहे, असें त्याच्या दृष्टीस

१. गुहाच्या साशंक मनःस्थितीबरोबरच त्याची परम रामभक्ति एकनाथानीं दाखविली आहे.—' श्रीराम माझा मातापिता । श्रीराम माझा सुहृद् भ्राता । श्रीराम सद्गुरु निजात्मता । श्रीराम तत्त्वतां आत्मा माझा ॥ त्याचा करावया घात । सैन्येसीं जातो भरत । त्याचा करीन मी निःपात । श्रीरामभक्त तैं सत्य ॥ श्रीरामाचा मी मेटकरी । ठेविला आहे गंगातीरीं । भरत येवोनि कैसेपरी । परतीरीं उतरेल ' ॥—भा. रामायण, अयो. १२.

राम रामेति वादिनम्। ननाम शिरसा भूमौ गुहोऽहमिति चाब्रवीत्॥२१॥
शीघ्रमुत्थाप्य भरतो गाढमालिंग्य सादरम्। पृष्ट्वाऽनामयमव्यग्रः सखा-
यमिदमब्रवीत्॥ २२॥ भ्रातस्त्वं राघवेणात्र समेतः समवस्थितः।
रामेणालिंगितः सार्द्रनयनेनामलात्मना॥२३॥ धन्योऽसि कृतकृत्योऽसि
यत्त्वया परिभाषितः। रामो राजीवपत्राक्षो लक्ष्मणेन च सीतया
॥ २४॥ यत्र रामस्त्वया दृष्टस्तत्र मां नय सुव्रत। सीतया सहितो
यत्र सुप्तस्तद्दर्शयस्व मे॥ २५॥ त्वं रामस्य प्रियतमो भक्तिमानसि
भाग्यवान्। इति संस्मृत्य संस्मृत्य रामं साश्रुविलोचनः॥ २६॥
गुहेन सहितस्तत्र यत्र रामः स्थितो निशि। ययौ ददर्श शयनस्थलं
कुशसमास्तृतम्॥ २७॥ सीताभरणसंलग्नस्वर्णबिंदुभिराश्चितम्। दुःख-
संतप्तहृदयो भरतः पर्यदेवयत्॥ २८॥ अहोऽतिसुकुमारी या सीता

पडलें. १८,१९,२० तो रामाबद्दल शोक करीत असून तोंडानें 'राम, राम' असा जप करीत होता. (हें पाहून) गुहानें त्याला साष्टांग नमस्कार घातला, आणि 'मी गुह आहें,' असें सांगितलें. २१ भरतानें गुहाला तावडतोब उठविलें, आदरपूर्वक गाढ आलिंगन दिलें, आणि खुशाली विचारली. गुहाला मित्र समजून अव्यग्र मनानें भरत बोलला, २२ 'बंधो! रामाच्या भेटीचा लाभ तुला होऊन तूं त्यासह येथें राहत आहेस; त्या निर्मलांतःकरण रामाच्या प्रेमाश्रुयुक्त आलिंगनास तूं पात्र झाला आहेस; २३ तूं धन्य आहेस, तूं कृतकृत्य आहेस, कारण सीता आणि लक्ष्मण यांसह कमलनयन रामाशीं तुझें भाषण झालें आहे. हे सुव्रता (गुहा)! 'ज्या ठिकाणीं रामाची तुझी भेट झाली, त्या ठिकाणी मला ने, सीतेसहित ज्या ठिकाणीं रामानें शयन केलें, तें ठिकाण मला दाखीव. २४,२५ तूं रामाचा अत्यंत प्रियकर असा भक्त आहेस, म्हणून तूं भाग्यवान् आहेस.' अशा प्रकारें वरचेवर रामाचें स्मरण चाललें आहे, नेत्रांतून सारखे अश्रू गळत आहेत, २६ अशा स्थितींत रामचंद्र ज्या स्थळीं रात्रौ राहिला होता, तेथें गुहाबरोबर भरत गेला, आणि दर्भ पसरून तयार केलेलें रामाचें शयनस्थळ त्यानें तेथें पाहिलें. २७ सीतेच्या अंगावरील सुवर्ण भूषणांच्या संघर्षणानें त्या शय्येवर सुवर्णचिह्नें उमटलेलीं दिसत होतीं, (तीं पाहून) भरताचें मन दुःखानें व्याकुळ झालें आणि त्यानें शोक केला. २८

जनकनंदिनी । प्रासादे रत्नपर्यंके कोमलास्तरणे शुभे ॥ २९ ॥ रामेण सहिता शेते सा कथं कुशविष्टरे । सीता रामेण सहिता दुःखेन मम दोषतः ॥ ३० ॥ धिङ् मां जातोऽस्मि कैकेय्यां पापराशिसमानतः । मन्निमित्तमिदं क्लेशं रामस्य परमात्मनः ॥ ३१ ॥ अहोऽतिसफलं जन्म लक्ष्मणस्य महात्मनः । राममेव सदाऽन्वेति वनस्थमपि हृष्टधीः ॥ ३२ ॥ अहं रामस्य दासा ये तेषां दासस्य किंकरः । यदि स्यां सफलं जन्म मम भूयान्न संशयः ॥ ३३ ॥ भ्रातर्जानासि यदि तत्कथयस्व ममाखिलम् । यत्र तिष्ठति तत्राहं गच्छाम्यानेतुमंजसा ॥ ३४ ॥ गुहस्तं शुद्धहृदयं ज्ञात्वा सस्नेहमब्रवीत् । देव त्वमेव धन्योऽसि यस्य ते भक्तिरीदृशी ॥ ३५ ॥ रामे राजीवपत्राक्षे सीतायां लक्ष्मणे तथा । चित्रकूटाद्रिनिकटे मंदाकिन्याविदूरतः ॥ ३६ ॥ मुनीनामाश्रमपदे रामस्तिष्ठति सानुजः । जानक्या सहितो नंदात्सुखमास्ते किल प्रभुः

( तो म्हणाला, ) ' अहो ! जी अतिसुकुमार जनककन्या सीता राजवाड्यांत रत्नपर्यंकावर उत्तम मृदुशय्येवर रामासहवर्तमान शयन करावयाची, त्याच सीतेला माझ्या दोषामुळें रामासह दर्भांच्या आसनावर झोंपण्याचा प्रसंग यावा ना ? २९,३० मला धिक्कार असो ! केवळ पापाची राशिच, अशा कैकेयीच्या पोटीं मी जन्म घेतला आहे ! परमात्म रामाला हें सर्व मजकरितां सोसावें लागत आहे. ३१ अहाहा ! महाभाग लक्ष्मणानें जन्माचें सार्थक केलें. तो वनवासांतही रामामागून आनंदानें फिरत आहे. ३२ रामाचे जे दास आहेत, त्यांच्या दासांचा दास होईन, तर माझ्या जन्माचें साफल्य होईल, यांत संशय नाहीं. ३३ बंधो ! तुला ठाऊक असेल, तर सर्व कांहीं मला सांग. तो ( राम ) कोठें आहे ? तेथें त्याला आणण्याकरितां मी लवकर जातों'. ३४ भरताचें अंतःकरण शुद्ध आहे, हें जाणून गुह त्याला स्नेहपूर्वक म्हणाला, ' राजा ( भरता ) ! तूंच एक खरा धन्य, की ज्या तुझी अशा प्रकारची भक्ति कमलनयन रामावर, सीतेवर आणि लक्ष्मणावर आहे. चित्रकूट[1] पर्वताच्या जवळ, मंदाकिनीपासून[2] फार दूर नाहीं, अशा ठिकाणीं ३५,३६ मुनींच्या आश्रमांत कनिष्ठ बंधु ( लक्ष्मण ) आणि जानकी यांसहित श्रीराम राहत आहे. तेथें सर्व प्रकारचे आनंदजनक गोष्टीची विपुलता असल्यामुळें तो सुखानें राहात

१ हा पर्वत प्रयागापासून दहा कोसाच्या अंतरावर आहे. याच्या उत्तरेला मंदाकिनी नदी आहे. २ मंदाकिनी—गंगा ( ' मंदाकिनी वियद्गंगा ' ).

॥ ३७ ॥ तत्र गच्छामहे शीघ्रं गंगां ततुमिहार्हसि । इत्युक्त्वा त्वरितं गत्वा नावः पंचशतानि ह ॥ ३८ ॥ समानयत्ससैन्यस्य तर्तुं गंगां महानदीम् । स्वयमेवानिनायैकां राजनावं गुहस्तदा ॥ ३९ ॥ आरोप्य भरतं तत्र शत्रुघ्नं राममातरम् । वसिष्ठं च तथान्यत्र कैकेयीं चान्ययोषितः ॥ ४० ॥ तीर्त्वा गंगां ययौ शीघ्रं भरद्वाजाश्रमं प्रति । दूरे स्थाप्य महासैन्यं भरतः सानुजो ययौ ॥ ४१ ॥ आश्रमे मुनिमासीनं ज्वलंतमिव पावकम् । दृष्ट्वा ननाम भरतः साष्टांगमतिभक्तितः ॥ ४२ ॥ ज्ञात्वा दाशरथिं प्रीत्या पूजयामास मौनिराट् । पप्रच्छ कुशलं दृष्ट्वा जटावल्कलधारिणम् ॥ ४३ ॥ राज्यं प्रशासतस्तेऽत्र किमेतद्वल्कलादिकम् । आगतोऽसि किमर्थं त्वं विपिनं मुनिसेवितम् ॥४४॥ भरद्वाजवचः श्रुत्वा भरतः साश्रलोचनः। सर्वं जानासि भगवन् सर्वभूताशयस्थितः॥ ४५॥

आहे. ३७ तेथें आपण लवकर जाऊं या. आधी तुम्ही गंगा ओलांडून पलीकडे जाव. असें बोलून त्यानें—गुहानें—ती महानदी गंगा सैन्यासह ( भरताला ) उतरून जाता यावी, म्हणून पांचशें नावा आणविल्या. त्या वेळी भरताकरितां एक राजनौका—उत्तम नौका—गुहानें स्वतः आणिली होती. ३८, ३९ तींत भरताला, शत्रुघ्नाला, राममातेला—कौसल्येला—आणि वसिष्ठाला त्यानें बसविलें. तसेंच दुसऱ्या एका नौकेंत कैकेयीला व दुसऱ्या स्त्रियांना बसविलें. ४० गंगा उतरून गेल्यावर तो भरत लवकरच भरद्वाजाश्रमाला पोंचला. आपल्या महासैन्याला दूर ठेवून कनिष्ठ बंधूसहित भरत आंत—आश्रमांत—गेला. ४१ प्रदीप्त अग्निच की काय, अशा त्या ( भरद्वाज ) मुनीला आश्रमांत बसलेला पाहून, भरतानें अतिभक्तिपूर्वक त्याला साष्टांग नमस्कार घातला. ४२ हा दशरथपुत्र भरत आहे, असें जाणून त्या मुनिश्रेष्ठानें त्याचें आदरातिथ्य केलें, आणि शरीरावरील जटा आणि वल्कलें पाहून कुशलप्रश्नपूर्वक विचारिलें, ४३ ‘ तूं राज्य चालवीत असतां ही वल्कलें वगैरे कशाकरितां धारण केली आहेस ? मुनिजनानी आश्रय केलेल्या अरण्यामध्यें तूं काय योजून आला आहेस ? ’ ४४ भरद्वाजाचें भाषण ऐकून भरताच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले तो म्हणाला, ‘ भगवन् ! आपण सर्व प्राण्याच्या अंतरी वास करीत असल्यामुळें आपणाला सर्व ठाऊक आहेच. ४५

तथापि पृच्छसे किंचित्तदनुग्रह एव मे । कैकेय्या यत्कृतं कर्म रामराज्यविघातनम् ॥ ४६ ॥ वनवासादिकं वापि नहि जानामि किंचन । भवत्पादयुगं मेऽद्य प्रमाणं मुनिसत्तम ॥ ४७ ॥ इत्युक्त्वा पादयुगलं मुनेः स्पृष्ट्वार्तमानसः । ज्ञातुमर्हसि मां देव शुद्धो वाशुद्ध एव वा ॥ ४८ ॥ मम राज्येन किं स्वामिन् रामे तिष्ठति राजनि । किंकरोऽहं मुनिश्रेष्ठ रामचंद्रस्य शाश्वतः ॥ ४९ ॥ अतो गत्वा मुनिश्रेष्ठ रामस्य चरणांतिके । पतित्वा राज्यसंभारान्समर्प्यात्रैव राघवम् ॥५०॥ अभिषेक्ष्ये वसिष्ठाद्यैः पौरजानपदैः सह । नेष्येऽयोध्यां रमानाथं दासः सेवेऽतिनीचवत् ॥ ५१ ॥ इत्युदीरितमाकर्ण्य भरतस्य वचो मुनिः । आलिंग्य मूर्ध्न्यवघ्राय प्रशशंस सविस्मयः ॥ ५२ ॥ वत्स ज्ञातं पुरैवैतद्भविष्यं ज्ञानचक्षुषा । मा शुचस्त्वं परो भक्तः श्रीरामे लक्ष्मणादपि

असें असून ज्या अर्थी आपण मला हे विचारांत आहां, त्या अर्थी तो मजवर अनुग्रहच होय. रामाच्या राज्यप्राप्तीस विघ्न आणण्यासाठी कैकेयीनें जें जें कांहीं कर्म केलें, तें अगर त्याचा वनवास, ह्यांसंबंधी मला कांहींएक माहिती नाही. हे मुनिसत्तमा ! ह्याबद्दल मी आपल्या चरणद्वयाची शपथ वाहतों.' ४६,४७ असें बोलून मुनीच्या दोनी चरणांना स्पर्श करून दुःखित अंतःकरणानें तो ( म्हणाला ), ' देवा ! मी शुद्ध आहें, किंवा अशुद्ध आहें, हें आपण समजून घ्यावें ४८ राम राजा असतां मला राज्य काय करावयाचें आहे ? मी तर रामचंद्राचा नित्याचा सेवक आहें. ४९ म्हणून हे मुनिश्रेष्ठा ! मी रामाजवळ जाऊन त्याच्या पायांवर लोळण घेईन, आणि सर्व राज्यभार त्याला अर्पण करून येथेंच वसिष्ठादि मुनि, नगरवासी जन आणि देशोदेशींचे लोक ह्यांसह त्याला अभिषेक करीन, आणि नंतर त्या रमानाथाला-रामाला-अयोध्येला नेईन, आणि त्याचा दास होऊन नम्रभावें सेवा करीन.' ५०,५१ हे भरताचे तोंडून निघालेले शब्द ऐकून भरद्वाजानें त्याला आलिंगन दिलें, मस्तकाचे ठिकाणी अवघ्राण[1] केलें आणि आश्चर्यपूर्वक ( भरताची ) प्रशंसा केली. ५२ तो म्हणाला, ' वत्सा ! हें भविष्य मीं पूर्वींच ज्ञानदृष्टीनें जाणिलें आहे. तूं खेद करूं नकोस. तुझी रामाचे ठिकाणीं लक्ष्मणापेक्षांही

१. मांगल्यसूचक आशीर्वादात्मक मस्तकाचे ठिकाणीं हुंगणे.

॥ ५३ ॥ आतिथ्यं कर्तुमिच्छामि ससैन्यस्य तवानघ । अद्य भुक्त्वा ससैन्यस्त्वं श्वो गंता रामसन्निधिम् ॥ ५४ ॥ यथाज्ञापयति भवांस्तथेति भरतोऽब्रवीत् । भरद्वाजस्त्वपः स्पृष्ट्वा मौनी होमगृहे स्थितः ॥ ५५ ॥ दध्यौ कामदुघां कामवर्षिणीं कामदो मुनिः । असृजत्कामधुक् सर्वं यथाकाममलौकिकम् ॥ ५६ ॥ भरतस्य ससैन्यस्य यथेष्टं च मनोरथम् । यथा ववर्ष सकलं तृप्तास्ते सर्वसैनिकाः ॥ ५७ ॥ वसिष्ठं पूजयित्वाग्रे शास्त्रदृष्टेन कर्मणा । पश्चात्ससैन्यं भरतं तर्पयामास योगिराट् ॥ ५८ ॥ उषित्वा दिनमेकं तु आश्रमे स्वर्गसन्निभे । अभिवाद्य पुनः प्रातर्भरद्वाजं सहानुजः । भरतस्तु कृतानुज्ञः प्रययौ रामसन्निधिम् ॥ ५९ ॥ चित्रकूटमनुप्राप्य दूरे संस्थाप्य सैनिकान् । रामसंदर्शनाकांक्षी प्रययौ भरतः स्वयम ॥ ६० ॥ शत्रुघ्नेन सुमंत्रेण

अधिक भक्ति आहे. ५३ हे निष्पापा ! सर्व सैन्यासह तुझें आतिथ्य करण्याची माझी इच्छा आहे. आज सैन्यासमवेत येथें भोजन करून उद्यां तूं रामाजवळ जावें.' ५४ 'जशी आपली आज्ञा असेल तसें' असें भरत म्हणाला. पुढें भरद्वाज मुनीनें उदकस्पर्श[1] केला आणि मौन धारण करून तो होमशाळेंत[2] बसला. ५५ तेथें (जनांच्या) इच्छा परिपूर्ण करणाऱ्या (भरद्वाज) मुनीनें इष्टार्थ पुरविणाऱ्या कामधेनूचें ध्यान केलें. तेव्हां कामधेनूनें त्या सर्व जनसमुदायाच्या इच्छेनुसार अनेक उत्तमोत्तम पदार्थ निर्माण केले. ५६ भरताला आणि त्याच्या सैन्याला जे जे पदार्थ इष्ट होते, त्यांची त्या कामधेनूनें यथेच्छ वृष्टि केली; तेणेंकरून ते सर्व सैनिक संतुष्ट झाले. ५७ त्या योगिश्रेष्ठ भरद्वाजानें शास्त्रोक्त विधीनें अगोदर वसिष्ठाचें पूजन केलें, आणि नंतर सर्व सैन्यासह भरताचें आतिथ्य करून त्याला संतुष्ट केलें. ५८ त्या स्वर्गसदृश[3] आश्रमांत एक दिवस राहून दुसरे दिवशीं सकाळी भरतानें कनिष्ठ बंधूसह पुनः भरद्वाजाला वंदन केलें, आणि त्याची अनुज्ञा—परवानगी—घेऊन रामाकडे जाण्याला तो निघाला. ५९ चित्रकूट पर्वत जवळ येतांच सैनिकांना लांब ठेवून, रामदर्शनाची इच्छा धरून भरत एकटाच पुढें चालला. ६०, शत्रुघ्न, सुमंत्र आणि

१. आचमन केलें. २. यज्ञ किंवा होम करण्याची जागा. ३. स्वर्ग—इंद्राचे सुखमंदिर. हा सूर्य आणि ध्रुव यामधील प्रदेश होय

गुहेन च परंतपः । तपस्विमंडलं सर्वं विचिन्वानो न्यवर्तत ॥ ६१ ॥
अदृष्ट्वा रामभवनमपृच्छदृषिमंडलम् । कुत्रास्ते सीतया सार्धं लक्ष्म-
णेन रघूत्तमः ॥ ६२ ॥ ऊचुरग्रे गिरेः पश्चाद्गंगाया उत्तरे तटे । विविक्तं
रामसदनं रम्यं काननमंडितम् ॥ ६३ ॥ सफलैराम्रपनसैः कदलीखं-
डसंवृतम् । चंपकैः कोविदारैश्च पुन्नागैर्विपुलैस्तथा ॥ ६४ ॥ एवं दर्शि-
तमालोक्य मुनिभिर्भरतोऽग्रतः । हर्षाद्ययौ रघुश्रेष्ठभवनं मंत्रिणा सह
॥ ६५ ॥ ददर्श दूरादतिभासुरं शुभं रामस्य गेहं मुनिवृंदसेवितम् ।
वृक्षाग्रसंलग्नसुवल्कलाजिनं रामाभिरामं भरतः सहानुजः ॥ ६६ ॥ इति
श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अयोध्याकांडेऽष्टमः सर्गः ॥ ८ ॥

गुह याना बरोबर घेऊन त्या परंतप–शत्रूंस ताप देणाऱ्या–भरतानें सर्व तपस्व्यांची स्थानें शोधिली, ( परंतु रामाचा पत्ता कोठेंच लागला नाही ). रामाच्या शोधाकरितां इतर सर्व उद्योग त्यानें सोडून दिले. ६१ रामाचें वसतिस्थान न सांपडल्यामुळें त्यानें तेथील ऋषिजनांना विचारिलें, ' सीता आणि लक्ष्मण यासह रघुश्रेष्ठ श्रीराम कोठें राहत आहे ? ' ६२ त्यावर ते म्हणाले, ' तुझ्या अग्रभागी असणाऱ्या पर्वताच्या पाठीमागच्या बाजूला गंगेच्या उत्तरकडील तीरावर एकांतभागी सुंदर अरण्यानें सुशोभित असें रामाचें मंदिर आहे. ६३ त्या मंदिरासभोंवती फलयुक्त आम्र आणि पनसवृक्ष आहेत. केळींचीं अनेक बनें आहेत; तसेच चांफे, कोविदार[1], पुन्नाग[2] असे अनेक वृक्ष आहेत. ६४ अशा प्रकारें त्या मुनींनी खुणा सांगितल्यावर ( सुमंत्र ) प्रधानास बरोबर घेऊन आनंदित अंतःकरणानें भरत पुढें रामभवनाकडे जाण्यास निघाला. ६५ तोंच दुरून अत्यंत तेजस्वी, कल्याणप्रद आणि मुनिजनवेष्टित असें रामाचें गृह कनिष्ठ बंधूसह भरताच्या दृष्टीस पडलें. तेथें वृक्षांच्या अग्रांवर उत्तम वल्कलें आणि अजिनें[3]–कृष्णाजिनें–वाळत घातली असून रामाच्या राहण्यानें त्या स्थळाला विशेषच शोभा आली होती. ६६ ”

**अयोध्याकांड, सर्ग आठवा समाप्त.**

१. असाण्याचा वृक्ष. २. एक सुगंधी पुष्पवृक्ष. ३. अजिन–हरिणचर्म.

## अयोध्याकांड, सर्ग नववा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ ॥ अथ गत्वाश्रमपदसमीपं भरतो मुदा । सीतारामपदैर्युक्तं पवित्रमतिशोभनम् ॥ १ ॥ स तत्र वज्रांकुशवारिजांचितध्वजादिचिह्नानि पदानि सर्वतः । ददर्श रामस्य भुवोऽतिमंगलान्यचेष्टयत्पादरजःसु सानुजः ॥ २ ॥ अहो सुधन्योऽहममूनि रामपादारविंदांकितभूतलानि । पश्यामि यत्पादरजो विमृग्यं ब्रह्मादिदेवैः श्रुतिभिश्च नित्यम् ॥ ३ ॥ इत्यद्भुतप्रेमरसाप्लुताशयो विगाढचेता रघुनाथभावने । आनंदजाश्रुस्नापितस्तनांतरः शनैरवापाश्रमसन्निधिं हरेः ॥ ४ ॥ स तत्र दृष्ट्वा रघुनाथमास्थितं दूर्वादलश्यामलमायतेक्षणम् ।

श्रीमहादेव म्हणाला, "नंतर भरत त्या रामाच्या आश्रमाजवळ आनंदानें गेला. ( ठिकठिकाणी ) सीता आणि राम यांच्या पावलांनीं तें आश्रमस्थान चिन्हित झाल्याकारणानें त्यास विशेषच पवित्रता व शोभा आली होती १ तेथें वज्र, अंकुश, कमल, ध्वजादिकांनीं अंकित अशी श्रीरामाची पावलें सर्वत्र उमटलेली भरताच्या दृष्टीस पडली. त्या पावलांवरून त्या भूमिभागाला मांगल्य आलें होतें. अशा त्या श्रीरामाच्या पायधुळींत कनिष्ठ बंधूसहित भरत लोळला. २ ( तो म्हणाला, ) 'अहो! मी मोठा धन्य आहें कीं, ब्रह्मादि देव आणि वेद ज्याच्या पादरजाचा सदैव शोध करीत असतात, त्या श्रीरामाच्या पदकमलांनीं चिह्नित अशा ह्या भूमिभागांचें मला दर्शन होत आहे.' ३ अशा प्रकारें अद्भुत प्रेमरसांत भरताचें अंतःकरण निमग्न होऊन श्रीरघुनाथाच्या चिंतनांत त्याची मनोवृत्ति रंगून गेली; त्याच्या डोळ्यांतून सारखे आनंदाश्रू वाहूं लागून त्यांयोगें त्याचें वक्षःस्थल भिजून गेलें. अशा स्थितींत तो रामाच्या आश्रमाजवळ येऊन पोंचला. ४ तेथें बसलेल्या रामाला भरतानें पाहिलें. त्या रामाची शरीरकांति दूर्वादलाप्रमाणें श्यामवर्णाची होती, त्याचे नेत्र दीर्घ

१. वज्र, अंकुश, कमल, ध्वज हीं सार्वभौमत्वाचीं चिन्हें रामाच्या चरणतलावर स्वाभाविकच असल्यामुळें अर्थातच तीं त्या भूप्रदेशावर उमटलीं होतीं. समानार्थक श्लोक –'संचिंतयेद् भगवतश्चरणारविंदं वज्रांकुशध्वजसरोरुहलांछनाढ्यम्' ॥–ब्रह्मस्तुति, भागवत (२) 'ध्यावें बरें हरिचिया पदपंकजातें, वज्रांकुशध्वजसरोरुह अंक ज्यातें.' ॥–वामनी भाषांतर

जटाकिरीटं नववल्कलांबरं प्रसन्नवक्त्रं तरुणारुणद्युतिम् ॥ ५ ॥
विलोकयंतं जनकात्मजां शुभां सौमित्रिणा सेवितपादपंकजम् ।
तदाभिदुद्राव रघूत्तमं शुचा हर्षाच्च तत्पादयुगं त्वराग्रहीत् ॥ ६ ॥
रामस्तमाकृष्य सुदीर्घबाहुर्दोर्भ्यां परिष्वज्य सिषिंच नेत्रजैः । जलै-
रथांकोपरि संन्यवेशयत्पुनः पुनः संपरिषस्वजे विभुः ॥ ७ ॥
अथ ता मातरः सर्वाः समाजग्मुस्त्वरान्विताः । राघवं द्रष्टु-
कामास्तास्तृषार्ता गौर्यथा जलम् ॥ ८ ॥ रामः स्वमातरं वीक्ष्य द्रुतमु-
त्थाय पादयोः । ववंदे साश्रु सा पुत्रमालिंग्यातीव दुःखिता ॥ ९ ॥
इतराश्च तथा नत्वा जननी रघुनंदनः । ततः समागतं दृष्ट्वा वसिष्ठं मुनि-
पुंगवम् ॥ १० ॥ साष्टांगं प्रणिपत्याह धन्योऽस्मीति पुनः पुनः ।
यथार्हमुपवेश्याह सर्वानेव रघूद्वहः ॥ ११ ॥ पिता मे कुशली किं वा

होते; त्यानें मस्तकावर जटांचा मुकुट धारण केला होता, त्यानें नवीन वल्कलांचीं वस्त्रें परिधान केलीं होतीं; त्याचें मुख प्रसन्न दिसत होतें; त्याची प्रभा बालसूर्याप्रमाणें भासत होती. ५ रामाची नजर सुलक्षण जानकीवर लागून राहिली असून, लक्ष्मण त्याच्या पदकमलांची सेवा करीत होता. अशा वेळीं हर्ष आणि शोक हे दोनीही विकार मनांत उद्भवून भरत धांवत गेला, आणि रामाचे दोनी पाय त्यानें धरिले. ६ आजानुबाहु रामानें आपल्या बाहूंनीं ( भरताला ) जवळ ओढिलें, त्याला आलिंगन दिलें, आणि आपल्या नेत्रोदकांनी–हर्षाश्रूंनी–त्याला अभिषेक केला. नंतर त्या प्रभु रामचंद्रानें त्याला मांडीवर बसविलें आणि वारंवार पोटाशीं कवटाळून धरिलें. ७ इतक्यांत, तहानेनें व्याकुळ झालेली गाय जलाकरितां धांवून येते, त्याप्रमाणें त्या सर्व राममाता त्वरा करून रामाला भेटायाला आल्या. ८ आपली माता–कौसल्या–दृष्टीस पडतांच राम तावडतोब उठला, आणि डोळ्यांत आंसवें आणून तिच्या चरणांवर त्यानें वंदन केलें. कौसल्येनें पुत्राला आलिंगन दिलें ( रामाला पाहून ) तिला अत्यंत दुःख झालें. ९ रघुनंदन रामानें इतरही मातांना तसेंच वंदन केलें. नंतर मुनिश्रेष्ठ वसिष्ठ आल्याचें पाहून, १० रामानें त्याला साष्टांग नमस्कार केला, व 'मी आज धन्य झालों,' असें वारंवार बोलून दाखवून त्या रघुश्रेष्ठ रामचंद्रानें सर्वांना यथायोग्य आसनांवर बसविलें आणि विचारिलें. ११ 'माझे बाबा खुशाल आहेत ना ?

1. गुडघ्यापर्यंत हात पोंचत आहेत असा. हें वीरत्वाचें चिह्न समजतात.

**मां किमाहातिदुःखितः । वसिष्ठस्तमुवाचेदं पिता ते रघुनंदन ॥ १२ ॥ त्वद्वियोगाभितप्तात्मा त्वामेव परिचिंतयन् । राम रामेति सीतेति लक्ष्मणेति ममार ह ॥ १३ ॥ श्रुत्वा तत्कर्णशूलाभं गुरोर्वचनमंजसा । हा हतोऽस्मीति पतितो रुदन् रामः सलक्ष्मणः ॥ १४ ॥ ततोऽनुरुरुदुः सर्वा मातरश्च तथापरे । हा तात मां परित्यज्य क्व गतोऽसि घृणाकर ॥ १५ ॥ अनाथोऽस्मि महाबाहो मां को वा लालयेदितः । सीता च लक्ष्मणश्चैव विलेपतुरतो भृशम् ॥ १६ ॥ वसिष्ठः शांतवचनैः शमयामास तां शुचम् । ततो मंदाकिनीं गत्वा स्नात्वा ते वीतकल्मषाः॥१७॥ राज्ञे ददुर्जलं तत्र सर्वे ते जलकांक्षिणे । पिंडान्निर्वापयामास रामो लक्ष्मणसंयुतः ॥ १८ ॥ इंगुदीफलपिण्याकरचितान्मधुसंप्लुतान् । वयं**

माझ्याकरितां दुःखांत पडलेल्या बाबांनी मला काय सांगितलें आहे ? ' यावर वसिष्ठ म्हणाला, ' हे रघुनंदना ! तुझ्या वियोगानें दुःखसतप्त झालेल्या तुझ्या पित्यानें तुझेंच चिंतन करीत आणि ' हा रामा ! हा रामा ! हा सीते ! हा लक्ष्मणा ' ! असें ( तुमचेंच ) स्मरण करीत प्राण ठेवला. ' १२।१३ त्या गुरूचें-वसिष्ठाचें-हें कर्णशूलासारखें भाषण ऐकून ' हायहाय ! घात झाला ! ' असें म्हणत तत्काळ राम रडत जमिनीवर पडला. लक्ष्मणाचीही तीच स्थिति झाली. १४ तें पाहून सर्व माता आणि इतरही मंडळी रडूं लागली. 'हा ताता ! हा दयाळो ! मला टाकून आपण कोठें गेलां ? १५ मी अनाथ झालों ! महाबाहो ! यापुढें माझें लालन कोण बरें करणार' ? ( असा रामानें विलाप केला. ) सीता आणि लक्ष्मण यांनी तर अधिकच विलाप केला.१६ वसिष्ठानें शांत भाषणांनी त्या शोकाचें सांत्वन केलें. नंतर ती सर्व मंडळी मंदाकिनीवर-गंगेवर जाऊन शुद्ध झाली १७ तेथें जलाची इच्छा करीत असणाऱ्या त्या राजाला-दशरथाला-सर्वांनीं उदक दिलें. पुढें राम व लक्ष्मण यांनी पिंडदान केलें. १८ इंगुदीफळांच्या पिठाचे ते पिंड केले असून मधानें

१. समानार्थक वर्णन -' हा राम ' रामानुज ' हा हा वैदेहि तपस्विनि ! न मा जानीथ दुःखेन म्रियमाणमनाथवत् ' ।-वा. रामायण, अयो. सर्ग ५९. २ कानातील रोगासारखें. ३. गंगानदी ही सर्वांत श्रेष्ठ तीर्थ मानिलें आहे. तिचें पाणी शुद्ध व रोगपरिहारक आहे असेंही शास्त्रीय शोधानीं ठरलें आहे. उत्तर हिंदुस्थानात गंगेला मा-आई-म्हणत असतात. ४. हिंगणबेटाच्या पिठाचे.

यदन्नाः पितरस्तदन्नाः स्मृतिनोदिताः ॥ १९ ॥ इति दुःखाश्रुपूर्णाक्षः पुनः स्नात्वा गृहं ययौ । सर्वे रुदित्वा सुचिरं स्नात्वा जग्मुस्तथाश्रमम् ॥ २० ॥ तस्मिंस्तु दिवसे सर्वे उपवासं प्रचक्रिरे । ततः परेद्युर्विमले स्नात्वा मंदाकिनीजले ॥ २१ ॥ उपविष्टं समागम्य भरतो राममब्रवीत् । राम राम महाभाग स्वात्मानमभिषेचय ॥ २२ ॥ राज्यं पालय पित्र्यं ते ज्येष्ठस्त्वं मे पिता तथा । क्षत्रियाणामयं धर्मो यत्प्रजापरिपालनम् ॥ २३ ॥ इष्ट्वा यज्ञैर्बहुविधैः पुत्रानुत्पाद्य तंतवे । राज्ये पुत्रं समारोप्य गमिष्यसि ततो वनम् ॥ २४ ॥ इदानीं वनवासस्य कालो नैव प्रसीद मे । मातुर्मे दुष्कृतं किंचित्स्मर्तुं नार्हसि पाहि नः ॥ २५ ॥ इत्युक्त्वा चरणौ भ्रातुः शिरस्याधाय भक्तितः । रामस्य पुरतः साक्षाद्दंडवत्पतितो भुवि ॥ २६ ॥ उत्थाप्य राघवः शीघ्रमारोप्यांकेऽतिभक्तितः । उवाच

भिजविले होते. कारण जें अन्न आम्ही खातों, तेंच पितरांचेंही अन्न होय, असें स्मृतीत सांगितलें आहे. १९ पुढें दुःखाश्रूंनी डोळे भरून गेले आहेत, अशा स्थितीत रामानें पुनः स्नान केलें आणि तो गृहाला आला. इतर जनांनीही बराच वेळ शोक करून मग ते सर्व आश्रमाला आले. २० त्या दिवशीं सर्वांनीं उपवास केला. नंतर दुसऱ्या दिवशीं गंगेच्या निर्मल उदकांत स्नान करून राम बसला असतां भरत त्याच्या जवळ गेला आणि त्याला म्हणाला, 'रामा ! महाभागा रामा ! तूं आपणाला अभिषेक करून घे. २१,२२ पितृपरंपरेनें मिळालेल्या राज्याचें पालन कर. तूं ज्येष्ठ ( बंधु ) असल्यामुळे मला पित्याचे ठिकाणी आहेस. प्रजांचें परिपालन करणें हाच क्षत्रियांचा धर्म होय. २३ नाना प्रकारचे यज्ञ करून, वंशवृद्ध्यर्थ पुत्रोत्पत्ति करून, आणि नंतर पुत्राला राज्यावर बसवून मग तूं वनाला जावें. २४ सध्यां वनवासाला जाण्याचे तुझे दिवस नाहींत. मजवर दया कर. माझे आईचें दुष्कृत्य यत्किंचित्‌ही तूं मनांत आणूं नये. ( रामा ! ) आमचें रक्षण कर.' २५ असें म्हणून भरतानें भावाचे ( रामाचे ) चरण भक्तिपूर्वक मस्तकीं धारण केले, आणि साक्षात् रामाच्या पूढें भूमीवर त्यानें साष्टांग नमस्कार घातला. २६ रामानें भरताला तत्काल उठविलें आणि आपल्या मांडीवर बसविलें; त्याची भक्ति पाहून रामाच्या डोळ्यांत प्रेमाश्रू आले; त्यानें हळूहळू भाषण

भरतं रामः स्नेहार्द्रनयनः शनैः ॥ २७ ॥ शृणु वत्स प्रवक्ष्यामि त्वयोक्तं यत्तथैव तत् । किंतु मामब्रवीत्तातो नव वर्षाणि पंच च ॥ २८ ॥ उषित्वा दंडकारण्ये पुरं पश्चात्समाविश । इदानीं भरतायेदं राज्यं दत्तं मयाखिलम् ॥ २९ ॥ ततः पित्रैव सुव्यक्तं राज्यं दत्तं तवैव हि । दंडकारण्यराज्यं मे दत्तं पित्रा तथैव च ॥ ३० ॥ अतः पितुर्वचः कार्यमावाभ्यामतियत्नतः । पितुर्वचनमुल्लंघ्य स्वतंत्रो यस्तु वर्तते ॥ ३१ ॥ स जीवन्नेव मृतको देहांते निरयं व्रजेत् । तस्माद्राज्यं प्रशाधि त्वं वयं दंडकपालकाः ॥ ३२ ॥ भरतस्त्वब्रवीद्रामं कामुको मूढधीः पिता । स्त्रीजितो भ्रांतहृदय उन्मत्तो यदि वक्ष्यति । तत्सत्यमिति न ग्राह्यं भ्रांतवाक्यं यथा सुधीः ॥ ३३ ॥ राम उवाच ॥ न स्त्रीजितः पिता ब्रूयान्न कामी नैव मूढधीः । पूर्वं प्रतिश्रुतं तस्य सत्यवादी

करण्यास आरंभ केला. २७ ( तो म्हणाला, ) ' वत्सा ! माझें बोलणें ऐक. तूं म्हणतोस तें खरेंच आहे, परंतु मला बाबांनी सांगितलें आहे की, ' चवदा वर्षें अरण्यांत राहून नंतर तूं राजधानीला ये. सांप्रत हे सर्व राज्य मी भरताला दिलें आहे. ' २८,२९ तर मग हें उघडच होत आहे की, बाबांनीच तुला ( अयोध्येचें ) राज्य दिलें आहे, आणि दंडकारण्याचें राज्य मला दिलें आहे. ३० म्हणून आम्ही दोघांनींही अत्यंत यत्नपूर्वक बाबांचे वचनाप्रमाणें केलें पाहिजे. पित्याचे वचनाचें उल्लंघन करून जो स्वतंत्र रीतीनें वागतो, तो जीवंत असूनही मेल्यासारखाच होय. देहांती त्याला नरकास जावें लागेल. म्हणून राज्याचें प्रतिपालन तूं कर; मी दंडकारण्याचें पालन करितों.' ३१,३२ त्यावर भरत रामाला म्हणाला, 'बाबा विषयी होते, त्यामुळें त्यांच्या बुद्धीला मोह झाला होता. ज्याप्रमाणें शहाणा मनुष्य भ्रमिष्ठाचें बोलणें ग्राह्य मानीत नाही, त्याप्रमाणें स्त्रीलंपट होऊन भ्रांतचित्तानें उन्मत्तासारखें बाबांनी कांही सांगितलें असल्यास तें तूं खरें समजूं नकोस.' ३३ त्यावर राम म्हणाला, ' आमचे बाबा स्त्रीलंपट नव्हत, विषयासक्त होऊन अगर भ्रांतहृदय होऊन कांही आज्ञा करितील, असे ते नव्हते. त्यांनी पूर्वींच त्या कैकयीला वचन दिलें होतें; आणि ते सत्यवादी असल्यामुळें तें वचन खोटें होऊं नये, या भीतीस्तव त्यांनी

१. पित्राज्ञापालनाची रामाला वाटणारी थोरवीः-' लक्ष्मीश्चंद्रादपेयाद्वा हिमवान् वा हिमं त्यजेत् । अतीयात् सागरो वेला न प्रतिज्ञामहं पितुः ' ॥-वा. रामायण, अयो० कांड.

ददौ भयात् ॥ ३४ ॥ असत्याद्भीतिरधिका महतां नरकादपि ।
करोमीत्यहमप्येतत्सत्यं तस्यै प्रतिश्रुतम् ॥ ३५ ॥ कथं वाक्यमहं कुर्या-
मसत्यं राघवो हि सन् । इत्युदीरितमाकर्ण्य रामस्य भरतोऽब्रवीत्
॥ ३६ ॥ तथैव चीरवसनो वने वत्स्यामि सुव्रत । चतुर्दश समास्त्वं तु
राज्यं कुरु यथासुखम् ॥३७॥ राम उवाच ॥ पित्रा दत्तं तवैवैतद्राज्यं
मह्यं वनं ददौ । व्यत्ययं यद्यहं कुर्यामसत्यं पूर्ववत् स्थितम् ॥ ३८ ॥
॥ भरत उवाच ॥ अहमप्यागमिष्यामि सेवे त्वां लक्ष्मणो यथा ।
नोचेत्प्रायोपवेशेन त्यजाम्येतत्कलेवरम् ॥ ३९ ॥ इत्येवं निश्चयं कृत्वा
दर्भानास्तीर्य चातपे । मनसापि विनिश्चित्य प्राङ्मुखोपविवेश सः ॥४०॥
भरतस्यापि निर्बंधं दृष्ट्वा रामोऽतिविस्मितः । नेत्रांतसंज्ञां गुरवे चकार
रघुनंदनः ॥४१॥ एकांते भरतं प्राह वसिष्ठो ज्ञानिनां वरः । वत्स गुह्यं

तिच्या म्हणण्याप्रमाणें तिला दिलें. ३४ मोठ्यांना नरकापेक्षांही असत्याची अधिक भीति वाटते; आणि म्हणूनच मीही तिला—कैकेयीला—( बाबांनीं ) जे वचन दिलें आहे, तें सत्य करणार. ३५ मी जर रघुकुलोत्पन्न आहे, तर वचनाचा भंग कसा बरें करीन ? ' हें रामाचें भाषण ऐकून भरत म्हणाला, ३६ ' हे सुव्रता रामा ! तुझ्या-प्रमाणेंच वल्कलें परिधान करून मी चवदा वर्षे वनांत राहीन, तूं सुखानें राज्य कर. ' ३७ त्यावर राम म्हणाला, ' बाबांनी तुला हें राज्य दिलें आहे, आणि मला वन दिलें आहे, त्यांत मी उलटापालट करीन, तर पूर्वीप्रमाणेंच असत्य पदरीं येईल. ' ३८ भरत म्हणाला, ' मीही ( वनांत ) येईन, आणि लक्ष्मणाप्रमाणें तुझी सेवा करीन, नाहीतर प्रायोपवेशनाचा आश्रय करून देहत्याग करीन. ' ३९ असा निश्चय प्रकट करून भरतानें उन्हामध्यें दर्भ पसरून दिले. आणि आपल्या मनाचाही तसाच निर्धार करून पूर्वेकडे तोंड करून भरत बसला. ४० भरताचा तो निर्बंध पाहून रामाला अत्यंत विस्मय वाटला; म्हणून त्या रघुनंदन रामानें भरताला चार युक्तीच्या गोष्टी सांगण्याविषयीं गुरूला—वसिष्ठाला—नेत्रसंकेत केला. ४१ त्यावर तो ज्ञानिजनश्रेष्ठ वसिष्ठ भरताला एकांतांत बोलला, 'वत्सा ! मी तुला गुह्य गोष्ट

१. प्राय+उपवेशन. अन्नत्याग करून मृत्यूची वाट पहात बसून राहणें. प्राय्—प्र+अय्= निघून जाणें. उपवेशन—बसून राहणें.

शृणुष्वेदं मम वाक्यात्सुनिश्चितम् ॥ ४२ ॥ रामो नारायणः साक्षा-
द्ब्रह्मणा याचितः पुरा। रावणस्य वधार्थाय जातो दशरथात्मजः ॥४३॥
योगमायापि सीतेति जाता जनकनंदिनी। शेषोऽपि लक्ष्मणो जातो
राममन्वेति सर्वदा ॥ ४४ ॥ रावणं हंतुकामास्ते गमिष्यंति न संशयः।
कैकेय्या वरदानादि यद्यन्निष्ठुरभाषणम् ॥ ४५ ॥ सर्वं देवकृतं नोचे-
देवं सा भाषयेत्कथम्। तस्मात्त्यजाग्रहं तात रामस्य विनिवर्तने ॥४६॥
निवर्तस्व महासैन्यैर्मातृभिः सहितः पुरम्। रावणं सकुलं हत्वा शीघ्र-
मेवागमिष्यति ॥ ४७ ॥ इति श्रुत्वा गुरोर्वाक्यं भरतो विस्मयान्वितः।
गत्वा समीपं रामस्य विस्मयोत्फुल्ललोचनः ॥ ४८ ॥ पादुके देहि राजेंद्र
राज्याय तव पूजिते। तयोः सेवां करोम्येव यावदागमनं तव
॥ ४९ ॥ इत्युक्त्वा पादुके दिव्ये योजयामास पादयोः। रामस्य

सांगतो, तर माझें भाषण निश्चयपूर्वक ऐकून घे. ४२ राम हा साक्षात् नारायण आहे. पूर्वी ब्रह्मदेवानें प्रार्थना केल्यावरून रावणाच्या वधाकरितां म्हणून हा दशरथपुत्र होऊन ( पृथ्वीवर ) अवतीर्ण झाला आहे. ४३ योगमाया[1] देखील सीता हें नांव धारण करून जनकाची कन्या होऊन अवतरली आहे. तसाच शेषही[2] लक्ष्मण होऊन रामाच्या मागून सर्वदा फिरत आहे. ४४ रावणाला ठार मारण्याची इच्छा धरून हे (त्या ठिकाणी) जाणार, यांत संशय नाही. कैकेयीला वरदान आणि तिचें निष्ठुर भाषण, वगैरे, हें सर्व देवांनीं घडवून आणलें आहे; नाही तर ती असें कसें बरें बोलेल ? म्हणून बाबा (भरता)! रामाला परतविण्याचा आग्रह सोडून दे. ४५,४६ मोठमोठी सैन्यें आणि माता यांसह राजधानीला परत जा. सहकुटुंब रावणाचा वध करून (राम) हा लवकरच परत येईल ’ ४७ हें गुरूचें—वसिष्ठाचें—बोलणें ऐकून भरताला विस्मय वाटला. त्या विस्मयाचे योगानें त्याचे डोळे प्रफुल्लित होऊन तो रामाजवळ गेला आणि त्याला म्हणाला, ४८ ‘ राजेंद्रा ! राज्य करण्याकरितां म्हणून तुझ्या पूज्य पादुका मला दे. तुझें आगमन होईपर्यंत मी त्यांचीच सेवा करीत राहीन. ’ ४९ असें बोलून भरतानें दिव्य पादुका रामाच्या पायांत चढविल्या. मग रामानें

१. योगमाया—भगवत सर्जनार्था शक्तिः-मूलप्रकृति. २. ह्यावर विष्णु शयन करीत असून ह्याला एक हजार मस्तकें आहेत व हा आपल्या मस्तकावर अखिल पृथ्वीचा भार धारण करितो, असें अनेक पुराणांतून वर्णिलें आहे.

ते ददौ रामो भरतायातिभक्तितः ॥ ५० ॥ गृहीत्वा पादुके दिव्ये भरतो रत्नभूषिते । रामं पुनः परिक्रम्य प्रणनाम पुनः पुनः ॥ ५१ ॥ भरतः पुनराहेदं भक्त्या गद्गदया गिरा । नव-पंचसमांते तु प्रथमे दिवसे यदि ॥५२॥ नागमिष्यसि चेद्राम प्रविशामि महानलम् । बाढमित्येव तं रामो भरतं संन्यवर्तयत् ॥ ५३ ॥ ससैन्यः सवसिष्ठश्च शत्रुघ्नसहितः सुधीः । मातृभिर्मंत्रिभिः सार्धं गमनायोपचक्रमे ॥ ५४ ॥ कैकेयी राममेकांते स्रवन्नेत्रजलाकुला । प्रांजलिः प्राह हे राम तव राज्यविघातनम् ॥ ५५ ॥ कृतं मया दुष्टधिया मायामोहितचेतसा । क्षमस्व मम दौरात्म्यं क्षमासारा हि साधवः ॥ ५६ ॥ त्वं साक्षाद्विष्णुर-व्यक्तः परमात्मा सनातनः । मायामानुषरूपेण मोहयस्यखिलं जगत् । त्वयैव प्रेरितो लोकः कुरुते साध्वसाधु वा ॥५७॥ त्वदधीनमिदं विश्वम-

त्या अत्यंत प्रेमपूर्वक भरताला दिल्या. ५० त्या रत्नजडित दिव्य पादुका घेऊन भरतानें रामाला पुनः प्रदक्षिणा घातली आणि त्याला अनेक वेळां नमस्कार केला. ५१ भक्तीनें गळा भरून येऊन भरत रामाला म्हणाला, 'चवदा वर्षें पूर्ण होऊन पहिल्याच दिवशी रामा ! तूं आला नाहीस, तर मी मोठ्या अग्नींत प्रवेश करीन.' 'बरें आहे' असें रामानें म्हटलें आणि त्याला परतविलें. ५२, ५३ नंतर त्या बुद्धिमान् भरतानें सर्व सैन्य, वसिष्ठ, शत्रुघ्न, माता आणि प्रधान यांसह-वर्तमान जाण्याची तयारी केली. ५४ ह्या वेळीं कैकेयी रामाला एकांतांत भेटली आणि डोळ्यांतून दुःखाश्रू वाहात आहेत, अशा स्थितींत हात जोडून म्हणाली, 'हे रामा ! तुझ्या राज्यप्राप्तीच्या कामीं दुष्टबुद्धि धारण करून मी अडथळा आणला; मायेनें माझ्या अंतःकरणाला मोह झाला. माझ्या दुष्टपणाबद्दल मला क्षमा कर. साधु-जनांचा क्षमा हाच प्रधान गुण असतो. ५५,५६ तूं साक्षात् विष्णु आहेस; तुझें स्वरूप अव्यक्त[1] असून तूं सनातन परमात्मा आहेस. तूं मायेनें मनुष्यरूप धारण करून सर्व जगाला मोहीत करीत आहेस; तुझ्याच प्रेरणेनें सर्व लोक चांगलीं वाईट कृत्यें[2] करीत आहेत. ५७ हें सर्व विश्व तुझ्या स्वाधीन आहे. तें परतंत्र आहे; तें स्वतः काय करणार?

१. सदृश उतारा.–'अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहु परमा गतिम्'.–भ. गीता, अ. ८.२१.
२. समानार्थक वचन.–'मीचि गा पांडवा । या त्रिभुवनासी वोलावा । सृष्टिक्षयप्रभवा । मूळ तें मी'॥–ज्ञानेश्वरी ९.

स्वतंत्रं करोति किम् । यथा कृत्रिमनर्तक्यो नृत्यंति कुहकेच्छया
॥ ५८ ॥ त्वदधीना तथा माया नर्तकी बहुरूपिणी । त्वयैव प्रेरिताऽहं
च देवकार्यं करिष्यता ॥ ५९ ॥ पापिष्ठं पापमनसा कर्माचरमरिंदम ।
अद्य प्रतीतोऽसि मम देवानामप्यगोचरः ॥ ६० ॥ पाहि विश्वेश्वरानंत
जगन्नाथ नमोऽस्तु ते । छिंधि स्नेहमयं पाशं पुत्रवित्तादिगोचरम् ॥६१॥
त्वज्ज्ञानानलखड्गेन त्वामहं शरणं गता । कैकेय्या वचनं श्रुत्वा रामः
सस्मितमब्रवीत् ॥ ६२ ॥ यदाह मां महाभागे नानृतं सत्यमेव तत् ।
मयैव प्रेरिता वाणी तव वक्राद्विनिर्गता ॥ ६३ ॥ देवकार्यार्थसिद्ध्यर्थमत्र
दोषः कुतस्तव । गच्छ त्वं हृदि मां नित्यं भावयंती दिवानिशम् ॥६४॥
सर्वत्र विगतस्नेहा मद्भक्त्या मोक्ष्यसेऽचिरात् । अहं सर्वत्र समदृक् द्वेष्यो
वा प्रिय एव वा ॥ ६५ ॥ नास्ति मे कल्पकस्येव भजतोऽनभजाम्यहम ।

ज्याप्रमाणें कळसूत्री बाहुल्या गारुड्याच्या इच्छेप्रमाणें नाचतात, त्याचप्रमाणें तुझ्या स्वाधीन असलेली मायारूप बाहुली अनेक रूपें धारण करून तुझ्या प्रेरणेनुसार नाचत आहे, देवांचें कार्य करण्यास तयार झालेल्या त्वांच मला प्रेरणा केली ५८, ५९ आणि म्हणूनच पापी विचार मनांत आणून मी ह्या अत्यंत पापाचरणाला प्रवृत्त झाल्यें. हे शत्रुमर्दना! ज्याचें दर्शन देवांनाही दुर्लभ, तो तूं मला आज दृष्टीस पडला आहेस. ६० हे विश्वेश्वरा! हे अनंता! हे जगन्नाथा! तुला नमस्कार असो! माझें रक्षण कर. पुत्र, वित्त इत्यादिविषयक माझा स्नेहपाश तुझ्या ज्ञानरूप निर्मळ खड्गानें तोडून टाक.' कैकेयीचें भाषण ऐकून स्मितपूर्वक राम तिला म्हणाला, ६१,६२ 'महाभागे! तू मला जें सांगितलेंस, तें खोटें नव्हे, तें खरेंच आहे. ज्या वाणीची मीं प्रेरणा केली, तीच तुझ्या तोंडांतून निघाली. ६३ आणि तीही देवकार्याच्या सिद्धी-करितां; यांत तुझा तो दोष कोणचा? आतां तूं जा, रात्रंदिवस हृदयांत माझें चिंतन करीत रहा. ६४ माझ्या भक्तीच्या योगेंकरून सर्व ठिकाणची तुझी स्नेहबुद्धि नाहींशी होईल आणि लवकरच तूं मुक्त होशील. माझी सर्वत्र समदृष्टि आहे. स्वतःच निर्माण केलेल्या मायिक पदार्थासंबंधी गारुड्याला द्वेष किंवा प्रेम नसतें, तसेंच मला कोणाविषयीं द्वेष नाही, किंवा कोणी प्रियही नाहीं. मला जे भजतात त्यांना मीही भजतों. माते!

१. 'तस्मात् सर्वेषु कालेषु मामनुस्मर ।'—भ. गीता ८, ७. २. 'समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः। ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥'—भ. ९, २९.

मन्मायामोहितधियो मामंब मनुजाकृतिम् ॥ ६६ ॥ सुखदुःखाद्यनुगतं जानंति नतु तत्त्वतः । दिष्ट्या मद्गोचरं ज्ञानमुत्पन्नं ते भवापहम् ॥६७॥ स्मरंती तिष्ठ भवने लिप्यसे न च कर्मभिः । इत्युक्त्वा सा परिक्रम्य रामं सानंदविस्मया ॥६८॥ प्रणम्य शतशो भूमौ ययौ गेहं मुदान्विता । भरतस्तु सहामात्यैर्मातृभिर्गुरुणा सह ॥ ६९ ॥ अयोध्यामगमच्छीघ्रं राममेवानुचिंतयन् । पौरजानपदान्सर्वानयोध्यायामुदारधीः ॥ ७० ॥ स्थापयित्वा यथान्यायं नंदिग्रामं ययौ स्वयम् । तत्र सिंहासने नित्यं पादुके स्थाप्य भक्तितः ॥७१॥ पूजयित्वा यथा रामं गंधपुष्पाक्षतादिभिः । राजोपचारैरखिलैः प्रत्यहं नियतव्रतः ॥७२॥ फलमूलाशनो दांतो जटा-वल्कलधारकः । अधःशायी ब्रह्मचारी शत्रुघ्नसहितस्तदा ॥ ७३ ॥ राज-

माझ्या मायेनें मोहितचित्त झालेले लोक मला मनुष्यासारखा सुखदुःखादिकांच्या प्रवाहांत सांपडलेला समजतात. तत्त्वतः माझें स्वरूप ते जाणत नाहीत. संसाराचा नाश करणारें असें मजसबंधी तुला ज्ञान झालें, ही मोठ्या आनंदाची गोष्ट होय. ६५,६६,६७ माझें स्मरण करीत घरींच रहा, म्हणजे तूं कर्मांनी लिप्त होणार नाहीस.' असें रामानें सांगितल्यावर कैकेयीला सानंद आश्चर्य वाटलें, व तिनें रामाला प्रदक्षिणा घातली. ६८ ( रामापुढें ) भूमीवर शेंकडों नमस्कार घालून ती आनंदानें घरीं गेली. भरतही आपले अमात्य, माता आणि गुरु वसिष्ठ यांसह लवकरच रामाचें सतत चिंतन करीत अयोध्येला गेला. पुढें त्या महाबुद्धिमान् भरतानें नगरांतील व देशांतील सर्व लोकांना न्यायमार्गामध्यें ठेवून आपण स्वतः नंदिग्रामाला गेला. तेथें सिंहासनावर त्यानें रामाच्या पादुकांची भक्तिपूर्वक स्थापना केली. ६९,७०,७१ गंध, पुष्पें, अक्षता इत्यादींनीं प्रत्येक दिवशी त्या पादुकांची रामच समजून तो पूजा करूं लागला. तसेंच, सर्व ( छत्र, चामरें इत्यादि ) राजोपचारहीं ( त्या पादुकांना ) तो अर्पण करीत असे. तो नित्य व्रतस्थ राहूं लागला. ७२ तो व शत्रुघ्न फळें व मूळें खाऊन राहूं लागले. त्यांनीं इंद्रियें स्वाधीन ठेविली, जटा आणि वल्कलें धारण केलीं, व ब्रह्मचर्य[1] व्रताचा अंगीकार करून ते जमिनीवर निजूं लागले. ७३ त्या वेळीं पृथ्वीतलावर जितकीं म्हणून

१. मौंजीबंधनानंतर गुरुगृहीं अविवाहित स्थितीत राहून वेदाध्ययन करणें. ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य वानप्रस्थ आणि संन्यास हे चार आश्रम–अवस्था–आहेत.

कार्याणि सर्वाणि यावंति पृथिवीतले । तानि पादुकयोः सम्यङ् निवेदयति राघवः ॥ ७४ ॥ गणयन् दिवसानेव रामागमनकांक्षया । स्थितो रामार्पितमनाः साक्षाद्ब्रह्ममुनिर्यथा ॥ ७५ ॥ रामस्तु चित्रकूटाद्रौ वसन्मुनिभिरावृतः । सीतया लक्ष्मणेनापि किंचित्कालमुपावसत् ॥ ७६ ॥ नागराश्च सदा यांति रामदर्शनलालसाः । चित्रकूटस्थितं ज्ञात्वा सीतया लक्ष्मणेन च ॥ ७७ ॥ दृष्ट्वा तज्जनसंबाधं रामस्तत्याज तं गिरिम् । दंडकारण्यगमने कार्यमप्यनुचिंतयन् ॥ ७८ ॥ अन्वगात्सीतया भ्रात्रा ह्यत्रेराश्रममुत्तमम् । सर्वत्र सुखसंवासं जनसंबाधवर्जितम् ॥ ७९ ॥ गत्वा मुनिमुपासीनं भासयंतं तपोवनम् । दंडवत्प्रणिपत्याह रामोऽहमभिवादये ॥८०॥ पितुराज्ञां पुरस्कृत्य दंडकानहमागतः। वनवासमिषेणापि धन्योऽहं

राजकार्यें निघत, त्यांसंबंधी योग्य प्रकार निवेदन भरत त्या पादुकांना करीत असे. ७४ रामाचे आगमनाची वाट पहात साक्षात् ब्रह्ममुनीप्रमाणें रामाचे ठिकाणीं चित्त अर्पण करून तो भरत एक एक दिवस मोजीत राहिला. ७५ इकडे चित्रकूट पर्वतावर सीता व लक्ष्मण यांसह राम कांहीं काळपर्यंत राहिला. येथें अनेक मुनिही त्यांबरोबर राहत असत. ७६ सीता आणि लक्ष्मण यांसह राम चित्रकूट पर्वतावर आहे, हें जाणून अनेक नागरिक जन रामाला भेटण्याच्या इच्छेनें सदोदित येत असत. ७७ ती लोकांची दाटी पाहून, त्याचप्रमाणें दंडकारण्यात आपणाला काय कर्तव्य आहे याचाही विचार करून रामानें त्या पर्वतावरील आपलें राहणें सोडून दिलें; ७८ आणि सीतालक्ष्मणांसहवर्तमान अत्रीन्च्या पुण्याश्रमाला तो गेला. तें स्थान राहण्यास सर्वदा सुखकारक व जनसमुदायाची गर्दी नाहीं असें होतें. ७९ आपल्या तेजानें त्या तपोवनाला प्रकाशित करणारा अत्रि मुनि बसला होता, त्या ठिकाणीं जाऊन रामानें त्याला साष्टांग नमस्कार घातला, आणि तो बोलला:—'मी राम आपणाला अभिवंदन करीत आहें; ८० वडिलांची आज्ञा मान्य करून मी दंडकारण्याला आलों आहें. वनवासाच्या निमित्तानें कां होईना, आपलें दर्शन होऊन मी धन्य झालों

१. एक प्रख्यात ऋषि हा ब्रह्मदेवाच्या दहा मानसपुत्रांपैकीं एक—नेत्रापासून निर्माण झालेला—होय. ह्याच्या स्त्रीचे नाव अनसूया. अत्रिसंहिता नावाच्या ग्रंथाचा हा कर्ता आहे. ह्याच्याच पोटीं त्रिमूर्ति दत्तात्रेयाचा अवतार झाल्याचें वर्णिलें आहे.

दर्शनात्तव ॥ ८१ ॥ श्रुत्वा रामस्य वचनं रामं ज्ञात्वा हरिं परम् । पूजयामास विधिवद्भक्त्या परमया मुनिः ॥ ८२ ॥ वन्यैः फलैः कृतातिथ्यमुपविष्टं रघूत्तमम् । सीतां च लक्ष्मणं चैव संतुष्टो वाक्यमब्रवीत् ॥ ८३ ॥ भार्या मेऽतीव संवृद्धा ह्यनसूयेति विश्रुता । तपश्चरंती सुचिरं धर्मज्ञा धर्मवत्सला ॥ ८४ ॥ अंतस्तिष्ठति तां सीता पश्यत्वरिनिषूदन । तथेति जानकीं प्राह रामो राजीवलोचनः ॥ ८५ ॥ गच्छ देवीं नमस्कृत्य शीघ्रमेहि पुनः शुभे । तथेति रामवचनं सीता चापि तथाऽकरोत् ॥ ८६ ॥ दंडवत्पतितामग्रे सीतां दृष्ट्वाऽतिहृष्टधीः । अनसूया समालिंग्य वत्से सीतेति सादरम् ॥ ८७ ॥ दिव्ये ददौ कुंडले द्वे निर्मिते विश्वकर्मणा । दुकूले द्वे ददौ तस्यै निर्मले भक्तिसंयुता ॥ ८८ ॥ अंगरागं च सीतायै ददौ दिव्यं शुभानना । न त्यक्ष्यतेंऽगरागेण शोभा

आहे.' ८१ रामाचें वचन ऐकून व राम हा परमात्मा विष्णुच आहे, असें जाणून परम भक्तीनें त्या मुनीनें त्याची यथाविधि पूजा केली. ८२ त्यानें वनांतील फलांनीं त्याचें आदरातिथ्य केलें. नंतर रघुश्रेष्ठ राम, सीता आणि लक्ष्मण हीं बसली असतां ( तो मुनि ) संतुष्ट अंतःकरणानें त्यांना म्हणाला, ८३ 'अनसूया नांवाची माझी लोकविश्रुत[1] अति वृद्ध पत्नी आंत बसली आहे, ती धर्मज्ञ असून धर्माचरण म्हणजे तिला अत्यंत प्रिय वाटतें. तिचा सर्व काल तपश्चर्या करण्यांत जात असतो. ८४ हे अरिमर्दना ( रामा )! सीतेनें तिला भेटावें.' त्यावर त्या कमलनयन रामानें 'बरें आहे' असें म्हटलें. नंतर तो सीतेला बोलला, ८५ 'हे सुलक्षणे ( सीते )! भगवती ( अनसूये ) ला नमस्कार करून पुनः लवकर ये.' 'ठीक आहे,' असें म्हणून सीतेनें देखील रामानें सांगितल्याप्रमाणें केलें. ८६ आपल्यापुढें सीतेनें दंडवत् प्रणाम केलेला आहे, हें पाहून अनसूयेच्या मनाला अत्यंत आनंद झाला. तिनें 'वत्से सीते'! म्हणून आदरपूर्वक तिला संबोधिलें आणि आलिंगन दिलें. ८७ विश्वे-कर्म्यानें[2] निर्माण केलेली दोन दिव्य कुंडलें[3] तिनें सीतेला दिलीं; त्याचप्रमाणें भक्तिपुरस्सर दोन निर्मल रेशमी वस्त्रेंही दिलीं. ८८ पुढें त्या ( सर्वदा ) प्रसन्नमुख अनुसूयेनें सीतेला दिव्य उटी लाविली, ( आणि ती सीतेला म्हणाली ) 'हे कमलवदने!

१. आपल्या तपःसामर्थ्यानें ब्रह्मा, विष्णु, महेश याना हिनें रागतीं मुलें केल्याचें प्रसिद्ध आहे. २. देवाचा शिल्पी–कारागीर. ३. कर्णभूषणें.

त्वां कमलानने ॥ ८९ ॥ पातिव्रत्यं पुरस्कृत्य राममन्वेहि जानकि । कुशली राघवो यातु त्वया सह पुनर्गृहम् ॥ ९० ॥ भोजयित्वा यथान्यायं रामं सीतासमन्वितम् । लक्ष्मणं च तदा रामं पुनः प्राह कृतांजलिः ॥ ९१ ॥ राम त्वमेव भुवनानि विधाय तेषां संरक्षणाय सुरमानुषातिर्यगादीन् । देहान्बिभर्षि न च देहगुणैर्विलिप्तस्त्वत्तो बिभेत्यखिलमोहकरी च माया ॥ ९२ ॥ इति श्रीमदयोध्याकांडे उमामहेश्वरसंवादे अयोध्याकांडे नवमः सर्गः ॥ ९ ॥

**अयोध्याकांडे नवानां सर्गाणां सप्त शतानि श्लोकाः ॥ ७०० ॥**

ह्या उटीच्या योगानें तुझी नैसर्गिक शोभा कधींही नाहीशी होणार नाही. ८९ हे जानकि ! पातिव्रत्याचा पुरस्कार करून तूं (सर्वदा) रामाच्या मागून जात जा. श्रीराम तुझ्यासह पुन्हां कुशल स्थितीत घरीं परत जावो.' ९० नंतर ( अत्रि ऋषीनें ), यथाविधि रामाला, सीतेला आणि लक्ष्मणाला भोजन घातलें, आणि नंतर हात जोडून म्हटलें, ९१ 'हे रामा ! तूंच सर्व भुवनें[1] निर्माण करून त्यांच्या संरक्षणाकरितां देव, मनुष्यें, पशुपक्षी वगैरे देह धारण करितोस. देहाच्या गुणांचा तुला किमपीहि लेप होत नाही. सर्वांना मोह करणारी माया देखील तुला भीत असते.' ९२ अयोध्याकांडाचे नऊ सर्ग मिळून एकंदर श्लोक ७००.

**अयोध्याकांड, सर्ग नववा समाप्त.**



१. भुवन–सृष्टि, लोक. एकंदर भुवनें तीन किंवा चौदा मानिलीं आहेत.

# अथ अरण्यकांडप्रारंभः ॥



## अरण्यकांड, सर्ग पहिला.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ अथ तत्र दिनं स्थित्वा प्रभाते रघुनंदनः। स्नात्वा मुनिं समामंत्र्य प्रयाणायोपचक्रमे ॥ १ ॥ मुने गच्छामहे सर्वे मुनिमंडलमंडितम् । विपिनं दंडकं यत्र त्वमाज्ञातुमिहार्हसि ॥ २ ॥ मार्गप्रदर्शनार्थाय शिष्यानाज्ञप्तुमर्हसि । श्रुत्वा रामस्य वचनं प्रहस्यात्रिर्महायशाः । प्राह तत्र रघुश्रेष्ठं राम राम सुराश्रय ॥ ३ ॥ सर्वस्य मार्गद्रष्टा त्वं तव को मार्गदर्शकः। तथापि दर्शयिष्यंति तव लोकानुसारिणः॥४॥ इति शिष्यान्समादिश्य स्वयं किंचित्तमन्वगात् । रामेण वारितः प्रीत्या

श्रीमहादेव म्हणाला, " ( पार्वती ! ) श्रीराम त्या ठिकाणी एक दिवस राहिला. दुसरे दिवशी प्रभातकाली स्नान झाल्यावर त्यानें त्या ( अत्रि ) मुनीचा निरोप घेतला, आणि पुढें जाण्याची तयारी केली. १ ( तो म्हणाला, ) 'मुने ! अनेक मुनिसमुदायांच्या रहाण्यानें ज्या स्थलाला विशेष शोभा आली आहे, अशा दंडकारण्यांत आम्ही जात आहों, तरी त्याला आपलें अनुमोदन असावें. २ आम्हांला मार्ग दाखविण्याविषयींही शिष्यांना आपली आज्ञा असावी. हें रामाचें भाषण ऐकून त्या महाकीर्तिशाली अत्रि ऋषीला हंसे आलें. तो त्या रघुश्रेष्ठ रामाला म्हणाला, ' जगद्रमणा रामा ! तूं देवांनाही आधारभूत आहेस. ३ सर्वांचा मार्गदर्शक तूं असतां तुला मार्ग दाखविणारा दुसरा कोण आहे ? तरीही लोकानुकरण करणाऱ्या तुला (माझे शिष्य) मार्ग दाखवितील ' ४ असें बोलून (त्या मुनीनें) शिष्यांस आज्ञा दिली आणि आपणही स्वतः थोडेंसें त्याला पोंचवायाला गेला. नंतर रामानें आदरपूर्वक

१. जगद्रमण राम –'सोमे चकोर, मेघे चातक, जन तेंवि निववविले रामे, । नामें प्रभुच्या केलीं कल्पतरूचीं हतप्रभे दामे '. ॥–मोरोपंत, सद्गर्भरामायण १३५. २. श्रीराम देवानाही आधारः–' ब्रह्ममहेंद्रसुरेंद्रमरुद्गण रुद्रमुनींद्रगणैरतिरम्य क्षीरसरित्पतितीरमुपेत्य नुत हि सतामवितारमुदारम् । भूमिभरप्रशमार्थमथ प्रथितप्रकटीकृतचिद्घनमूर्तिं त्वा भजतो रघुनंदन देहि दयाघन मे स्वपदांबुजदास्यम् ' ॥–सीतारामाष्टक.

अत्रिः स्वभवनं ययौ ॥५॥ क्रोशमात्रं ततो गत्वा ददर्श महतीं नदीम्। अत्रेः शिष्यानुवाचेदं रामो राजीवलोचनः ॥ ६ ॥ नद्याः संतरणे कश्चिदुपायो विद्यते न वा । ऊचुस्ते विद्यते नौका सुदृढा रघुनंदन ॥ ७ ॥ तारयिष्यामहे युष्मान्वयमेव क्षणादिह । ततो नावि समारोप्य सीतां राघवलक्ष्मणौ ॥ ८ ॥ क्षणात्संतारयामासुर्नदीं मुनिकुमारकाः । रामाभिनंदिताः सर्वे जग्मुरत्रेरथाश्रमम् ॥ ९ ॥ तावेत्य विपिनं घोरं झिल्लीझंकारनादितम् । नानामृगगणाकीर्णं सिंहव्याघ्रादिभीषणम् ॥ १० ॥ राक्षसैर्घोररूपैश्च सेवितं रोमहर्षणम्। प्रविश्य विपिनं घोरं रामो लक्ष्मणमब्रवीत्॥११॥ इतः परं प्रयत्नेन गंतव्यं सहितेन मे। धनुर्गुणेन संयोज्य शरानपि करे दधत् ॥१२॥ अग्रे यास्याम्यहं पश्चात्त्वमन्वेहि धनुर्धरः ।

परतण्यास सांगितल्यावर तो ( ऋषि ) आपल्या आश्रमाला परतला. ५ पुढें एक कोस चालून गेल्यावर त्यांच्या दृष्टीस एक मोठी नदी पडली. तेव्हां तो कमलनयन राम त्या अत्रिशिष्यास म्हणाला, ६ 'नदी उतरण्याला कांहीं उपाय आहे किंवा नाहीं?' त्यावर ते म्हणाले, 'रघुनंदना! येथें एक सुदृढ नाव आहे. ७ तिच्यांतून आम्ही तुम्हांला एका क्षणांत येथून पलीकडे नेऊं.' ( असें बोलून ) सीता, राम आणि लक्ष्मण याना नौकेंत बसवून त्या मुनिकुमारांनी हांहां म्हणतां त्यांना नदीपार उतरविलें. नंतर प्रेमपूर्वक रामाचा निरोप घेऊन ते सर्व ( अत्रि ) मुनीच्या आश्रमाला परत गेले. ८,९ इकडे रामलक्ष्मणांना एक घोर अरण्य लागलें. त्यांत रानमाशांचा 'घोंघों' शब्द सारखा घुमत होता, अनेक प्रकारचे पशुसमुदाय सर्वत्र भटकत होते; सिंह, व्याघ्रादिकांच्या मुळें त्या स्थलाला अत्यंत भीषण स्वरूप प्राप्त झालें होतें. १० अंगावर शहारे उत्पन्न करणारे भयंकर स्वरूपाचे राक्षस तेथें राहात होते. अशा त्या घोर अरण्यांत प्रवेश केल्यावर राम लक्ष्मणाला बोलला, ११ 'ह्यापुढें फार सावध राहून माझ्या बरोबर ये.' असें सांगून रामानें धनुष्यावर दोरी चढविली आणि तें हातांत घेतलें. १२ ( तो म्हणाला, ) 'मी पुढें चालतों, तूं धनुष्य हातांत घेऊन माझ्या मागून ये. तसेंच जीव आणि ईश्वर यांमध्यें माया असते, त्याप्रमाणें

१. येथे जीव–लक्ष्मण, ईश्वर–रामचंद्र आणि सीता–ईश्वरविषयक अज्ञान राहविणारें मायापटळ–अविद्यापटल–असे समजावें. याचा समानार्थक उतारा –'चालति माझ्या मागें लक्ष्मणजी काननीं पुढें स्वामी'—मोरोपंत.

आवयोर्मध्यगा सीता मायेवात्मपरात्मनोः ॥ १३ ॥ चक्षुश्चारय सर्वत्र दृष्टं रक्षोभयं महत् । विद्यते दंडकारण्ये श्रुतपूर्वमरिंदम ॥ १४ ॥ इत्येवं भाषमाणौ तौ जग्मतुः सार्धयोजनम् । तत्रैका पुष्करिण्यास्ते कल्हारकुमुदोत्पलैः ॥ १५ ॥ अंबुजैः शीतलोदेन शोभमाना व्यदृश्यत । तत्समीपमथो गत्वा पीत्वा तत्सलिलं शुभम् ॥१६॥ ऊषुस्ते सलिलाभ्याशे क्षणं छायामुपाश्रिताः । ततो ददृशुरायांतं महासत्वं भयानकम् ॥१७॥ करालदंष्ट्रवदनं भीषयंतं स्वगर्जितैः । वामांसे न्यस्तशूलाग्रग्रथितानेकमानुषम् ॥१८॥ भक्षयंतं गजव्याघ्रमहिषं वनगोचरम् । ज्याऽऽरोपितं धनुर्धृत्वा रामो लक्ष्मणमब्रवीत् ॥१९॥ पश्य भ्रातर्महाकायो राक्षसोऽयमपागतः । आयात्यभिमुखं नोऽग्रे भीरूणां भयमावहन ॥ २० ॥

सीतेनें आम्हां दोघांमध्ये चालत असावें. १३ तुझी दृष्टि सर्वत्र असूं दे. हे शत्रुमर्दना ! दंडकारण्यामध्यें राक्षसांचें फार भय असल्याचें आम्ही पूर्वी ऐकिलें होतें, तें आज प्रत्यक्ष दिसून आलें आहे.' १४ असें बोलत बोलत ते सहा कोस रस्ता चालून गेले. तेथें एक सरोवर त्यांच्या दृष्टीला पडलें. त्यांत पांढरी, तांबडीं, निळीं, कमळें असल्याकारणानें तें अत्यंत शोभिवंत दिसत होतें. त्या तिघांनी त्या सरोवराजवळ जाऊन तेथील उत्तम उदक प्राशन केलें. १५,१६ त्या पाण्याजवळ छायेखालीं त्यांनीं क्षणभर विश्रांति घेतली, तों एक भयंकर मोठा प्राणी आपल्याकडे येत आहे असें त्या दोघांना दिसून आलें. १७ त्याच्या तोंडांत भयंकर दाढा होत्या व आपल्या गर्जनेनें तो ( सर्वांस ) भीति दाखवीत होता. डाव्या खांद्यावर त्यानें शूळ ठेविला असून त्याच्या अग्राला अनेक मनुष्यें बांधून ठेविली होतीं. १८ अरण्यांत दिसणारें कोणतेंही श्वापद, मग तो हत्ती असो, वाघ असो, किंवा रेडा असो, तो खात असे. ( तें पाहून ) आपलें दोरी चढविलेलें धनुष्य ( हातीं ) धारण करून राम लक्ष्मणाला म्हणाला, १९ 'बंधो ! हा महाकाय राक्षस येऊन ठेपला आहे पहा ! भिऱ्यांना भीति उत्पन्न करणारा हा आपल्या समोर येत आहे. २०

१. ह्या राक्षसाचे वर्णन एकनाथानीं केलें आहे तें असें.–'राक्षस देखिला अतिक्रूर । पर्वतोपम महाथोर । वक्र नासिक वक्र वक्त्र । कपाटोदर दुर्धर्ष ॥ अष्ट महासिंहाचीं मढीं । शूळीं खेचोनि खादीं कावडी । मृगव्याळ चितळे बापुडीं । मारी कोडी श्वापदाच्या ॥ सदंत गजांची शिरें । गजचर्मै थबथबती रुधिरें । मारोनि पंच पंच व्याघ्रें । खादीं क्रूरें वाहिजेती ॥–भा. रामायण, अरण्यकांड २.

सज्जीकृतधनुस्तिष्ठ मा भैजेनकनंदिनि । इत्युक्त्वा बाणमादाय स्थितो राम इवाचलः ॥ २१ ॥ स तु दृष्ट्वा रमानाथं लक्ष्मणं जानकीं तदा । अट्टहासं ततः कृत्वा भीषयन्निदमब्रवीत् ॥ २२ ॥ कौ युवां बाणतूणीरजटावल्कलधारिणौ । मुनिवेषधरौ बालौ स्त्रीसहायौ सुदुर्मदौ ॥ २३ ॥ सुंदरौ बत मे वक्त्रप्रविष्टकवलोपमौ । किमर्थमागतौ घोरं वनं व्यालनिषेवितम् ॥ २३ ॥ श्रुत्वा रक्षोवचो रामः स्मयमान उवाच तम् । अहं रामस्त्वयं भ्राता लक्ष्मणो मम संमतः ॥ २५ ॥ एषा सीता मम प्राणवल्लभा वयमागताः । पितृवाक्यं पुरस्कृत्य शिक्षणार्थं भवादृशाम् ॥ २६ ॥ श्रुत्वा तद्रामवचनमट्टहासमथाकरोत् । व्यादाय वक्त्रं बाहुभ्यां शूलमादाय सत्वरः ॥ २७ ॥ मां न जानासि राम त्वं विराधं लोकविश्रुतम् । मद्भयान्मुनयः सर्वे त्यक्त्वा वनमितो गताः ॥ २८ ॥ यदि

आपलें धनुष्य सज्ज करून उभा रहा. जानकि ! भिऊं नको.' असें बोलून बाण घेऊन राम पर्वतासारखा ( निश्चल ) उभा राहिला. २१ तो ( राक्षस ) रामाला लक्ष्मणाला आणि जानकीला पाहून अट्टहासपूर्वक भीति दाखवीत म्हणाला. २२ 'बाल असूनही मुनिवेष घेऊन बाण, भाते, जटा आणि वल्कलें धारण करणारे असे तुम्ही दोघे कोण आहां ? तुमच्या बरोबर ही स्त्री असून तुम्ही ( आकृतीनें ) फार उन्मत्त दिसत आहां. २३ तुम्ही सुंदर आहां, तरी माझ्या तोंडांत प्रविष्ट झालेल्या घांसासारखे मला वाटत आहां. हिंस्र पशूंनी वसती केलेल्या ह्या भयंकर वनांत तुम्ही कशाकरितां आलां आहां ?' २४ ( हें ) त्या राक्षसाचें भाषण ऐकून राम त्याला हंसत म्हणाला, 'मी राम[1] असून हा माझा आवडता लक्ष्मण बंधु आहे. २५ त्याचप्रमाणें ही सीता माझी प्राणप्रिय स्त्री आहे. पित्याचे वचनाचा अंगीकार करून तुम्हांसारख्यांना शिक्षा करण्याकरितां आम्ही आलों आहों.' २६ हें रामाचें भाषण ऐकून ( तो राक्षस ) मोठमोठ्यानें हंसला आणि तोंड पसरून त्यानें आपला शूळ लगेच हातीं घेतला. तो म्हणाला, २७ 'रामा ! तूं ह्या जगविख्यात विराधाला—मला—ओळखत नाहीस काय ? माझ्या भीतीनें सर्व मुनि हें वन टाकून येथून निघून गेले आहेत. २८ जर तुम्हांला

१. सदृश वर्णन—'सूर्यवंशींचा विख्यात । श्रीरामदाशरथी काकुत्स्थ । करावया राक्षसांचा अंत । वना निश्चित मी आलों ॥. सीता माझी निजवधू । आणि लक्ष्मण माझा धाकटा बंधू । तूं कोण राक्षसबंधू । मूळानुवाद मज सांगें' ॥—भा. रामायण, अरण्य० २.

जीवितुमिच्छास्ति त्यक्त्वा सीतां निरायुधौ । पलायतं न चेच्छीघ्रं भक्षयामि युवामहम् ॥ २९ ॥ इत्युक्त्वा राक्षसः सीतामादातुमभिदुद्रुवे । रामश्चिच्छेद तद्बाहू शरेण प्रसहन्निव ॥ ३० ॥ ततः क्रोधपरीतात्मा व्यादाय विकटं मुखम् । राममभ्यद्रवद्रामश्चिच्छेद परिधावतः ॥ ३१ ॥ पदद्वयं विराधस्य तदद्भुतमिवाभवत् ॥ ३२ ॥ ततः सर्प इवास्येन ग्रसितुं राममापतत् । ततोऽर्धचंद्राकारेण बाणेनास्य महच्छिरः ॥ ३३ ॥ चिच्छेद रुधिरौघेण पपात धरणीतले । ततः सीता समालिंग्य प्रशशंस रघूत्तमम् ॥ ३४ ॥ ततो दुंदुभयो नेदुर्दिवि देवगणेरिताः । ननृतुश्चाप्सरा हृष्टा जगुर्गंधर्वकिन्नराः ॥ ३५ ॥ विराधकायादतिसुंदराकृतिर्बिभ्राजमानो विमलांबरावृतः । प्रतप्तचामीकरचारुभूषणो व्यदृश्यताग्रे गगने रविर्यथा ॥ ३६ ॥ प्रणम्य रामं प्रणतार्तिहारिणं भवप्रवाहोपरमं

जगण्याची इच्छा असल, तर आपलीं आयुधें टाकून आणि सीतेला सोडून पळून जा. नाहीतर तुम्हां दोघांना मी आतां ताबडतोब खाऊन टाकीन'. २९ असें म्हणून तो राक्षस सीतेला धरण्याकरितां तिच्यावर धांवून आला, तोंच रामानें हंसत हंसत बाण मारून त्याचे दोनी हात तोडून टाकिले. ३० तेव्हां क्रोधायमान होऊन त्यानें आपलें भयंकर तोंड पसरिलें आणि तो रामावर धांवून आला तो धांवून येत आहे, तोंच रामानें त्याचे दोनी पाय तोडून टाकिले. ती अद्भुत पराक्रमाची गोष्ट झाली. ३१,३२ नंतर तोंडानें रामाचा ग्रास करण्याच्या उद्देशानें सर्पाप्रमाणें तो राक्षस रामाकडे सरपटत येऊं लागला, तोंच रामानें अर्धचंद्राकार बाण योजून त्याचें प्रचंड मस्तक तोडून टाकिलें. तेव्हां तें रक्ताच्या प्रवाहांत पृथ्वीतलावर पडलें. तें पाहून सीतेनें रामाला आलिंगन दिलें आणि त्याची प्रशंसा केली. ३३,३४ त्या वेळीं देवगणांनीं वाजविलेल्या दुंदुभींचे आवाज होऊं लागले, अप्सरा आनंदित होऊन नाचूं लागल्या, आणि गंधर्व व किन्नर गाऊं लागले. ३५ आकाशांत सूर्य दिसावा, त्याप्रमाणें त्या विराधाच्या देहापासून अत्यंत तेजस्वी आकाराचा, निर्मल वस्त्रपरिधान करणारा, तापविलेल्या सोन्यासारख्या चकचकित अलंकारांनीं विभूषित, असा एक पुरुष प्रगट झाला. ३६ प्रणतांचीं[1] दुःखें दूर करणारा, संसारप्रवाहाचा

१. सदृश उतारा — जटाकलापशोभितं समस्तपापनाशकम्, स्वभक्तभीतिभंजनं भजे ह राममद्वयम् ॥ निजस्वरूपबोधकं कृपाकरं भवापहं, समं शिवं निरंजनं भजे ह राममद्वयम् '॥— व्यासकृत रामाष्टकम्.

घृणाकरम् । प्रणम्य भूयः प्रणनाम दंडवत्प्रपन्नसर्वार्तिहरं प्रसन्नधीः ॥ ३७ ॥ विराध उवाच ॥ श्रीराम राजीवदलायताक्ष विद्याधरोऽहं विमलप्रकाशः । दुर्वाससाऽकारणकोपमूर्तिना शप्तः पुरा सोऽद्य विमोचितस्त्वया ॥ ३८ ॥ इतः परं त्वच्चरणारविंदयोः स्मृतिः सदा मेऽस्तु भवोपशांतये । त्वन्नामसंकीर्तनमेव वाणी करोतु मे कर्णपुटं त्वदीयम् ॥ ३९ ॥ कथामृतं पातु करद्वयं ते पादारविंदार्चनमेव कुर्यात् । शिरश्च ते पादयुगप्रणामं करोतु नित्यं भवदीयमेवम् ॥ ४० ॥ नमस्तुभ्यं भगवते विशुद्धज्ञानमूर्तये । आत्मारामाय रामाय सीतारामाय वेधसे ॥ ४१ ॥ प्रपन्नं पाहि मां राम यास्यामि त्वदनुज्ञया ।

नाश करणारा, दयेची खाणच की काय, अशा श्रीरामाला त्यानें प्रणाम केला; नंतर प्रसन्नचित्तानें त्या शरणागतांची संकटें हरण करणाऱ्याला त्यानें पुनः पुनः साष्टांग नमस्कार घातले. ३७ विराध म्हणाला, ' कमलपत्रविशालाक्षा श्रीरामा ! मी अत्यंत तेजस्वी असा एक विद्याधर[1] आहें. अकारण क्रुद्ध होणाऱ्या दुर्वास[2] मुनीनें पूर्वीं एकदां मला शाप दिला होता, त्यापासून तुझ्याकडून आज माझी मुक्तता झाली आहे. ३८ म्हणून ह्यापुढें संसारपीडा नाहींशी व्हावी, यास्तव तुझ्या पद्कमलाची मला सर्वदा स्मृति[3] असावी. माझी वाणी तुझ्या नामाचें कीर्तन करो, माझें कर्णद्वय तुझ्या कथामृताचें प्राशन करो, माझे हात तुझ्या पद्कमलाचें अर्चन करोत; आणि माझें मस्तक तुझ्या चरणयुगलाला प्रणाम करो. अशा रीतीनें माझें सर्व शरीर तुझ्या सेवेंत नित्य तत्पर असो. ३९,४० भगवन् सीतारामा ! विशुद्धज्ञान —अपरोक्षज्ञान—हीं तुझी मूर्ति आहे, तूं स्वस्वरूपी रममाण होणारा आहेस; तूं सर्वांस रमविणारा आहेस; तूं अघटितघटनासमर्थ आहेस, तुला नमस्कार असो. ४१ हे रामा ! मी तुला शरण आलों आहें, माझें रक्षण कर. मी तुझ्या

१ गंधर्वांपैकीं एक जाति २ हा मोठा शीघ्रकोपी ऋषि होता. हा अत्रि आणि अनसूया यांचा पुत्र होय. ' दुर्वासाचा कोप ' ही प्रचलित म्हण झाली आहे ३. समानार्थक वर्णनः–( १ ) 'श्रीरामचंद्रचरणौ मनसा स्मरामि श्रीरामचंद्रचरणौ वचसा गृणामि । श्रीरामचंद्रचरणौ शिरसा नमामि श्रीरामचंद्रचरणौ शरणं प्रपद्ये ॥'–रामरक्षास्तोत्र. ( २ ) ' ते जन्मभाज खलु जीवलोके येषां मनो ध्यायति विश्वनाथम् । वाणी गुणान् स्तौति कथां शृणोति श्रोत्रद्वयं ते भवमुत्तरन्ति ' ॥

देवलोकं रघुश्रेष्ठ माया मां मावृणोतु ते ॥ ४२ ॥ इति विज्ञापितस्तेन प्रसन्नो रघुनंदनः । ददौ वरं तदा प्रीतो विराधाय महामतिः ॥ ४३ ॥ गच्छ विद्याधराशेषमायादोषगुणा जिताः । त्वया मद्दर्शनात्सद्यो मुक्तो ज्ञानवतां वरः ॥ ४४ ॥ मद्भक्तिर्दुर्लभा लोके जाता चेन्मुक्तिदा यतः। अतस्त्वं भक्तिसंपन्नः परं याहि ममाज्ञया ॥ ४५ ॥ रामेण रक्षोनिधनं सुघोरं शापाद्विमुक्तिर्वरदानमेवम् । विद्याधरत्वं पुनरेव लब्धं रामं गृणन्नेति नरोऽखिलार्थान् ॥ ४६ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अरण्यकांडे प्रथमः सर्गः ॥ १ ॥

## अरण्यकांड, सर्ग दुसरा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ विराधे स्वर्गते रामो लक्ष्मणेन च सीतया । जगाम शरभंगस्य वनं सर्वसुखावहम् ॥ १ ॥ शरभंगस्ततो

आज्ञेनें देवलोकीं जाइन. हे रघुश्रेष्ठा ! तुझा माया मला मोहित न करो.' ४२ अशी त्यानें—विराधानें—विज्ञापना केली असतां श्रीरामचंद्र प्रसन्न झाला. संतुष्ट होऊन बुद्धिमान् रामानें विराधाला वर दिला आणि सांगितलें, ४३ ' हे विराधा ! जा, मायादोषाचे परिणाम तूं जिंकून टाकिले आहेस. ज्ञानी लोकांमध्यें श्रेष्ठ होऊन तूं मुक्त झाला आहेस. ४४ लोकांमध्यें दुर्मिळ अशी माझी भक्ति उत्पन्न झाली असतां मुक्ति मिळतेच. त्या अर्थी भक्तिसंपन्न होत्साता तूं माझ्या आज्ञेनें मोक्षाला पावशील.'[१] ४५ श्रीरामानें अत्यंत भयंकर राक्षसाचा नाश केला, त्याला शापविमुक्त करून वर दिला, आणि ( अशा रीतीनें ) तो राक्षस पुनः विद्याधर झाला. जो कोणी रामचरित्र वर्णन करितो, त्याला सकल इच्छित वस्तूंची प्राप्ति होते." ४६

**अरण्यकांड, प्रथम सर्ग समाप्त.**

श्रीशंकर म्हणाला, " विराध स्वर्गाला गेला असतां लक्ष्मण आणि सीता यांसहवर्तमान राम शरभंगाच्या वनांत गेला. तें वन सर्व प्राण्यांना सुखावह असें होतें. १ लक्ष्मणा-

१. ' मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु । मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि ॥ ' भ. गीता, अध्याय १८,६५.

दृष्ट्वा रामं सौमित्रिणा सह । आयांतं सीतया सार्धं संभ्रमादुत्थितः सुधीः ॥ २ ॥ अभिगम्य सुसंपूज्य विष्टरेषूपवेशयत् । आतिथ्यमकरोत्तेषां कंदमूलफलादिभिः ॥ ३ ॥ प्रीत्याह शरभंगोऽपि रामं भक्तपरायणम् । बहुकालमिहैवासं तपसे कृतनिश्चयः ॥ ४ ॥ तव संदर्शनाकांक्षी राम त्वं परमेश्वरः । अद्य मत्तपसा सिद्धं यत्पुण्यं बहु विद्यते । तत्सर्वं तव दास्यामि ततो मुक्तिं व्रजाम्यहम् ॥ ५ ॥ समर्प्य रामस्य महत्सुपुण्यफलं विरक्तः शरभंगयोगी । चितिं समारोहयदप्रमेयं रामं ससीतं सहसा प्रणम्य ॥ ६ ॥ ध्यायंश्चिरं राममशेषहृत्स्थं दूर्वादलश्यामलमंबु-

सह सीतेला घेऊन आलेल्या रामाला पाहून तो बुद्धिमान् ( ऋषि ) लगेच उठला, २ आणि सामोरा जाऊन त्यानें त्या तिघांचें आदरपूर्वक पूजन केलें आणि आसनांवर बसवून कंदमूलफलादिकांनी आतिथ्य केलें ३ नंतर शरभंग प्रीतिपूर्वक त्या भक्तवत्सल रामाला म्हणाला, ‘ ( रामा ! ) तप करण्याच्या निश्चयानें मी येथें बराच काळ राहिलों. ४ त्यांत तुझें दर्शनं व्हावें हीच माझी मोठी इच्छा होती. कारण रामा ! तूं प्रत्यक्ष परमेश्वर आहेस. माझ्या तपश्चर्येच्या सिद्धीनें जें बरेंच पुण्य मी मिळविलें आहे, तें सर्व आज तुला अर्पण करितों, नंतर मी मुक्तीस जाईन.’ ५ ( असें बोलून ) त्या विरक्त शरभंग मुनीनें आपलें मोठें पुण्यफल रामाला अर्पण केलें. नंतर त्यानें सीतेला आणि त्या अप्रमेय-अनिर्वचनीय-रामाला प्रणाम करून तत्काल चितेवर आरोहण केलें. ६ जो सर्वांच्या हृदयांत राहतो, दूर्वादलाप्रमाणें ज्याचा श्यामवर्ण आहे, कमलासमान ज्याचे डोळे आहेत, ज्यानें वल्कल परिधान केलें आहे, ज्यानें सुंदर जटाकलाप मस्तकीं धारण

१. या प्रसंगाचें एकनाथांनी असें वर्णन केलें आहे.—‘लोकलोकांतर प्राप्त । ऐसें पुण्य केलें अद्भुत । परी तें तुज अर्पिलें समस्त । श्रीरघुनाथ प्रीति पावो ॥ तुजसीं जंव होय भेटी । तंव प्रारब्धदेहाची गांठी । तुज देखतां जगजेठी । उठाउठीं देह पडेल ॥ तुज देखतां सावधान । करूनि निजदेहाचें दहन । करीन सत्यलोका गमन । तंव आपण स्थिर व्हावें ॥ ऐसें बोलोनियां जाण । श्रीरामादेखतां आपण । शरभंगानें घालोनियां आसन । केलें दहन योगाग्नियोगें’ ॥—भावार्थरामायण, अरण्यकांड ३. २. अर्थसादृश्य —‘ध्यात्वा नीलोत्पलश्यामं रामं राजीवलोचनम् । जानकीलक्ष्मणोपेतं जटामुकुटमंडितम् । सासितूणधनुर्बाणपाणिं नक्तंचरांतकम् । स्वलीलया जगत्त्रातुमाविर्भूतमजं विभुम् ’ ॥—रामरक्षा.

जाक्षम् । चीरांबरं स्निग्धजटाकलापं सीतासहायं सहलक्ष्मणं तम् ॥७॥ को वा दयालुः स्मृतकामधेनुरन्यो जगत्यां रघुनायकादहो । स्मृतो मया नित्यमनन्यभाजा ज्ञात्वा स्मृतिं मे स्वयमेव यातः ॥ ८ ॥ पश्य-त्विदानीं देवेशो रामो दाशरथिः प्रभुः । दग्ध्वा स्वदेहं गच्छामि ब्रह्म-लोकमकल्मषः ॥ ९ ॥ अयोध्याधिपतिर्मेऽस्तु हृदये राघवः सदा । यद्वामांके स्थिता सीता मेघस्येव तडिल्लता ॥ १० ॥ इति रामं चिरं ध्यात्वा दृष्ट्वा च पुरतः स्थितम् । प्रज्वाल्य सहसा वह्निं दग्ध्वा पंचा-त्मकं वपुः ॥ ११ ॥ दिव्यदेहधरः साक्षाद्ययौ लोकपतेः पदम् । ततो मुनिगणाः सर्वे दंडकारण्यवासिनः । आजग्मू राघवं द्रष्टुं शरभंगनिवे-शनम् ॥ १२ ॥ दृष्ट्वा मुनिसमूहं तं जानकीरामलक्ष्मणाः । प्रणेमुः

केला आहे, ज्याबरोबर सीता आणि लक्ष्मण आहेत, अशा श्रीरामाचें त्यानें एकसारखें ध्यान चालविलें. ७ ( तो म्हणाला, ) 'स्मरण केलें असतां कामधेनूसारखा इच्छित हेतु पुरविणारा जगतांत रामचंद्राहून दुसरा दयाळू कोण आहे ? अनन्यभावानें मी त्याचें स्मरण केलें आहे, आणि हीच गोष्ट जाणून त्यानें आज मला दर्शन दिलें आहे. ८ देवाधिपति दाशरथि रामचंद्र प्रभु आतां मला पाहो ! निष्पाप होत्साता मी स्वतःच्या देहाचें दहन करून ब्रह्मलोकाला जातों. ९ मेघावर विद्युल्लतेप्रमाणें ज्याच्या वामांकावर सीता आरूढ झाली आहे, असा तो अयोध्यापति श्रीराम माझ्या हृदयांत सर्व काळ वास करो.' १० नंतर रामाचें चिरकाळ ध्यान करून, आणि पुढें असलेल्या त्याच्या प्रत्यक्ष मूर्तीचें दर्शन घेऊन त्यानें अग्नि पेटविला, आणि त्यांत आपलें पंचभूतात्मक शरीर जाळून टाकलें. ११ या प्रकारें तो (शरभंग) दिव्य देहधारी होऊन लोकपतीच्या—विष्णूच्या—पदाला गेला. नंतर दंडकारण्यांत राहणारे सर्व मुनि रामाला पाहण्याकरितां शरभंगाच्या आश्रमाला आले. १२ त्या मुनिसमूहाला पाहून मायेनें मनुष्यांची रूपें धारण करणाऱ्या सीता, राम आणि

१. श्रीराम ( कीर्ति ) कामधेनु –' मन हें विषयीं उडीच घाली । विष हें जाणुनि त्यावरी विटावें॥ तव कीर्ति उदार कामधेनू । तिस मी होउनि वासरू चिटावें ॥'–आशंसाष्टक, मोरोपंत.
२. ' रमानाथो रामो रमतु मम चित्ते तु सततम् ' ॥–रामचंद्राष्टक.

सहसा भूमौ मायामानुषरूपिणः ॥ १३ ॥ आशीर्भिरभिनंद्याथ रामं सर्वहृदि स्थितम् । ऊचुः प्रांजलयः सर्वे धनुर्बाणधरं हरिम् ॥ १४ ॥ भूमेर्भारावताराय जातोऽसि ब्रह्मणाऽर्थितः । जानीमस्त्वां हरिं लक्ष्मीं जानकीं लक्ष्मणं तथा ॥ १५ ॥ शेषांशं शंखचक्रे द्वे भरतं सानुजं तथा । अतश्चादौ ऋषीणां त्वं दुःखं मोक्तुमिहार्हसि ॥ १६ ॥ आगच्छ यामो मुनिसेवितानि वनानि सर्वाणि रघूत्तम क्रमात् । द्रष्टुं सुमित्रासुतजानकीभ्यां तदा दयास्मासु दृढा भविष्यति ॥ १७ ॥ इति विज्ञापितो रामः कृतांजलिपुटैर्विभुः । जगाम मुनिभिः सार्धं द्रष्टुं मुनिवनानि सः ॥ १८ ॥ ददर्श तत्र पतितान्यनेकानि शिरांसि सः । अस्थिभूतानि सर्वत्र रामो वचनमब्रवीत् ॥ १९ ॥ अस्थीनि केषामेतानि किमर्थं पतितानि वै । तमचुर्मुनयो राम ऋषीणां मस्तकानि हि ॥ २० ॥ राक्षसैर्भक्षितानीश

लक्ष्मण यानीं भूमीवर साष्टांग नमस्कार घातला. १३ तेव्हां सर्वांच्या हृदयांत राहणाऱ्या रामाला त्या ऋषींनी आशीर्वाद दिला आणि त्याचें अभिनंदन केलें. नंतर हात जोडून त्यांनी त्या धनुर्बाणधारी हरीला–भक्ताच्या दुःखें हरण करणाऱ्या रामाला–म्हटलें, १४ '(हे रामा !) ब्रह्मदेवानें प्रार्थना केल्यावरून भूमीचा भार हरण करण्याकरितां तूं अवतार धारण केला आहेस; तूं प्रत्यक्ष हरि आहेस, जानकी लक्ष्मी आहे, लक्ष्मण शेषाचा अंश आहे, आणि भरतशत्रुघ्न शंखचक्र आहेत, हें आम्ही जाणतों. म्हणून आधीं तूं ऋषींचीं दुःखें हरण करावीं, हें योग्य आहे. १५, १६ हे रघूत्तमा ! लक्ष्मण आणि जानकी यांना घेऊन मुनींचीं सर्व आश्रमस्थानें क्रमानें पहाण्यास चल जाऊं या. असें केल्यानें आम्हावरील तुझी दया दृढ होईल.' १७ अशी ऋषींनी हात जोडून प्रार्थना केली असतां तो प्रभु रामचंद्र तीं मुनींचीं वनें पाहण्याकरितां त्यांबरोबर गेला. १८ तेथें सर्वत्र पडलेलीं अनेक मस्तकांचीं हाडें त्याच्या दृष्टीस पडलीं. (तीं पाहून) राम म्हणाला, १९ 'हीं कोणाचीं हाडें आहेत, आणि हीं येथें कशाकरितां पडलीं आहेत ?' त्यावर ते मुनि म्हणाले, 'रामा ! हीं ऋषींचीं मस्तकें आहेत. २० प्रभो ! ऋषींनी समाधि उतर-

१. 'अंतर्बाह्य कृपाळा ! सर्वां जीवांसि वेष्टुनी असती' ॥–आर्या–केकावलि–मोरोपंत.

प्रमत्तानां समाधितः । अंतरायं मुनीनां ते पश्यंतोऽनुचरंति हि ॥ २१ ॥ श्रुत्वा वाक्यं मुनीनां स भयदैन्यसमन्वितम् । प्रतिज्ञामकरोद्रामो वधायाशेषरक्षसाम् ॥ २२ ॥ पूज्यमानः सदा तत्र मुनिभिर्वनवासिभिः। जानक्या सहितो रामो लक्ष्मणेन समन्वितः॥२३॥ उवास कतिचित्तत्र वर्षाणि रघुनंदनः । एवं क्रमेण संपश्यन्नृषीणामाश्रमान्विभुः ॥ २४ ॥ सुतीक्ष्णस्याश्रमं प्रागात्प्रख्यातमृषिसंकुलम् । सर्वर्तुगुणसंपन्नं सर्वकालसुखावहम् ॥ २५ ॥ राममागतमाकर्ण्य सुतीक्ष्णः स्वयमागतः । अगस्त्यशिष्यो रामस्य मंत्रोपासनतत्परः । विधि-

त्यावर हा त्यांचा मस्तक राक्षसानी खाऊन टाकला आहेत. ऋषींच कांहीतरी व्यंग पाहूनच ते त्यांच्या सभोंवतीं फिरत असतात. २१ हें भय आणि दैन्य यांनी युक्त असें त्या मुनींचें भाषण ऐकून रामानें सकल राक्षसांचा वध करण्याची प्रतिज्ञा केली. २२ मग जानकी आणि लक्ष्मण यांसह तो रघुनंदन—राम—तेथें कांहीं वर्षें राहिला. तेथें ते वनवासी ऋषि त्याची सदा पूजा करीत असत. पुढें क्रमाक्रमानें ऋषींचे आश्रम पहात पहात प्रभु ( रामचंद्र ) सुतीक्ष्ण ऋषींच्या प्रसिद्ध आश्रमाला आला. त्या आश्रमांत अनेक ऋषि राहात असत. तेथें सर्व ऋतूंतील ( फळांफुलांची ) सुबत्ता नित्य असल्यामुळें तें ठिकाण ( सर्वांस ) सर्व काल सुखावह वाटत असे. २३, २४, २५ राम आला आहे, असें ऐकून सुतीक्ष्ण स्वतः त्याजकडे आला. हा ( सुतीक्ष्ण ) अगस्त्य ऋषींचा शिष्य असून राममंत्रोपासनेंत अत्यंत तत्पर असे. भक्तीमुळें ( रामाच्या ठिकाणी ) त्याचे डोळे अत्यंत उत्कंठित होऊन राहिले होते.

१ अगस्त्य हा एक प्रख्यात ऋषि होऊन गेला. याजसंबंधी अनेक आख्यायिका पुराणात आढळतात, व त्याजवरून त्याला कुंभयोनि, घटोद्भव, मैत्रावरुणि अशी अनेक नावें पडलीं आहेत. समुद्रप्राशन केल्यावरून याला पीताब्धि असेंही नांव आहे तत्संबंधीं कथा अशी आहे'–पूर्वी कालेय नावाचे दैत्य होते. ते दिवसा समुद्रात लपून राहात व रात्री ऋषि, ब्राह्मण वगैरे मंडळीला पीडा देत असत. हे राक्षस देवानाही अजिंक्य झाले होते. पुढें विष्णूच्या सागण्यावरून अगस्त्यानें समुद्राचें प्राशन केलें. पुढें देवानीं कालेयाना समुद्रातून ओढून काढून त्याशीं युद्ध केलें आणि त्यास ठार मारिलें. अगस्त्याचा आश्रम विन्ध्यपर्वताच्या दक्षिणेस होता. ह्यानें वातापी नावाच्या राक्षसास खाऊन टाकल्याची कथा प्रसिद्ध आहे. ' अगस्त्यो दक्षिणामाशामाश्रित्य नभसि स्थित. । वरुणस्यात्मजो योगी विन्ध्यवातापिमर्दनः ॥ '

वत्पूजयामास भक्त्युत्कंठितलोचनः ॥ २६ ॥ ॥ सुतीक्ष्ण उवाच ॥ त्वन्मंत्रजाप्यहमनंतगुणाप्रमेय सीतापते शिवविरिंचिसमाश्रितांघ्रे । संसारसिंधुतरणामलपोतपाद रामाभिराम सततं तव दासदासः ॥ २७ ॥ मामद्य सर्वजगतामविगोचरस्त्वं त्वन्मायया सुतकलत्रगृहांधकूपे । मग्नं निरीक्ष्य मलपुद्गलपिंडमोहपाशानुबद्धहृदयं स्वयमागतोऽसि ॥ २८ ॥ त्वं सर्वभूतहृदयेषु कृतालयोऽपि त्वन्मंत्रजाप्यविमुखेषु तनोषि मायाम् । त्वन्मंत्रसाधनपरेष्वपयाति माया सेवानुरूपफलदोऽसि यथा महीपः

त्यानें यथाविधि रामाची पूजा केली. २६ सुतीक्ष्ण म्हणाला, 'हे सीतापते! मी तुझ्या नाममंत्राचा जप करीत असतों. तुझे गुण अनंत आहेत, तुझ्या स्वरूपाला इयत्ता नाहीं; तुझ्या चरणांचा आश्रय शंकर, ब्रह्मदेव, यांनी केला आहे; तुझे पाय म्हणजे संसारसमुद्र तरून जाण्याची उत्तम नौकाच होत. हे रामा! तूं सर्वांना रमविणारा आहेस. मी सदोदित तुझ्या दासांचा दास आहें. २७ तुझें ज्ञान जगतांत कोणालाही नाहीं. तुझ्या मायेनें मी स्त्री, पुत्र, गृहादिरूपी अंधारमय विहिरीत बुडालों होतों. मळाचा सुंदर गोळाच, अशा शरीराच्या मोहपाशांत माझें हृदय बद्ध होऊन गेलें होतें. अशा मला पाहून तूं स्वतः होऊन आज मजकडे आलास. २८ तूं सर्व प्राण्यांच्या हृदयांत वसती करितोस, तरी तुझ्या मंत्राचा जप करण्यांत जे विमुख आहेत, त्यांजवर तूं आपली माया पसरतोस. तसेंच जे तुझे मंत्रसाधनांत तत्पर असतात, त्यांजपासून तुझी माया दूर जाते. ज्याप्रमाणें राजा आपल्या सेवकांस त्यांच्या सेवेनुरूप फळ देतो, त्याप्रमाणें तूंही आपेल्या भक्तांना त्यांच्या

१. सन्मानार्थक वर्णनः—'नाव तुझें नावचि या ससाराभोधिला तरायासी। तें हृदयीं धरली-ही मी का अद्यापि साग आयासी?' ४०—आर्याकेकावलि, मोरोपंत. २. 'माझी माता पिता माझे बंधूजन । कन्या पुत्र धन सर्व माझें ॥ सर्व माझे ऐसा मानीला भरंसा । तुज जगदीशा विसरलों' ॥–वैराग्यशतक, रामदास. ३. 'देह विटाळाचा गोळा । कैसा होतोसी सोंवळा ॥ दृढ केला अभिमान । तेणें जाहले बंधन' ॥–रामदास, स्फुट अभंग. ४. (१) 'मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ॥'–भ. गीता ७, १४. (२) 'हरीभक्तिचा घाव घालीं निशाणीं । नुपेक्षी कदा राम दासाभिमानी' ॥–मनाचे श्लोक, रामदास. ५. 'ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम' ॥ भ. गीता.

॥ २९ ॥ विश्वस्य सृष्टिलयसंस्थितिहेतुरेकस्त्वं मायया त्रिगुणया विधिरीशविष्णू । भासीश मोहितधियां विविधाकृतिस्त्वं यद्वद्रविः सलिलपात्रगतो ह्यनेकः ॥ ३० ॥ प्रत्यक्षतोऽद्य भवतश्चरणारविंदं पश्यामि राम तमसः परतः स्थितस्य । दृग्रूपतस्त्वमसतामविगोचरोऽपि त्वन्मंत्रपूतहृदयेषु सदा प्रसन्नः ॥ ३१ ॥ पश्यामि राम तव रूपमरूपिणोऽपि मायाविडंबनकृतं सुमनुष्यवेषम् । कंदर्पकोटिसुभगं कमनीयचापबाणं दयार्द्रहृदयं स्मितचारुवक्त्रम् ॥ ३२ ॥ सीतासमेतमजिनांबरमप्रधृष्यं सौमित्रिणा नियतसेवितपादपद्मम् । नीलोत्पलद्युतिमनंतगुणं प्रशांतं तद्भागधेयमनिशं प्रणमामि रामम् ॥ ३३ ॥ जानंतु राम तव रूपम-

सेवेप्रमाणें फलदायी होतोस. २९ जगाची उत्पत्ति, संहार आणि पालन यांना तूंच एक कारण आहेस, त्याचप्रमाणें आपल्या त्रिगुणात्मक मायेनें हे ईशा ! तूंच ब्रह्मा, शंकर आणि विष्णु या रूपांनी भासतोस. ज्याप्रमाणें सूर्य पाण्याच्या अनेक भांड्यांत प्रतिबिंबित झाला म्हणजे विविध आकारांचा दिसतो, त्याचप्रमाणें तुझ्या मायेनें मोहितबुद्धि झालेल्या लोकांना तुझी वेगवेगळी रूपें दिसतात. ३० श्रीरामा ! तमोगुणाच्या पलीकडे वास्तव्य करणाऱ्या तुझ्या चरणकमलाचें प्रत्यक्ष दर्शन आज मला घडत आहे असज्जनांना तुझें स्वरूप कळून येण्याजोगें नाही. ज्यांचीं हृदयें तुझ्या मंत्राच्या जपानें पवित्र झाली आहेत, अशांच्याच हृदयांत तूं प्रसन्नतेनें वास करतोस. ३१ रामा ! तुला रूप नसूनही मायेच्या योगानें जें उत्तम मनुष्यरूप तूं धारण केलें आहेस, त्या स्वरूपांत तुझें दर्शन मला घडत आहे. हें तुझें रूप कोटिमदनांप्रमाणें मनोहर आहे. हातांत सुंदर धनुष्यबाण असून अंतःकरण दयार्द्र आहे, आणि हास्याच्या योगें मुखाला शोभा आली आहे. ३२ रामा ! सीतेच्या संगतीत तुझें दर्शन मला झालें, हें माझें भाग्य होय. तूं कृष्णाजिन धारण केलें आहेस, तुला कोणापासूनही भीति नाहीं, लक्ष्मण तुझ्या चरणकमलाची नित्य सेवा करीत आहे, नीलकमलाप्रमाणें तुझी अंगकांति आहे, तुझे गुण अनंत आहेत, तूं प्रशांत आहेस. अशा तला मी नित्य प्रणाम करितों. ३३ रामा ! देशकालादि सकल उपाधि-

१. सदृश उतारा.–' सत्तत्त्वमाश्रिता शक्तिः कल्पयेत् सति विक्रियाः । वर्णा भित्तिगता भित्तौ चित्रं नानाविधं यथा ' ॥–पंचदशी, महाभूतविवेक. २. सदृश वर्णन–' तुज हात जोडितो जो त्याचे अपराध घालिशी पोटी । ' रामप्रार्थना, मोरोपंत.

शेषदेशकालाद्युपाधिरहितं घनचित्प्रकाशम् । प्रत्यक्षतोऽद्य मम गोचरमेतदेव रूपं विभातु हृदये न परं विकांक्षे ॥ ३४ ॥ इत्येवं स्तुवतस्तस्य रामः सस्मितमब्रवीत् । मुने जानामि ते चित्तं निर्मलं मदुपासनात् ॥३५॥ अतोऽहमागतो द्रष्टुं मदृते नान्यसाधनम् । मन्मंत्रोपासका लोके मामेव शरणं गताः ॥ ३६ ॥ निरपेक्षा नान्यगतास्तेषां दृश्योऽहमन्वहम् । स्तोत्रमेतत्पठेद्यस्तु त्वत्कृतं मत्प्रियं सदा ॥ ३७ ॥ सद्भक्तिर्मे भवेत्तस्य ज्ञानं च विमलं भवेत् । त्वं ममोपासनादेव विमुक्तोऽसीह सर्वतः ॥३८॥ देहांते मम सायुज्यं लप्स्यसे नात्र संशयः । गुरुं ते द्रष्टुमिच्छामि ह्यगस्त्यं मुनिनायकम् । किंचित्कालं तत्र वस्तुं मनो मे त्वरयत्यलम् ॥ ३९ ॥ सुतीक्ष्णोऽपि तथेत्याह श्वो गमिष्यसि राघव । अहमप्याग-

रहित, पूर्णज्ञानप्रकाशरूप, असें तुझें स्वरूप ज्ञानी जाणोत, मला तर असें वाटतें, की आज प्रत्यक्ष गोचर झालें आहे, तेंच तुझें ( सगुण ) रूप माझ्या हृदयांत नित्य शोभो. ह्याहून दुसरें कांहीं मी इच्छित नाही.' ३४ अशा प्रकारें तो ऋषि स्तुति करीत असतां राम हंसत म्हणाला, ' मुने ! माझ्या उपासनेनें तुझें चित्त निर्मल झालें आहे, हें मी जाणतों. ३५ आणि त्यामुळें तुला भेट देण्याला मी आलों आहें. माझ्यावांचून दुसरें साधन–तरणोपाय–नाही. जगामध्यें माझ्या ( नाम ) मंत्राची उपासना करितात, आणि मला शरण येतात, अन्य कशाचीही इच्छा करीत नाहीत, दुसऱ्याकडे जात नाहीत, त्यांनाच माझें प्रतिदिनी दर्शन होतें. हें तूं केलेलें स्तोत्र मला प्रिय असून त्याचा जो नित्य पाठ करील, त्याची माझ्या ठिकाणी भक्ति जडेल, आणि त्याला विमल ज्ञानाची प्राप्ति होईल. माझ्या उपासनेनेंच तूं आज सर्वस्वीं मुक्त झाला आहेस. ३६, ३७, ३८ देहांती तूं मत्स्वरूपीं लय पावशील यांत संशय नाही. तुझा गुरु मुनिश्रेष्ठ जो अगस्त्यमुनि त्याचे दर्शनाची मला इच्छा आहे. कांहीं काल तेथें रहाण्याविषयी माझें मन अत्यंत उत्कंठित झालें आहे.' ३९ सुतीक्ष्ण

१. ' पैं सर्वभावेंसि उखिते । जे वोपिले मज चित्ते । जैसा गर्भगोळू उद्यमाते । कोणाही नेणे ॥ तैसा मीवाचूनि काही । आणीक गोमटेंचि नाहीं । मजचि नाम पाहीं । जिणेंया ठेविलें ॥ ऐसे अनन्य गतिकें चित्ते । चिंतितसाते माते । जे उपासिती तयाते ॥ मीचि सेवीं ॥ ते एकवटूनि जिये क्षणीं । अनुसरले गा माझिये वाहाणीं । तेव्हांचि तयाची चिंतवणी । मजचि पडली ' ॥–ज्ञानेश्वरी ९

मिष्यामि चिराद्दृष्टो महामुनिः ॥ ४० ॥ अथ प्रभाते मुनिना समेतो रामः ससीतः सहः लक्ष्मणेन । अगस्त्यसंभाषणलोलमानसः शनैरगस्त्यानुजमंदिरं ययौ ॥ ४१ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अरण्यकांडे द्वितीयः सर्गः ॥ २ ॥

## अरण्यकांड, सर्ग तिसरा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ अथ रामः सुतीक्ष्णेन जानक्या लक्ष्मणेन च । अगस्त्यस्यानुजस्थानं मध्याह्ने समपद्यत ॥ १ ॥ तेन संपूजितः सम्यग्भुक्त्वा मूलफलादिकम् । परेद्युः प्रातरुत्थाय जग्मुस्तेऽगस्त्यमंडलम् ॥ २ ॥ सर्वर्तुफलपुष्पाढ्यं नानामृगगणैर्युतम् । पक्षिसंघैश्च विविधैर्नादितं नंदनोपमम् ॥ ३ ॥ ब्रह्मर्षिभिर्देवर्षिभिः सेवितं

मुनिही म्हणाला, 'राघवा ! ठीक आहे, उद्यां तूं तिकडे जावें; मीही त्या मुनीचें दर्शन घेतल्याला बरेच दिवस झाले आहेत. तरी मीही तुझ्याबरोबर येईन.' ४० पुढें अगस्त्याशीं भाषण करण्याची अत्यंत उत्कंठा धारण करून प्रभातकाली राम, तो मुनि (सुतीक्ष्ण), सीता आणि लक्ष्मण यांसमवेत हळूहळू अगस्त्याचा कनिष्ठ बंधु ज्या ठिकाणीं राहत असे, तेथें येऊन पोंचला." ४१

**अरण्यकांड, दुसरा अध्याय समाप्त.**

श्रीशंकर ( पार्वतीस ) म्हणाला, " पुढें सुतीक्ष्ण, जानकी आणि लक्ष्मण यांसहवर्तमान मध्याह्नसमयीं राम अगस्त्याच्या कनिष्ठ बंधूच्या आश्रमाला येऊन पोंचला. १ त्यानें रामाची उत्तम प्रकारें पूजा केली. नंतर रामानें उत्तम मुळें, फळें इत्यादिकांचा यथेष्ट आहार केला. दुसरे दिवशी सकाळी उठल्यावर ते ( सर्व ) अगस्त्याच्या आश्रमाला गेले. २ त्या आश्रमांत सर्व ऋतूंचीं फळें आणि फुलें सदैव विपुल मिळत असत, तेथें अनेक जातीचे पशुसमुदाय असत, तसेंच विविध पक्षिकुळें तेथें एकसारखे शब्द करीत असत. तेणेंकरून त्या ठिकाणाला नंदनवनाची शोभा आली होती. ३ तेथें अनेक ब्रह्मर्षि, तसेच देवर्षि राहत असून सर्व बाजूंनीं

१. इंद्राचे उपवन. २ देवस्वरूपाला प्राप्त झालेले अत्रि, भृगु वगैरे ऋषि.

मुनिमंदिरैः । सर्वतोऽलंकृतं साक्षाद्ब्रह्मलोकमिवापरम् ॥ ४ ॥ बहिरे-
वाश्रमस्याथ स्थित्वा रामोऽब्रवीन्मुनिम् । सुतीक्ष्ण गच्छ त्वं शीघ्रमागतं
मां निवेदय ॥ ५ ॥ अगस्त्यमुनिवर्याय सीतया लक्ष्मणेन च । महा-
प्रसाद इत्युक्त्वा सुतीक्ष्णः प्रययौ गुरोः ॥ ६ ॥ आश्रमं त्वरया तत्र
ऋषिसंघसमावृतम् । उपविष्टं रामभक्तैर्विशेषेण समायुतम् ॥ ७ ॥
व्याख्यातराममंत्रार्थं शिष्येभ्यश्चातिभक्तितः । दृष्ट्वागस्त्यं मुनिश्रेष्ठं
सुतीक्ष्णः प्रययौ मुनेः ॥ ८ ॥ दंडवत्प्रणिपत्याह विनयावनतः सुधीः ।
रामो दाशरथिर्ब्रह्मन् सीतया लक्ष्मणेन च । आगतो दर्शनार्थं ते बहि-
स्तिष्ठति सांजलिः ॥ ९ ॥ अगस्त्य उवाच ॥ शीघ्रमानय भद्रं ते
रामं मम हृदि स्थितम् । तमेव ध्यायमानोऽहं कांक्षमाणोऽत्र संस्थितः
॥ १० ॥ इत्युक्त्वा स्वयमुत्थाय मुनिभिः सहितो द्रुतम् । अभ्ययात्प-
रया भक्त्या गत्वा राममथाब्रवीत ॥ ११ ॥ आगच्छ राम भद्रं ते

मुनिमंदिरें होतीं, त्यामुळें तो प्रदेश सुशोभित होऊन दुसरा ब्रह्मलोकच आहे कीं काय असें वाटत असे. ४ राम आश्रमाच्या बाहेरच राहून ( सुतीक्ष्ण ) मुनीला म्हणाला, 'सुतीक्ष्णा ! तूं लवकर जा, आणि मी, लक्ष्मण आणि सीता यांसह आल्याचें मुनिश्रेष्ठ अगस्त्याला सांग.' हा आपल्यावर मोठा अनुग्रहच आहे, असें समजून सुतीक्ष्ण त्वरेनें गुरूच्या—अगस्त्याच्या—आश्रमाला गेला. तेथें ऋषिसमुदायानें वेष्टित असा अगस्त्य बसला होता. त्या मंडळीत विशेषेंकरून राम-भक्तांचाच भरणा असून त्यांस तो भक्तिपूर्वक राममंत्राचा अर्थ समजून सांगत होता. मुनिश्रेष्ठ अगस्त्याला पाहून बुद्धिमान् सुतीक्ष्ण त्याजवळ गेला, ५,६,७,८ आणि साष्टांग नमस्कार घालून नम्रतापूर्वक त्याला म्हणाला, 'ब्रह्मन् ! दशरथपुत्र राम, सीता आणि लक्ष्मण यांसहवर्तमान आपल्या दर्शनाकरितां आला असून हात जोडून बाहेर उभा आहे.' ९ अगस्त्य म्हणाला, '( सुतीक्ष्णा ! ) तुझें कल्याण होवो. रामाला लवकर घेऊन ये. तो माझ्या हृदयांत वसत आहे. त्याचे आगम-नाची इच्छा धरून त्याचेंच चिंतन करीत मी येथें राहिलों आहें.' १० असें म्हणून ( अगस्त्य ) मुनि सर्व मुनींसह स्वतः उठला आणि अत्यंत भक्तिपूर्वक रामाला सामोरा गेला, आणि जवळ जाऊन त्याला म्हणाला, ११ 'रामा ! ये. तुझें

दिष्ट्या तेऽद्य समागमः । प्रियातिथिर्मम प्राप्तोऽस्यद्य मे सफलं दिनम् ॥ १२ ॥ रामोऽपि मुनिमायांतं दृष्ट्वा हर्षसमाकुलः । सीतया लक्ष्मणेनापि दंडवत्पतितो भुवि ॥ १३ ॥ द्रुतमुत्थाप्य मुनिराड्राममालिंग्य भक्तितः । तद्गात्रस्पर्शजाह्लादस्रवन्नेत्रजलाकुलः ॥ १४ ॥ गृहीत्वा करमेकेन करेण रघुनंदनम् । जगाम स्वाश्रमं हृष्टो मनसा मुनिपुंगवः ॥ १५ ॥ सुखोपविष्टं संपूज्य पूजया बहुविस्तरम् । भोजयित्वा यथान्यायं भोज्यैर्वन्यैरनेकधा ॥ १६ ॥ सुखोपविष्टमेकांते रामं शशिनिभाननम् । कृतांजलिरुवाचेदमगस्त्यो भगवानृषिः ॥ १७ ॥ त्वदागमनमेवाहं प्रतीक्षन्समवस्थितः । यदा क्षीरसमुद्रांते ब्रह्मणा प्रार्थितः पुरा ॥ १८ ॥ भूमेर्भारापनुत्त्यर्थं रावणस्य वधाय च । तदादि दर्शनाकांक्षी

कल्याण असो. तुझा समागम घडला, ही मोठ्या आनंदाची गोष्ट होय. मला प्रिय असा तूं अतिथि घरी आल्यानें आजचा माझा दिवस सफल झाला आहे.’ १२ ( अगस्त्य ) मुनि येत आहे असें पाहून रामाला देखील अत्यंत आनंद झाला. त्यानें सीता आणि लक्ष्मण यांसह जमिनीवर दंडवत् प्रणाम केला. १३ त्या मुनिश्रेष्ठानें तावडतोब रामाला उठविलें आणि भक्तिपूर्वक त्याला आलिंगन दिलें. रामाच्या गात्रस्पर्शानें त्याला आनंद होऊन त्याच्या डोळ्यांतून सारखे आनंदाश्रू वाहूं लागले. १४ त्या मुनिपुंगवानें एका हातानें रामाचा हात धरिला; नंतर तो मनांत अत्यंत आनंदित होऊन आपल्या आश्रमांत गेला. १५ राम आनंदांत बसला असतां अगस्त्यानें त्याची यथासांग ( षोडशोपचारें[1] ) पूजा केली व अरण्यांतील अनेक प्रकारच्या खाद्य फलांनीं त्याला यथायोग्य भोजन घातलें. १६ पुढें तो चंद्रवदन राम एकांतांत बसला असतां भगवान् अगस्त्य मुनि हात जोडून त्याला म्हणाला, १७ ‘( रामा ! ) तुझ्या आगमनाची मी वाट पाहात राहिलों आहें. पूर्वी जेव्हां ब्रह्मदेवानें भूमीचा भार हरण्याचे कामीं रावणाचा वध करण्याविषयीं तुझी क्षीरसमुद्रांत प्रार्थना केली. तेव्हांपासून तुझे दर्शनाची इच्छा

१. षोडशोपचारयुक्त पूजा —‘आसनं स्वागतं पाद्यमर्घ्यमाचमनीयकम् । मधुपर्काचमस्नानं वसनाभरणानि च । गंधपुष्पे धूपदीपौ नैवेद्यं वंदनं तथा ॥’

तव राम तपश्चरन् । वसामि मुनिभिः सार्धं त्वामेव परिचिंतयन्
॥ १९ ॥ सृष्टेः प्रागेक एवासीर्निर्विकल्पोऽनुपाधिकः । त्वदाश्रया
त्वद्विषया माया ते शक्तिरुच्यते ॥ २० ॥ त्वामेव निर्गुणं शक्तिरावृ-
णोति यदा तदा । अव्याकृतमिति प्राहुर्वेदांतपरिनिष्ठिताः ॥ २१ ॥
मूलप्रकृतिरित्येके प्राहुर्मायेति केचन । अविद्या संसृतिर्बंध इत्यादि
बहुधोच्यते ॥ २२ ॥ त्वया संक्षोभ्यमाणा सा महत्तत्त्वं प्रसूयते ।
महत्तत्त्वादहंकारस्त्वया संचोदितादभूत् ॥ २३ ॥ अहंकारो महत्तत्त्वसं-
वृतस्त्रिविधोऽभवत् । सात्विको राजसश्चैव तामसश्चेति भण्यते ॥ २४ ॥
तामसात्सूक्ष्मतन्मात्राण्यासन् भूतान्यतः परम् । स्थूलानि क्रमशो राम
क्रमोत्तरगुणानि ह ॥ २५ ॥ राजसानींद्रियाण्येव सात्त्विका देवता

धरून तुझेंच चिंतन करीत ( ह्या ) मुनींसह तप करीत मी राहिलों आहें. १८,१९ सृष्टीच्या पूर्वी तूं एकच निर्विकल्प आणि उपाधिरहित असा होतास. तुझ्या ठिकाणी आश्रयत्वानें व विषयत्वानें असणारी माया ही तुझी शक्ति असें म्हटलें आहे. २० निर्गुणाला तुला ही शक्ति जेव्हां आवृत करिते, तेव्हां वेदांतशास्त्रनिष्णात लोक तिला ‘ अव्याकृत ’–प्रधान–असें म्हणतात. २१ कित्येक लोक तिला ‘ मूलप्रकृति ’ म्हणतात, कित्येक ‘ माया ’ म्हणतात, तर कोणी ‘ अविद्या, ’ कोणी ‘ संसृति, ’ कोणी ‘ बंध, ’ अशीं निरनिराळी नावें देतात. २२ तुजकडून क्षुब्ध केली गेली असतां ती माया ‘ महत्तत्त्व ’ प्रसवते, आणि तुझ्याकडून प्रेरणा झाली असतां त्या महत्तत्त्वापासून ‘ अहंकार ’ उद्भवतो. २३ महत्तत्त्वानें युक्त अशा अहंकाराचे तीन प्रकार आहेत. त्यांना ‘ सात्त्विक, ’ ‘ राजस, ’ आणि ‘ तामस ’ असें म्हणतात. २४ तामस अहंकारापासून ‘ सूक्ष्मभूतें ’ झाली. रामा ! त्या सूक्ष्मभूतांपासून ‘ स्थूलभूतें ’ झाली. त्यामध्यें क्रमानें एक एक गुण अधिक उत्पन्न झाला. २५

१ प्रपंचरहित २ कोणत्याही मोहच्यारहित अगर संबंधरहित. ३. आश्रयत्वानें राहणारी माया जीव हें ईश्वराचेच स्वरूप आहे. त्या जीवाच्या ठिकाणी आश्रयत्वानें राहणारी जी शक्ति ती माया व जीवाचे ठिकाणीं ईश्वरविषयक जे अज्ञान ती अविद्या होय. ४. या शक्तीला अव्यक्त असेंही म्हणतात. ५. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध–सूक्ष्म भूतें ६. पृथ्वी, आप्, तेज, वायु, आकाश, हीं स्थूल भूतें यामध्यें उत्तरोत्तर क्रमानें एक एक गुण वाढत जातो. उदाहरणार्थ, प्रथमत उत्पन्न होणाऱ्या आकाशाचा गुण शब्द. वायूचे गुण शब्द आणि स्पर्श, अग्नीचे शब्द, स्पर्श, रूप, उदकाचे शब्द, स्पर्श, रूप आणि रस; पृथ्वीचे शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध.

मनः । तेभ्योऽभवत्सूत्ररूपं लिंगं सर्वगतं महत् ॥ २६ ॥ ततो विराट्
समुत्पन्नः स्थूलाद्भूतकदंबकात् । विराजः पुरुषात्सर्वं जगत्स्थावरजंगमम्
॥ २७ ॥ देवतिर्यङ्मनुष्याश्च कालकर्मक्रमेण तु । त्वं रजोगुणतो
ब्रह्मा जगतः सर्वकारणम् ॥ २८ ॥ सत्त्वाद्विष्णुस्त्वमेवास्य पालकः
सद्भिरुच्यसे । लये रुद्रस्त्वमेवास्य त्वन्मायागुणभेदतः ॥ २९ ॥
जाग्रत्स्वप्नसुषुप्त्याख्या वृत्तयो बुद्धिजैर्गुणैः । तासां विलक्षणो राम त्वं
साक्षी चिन्मयोऽव्ययः ॥ ३० ॥ सृष्टिलीलां यदा कर्तुमीहसे रघुनंदन ।

राजस अहंकारापासून 'दश इंद्रियें[1]' व सात्त्विक अहंकारापासून 'देवतां[2]' आणि 'मन' ही उत्पन्न झालीं. त्यांपासून सूत्रात्मा–प्राण–झाला, आणि ही सगळी मिळून हें सर्व व्यापक समष्टि–अवयवी–लिंगशरीर[3] झालें आहे. २६ नंतर त्या स्थूलभूत समुदायापासून 'विराट्[4]' उत्पन्न झाला. ह्याच विराट् स्वरूपापासून सर्व स्थावरजंगमात्मक जगताची उत्पत्ति झाली. २७ अशा रीतीनें काल आणि कर्म यांच्या अनुरोधानें क्रमानें देव, पशुपक्षी, मनुष्यें इत्यादि निर्माण होतात. तूं रजोगुणाचा आश्रय केला म्हणजे सृष्टीचा उत्पादक 'ब्रह्मदेव' होतोस. २८ सत्त्वगुणाचा स्वीकार करून पालनकर्ता होतोस, तेव्हां तुला सत्पुरुष 'विष्णु' असें नांव देतात. ह्या सृष्टीच्या लयकाली तूंच 'रुद्र' होतोस. तुझ्या मायेच्या ( तीन ) गुणांच्या भेदानें कमीजास्त प्रमाणानें–बुद्धीवर निरनिराळे परिणाम होऊन त्यांपासून जागृति, स्वप्न, सुषुप्ति, ह्या नांवाच्या वृत्ति–अवस्था–होतात; त्या अवस्थांपासून तूं वेगळा आहेस, तूं त्यांचा केवळ साक्षी, ज्ञानस्वरूपी आणि विकाररहित असा आहेस. २९,३० हे रघुनंदना ! जेव्हां तुला सृष्टिरूप लीला करण्याची इच्छा उत्पन्न होते, तेव्हां तूं ( स्वतः गुणरहित आहेस तरी ) गुणवानाप्रमाणें मायेचा

१. ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें मिळून दहा इंद्रियें. ज्ञानेंद्रियें.–'श्रोत्र त्वक् चक्षुषी जिह्वा नासिका चैव पंचमी ।' कर्मेंद्रियाणि:–'वायूपस्थं हस्तपादं वाक् चैव दशमी स्मृता ॥'–मनुस्मृति. २. देवताः–दिशा, वायु, सूर्य, वरुण, अश्विनीकुमार, अग्नि, इंद्र, विष्णु, मित्र, प्रजापति, ह्या दश इंद्रियांच्या दहा देवता क्रमाने जाणाव्या. ३. सूक्ष्मशरीर. याला हिरण्यगर्भ अशीही संज्ञा आहे. ४ ब्रह्मांड, विश्व.

अंगीकरोषि मायां त्वं तदा वै गुणवानिव ॥ ३१ ॥ राम माया द्विधा भाति विद्याऽविद्येति ते तदा । प्रवृत्तिमार्गनिरता अविद्यावशवर्तिनः । निवृत्तिमार्गनिरता वेदांतार्थविचारकाः ॥ ३२ ॥ त्वद्भक्तिनिरता ये च ते वै विद्यामयाः स्मृताः । अविद्यावशगा ये तु नित्यं संसारिणश्च ते । विद्याभ्यासरता ये तु नित्यमुक्तास्त एव हि ॥ ३३ ॥ लोके त्वद्भक्तिनिरतास्त्वन्मंत्रोपासकाश्च ये । विद्या प्रादुर्भवेत्तेषां नेतरेषां कदाचन ॥ ३४ ॥ अतस्त्वद्भक्तिसंपन्ना मुक्ता एव न संशयः । त्वद्भक्त्यमृतहीनानां मोक्षः स्वप्नेऽपि नो भवेत् ॥ ३५ ॥ किं राम बहुनोक्तेन सारं किंचिद्ब्रवीमि ते । साधुसंगतिरेवात्र मोक्षहेतुरुदाहृता ॥ ३६ ॥ साधवः समचित्ता ये निःस्पृहा विगतैषिणः । दांताः प्रशांतास्त्वद्भक्ता निवृत्ताखिलकामनाः ॥ ३७ ॥ इष्टप्राप्तिविपत्त्योश्च समाः संगविवर्जिताः । संन्यस्ताखिलक-

अंगीकार करितोस. ३१ रामा! तुझी माया सर्वदा विद्या आणि अविद्या अशा दोन प्रकारांनी भासते. प्रवृत्तिमार्गांत[1]—संसारांत—आसक्त असतात, ते अविद्येला—अज्ञानाला—वश होतात, त्याचप्रमाणें जे निवृत्तिमार्गांत आसक्त असतात, वेदांतार्थाचा विचार करितात, आणि तुझ्या भक्तींत रममाण होऊन जातात, तेच विद्यामय-ज्ञानमय-होत असें म्हटलें आहे. अविद्येच्या आधीन झालेले सर्वदा संसारीच राहतात, तसेंच विद्याभ्यासांत—तत्त्वज्ञानाभ्यासात—रत होणारे नित्यमुक्त होतात. ३२,३३ जगांत जे तुझी भक्ति करतात, आणि तुझ्या नाममंत्राचे उपासक असतात, त्यांनाच ज्ञानप्राप्ति होते, इतरांस ती कधीही होत नाही. ३४ म्हणून ज्यांच्या अंगी तुझी भक्ति असेल, तेच मुक्त होतील, यांत संशय नाही तुझें भक्तिरूप अमृत ज्याजवळ नाही, त्यांना स्वप्नांत देखील मुक्ति मिळणें शक्य नाहीं. ३५ रामा! फार काय सांगूं? थोडक्यांत सार सांगतों की, ह्या जगांत साधुसंगति[2] हीच एक मोक्षहेतु होय असें सांगितलें आहे. ३६ जे समचित्त, निःस्पृह, (स्त्रीपुत्रधनादि) इच्छारहित, इंद्रियनिग्रही, शांतचित्त, तुझे भक्तीत आसक्त, आणि कोणत्याही प्रकारच्या वासनेपासून अलिप्त असतात, ते साधुपुरुष होत. ३७ तसेंच ते इष्टप्राप्तीचे अगर संकटाचे प्रसंगी एकच वृत्ति ठेवणारे, कोणत्याही

१. ज्ञानयुक्त निष्काम कर्म करण्याचा मार्ग. २. 'सदा सताऽभिगन्तव्या यद्यप्युपदिशन्ति नो । या हि स्वैरकथास्तेषामुपदेशा भवंति ताः ॥'—योगवासिष्ठ.

माणः सर्वदा ब्रह्मतत्पराः ॥ ३८ ॥ यमादिगुणसंपन्नाः संतुष्टा येनकेनचित् । सत्संगमो भवेद्यर्हि त्वत्कथाश्रवणे रतिः ॥ ३९ ॥ समुदेति ततो भक्तिस्त्वयि राम सनातने । त्वद्भक्तावुपपन्नायां विज्ञानं विपुलं स्फुटम् ॥ ४० ॥ उदेति मुक्तिमार्गोऽयमाद्यश्चतुरसेवितः । तस्माद्राघव सद्भक्तिस्त्वयि मे प्रेमलक्षणा ॥ ४१ ॥ सदा भूयाद्धरे संगस्त्वद्भक्तेषु विशेषतः । अद्य मे सफलं जन्म भवत्संदर्शनादभूत् ॥ ४२ ॥ अद्य मे क्रतवः सर्वे बभूवुः सफलाः प्रभो । दीर्घकालं मया तप्तमनन्यमतिना तपः । तस्येह तपसो राम फलं तव यदर्चनम् ॥ ४३ ॥ सदा मे सीतया सार्धं हृदये वस राघव । गच्छतस्तिष्ठतो वापि स्मृतिः स्यान्मे सदा त्वयि ॥ ४४ ॥ इति स्तुत्वा रमानाथमगस्त्यो मुनिसत्तमः । ददौ चापं महेंद्रेण रामार्थे स्थापितं पुरा ॥ ४५ ॥ अक्षय्यौ बाणतूणीरौ

ठिकाणी आसक्ति न धरणारे, सर्व कर्मांचा त्याग करणारे व सर्वकाळ ब्रह्मस्वरूपी रममाण झालेले असे असतात. ३८ यमनियमादि ( अष्टांगयोग ) गुणांनी ते युक्त असतात, आणि कोणत्याही स्थितीत संतुष्ट असतात, (अशा प्रकारच्या) साधुपुरुषांचा समागम घडला असतां तुझ्या कथाश्रवणाची आवड उत्पन्न होते. ३९ हे रामा! नंतर सनातन अशा तुझ्या ठिकाणी भक्ति उत्पन्न होते. भक्ति उत्पन्न झाली म्हणजे प्रत्यक्ष तत्त्वज्ञान होतें. चतुर पुरुषानी सेविलेला हा मुक्तिमार्ग होय. म्हणूनच तुझ्या ठायीं प्रेमरूप उत्तम भक्ति मला सर्वदा प्राप्त व्हावी, आणि हे भक्तजनदुःखहारका! विशेषेंकरून तुझ्या भक्तांचा समागम मला घडावा. आज तुझ्या दर्शनाच्या योगेंकरून माझ्या जन्माचें सार्थक झालें. ४०,४१,४२ प्रभो! आज माझे सर्व यज्ञ सफल झाले. तुझ्या ठिकाणी अनन्य निष्ठा ठेवून मीं दीर्घकाल तपश्चर्या केली. त्या तपश्चर्येचें फळ म्हणजे आज माझे हातून तुझें पूजन घडलें हें होय. ४३ हे राघवा! तं सीतेसह सर्वदा माझ्या चित्तांत वास कर. चालतांना काय किंवा बसतांना काय, सर्वदा मला तुझें स्मरण असावें. ४४ अशा प्रकारें सीतापति रामाची स्तुति करून तो मुनिश्रेष्ठ अगस्त्य पूर्वी महेंद्रानें रामाचसाठी म्हणून ( आश्रमांत ) ठेवन दिलेलें धनुष्य त्याला देता झाला ४५ त्याचप्रमाणें

१. समानार्थक श्लोकः–'अहो जाता येता सतत बसता, कार्य करिता, । सदा देतां घेतां, वदनि वदता, ग्रास गिळिता । घरीं दारी शय्येवरी रतिसुखाचे अवसरीं, समस्ताची लज्जा त्यजुनि भगवच्चिंतन करी ॥ '–वामनपंडित.

खड्गो रत्नविभूषितः । जहि राघव भूभारभूतं राक्षसमंडलम् ॥ ४६ ॥ यदर्थमवतीर्णोऽसि मायया मनुजाकृतिः । इतो योजनयुग्मे तु पुण्यकाननमंडितः ॥ ४७ ॥ अस्ति पंचवटीनाम्ना आश्रमो गौतमीतटे । नेतव्यस्तत्र ते कालः शेषो रघुकुलोद्वह ॥ ४८ ॥ तत्रैव बहुकार्याणि देवानां कुरु सत्पते ॥ ४९ ॥ श्रुत्वा तदागस्त्यसुभाषितं वचः स्तोत्रं च तत्त्वार्थसमन्वितं विभुः । मुनिं समाभाष्य मुदान्वितो ययौ प्रदर्शितं मार्गमशेषविद्धरिः ॥ ५० ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अरण्यकांडे तृतीयः सर्गः ॥ ३ ॥

कधींही रिकामे न होणारे बाणांचे दोन भाते व एक रत्नविभूषित खड्ग ही आयुधें मुनि रामाला देता झाला व म्हणाला, 'राघवा! पृथ्वीला भारभूत अशा राक्षससमुदायाचा वध कर. ४६ त्याच कामाकरितां तूं मायेनें मनुष्यरूप धारण करून पृथ्वीतलावर अवतीर्ण झाला आहेस. येथून दोन योजनांवर—आठ कोसांवर—गौतमीच्या तीरीं पुण्यारण्यानें सुशोभित असा पंचवटी नांवाचा आश्रम आहे. हे रघुकुलश्रेष्ठा! बाकीचा तुझा (वनवासाचा) काळ तूं तेथें घालवावा. ४७,४८ हे सज्जनपालका! तेथें देवांचीं बहुत कामें तुला करावयाचीं आहेत, तीं कर.' ४९ सत्यार्थानें युक्त असें अगस्त्याचें उत्तम भाषण व स्तुति ऐकून (रामचंद्र) प्रभूनें त्या वेळीं अगस्त्य मुनीचा निरोप घेतला आणि तो स्वतः सर्वज्ञ असूनही (ऋषीनें) दाखविलेल्या मार्गानें प्रयाण करिता झाला." ५०

**अरण्यकांड, अध्याय तिसरा समाप्त.**

## अरण्यकांड, सर्ग चवथा.



॥ श्रीमहादेव उवाच ॥ मार्गे व्रजन्ददर्शाथ शैलशृंगमिव स्थितम् ॥ वृद्धं जटायुषं रामः किमेतदिति विस्मितः ॥ १ ॥ धनुरानय सौमित्रे राक्षसोऽयं पुरः स्थितः । इत्याह लक्ष्मणं रामो हनिष्याम्यृषिभक्षकम् ॥ २ ॥ तच्छ्रुत्वा रामवचनं गृध्रराड् भयपीडितः । वधार्होऽहं न ते राम पितुस्तेऽहं प्रियः सखा ॥ ३ ॥ जटायुर्नाम भद्रं ते गृध्रोऽहं प्रियकृत्तव ॥ ४ ॥ पंचवट्यामहं वत्स्ये तवैव प्रियकाम्यया । मृगयायां कदाचित्तु प्रयाते लक्ष्मणेऽपि च ॥ ५ ॥ सीता जनककन्या मे रक्षितव्या प्रयत्नतः । श्रुत्वा तद्गृध्रवचनं रामः सस्नेहमब्रवीत् ॥ ६ ॥ साधु

श्रीशंकर म्हणाला, "जातां जातां मार्गावर पर्वताचें शिखरच की काय, असा उभा असलेला वृद्ध जटायु रामाच्या दृष्टीस पडला. ( त्याला पाहतांच ) 'हें काय आहे,' असा विस्मय होऊन राम लक्ष्मणाला म्हणाला, 'सौमित्रे ! धनुष्य आण. हा राक्षस पुढें उभा आहे. ह्या ऋषिभक्षकाचा वध करितों.' १,२ तें रामाचें वचन ऐकून गृध्रराज जटायु भयपीडित झाला आणि म्हणाला, 'रामा ! तूं माझा वध करावा, हें तुला योग्य नाही. मी तुझे बापाचा प्रिय मित्र आहें. ३ तुझें कल्याण असो. माझें नांव जटायु असून मी तुझें प्रिय करणारा आहें. ४ तुझेंच प्रिय करण्याच्या इच्छेनें मी पंचवटीत राहीन. एखादे वेळी तुम्ही दोघेही शिकारीला गेलां, तर मी जनककन्या जानकीचें प्रयत्नपूर्वक रक्षण करीन.' तें त्या गृध्राचें–जटायूचें–भाषण ऐकून राम स्नेहपूर्वक म्हणाला, ५,६ 'गृध्रमहाराजा !

१. जटायु हा गृध्रराज असून दशरथाचा परम मित्र होता. रावण सीतेला हरण करून रथातून नेत असता तिच्या आरोळ्या जटायूच्या कानावर आल्या. त्यावरून त्याने रावणाशीं निकराने युद्ध केलें. त्यात प्राणातिक जखमा होऊन जटायु पडला. तरी रामदर्शनाच्या उत्सुकतेनें जीव धारण करून तसाच तो तेथें पडून राहिला. शेवटीं सीतेचा शोध करीत करीत राम तेथें आला. तेव्हा रावणाने सीता हरण केल्याचे वृत्त रामाला सागून जटायूनें प्राण सोडला.

गृध्र महाराज तथैव कुरु मे प्रियम् । अत्रैव मे समीपस्थो नातिदूरे वने वसन् ॥ ७ ॥ इत्यामंत्रितमालिंग्य ययौ पंचवटीं प्रभुः । लक्ष्मणेन सह भ्रात्रा सीतया रघुनंदनः ॥ ८ ॥ गत्वा ते गौतमीतीरं पंचवट्यां सुविस्तरम् । मंदिरं कारयामास लक्ष्मणेन सुबुद्धिना ॥ ९ ॥ तत्र ते न्यवसन्सर्वे गंगाया उत्तरे तटे । कदंबपनसाम्रादिफलवृक्षसमाकुले ॥ १० ॥ विविक्ते जनसंबाधवर्जिते नीरुजस्थले । विनोदयन् जनकजां लक्ष्मणेन विपश्चिता ॥ ११ ॥ अध्युवास सुखं रामो देवलोक इवापरः । कंद-मूलफलादीनि लक्ष्मणोऽनुदिनं तयोः ॥ १२ ॥ आनीय प्रददौ राम-सेवातत्परमानसः । धनुर्बाणधरो नित्यं रात्रौ जागर्ति सर्वतः ॥ १३ ॥ स्नानं कुर्वंत्यनुदिनं त्रयस्ते गौतमीजले । उभयोर्मध्यगा सीता कुरुते च गमागमौ ॥ १४ ॥ आनीय सलिलं नित्यं लक्ष्मणः प्रीतमानसः । सेवतेऽहरहः प्रीत्या एवमासन् सुखं त्रयः ॥ १५ ॥ एकदा लक्ष्मणो

फार चांगलें. येथेंच फार दूर नाही, अशा माझ्या आश्रमाजवळ वनामध्यें राहून तसें ( बोलल्याप्रमाणें ) माझें इष्ट करीत रहा.' ७ असें जटायूला सांगून आणि त्याला आलिंगन देऊन प्रभु राम, बंधु लक्ष्मण आणि सीता यांसह पंचवटीला गेला. ८ गौतमीच्या–गोदावरीच्या–तीरावर गेल्यावर पंचवटीमध्यें ( रामानें ) त्या बुद्धिवान् लक्ष्मणाकडून एक अत्यंत विस्तीर्ण असें मंदिर तयार करविलें. ९ तेथें तीं सर्व गोदावरीच्या उत्तर तीरावर ( त्या मंदिरात ) राहात असत. त्या स्थलासभोंवती कदंब, फणस, आंबे इत्यादि पुष्कळ वृक्ष दाटलेले होते. १० असें एकांताचें, माणसांची गर्दी नसलेलें, रोगरहित तें स्थल होतें. तेथें बुद्धिवान् लक्ष्मणाच्या साहाय्यानें सीतेच्या चित्ताचें रंजन करीत राम राहिला. हा दुसरा देवलोकच की काय, असें रामाला वाटून तो तेथें आनंदानें राहिला. लक्ष्मण प्रत्येक दिवशी त्यांना कंद, मुळें आणि फळें आणून देत असे. त्याचें मन सर्वदा रामसेवेंत तत्पर असे. धनुष्यबाण हातात घेऊन सर्वत्र लक्ष्य ठेवून तो रात्रीं जागत असे. ११,१२,१३ तें तिघें प्रत्येक दिवशी गोदावरीच्या तीरावर स्नान करीत असत. कोठें जाणें येणें झाल्यास सीता दोघां–रामलक्ष्मणांच्या–मध्यें चालत असे. १४ संतुष्ट अंतःकरणानें नित्य पाणी आणून लक्ष्मण त्यांची प्रतिदिवशीं प्रेमपूर्वक सेवा करीत असे. अशा रीतीनें तीं तिघें सुखानें राहिलीं. १५ एकदां परमेश्वर राम एकांतांत बसला असतां मोठ्या विनयानें

राममेकांते समुपस्थितम् । विनयावनतो भूत्वा पप्रच्छ परमेश्वरम् ॥१६॥
भगवन् श्रोतुमिच्छामि मोक्षस्यैकांतिकीं गतिम् । त्वत्तः कमलपत्राक्ष
संक्षेपाद्वक्तुमर्हसि ॥ १७ ॥ ज्ञानं विज्ञानसहितं भक्तिवैराग्यबृंहितम् ।
आचक्ष्व मे रघुश्रेष्ठ वक्ता नान्योऽस्ति भूतले ॥ १८ ॥ राम उवाच ॥
शृणु वक्ष्यामि ते वत्स गुह्याद्गुह्यतरं परम् । यद्विज्ञाय नरो जह्यात्सद्यो
वैकल्पिकं भ्रमम् ॥ १९ ॥ आदौ मायास्वरूपं ते वक्ष्यामि तदनंतरम् ।
ज्ञानस्य साधनं पश्चाज्ज्ञानं विज्ञानसंयुतम् ॥ २० ॥ ज्ञेयं च परमात्मानं
यज्ज्ञात्वा मुच्यते भयात् । अनात्मनि शरीरादावात्मबुद्धिस्तु या भवेत्
॥ २१ ॥ सैव माया तयैवासौ संसारः परिकल्प्यते । रूपे द्वे निश्चिते
पूर्वे मायायाः कुलनंदन ॥ २२ ॥ विक्षेपावरणे तत्र प्रथमं कल्पये-

नम्र होत्साता लक्ष्मण त्याला म्हणाला, १६ 'भगवन् कमलनयन ( रामा ) ! मोक्षप्राप्तीचें निश्चित साधन कोणतें तें तुजपासून ऐकावें, अशी माझी इच्छा आहे, तर तूं मला तें संक्षेपानें सांगावें. १७ ज्ञान म्हणजे काय, विज्ञान—अपरोक्षज्ञान—म्हणजे काय, त्याचप्रमाणें त्या ज्ञानाची पोषक जी भक्तिवैराग्यादि साधनें, त्यांजसंबंधीहि हे रघुश्रेष्ठा ! मला सांग. ( हें सांगणारा ) ह्या भूतलावर दुसरा वक्ता नाहीं.' १८ श्रीराम म्हणाला, 'वत्सा ! ऐक. गुह्यापेक्षांही अधिक गुह्य असें ज्ञान तुला सांगतों. तें झाल्यानें मनुष्याचा काल्पनिक भ्रम तत्काळ दूर होतो. १९ प्रथमतः तुला मायेचें स्वरूप सांगतों. त्यानंतर ज्ञानाचें साधन, त्यानंतर ज्ञान, त्यानतर विज्ञान—अपरोक्षज्ञान—आणि त्यानंतर ज्ञेय असा जो परमात्मा त्याजसंबंधी सांगेन. हें जाणल्यानें मनुष्यप्राणी भयापासून—संसारभयापासून—मुक्त होतो. आत्म्याहून भिन्न अशा शरीरादिकाच्या—जडाच्या—ठिकाणी हा आत्मा, अशी जी आत्मबुद्धि होते, तीच माया होय तिच्याच योगेंकरून हा संसार कल्पिला जातो. हे कुलनंदना ( लक्ष्मणा ) ! मायेची निश्चित अशी दोन पुरातन रूपें आहेत. २०,२१,२२ तीं विक्षेप ( पसारा ) रूप, व आवरण ( आच्छादन ) रूप हीं होत. त्यांपैकीं पहिलें

१. सदृश कल्पना —( १ ) 'इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया' ॥—भगवद्गीता १८. ( २ ) 'तें हें गा आत्मज्ञान । मज गोप्याचेंही गुप्त धन । परी तूं म्हणोनि आन । केवीं करूं ॥ या कारणें गा पाडवा । आम्हीं आपला हा गुप्त ठेवा । तुज दिधला कणवा । जाकळिलेपणें ॥' ज्ञानेश्वरी १८.

। लिंगाद्यब्रह्मपर्यंतं स्थूलसूक्ष्मविभेदतः ॥ २३ ॥ अपरं त्वखिलं रूपमावृत्य तिष्ठति । मायया कल्पितं विश्वं परमात्मनि केवले ४ ॥ रज्जौ भुजंगवद् भ्रांत्या विचारे नास्ति किंचन । श्रूयते दृश्यते यद्यत्स्मर्यते वा नरैः सदा ॥ २५ ॥ असदेव हि तत्सर्वं यथा स्वप्नमनोरथौ । देह एव हि संसारवृक्षमूलं दृढं स्मृतम् ॥ २६ ॥ तन्मूलः पुत्रदारादिबंधः किं तेऽन्यथात्मनः ॥ २७ ॥ देहस्तु स्थूलभूतानां पंचतन्मात्रपंचकम् । अहंकारश्च बुद्धिश्च इंद्रियाणि तथा दश ॥ २८ ॥ चिदाभासो मनश्चैव मूलप्रकृतिरेव च । एतत्क्षेत्रमिति ज्ञेयं देह इत्यभिधीयते ॥ २९ ॥ एतैर्विलक्षणो जीवः परमात्मा निरामयः । तस्य जीवस्य विज्ञाने साधनान्यपि मे शृणु ॥ ३० ॥ जीवश्च परमात्मा

विक्षेपरूप, प्रकृतीपासून तों ब्रह्मदेवापर्यंत स्थूलसूक्ष्मभेदरूप सर्व जगताची कल्पना करितें, २३ व दुसरें—आवरणरूप—अखिल ज्ञानरूपाला आच्छादून असतें. माया केवळ परमात्म्यावर—परमात्म्याच्या आधारावर—विश्वाची रचना करीत असते. २४ भ्रांतीनें दोरीवर सर्पाचा भास व्हावा, त्याप्रमाणें ( हें सर्व ) आहे. विचार केला असतां कांहीच ( सत्य ) नाहीं. मनुष्यें जें जें काही सर्वदा ऐकतात, पाहतात, स्मरतात, तें तें सर्व स्वप्नाप्रमाणें अगर मनोरथाप्रमाणें मिथ्या आहे. संसारवृक्षाचें बळकट मूळ देह हाच होय, असें म्हटलें आहे. २५,२६ पुत्र, स्त्री, इत्यादि संबंध त्यामुळें ( देहामुळेंच ) होय. तसें नसेल, तर आत्म्याला त्यांचा—पुत्रदारादिकांचा—काय संबंध ? २७ पंचस्थूलभूतांचा ( स्थूल ) देह, पांच सूक्ष्मभूतें, अहंकार, बुद्धि, दशेंद्रियें, चैतन्याचें प्रतिबिंब, मन, मूलप्रकृति, ह्या सर्वांला क्षेत्र असें नांव आहे. देह असेंही ह्याला म्हणतात. २८,२९ ह्या सर्वांहून जीव वेगळा आहे. तोच परमात्मा होय. तो परमात्मा विकाररहित आहे. त्या जीवाचें सत्यज्ञान होण्याचीं साधनेंही सांगतों. तीं ऐक. ३० जीव आणि परमात्मा हे पर्यायशब्द—एकार्थ-

१. ' विक्षेपावरणे साकं शरीरं वर्धते यथा । तथा देहाभिमानोऽपि वर्धते हि दिने दिने ' ॥—सिद्धांतमहिता अ. १६. २. ' एव पिंडब्रह्मांड खटाटोप । हा अवघाचि आरोप । दोरू झाला नाहीं साप । भ्रमें सर्प तो म्हणती ॥ '—एकनाथी भागवत ९. ३. पृथ्वी, आप्, तेज, वायु, आकाश हीं पंचमहाभूतें. ४. ' इदं शरीरं कौंतेय क्षेत्रमित्यभिधीयते ' ॥—भ. गीता १३, १.

च पर्यायो नात्र भेदधीः। मानाभावस्तथा दंभहिंसादिपरिवर्जनम् ॥३१॥
पराक्षेपादिसहनं सर्वत्रावक्रता तथा । मनोवाक्कायसद्भक्त्या सद्गुरोः
परिसेवनम् ॥ ३२ ॥ बाह्याभ्यंतरसंशुद्धिः स्थिरता सत्क्रियादिषु ।
मनोवाक्कायदंडश्च विषयेषु निरीहता ॥ ३३ ॥ निरहंकारता जन्मजरा-
द्यालोचनं तथा । असक्तिः स्नेहशून्यत्वं पुत्रदारधनादिषु ॥ ३४ ॥
इष्टानिष्टागमे नित्यं चित्तस्य समता तथा । मयि सर्वात्मके रामे ह्यन-
न्यविषया मतिः ॥ ३५ ॥ जनसंबाधरहितशुद्धदेशनिषेवणम् । प्राकृ-
तैर्जनसंघैश्च ह्यरतिः सर्वदा भवेत् ॥ ३६ ॥ आत्मज्ञाने सदोद्योगो
वेदांतार्थावलोकनम् । उक्तैरेतैर्भवेज्ज्ञानं विपरीतैर्विपर्ययः ॥ ३७ ॥

वाचक—शब्द आहेत. या दोहोंत भेदभाव नाही. त्याला—परमात्मस्वरूपाला—प्रमाण किंवा इयत्ता नाही. ( आतां त्याचें ज्ञान होण्याचा उपाय सांगतों. ) दंभ, हिंसा यांचा त्याग, दुसऱ्यांनी केलेली निंदा सहन करणें, सर्वत्र सरळपणा, मन, वाणी आणि शरीर यांच्या योगें उत्तम भक्ति करून सद्गुरूची सेवा, शारीरिक आणि मानसिक शुद्धि, सदाचरणांत स्थिरता, मन, वाणी आणि शरीर ह्यांचा निग्रह; विषयाची इच्छा न करणें, अहंकारबुद्धि सोडणें, जन्म, जरादिकाचा विचार; संसाराचे ठिकाणीं अनासक्ति, पुत्र, स्त्री, धन इत्यादिकांविषयी अप्रीति, इष्ट किंवा अनिष्ट स्थितीतही चित्ताची समता, सर्वांतर्यामी असणारा जो मी राम त्याचे ठिकाणी अनन्यभक्ति, जनसमुदायरहित पवित्र स्थानी राहणें, प्राकृत जनसमाजाशी प्रेमसंबंध न ठेवणें; आत्मज्ञानप्राप्त्यर्थ सतत उद्योग, वेदांतार्थाचें अवलोकन, ह्या ( वर ) सांगितलेल्या गोष्टींनी ज्ञान होतें. ह्याच्या विपरीत गोष्टीनी विपरीत परिणाम ( अज्ञान ) होतो. ३१.३२.३३.३४.३५.३६.३७

१. ३१–३७ श्लोकातील वर्णनाशी पुढील गीतेतील श्लोकाचे किती तंतोतंत साम्य आहे हें लक्ष्यात घेण्यासारखे आहे:—"अमानित्वमदंभित्वमहिंसा क्षांतिरार्जवम् । आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥ इंद्रियार्थेषु वैराग्यमनहंकार एव च । जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ॥ असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु । नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ॥ मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी । विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥ अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् । एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ॥"

बुद्धिप्राणमनोदेहाहंकृतिभ्यो विलक्षणः । चिदात्माऽहं नित्यशुद्धो बुद्ध एवेति निश्चयम् ॥ ३८ ॥ येन ज्ञानेन संवित्ते तज्ज्ञानं निश्चितं च मे । विज्ञानं च तदैवैतत्साक्षादनुभवेद्यदा ॥ ३९ ॥ आत्मा सर्वत्र पूर्णः स्याच्चिदानंदात्मकोऽव्ययः । बुद्ध्याद्युपाधिरहितः परिणामादिवर्जितः ॥ ४० ॥ स्वप्रकाशेन देहादीन् भासयन्ननपावृतः । एक एवाद्वितीयश्च सत्यज्ञानादिलक्षणः ॥४१॥ असंगः स्वप्रभो द्रष्टा विज्ञानेनावगम्यते । आचार्यशास्त्रोपदेशादैक्यज्ञानं यदा भवेत् ॥४२॥ आत्मनोर्जीवपरयोर्मूलाविद्या तदैव हि । लीयते कार्यकरणैः सहैव परमात्मनि ॥ ४३ ॥ सावस्था मुक्तिरित्युक्ता ह्युपचारोऽयमात्मनि । इदं मोक्षस्वरूपं ते कथितं

मी चिदात्मा बुद्धि, प्राण, मन, देह, अहंकार, ह्यांहून निराळा, नित्यशुद्ध, ज्ञानरूप आहें, असें ज्या ज्ञानानें मनुष्य जाणतो, तेंच ज्ञान ( शब्दादिक ) असें मी निश्चयपूर्वक समजतों, आणि जेव्हां ह्याचा प्रत्यक्ष अनुभव येतो, तेव्हां तें विज्ञान–अपरोक्षज्ञान–होय. ३८,३९ आत्मा[1] सर्वत्र पूर्ण ज्ञानानंदरूप असा आहे, तो अव्यय–विकाररहित–आहे, त्याच्या ठिकाणीं बुद्ध्यादिकांचे ( रागद्वेषादि ) धर्म नाहीत, तो परिणामादि–रूपांतरादि–रहित आहे, ४० तो स्वतःच्या प्रकाशानें देहादिकांना प्रकाशित करितो, त्याच्या स्वरूपाला कशाचेंही आवरण नाहीं, तो एकरूप, अद्वितीय आहे; तो 'सत्य, ज्ञान, अनंत' इत्यादि लक्षणांनीं युक्त आहे, ४१ तो कोठेंही आसक्त होत नाहीं, तो स्वयंप्रकाश आहे, तो सर्वद्रष्टा आहे, तो अपरोक्षज्ञानानें जाणला जातो, गुरूकडून शास्त्रोपदेश–महावाक्योपदेश–होऊन जीवात्मा व शिवात्मा याचें ऐक्यज्ञान होतें, तेव्हांच (संसाराचें) मूळ अशी अविद्या आपलीं कार्यें व करणें–इंद्रियें–यासहवर्तमान परमात्माचे स्वरूपीं लीन[2] होते. ४२, ४३ या अवस्थेला मुक्ति असें म्हटलें आहे. हा आत्मप्राप्तीचा–आत्मज्ञानप्राप्तीचा–उपाय आहे. रघुनंदना ( लक्ष्मणा )! परात्मा जो मी त्या माझें मोक्षावस्थारूपी स्वरूप ज्ञान, विज्ञान आणि वैराग्य यांसहित तुला मी सांगितलें, परंतु जे

१ आत्म्याचें स्वरूप –'यदानंदरूपं प्रकाशस्वरूपं निरस्तप्रपंच परिच्छेदशून्यम '- शंकराचार्यकृत विज्ञाननौका. २ अविद्यारूपी आरशांत पडलेल्या परमात्मस्वरूपाच्या प्रतिबिंबामुळें जीवभाव उत्पन्न होतो. अविद्येचा उपाधि काढून टाकल्यानें, त्याचा नाश आपोआप होतो तो उपाधि काढून टाकणे म्हणजे प्रतिबिंबाचा परमात्मस्वरूपबिंबाचे ठिकाणीं लय करणे होय.

रघुनंदन ॥ ४४ ॥ ज्ञानविज्ञानवैराग्यसहितं मे परात्मनः । किं त्वेत-
द्दुर्लभं मन्ये मद्भक्तिविमुखात्मनाम् ॥ ४५ ॥ चक्षुष्मतामपि यथा रात्रौ
सम्यङ् न दृश्यते । पदं दीपसमेतानां दृश्यते सम्यगेव हि ॥ ४६ ॥
एवं मद्भक्तियुक्तानामात्मा सम्यक् प्रकाशते । मद्भक्तेः कारणं किंचि-
द्वक्ष्यामि शृणु तत्त्वतः ॥ ४७ ॥ मद्भक्तसंगो मत्सेवा मद्भक्तानां
निरंतरम् । एकादश्युपवासादि मम पर्वानुमोदनम् ॥ ४८ ॥ मत्कथा-
श्रवणे पाठे व्याख्याने सर्वदा रतिः । मत्पूजापरिनिष्ठा च मम नामा-
नुकीर्तनम् ॥ ४९ ॥ एवं सततयुक्तानां भक्तिरव्यभिचारिणी । मयि
संजायते नित्यं ततः किमवशिष्यते ॥ ५० ॥ अतो मद्भक्तियुक्तस्य ज्ञानं
विज्ञानमेव च । वैराग्यं च भवेच्छीघ्रं ततो मुक्तिमवाप्नुयात ॥५१॥ कथितं

माझे भक्तीचे ठिकाणी विन्मुख असतात, त्यांना ह्या स्वरूपाची प्राप्ति दुर्लभ आहे असें मी समजतों. ४४,४५ डोळे असूनही रात्रीं मनुष्याला चांगलें दिसत नाहीं, पण दिवा जवळ घेतला असतां जागा नीट दिसूं लागते, ४६ त्याचप्रमाणें माझी भक्ति ज्याच्या ठिकाणी वसत आहे, त्यांना आत्मस्वरूप स्पष्टपणें समजतें. आतां भक्ति कशानें प्राप्त होते तें थोडक्यांत सांगतों. नीट ऐक. ४७ माझ्या भक्तांची संगति, माझी आणि माझ्या भक्तांची निरंतर सेवा, एकादशीचें उपोषण नियम, जयंत्यादि माझे उत्सवांची आवड, ४८ माझ्या कथांचें श्रवण, पठण आणि कीर्तन यांसंबधी आसक्ति, माझ्या पूजेंत दक्षता, आणि माझ्या नामाचा संतत जप (हीं ती साधनें होत). ४९ अशा रीतीनें माझ्या ठिकाणी जे सतत आसक्त होतात, त्यांची माझ्या ठिकाणीं निरंतर निश्चल भक्ति जडते. (ही जडली असतां) मग मिळविण्याजोगें काय राहिलें? ५० म्हणून माझ्या भक्ति करणाऱ्याला ज्ञान, विज्ञान आणि वैराग्य यांची तत्काळ प्राप्ति होते आणि, त्यांपासून मग त्याला मुक्ति मिळते. ५१ तुझ्या प्रश्नाला अनुसरून हें सर्व

१. 'जे वैराग्याचिये शिवे । पावताचि ना कीं स्वभावें । विवेकाचिया नावें । झुरती सदा ॥ नेणती मोक्षाचें साधन । करिती संसारआराधन । सदोदित अवधान । निंदेमाजी ॥ जे परमचिंतनें व्यापले । अज्ञानभूतानें खेंपिले । आत्मज्ञानें पैं लोपले । अन्यथाज्ञानी ॥ प्रथम संताची सेवा । त्याणें करावी विनयभावा । सर्वांठायीं गर्वा । सोडूनियां ॥'—सोहिरोबा, सिद्धांतसंहिता.
२. 'यत्कर्मभिर्यत्तपसा ज्ञानवैराग्यतश्च यत् । योगेन दानधर्मेण श्रेयोभिरितरैरपि ॥ सर्वं मद्भक्ति-योगेन मद्भक्तो लभतेऽञ्जसा । स्वर्गापवर्गं मद्धाम कथंचिद्यदि वाञ्छति ' ॥—भागवत ११.

सर्वमेतत्ते तव प्रश्नानुसारतः । अस्मिन्मनः समाधाय यस्तिष्ठेत्स तु मुक्तिभाक् ॥ ५२ ॥ न वक्तव्यमिदं यत्नान्मद्भक्तिविमुखाय हि । मद्भक्ताय प्रदातव्यमाहूयापि प्रयत्नतः ॥ ५३ ॥ य इदं तु पठेन्नित्यं श्रद्धाभक्तिसमन्वितः । अज्ञानपटलध्वांतं विधूय परिमुच्यते ॥ ५४ ॥ भक्तानां मम योगिनां सुविमलस्वांतातिशांतात्मनां मत्सेवाभिरतात्मनां च विमलज्ञानात्मनां सर्वदा । संगं यः कुरुते सदोद्यतमतिः सत्सेवनानन्यधीर्मोक्षस्तस्य करे स्थितोऽहमनिशं दृश्यो भवे नान्यथा ॥ ५५ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अरण्यकांडे चतुर्थः सर्गः ॥४॥

मी तुला सांगितलें. ह्याच्या ठिकाणी मन ठेवून जो राहतो, त्याला मुक्तीची प्राप्ति होते. ५२ माझ्या भक्तीविषयी जो विमुख असेल, त्याला हें ज्ञान सांगण्याचा कधीही यत्न करूं नये. परंतु जो कोणी माझा भक्त असेल, त्याला प्रयत्नपूर्वक बोलावूनही हें ज्ञान द्यावें. ५३ श्रद्धेनें आणि भक्तीनें युक्त होऊन जो ह्याचें नित्य पठण करील, तो अज्ञानपटलानें उत्पन्न झालेल्या अंधकाराचा नाश करून मुक्त होईल. ५४ जे माझा भक्तियोग करून माझ्या ठिकाणी आसक्त होतात, त्यांचें मन अत्यंत शांत व निर्मल असतें, त्यांच्या मनांत माझी सेवा करण्याची अत्यंत आवड असते, शुद्ध आत्मज्ञानप्राप्तीची त्यांस सदैव इच्छा असते, अशा भक्तांचा समागम जो कोणी करितो आणि ज्ञानसंपादन करण्याचे कामी उद्युक्त राहतो, साधूंच्या सेवेवांचून दुसऱ्या कोठेंही मनाची प्रवृत्ति करीत नाही, त्याच्याच हातांत मोक्ष असतो आणि त्यालाच मी दर्शन देतों, इतर प्रकारानी माझें दर्शन होणें शक्य नाही.'' ५५

**अरण्यकांड, अध्याय चवथा समाप्त.**

१. भगवद्भक्ताचो थोरवा.—' जे पाहाटवीण पाहावीत । अमृतेवीण जीववीत । योगेंवीण दावित । कैवल्य डोळा ॥ जयाचे वाचेपुढें भोजे । नाम नाचत असे माझें । जे जन्मसहस्रीं वोळगिजे । एक वेळ यावया ॥ तो मी वैकुंठीं नसें । वेळ एक भानुबिंबीही न दिसें । वरी योगियाचीही मानसें । उमरडोनि जाय ॥ परी तयांपाशीं पांडवा । मी हारपला गिवसावा । जेथ नामघोष बरवा । करिती माझा ॥ '—ज्ञानेश्वरी १४.

## अरण्यकांड, सर्ग पांचवा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ तस्मिन् काले महारण्ये राक्षसी कामरूपिणी । विचचार महासत्त्वा जनस्थाननिवासिनी ॥ १ ॥ एकदा गौतमीतीरे पंचवट्याः समीपतः । पद्मवज्रांकुशांकानि पदानि जगतीपतेः ॥ २ ॥ दृष्ट्वा कामपरीतात्मा पादसौंदर्यमोहिता । पश्यंती सा शनैरायाद्राघवस्य निवेशनम् ॥ ३ ॥ तत्र सा तं रमानाथं सीतया सह संस्थितम् । कंदर्पसदृशं रामं दृष्ट्वा कामविमोहिता ॥ ४ ॥ राक्षसी राघवं प्राह कस्य त्वं कः किमाश्रमे । युक्तो जटावल्कलाद्यैः साध्यं किं तेऽत्र मे वद ॥ ५ ॥ अहं शूर्पणखा नाम राक्षसी कामरूपिणी । भगिनी राक्षसेंद्रस्य रावणस्य महात्मनः ॥ ६ ॥ खरेण सहिता भ्रात्रा वसाम्यत्रैव कानने । राज्ञा दत्तं च मे सर्वं मुनिभक्षा वसाम्यहम् ॥ ७ ॥ त्वां

श्रीशंकर म्हणाला, "त्या वेळीं जनस्थानांत राहणारी, वाटेल तें रूप धारण करणारी, अतिबलाढ्य अशी एक राक्षसी त्या मोठ्या (दंडका) अरण्यांत फिरत असे. १ एकदां गोदावरीच्या तीरावर पंचवटीच्या जवळ, कमळ, वज्र, अकुश ह्या चिह्नांनी युक्त अशी (उमटलेलीं) पृथ्वीपति रामाची पावलें तिनें पाहिली, व त्या (पायांच्या) सौंदर्यानें मोहित होऊन तिचें मन कामवासनेनें व्याप्त झालें, आणि रामाला शोधित शोधित हळूहळू ती त्याच्या आश्रमाजवळ आली. २, ३ तेथें सीतेसह असणाऱ्या मदनासारख्या सुंदर रामाला पाहून ती काममोहित झाली. ४ ती राक्षसी रामाला म्हणाली, 'तूं कोण, कोणाचा ? या आश्रमांत जटा, वल्कलें इत्यादि धारण करून तुला काय साध्य करावयाचें आहे ? मला सांग. ५ मी शूर्पणखा नांवाची राक्षसीण आहें, मला वाटेल तें रूप धारण करतां येतें, मी महात्म्या रावणाची बहीण आहें. ६ माझा बंधु खर, त्यासह ह्या अरण्यांत मी राहत असतें. राजानें हें सव अरण्य मला दिलें आहे. मी मुनींचें भक्षण करून ( येथें ) राहतें. ७ वक्त्यांमध्यें तूं उत्तम वक्ता

१ पंचवटी हा दंडकारण्याचा एक भाग आहे. येथें राम सीतेसह बराच काळ राहिला होता. हें ठिकाण नाशिकाहून दोन मैलांवर आहे. २. हा रावणाचा सावत्र बंधु होता.

तु वेदितुमिच्छामि वद मे वदतां वर । तामाह रामनामाऽहमयोध्याधिपतेः सुतः ॥ ८ ॥ एषा मे सुंदरी भार्या सीता जनकनंदिनी । स तु भ्राता कनीयान्मे लक्ष्मणोऽतीव सुन्दरः ॥ ९ ॥ किं कृत्यं ते मया ब्रूहि कार्यं भुवनसुंदरि । इति रामवचः श्रुत्वा कामार्ता साऽब्रवीदिदम् ॥ १० ॥ एहि राम मया सार्धं रमस्व गिरिकानने । कामार्ताहं न शक्नोमि त्यक्तुं त्वां कमलेक्षणम् ॥ ११ ॥ रामः सीतां कटाक्षेण पश्यन् सस्मितमब्रवीत् । भार्या ममैषा कल्याणी विद्यते ह्यनपायिनी ॥ १२ ॥ त्वं तु सापत्न्यदुःखेन कथं स्थास्यसि सुंदरि । बहिरास्ते मम भ्राता लक्ष्मणोऽतीव सुंदरः ॥ १३ ॥ तवानुरूपो भविता पतिस्तेनैव संचर । इत्युक्ता लक्ष्मणं प्राह पतिर्मे भव सुंदरः ॥ १४ ॥ भ्रातुराज्ञां पुरस्कृत्य संगच्छावोऽद्य माचिरम् । इत्याह राक्षसी घोरा लक्ष्मणं काममोहिता ॥ १५ ॥ तामाह लक्ष्मणः साध्वि दासोऽहं तस्य धीमतः । दासी भविष्यसि त्वं

आहेस, त्यामुळें तुझी हकीकत समजून घ्यावी, अशी माझी इच्छा आहे, तरी मला सांग ' तिला राम म्हणाला, ' मी अयोध्यापतीचा पुत्र आहें; माझें नांव राम आहे. ८ ही सुंदरी जनकराजाची कन्या माझी भार्या असून तिचें नांव सीता आहे. तो अत्यंत सुंदर ( दिसणारा ) माझा धाकटा बंधु लक्ष्मण आहे. ९ हे त्रैलोक्यसुंदरि ! माझ्याशी तुझें कोणतें काम आहे तें सांग.' हें रामाचें भाषण ऐकून कामपीडित होत्साती ती ( शूर्पणखा ) म्हणाली, १० ' रामा ! मजबरोबर ये, या पर्वतावरील अरण्यांत मजशीं रममाण हो. मी काममोहित झाल्यें असल्याकारणानें कमललोचन अशा तुला माझ्यानें सोडवत नाही.' ११ रामानें सीतेकडे कटाक्षदृष्टीनें पाहिलें, आणि हंसत म्हटलें, ' ही सुलक्षणा माझी पत्नी आहे, मला हिला टाकतां येणार नाहीं. १२ हे सुंदरि ! सापत्नभावात तूं ( मजजवळ ) कशी राहणार ? माझा अति सुंदर भाऊ लक्ष्मण बाहेर आहे. १३ तो तुला योग्य पति होईल; त्याच्याबरोबर तूं वनांत संचार कर. ' असें रामानें सांगतांच ती लक्ष्मणाला म्हणाली, ' हे सुंदरा ! तूं माझा पति हो. १४ भावाच्या आज्ञेनुसार आपण आतां संगमसुख भोगूं. आतां उशीर नको ?' असें ती घोर राक्षसी काममोहित होऊन लक्ष्मणाला म्हणाली. १५ त्यावर लक्ष्मण तिला म्हणाला, ' हे साध्वि ! मी त्या बुद्धिवान् रामाचा दास आहें. तेव्हां

तु ततो दुःखतरं नु किम् ॥ १६ ॥ तमेव गच्छ भद्रं ते स तु राजाऽखिलेश्वरः । तच्छ्रुत्वा पुनरप्यागाद्राघवं दुष्टमानसा ॥ १७ ॥ क्रोधाद्राम किमर्थं मां भ्रामयस्यनवस्थितः । इदानीमेव तां सीतां भक्षयामि तवाग्रतः ॥ १८ ॥ इत्युक्त्वा विकटाकारा जानकीमनुधावती । ततो रामाज्ञया खड्गमादाय परिगृह्य ताम् ॥ १९ ॥ चिच्छेद नासां कर्णौ च लक्ष्मणोऽलघुविक्रमः । ततो घोरध्वनिं कृत्वा रुधिराक्तवपुर्द्रुतम् ॥ २० ॥ क्रंदमाना पपाताग्रे खरस्य परुषाक्षरा । किमेतदिति तामाह खरः खरतराक्षरः ॥ २१ ॥ केनैवं कारितासि त्वं मृत्योर्वक्त्रानुवर्तिना । वद मे तं वधिष्यामि कालकल्पमपि क्षणात् ॥ २२ ॥ तमाह राक्षसी रामः सीतालक्ष्मणसंयुतः । दंडकं निर्भयं कुर्वन्नास्ते गोदावरीतटे ॥२३॥ मामेवं कृतवांस्तस्य भ्राता तेनैव चोदितः । यदि त्वं कुलजातोऽसि

तूंही त्याची दासी होशील. ह्याहून अधिक दुःखकारक तें काय ? १६ म्हणून तूं त्याच्याचकडे जा. त्यांत तुझें कल्याण आहे. तो सर्वांचा राजा आहे, तसाच सर्वेश्वर आहे.' तें ऐकून ती दुष्ट अंतःकरणाची स्त्री पुनः रामाकडे गेली, १७ व क्रोधानें म्हणाली, 'चंचलपणानें तूं मला कां भ्रमवीत आहेस ? रामा ! त्या सीतेला आतांच तुझ्या-पुढें खाऊन टाकत्यें.' १८ असें बोलून ती भयंकर आकाराची राक्षसी जानकीच्या अंगावर धावून गेली. इतक्यांत रामाच्या आज्ञेनें महापराक्रमी लक्ष्मणानें तरवार हातांत घेतली, आणि तिला धरून तिचे कान आणि नाक तोडून टाकिले. त्या वेळी तिचें शरीर रक्तबंबाळ होऊन गेलें. तिनें तत्काल आरोळी ठोकिली. १९, २० मोठ्यानें ओरडत व अपशब्द उच्चारीत ती खराच्या पुढें आली व तेथें तिनें लोळण घेतली. त्यावर क्रोधाविष्ट होऊन खरान विचारिलें 'हें काय आहे ? २१ तुझी अशी स्थिति करून मृत्यूच्या मुखांत उडी घालण्यास कोण तयार झाला आहे, मला सांग. तो प्रत्यक्ष यमासारखा असला, तरीही त्याचा एका क्षणांत मी वध करीन.' २२ राक्षसी त्याला म्हणाली, 'सीता आणि लक्ष्मण यांसह राम दंडकारण्य निर्भय करण्याच्या उद्देशानें गोदावरीच्या तीरावर राहात आहे. २३ त्याच्याच प्रेरणेनें त्याच्या भावानें माझी अशी स्थिति केली आहे. जर तूं कुलाभिमानी वीर पुरुष

वीरोऽसि जहि तौ रिपू ॥ २४ ॥ तयोस्तु रुधिरं पास्ये भक्षये तौ सुदुर्मदौ । नो चेत्प्राणान्परित्यज्य यास्यामि यमसादनम् ॥ २५ ॥ तच्छ्रुत्वा त्वरितं प्रागात्खरः क्रोधेन मूर्च्छितः । चतुर्दश सहस्राणि रक्षसां भीमकर्मणाम् ॥ २६ ॥ चोदयामास रामस्य समीपं वधकांक्षया । खरश्च त्रिशिराश्चैव दूषणश्चैव राक्षसः ॥ २७ ॥ सर्वे रामं ययुः शीघ्रं नानाप्रहरणोद्यताः । श्रुत्वा कोलाहलं तेषां रामः सौमित्रिमब्रवीत् ॥ २८ ॥ श्रूयते विपुलः शब्दो नूनमायांति राक्षसाः । भविष्यति महद्युद्धं नूनमद्य मया सह ॥ २९ ॥ सीतां नीत्वा गुहां गत्वा तत्र तिष्ठ महाबल । हंतुमिच्छाम्यहं सर्वान् राक्षसान् घोररूपिणः ॥ ३० ॥ अत्र किंचिन्न वक्तव्यं शापितोऽसि ममोपरि । तथेति सीतामादाय लक्ष्मणो गह्वरं ययौ ॥ ३१ ॥ रामः परिकरं बद्ध्वा धनुरादाय निष्ठुरम् । तूणीरावक्षयशरौ बद्ध्वा यत्तोऽभवत्प्रभुः ॥ ३२ ॥ तत आगत्य रक्षांसि रामस्योपरि चिक्षिपुः । आयुधानि विचित्राणि पाषाणान्पादपा-

असशील, तर त्या दोन शत्रूंचा वध कर २४ त्यांचें रक्त प्राशन करून त्या उन्मत्त (दोघां) पुरुषांना खाऊन टाकीन. असें (मजकडून) न घडल्यास मी प्राणत्याग करून यमपुरी जाईन' २५ तें ऐकून तो खर क्रोधानें व्याप्त होऊन निघाला. त्यानें चौदा हजार महाक्रूर राक्षस, रामाचा वध करण्याच्या इच्छेनें त्याजवर पाठविले. तसेंच खर, त्रिशिरा आणि दूषण[1] हे सर्व जण अनेक प्रकारच्या आयुधांनी सज्ज होऊन लागलेच रामाकडे गेले. त्यांचा कोलाहल ऐकून राम लक्ष्मणाला म्हणाला, २६, २७, २८ ही मोठी आरोळी ऐकूं येत आहे, त्या अर्थी राक्षसच निःसंशय येत आहेत. आज खचितच त्यांचें मजबरोबर युद्ध होणार आहे. २९ हे बलिष्ठा (लक्ष्मणा)! सीतेला घेऊन गुहेंत जाऊन बस. ह्या सर्व घोररूपी राक्षसांचा वध करावा, अशी माझी इच्छा आहे. ३० ह्यावर तूं कांहीं बोलतां नये, अशी माझी तुला शपथ आहे.' 'बरें आहे,' असें म्हणून लक्ष्मण गुहेंत गेला ३१ रामानें कमर कसून आपलें कठोर धनुष्य हातांत घेतलें, आणि अक्षय बाणांनी युक्त असे दोन भाते (पाठीवर) बांधून सज्ज होऊन राहिला. ३२ पुढें राक्षस तेथें आले, आणि त्यांनी आपलीं विचित्र आयुधें आणि त्यांबरोबर दगड

१. त्रिशिरा आणि दूषण हे महापराक्रमी प्रख्यात राक्षससेनापति होते.

नपि ॥ ३३ ॥ तानि चिच्छेद रामोऽपि लीलया तिलशः क्षणात् ।
ततो बाणसहस्रेण हत्वा तान् सर्वराक्षसान् ॥ ३४ ॥ खरं त्रिशिरसं
चैव दूषणं चैव राक्षसम् । जघान प्रहरार्धेन सर्वानेव रघूत्तमः ॥ ३५॥
लक्ष्मणोऽपि गुहामध्यात्सीतामादाय राघवे । समर्प्य राक्षसान्दृष्ट्वा हता-
न्विस्मयमाययौ ॥ ३६ ॥ सीता रामं समालिंग्य प्रसन्नमुखपंकजा ।
शस्त्रव्रणानि चांगेषु ममार्ज जनकात्मजा ॥ ३७ ॥ साऽपि दुद्राव दृष्ट्वा
तान्हतान् राक्षसपुंगवान् । लंकां गत्वा सभामध्ये क्रोशंती पादसन्निधौ
॥ ३८ ॥ रावणस्य पपातोर्व्यां भगिनी तस्य रक्षसः । दृष्ट्वा तां रावणः
प्राह भगिनीं भयविह्वलाम् ॥ ३९ ॥ उत्तिष्ठोत्तिष्ठ वत्से त्वं विरूपकरणं
तव । कृतं शक्रेण वा भद्रे यमेन वरुणेन वा ॥ ४० ॥ कुबेरेणाथवा

आणि वृक्ष यांची वृष्टि रामावर केली. ३३ रामानें सहज लीलेनें ती सर्व आयुधें एका क्षणात तिळांप्रमाणें तुकडे करून मोडून टाकिली, आणि नंतर हजार बाण टाकून त्यानें त्या सर्व राक्षसांना ठार केलें. ३४ खर, त्रिशिरा आणि दूषण या सर्व राक्षसांचा त्या रघुश्रेष्ठा (रामा)नें अर्ध्या प्रहरांत वध केला. ३५ इतक्यांत लक्ष्मणानेंही गुहेंतून सीतेला आणून रामाच्या स्वाधीन केलें. त्या राक्षसांना रामानें ठार केलेलें पाहून त्याला फार विस्मय वाटला. ३६ (रामाला पाहून) सीतेचें मुखकमल प्रसन्न झालें. तिनें रामाला आलिंगन दिलें आणि त्याच्या शरीरावरील शस्त्राचे व्रण त्या जनकतनयेनें धुवून काढले. ३७ इकडे ती (रावणाची बहीण शूर्पणखा) ते मोठमोठे राक्षस मरण पावलेले पाहून त्वरेनें पळत लंकेला गेली, आणि तेथें सभेंत बसलेल्या रावणाच्या पायांजवळ जाऊन तेथें तिनें जमिनीवर लोळण घेतली. त्या आपल्या भयविव्हल बहिणीला पाहून रावण तिला म्हणाला, ३८,३९ 'वत्से, ऊठ, तूं ऊठ, तुला हें असें विद्रूप कोणी केलें? कल्याणि! इंद्रानें, की यमानें, की वरुणानें, की कुबेरानें (असें केलें) तें सांग. एका क्षणांत

१. रावणाची राजधानी. साप्रत हिला सीलोन अशी संज्ञा आहे. २. इंद्र, यम, वरुण, आणि कुबेर हे अष्ट दिक्पालांपैकीं चार असून अनुक्रमे पूर्व, दक्षिण, पश्चिम आणि उत्तर दिशांचे अधिपति होत. अष्ट दिक्पाल'—' इंद्रो वह्निः पितृपतिः (यम.) नैर्ऋतो वरुणो मरुत् । कुबेर ईश. पतय· पूर्वादीनां दिशां क्रमात् ॥ '—अमरकोश.

ब्रूहि भस्मीकुर्यां क्षणेन तम् । राक्षसी तमुवाचेदं त्वं प्रमत्तो विमूढधीः ॥ ४१ ॥ पानासक्तः स्त्रीविजितः पंढः सर्वत्र लक्ष्यसे ॥ चारचक्षुर्विहीनस्त्वं कथं राजा भविष्यसि ॥ ४२ ॥ खरश्च निहतः संख्ये दूषणस्त्रिशिरास्तथा । चतुर्दश सहस्राणि राक्षसानां महात्मनाम् ॥ ४३ ॥ निहतानि क्षणेनैव रामेणासुरशत्रुणा । जनस्थानमशेषेण मुनीनां निर्भयं कृतम् । न जानासि विमूढस्त्वमत एव मयोच्यते ॥ ४४ ॥ रावण उवाच ॥ ॥ को वा रामः किमर्थं वा कथं तेनासुरा हताः । सम्यक्कथय मे तेषां मूलघातं करोम्यहम् ॥ ४५ ॥ ॥ शूर्पणखोवाच ॥ ॥ जनस्थानादहं याता कदाचिद्गौतमीतटे । तत्र पंचवटी नाम पुरा मुनिजनाश्रया ॥ ४६ ॥ तत्राश्रमे मया दृष्टो रामो राजीवलोचनः । धनुर्बाणधरः श्रीमान् जटावल्कलमंडितः ॥ ४७ ॥ कनीयाननुजस्तस्य लक्ष्मणोऽपि तथाविधः । तस्य भार्या विशालाक्षी रूपिणी श्रीरिवापरा

मी त्याच भस्म करून टाकतो.' त्यावर ती राक्षसी म्हणाली, 'तूं उन्मत्त झाला आहेस, तुझी बुद्धि मंद झाली आहे, ४०,४१ तूं मद्यपानांत दंग झालेला, स्त्रीजित व पूर्णपणें नपुंसकासारखा दिसत आहेस. राजाचे खरे खरे नेत्र म्हणजे हेर[1], ते तुजजवळ नाहींत. तूं कसला राजा? ४२ असुरांचा शत्रु जो राम त्यानें खर, दूषण आणि त्रिशिरा, त्याचप्रमाणें चौदा हजार मोठमोठे राक्षस, रणांगणावर एका क्षणांत मारून टाकिले आणि जनस्थान[2] मुनींना निर्भय करून दिलें. तुला ह्याचा काहीच वृत्तांत ठाऊक नाहीं, म्हणून तूं मूढ आहेस असें मला म्हणणें भाग आहे.' ४३,४४ रावण म्हणाला, 'कोण हा राम, त्यानें राक्षसांना कां मारिलें, कसें मारिलें, तें सारें नीट सांग, म्हणजे मी त्या सर्वांचा समूळ नाश करितों.' ४५ शूर्पणखा म्हणाली, 'एके वेळीं जनस्थानांतून गोदावरीच्या तीरावर मी गेल्यें होत्यें. तेथें पंचवटी नांवाचें स्थल असून पूर्वीं तेथें मुनि राहात असत. ४६ त्या आश्रमांत मी त्या कमलनयन रामाला पाहिलें. त्याचे हातांत धनुष्यबाण असून जटा आणि वल्कलें यांनी त्याचें शरीर सुशोभित झालें आहे. ४७ त्याचा धाकटा भाऊ लक्ष्मण देखील त्यासारखाच आहे. त्या (रामा)ची

१. हेर हा राजाचा चक्षु.—'चारचक्षुर्महाभर्तुर्यस्य नास्त्यन्ध एव स'—विग्रह, हितोपदेश.
२. पंचवटीनजीकच्या दंडकारण्याचा काहीं भाग.

॥ ४८ ॥ देवगंधर्वनागानां मनुष्याणां तथाविधा । न दृष्टा न श्रुता राजन्द्योतयंती वनं शुभा ॥ ४९ ॥ आनेतुमहमुद्युक्ता तां भार्यार्थं तवानघ । लक्ष्मणो नाम तद्भ्राता चिच्छेद मम नासिकाम् ॥ ५० ॥ कर्णौ च नोदितस्तेन रामेण स महाबलः । ततोऽहमतिदुःखेन रुदती खरमन्वगाम् ॥ ५१ ॥ सोऽपि रामं समासाद्य युद्धं राक्षसयूथपैः । ततः क्षणेन रामेण तेनैव बलशालिना ॥ ५२ ॥ सर्वे तेन विनष्टा वै राक्षसा भीमविक्रमाः । यदि रामो मनः कुर्यात्त्रैलोक्यं निमिषार्धतः ॥ ५३ ॥ भस्मीकुर्यान्न संदेह इति भाति मम प्रभो । यदि सा तव भार्या स्यात्सफलं तव जीवितम् ॥ ५४ ॥ अतो यतस्व राजेंद्र यथा ते वल्लभा भवेत् । सीता राजीवपत्राक्षी सर्वलोकैकसुंदरी ॥ ५५ ॥ साक्षाद्रामस्य पुरतः स्थातुं त्वं न क्षमः प्रभो । मायया मोहयित्वा तु प्राप्स्यसे तां रघूत्तमम् ॥ ५६ ॥ श्रुत्वा तत्सूक्तवाक्यैश्च दानमानादि-

बायको दुसरी लक्ष्मीच की काय अशी सुंदर आणि विशालाक्षी आहे. ४८ देव, गंधर्व, नाग आणि मनुष्यें यांमध्यें आजपर्यंत तिच्यासारखी ( स्त्री ) कोणी पाहिली नाही, किंवा ऐकिलीही नाही. राजा ! त्या सुंदरीनें वनाला शोभा आणिली आहे. ४९ हे निष्पापा (रावणा) ! तुझी बायको म्हणून तिला आणावें अशी इच्छा धरून मी उद्युक्त झाल्यें होत्यें, परंतु त्याच्या महाप्रबल लक्ष्मणनामक भावानें माझें नाक आणि दोनी कान रामाच्या सांगण्यावरून कापिले. मग मी अतिदुःखानें रडत रडत खराकडे गेल्यें. ५०,५१ तो देखील अनेक राक्षससेनापति बरोबर घेऊन रामावर चालून जाऊन त्याशी युद्ध करिता झाला; परंतु बलशाली रामानें एका क्षणांत त्या महापराक्रमी सर्व राक्षसांस मारून टाकिलें. जर रामानें मनांत आणलें, तर तो अर्ध्या क्षणांत त्रैलोक्याचें निःसंशय भस्म करील, असें मला वाटतें. राजा ! जर ती ( सीता ) तुझी स्त्री होईल, तर तुझें जीवित सफल होईल. ५२,५३, ५४ म्हणून हे राजेंद्रा ! जेणेंकरून ती ( सीता ) तुझी प्रिय पत्नी होईल, असा यत्न कर. त्या कमलनयन सुंदरीसारखी दुसरी सुंदर स्त्री त्रिभुवनांत मिळणार नाही. ५५ राजा ! त्या रामापुढे प्रत्यक्ष उभे राहण्याची तुझी शक्ति नाहीं. कांही-तरी कपटप्रयुक्तीनें त्या रघुश्रेष्ठ रामाला मोह घातलास, तर मात्र ती सीता तुला प्राप्त होईल. ५६ तें ऐकन गोड वचनांनीं आणि दानमानादिकांनी

भिस्तथा । आश्वास्य भगिनीं राजा प्रविवेश स्वकं गृहम् । तत्र चिंतापरो भूत्वा निद्रां रात्रौ न लब्धवान् ॥ ५७ ॥ एकेन रामेण कथं मनुष्यमात्रेण नष्टः सबलः खरो मे । भ्राता कथं मे बलवीर्यदर्पयुतो विनष्टो बत राघवेण ॥ ५८ ॥ यद्वा न रामो मनुजः परेशो मां हंतुकामः सबलं बलौघैः । संप्रार्थितोऽयं द्रुहिणेन पूर्वं मनुष्यरूपोऽद्य रघोः कुलेऽभूत् ॥ ५९ ॥ वध्यो यदि स्यां परमात्मनाहं वैकुंठराज्यं परिपालयेऽहम् । नो चेदिदं राक्षसराज्यमेव भोक्ष्ये चिरं राममतो व्रजामि ॥६०॥ इत्थं विचिंत्याखिलराक्षसेंद्रो रामं विदित्वा परमेश्वरं हरिम् । विरोधबुद्ध्यैव हरिं प्रयामि द्रुतं न भक्त्या भगवान्प्रसीदेत् ॥ ६१ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अरण्यकांडे पंचमः सर्गः ॥५॥

राजा ( रावणा ) ने त्या आपल्या बहिणीचें सांत्वन केलें. मग तो आपल्या मंदिरी गेला. परंतु चिंतेनें त्याचें अंतःकरण व्यग्र झालें असल्याकारणानें त्याला रात्री झोंप लागली नाही. ५७ 'मनुष्यमात्र एकट्या रामाकडून माझ्या खराचा सर्व सैन्यासह वध व्हावा, हें कसें? आपल्या शक्तीचा आणि वीर्याचा माझ्या भावाला मोठा गर्व, आणि तो रामाकडून मारला जावा ना? ५८ किंवा राम हा मनुष्य नसून प्रत्यक्ष परमेशच असावा. माझें सैन्य मोठें असून मी प्रबल झालों आहें, म्हणून मला मारण्याची त्याला इच्छा झाली असावी; आणि पूर्वी ब्रह्मदेवानें प्रार्थना केल्याप्रमाणें मनुष्यरूपानें तो सांप्रत रघुकुलांत जन्मला असावा. ५९ त्या परमात्म्याकडून मी मारला जाईन, तर वैकुंठाचे राज्याचा मालक होईन. नाहीतर ह्या राक्षसराज्याचा चिरकाल भोग घेईन. म्हणूनच मी रामावर चालून जाणार?' ६० सर्व राक्षसांचा राजा अशा त्या रावणानें असा विचार करून आणि राम हा परमेश्वर विष्णुच होय, असें जाणून, भक्तीनें भगवान् सत्वर प्रसन्न होत नसतो, तरी विरोधबुद्धीनेंच त्याजकडे जावें—त्याची प्राप्ति करून घ्यावी—असें मनांत योजिलें. ६१ "

**अरण्यकांड, सर्ग पांचवा समाप्त.**

## अरण्यकांड, सर्ग सहावा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ विचिंत्यैवं निशायां स प्रभाते रथमास्थितः । रावणो मनसा कार्यमेकं निश्चित्य बुद्धिमान् ॥ १ ॥ ययौ मारीचसदनं परं पारमुदन्वतः । मारीचस्तत्र मुनिवज्जटावल्कलधारकः ॥ २ ॥ ध्यायन् हृदि परात्मानं निर्गुणं गुणभासकम् । समाधिविरमेऽपश्यद्रावणं गृहमागतम् ॥ ३ ॥ द्रुतमुत्थाय चालिंग्य पूजयित्वा यथाविधि । कृतातिथ्यं सुखासीनं मारीचो वाक्यमब्रवीत् ॥ ४ ॥ समागमनमेतत्ते रथेनैकेन रावण । चिंतापर इवाभासि हृदि कार्यं विचिंतयन् ॥ ५ ॥ ब्रूहि मे न हि गोप्यं चेत्करवाणि तव प्रियम् । न्याय्यं चेद् ब्रूहि राजेंद्र वृजिनं मां स्पृशेन्न हि ॥ ६ ॥ रावण उवाच ॥ अस्ति राजा दशरथः साकेताधिपतिः किल । रामनामा सुतस्तस्य ज्येष्ठः

श्रीशंकर म्हणाला, "असा रात्रभर विचार करून आणि आपणाला जें कांहीं करावयाचें त्याची निश्चित योजना मनांत ठरवून तो बुद्धिमान् रावण प्रभातकाली रथावर आरूढ झाला. १ तो समुद्राच्या पैलतीरावर असणाऱ्या मारीचाच्या गृहीं गेला. तेथें मारीच जटा आणि वल्कलें धारण करून राहिला होता. २ स्वतः निर्गुण असून गुणांना भासविणाऱ्या परमात्म्याचें तो ध्यान करीत होता. समाधि उतरल्यावर त्यानें आपल्या घरीं आलेल्या रावणाला पाहिलें. ३ ताबडतोब उठून त्यानें ( रावणाला ) आलिंगन दिलें, आणि त्याची यथाविधि पूजा केली. ( यथायोग्य ) आदरातिथ्य होऊन रावण सुखानें बसला असतां मारीच त्याला बोलला, ४ 'रावणा ! आज तुझें येथें येणें एकाच रथानिशीं झालें आहे ! कांहीतरी कार्याचा विचार मनांत सारखा चालला आहे, त्यामुळें तूं चिंताग्रस्त दिसत आहेस. ५ यांत कांहीं गोप्य नसेल, तर मला सांग. मी तुला इष्ट असेल तें करीन. राजश्रेष्ठा ! ती गोष्ट न्याय्य असेल, तरच सांग. ( कारण ) पाप मला न लागावें.' ६ रावण म्हणाला. 'अयोध्यानग-

१. ' सांग आपुलें इष्ट काज । मी तें साधून देईन सहज । परी तें केव्हांहि महाराज । नीतीस सांडून नसावें ॥ सेवूनि अन्यायाचा पथ । पाप सांठवावें बहुत । हें तो सर्वथा नोहे उचित । विचारवंता आपणां ॥ '—अध्यात्मरामकथा, अरण्यकांड ६.

सत्यपराक्रमः ॥ ७ ॥ विवासयामास सुतं वनं वनजनप्रियम् । भार्यया
सहितं भ्रात्रा लक्ष्मणेन समन्वितम् ॥ ८ ॥ स आस्ते विपिने घोरे
पंचवट्याश्रमे शुभे । तस्य भार्या विशालाक्षी सीता लोकविमोहिनी
॥ ९ ॥ रामो निरपराधान्मे राक्षसान् भीमविक्रमान् । खरं च हत्वा
विपिने सुखमास्तेऽतिनिर्भयः ॥ १० ॥ भगिन्या मे शूर्पणख्या निर्दो-
षायाश्च नासिकाम् । कर्णौ चिच्छेद दुष्टात्मा वने तिष्ठति निर्भयः ॥ ११ ॥
अतस्त्वया सहायेन गत्वा तत्प्राणवल्लभाम् । आनयिष्यामि विपिने
रहिते राघवेण ताम् ॥ १२ ॥ त्वं तु मायामृगो भूत्वा ह्याश्रमादपने-
ष्यसि । रामं च लक्ष्मणं चैव तदा सीतां हराम्यहम् ॥ १३ ॥ त्वं तु
तावत्सहायं मे कृत्वा स्थास्यसि पूर्ववत् । इत्येवं भाषमाणं तं रावणं
वीक्ष्य विस्मितः ॥ १४ ॥ केनेदमुपदिष्टं ते मूलघातकरं वचः । स
एव शत्रुर्वध्यश्च यस्त्वन्नाशं प्रतीक्षते ॥ १५ ॥ रामस्य पौरुषं स्मृत्वा

रीचा दशरथ नांवाचा राजा होता. त्याचा ज्येष्ठ पुत्र राम नांवाचा असून तो सत्य-पराक्रमी आहे. ७ ( राजा दशरथानें ) आपल्या या पुत्राला बंधु लक्ष्मण आणि पत्नी ( सीता ) यांसह रानटी लोकांना प्रिय अशा अरण्यांत घालविलें. ८ तो अरण्यांत पंचवटी नांवाच्या पुण्याश्रमांत राहात आहे. त्याची पत्नी सीता आहे. तिचे नेत्र विशाल आहेत. ती ( सुंदरी ) लोकांना मोह उत्पन्न करणारी अशी आहे. ९ माझ्या महापराक्रमी राक्षसांना आणि खराला अपराधावाचून रामानें मारलें असून ( सध्यां ) तो निर्भय होऊन वनांत राहिला आहे. १० माझी बहीण शूर्पणखा अगदी निर्दोष असून तिचें नाक आणि कान त्या दुष्टानें कापिले आहेत. त्यामुळें ( आतां ) तो वनांत निर्भय राहात आहे. ११ म्हणून तुझें साह्य घेऊन तेथें जावें आणि राम अरण्यांत नाहीं, अशा वेळेला त्याच्या प्रियपत्नीला घेऊन यावें ( असें मी योजिलें आहे ). १२ तूं मायेनें हरिणाचें रूप घ्यावें आणि आश्रमापासून राम आणि लक्ष्मण यांना दूर न्यावें, म्हणजे मी सीतेचें हरण करीन. १३ अशा रीतीनें मला साह्य करून तूं पूर्ववत् आपल्या ठिकाणी जाऊन राहावें.' असें रावण बोलला; तें ऐकून मारीचाला आश्चर्य वाटलें. १४ ( तो म्हणाला, ) ' तुझा सर्वस्वीं घात होईल, असा उपदेश तुला कोणीं केला ? जो ( असा उपदेश करून ) तुझ्या नाशाची वाट पाहात आहे, तोच तुझा शत्रु असून त्याचा त्वां वध केला पाहिजे. १५ रामाच्या परा-

चित्तमद्यापि रावण। बालोऽपि मां कौशिकस्य यज्ञसंरक्षणाय सः॥१६॥
आगतस्त्विषुणैकेन पातयामास सागरे। योजनानां शतं रामस्तदादि
भयविह्वलः॥ १७॥ स्मृत्वा स्मृत्वा तदेवाहं रामं पश्यामि सर्वतः
॥ १८॥ दंडकेऽपि पुनरप्यहं वने पूर्ववैरमनुचिंतयन् हृदि। तीक्ष्ण-
शृंगमृगरूपमेकदा मादृशैर्बहुभिरावृतोऽभ्ययाम्॥ १९॥ राघवं जनक-
जासमन्वितं लक्ष्मणेन सहितं त्वरान्वितः। आगतोऽहमथ हंतुमुद्यतो
मां विलोक्य शरमेकमाक्षिपत्॥ २०॥ तेन विद्धहृदयोऽहमुद्भ्रमन् राक्षसेंद्र
पतितोऽस्मि सागरे। तत्प्रभृत्यहमिदं समाश्रितः स्थानमूर्जितमिदं भया-
र्दितः॥ २१॥ राममेव सततं विभावये भीतभीत इव भोगराशितः।
राजरत्नरमणीरथादिकं श्रोत्रयोर्यदि गतं भयं भवेत्॥ २२॥ राम
आगत इहेति शंकया बाह्यकार्यमपि सर्वमत्यजम्। निद्रया परिवृतो

क्रमाचें स्मरण होऊन माझें अंतःकरण अजूनही भयग्रस्त होतें. कौशिकाच्या—विश्वामित्राच्या—यज्ञरक्षणाकरितां बालपणीच ( राम ) आला असतां एकाच बाणानें त्यानें मला शंभर योजनें दूर समुद्रांत फेंकून दिलें, तेव्हांपासून मी अगदीं भयविव्हल होऊन गेलों आहें. १६, १७ वरचेवर त्याची मला आठवण होऊन जिकडेतिकडे मला एक रामच दिसत आहे. १८ दंडकारण्यांतही पूर्वीचें वैर मनांत आणून मी एकदां तीक्ष्ण शिंगांच्या हरिणाचें रूप धारण केलें व माझ्यासारख्या पुष्कळांना बरोबर घेऊन ( त्याच्यावर ) धांवून गेलों. १९ सीता आणि लक्ष्मण यांसह राम जेथें होता, त्या ठिकाणी त्यास मारण्यास उद्युक्त होऊन मी त्वरेनें गेलों. मला (आलेला) पाहतांच रामानें ( मजवर ) एक बाण टाकला. २० राक्षसश्रेष्ठा! त्या ( बाणा )नें हृदयाच्या ठिकाणीं विद्ध होऊन गोलांत्या खात खात मी समुद्रांत येऊन पडलों. तेव्हांपासून भयभीत होऊन मी या पीडारहित स्थळीं राहात आहें. २१ रामाचा मला (सर्वत्र) सतत भास होत असतो; इतका की, सर्व उपभोग्य पदार्थांचे ठिकाणीही ( रामाचा भास होऊन ) मला भ्याल्यासारखें होतें. ज्यांचें पहिलें अक्षर ‘ र ’ आहे असे राजा, रत्न, रमणी, रथ इत्यादि शब्दही कानीं पडले तरी मला भय वाटत असतें. २२ राम आला का काय, ह्या शंकेनें बाहेरचीं सर्व कामें मीं सोडून दिलीं आहेत. निद्रेनें व्याप्त होऊन मी जेव्हां झोंपीं

यदा स्वपे राममेव मनसाऽनुचिंतयन् ॥ २३ ॥ स्वप्नदृष्टिगतराघवं तदा बोधितो विगतनिद्र आस्थितः । तद्भवानपि विमुच्य चाग्रहं राघवं प्रति गृहं प्रयाहि भो । रक्ष राक्षसकुलं चिरागतं तत्स्मृतौ सकलमेव नश्यति ॥२४॥ तव हितं वदतो मम भाषितं परिगृहाण परात्मनि राघवे । त्यज विरोधमतिं भज भक्तितः परमकारुणिको रघुनंदनः ॥२५॥ अहमशेषमिदं मुनिवाक्यतोऽशृणवमादियुगे परमेश्वरः । ब्रह्मणाऽर्थित उवाच तं हरिः किं तवेप्सितमहं करवाणि तत् ॥ २६ ॥ ब्रह्मणोक्तमरविंदलोचन त्वं प्रयाहि भुवि मानुषं वपुः । दशरथात्मजभावमंजसा जहि रिपुं दशकंधरं हरे ॥ २७ ॥ अतो न मानुषो रामः साक्षान्नारायणोऽव्ययः । मायामानुषवेषेण वनं यातोऽतिनिर्भयः ॥२८॥ भूभारहरणार्थाय गच्छ तात गृहं सुखम् । श्रुत्वा मारीचवचनं रावणः प्रत्यभाषत ॥२९॥ परमात्मा

जातां, तेव्हां मनांत सारा वेळ रामाचेंच चिंतन चालत असल्यामुळें, स्वप्नामध्यें राम दृष्टीस पडून मी जागा होतों, आणि मग झोंप नाहीशी होऊन बसून राहातों. तरी तूं रामासंबंधींचा आग्रह सोडून घराला जा; आणि चिरकाल परंपरेनें चालत आलेल्या राक्षसकुलाचें पालन कर. रामाची (विरुद्ध) गोष्ट मनांत आणशील तर सकल (राक्षसकुल) नाश पावेल. २३, २४ तुझे हिताची गोष्ट मी सांगत आहें, तरी माझें म्हणणें कबूल कर. परात्म्या राघवाचे ठिकाणीं विरोधभक्ति टाकून त्याचें भक्तिपूर्वक भजन कर. तो रघुनंदन अत्यंत दयाळू आहे. २५ नारदमुनींच्या बोलण्यावरून मला असें पूर्णपणें कळून आलें आहे की,सत्ययुगामध्यें ब्रह्मदेवानें परमेश्वराची प्रार्थना केली; तेव्हां श्रीहरीनें त्याला सांगितलें की, 'तुझी काय इच्छा आहे ( ती सांग ), त्याप्रमाणें मी करितों.' २६ तेव्हां ब्रह्मदेव म्हणाला, 'हे कमललोचना हरे! मनुष्यरूप धारण करून आणि दशरथाचा पुत्र होऊन तूं पृथ्वीवर अवतीर्ण हो, आणि शत्रु जो दशानन ( रावण ) त्याचा लवकर वध कर.' २७ म्हणून राम हा मनुष्य नसून प्रत्यक्ष निर्विकार नारायण[1] आहे. मायेनें मनुष्यवेष घेऊन, अतिनिर्भय होत्साता, पृथ्वीचा भार हरण करण्यासाठीं हा वनांत आला आहे. तरी बाबा! तूं सुखानें घरीं जा.' हें मारीचाचें भाषण ऐकून रावण बोलला, २८, २९ ब्रह्मदेवाच्या प्रार्थनेवरून परमात्मा राम मला

१. 'सोडूनि विरोधाची मति । प्रेमेंचि सेवीं सीतापती । ह्या करुणेच्या मेघाप्रती भक्तिच एक जिंकिजे ॥ '—अध्यात्मरामकथा, अरण्यकांड ६.

यदा रामः प्रार्थितो ब्रह्मणा किल । मां हंतुं मानुषो भूत्वा यत्ना-
दिह समागतः ॥ ३० ॥ करिष्यत्यचिरादेव सत्यसंकल्प ईश्वरः ।
अतोऽहं यत्नतः सीतामानेष्याम्येव राघवात् ॥ ३१ ॥ वधे प्राप्ते रणे
वीर प्राप्स्यामि परमं पदम् । यद्वा रामं रणे हत्वा सीतां प्राप्स्यामि
निर्भयः ॥ ३२ ॥ अतोत्तिष्ठ महाभाग विचित्रमृगरूपधृक् । रामं सल-
क्ष्मणं शीघ्रमाश्रमादतिदूरतः ॥ ३३ ॥ आक्रम्य गच्छ त्वं शीघ्रं सुखं
तिष्ठ यथा पुरा । अतःपरं चेद्यत्किंचिद्भाषसे मद्विभीषणम् ॥ ३४ ॥
हनिष्याम्यसिनाऽनेन त्वामत्रैव न संशयः । मारीचस्तद्वचः श्रुत्वा
स्वात्मन्येवान्वचिंतयत् ॥ ३५ ॥ यदि मां राघवो हन्यात्तदा मुक्तो
भवार्णवात् । मां हन्याद्यदि चेद्दुष्टस्तदा मे निरयो ध्रुवम् ॥ ३६ ॥
इति निश्चित्य मरणं रामादुत्थाय वेगतः । अब्रवीद्रावणं राजन्करोम्याज्ञां

मारण्याकरितां जर मनुष्यरूप धारण करून प्रयत्नपूर्वक येथें आला आहे, तर तो सत्य-संकल्प प्रभु लवकरच त्याप्रमाणें करील, आणि म्हणूनच शक्य ते प्रयत्न करून मी रामापासून सीतेला आणणार. ३०, ३१ हे वीरा[1] रणाचे ठिकाणी माझा वध झाल्यास मला परमपदाची प्राप्ति होईल. त्याच्या उलट रामाला युद्धांत मी मारलें, तर सीतेची प्राप्ति होऊन मी निर्धास्त होईन. ३२ म्हणून हे महाभागा ( मारीचा ) ! ऊठ, विचित्रें मृगाचें रूप धारण कर आणि राम आणि लक्ष्मण हे आश्रमापासून बरेच दूर जातील असें कर. मग तूं सत्वर घरीं जाऊन पूर्वीप्रमाणें ( सुखांत ) रहा. याउपर मला भिवविणारें कांहीं भाषण केलेंस, ३३, ३४ तर येथेंच तुला ह्या तरवारीनें ठार करीन, यांत संशय नाहीं.' त्याचें भाषण ऐकून मारीचानें मनांत विचार केला, ३५ 'जर मला राम मारील, तर मी संसारसागरांतून मुक्त होईन. परंतु हा दुष्ट माझा वध करील, तर निःसंशय मला नरकाचीच प्राप्ति होईल.' ३६ अशा प्रकारें रामापासून मरण मिळावें, असें निश्चित ठरवून तो ( मारीच ) वेगानें उठला, आणि

१. ह्या प्रसगाचे एकनाथानीं खालीलप्रमाणे वर्णन केले आहे:—'तुजपाशीं ।वांचंत्रगती । धरूं जाणसी नानाव्यक्ती । सुवर्णमृगाची आकृती । धरून सीतेप्रती त्वा जावें ॥ सीता साडोनि पंचवटीं । सुवर्णमृगवधार्थ दृष्टी । राम धावेल पाठोपाठीं । ऐसी गोष्टी साधावी ॥ दूरी नेवोनिया राघव । हाक मारावी अति अपूर्व । लक्ष्मणा वेगी धाव पाव । हेंही लाघव साधावें ॥' भा. रामायण. अरण्यकांड १३.

तव प्रभो ॥ ३७ ॥ इत्युक्त्वा रथमास्थाय गतौ रामाश्रमं प्रति । शुद्ध जांबूनदप्रख्यो मृगोऽभूद्रौप्यबिंदुकः ॥ ३८ ॥ रत्नशृंगो मणिखुरो नीलरत्नविलोचनः । विद्युत्प्रभो विमुग्धास्यो विचचार वनांतरे ॥३९॥ रामाश्रमपदस्यांते सीतादृष्टिपथे चरन् ॥ ४० ॥ क्षणं च धावत्यवतिष्ठते क्षणं समीपमागत्य पुनर्भयाद्वृतः । एवं स मायामृगवेषरूपधृक् चचार सीतां परिमोहयन्खलः ॥ ४१ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अरण्यकांडे षष्ठः सर्गः ॥ ६ ॥

## अरण्यकांड, सर्ग सातवा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ अथ रामोऽपि तत्सर्वं ज्ञात्वा रावणचेष्टितम् । उवाच सीतामेकांते शृणु जानकि मे वचः ॥ १ ॥ रावणो भिक्षुरूपेण आगमिष्यति तेऽतिकम् । त्वं तु छायां त्वदाकारां स्थापयि-

रावणाला म्हणाला, ' महासमर्थ राजा ! तुझे आज्ञप्रमाणें करितों. ' ३७ असें बोलून ते दोघे रथांत बसले, आणि रामाच्या आश्रमाजवळ आले. मारीचानें शुद्ध सोन्यासारख्या हरिणाचें रूप धारण केलें. त्याच्या अंगावर रुप्यासारखे ठिपके होते. ३८ त्याची शिंगें रत्नाची होती, खुर हिऱ्याचे होते, डोळे निळ्या रत्नांचे–इंद्रनीलमण्यांचे–होते, कांति विजेसारखी होती, आणि तोंड अत्यंत सुंदर होतें. असा तो हरिण वनांत इकडेतिकडे फिरूं लागला. ३९ तो हरिण रामाच्या आश्रमाच्या बाजूनें सीतेच्या दृष्टिमार्गांत राहून क्षणभर धांवे, क्षणभर उभा राही, कांहीं वेळ जवळ येऊन पुनः भयभीत होऊन दूर जाई. अशा रीतीनें कपटी हरिणाचें रूप धारण करणारा तो दुष्ट ( मारीच ) सीतेला मोह पडावा, या उद्देशानें तेथें हिंडत बागडत राहिला. ४०, ४१ ”

**अरण्यकांड, सर्ग सहावा समाप्त.**

श्रीमहादेव म्हणाला, “इकडे रामाला देखील रावणाच्या सर्व हालचाली कळून आल्या तो सीतेला एकांतांत म्हणाला, 'जानकि ! माझें वचन ऐक. १ रावण भिक्षूचें–संन्याशाचें–रूप घेऊन तुझ्याजवळ येईल. म्हणून तूं तुझ्या आकाराची छाया आश्रमांत ठेव

त्वोटजे विश ॥ २ ॥ अग्नावदृश्यरूपेण वर्षं तिष्ठ ममाज्ञया । रावणस्य वधांते मां पूर्ववत्प्राप्स्यसे शुभे ॥ ३ ॥ श्रुत्वा रामोदितं वाक्यं सापि तत्र तथाकरोत् । मायासीतां बहिः स्थाप्य स्वयमंतर्दधेऽनले ॥ ४ ॥ मायासीता तदाऽपश्यन्मृगं मायाविनिर्मितम् । हसंती राममभ्येत्य प्रोवाच विनयान्विता ॥ ५ ॥ पश्य राम मृगं चित्रं कानकं रत्नभूषितम् । विचित्रबिंदुभिर्युक्तं चरन्तमकुतोभयम् । बद्धा देहि मम क्रीडामृगो भवतु सुंदरः ॥ ६ ॥ तथेति धनुरादाय गच्छन् लक्ष्मणमब्रवीत् । रक्ष त्वमतियत्नेन सीतां मत्प्राणवल्लभाम् ॥ ७ ॥ मायिनः संति विपिने राक्षसा घोरदर्शनाः । अतोऽत्रावहितः साध्वीं रक्ष सीतामनिंदिताम् ॥ ८ ॥ लक्ष्मणो राममाहेदं देवायं मृगरूपधृक् । मारीचोऽत्र न संदेह एवंभूतो मृगः कुतः ॥ ९ ॥ राम उवाच ॥ यदि मारीच एवायं

आणि माझ्या आज्ञेनें एक वर्षपर्यंत अग्नीमध्यें गुप्तरूपानें रहा. हे कल्याणि ! रावणाचा वध झाल्यानंतर तूं मला येऊन मिळशील.' २, ३ रामाचें बोलणें ऐकन तिनें देखील लगेच तसें केलें. मायेची सीता बाहेर ठेऊन देऊन ती स्वतः अग्नींत गुप्त झाली. ४ त्या मायिक सीतेनें मायानिर्मित हरिणाला पाहिलें, आणि हंसत हंसत रामाजवळ येऊन ती विनयपूर्वक म्हणाली, ५ 'रामा ! तो पहा विचित्र सुवर्णमृग निर्भयपणें भटकत आहे. तो रत्नविभूषित असून त्याच्या अंगावर चित्रविचित्र ठिपके आहेत. तो निर्भयपणें भटकत आहे. त्याला बांधून आणून मला द्या. हा सुंदर हरिण मला क्रीडेसाठीं होईल.' ६ 'बरें आहे' असें म्हणून रामानें धनुष्य घेतलें आणि जातांना तो लक्ष्मणाला म्हणाला, 'माझी प्राणप्रिया जी सीता, तिचें अत्यंत प्रयत्नपूर्वक रक्षण कर. ७ ह्या अरण्यांत भयंकर दिसणारे कपटी राक्षस आहेत. म्हणून येथें सावधपणें राहून सीतेचें रक्षण कर. ही साध्वी कधींही कोणाच्या निंदेस पात्र झाली नाहीं.' ८ त्यावर लक्ष्मण रामाला म्हणाला, 'हा मृगरूप धारण करणारा मारीच ( राक्षस ) आहे, यांत संशय नाहीं. अशा प्रकारचा हरिण कसा बरें असेल ? ' ९ राम म्हणाला, 'जर हा मारीच आहे, तर मी त्याचा वध करीन, यांत संशय नाहीं. ( उलट )

१. सुवर्णमृगाचें रूप घेऊन आलेल्या मारीचाला. २. अकाळविक्राळ रूप घेऊन फिरणारे.

तदा हन्मि न संशयः । मृगश्चेदानयिष्यामि सीताविश्रमहेतवे ॥ १० ॥
गमिष्यामि मृगं बद्ध्वा ह्यानयिष्यामि सत्वरः । त्वं प्रयत्नेन संतिष्ठ
सीतासंरक्षणोद्यतः ॥ ११ ॥ इत्युक्त्वा प्रययौ रामो मायामृगमनुद्रुतः ।
माया यदाश्रया लोकमोहिनी जगदाकृतिः ॥ १२ ॥ निर्विकारश्चिदा-
त्मापि पूर्णोऽपि मृगमन्वगात् । भक्तानुकंपी भगवानिति सत्यं वचो हरिः
॥ १३ ॥ कर्तुं सीताप्रियार्थाय जानन्नपि मृगं ययौ । अन्यथा पूर्ण-
कामस्य रामस्य विदितात्मनः ॥ १४ ॥ मृगेण वा स्त्रिया वापि किं
कार्यं परमात्मनः । कदाचिद्दृश्यतेऽभ्याशे क्षणं धावति लीयते ॥ १५ ॥
दृश्यते च ततो दूरादेवं राममपाहरत् । ततो रामोऽपि विज्ञाय राक्षसोऽ-

हारण असल्यास सीतेच्या करमणुकीकारतां म्हणून मी त्याला आणीन. १० मी जातों आणि लागलाच त्याला बांधून आणितों. तूं प्रयत्नानें सीतेचें रक्षणाचे कामीं उद्युक्त होऊन रहा.' ११ असें बोलून लोकांना मोह घालणारी व जगाच्या रूपानें नटलेली माया ज्याच्या आश्रयानें रहाते, असा तो राम त्या मायामृगाचे मागें धांवत गेला. १२ तो (राम) निर्विकार, चैतन्यमय, पूर्ण असूनही त्या हरिणाच्या मागें धांवत सुटला, ह्यावरून भगवान् हरि 'भक्तांवर दया करणारा' (असें जें म्हणतात) तें वचन सत्य आहे. १३ तो मायामृग असल्याचें जाणूनही (राम) सीतेचें प्रिय करण्याच्या इच्छेनें (हरिणावर) गेला. नाहींतर त्या पूर्णकाम आत्मस्वरूपज्ञ परमात्म रामाला त्या हरिणाशीं किंवा स्त्रीशीं तरी काय कर्तव्य होतें ! तो हरिण कांहीं काळ जवळ दिसे, क्षणांत धांवे, झटकन् अदृश्य होई. १४.१५ नंतर पुष्कळ दूर अंतरावर दिसे. अशा रीतीनें त्यानें रामाला दूर नेलें.

१. मोहक मायाः—'सुरांमाजी श्रेष्ठ हृषीकेशी । ब्रह्मादि शिवू वंदिती ज्यासी । त्या विष्णूची माया कैसी । जी मायिकांसी व्यामोही ॥ ब्रह्मा मोहिला शिवाचे लग्नीं । वीर्य द्रवे पार्वती देखोनी । महादेवो महाज्ञानी । देखताचि मोहिनी निजवीर्य द्रवलें ॥'—ए. भागवत. २ 'किंबहुना एकपणें समस्तें । रूपा आलीं महाभूतें । तीचि हरीची माया येथें । जाण निश्चितें नृपनाथा ॥ भूत भौतिक स्फुरे जे स्फूर्ती । ते प्रकाशूं न शके माया स्वशक्ती । मायाप्रकाशकू चिन्मूर्ती । अखंडत्वें भूताकृतीं प्रवेशला भासे' ॥—एकनाथी भागवत.
३. सदृश वर्णनः—'तूं आनंदमय स्वयंप्रकाश । कैवल्यदाता परम ईश । तूं निजरूपें अविनाश । निराकार' ॥—परमामृत १.

यामास स्फुटम् ॥ १६ ॥ विव्याध शरमादाय राक्षसं मृगरूपिणम् ।
पपात रुधिरात्तास्यो मारीचः पूर्वरूपधृक् ॥ १७ ॥ हा हतोऽस्मि
महाबाहो त्राहि लक्ष्मण मां द्रुतम् । इत्युक्त्वा रामवद्वाचा पपात रुधि-
राशनः ॥ १८ ॥ यन्नामाज्ञोऽपि मरणे स्मृत्वा तत्साम्यमाप्नुयात् ।
किमुताग्रे हरिं पश्यंस्तेनैव निहतोऽसुरः ॥ १९ ॥ तद्देहादुत्थितं तेजः
सर्वलोकस्य पश्यतः । राममेवाविशद्देवा विस्मयं परमं ययुः ॥ २० ॥
किं कर्म कृत्वा किं प्राप्तः पातकी मुनिहिंसकः । अथवा राघवस्यायं
महिमा नात्र संशयः ॥ २१ ॥ रामबाणेन संविद्धः पूर्वं राममनुस्मरन् ।
भयात्सर्वं परित्यज्य गृहवित्तादिकं च यत् ॥ २२ ॥ हृदि रामं सदा
ध्यात्वा निर्धूताशेषकल्मषः । अंते रामेण निहतः पश्यन् राममवाप सः
॥ २३ ॥ द्विजो वा राक्षसो वाऽपि पापी वाऽधार्मिकोऽपि वा । त्यज-

तव्हां रामानेंहा जाणलें कीं, 'हा खरोखरच राक्षस आहे.' १६ मग त्यानें एक बाण घेऊन त्या मृगरूपधारी राक्षसावर सोडला; त्याबरोबर त्या मारीचाचें तोंड रक्तबंबाळ झालें; व पूर्वस्वरूप धारण करून तो जमिनीवर पडला. १७ पडतेवेळीं 'हायहाय ! मी मेलों ! महाबाहो लक्ष्मणा ! लवकर येऊन माझें रक्षण कर,' असा रामा-सारखाच आवाज काढून तो राक्षस पडला. १८ ज्याचें नामस्मरण मरणसमयीं केल्यानें अज्ञही मनुष्य सायुज्याला पावतो त्याच (हरी) कडून त्याच्याच अग्रभागी व त्याचेंच चिंतन करीत असतां, मारला गेलेला असुर, ती (सायुज्यगति) पावेल, यांत नवल तें काय ? १९ त्याच्या शरीरांतून बाहेर पडलेलें तेज सर्व लोकांसमक्ष राम-रूपीं प्रविष्ट झालें. (तें पाहून) सर्व देवांना मोठा विस्मय वाटला. २० (ते मनांत म्हणाले) 'अहाहा ! ह्या मुनिहिंसक पातक्यानें कर्म केलें काय, आणि मिळविलें काय ? अथवा हा सारा रामाचाच महिमा होय, यांत संशय नाहीं. २१ पूर्वी एकदां रामबाणानें विद्ध झाला असतां भयानें गृहवित्तादि जें जें कांहीं होतें, तें तें सर्व टाकून देऊन, २२ अंतःकरणांत रामाचें ध्यान करीत हा राहिला होता; त्यायोगें ह्याची सर्व पापें नाहींशी झालीं. शेवटी रामाकडून मारला जाऊन ह्याला त्याचें दर्शन घडलें, आणि तो रामस्वरूपीं मिळाला. २३ ब्राह्मण असो, कीं राक्षस

१. सायुज्य—परमशस्वरूपा साम्य—तद्रूप—होणं. २. 'द्विज असो कां राक्षस दुष्ट । पातकी आणि धर्मभ्रष्ट । अंतीं रामास पावेल स्पष्ट । स्मरणमात्रेंचि तयाच्या ॥'—अध्यात्मरामकथा.

न्कलेवरं रामं स्मृत्वा याति परं पदम् ॥ २४ ॥ इति तेऽन्योन्यमाभाष्य ततो देवा दिवं ययुः । रामस्तच्चिंतयामास म्रियमाणोऽसुराधमः ॥२५॥ हा लक्ष्मणेति मद्वाक्यमनुकुर्वन्ममार किम् । श्रुत्वा मद्वाक्यसदृशं वाक्यं सीतापि किं भवेत् ॥ २६ ॥ इति चिंतापरीतात्मा रामो दूरान्न्यवर्तत । सीता तद्भाषितं श्रुत्वा मारीचस्य दुरात्मनः ॥ २७ ॥ भीताऽतिदुःखसंविग्ना लक्ष्मणं त्विदमब्रवीत् । गच्छ लक्ष्मण वेगेन भ्राता तेऽसुरपीडितः ॥ २८ ॥ हा लक्ष्मणेति वचनं भ्रातुस्ते न शृणोषि किम् । तामाह लक्ष्मणो देवि रामवाक्यं न तद्भवेत् ॥ २९ ॥ यः कश्चिद्राक्षसो देवि म्रियमाणोऽब्रवीद्वचः । रामस्त्रैलोक्यमपि यः क्रुद्धो नाशयति क्षणात् ॥ ३० ॥ स कथं दीनवचनं भाषतेऽमरपूजितः । क्रुधा लक्ष्मणमालोक्य सीता बाष्पविलोचना ॥ ३१ ॥ प्राह लक्ष्मण दुर्बुद्धे भ्रातु-

असो, पापी असो, वा अधार्मिक असो, रामाचें स्मरण करीत देहत्याग करितो, तो परमपदाला पावतो.' २४ असें परस्परांत भाषण करून ते देव तेथून स्वर्गाला गेले. इकडे रामानें विचार केला की, 'ह्या दुष्ट राक्षसानें 'हा लक्ष्मणा!' इत्यादि माझ्या आवाजांत शब्द काढले, आणि मेला, त्याचें कारण काय बरें असावें? माझ्या शब्दासारखे ते शब्द ऐकून सीतेची अवस्था काय झाली असेल?' २५, २६ ह्या चिंतेनें रामाचें मन व्यापून गेलें, आणि तो त्या दूरच्या ठिकाणाहून परतला. इकडे त्या दुष्ट मारीचाचें भाषण ऐकून सीता भयभीत झाली, आणि अत्यंत दुःखित होऊन लक्ष्मणाला म्हणाली, 'लक्ष्मणा! तुझ्या बंधूला त्या राक्षसानें पीडिलें आहे, तरी तूं तावडतोब जा. २७, २८ 'हा लक्ष्मणा!' हे तुझ्या बंधूचे शब्द तूं ऐकिले नाही काय?' तिला लक्ष्मण म्हणाला, 'देवि! ते रामाचे शब्द नव्हत.' २९ ते कोणा राक्षसाचे मरतां मरतांनाचे शब्द आहेत. देवि! जो राम रागावला असतां त्रैलोक्याचाही नाश एका क्षणांत करूं शकेल, तो देवांनाही वंद्य (राम) असे दीन शब्द उच्चारील, हें संभवतें तरी काय?' यावर क्रुद्ध होऊन सीतेनें लक्ष्मणाकडे पाहिलें. तिचे डोळे अश्रूंनीं भरून आले. ३०, ३१ ती म्हणाली, 'दुर्बुद्धे लक्ष्मणा!

१. या प्रसगाचें एकनाथानीं सुंदर वर्णन केलें आहे —' माझा अभिलाष धरोनी मनीं। वना आलासी सेवक होवोनी। श्रीराम राक्षसीं वधिल्या वनीं। मज निजपत्नी करूं पाहसी।

व्र्यसनमिच्छसि । प्रेषितो भरतेनैव रामनाशाभिकांक्षिणा ॥ ३२ ॥
मां नेतुमागतोऽसि त्वं रामनाश उपस्थिते । न प्राप्स्यसे त्वं मामद्य
पश्य प्राणांस्त्यजाम्यहम् ॥ ३३ ॥ न जानातीदृशं रामस्त्वां भार्याह-
रणोद्यतम् । रामादन्यं न स्पृशामि त्वां वा भरतमेव वा ॥ ३४ ॥
इत्युक्त्वा वध्यमाना सा स्वबाहुभ्यां रुरोद ह । तच्छ्रुत्वा लक्ष्मणः
कर्णौ पिधायातीव दुःखितः ॥ ३५ ॥ मामेवं भाषसे चंडि धिक् त्वां
नाशमुपैष्यसि । इत्युक्त्वा वनदेवीभ्यः समर्प्य जनकात्मजाम् ॥ ३६ ॥
ययौ दुःखातिसंविग्नो राममेव शनैः शनैः । ततोऽतरं समालोक्य
रावणो भिक्षुवेषधृक् ॥ ३७ ॥ सीतासमीपमगमत्स्फुरद्दंडकमंडलुः ।

बंधूवर संकट यावें असेंच तूं इच्छीत आहेस. रामनाशाची इच्छा करणाऱ्या भरता-
नेंच तुला पाठविलें आहे. ३२ रामाचा नाश झाल्यावर मला न्यावें, यासाठीच
तूं आला आहेस. परंतु पहा, माझी प्राप्ति तुला होणार नाहीं. मी आतांच प्राण देतें.
३३ अशा प्रकारें आपल्या पत्नीचें हरण करण्याविषयीं तूं उद्युक्त होशील हें रामाला
कळलें नाही. रामाशिवाय दुसऱ्या कोणालाही–तुला काय, किंवा भरताला काय–मी
स्पर्श करणार नाहीं.' ३४ असें बोलून आपल्याच हातांनीं ती ( सीता ) आपणाला
मारून घेऊन रडूं लागली. तें ऐकून लक्ष्मण अति दुःखित झाला. त्यानें कानावर
हात ठेविले. ३५ तो म्हणाला, 'हे तापट स्त्रिये ! तूं मला असें बोलत आहेस,
त्या अर्थी तुझा धिक्कार असो; अशानें तूं नाहीशी होशील.' असें बोलून त्यानें
सीतेला वनदेवीच्या स्वाधीन केलें, ३६ आणि दुःखानें अत्यंत खिन्न होऊन तो
हळूहळू रामाकडे गेला. ही संधि पाहून रावणानें भिक्षुवेष धारण केला, ३७
आणि तो सीतेजवळ गेला. त्याच्या हातांत दंडकमंडलू शोभत होते. सीतेनें

सवचोराचे साजणें । तैसी सेवा केली लक्ष्मणें । नानायुक्ती श्रीराम मारवणें । मज आपण भोगावया ॥ श्रीरामसेवा केली प्रबळ । त्या सेवेचें हेंचि फळ । पत्नी करावी जनक बाळ । सेवा सफळ येणे तुझी ॥ श्रीराम सन्निध देखोनी । म्हणसी जानकी माझी जननी । श्रीराम राक्षसीं वधलिया वनीं । सीता पत्नी करूं पाहसी ॥ मी तंव रामाचें रंक । परपुरुषाचें न शिवें अंक । जळो तुझें काळें मुख । माझा अभिलाष करूं पाहसी ॥ तूं तंव माझा अभिलाषी । मजपासूनि दूरी न वचसी । मीच जाईन श्रीरामापाशीं । काय त्यासी वर्तलें'॥–भा. रामायण.

सीता तमवलोक्याशु नत्वा संपूज्य भक्तितः ॥ ३८ ॥ कंदमूलफलादीनि दत्त्वा स्वागतमब्रवीत् । मुने भुंक्ष्व फलादीनि विश्रमस्व यथासुखम् ॥ ३९ ॥ इदानीमेव भर्ता मे ह्यागमिष्यति ते प्रियम् । करिष्यति विशेषेण तिष्ठ त्वं यदि रोचते ॥ ४० ॥ भिक्षुरुवाच ॥ का त्वं कमलपत्राक्षि को वा भर्ता तवानघे । किमर्थमत्र ते वासो वने राक्षससेविते । ब्रूहि भद्रे ततः सर्वं स्ववृत्तांतं निवेदये ॥ ४१ ॥ सीतोवाच ॥ अयोध्याधिपतिः श्रीमान् राजा दशरथो महान् । तस्य ज्येष्ठः सुतो रामः सर्वलक्षणलक्षितः ॥ ४२ ॥ तस्याहं धर्मतः पत्नी सीता जनकनंदिनी । तस्य भ्राता कनीयांश्च लक्ष्मणो भ्रातृवत्सलः ॥ ४३ ॥ पितुराज्ञां पुरस्कृत्य दंडके वस्तुमागतः । चतुर्दश समास्त्वां तु ज्ञातुमिच्छामि मे वद ॥ ४४ ॥ भिक्षुरुवाच ॥ पौलस्त्यतनयोऽहं तु रावणो राक्षसाधिपः । त्वत्कामपरितप्तोऽहं त्वां नेतुं पुरमागतः

त्याला पाहून लागलेच त्याला भक्तिपूर्वक वंदन केलें, आणि त्याची पूजा केली. ३८ तिनें त्याला कंदमूलें आणि फळें देऊन आदरपूर्वक म्हटलें, 'मुने! आपण हीं फळेंमूळें वगैरे खावी, आणि यथेच्छ विश्रांति घ्यावी. ३९ माझे पति आतां लवकर येतील, ते आपलें ह्याहूनही अधिक स्वागत करितील. आपल्या इच्छेस येईल, तर बसावें.' ४० भिक्षु–रावण–म्हणाला, 'हे कमलपत्राक्षि! तूं कोण आहेस? तुझा पति कोण आहे? निष्पाप सुंदरि! राक्षसांनी आश्रित केलेल्या ह्या वनामध्यें तूं काय म्हणून राहिली आहेस? सांग. नंतर माझा सर्व वृत्तांत मी तुला सांगेन.' ४१ सीता म्हणाली, 'अयोध्यापति दशरथ नांवाचा प्रख्यात व श्रीमान् राजा होऊन गेला. सर्वगुणसंपन्न राम हा त्याचा ज्येष्ठ पुत्र होय. ४२ मी त्याची धर्मपत्नी आहें. माझें नांव सीता असून मी जनकाची कन्या आहें. त्याचा धाकटा बंधु लक्ष्मण असून तो आपल्या (ज्येष्ठ) भ्रात्यावर अत्यंत प्रेम करणारा असा आहे. ४३ पित्याची आज्ञा स्वीकारून तो दंडकारण्यांत चौदा वर्षे राहण्याला आला आहे. आतां आपली हकीकत ऐकावी अशी माझी इच्छा आहे.' ४४ भिक्षु म्हणाला, 'मी पौलस्त्याचा पुत्र असून माझें नांव रावण आहे. मी राक्षसांचा राजा आहें. तुझ्यावर माझें प्रेम जडलें असून त्यायोगें मी संतप्त झालों आहें, आणि म्हणून माझ्या नगराला तुला नेण्याकरितां

॥ ४५ ॥ मुनिवेषेण रामेण किं करिष्यासि मां भज । भुंक्ष्व भोगान्मया सार्धं त्यज दुःखं वनोद्भवम् ॥ ४६ ॥ श्रुत्वा तद्वचनं सीता भीता किंचिदुवाच तम् । यदेवं भाषसे मां त्वं नाशमेष्यासि राघवात् ॥ ४७॥ आगमिष्यति रामोऽपि क्षणं तिष्ठ सहानुजः । मां को धर्षयितुं शक्तो हरेर्भार्यां शशो यथा ॥ ४८ ॥ रामबाणैर्विभिन्नस्त्वं पतिष्यसि महीतले। इति सीतावचः श्रुत्वा रावणः क्रोधमूर्च्छितः ॥ ४९ ॥ स्वरूपं दर्शयामास महापर्वतसन्निभम् । दशास्यं विंशतिभुजं कालमेघसमद्युति ॥ ५० ॥ तद्दृष्ट्वा वनदेव्यश्च भूतानि च वितत्रसुः । ततो विदार्य धरणीं नखैरुद्धृत्य बाहुभिः ॥ ५१ ॥ तोलयित्वा रथे क्षिप्त्वा ययौ क्षिप्रं विहायसा । हा राम हा लक्ष्मणेति रुदती जनकात्मजा ॥ ५२ ॥ भयोद्विग्नमना दीना

मी आलों आहें. ४५ मुनिवेष धारण करणाऱ्या रामाशीं तूं काय करणार ? तरी तूं माझा आश्रय कर. आणि मजसंगती उपभोग भोग. वनवासदुःख ( आतां ) सोडून दे !' ४६ हें त्याचें भाषण ऐकून सीता भयभीत झाली, तरी ( धीर धरून ) ती त्याला कांही बोलली. ती म्हणाली, ' हें तूं अशा प्रकारचें मला बोलत आहेस, तरी तुझा रामाच्या हातून नाश होईल. ४७ क्षणभर थांब, तो राम देखील आपल्या कनिष्ठ बंधूसह येईल. सिंहाच्या पत्नीला ससा कसा बरें भिवविणार ? ( माझीही गोष्ट तशीच आहे. ) मला भेवडावयाचें सामर्थ्य कोणाला आहे ? ४८ रामबाणांनीं विद्ध होऊन तूं भूतलावर पडशील !' हें सीतेचें भाषण ऐकून रावणाला इतका क्रोध आला की, तो आपलें देहभान विसरून गेला. ४९ त्यानें महापर्वतासारखें—दहा तोंडें, वीस हात, कृष्णमेघासारखी कांति,—अशा प्रकारचें आपलें स्वरूप दाखविलें. ५० तें पाहून वनदेवी आणि सर्व प्राणिवर्ग भिऊन गेले. नंतर रावणानें ( सीतेच्या पायांखालील ) जमीन आपल्या नखांनीं उकरिली, आणि बाहूंनी तिला उचलून धरिलें. मग रथांत घालून तिला घेऊन लगेच आकाशमार्गानें तो निघाला. ' हा रामा ! हा लक्ष्मणा ! ' अशा प्रकारें ती जानकी आक्रोश करूं लागली. ५१, ५२ तिचें मन भयानें त्रस्त होऊन गेलें होतें. दीन

१. सीतेचे पाय जोंपर्यंत जमिनीला लागले आहेत, तोपर्यंत तिला उचलून नेणे अशक्य आहे, अशा समजुतीनें रावणानें तिच्या पायाखालची जमीन उकरिली.

पश्यंती भुवमेव सा। श्रुत्वा तत्क्रंदितं दीनं सीतायाः पक्षिसत्तमः ॥५३॥ जटायुरुत्थितः शीघ्रं नगाग्रात्तीक्ष्णतुंडकः। तिष्ठ तिष्ठेति तं प्राह को गच्छति ममाग्रतः ॥ ५४ ॥ मुषित्वा लोकनाथस्य भार्यां शून्याद्वनालयात्। शुनको मंत्रपूतं त्वं पुरोडाशमिवाध्वरे ॥५५॥ इत्युक्त्वा तीक्ष्णतुंडेन चूर्णयामास तद्रथम्। वाहान्बिभेद पादाभ्यां चूर्णयामास तद्धनुः ॥ ५६ ॥ ततः सीतां परित्यज्य रावणः खड्गमाददे। चिच्छेद पक्षौ सामर्षः पक्षिराजस्य धीमतः ॥ ५७ ॥ पपात किंचिच्छेषेण प्राणेन भुवि पक्षिराट्। पुनरन्यरथेनाशु सीतामादाय रावणः ॥ ५८ ॥ क्रोशंती रामारामेति त्रातारं नाधिगच्छती। हा राम हा जगन्नाथ मां न पश्यसि दुःखिताम् ॥ ५९ ॥ रक्षसा नीयमानां स्वां भार्यां मोचय राघव। हा

होऊन तिनें आपली दृष्टि भूमीकडे लावली होती. तें दीनपणाचें सीतेचें आक्रंदन पक्षिराज जटायूला ऐकूं आलें. तेव्हां पर्वतशिखरावरून तो तत्काळ उठला. त्याची चोंच तीक्ष्ण होती तो त्याला (रावणाला) म्हणाला, 'थांब, थांब जनरहित अशा वनाश्रमांतून त्या लोकनाथ (रामाच्या) पत्नीला माझ्या पुढ्यांतून (मला न कळत) चोरून घेऊन कोण जाणार? यज्ञांतील, मंत्रांनी पवित्र झालेला, पुरोडाश[1] ज्याप्रमाणें एखाद्या कुत्र्यानें हरण करावा, त्याचप्रमाणें (सीता हरण करणाऱ्या) तुझी स्थिति आहे.' ५३, ५४, ५५ असें बोलून आपल्या तीक्ष्ण चोंचीनें त्यानें (रावणाच्या) रथाचा चूर केला, घोड्यांचे तुकडे केले, आणि त्याचे धनुष्याचें पायांनी चूर्ण केलें. ५६ (हें पाहून) रावणानें सीतेला सोडून (हातांत) खड्ग घेतलें, आणि क्रोधाविष्ट होऊन त्यानें त्या बुद्धिमान् पक्षिराजाचे पंख तोडले. ५७ यामुळें तो पक्षिश्रेष्ठ किंचित् प्राणांची धुगधुगी राहिली आहे, अशा स्थितींत जमिनीवर पडला. इकडे रावणानें दुसरा रथ[2] जोडून त्यांत सीतेला घातलें (आणि तो निघाला). ५८ 'हा राम! हा राम! हा जगन्नाथ रामा! दुःखमग्न मला आपण पाहात नाही काय? मला आतां कोणी त्राता नाही,' असा ती (सीता) आक्रोश करूं लागली ५९ (ती म्हणाली,) 'आपल्या पत्नीला राक्षस हरण करून नेत आहे. तरी तिला सोडवा. महाभागा लक्ष्मणा! मी अपराधी आहें. माझें रक्षण कर.

१. या नावाचें होमद्रव्य. २. हा दुसरा रथ रावणानें मायेनें निर्माण केला होता. पहिल रथ जटायूनें मोडल्यावर सीतेला रावणानें खांद्यावर वाहून नेलें, असें इतरत्र वर्णन आहे.

लक्ष्मण महाभाग त्राहि मामपराधिनीम् ॥ ६० ॥ वाक्शरेण हतस्त्वं मे क्षंतुमर्हसि देवर । इत्येवं क्रोशमानां तां रामागमनशंकया ॥ ६१ ॥ जगाम वायुवेगेन सीतामादाय सत्वरः । विहायसा नीयमाना सीताप-श्यदधोमुखी ॥ ६२ ॥ पर्वताग्रे स्थितान्पंच वानरान्वारिजानना । उत्त-रीयार्धखंडेन विमुच्याभरणादिकम् ॥ ६३ ॥ बद्ध्वा चिक्षेप रामाय कथयंत्विति पर्वते । ततः समुद्रमुल्लंघ्य लंकां गत्वा स रावणः ॥६४॥ स्वांतःपुरे रहस्येतामशोकविपिनेऽक्षिपत् । राक्षसीभिः परिवृतां मातृबु-द्ध्याऽनुपालयत् ॥ ६५ ॥ कृशाऽतिदीना परिकर्मवर्जिता दुःखेन शुष्य-द्वदनाऽतिविह्वला । हा राम रामेति विलप्यमाना सीता स्थिता राक्षसवृं-दमध्ये ॥६६॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अरण्यकांडे सप्तमः सर्गः ॥ ७ ॥

६० भावाजी ! मीं तुम्हांला वाग्बाणांनीं ताडण केलें, तरी त्याबद्दल मला क्षमा करा. अशा रीतीनें आक्रोश करीत असणाऱ्या सीतेला घेऊन तो ( रावण ) वायुवेगानें सत्वर निघून गेला. त्याला शंका आली कीं मध्येंच राम येईल. रावण सीतेला आकाशमार्गानें नेत असतां तिनें आपली दृष्टि खालीं भूमीकडे लाविली होती. ६१,६२ अशा स्थितींत त्या कमलनयन सीतेनें पर्वतशिखरावर असलेले पांच वानर पाहिले. ( त्यांना पाहून ) त्यांनीं रामाला ( आपलें वृत्त ) कळवावें, अशा उद्देशानें आपल्या अंगावरील वस्त्रांत आपले दागिने वगैरे बांधून सीतेनें ते ( त्यांकडे ) खालीं पर्वतावर टाकले. नंतर समुद्र उल्लंघून तो रावण लंकेला गेला. ६३,६४ आपल्या अंतःपुरांतील एकांतस्थल अशा अशोकवनांत त्यानें तिला ठेवून दिलें. तेथें तिच्या रक्षणाकरितां त्यानें राक्षसिणी ठेविल्या, आणि मातृ-बुद्धीनें तिचें पालन केलें. ६५ तेथें कृश झालेली, अत्यंत दीनासारखी राहणारी, अभ्यंगस्नानादि संस्काररहित असणारी, दुःखामुळें तोंड सुकून जाऊन अति व्याकुळ झालेली सीता 'हा रामा ! हा रामा !' असा विलाप करीत त्या राक्षसांच्या समुदायामध्यें राहिली. ६६"

**अरण्यकांड, सर्ग सातवा समाप्त.**

१. हे पांच वानर म्हणजे सुग्रीव व त्याचे चार सोबती होत. २. 'मातृबुद्धीनें रावणानें सीतेचें पालन केलें,' हें वर्णन मागीलपुढील कथासंदर्भाच्या विरुद्ध दिसतें. तरी येणेंकरून रावणाची रामविषयक विरोधभक्ति होती, हें दाखविण्याचा कवीचा उद्देश असावा, असें वाटतें.

## अरण्यकांड, सर्ग आठवा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ रामो मायाविनं हत्वा राक्षसं कामरूपिणम् । प्रतस्थे स्वाश्रमं गंतुं ततो दूराद्ददर्श तम् ॥ १ ॥ आयांतं लक्ष्मणं दीनं मुखेन परिशुष्यता । राघवश्चिंतयामास स्वात्मन्येव महामतिः ॥ २ ॥ लक्ष्मणस्तन्न जानाति मायासीतां मया कृताम् । ज्ञात्वाप्येनं वंचयित्वा शोचामि प्राकृतो यथा ॥ ३ ॥ यद्यहं विरतो भूत्वा तूष्णीं स्थास्यामि मंदिरे । तदा राक्षसकोटीनां वधोपायः कथं भवेत् ॥ ४ ॥ यदि शोचामि तां दुःखसंतप्तः कामुको यथा । तदा क्रमेणानुचिन्वन्सीतां यास्येऽसुरालयम् । रावणं सकुलं हत्वा सीतामग्नौ स्थितां पुनः ॥ ५ ॥ मयैव स्थापितां नीत्वा याताऽयोध्यामतंद्रितः । अहं मनुष्यभावेन जातोऽस्मि ब्रह्मणाऽर्थितः ॥ ६ ॥ मनुष्यभावमापन्नः किंचित्कालं वसामि कौ । ततो मायामनुष्यस्य चरितं मेऽनुशृण्वताम्

श्रीमहादेव म्हणाला, "मायावी आणि इच्छनुसार रूप धारण करणाऱ्या त्या राक्षसाचा—मारीचाचा—वध करून राम आपल्या आश्रमाकडे येण्यास निघाला, तों दुरून लक्ष्मण येत आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. तो दीन झाला असून त्याचें तोंड अगदीं सुकून गेलें होतें. तें पाहून त्या महामतिमान् रामानें मनांत विचार केला कीं, १,२ 'मी मायासीता निर्माण केली आहे, ही गोष्ट लक्ष्मणाला ठाऊक नाहीं. मला सर्व कळत आहे, तरी लक्ष्मणाची फसवणूक करून प्राकृत मनुष्याप्रमाणें आपण शोक करून दाखवावा. ३ जर मी वैराग्य धरून माझ्या मंदिरांत स्वस्थ बसेन, तर कोट्यवधि राक्षसांच्या वधाची गोष्ट कशी घडून येईल? ४ कामिजनाप्रमाणें दुःखसंतप्त होऊन तिजसाठीं शोक करूं लागेन, तर मग क्रमाक्रमानें सीतेचा शोध करीत राक्षसांच्या नगराला—लंकेला—माझें जाणें होईल. ( असें झालें असतां ) किमपीही आळस न करितां सकुटुंब रावणाचा वध करीन, आणि माझ्याच सांगण्यावरून अग्नीत ( गुप्तपणें ) राहिलेल्या सीतेला घेऊन अयोध्येला जाईन. ब्रह्मदेवाच्या प्रार्थनेवरून मीं मनुष्यरूप धारण केलें आहे. ५,६ ह्या मनुष्यरूपांत कांहीं काल मी पृथ्वीवर राहाणार आहें. त्यामुळें माझें मायामनुष्यावता-

॥ ७ ॥ मुक्तिः स्यादप्रयासेन भक्तिमार्गानुवर्तिनाम् । निश्चित्यैवं तदा दृष्ट्वा लक्ष्मणं वाक्यमब्रवीत् ॥ ८ ॥ किमर्थमागतोऽसि त्वं सीतां त्यक्त्वा मम प्रियाम् । नीता वा भक्षिता वापि राक्षसैर्जनकात्मजा॥९॥ लक्ष्मणः प्रांजलिः प्राह सीताया दुर्वचो रुदन् । हा लक्ष्मणेति वचनं राक्षसोक्तं श्रुतं तया ॥ १० ॥ त्वद्वाक्यसदृशं श्रुत्वा मां गच्छेति त्वराब्रवीत् । रुदती सा मया प्रोक्ता देवि राक्षसभाषितम् । नेदं रामस्य वचनं स्वस्था भव शुचिस्मते ॥ ११ ॥ इत्येवं सांत्विता साध्वी मया प्रोवाच मां पुनः । यदुक्तं दुर्वचो राम न वाच्यं पुरतस्तव ॥ १२ ॥ कर्णौ पिधाय निर्गत्य यातोऽहं त्वां समीक्षितुम् । रामस्तु लक्ष्मणं प्राह तथाऽप्यनुचितं कृतम् ॥ १३ ॥ त्वया स्त्रीभाषितं सत्यं कृत्वा त्यक्त्वा शुभाननाम् । नीता वा भक्षिता वाऽपि राक्षसैर्नात्र संशयः ॥ १४ ॥

राचें चरित्र जे कोणी ऐकतील, त्यांना भक्तिमार्गानें चालत असतां आयासावांचून मुक्ति प्राप्त होईल.' असा निश्चय मनाशी ठरवून ( राम ) लक्ष्मणाला पाहून त्याला बोलला की, ७,८ 'माझ्या प्रिय सीतेला सोडून तूं काय म्हणून आलास ? ती जनकतनया बहुधा राक्षसांनी नेली असेल, किंवा भक्षिली असेल !'' ९ त्यावर लक्ष्मणानें हात जोडले, आणि रडन रडत सीतेच्या तोंडचे अपशब्द त्यानें रामाला निवेदन केले. ( तो म्हणाला, ) "हा लक्ष्मणा !' असे राक्षसाचे तोंडचे शब्द तिनें—सीतेनें—ऐकिले. १० ती वाणी तुझ्यासारखी होती. ती कानी पडतांच 'त्वरेनें जा,' म्हणून ती मला रडत बोलली. मी तिला म्हणालों, 'सुहास्यवदने देवि ! हे शब्द राक्षसाचे आहेत, रामाचे नव्हत. तूं स्वस्थ रहा.' ११ अशा प्रकारें मीं त्या साध्वीचें सांत्वन केलें, तरी ती मला उलट जे दुःशब्द बोलली, ते तुझ्यापुढें उच्चारण्यासारखे नाहीत. १२ कान झांकून घेऊन मी तुला पाहण्यास ( तेथून ) निघून आलों." राम लक्ष्मणाला म्हणाला, 'तथापि तूं केलेंस, तें अनुचितच होय. १३ स्त्रीभाषण खरें मानून तूं त्या शुभाननेला टाकून ( आलास ); राक्षसांनीं तिला नेली असेल किंवा भक्षण केली असेल,

१. (१) आत्यंतिक भक्तीनें मुक्ति —'मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयः'॥—भ. गीता ८. ( २ ) 'तूं मन बुद्धि साचेंसीं । जरी माझिया स्वरूपीं अर्पिसी । तरी मातेंचि गा पावसी । हे माझी भाक ॥ '—ज्ञानेश्वरी. अ. ८.

**इति चिंतापरो रामः स्वाश्रमं त्वरितो ययौ । तत्रादृष्ट्वा जनकजां विल-
लापातिदुःखितः ॥ १५ ॥ हा प्रिये क्व गताऽसि त्वं नासि पूर्ववदाश्रमे ।
अथवा मद्विमोहार्थं लीलया क्व विलीयसे ॥ १६ ॥ इत्याचिन्वन्वनं सर्वं
नापश्यज्जानकीं तदा । वनदेव्यः कुतः सीतां ब्रुवंतु मम वल्लभाम्
॥ १७ ॥ मृगाश्च पक्षिणो वृक्षा दर्शयंतु मम प्रियाम् । इत्येवं विलपन्नेव
रामः सीतां न कुत्रचित् ॥ १८ ॥ सर्वज्ञः सर्वथा क्वापि नापश्यद्रघुनं-
दनः । आनंदोऽप्यन्वशोचत्तामचलोऽप्यनुधावति ॥ १९ ॥ निर्ममो
निरहंकारोऽप्यखंडानंदरूपवान् । मम जायेति सीतेति विललापातिदुः-**

यांत संशय नाही.' १४ अशा प्रकारें चितातुर होऊन राम आपल्या आश्रमाला त्वरित आला. परंतु तेथें सीता न दिसल्यामुळें अत्यंत दुःखित होऊन त्यानें विलाप केला. १५ 'हा प्रिये! तूं कोठें गेली आहेस? नित्यासारखी आज तूं आश्रमांत कां (दिसत) नाहींस? अथवा मला मोह पाडण्यासाठीं कोठें लपून बसली नाहीस ना?' १६ असें म्हणून वनभर त्यानें शोध केला, तरी त्याला जानकी कोठेंही दिसली नाही. तेव्हां 'वनदेवता माझी सीता कुठ आहे, तें सांगोत, पशु, पक्षी, वृक्ष माझी प्रिया कोठें आहे तें दाखवोत,' अशा रीतीनें त्या सर्वज्ञानें सर्वत्र शोध केला, तरी त्या रघुनंदनाला सीता मुळीच कोठें दिसेना. ( राम ) स्वतः आनंदरूप असूनही त्यानें सीतेकरितां शोक केला. तो अचल–गमनागमनरहित–असूनही धावूं लागला. १७,१८,१९ तो राम ममत्वरहित, अहंकाररहित, नित्य आनंदस्वरूप असूनही अति दुःखित

१. ( १ ) 'सीता सीता म्हणता वेळोवेळा । वाळले ओंठ सुकला गळा । अश्रु पूर्ण आले डोळा । जनकबाळा केउती आहे ॥ मूर्च्छापन्न मूर्च्छेआंत । हाय हाय सीता म्हणत । सीता-विरहें श्रीरघुनाथ । दुःखाभिभूत अतिदुःखी ॥ पडे अडखळे उठे बैसे । सीता सीता म्हणे आवेशे । सीताविरहें लागले पिसें । क्षणक्षणां पुसे जानकी' ॥–भा. रामायण. ( २ ) 'यैः परिक्रीडसे सीते विश्वस्तैर्मृगपोतकैः । एते हीनास्त्वया सौम्ये ध्यायन्त्यस्राविलेक्षणाः ॥ मामिहोत्सृज्य करुणं कीर्तिर्नरमिवानृजम् । क्व गच्छसि वरारोहे मा मोत्सृज सुमध्यमे ॥'–रामायण. २. सदृश उतारा —' निर्मम आणिक निरहंकार । परमात्मा जो श्रीरघुवीर । तोचि शोक करीत थोर । माझी जाया म्हणोनी ॥ अखंड आनंदरूप राम । सकळिकांचा सुखविश्राम । तोचि पावत आहे श्रम । नानापरी फिरूनी ॥ ऐसा परिपूर्ण रघुनंदन । वर्ततो मायेस अनुसरून । परी तयातें प्राकृत जन । कामी म्हणती स्त्रियेचा ॥'–अध्यात्मरामकथा.

खितः ॥ २० ॥ एवं मायामनुचरन्नसक्तोऽपि रघूत्तमः । आसक्त इव मूढानां भाति तत्त्वविदां न हि ॥ २१ ॥ एवं विचिन्वन्सकलं वनं रामः सलक्ष्मणः । भग्नं रथं छत्रचापं कूबरं पतितं भुवि ॥ २२ ॥ दृष्ट्वा लक्ष्मणमाहेदं पश्य लक्ष्मण केनचित् । नीयमानां जनकजां तं जित्वान्यो जहार ताम् ॥ २३ ॥ ततः कंचिद्भुवो भागं गत्वा पर्वतसन्निभम् । रुधिराक्तवपुर्दृष्ट्वा रामो वाक्यमथाब्रवीत् ॥ २४ ॥ एष वै भक्षयित्वा तां जानकीं शुभदर्शनाम् । शेते विविक्तेऽतितृप्तः पश्य हन्मि निशाचरम् ॥ २५ ॥ चापमानय शीघ्रं मे बाणं च रघुनंदन । तच्छ्रुत्वा रामवचनं जटायुः प्राह भीतवत् ॥ २६ ॥ मां न मारय भद्रं ते म्रियमाणं स्वकर्मणा । अहं जटायुस्ते भार्याहारिणं समनुद्रुतः ॥ २७ ॥ रावणं तत्र युद्धं मे बभूवारिविमर्दन । तस्य वाहान् रथं चापं छित्त्वाहं तेन घातितः

होऊन ' माझी जाया, ' ' माझी सीता ' असा शोक करू लागला. २० अशा रीतीनें मायेस अनुसरून वागणारा रघूत्तम राम कोणत्याही ठिकाणीं आसक्ति ठेवणारा नसतांही अज्ञानी लोकांस तो आसक्त असल्यासारखा वाटतो, तत्ववेत्त्यांना तो तसा वाटत नाहीं. २१ याप्रमाणें तें सारें वन लक्ष्मणासह रामानें धुंडिलें, परंतु एक मोडलेला रथ, एक छत्री, एक धनुष्य आणि जमिनीवर पडलेलें जूं (इतक्याच) वस्तू त्याच्या दृष्टीस पडल्या. तेव्हां तो लक्ष्मणाला म्हणाला, ' लक्ष्मणा ! पहा, सीतेला कोणी ( राक्षस ) नेत असतां त्याला जिंकून दुसऱ्या कोणी तिला नेलें असावें. ' २२,२३ नंतर कांहीं जमीन-मार्ग-चालून गेल्यावर रक्तबंबाळ झालेलें पर्वतासारखें एक (प्रचंड) शरीर त्यांच्या दृष्टीस पडलें. तें पाहून राम बोलला. २४ ' ह्यानेंच त्या रूपसंपन्न जानकीला खाऊन टाकिलें आहे ! तृप्त होऊन हा येथें एकांतांत लोळत पडला आहे. पहा ! आतां मी ह्या राक्षसाचा वध करितों. २५ रघुनंदना—लक्ष्मणा ! माझें धनुष्य आणि बाण लवकर आण. ' हें रामाचें भाषण ऐकून जटायु भ्याल्यासारखा होऊन म्हणाला. २६ ' मला मारूं नको. तुझें कल्याण असो. मी माझ्याच कर्मानें मरत आहें. मी जटायु असून तुझ्या स्त्रीचें हरण करणाऱ्या रावणावर धांवून गेलों होतों. हे शत्रुनाशना ! तेथें माझें त्याच्याशीं युद्ध झालें. त्याचे घोडे, रथ, धनुष्य हीं सर्व मी चूर्ण केलीं. परंतु

॥ २८ ॥ पतितोऽस्मि जगन्नाथ प्राणांस्त्यक्ष्यामि पश्य माम् । तच्छ्रुत्वा राघवो दीनं कंठप्राणं ददर्श ह ॥ २९ ॥ हस्ताभ्यां संस्पृशन् रामो दुःखाश्रुवृतलोचनः ॥३०॥ जटायो ब्रूहि मे भार्या केन नीता शुभानना । मत्कार्यार्थं हतोऽसि त्वमतो मे प्रियबांधवः ॥ ३१ ॥ जटायुः सन्नया वाचा वक्राद्रक्तं समुद्वमन् । उवाच रावणो राम राक्षसो भीमविक्रमः ॥ ३२ ॥ आदाय मैथिलीं सीतां दक्षिणाभिमुखो ययौ । इतो वक्तुं न मे शक्तिः प्राणांस्त्यक्ष्यामि तेऽग्रतः ॥ ३३ ॥ दिष्ट्या दृष्टोऽसि राम त्वं म्रियमाणेन मेऽनघ । परमात्माऽसि विष्णुस्त्वं मायामनुजरूपधृक् ॥ ३४ ॥ अंतकालेऽपि दृष्ट्वा त्वां मुक्तोऽहं रघुसत्तम । हस्ताभ्यां स्पृश मां राम पुनर्यास्यामि ते पदम् ॥ ३५ ॥ तथेति रामः परपर्श तदंगं पाणिना स्मयन् । ततः प्राणान्परित्यज्य जटायुः पतितो भुवि ॥ ३६ ॥ रामस्तमनुशोचित्वा बंधुवत्साश्रुलोचनः । लक्ष्मणेन समानाय्य काष्ठानि

( शेवटीं ) त्याने माझा घात केला. २७, २८ हे जगन्नाथा ! मी जखमी होऊन पडलों आहें. आतां मी प्राण सोडणार. मजकडे अवलोकन कर.' तें ऐकून त्या कंठीं प्राण आलेल्या दीन जटायूकडे रामानें पाहिलें. २९ रामाचे डोळे दुःखाश्रूंनीं भरून आले. यानें आपल्या हातांनी जटायूला कुरवाळिलें. ३० ( तो म्हणाला, ) 'जटायो ! माझी सुवदना भार्या कोणी हरण करून नेली, तें सांग. तूं माझे कार्याप्रीत्यर्थ मारला गेला आहेस, त्या अर्थी तूं माझा प्रिय बंधु आहेस.' ३१ जटायूच्या तोंडांतून रक्त वाहात होतें. तो क्षीण स्वराने बोलला, रामा ! रावण नांवाचा एक 'उग्र पराक्रमाचा राक्षस आहे. ३२ तो जनकराजाची कन्या जी सीता, तिला घेऊन दक्षिणेच्या दिशेनें गेला. यापुढें मला बोलण्याला शक्ति नाही. मी आतां तुझ्यापुढें प्राणत्याग करितों. ३३ अनघा रामा ! तुझें दर्शन मला मरतांना झालें, ही मोठ्या भाग्याची गोष्ट होय. तूं प्रत्यक्ष परमात्मा विष्णु असून मायेनें मनुष्यरूप धारण केलें आहेस. ३४ रघुश्रेष्ठा ! अंतकाळीं तरी तुझें दर्शन होऊन मी मुक्त झालों आहें. रामा ! 'पुनः एकदां आपले हात माझ्या शरीरावरून फिरीव. तेणेंकरून मी तुझ्या पदाला जाईन.' ३५ 'बरें आहे' असें म्हणून रामानें संतोषपूर्वक त्याच्या आंगाला हस्तस्पर्श केला. नंतर जटायु प्राण सोडून भमीवर पडला. ३६ त्या (जटायू) बद्दल रामानें साक्षात् बंधूप्रमाणें

प्रददाह तम् ॥ ३७ ॥ स्नात्वा दुःखेन रामोऽपि लक्ष्मणेन समन्वितः ।
हत्वा वने मृगं तत्र मांसखंडान्समंततः ॥ ३८ ॥ शाद्वले प्राक्षिपद्रामः
पृथक् पृथगनेकधा । भक्षंतु पक्षिणः सर्वे तृप्तो भवतु पक्षिराट् ॥ ३९ ॥
इत्युक्त्वा राघवः प्राह जटायो गच्छ मत्पदम् । मत्सारूप्यं भजस्वाद्य
सर्वलोकस्य पश्यतः ॥ ४० ॥ ततोऽनंतरमेवासौ दिव्यरूपधरः शुभः ।
विमानवरमारुह्य भास्वरं भानुसन्निभम् ॥ ४१ ॥ शंखचक्रगदापद्म-
किरीटवरभूषणैः । द्योतयन्स्वप्रकाशेन पीतांबरधरोऽमलः ॥ ४२ ॥
चतुर्भिः पार्षदैर्विष्णोस्तादृशैरभिपूजितः । स्तूयमानो योगिगणै राममा-
भाष्य सत्वरः । कृतांजलिपुटो भूत्वा तुष्टाव रघुनंदनम् ॥ ४३ ॥
॥ जटायुरुवाच ॥ अगणितगुणमप्रमेयमाद्यं सकलजगत्स्थितिसंयमा-

शोक केला. त्याचे डोळे दुःखाश्रूंनी भरून आले. त्यानें लक्ष्मणाकडून काष्ठें आणवून त्याचें दहन केलें. ३७ नंतर लक्ष्मणासह दुःखी अंतःकरणानें त्यानें स्नान केलें. मग त्या अरण्यांत रामानें एक मृग मारून त्याचें मांस सर्वत्र हिरव्यागार गवताच्या कुरणावर अनेक ठिकाणीं फेंकिलें, आणि ' सर्व पक्षी हें ( मांस ) खावोत. येणेंकरून पक्षिराज ( जटायु ) तृप्त होवो, ' असें राम बोलला नंतर तो म्हणाला, ' जटायो ! तूं माझ्या पदाला जा. सर्व लोकांच्या देखत तुला माझी सरूपता[1] मुक्ति मिळो. ' ३८, ३९, ४० नंतर त्या पुण्यवान् जटायूला दिव्यस्वरूप प्राप्त होऊन तो सूर्यासारख्या तेजस्वी विमानांत आरूढ झाला. ४१ शंख, चक्र, गदा, पद्म, किरीटादि सुंदर भूषणांनी व आपल्या अंगकांतीनें त्यानें सर्वत्र शोभा आणिली होती. त्यानें पीतांबर परिधान केला असून त्याची शरीरकांति निर्मल दिसत होती. ४२ तशाच स्वरूपांचे विष्णूचे चार पार्षद[2] त्याची ( चारी बाजूंनीं ) पूजा करीत होते, आणि योगिजनांचे समूह त्याची स्तुति करीत होते. इतक्यांत त्या रघुनंदन रामाला उद्देशून हात जोडून स्तुति करण्यास त्या ( जटायू )नें प्रारंभ केला. ४३ जटायु म्हणाला, ' ज्याचे गुण असंख्य आहेत; जो प्रमेयातीत[3] आहे, जो सर्वांचें आदिकारण आहे, सकल जगाचें पालन, संहार इत्यादिकांचा जो

१. मुक्तीचे प्रकार चार आहेत, ते –सलोकता, समीपता, सरूपता, आणि सायुज्यता. २ परिचारक. ३ देशकालाची इयत्ता-मर्यादा-ज्याला नाहीं असा.

दिहेतुम् । उपरमपरमं परात्मभूतं सततमहं प्रणतोऽस्मि रामचंद्रम् ॥४४॥ निरवधिसुखमिंदिराकटाक्षं क्षपितसुरेंद्रचतुर्मुखादिदुःखम् । नरवरमनिशं नतोऽस्मि रामं वरदमहं वरचापबाणहस्तम् ॥४५॥ त्रिभुवनकमनीयरूपमीड्यं रविशतभासुरमीहितप्रदानम् । शरणदमनिशं सुरागमूले कृतनिलयं रघुनंदन प्रपद्ये ॥ ४६ ॥ भवविपिनदवाग्निनामधेयं भवमुखदैवतदैवतं दयालुम् । दनुजपतिसहस्रकोटिनाशं रवितनयासदृशं हरिं प्रपद्ये ॥४७॥ अविरतभवभावनातिदूरं भवविमुखैर्मुनिभिः सदैव दृश्यम् । भवजलधिसुतारणांघ्रिपोतं शरणमहं रघुनंदनं प्रपद्ये ॥ ४८ ॥ गिरिशगिरि-

हेतु आहे, ज्याचें रूप शांतीनें शोभणारें असें आहे, अशा त्या परमात्मरूपी रामचंद्राला मी सतत प्रणाम करितों. ४४ जो अत्यंत सुखमय आहे, ज्यावर लक्ष्मी आपले प्रेमकटाक्ष टाकित असते, ज्यानें इंद्र, ब्रह्मदेव इत्यादिकांचीं दुःखें दूर केली आहेत, जो (भक्तांना) वर देण्यांत सदैव तत्पर असतो, ज्याच्या हातांत सर्वदा उत्तम धनुष्यबाण असतात; अशा त्या नरश्रेष्ठाला—रामचंद्राला—मी अहर्निश नमन करितों. ४५ ज्याचें रूप त्रिभुवनांत अत्यंत सुंदर असें आहे, जो सर्वांनीं स्तुति करण्यास योग्य आहे, जो शेंकडों सूर्याप्रमाणें तेजस्वी आहे, जो ( भक्तांचे ) काम पूर्ण करीत असतो, जो निरंतर सर्वांचा आश्रयदाता आहे, अंतःकरणांत प्रेम असेल, तेथेंच जो वसति करितो; अशा त्या रघुनंदनाला मी शरण जातों. ४६ ज्याचें नांव संसाररूपी अरण्याला जाळून टाकणारा वणवा आहे, जो शंकर वगैरे दैवतांचें दैवत आहे, जो दयाळू आहे, हजारों कोटि मोठमोठ्या दैत्यांचा ज्यानें नाश केला आहे, ज्याची अंगकांति सूर्यकन्या जी यमुना तिच्यासारखी कृष्णवर्ण आहे, अशा त्या हरीला—श्रीरघुवीराला—मी वंदन करितों. ४७ संसारांत नित्य आसक्त असणाऱ्या लोकांपासून जो सर्वदा दूर असतो, संसारापासून पराङ्मुख झालेल्यांनाच ज्याची भेट होते, ज्याचे चरण भवसागर तरून जाण्याची उत्तम नौका होत; अशा त्या रघुनंदनाला मी शरण येतों. ४८ जो शंकर

१. 'दिनानाथ हा राम कोदंडधारी । पुढें देखता काळ पोटीं थरारी' ॥—मनाचे श्लोक. २. (१) ' भजेऽहं सदा राममिंदीवराभं भवारण्यदावानलाभाभिधानम् '—इंद्रकृत रामस्तोत्र, अध्यात्मरामायण. (२) ' बहू चांगले नाम या राघवाचे । अती साजिरें स्वल्प सोपें फुकाचें ॥ करी मूळ निर्मूळ घेता भवाचे। जिता मानवा हेंचि कैवल्य साचे ॥'—मनाचे श्लोक. ३. ईशचरण

**सुतामनोनिवासं गिरिवरधारिणमीहिताभिरामम् । सुरवरदनुजेंद्रसेवितांघ्रिं सुरवरदं रघुनायकं प्रपद्ये ॥ ४९ ॥ परधनपरदारवर्जितानां परगुणभूतिषु तुष्टमानसानाम् । परहितनिरतात्मनां सुसेव्यं रघुवरमंबुजलोचनं प्रपद्ये ॥ ५० ॥ स्मितरुचिरविकासिताननाब्जमतिसुलभं सुरराजनीलनीलम् । सितजलरुहचारुनेत्रशोभं रघुपतिमीशगुरोर्गुरुं प्रपद्ये ॥५१॥ हरिकमलजशंभुरूपभेदात्त्वमिह विभासि गुणत्रयानुवृत्तः । रविरिव जलपूरितोदपात्रेष्वमरपतिस्तुतिपात्रमीशमीडे ॥ ५२ ॥ रतिपतिशतकोटिसुंदरांगं शतपथगोचरभावनाविदूरम् । यतिपतिहृदये सदा विभातं**

आणि पार्वती यांच्या अंतःकरणांत वास करितो, जो ( गोवर्धननामक ) मोठ्या पर्वतास (कृष्णावतारीं) धारण करितो, ज्याची चरित्रें अत्यंत मनोहर आहेत, मोठमोठे देव आणि दैत्य ज्याची चरणसेवा करित असतात, जो देवांना वर देत असतो; अशा त्या रघुनायकाला मी शरण जातों. ४९ परधन आणि परस्त्री ज्यांनीं वर्ज्य केलीं आहेत, दुसऱ्यांच्या गुणांनी आणि ऐश्वर्यानें ज्यांचें अंतःकरण तुष्ट होतें, ज्यांचें मन सर्वदा परहित करण्याचे कामी तत्पर असतें, अशांना जो सुसेव्य, त्या कमलनयन रघुश्रेष्ठाला—रामाला—मी शरण जातों. ५० हास्याचे योगानें ज्याचें मुखकमल सुंदर व विकसित झालें आहे, ज्याची प्राप्ति अत्यंत सुलभ मार्गानें ( भक्तिभावानें ) होत असते, ज्याची स्वरूपकांति इंद्रनील मण्याप्रमाणें नील आहे, शुभ्र कमलाप्रमाणें सुंदर नेत्रांनी ज्याला शोभा आली आहे, अशा शंकराच्या गुरूचाही—ब्रह्मदेवाचाही—गुरु जो विष्णु—रामचंद्र—त्याला मी शरण जातों. ५१ उदकानें भरलेल्या अनेक भांड्यांत अनेक रूपांनीं सूर्य जसा भासतो, त्याप्रमाणें तीन गुणांनीं युक्त होत्साता तूं विष्णु, ब्रह्मदेव आणि शंकर अशा रूपभेदांनीं ह्या जगांत शोभत असतोस. देवेंद्राच्या स्तुतीसही तूं पात्र होतोस, त्या तुझें रामचंद्राचें मी स्तवन करितों. ५२ शेंकडों मदनांप्रमाणें ज्याची अंगकांति सुंदर आहे, शतपथब्राह्मणांत सांगितल्याप्रमाणें प्रेमभावानेंच ज्याची प्राप्ति होणें दुर्घट नाहीं, मोठमोठ्या योगिजनांच्या हृदयांत जो सर्वदा प्रकाशत असतो,

भवाब्धितारक नौका.— 'ध्येयं सदा परिभवघ्नमभीष्टदोहं तीर्थास्पदं शिवविरिंचिनुतं शरण्यम् । भृत्यार्तिहं प्रणतपाल भवाब्धिपोतं वंदे महापुरुष ते चरणारविंदम् ॥ '—भागवत ११.

रघुपतिमार्तिहरं प्रभुं प्रपद्ये ॥ ५३ ॥ इत्येवं स्तुवतस्तस्य प्रसन्नोऽभूद्र-
घूत्तमः । उवाच गच्छ भद्रं ते मम विष्णोः परं पदम् ॥ ५४ ॥
शृणोति य इदं स्तोत्रं लिखेद्वा नियतः पठेत् । स याति मम सारूप्यं
मरणे मत्स्मृतिं लभेत् ॥ ५५ ॥ इति राघवभाषितं तदा श्रुतवान्
हर्षसमाकुलो द्विजः । रघुनंदनसाम्यमास्थितः प्रययौ ब्रह्मसुपूजितं पदम्
॥ ५६ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अरण्यकांडे
अष्टमः सर्गः ॥ ८ ॥

## अरण्यकांड, सर्ग नववा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ ततो रामो लक्ष्मणेन जगाम विपि-
नांतरम् । पुनर्दुःखं समाश्रित्य सीतान्वेषणतत्परः ॥ १ ॥ तत्राद्भु-
तसमाकारो राक्षसः प्रत्यदृश्यत । वक्षस्येव महावक्त्रश्चक्षुरादिविवर्जितः

अशा त्या (लोकाच्या) पीडा हरण करणाऱ्या प्रभु (रामचंद्रा)ला मी
शरण जातों.' ५३ अशा प्रकारें तो (जटायु) स्तुति करीत असतां रघुश्रेष्ठ
(श्रीराम) प्रसन्न झाला, आणि त्याला म्हणाला, 'तुझें कल्याण असो. माझ्या–
विष्णूच्या उच्च पदाला तूं प्राप्त होशील. ५४ हें स्तोत्र जो कोणी ऐकेल, लिहील
किंवा नियमानें पठण करील, तो माझ्या सरूपता मुक्तीला प्राप्त होईल. त्याला
मरणकाळीं माझी स्मृति होईल.' ५५ असें हें श्रीरामाचें भाषण हर्षभरित होऊन
त्या पक्ष्यानें–जटायूनें–ऐकिलें. मग रघुनंदन रामाच्या सरूपतेला पोंचून ब्रह्मदेवा-
लाही पूज्य असें अत्युत्तम पद तो पावला. ५६ "

**अरण्यकांड, अध्याय आठवा समाप्त.**

श्रीमहादेव म्हणाला, " नंतर राम लक्ष्मणासहवर्तमान दुसऱ्या अरण्यांत
गेला, आणि पुनः शोकाक्रांत होऊन सीतेचा शोध लावण्याविषयीं उत्सुक झाला.
१ तेथें त्यांना एक विलक्षण आकाराचा राक्षस दृष्टीस पडला. त्याच्या छातीवर

1. 'गानेन नामगुणयोर्मम सायुज्यमाप्नुयात् ।'–अद्भुतरामायण.

॥ २ ॥ बाहू योजनमात्रेण व्यापृतौ तस्य रक्षसः । कबंधो नाम दैत्येंद्रः सर्वसत्त्वविहिंसकः ॥ ३ ॥ तद्बाह्वोर्मध्यदेशे तौ चरंतौ रामलक्ष्मणौ । ददर्शतुर्महासत्त्वं तद्बाहुपरिवेष्टितौ ॥ ४ ॥ रामः प्रोवाच विहसन्पश्य लक्ष्मण राक्षसम् । शिरःपादविहीनोऽयं यस्य वक्षसि चाननम् ॥ ५ ॥ बाहुभ्यां लभ्यते यद्यत्तत्तद्भक्षन् स्थितो ध्रुवम् । आवामप्येतयोर्बाह्वोर्मध्ये संकलितौ ध्रुवम् ॥ ६ ॥ गंतुमन्यत्र मार्गो न दृश्यते रघुनंदन । किं कर्तव्यमितोऽस्माभिरिदानीं भक्षयेत्स नौ ॥ ७ ॥ लक्ष्मणस्तमुवाचेदं किं विचारेण राघव । आवामेकैकमव्यग्रौ छिंद्यां रक्षोभुजौ ध्रुवम् ॥ ८ ॥ तथेति रामः खड्गेन भुजं दक्षिणमच्छिनत् । तथैव लक्ष्मणो वामं चिच्छेद भुजमंजसा ॥ ९ ॥ ततोऽतिविस्मितो दैत्यः कौ युवां सुरपुंगवौ । मद्बाहुच्छेदकौ लोके दिवि देवेषु

मोठें तोंड असून डोळे वगैरे त्याला कांहीएक नव्हते. २ त्या राक्षसाचे हात योजनभर ( चार कोस ) लांब पसरलेले होते. त्याचें नांव कबंध असून तो सर्व प्राण्यांची हिंसा करणारा होता. ३ त्याच्या दोन बाहूंच्या मध्यभागीं रामलक्ष्मण फिरत होते. त्याच्या बाहूंचा वेढा त्यां( रामलक्ष्मणां ) सभोंवती पडतांच त्यांनी त्या महाप्राण्याकडे पाहिले. ४ तेव्हां राम हंसत हंसत म्हणाला, ‘ लक्ष्मणा ! पहा हा राक्षस. याला मस्तक व पाय नसून याच्या वक्षःस्थलावर तोंड आहे. ५ हातामध्यें जें जें कांहीं सांपडतें, तें केवळ खाऊन हा राहिला आहे. आम्ही दोघेही ह्याच्या बाहूंमध्यें सांपडलों आहों खरे. ६ रघुनंदना ( लक्ष्मणा ) ! (ह्याच्या हातांतून सुटून) दुसऱ्या ठिकाणी जाण्याला मार्ग दिसत नाही. आम्ही आतां येथें काय करावें ? तो आतां आम्हांला खाऊन टाकील.’ ७ लक्ष्मण त्याला—रामाला—म्हणाला की, ‘ रामा ! विचार कसला करायाचा ? आपण दोघे न गडबडतां त्या राक्षसाचे प्रत्येकी एक असे दोनी हात तोडूंया ’ ८ ‘ ठीक आहे ’ असें म्हणून रामानें तरवारीनें त्या राक्षसाचा उजवा हात तोडून टाकला. त्याबरोबर लक्ष्मणानेंही त्याचा डावा हात सहज छेदून टाकिला. ९ तेव्हां त्या दैत्याला अत्यंत आश्चर्य वाटून त्यानें विचारिलें, ‘ तुम्ही दोघे देवश्रेष्ठां-

१. कबंध हा पूर्वी गंधर्वांचा राजा होता. इंद्राच्या शापानें त्याला राक्षसरूप प्राप्त झालें होतें. त्याच्या आईचे नाव दनु पुढें रामदर्शनानें त्याला त्याचे पूर्वरूप प्राप्त झाले.

वा कुतः ॥ १० ॥ ततोऽब्रवीद्धसन्नेव रामो राजीवलोचनः । अयोध्याधिपतिः श्रीमान् राजा दशरथो महान् ॥ ११ ॥ रामोऽहं तस्य पुत्रोऽसौ भ्राता मे लक्ष्मणः सुधीः । मम भार्या जनकजा सीता त्रैलोक्यसुंदरी ॥ १२ आवां मृगयया यातौ तदा केनापि रक्षसा । नीतां सीतां विचिन्वंतौ चागतौ घोरकानने ॥ १३ ॥ बाहुभ्यां वेष्टितावत्र तव प्राणरिरक्षया । छिन्नौ तव भुजौ त्वं च को वा विकटरूपधृक् ॥ १४ ॥ कबंध उवाच ॥ धन्योऽहं यदि राम त्वमागतोऽसि ममांतिकम् । पुरा गंधर्वराजोऽहं रूपयौवनदर्पितः ॥ १५ ॥ विचरँल्लोकमखिलं वरनारीमनोहरः । तपसा ब्रह्मणो लब्धमवध्यत्वं रघूत्तम ॥ १६ ॥ अष्टावक्रं मुनिं दृष्ट्वा कदाचिदहसं पुरा । क्रुद्धोऽसावाह दुष्ट त्वं राक्षसो भव दुर्मते ॥ १७ ॥ अष्टावक्रः पुनः प्राह वंदितो मे

सारखे आहां तरी कोण? ह्या लोकीं अथवा स्वर्गलोकीं माझे हात तोडणारा कोण आहे? १० नंतर तो कमलनयन राम हंसत म्हणाला, 'अयोध्यापति दशरथ नांवाचा एक मोठा राजा होऊन गेला. ११ मी राम त्याचा पुत्र होय; हा बुद्धिमान् लक्ष्मण माझा धाकटा बंधु, आणि ही त्रैलोक्यसुंदरी जनककन्या माझी भार्या होय. १२ आम्ही मृगयेकरितां बाहेर गेलों असतां कोणी राक्षसानें सीतेला नेलें. तिचा शोध करीत आम्ही या भयंकर अरण्यांत आलों असतां, १३ तुझ्या बाहूंच्या गराड्यांत येथें सांपडलों. आम्ही प्राणरक्षण करण्याकरितां म्हणून तुझे बाहू छेदून टाकिले. ( आतां ) असें विराट्रूप धारण करणारा तूं कोण आहेस (तें सांग).' १४ कबंध म्हणाला 'रामा! तूं माझ्याजवळ आला आहेस, त्या अर्थी मी कृतार्थ झालों. पूर्वी मी गंधर्वांचा राजा असून माझें सुंदर रूप आणि तारुण्य यांचा मला मोठा गर्व झाला होता. १५ पृथ्वीवर मी सर्वत्र फिरत असतां मोठमोठ्या सुंदर स्त्रिया मला पाहून मोहित होत असत. हे रघुश्रेष्ठा! तप करून ब्रह्मदेवाकडून मी अवध्यपण मिळविलें. १६ पूर्वी एके वेळीं अष्टावक्र[1] मुनीला पाहून मी त्याला हंसलों. त्यामुळें तो ( मुनि ) क्रुद्ध होऊन म्हणाला ' दुष्टा ! दुर्मते ! तूं राक्षस हो.' १७ त्यावर मी त्या अष्टावक्राच्या

१. अष्टावक्र हा कहोडनामक एका ऋषीचा उद्दालकेच्या पोटीं झालेला पुत्र होय. बापाचे शापामुळें जन्मतःच ह्याचें शरीराचीं आठ अंगें वक्र होतीं. त्यावरून त्यास अष्टावक्र असें नांव पडलें होतें.

दयापरः । शापस्यांतं च मे प्राह तपसा द्योतितप्रभः ॥ १८ ॥ त्रेता-
युगे दाशरथिर्भूत्वा नारायणः स्वयम् । आगमिष्यति ते बाहू छिद्येते
योजनायतौ ॥ १९ ॥ तेन शापाद्विनिर्मुक्तो भविष्यासि यथा पुरा ।
इति शप्तोऽहमद्राक्षं राक्षसीं तनुमात्मनः ॥ २० ॥ कदाचिद्देवराजानम-
भ्यद्रवमहं रुषा । सोऽपि वज्रेण मां राम शिरोदेशेऽभ्यताडयत् ॥२१॥
तदा शिरो गतं कुक्षिं पादौ च रघुनंदन । ब्रह्मदत्तवरान्मृत्युर्नाभून्मे
वज्रताडनात् ॥ २२ ॥ मुखाभावे कथं जीवेदयमित्यमराधिपम् । ऊचुः
सर्वे दयाविष्टा मां विलोक्यास्यवर्जितम् ॥ २३ ॥ ततो मां प्राह
मघवा जठरे ते मुखं भवेत् । बाहू ते योजनायामौ भविष्यत इतो व्रज
॥ २४ ॥ इत्युक्तोऽत्र वसन्नित्यं बाहुभ्यां वनगोचरान् । भक्षयाम्य-
धुना बाहू खंडितौ मे त्वयाऽनघ ॥ २५ ॥ इतःपरं मां श्वभ्रास्ये
निक्षिपाग्नींधनावृते । अग्निना दह्यमानोऽहं त्वया रघुकुलोत्तम ॥ २६ ॥

पायां पडलो, तेव्हां त्याला माझी दया आली, आणि माझ्या शापाचा अंत केव्हां होईल, हें त्यानें सांगितलें. त्याच्या तपाचें तेज सभोंवती झळकत होतें. १८ तो म्हणाला, 'त्रेतायुगामध्यें साक्षात् नारायण दशरथपुत्र होऊन येईल, तो तुझे योजनपर्यंत पसर-लेले हात तोडून टाकील. १९ तेव्हां तूं शापविमुक्त होऊन पूर्वीच्या स्वरूपाला पात्र-शील.' असा शाप होतांच माझें राक्षसी स्वरूप झाल्याचें मला दिसून आलें. २० पुढें कोणी एके वेळी मी क्रोधानें देवेंद्राच्या अंगावर चालून गेलों. तेव्हां हे रामा ! त्यानेंही माझ्या मस्तकावर प्रहार केला. २१ तेव्हां हे रघुनंदना ! माझें मस्तक खाली पोटांत शिरलें आणि माझे दोनी पाय नष्ट झाले. परंतु ब्रह्मदेवाचा मला वर असल्यामुळें त्या वज्रप्रहारामुळें मला मृत्यु आला नाहीं. २२ मला मुखरहित पाहून सर्वांना दया येऊन 'ह्याला मुख नसल्यामुळें हा जीवंत कसा राहील,' असें त्यांनीं इंद्राला विचारिलें. २३ तेव्हां इंद्र मला म्हणाला, 'तुझ्या पोटावर मुख येईल, तुझे बाहू योजनाइतके लांब होतील. आतां येथून जा.' २४ असें त्यानें सांगितल्या-वरून मी येथें राहूं लागलों. वनांत जें जें कांहीं हातांला सांपडेल, तें मी खात असें. हे निष्पापा ! तूं आतां माझे बाहू तोडिले आहेस. २५ हे रघुकुलोत्तमा ! आतां अग्निकाष्ठें घातलेल्या गर्तेच्या तोंडी मला टाक. अग्नीच्या योगें माझें दहन झालें असतां माझें पूर्वरूप मला प्राप्त होईल, आणि मग मी तुझ्या

पूर्वरूपमनुप्राप्य भार्यामार्गं वदामि ते । इत्युक्ते लक्ष्मणेनाशु श्वभ्रं निर्माय तत्र तम् ॥ २७ ॥ निक्षिप्य प्रादहत्काष्ठैस्ततो देहात्समुत्थितः । कंदर्पसदृशाकारः सर्वाभरणभूषितः ॥ २८ ॥ रामं प्रदक्षिणं कृत्वा साष्टांगं प्रणिपत्य च । कृतांजलिरुवाचेदं भक्तिगद्गदया गिरा ॥ २९ ॥ गंधर्व उवाच ॥ स्तोतुमुत्सहते मेऽद्य मनो रामातिसंभ्रमात् । त्वामनंतमनाद्यंतं मनोवाचामगोचरम् ॥ ३० ॥ सूक्ष्मं ते रूपमव्यक्तं देहद्वयविलक्षणम् । दृग्रूपमितरत्सर्वं दृश्यं जडमनात्मकम् । तत्कथं त्वां विजानीयाद्व्यतिरिक्तं मनः प्रभो ॥ ३१ ॥ बुद्ध्यात्माभासयोरैक्यं जीव इत्यभिधीयते । बुद्ध्यादिसाक्षी ब्रह्मैव तस्मिन्निर्विषयेऽखिलम् ॥ ३२ ॥ आरोप्यतेऽज्ञानवशान्निर्विकारेऽखिलात्मनि । हिरण्यगर्भस्ते सूक्ष्मं देहं

पत्नीचा मार्ग तुला सांगेन. असे त्यानें सांगितल्यावर रामानें लक्ष्मणाकडून खड्डा तयार करवून त्यांत त्याला घालून काष्ठांनी त्याचें दहन केलें. मग त्याच्या शरीरापासून मदनासारखा सुंदर व सर्व अलंकारांनी भूषित असा एक पुरुष उत्पन्न झाला. २६, २७, २८ रामाला प्रदक्षिणा घालून व साष्टांग नमस्कार करून त्यानें हात जोडिले, त्याचा गळा भरून आला. सद्गद् वाणीनें तो बोलला. २९ गंधर्व म्हणाला, 'रामा! अतित्वरेनें तुझी स्तुति करण्यासाठीं माझें मन अत्यंत उत्सुक झालें आहे, तूं अनंत आहेस, आदिअंत तुला नाहीत, मनाला आणि वाणीला तूं अगोचर आहेस. ३० तुझें सूक्ष्मरूप विराट् आणि हिरण्यगर्भ या दोन्ही देहांहून वेगळें आहे. तें ज्ञानमय आहे. तें कोणालाही—योग्यांनाही—समजणारें नाही. त्यावांचून इतर सर्व दृश्य अनात्मक जड आहे. प्रभो! मनही, तुजहून भिन्न ( जड ) असल्यामुळें, तें तुला कसें जाणणार? ३१ बुद्धि आणि आत्म्याचें प्रतिबिंब यांचें ऐक्य म्हणजे जीव असें म्हटलें आहे. बुद्ध्यादिकांना साक्षिभूत ब्रह्मच आहे. अशा त्या निर्विषय रूपाचे ठिकाणी अज्ञानाचे योगानें सकल प्रपंचाचा आरोप केला जातो. तें रूप

१. समानार्थक उतारा:—'य न स्पृशत्यनमाचत्यतत्त्व दुरन्तधामानमनन्तरूपम् । मनोवचोवृत्तय आत्मभाजा स एव पूज्य. परमः शिवो नः ॥' २. पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें, पंच प्राण, मन आणि बुद्धि हीं सत्रा मिळून लिंगशरीर ( सूक्ष्मदेह ) होतें. मायाप्रतिबिंबित जो ईश्वर तो जेव्हां अशा शरीराचा अभिमानी होतो, तेव्हां त्यास 'हिरण्यगर्भ' असें म्हणतात.

स्थूलं विराट् स्मृतम् ॥ ३३ ॥ भावनाविषयो राम सूक्ष्मं ते ध्यातृमंगलम् । भूतं भव्यं भविष्यच्च यत्रेदं दृश्यते जगत् ॥ ३४ ॥ स्थूलेंऽडकोशे देहे ते महदादिभिरावृते । सप्तभिरुत्तरगुणैर्वैराजो धारणाश्रयः ॥ ३५ ॥ त्वमेव सर्वकैवल्यं लोकास्तेऽवयवाः स्मृताः । पातालं ते पादमूलं पार्ष्णिस्तव महातलम् ॥ ३६ ॥ रसातलं ते गुल्फौ तु तलातलमितीर्यते । जानुनी सुतलं राम ऊरू ते वितलं तथा ॥ ३७ ॥ अतलं च मही राम जघनं नाभिगं नभः । उरःस्थलं ते ज्योतींषि ग्रीवा ते मह उच्यते ॥ ३८ ॥ वदनं जनलोकस्ते तपस्ते शंखदेशगम् ।

निर्विकार, सकलांचा आत्मा, असें आहे. हिरण्यगर्भ हें तुझें सूक्ष्म रूप असून विराट् हें तुझें स्थूलरूप असें म्हटले आहे. ३२, ३३ रामा ! तुझें सूक्ष्मरूप म्हणजे ध्यानाचा विषय असून तें, ध्यान करणारांना कल्याणकारक आहे. ह्या ध्यानाच्या योगानें जगांतील भूत, भविष्य, वर्तमान या सर्वांचें ज्ञान होतें. ३४ तुझा स्थूलदेह हेंच ब्रह्मांड होय. त्याच्या सभोंवती उत्तरोत्तर ( दसपट ) अधिक अशी महत्तत्त्वादि सात आवरणें आहेत. त्यांतील विराट्पुरुष हा ध्यानाचा आश्रय होय. ३५ अंती मिळविण्याजोगी वस्तु म्हणजे तूंच होस. सर्व लोक—भुवनें—तुझे अवयव असें सांगितलें आहे. पाताळ तुझें पादतळ, महातल तुझी खोंट. ३६ रसातल व तलातल तुझे घोटे होत असें म्हटलें आहे. रामा ! सुतल हे तुझे गुडघे असून वितल ह्या तुझ्या मांड्या होत. ३७ रामा ! अतल आणि महीतल हे तुझे जघन असून नभोदेश हें तुझें नाभिस्थान होय. ज्योतिर्गण हें तुझें वक्षःस्थल असून महर्लोक हा तुझा कंठभाग आहे. ३८ जनलोक तुझें वदन असून तपोलोक म्हणजे शंखाकार

१. महत्तत्त्व, अहंकार, आकाश, वायु, अग्नि, उदक, पृथ्वी हीं सात आवरणें—पहिल्यापेक्षा दुसरें दसपटीनें मोठे, दुसऱ्यापेक्षा तिसरें दसपटीनें मोठें, अशा क्रमाने उत्तरोत्तर मोठी आहेत. २. एकंदर १४ लोक अथवा भुवनें आहेत. त्यापैकीं सात ऊर्ध्वलोक व सात अधोलोक आहेत येथे ३६–४५ पर्यंत श्लोकात केलेले वर्णन वाचून पुरुषसूक्तात केलेल्या आदिपुरुषापासून उत्पन्न झालेल्या विराट् देहाचे वर्णनाची आठवण होते. ३. 'नाभ्या आसीदंतरिक्षम् '—पुरुषसूक्त.

सत्यलोको रघुश्रेष्ठ शीर्षण्यास्ते सदा प्रभो ॥ ३९ ॥ इंद्रादयो लोक-पाला बाहवस्ते दिशः श्रुती । अश्विनौ नासिके राम वक्त्रं तेऽग्निरुदाहृतः ॥ ४० ॥ चक्षुस्ते सविता राम मनश्चंद्र उदाहृतः । भ्रूभंग एव कालस्ते बुद्धिस्ते वाक्पतिर्भवेत् ॥ ४१ ॥ रुद्रोऽहंकाररूपस्ते वाचश्छंदांसि तेऽव्यय । यमस्ते दंष्ट्रदेशस्थो नक्षत्राणि द्विजालयः ॥ ४२ ॥ हासो मोहकरी माया सृष्टिस्तेऽपांगमोक्षणम् । धर्मः पुरस्तेऽधर्मश्च पृष्ठभाग उदीरितः ॥ ४३ ॥ निमिषोन्मेषणे रात्रिर्दिवा चैव रघूत्तम । समुद्राः सप्त ते कुक्षिर्नाड्यो नद्यस्तव प्रभो ॥ ४४ ॥ रोमाणि वृक्षौषधयो रेतो वृष्टिस्तव प्रभो । महिमा ज्ञानशक्तिस्ते एवं स्थूलं वपुस्तव ॥ ४५ ॥ यदस्मिन् स्थूलरूपं ते मनः संधार्यते नरैः । अनायासेन मुक्तिः स्याद-

भालस्थान होय. हे रघुश्रेष्ठा प्रभो ! सत्यलोक तुझ्या मस्तकाच्या ठिकाणी सर्वदा राहत असतो. ३९ इंद्रादि लोकपाल हे तुझे बाहू असून दिशा ह्या कान आहेत. रामा ! अश्विनीकुमार तुझ्या नाकपुड्या आणि अग्नि हें तुझें मुख असें सांगितलें आहे. ४० रामा ! सूर्य[1] हा तुझा डोळा असून मन हा चंद्र[2] म्हटलें आहे तुझा भ्रूभंग हा काल-नाश करणारा मृत्यु-च तुझी बुद्धि बृहस्पति होय. ४१ रुद्र हा तुझा अहंकार आहे. हे अव्यया-निर्विकाररूपा ! तुझी भाषणें वेद होत. यम हा तुझ्या दाढांच्या ठिकाणी राहिला असून नक्षत्रें ह्या तुझ्या दंतपंक्ति होत. ४२ तुझें हास्य ही जगाला मोह घालणारी अशी माया असून तुझा कटाक्षपात म्हणजे सृष्टि होय. धर्म म्हणजे तुझा पुढचा भाग आणि अधर्म म्हणजे तुझा पृष्ठभाग असें सांगितलें आहे. ४३ रघुश्रेष्ठा ! तुझ्या डोळ्यांची झांपउघड म्हणजे रात्र आणि दिवस होत. सात समुद्र हें तुझें उदर असून ईश्वरा ! नद्या ह्या तुझ्या नाड्या होत. हे सर्वसमर्था ! वृक्ष आणि वनस्पति ह्या तुझे केस असून तुझें रेत म्हणजे पर्जन्य होय. ४४ ज्ञानशक्ति हें तुझें मोठेपण होय. अशा प्रकारचें तुझें स्थूलरूप आहे. ४५ ह्या तुझ्या स्थूलरूपाचे ठिकाणी मनुष्यांनी चित्त[3] स्थिर ठेवणें म्हणजेच अनायासें मुक्ति

१. 'चक्षो. सूर्यो अजायत '-पुरुषसूक्त २. 'चंद्रमा मनसो जात. '-पुरुषसूक्त.
३. (१) मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मा नमस्कुरु । मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥ '-भ. गीता. (२) 'तूं मन हें मीचि करीं । माझिया भजनीं प्रेम धरीं । सर्वत्र नमस्कारीं । मज एकाते ॥ ऐसा मिया आथिला होसी । तेथ माझियाचि स्वरूपा पावसी । हें अंतःकरणींचें तुजपासीं । बोलिजत असे ॥ '-ज्ञानेश्वरी ९.

तोऽन्यन्नहि किंचन ॥ ४६ ॥ अतोऽहं राम रूपं ते स्थूलमेवानुभावये ॥ यस्मिन्ध्याते प्रेमरसः सरोमपुलको भवेत् ॥ ४७ ॥ तदैव मुक्तिः स्याद्राम यदा ते स्थूलभावकः । तदप्यास्तां तवैवाहमेतद्रूपं विचिंतये ॥ ४८ ॥ धनुर्बाणधरं श्यामं जटावल्कलभूषितम् । अपीच्यवयसं सीतां विचिन्वंतं सलक्ष्मणम् ॥ ४९ ॥ इदमेव सदा मे स्यान्मानसे रघुनंदन । सर्वज्ञः शंकरः साक्षात्पार्वत्या सहितः सदा ॥ ५० ॥ त्वद्रूपमेवं सततं ध्यायन्नास्ते रघूत्तम । मुमूर्षूणां तदा काश्यां तारकं ब्रह्मवाचकम् ॥ ५१ ॥ रामरामेत्युपदिशन्सदा संतुष्टमानसः । अतस्त्वं जानकीनाथ परमात्मा सुनिश्चितः ॥ ५२ ॥ सर्वे ते मायया मूढास्त्वां

मिळविणें होय. ह्याहून दुसरें कोणतेही साधन नाही. ४६ म्हणून हे रामा ! तुझ्या स्थूलरूपाचेंच मी चिंतन करितों. त्याचें ध्यान केलें असतां अंतःकरणांत प्रेमरस उत्पन्न होतो व शरीरावर रोमांच दाटून येतात. ४७ रामा ! तुझ्या स्थूलरूपाचें ध्यान जीवाच्या ठिकाणी जडेल, तेव्हांच त्याला मुक्ति मिळेल. त्या तुझ्या स्थूलस्वरूपाचें चिंतन तर असोच, मी माझ्या समोर दिसत असणाऱ्या ह्या तुझ्या (सगुण)रूपाचेंच चिंतन करितों ! ४८ ह्या मूर्तीच्या हातांत धनुष्यबाण आहेत, अंगकांति श्यामवर्ण आहे, जटा आणि वल्कलें ह्यांच्या योगानें ह्या रूपाला शोभा आली आहे, वय तारुण्याचें असून लक्ष्मणासहवर्तमान ही मूर्ति सीतेचा शोध करीत आहे. ४९ हे रघुनंदना ! हेंच रूप सर्वदा माझे अंतःकरणांत राहो. सर्वज्ञ असा साक्षात् शंकरही पार्वतीसह सर्वदा तुझ्या स्वरूपाचें, हे रघूत्तमा ! चिंतन करीत असतो; आणि काशीत राहून आसन्नमरण जीवांना तारणारें आणि ( 'तत्त्वमसि' इत्यादि महावाक्यांनीं प्रतिपादित ) ब्रह्मस्वरूपाचें वाचक असें जें तुझें 'रामराम' नाम, त्याचा संतुष्ट अंतःकरणानें उपदेश करीत असतो. म्हणून हे जानकीनाथा ! तूं परमात्मा आहेस, हें निश्चित आहे. ५०,५१,५२ सर्व लोक मायेनें मोहित होऊन यथार्थ

१. समानार्थक वर्णन—'ये मानवा विगतरागपरावरज्ञा नारायणं सुरगुरुं सततं स्मरन्ति । ध्यानेन तेन हतकिल्बिषचेतनास्ते मातुः पयोधररसं न पुनः पिबंति ॥ '–पांडवगीता. २. 'रामः सत्यं परं ब्रह्म रामात् किंचिन् न विद्यते ' ॥ ३. 'न मां दुष्कृतिनो मूढा प्रपद्यन्ते नराधमाः । माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः' ॥–भ. गीता.

न जानंति तत्त्वतः । नमस्ते रामभद्राय वेधसे परमात्मने ॥ ५३ ॥ अयोध्याधिपते तुभ्यं नमः सौमित्रिसेवित । त्राहि त्राहि जगन्नाथ मां माया नावृणोतु ते ॥ ५४ ॥ श्रीराम उवाच ॥ तुष्टोऽहं देवगंधर्व भक्त्या स्तुत्या च तेऽनघ । याहि मे परमं स्थानं योगिगम्यं सनातनम् ॥ ५५ ॥ जपंति ये नित्यमनन्यबुद्ध्या भक्त्या त्वदुक्तं स्तवमागमोक्तम् । तेऽज्ञानसंभूतभवं विहाय मां यांति नित्यानुभवानुमेयम् ॥५६॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे अरण्यकांडे नवमः सर्गः ॥ ९ ॥

## अरण्यकांड, सर्ग दहावा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ लब्ध्वा वरं स गंधर्वः प्रयास्यन् राममब्रवीत् । शबर्यास्ते पुरोभागे आश्रमे रघुनंदन ॥ १ ॥ भक्त्या

रीतीनें तुझें स्वरूप जाणत नाहींत. हे सृष्टिकर्त्या परमात्मन् रामभद्रा ! तुला नमस्कार असो ! ५३ अयोध्याधीशा ! लक्ष्मण तुझी सर्वदा सेवा करीत असतो. तुला नमस्कार असो ! जगन्नाथा ! माझें रक्षण कर, रक्षण कर. तुझी माया मला मोहित न करो.' ५४ राम म्हणाला, ' हे निष्पाप देवगंधर्वा ! तुझ्या भक्तीनें आणि स्तुतीनें मी प्रसन्न झालों आहें. योग्यांनाच केवळ ( योगबलानें ) गम्य असें माझें सनातन—नित्य—परम स्थान—स्वर्लोक—तेथें तूं जा. ५५ जे कोणी अनन्यभावानें वेदार्थाला अनुसरून केलेल्या तुझ्या स्तोत्राचा जप करितील, ते अज्ञानापासून उत्पन्न झालेल्या संसाराचा त्याग करून नित्य व अनुभवगम्य अशा माझ्या स्वरूपाला पावतील. ५६ "

**अरण्यकांड, नवम सर्ग समाप्त.**

श्रीमहादेव म्हणाला, " तो गंधर्व ( अशा प्रकारें ) वर पावून जावयास निघाला असतां रामाला म्हणाला, ' हे रघुनंदना ! पुढच्या भागीं दिसणाऱ्या आश्रमांत एक शबरी ( भिल्लीण ) राहात असते. १ ती भक्तिमार्गांत निष्णात

ही भिल्लीण पंपासरोवराच्या पश्चिमतीरी वास करणाऱ्या मातंग ऋषीची दासी होती.

त्वत्पादकमले भक्तिमार्गविशारदा । तां प्रयाहि महाभाग सर्वं ते कथयिष्यति ॥ २ ॥ इत्युक्त्वा प्रययौ सोऽपि विमानेनार्कवर्चसा । विष्णोः पदं रामनामस्मरणे फलमीदृशम् ॥ ३ ॥ त्यक्त्वा तद्विपिनं घोरं सिंहव्याघ्रादिदूषितम् । शनैरथाश्रमपदं शबर्या रघुनंदनः ॥ ४ ॥ शबरी राममालोक्य लक्ष्मणेन समन्वितम् । आयांतमाराद्धर्षेण प्रत्युत्थायाचिरेण सा ॥ ५ ॥ पतित्वा पादयोरग्रे हर्षपूर्णाश्रुलोचना । स्वागतेनाभिनंद्याथ स्वासने संन्यवेशयत् ॥६॥ रामलक्ष्मणयोः सम्यक्पादौ प्रक्षाल्य भक्तितः। तज्जलेनाभिषिच्यांगमथार्घ्यादिभिरादृता ॥७॥ संपूज्य विधिवद्रामं ससौमित्रिं सपर्यया। संगृहीतानि दिव्यानि रामार्थं शबरी मुदा ॥८॥ फलान्यमृतकल्पानि ददौ रामाय भक्तितः। पादौ संपूज्य कुसुमैः सुगंधैः

असून तुझ्या पदकमलाचे ठायीं तिची अत्यंत भक्ति आहे. हे महाभागा ! तूं तिजकडे जा. ती तुला सर्व सांगेल'. २ असें बोलून सूर्यासारख्या तेजस्वी विमानांत बसून तो विष्णुपदास–स्वर्गास–गेला. रामनामस्मरणाच्या ठिकाणीं असें फल आहे. ३ सिंह, व्याघ्र इत्यादिकांनीं दूषित असें तें भयंकर वन सोडून तो रघुनंदन (राम) हळूहळू शबरीच्या आश्रमाला गेला. लक्ष्मणासहवर्तमान रामाला जवळ आलेला पाहून हर्षानें उठून ती शबरी लागलीच सामोरी गेली, ४,५ आणि तिनें त्याच्या पायांपुढें लोटांगण घातलें. आनंदाश्रूंनी तिचे डोळे भरून आले. कुशलप्रश्नपूर्वक आदरसत्कार करून तिनें त्यांना उत्तम आसनांवर बसविलें. ६ रामलक्ष्मणांचें भक्तिपूर्वक उत्तम रीतीनें पादप्रक्षालन करून त्या उदकाचें तिनें आपल्या अंगावर अभिषिंचन केलें. नंतर अर्घ्यादि उपचारयुक्त पूजासाहित्यानें लक्ष्मणाची व रामाची शबरीनें आदरपूर्वक यथाविधि पूजा केली, आणि रामाला देण्याकरितां म्हणून अमृततुल्य फळें गोळा करून ठेविलीं होती, ती भक्तिपुरस्सर त्याला आनंदानें अर्पण केलीं.

१. शबरीची भक्ति –' वाचे राघवनाम संतत जपे, तें ध्यानही अंतरीं । वांछी दर्शनलाभ होइल कधीं, शोधी अरण्यातरीं ॥ '–आनंदतनय. २. शबरीचीं अमृततुल्य फळें–' बहु दीससी राघवा तूं भुकेला, तुवां पाहिजे बा फलाहार केला । तुझ्या कारणें म्या फळें गोड रामा ! अगा आणिलीं सेविं सीताभिरामा ! ॥ '–आनंदतनय.

सानुलेपनैः ॥ ९ ॥ कृतातिथ्यं रघुश्रेष्ठमुपविष्टं सहानुजम् । शबरी भक्तिसंपन्ना प्रांजलिर्वाक्यमब्रवीत् ॥ १० ॥ अत्राश्रमे रघुश्रेष्ठ गुरवो मे महर्षयः । स्थिताः शुश्रूषणं तेषां कुर्वती समुपस्थिता ॥ ११ ॥ बहुवर्षसहस्राणि गतास्ते ब्रह्मणः पदम् । गमिष्यंतोऽब्रुवन्मां त्वं वसात्रैव समाहिता ॥ १२ ॥ रामो दाशरथिर्जातः परमात्मा सनातनः । राक्षसानां वधार्थाय ऋषीणां रक्षणाय च ॥ १३ ॥ आगमिष्यति चैकाग्रध्याननिष्ठा स्थिरा भव । इदानीं चित्रकूटाद्रावाश्रमे वसति प्रभुः ॥ १४ ॥ यावदागमनं तस्य तावद्रक्ष कलेवरम् । दृष्ट्वैव राघवं दग्ध्वा देहं यास्यसि तत्पदम् ॥ १५ ॥ तथैवाकरवं राम त्वद्ध्यानैकपरायणा । प्रतीक्ष्यागमनं तेऽद्य सफलं गुरुभाषितम् ॥ १६ ॥ तव संदर्शनं राम गुरूणामपि मे न हि । योपिन्मूढाऽप्रमेयात्मन् हीनजातिसमुद्भवा ॥१७॥ तव दासस्य दासानां शतसंख्योत्तरस्य वा । दासीत्वे नाधिकारोऽस्ति

सुवासिक कुसुमांनी आणि विलेपनांनी तिनें त्यांचें पादपूजन केलें. ७,८,९ लक्ष्मणासहित बसलेल्या रघुश्रेष्ठ रामाचें आदरातिथ्य केल्यावर भक्तियुक्त होत्साती शबरी हात जोडून म्हणाली, १० 'रघूत्तमा ' ह्या आश्रमांत माझे गुरु महर्षि राहात असत. त्यांच्या सन्निध राहून मी त्यांची कित्येक वर्षसहस्रें सेवा केली. ते सांप्रत ब्रह्मपदाला गेले आहेत. जातांना त्यांनी मला सांगितलें आहे की, 'तूं येथेंच समाधानयुक्त रहा. ११,१२ सनातन परमात्मा राक्षसांच्या वधाकरितां आणि ऋषींच्या रक्षणाकरितां दशरथपुत्र राम झाला आहे. १३ तो येईल, तोंपर्यंत अत्यंत ध्याननिष्ठतेनें येथें स्थिर होऊन रहा. सांप्रत तो प्रभु चित्रकूट पर्वतावरील आश्रमांत राहात आहे. १४ तो येईपर्यंत आपल्या शरीराचें रक्षण कर. रामाचें दर्शन झाल्यावर शरीर दग्ध करून घे, मग तूं त्याच्या पदाला जाशील.' १५ त्याप्रमाणेंच हे रामा! मी केलें. तुझें एकनिष्ठतेनें ध्यान करीत तुझी वाट पाहात मी राहिल्यें होत्यें. आज (त्या माझ्या) गुरूंचें भाषण सफल झालें. १६ अप्रमेयरूपा रामा! तुझें दर्शन माझ्या गुरूंनाही झालें नाही! (मग मला कोठून?) मी एक हीन जातींत उत्पन्न झालेली मूर्ख स्त्री. तुझ्या दासाची दासी, अगर अशी दासांची परंपरा शंभरांपलीकडे नेली, तरीही त्या दासाची दासी होण्याचा मला अधिकार

**कुतः साक्षात्तवैव हि ॥ १८ ॥ कथं रामाद्य मे दृष्टस्त्वं मनोवागगो-**
**चरः । स्तोतुं न जाने देवेश किं करोमि प्रसीद मे ॥ १९ ॥ श्रीराम**
**उवाच ॥ पुंस्त्वे स्त्रीत्वे विशेषो वा जातिनामाश्रमादयः । न कारणं**
**मद्भजने भक्तिरेव हि कारणम् ॥ २० ॥ यज्ञदानतपोभिर्वा वेदाध्ययन-**
**कर्मभिः । नैव द्रष्टुमहं शक्यो मद्भक्तिविमुखैः सदा ॥ २१ ॥ तस्मा-**
**द्भामिनि संक्षेपाद्वक्ष्येऽहं भक्तिसाधनम् । सतां संगतिरेवात्र साधनं**
**प्रथमं स्मृतम् ॥ २२ ॥ द्वितीयं मत्कथालापस्तृतीयं मद्गुणेरणम् ।**
**व्याख्यातृत्वं मद्वचसां चतुर्थं साधनं भवेत् ॥ २३ ॥ आचार्योपासनं**

नाहीं. मग प्रत्यक्ष तुझे दास्य मला कोठून प्राप्त व्हावयाचें ? १७,१८ रामा ! तुझें स्वरूप मनाला आणि वाणीलाही कळण्यासारखें नाहीं. असा तूं माझ्या दृष्टीस पडलास हें कसें ? देवेशा ! तुझी स्तुति कशी करावी, हें मला ज्ञान नाहीं, त्याला काय करूं ? मजवर प्रसन्न हो.' १९ श्रीराम म्हणाला, 'पुरुष, स्त्री हा विशेष, किंवा जाति, नाम, आश्रम इत्यादि गोष्टी माझ्या भजनाला–सेवा करण्याला–कारण होत नाहीत. ( त्या कामी ) भक्ति हेंच एक साधन आहे. २० माझ्या भक्ति-संबंधी जे सर्वदा पराङ्मुख असतील, त्यांनीं कितीही यज्ञ, दानें, तपश्चर्या, वेदाध्ययन व दुसरीं अनेक कर्में केलीं, तरी त्यांना माझें दर्शन होणें शक्य नाहीं. २१ म्हणून हे स्त्रिये ! भक्तीची साधनें संक्षेपानें सांगतों. येथें पहिलें साधन म्हणजे सज्जनसंगति हेंच सांगितलें आहे. २२ दुसरें साधन म्हणजे माझ्या कथांचें वर्णन, तिसरें माझे गुणांचें गाणें, तसेंच चवथें माझ्या वचनांचें व्याख्यान करणें, हें होय. २३ हे कल्याणि ! 'हा रामच आहे' अशा बुद्धीनें निष्कपट रीतीनें सदा गुरूची

१ समानार्थक उतारा –' तरि क्षत्रिय वैश्य स्त्रिया । कां शूद्र अंत्यजादि इया । जाति तंवचि वेगळालिया । जंव न पवती मातें ॥ मग जाती व्यक्ती पडे बिंदुलें । जेव्हां भावे होती मज मीनले । लवणकण घातले । सागरामाजी ॥ '–ज्ञानेश्वरी ९. २. 'नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया । शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ॥ भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन । ज्ञातुं द्रष्टुं च तत्वेन प्रवेष्टुं च परंतप ॥ '–भ. गीता ११. ३. येथें भक्तीची नऊ साधनें सांगितलीं आहेत. तीं साधनें म्हणजे 'श्रवणं, कीर्तनं,' इत्यादि नवविधा भक्तिच होय. सत्संगतींत हरिकथाश्रवण घडतेंच, म्हणून 'सज्जनसंगति' हें पहिलें साधन येथें सांगितलें आहे. 'कथा हरिकथोदर्का सतां स्युः सदसि ध्रुवम्'–भागवत.

भद्रे मद्बुद्ध्याऽमायया सदा । पंचमं पुण्यशीलत्वं यमादि नियमादि च ॥ २४ ॥ निष्ठा मत्पूजने नित्यं षष्ठं साधनमीरितम् । मम मंत्रोपासकत्वं सांगं सप्तममुच्यते ॥ २५ ॥ मद्भक्तेष्वधिका पूजा सर्वभूतेषु मन्मतिः । बाह्यार्थेषु विरागित्वं शमादिसहितं तथा ॥ २६ ॥ अष्टमं नवमं तत्त्वविचारो मम भामिनि । एवं नवविधा भक्तिः साधनं यस्य कस्य वा ॥ २७ ॥ स्त्रियो वा पुरुषस्यापि तिर्यग्योनिगतस्य वा । भक्तिः संजायते प्रेमलक्षणा शुभलक्षणे ॥ २८ ॥ भक्तौ संजातमात्रायां मत्तत्त्वानुभवस्तदा । ममानुभवसिद्धस्य मुक्तिस्तत्रैव जन्मनि ॥ २९ ॥ स्यात्तस्मात्कारणं भक्तिर्मोक्षस्येति सुनिश्चितम् । प्रथमं साधनं यस्य भवेत्तस्य क्रमेण तु ॥ ३० ॥ भवेत्सर्वं ततो भक्तिर्मुक्तिरेव सुनिश्चितम् ।

उपासना करणें, हें पांचवें साधन होय. पुण्याचरणाची आवड, आणि यमनियमादि (अहिंसा, अस्तेय, शौच, संतोष वगैरे) पाळणें, २४ माझ्या पूजनीं सदा एकनिष्ठता ठेवून राहणें, हें सहावें साधन सांगितलें असून माझ्या मंत्रांची सांग उपासना करणें हें सातवें साधन म्हटलें आहे. २५ माझ्यापेक्षांही माझ्या भक्तांची अधिक पूजा करणें, भूतमात्राचे ठिकाणी मद्भाव—ही रामच आहेत असा भाव ठेवणें,—लौकिक गोष्टीचा वीट मानणें, मनाचा आणि बाह्येंद्रियांचा निग्रह, हें आठवें साधन, आणि हे स्त्रिये! नववें साधन म्हणजे मत्स्वरूपाचा तत्त्वविचार हें होय. अशी नऊ प्रकाराची भक्ति आहे. ह्या सर्वांचें साधन जो कोणी करील, मग तो पुरुष असो, वा स्त्री असो, किंवा पशुपक्षिकोटींतील असो, त्याच्या ठिकाणीं माझी भक्ति जडते. हे शुभलक्षणे! प्रेम हें त्या भक्तीचें लक्षण होय. २६,२७,२८ भक्ति झाल्याबरोबर माझ्या स्वरूपाचा अनुभव होतो. माझ्या स्वरूपाचा अनुभव—साक्षात्कार—आला असतां त्याच जन्मांत मोक्ष मिळतो. म्हणून भक्ति हेंच मोक्षाचें कारण आहे, हें निश्चित होय. (वरीलपैकी) प्रथम साधन केलें असतां क्रमानें सर्व साध्य होतें, म्हणून भक्ति म्हणजेच मुक्ति होय हें पूर्णपणें ठरतें. ज्या अर्थी तुझी मजवर

१. प्रेमामुळे भक्तिः—' त्यावरि भगवंती रति, त्या रतिनें देख सद्विवेक घडे । त्या सुविवेकें अंत:करणींचा क्षिप्र सर्व मोह झडे ॥ मग होय ज्ञान विमल, त्या ज्ञानें ईश्वरीं दृढा भक्ती । मग भगवत्तत्त्वाच्या ज्ञानाची होतसे अभिव्यक्ती ॥ '—मोरोपंतकृत नारदाभ्युदय. २. ' मोक्षकारणसामग्र्या भक्तिरेव गरीयसी ।'—शंकराचार्यकृत विवेकचूडामणि.

यस्मान्मद्भक्तियुक्ता त्वं ततोऽहं त्वामुपस्थितः ॥ ३१ ॥ इतो मद्दर्शना-
न्मुक्तिस्तव नास्त्यत्र संशयः । यदि जानासि मे ब्रूहि सीता कमललो-
चना ॥ ३२ ॥ कुत्रास्ते केन वा नीता प्रिया मे प्रियदर्शना ॥ ३३ ॥
॥ शबर्युवाच ॥ देव जानासि सर्वज्ञ सर्वं त्वं विश्वभावन । तथाऽपि
पृच्छसे यन्मां लोकाननुसृतः प्रभो ॥ ३४ ॥ ततोऽहमभिधास्यामि
सीता यत्राधुना स्थिता । रावणेन हृता सीता लंकायां वर्ततेऽधुना ॥३५॥
इतः समीपे रामास्ते पंपा नाम सरोवरम् । ऋष्यमूकगिरिर्नाम तत्समीपे
महानगः ॥ ३६ ॥ चतुर्भिर्मंत्रिभिः सार्धं सुग्रीवो वानराधिपः । भीत-
भीतः सदा यत्र तिष्ठत्यतुलविक्रमः ॥ ३७ ॥ वालिनश्च भयाद्भ्रातु-
स्तदगम्यमृषेर्भयात् । वालिनस्तत्र गच्छ त्वं तेन सख्यं कुरु प्रभो
॥ ३८ ॥ सुग्रीवेण स सर्वं ते कार्यं संपादयिष्यति । अहमग्निं प्रवे-
क्ष्यामि तवाग्रे रघुनंदन ॥ ३९ ॥ मुहूर्तं तिष्ठ राजेंद्र यावद्दग्ध्वा कले-
वरम । यास्यामि भगवन राम तव विष्णोः परं पदम ॥ ४० ॥ इति

भक्ति जडली आहे, त्या अर्थी मी तुजकडे आलो आहे. २९,३०,३१ आतां माझ्या दर्शनामुळें तुला मुक्ति मिळेल, यांत संशय नाही. ( आतां ) तुला माहीत असेल, तर कमललोचना सीता कोठें आहे, त्या माझ्या सुस्वरूप प्रियेला कोणी नेलें, तें सांग.' ३२,३३ शबरी म्हणाली, 'देवा सर्वज्ञा ! विश्वकर्त्या ! तूं सर्व जाणत आहेस. तरी ज्या अर्थी लौकिकाला अनुसरून तूं विचारीत आहेस, त्या अर्थी हे प्रभो ! सांप्रत सीता कोठें आहे, हें मी तुला सांगत्यें. रावणानें सीतेचें हरण केलें असून सांप्रत ती लंकेमध्यें आहे. ३४,३५ हे रामा ! येथें जवळच पंपा नांवाचें सरोवर आहे. त्याच्या जवळ ऋष्यमूक नांवाचा मोठा पर्वत आहे. ३६ त्यावर सुग्रीव नांवाचा अतुलपराक्रमी, वानरांचा राजा, भयभीत स्थितीत आपल्या चार प्रधानांसह राहात आहे. ३७ त्याला आपल्या वाली नांवाच्या बंधूची धास्ती वाटते. तथापि, एका ऋषीच्या भीतीमुळें त्या वालीला येथें येणें शक्य नाही. प्रभो ! तूं तेथें जा आणि त्याशीं—सुग्रीवाशी—सख्य कर. तो तुझें सर्व कार्य सिद्धीला नेईल. हे रघुनंदना ! तुझ्यासमोर मी आतां अग्निप्रवेश करित्यें. ३८,३९ हे राजेंद्रा ! क्षणभर येथें रहा, तोंपर्यंत शरीराचें दहन करून भगवन् रामा ! मी तुझ्या विष्णुपदाला जाईन.' ४०

**रामं समामंत्र्य प्रविवेश हुताशनम् । क्षणान्निर्धूय सकलमविद्याकृत-
बंधनम् । रामप्रसादाच्छबरी मोक्षं प्रापातिदुर्लभम् ॥ ४१ ॥ किं दुर्लभं
जगन्नाथे श्रीरामे भक्तवत्सले । प्रसन्नेऽधमजन्मापि शबरी मुक्तिमाप सा
॥ ४२ ॥ किं पुनर्ब्राह्मणा मुख्याः पुण्याः श्रीरामचिंतकाः । मुक्तिं
यांतीति तद्भक्तिर्मुक्तिरेव न संशयः ॥ ४३ ॥ भक्तिर्मुक्तिविधायिनी
भगवतः श्रीरामचंद्रस्य हे लोकाः कामदुघांघ्रिपद्मयुगलं सेवध्वमत्यु-
त्सुकाः । नानाज्ञानविशेषमंत्रविततिं त्यक्त्वा सुदूरे भृशं रामं श्यामतनुं
स्मरारिहृदये भांतं भजध्वं बुधाः ॥ ४४ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे
उमामहेश्वरसंवादे अरण्यकांडे दशमः सर्गः ॥ १० ॥**

अशा प्रकारें रामाला कळवून ( त्या शबरीनें ) अग्नीमध्यें प्रवेश केला, तोंच क्षणांत तिच्या अज्ञानोत्पन्न सकल बंधनांचा नाश होऊन रामाच्या प्रसादामुळें ती शबरी अति दुर्लभ अशा मोक्षाला पोंचली. ४१ भक्तवत्सल जगन्नाथ राम प्रसन्न झाला असतां दुर्लभ असें काय आहे ? नीचें कुलांत जन्मास आलेली शबरीही मोक्ष मिळविती झाली. ४२ तर मग ( वर्णांत ) मुख्य, सदाचरणी, रामाचें चिंतन करणारे ब्राह्मण मुक्तीप्रत जातील, यांत नवल तें काय ? यावरून भक्ति म्हणजेच मुक्ति होय, यांत संशय नाहीं. ४३ हे सुज्ञ लोकहो ! भगवान् श्रीरामचंद्राची भक्ति मुक्ति देणारी आहे, म्हणून ( सकल ) इच्छा परिपूर्ण करणारी कामधेनुच, अशा त्याच्या चरणकमलयुगलाची अत्युत्सुक होऊन सेवा करा. नाना प्रकारचे अज्ञानमूलक असे जे मंत्रतंत्रांचे खटाटोप, ते दूर टाका, आणि मदनारि शंकराच्या हृदयांत विलसणाऱ्या त्या श्यामसुंदर प्रभु रामचंद्राचें सतत भजन करा. ४४ ”

**अरण्यकांड, दशम सर्ग समाप्त.**

१. ' यालागा पापयोनीही अर्जुना । का वैश्य शूद्र अंगना । मातें भजता सदना । माझिया येती ॥ मग वर्णांमाजि छत्रचामर । स्वर्ग जयाचें अग्रहार । मंत्रविद्येसि माहेर । ब्राह्मण जे ॥ ऐसे पुण्यपूज्य जे ब्राह्मण । आणि माझ्या ठायीं अतिनिपुण । आता मात पावती हें कवण । समर्थावें ॥ '–ज्ञानेश्वरी ९

# अथ किष्किंधाकांडप्रारंभः ।

## किष्किंधाकांड, सर्ग पहिला.

श्रीमहादेव उवाच ॥ ॥ ततः सलक्ष्मणो रामः शनैः पंपास-
रस्तटम् । आगत्य सरसां श्रेष्ठं दृष्ट्वा विस्मयमाययौ ॥ १ ॥ क्रोशमात्रं
सुविस्तीर्णमगाधामलशंबरम् । उत्फुल्लांबुजकह्लारकुमुदोत्पलमंडितम् ॥२॥
हंसकारंडवाकीर्णं चक्रवाकादिशोभितम् । जलकुक्कुटकोयष्टिक्रौंचनादो-
पनादितम् ॥ ३ ॥ नानापुष्पलताकीर्णं नानाफलसमावृतम् । सतां
मनःस्वच्छजलं पद्मकिंजल्कवासितम् ॥ ४ ॥ तत्रोपस्पृश्य सलिलं पीत्वा
श्रमहरं विभुः । सानुजः सरसस्तीरे शीतलेन पथा ययौ ॥ ५ ॥ ऋष्य-
मूकगिरेः पार्श्वे गच्छंतौ रामलक्ष्मणौ । धनुर्बाणकरौ दांतौ जटावल्क-

श्रीशंकर म्हणाला, "नंतर लक्ष्मणासहवर्तमान श्रीराम हळूहळू पंपा सरोवराच्या तीरावर आला. त्या उत्तम—रमणीय—सरोवराला पाहून त्याला अत्यंत विस्मय वाटला. १ त्याचा विस्तार एक कोस असून त्यांत सखोल आणि निर्मल असें भरपूर पाणी होतें. फुललेली कमळें, कल्हारें, कुमुदें आणि उत्पलें यांच्या योगेंकरून त्या सरोवराला उत्तम शोभा आली होती. २ आंत हंस, कारंडव, या पक्ष्यांचे जागजागीं थवे असून चक्रवाक वगैरे पक्ष्यांनीं त्याला सौंदर्य आलें होतें. पाणकोंबडे, टिटव्या आणि क्रौंचे यांचा नाद सर्वत्र घुमून राहिला होता. ३ वेगवेगळ्या प्रकारच्या पुष्पलता सर्वत्र पसरल्या असून अनेक प्रकारचीं फळें-(फलवृक्ष)हीं दाटून राहिलीं होतीं. त्याचें पाणी सज्जनाच्या मनाप्रमाणें स्वच्छ असून तें कमलतंतूंनी सुगंधित झालें होतें. ४ कनिष्ठ बंधूसहित प्रभु (रामचंद्र) तेथें स्नान करून व तें श्रमहारक पाणी पिऊन सरोवराच्या तीरावरील शीतल मार्गानें पुढें निघाला. ५ ते इंद्रियनिग्रही, पराक्रमी रामलक्ष्मण ऋष्यमूक पर्वताच्या बाजूनें जात होते. त्यांच्या हातांत धनुष्यबाण होते. जटा आणि वल्कलें यांच्या योगानें

१. पांढरें कमळ. २. चंद्रविकासी पांढरें कमळ. ३. निळें कमळ. ४. बदकें. ५. बक.
६ हा पर्वत पंपासरोवराजवळ असून येथेंच राम व सुग्रीव यांचा स्नेह जडला. 'ऋष्यमूकस्तु पंपायाः पुरस्तात् पुष्पितद्रुमः ।'

लमंडितौ । पश्यंतौ विविधान्वृक्षान् गिरेः शोभां सुविक्रमौ ॥ ६ ॥ सुग्रीवस्तु गिरेर्मूर्ध्नि चतुर्भिः सह वानरैः । स्थित्वा ददर्श तौ यांतावारुरोह गिरेः शिरः ॥ ७ ॥ भयादाह हनूमंतं कौ तौ वीरवरौ सखे । गच्छ जानीहि भद्रं ते बटुर्भूत्वा द्विजाकृतिः ॥ ८ ॥ वालिना प्रेषितौ किंवा मां हंतुं समुपागतौ । ताभ्यां संभाषणं कृत्वा जानीहि हृदयं तयोः ॥ ९ ॥ यदि तौ दुष्टहृदयौ संज्ञां कुरु कराग्रतः । विनयावनतो भूत्वा एवं जानीहि निश्चयम् ॥ १० ॥ तथेति बटुरूपेण हनूमान् समुपागतः । विनयावनतो भूत्वा रामं नत्वेदमब्रवीत् ॥ ११ ॥ कौ युवां पुरुषव्याघ्रौ युवानौ वीरसंमतौ । द्योतयंतौ दिशः सर्वाः प्रभया भास्कराविव ॥ १२ ॥ युवां त्रैलोक्यकर्तारावि ति भाति मनो मम । युवां

त्याच्या शरीराला शोभा आली होती, ते अनेक प्रकारचे वृक्ष आणि पर्वत यांची शोभा पाहात ( जात ) होते. ६ त्या पर्वताच्या मस्तकावर सुग्रीव चार वानरांसह बसला होता. त्यां( रामलक्ष्मणां )ना येतांना पाहून तो पर्वताच्या शिखरावर चढला, आणि ७ भयानें हनुमंताला म्हणाला, 'मित्रा! हे दोघे वीरश्रेष्ठ कोण बरें असावे? ब्राह्मणबटुवेषानें जा आणि शोध घे. तुझें कल्याण होवो. ८ वालीनें पाठविल्यामुळें मला मारण्याकरितां म्हणून हे आले नसतीलना? त्यांच्याशी भाषण करून त्यांचा उद्देश काय आहे हें समजून घे. ९ जर त्यांच्या अंतःकरणांत कांहीं पापविचार असेल, तर मला हाताच्या बोटानें खूण कर. त्यांच्यापुढें तूं विनयानें नम्र होऊन रहा. मीं सांगितलेलें पक्कें लक्ष्यांत ठेव.' १० 'ठीक आहे' असें म्हणून बटुरूपानें हनुमान् ( रामाकडे ) आला, आणि विनयपूर्वक नम्रतेनें रामाला वंदन करून म्हणाला, ११ 'पुरुषश्रेष्ठ हो! तरुण आणि शूरांना मान्य असे तुम्ही कोण बरें आहां? सूर्याप्रमाणें आपल्या कांतीनें सर्व दिशा तुम्ही शोभवीत आहां. १२ तुम्ही त्रैलोक्याचे कर्ते, जगाचें कारण, सर्वव्यापी. प्रधानपुरुष—नरनारायणच—

१. नर—आद्य मनुष्यसृष्टि, आणि नारायण—साक्षात् परमात्मा. नरनारायण म्हणजे द्विधा झालेला साक्षात् परमात्माच होय. ह्याच नरनारायणास—द्विधारूप परमात्म्यास—महाभारताचे प्रारंभीं व्यासानीं नमन केलें आहे. तें असेः—'नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम्।' नरनारायणनामक दोन प्रख्यात ऋषि व पुढें त्यांचेच अवतार नरनारायण—अर्जुनकृष्ण—यातही वरील जीवशिवसंबंध दिसून येतो.

प्रधानपुरुषौ जगद्धेतू जगन्मयौ ॥ १३ ॥ मायया मानुषाकारा चरंताविव लीलया । भूभारहरणार्थाय भक्तानां पालनाय च ॥ १४ ॥ अवतीर्णाविह परौ चरंतौ क्षत्रियाकृती । जगत्स्थितिलयौ सर्गं लीलया कर्तुमुद्यतौ ॥ १५ ॥ स्वतंत्रौ प्रेरकौ सर्वहृदयस्थाविहेश्वरौ । नरनारायणौ लोके चरंताविति मे मतिः ॥ १६ ॥ श्रीरामो लक्ष्मणं प्राह पश्यैनं बटुरूपिणम् । शब्दशास्त्रमशेषेण श्रुतं नूनमनेकधा ॥ १७ ॥ अनेन भाषितं कृत्स्नं न किंचिदपशब्दितम् । ततः प्राह हनूमंतं राघवो ज्ञानविग्रहः ॥ १८ ॥ अहं दाशरथी रामस्त्वयं मे लक्ष्मणोऽनुजः । सीतया भार्यया सार्धं पितुर्वचनगौरवात् १९ आगतस्तत्र विपिने स्थितोऽहं दंडके द्विज । तत्र भार्या हृता सीता रक्षसा केनचिन्मम ॥ २० ॥ तामन्वेष्टुमिहायातौ त्वं को वा कस्य वा वद ॥ ॥ बटुरुवाच ॥ सुग्रीवो नाम राजा यो वानराणां महामतिः । चतुर्भिर्मंत्रिभिः सार्धं गिरिमूर्धनि तिष्ठति ॥ २१ ॥ भ्राता कनीयान् सुग्रीवो

आहांत, असें मला वाटतें. १३ मायेनें मनुष्याकार धारण करून तुम्ही लीलेनें फिरत आहां. ( वास्तविक ) पृथ्वीचा भार हरण करण्याकरितां व भक्तांचें पालन करण्याकरितां तुम्ही क्षत्रियरूपानें अवतीर्ण होऊन फिरत आहां. जगाची स्थिति, नाश आणि उत्पत्ति लीलेनें करण्यास तुम्ही उद्युक्त झालां आहां. १४,१५ स्वतंत्रतेनें सर्वांस प्रेरणा करणारे, सर्वांच्या अंतर्यामी राहाणारे नरनारायण देवच ह्या लोकीं फिरत आहेत, असें ( तुम्हांला पाहून ) मला वाटत आहे.' १६ त्यावर श्रीराम लक्ष्मणाला म्हणाला, ' बटुरूप धरून हा ( कोण ) आला आहे पहा! खरोखर हा सकल शब्दशास्त्रांत सर्वथा निष्णात दिसत आहे. १७ हा जें कांहीं सर्व बोलला, त्यांत कोठेंही अपशब्द आढळून आला नाहीं.' नंतर तो ज्ञानरूपी राम हनुमंताला बोलला, १८ ' मी दशरथपुत्र राम आहें; हा माझा कनिष्ठ बंधु लक्ष्मण आहे. पित्याचें वचन पाळण्यासाठीं पत्नी सीतेला बरोबर घेऊन मी वनांत आलों आणि तेथें दंडकारण्यांत राहिलों. हे ब्राह्मणा! तेथें कोणी एका राक्षसानें माझ्या सीतेचें हरण केलें. १९,२० तिला शोधण्याकरितां म्हणून आम्ही येथें आलों आहों. आतां तूं कोण आणि कोणाचा तें सांग.' बटु म्हणाला, ' वानरांचा सुग्रीव नांवाचा मोठा बुद्धिमान् असा राजा आहे. तो आपल्या चार प्रधानांसह या पर्वताच्या शिखरावर राहात आहे. २१ हा सुग्रीव दुष्टबुद्धि वालीचा कनिष्ठ बंधु

**वालिनः पापचेतसः। तेन निष्कासितो भार्या हृता तस्येह वालिना ॥२२॥ तद्भयादृष्यमूकाख्यं गिरिमाश्रित्य संस्थितः। अहं सुग्रीवसचिवो वायुपुत्रो महामते ॥२३॥ हनूमान्नाम विख्यातो ह्यंजनीगर्भसंभवः। तेन सख्यं त्वया युक्तं सुग्रीवेण रघूत्तम ॥ २४ ॥ भार्यापहारिणं हंतुं सहायस्ते भविष्यति। इदानीमेव गच्छाम आगच्छ यदि रोचते ॥ २५ ॥ ॥ श्रीराम उवाच ॥ अहमप्यागतस्तेन सख्यं कर्तुं कपीश्वर। सख्युस्तस्यापि यत्कार्यं तत्करिष्याम्यसंशयम् ॥ २६ ॥ हनूमान् स्वस्वरूपेण स्थितो राममथाब्रवीत्। आरोहतं मम स्कंधौ गच्छामः पर्वतोपरि ॥२७॥ यत्र तिष्ठति सुग्रीवो मंत्रिभिर्वालिनो भयात्। तथेति तस्यारुरोह स्कंधं रामोऽथ लक्ष्मणः ॥ २८ ॥ उत्पपात गिरेर्मूर्ध्नि क्षणादेव महाकपिः।**

आहे. वालीनें त्याला घालवून देऊन त्याच्या बायकोचें हरण केलें आहे. २२ त्या (वाली)च्या भयानें हा (सुग्रीव) ऋष्यमूक नांवाच्या पर्वताचा आश्रय करून राहिला आहे. हे महामते! मी सुग्रीवाचा सचिव असून वायूचा पुत्र आहें. २३ मी हनुमान् या नांवानें प्रसिद्ध असून माझा जन्म अंजनीच्या पोटीं झाला आहे. हे रघुश्रेष्ठा! त्या सुग्रीवाशी तुझें सख्य होणें योग्य आहे. २४ तुझ्या पत्नीचा अपहार करणाऱ्याचा वध करण्याचे कामी तो तुला सहाय होईल. जर तुला इष्ट वाटत असेल, तर आतांच (त्याकडे) जाऊं या.' २५ श्रीराम म्हणाला, 'हे कपिश्रेष्ठा! मीही त्याच्याशी सख्य करण्याकरितां आलों आहें. त्या माझ्या मित्राचेंही जें कांही कार्य करणें असेल, तें मी खात्रीपूर्वक करीन.' २६ यावर हनुमंतानें आपलें स्वतःचें—वानराचें—रूप धारण केलें आणि नंतर तो रामाला म्हणाला, 'माझ्या खांद्यावर तुम्ही दोघे बसा. वालीच्या भीतीनें पर्वतावर मंत्र्यासह जेथें सुग्रीव राहात आहे, तेथें आपण जाऊं या.' 'ठीक आहे' असें म्हणून राम आणि लक्ष्मण त्याच्या खांद्यावर चढून बसले. २७,२८ मग तो महाकपि (हनमान्) एका क्षणांत पर्वताच्या

१. ह्या सुग्रीवाच्या पत्नीचें नांव रुमा होतें. २. अंजनी ही हनुमंताची आई व केसरी नांवाच्या वानराची पत्नी होती. हिनें शंकराची आराधना कित्येक वर्षें केल्यावर त्याच्या अनुग्रहानें तिला जो पुत्र झाला तोच हा हनुमंत होय. शंकराच्या वरानें हा पुत्र परमप्रतापी, वज्रदेही व चिरंजीव असा झाला. मारुतीचा जन्म चैत्र पौर्णिमेस अरुणोदयसमयीं झाला.

**वृक्षच्छायां समाश्रित्य स्थितौ तौ रामलक्ष्मणौ ॥ २९ ॥ हनूमानपि
सुग्रीवमुपगम्य कृतांजलिः । व्येतु ते भयमायातौ राजन् श्रीरामलक्ष्मणौ
॥ ३० ॥ शीघ्रमुत्तिष्ठ रामेण सख्यं ते योजितं मया । अग्निं साक्षिण-
मारोप्य तेन सख्यं द्रुतं कुरु ॥ ३१ ॥ ततोऽतिहर्षात्सुग्रीवः समागम्य
रघूत्तमम् । वृक्षशाखां स्वयं छित्त्वा विष्टराय ददौ मुदा ॥ ३२ ॥ हनू-
मान्लक्ष्मणायादात्सुग्रीवाय च लक्ष्मणः । हर्षेण महताविष्टाः सर्वे एवा-
वतस्थिरे ॥ ३३ ॥ लक्ष्मणस्त्वब्रवीत्सर्वं रामवृत्तांतमादितः । वनवासा-
भिगमनं सीताहरणमेव च ॥ ३४ ॥ लक्ष्मणोक्तं वचः श्रुत्वा सुग्रीवो
राममब्रवीत् । अहं करिष्ये राजेंद्र सीतायाः परिमार्गणम् ॥ ३५ ॥ साहा-
य्यमपि ते राम करिष्ये शत्रुघातिनः । शृणु राम मया दृष्टं किंचित्ते
कथयाम्यहम् ॥ ३६ ॥ एकदा मंत्रिभिः सार्धं स्थितोऽहं गिरि-
मूर्धनि । विहायसा नीयमानां केनचित्प्रमदोत्तमाम् ॥ ३७ ॥**

मस्तकावर उडून गेला. तेथें रामलक्ष्मण एका वृक्षाच्या छायेखाली बसून राहिले. २९ इकडे हनुमान्‌ही सुग्रीवाजवळ गेला, आणि हात जोडून (म्हणाला), ‘ राजन् ! आपली भीति जावो ! रामलक्ष्मण आले आहेत. ३० लवकर उठा. मी रामाशीं आपले सख्याचा योग घडवून आणला आहे. अग्नीला साक्षी ठेवून आपण त्याच्याशी लवकर सख्य करा.’ ३१ नंतर सुग्रीव अतिहर्षानें त्या रघुश्रेष्ठाकडे गेला. त्यानें वृक्षाची एक खांदी आपण स्वतः तोडिली, आणि ती रामाला आसन म्हणून आनंदानें दिली. ३२ हनुमंतानें लक्ष्मणाला ( फांदी तोडून ) दिली, व लक्ष्मणानें सुग्रीवाला दिली. ( अशा रीतीनें ) अत्यंत हर्षयुक्त होऊन ते सर्व तेथें बसले. ३३ त्यावर लक्ष्मणानें रामाचा प्रथमपासूनचा सर्व वृत्तांत–वनवासगमन, सीताहरण वगैरे–( सुग्रीवाला ) सांगितला. ३४ लक्ष्मणाचें भाषण ऐकून सुग्रीव रामाला बोलला, ‘ हे राजेंद्रा ! सीतेचा शोध मी करीन. ३५ आणि शत्रूचा घात करण्याचे कामीं तुला साह्यही करीन. रामा ! मीं जें कांहीं थोडेंसें पाहिलें आहे, तें सांगतों ऐक. ३६ एकदां माझ्या मंत्र्यांसहवर्तमान मी पर्वताच्या शिखरावर बसलों होतों. तेव्हां आकाशांतून कोणीतरी ( राक्षस ) एका उत्तम स्त्रीचें हरण

क्रोशंती राम रामेति दृष्ट्वास्मान्पर्वतोपरि । आमुच्याभरणान्याशु स्वोत्तरीयेण भामिनी ॥ ३८ ॥ निरीक्ष्याधः परित्यज्य क्रोशंती तेन रक्षसा । नीताहं भूषणान्याशु गुहायामक्षिपं प्रभो॥३९॥इदानीमपि पश्य त्वं जानीहि तव वा न वा । इत्युक्त्वानीय रामाय दर्शयामास वानरः ॥४०॥ विमुच्य रामस्तद्दृष्ट्वा हा सीतेति मुहुर्मुहुः । हृदि निक्षिप्य तत्सर्वं रुरोद प्राकृतो यथा ॥ ४१ ॥ आश्वास्य राघवं भ्राता लक्ष्मणो वाक्यमब्रवीत् । अचिरेणैव ते राम प्राप्यते जानकी शुभा । वानरेंद्रसहायेन हत्वा रावणमाहवे ॥ ४२ ॥ सुग्रीवोऽप्याह हे राम प्रतिज्ञां करवाणि ते । समरे रावणं हत्वा तव दास्यामि जानकीम् ॥ ४३ ॥ ततो हनूमान्प्रज्वाल्य

करीत आहे ( असें आम्हांला आढळून आलें ). ३७ ती स्त्री रामा ! रामा ! असा आक्रोश करीत होती. तिनें आम्हांला पर्वतावर पाहून लागलेच आपले दागिने आंगावरून काढले, आणि ते आपल्या उत्तरीय वस्त्रांत बांधून आणि आमच्याकडे पाहून खालीं टाकून दिले. तो राक्षस तिला नेत असतां ती सारखी ओरडत होती. प्रभो ! ते दागिने मी लागलेच गुहेंत नेऊन ठेविले. ३८,३९ आतां ते तूं पहा, आणि ते तुझे आहेत किंवा नाहीत ते ओळख.' असें बोलून त्या वानरानें–सुग्रीवानें–ते दागिने आणिले, आणि रामाला दाखविले. ४० रामानें ते सोडून पाहिले, आणि वारंवार 'हा सीते !' 'हा सीते !' असें म्हणून ते सर्व (दागिने) त्यानें आपल्या हृदयीं धारण केले. या वेळीं तो एखाद्या प्राकृत मनुष्याप्रमाणें रडूं लागला. ४० त पाहून बंधु लक्ष्मणानें रामाचें सांत्वन केलें आणि त्याला म्हटलें, 'रामा ! वानरराजा ( सुग्रीवा )च्या साह्यानें रावणाला युद्धांत मारल्यावर सुलक्षण जानकीची तुला लवकरच प्राप्ति होईल.' ४२ सुग्रीवानें देखील सांगितलें, 'हे रामा ! मी तुला प्रतिज्ञापूर्वक सांगतों कीं, समरांत रावणाचा वध करून तुझी जानकी तुला मिळवून देईन' ४३ नंतर हनुमंतानें त्या दोघांच्या जवळच अग्नि प्रज्वलित केला. मग त्या

१. ( १ ) 'ह्रियमाणा मया दृष्टा रक्षसा क्रूरकर्मणा । क्रोशंती राम रामेति लक्ष्मणेति च विस्वरम् ॥ आत्मना पंचमं मा हि दृष्ट्वा शैलतले स्थितम् । उत्तरीयं तदा त्यक्त शुभान्याभरणानि च ॥'–भा रामायण, किष्किंधाकांड. ( २ ) 'हा राम, हा रमण, हा जगदेकवीर, । हा नाथ, हा रघुपते किमुपेक्षसे माम् ॥ इत्थं विदेहतनया मुहुरालपन्तीमादाय राक्षसपतिर्नभसा जगाम ॥'–रामायण.

तयोरग्निं समीपतः । तावुभौ रामसुग्रीवावग्नौ साक्षिणि तिष्ठति ॥ ४४ ॥
बाहू प्रसार्य चालिंग्य परस्परमकल्मषौ । समीपे रघुनाथस्य सुग्रीवः
समुपाविशत् ॥ ४५ ॥ स्वोदंतं कथयामास प्रणयाद्रघुनायके । सखे
शृणु ममोदंतं वालिना यत्कृतं पुरा ॥ ४६ ॥ मयपुत्रोऽथ मायावी
नाम्ना परमदुर्मदः । किष्किंधां समुपागत्य वालिनं समुपाह्वयत् ॥४७॥
सिंहनादेन महता वाली तु तदमर्षणः । निर्ययौ क्रोधताम्राक्षो जघान
दृढमुष्टिना ॥ ४८ ॥ दुद्राव तेन संक्लिष्टो जगाम स्वगुहां प्रति । अनुदु-
द्राव तं वाली मायाविनमहं तथा । ततः प्रविष्टमालोक्य गुहां मायाविनं
रुषा ॥ ४९ ॥ वाली मामाह तिष्ठ त्वं बहिर्गच्छाम्यहं गुहाम् । इत्यु-
क्त्वाविश्य स गुहां मासमेकं न निर्ययौ ॥ ५० ॥ मासादूर्ध्वं गुहाद्वा-
रान्निर्गतं रुधिरं बहु । तद्दृष्ट्वा परितप्तांगो मृतो वालीति दुःखितः ॥५१॥

अग्नीच्या साक्षानें त्या दोघां रामसुग्रीवांनी बाहू पसरून निष्कपटपणानें परस्परांस ( मित्रत्वसूचक ) आलिंगन दिलें. नंतर सुग्रीव रामाच्या जवळ बसला. ४४,४५ ( रामावरील ) प्रेमास्तव त्यानें आपला सर्व वृत्तांत त्या रघुनायकाला–रामाला–सांगितला ( तो म्हणाला, ) ‘ मित्रा ! वालीनें पूर्वी जें कांही केलें, तो माझा वृत्तांत ऐक ४६ मयासुराचा[1] मायावी नांवाचा मुलगा होता. तो अत्यंत उन्मत्त होता. त्यानें ( एकदां ) किष्किंधा नगरीजवळ येऊन मोठा सिंहनाद केला आणि वालीला ( युद्धाला ) बोलाविलें. वालीला तें सहन न झाल्यामुळें क्रोधानें त्याचे डोळे लाल झाले तो बाहेर पडला, आणि त्यानें त्या दैत्याला एक जोराचा मुष्टिप्रहार केला. ४७,४८ त्यासरशी पीडित होऊन तो ( दैत्य ) पळाला आणि आपल्या गुहेंत गेला. त्या मायावी राक्षसाच्या मागें वाली आणि मीही धांवत गेलों; परंतु तो गुहेंत शिरला, असें पाहून क्रोधानें वाली मला म्हणाला, ‘ तूं बाहेरच रहा, मी गुहेंत जातों.’ इतकें बोलून तो गुहेंत शिरला, तो महिना होऊन गेला, तरी बाहेर पडला नाहीं. ४९,५० एक महिना झाल्यावर त्या गुहेच्या दारांतून पुष्कळ रक्त बाहेर आलें. तें पाहून वाली मेला, असें वाटून मला दुःख झालें. माझें शरीर तप्त होऊन गेलें. ५१

१. मयासुर हा राक्षसाचा प्रसिद्ध शिल्पी होता. त्यानें दैत्याकरितां त्रिपुरें निर्माण केल्याचें प्रसिद्ध आहे. ह्यानेंच पांडवांकरितां अत्यंत शोभिवंत व आश्चर्यकारक मयसभा निर्माण केली होती.

गुहाद्वारि शिलामेकां निधाय गृहमागतः। ततोऽब्रुवं मृतो वाली गुहायां रक्षसा हतः ॥ ५२ ॥ तच्छ्रुत्वा दुःखिताः सर्वे मामनिच्छंतमच्युत। राज्येऽभिषेचनं चक्रुः सर्वे वानरमंत्रिणः ॥ ५३ ॥ शिष्टं तदा मया राज्यं किंचित्कालमरिंदम। ततः समागतो वाली मामाह परुषं रुषा ॥ ५४ ॥ बहुधा भर्त्सयित्वा मां निजघान च मुष्टिभिः। ततो निर्गत्य नगरादधावं परया भिया ॥५५॥ लोकान् सर्वान्परिक्रम्य ऋष्यमूकं समाश्रितः। ऋषेः शापभयात्सोऽपि नायातीमं गिरिं प्रभो ॥ ५६ ॥ तदादि मम भार्यां स स्वयं भुंक्ते विमूढधीः। अतो दुःखेन संतप्तो हृतदारो हृताश्रयः ॥ ५७ ॥ वसाम्यद्य भवत्पादसंस्पर्शात्सुखितोऽस्म्यहम्। मित्रदुःखेन संतप्तो रामो राजीवलोचनः ॥ ५८ ॥ हनिष्यामि तव

मग गुहेच्या द्वारावर एक शिळा ठेवून मी घरी आलों. मी ( लोकांना ) सांगितलें, 'वाली मेला, त्याचा गुहेमध्यें राक्षसानें वध केला.' ५२ तें ऐकून सर्व दुःखित झाले. नंतर सर्व वानरप्रधानांनी माझी इच्छा नसतांही मला राज्याभिषेक केला. ५३ अशा रीतीनें, हे अरिनाशना! कांहीं कालपर्यंत मीं राज्य केलें. पुढें (एकदां) वाली आला, आणि रागानें क्रुद्ध होऊन मला कठोर ( शब्दांनी ) बोलला. ५४ अनेक प्रकारांनी धिक्कार करून त्यानें मला मुष्टिप्रहार केले. तेव्हां मी नगरांतून निघालों आणि मोठ्या भीतीनें धांवत सुटलों. ५५ सर्व लोक हिंडून मी आतां ह्या ऋष्यमूक पर्वताचा आश्रय केला आहे. प्रभो[1] तोही ऋषिशापाच्या भीतीनें ह्या पर्वतावर येत नाही. ५६ त्या वेळेपासून तो मूढधी माझ्या पत्नीचा स्वतः उपभोग घेत आहे. माझ्या स्त्रीचें हरण करून त्यानें माझा आधारही नाहीसा केला आहे, यामुळें दुःखानें मी संतप्त झालों आहें. ५७ ( असा ) मी येथें राहात आहें, ( आज ) तुझ्या चरणांचा स्पर्श होऊन मी सुखी झालों आहें.' तो कमलनयन राम आपल्या मित्राचे—सुग्रीवाचे—दुःखानें संतप्त झाला. ५८ त्यानें सुग्रीवाच्या पुढें अशी प्रतिज्ञा केली कीं

१. या प्रसंगाचें एकनाथांनी केलेलें मनोहर वर्णन —'सर्व वैराचें कारण। मुख्य माझें दारहरण। तें म्या सांगितलें संपूर्ण। निर्भयस्थान ऋष्यमूकीं ॥ माझी भार्या जे का रुमा। ते मज पढियंती जैसा आत्मा। ते सोडविल्या श्रीरामा। सुखसंभ्रमा पावेन ॥ तारा निजपत्नी वाळीसी। तेणें सुख भोगावें तियेसी। रुमा माझी मज द्यावी गौरवेंसीं। वैर दोघांसी असेना' ॥—भा. रामायण, किष्किंधाकांड.

द्वेष्यं शीघ्रं भार्यापहारिणम् । इति प्रतिज्ञामकरोत्सुग्रीवस्य पुरस्तदा ॥५९॥
सुग्रीवोऽप्याह राजेंद्र वाली बलवतां बली । कथं हनिष्यति भवान्देवैरपि
दुरासदम् ॥६०॥ शृणु ते कथयिष्यामि तद्बलं बलिनां वर । कदाचिद्दुंदुभि-
र्नाम महाकायो महाबलः ॥ ६१ ॥ किष्किंधामगमद्राम महामाहिषरूपधृक् ।
युद्धाय वालिनं रात्रौ समाह्वयत भीषणः ॥६२॥ तच्छ्रुत्वाऽसहमानोऽसौ
वाली परमकोपनः । महिषं शृंगयोर्धृत्वा पातयामास भूतले ॥६३॥ पादेनैकेन
तत्कायमाक्रम्यास्य शिरो महत् । हस्ताभ्यां भ्रामयंश्छित्वा तोलयित्वा-
क्षिपद्भुवि ॥६४॥ पपात तच्छिरो राम मातंगाश्रमसन्निधौ । योजनात्पतितं
तस्मान्मुनेराश्रममंडले ॥६५॥ रक्तवृष्टिः पपातोच्चैर्दृष्ट्वा तां क्रोधमूर्च्छितः ।
मातंगो वालिनं प्राह यद्यागंतासि मे गिरिम् ॥ ६६ ॥ इतः परं भग्न-
शिरा मरिष्यसि न संशयः । एवं शप्तस्तदारभ्य ऋष्यमूकं न यात्यसौ
॥ ६७ ॥ एतज्ज्ञात्वाहमप्यत्र वसामि भयवर्जितः । राम पश्य शिर-

'तुझ्या भार्येचा अपहार करणाऱ्या शत्रूचा मी लवकरच वध करीन.' ५९ सुग्रीव यावर म्हणाला, 'राजेंद्रा! वाली हा सर्व बळीमध्यें बळी असा आहे. देवांना देखील तो साध्य होणें कठीण आहे; मग तू त्याला कसा मारणार? ६० बलि-श्रेष्ठा! ऐक, त्याचें बळ केवढें आहे तें मी तुला सांगतों. मागें एकदा दुंदुभि नांवाचा एक महाबलाढ्य व महाकाय (दैत्य) होऊन गेला. ६१ रामा! मोठ्या रेड्याचें रूप धारण करून तो भयंकर (दैत्य) किष्किंधा नगराला आला, आणि रात्रीच्या वेळीं वालीला युद्धासाठी बोलावूं लागला. ६२ तें ऐकून वालीला अत्यंत कोप आला. त्याला तें (दुंदुभीचें वर्तन) सहन झालें नाही. (बाहेर येऊन) त्यानें त्या रेड्याची शिंगें धरलीं, व त्याला जमिनीवर पाडलें. ६३ त्यानें त्याच्या शरीरावर एक पाय दिला, मस्तक हातांनीं पिळवटून तोडिलें, आणि तोलून पृथ्वीवर फेंकून दिलें. ६४ रामा! तें त्याचें शिर मातंग ऋषीच्या आश्रमाजवळ येऊन पडलें. (तेथें तें आपटून) चार कोस उंच उडालें. त्यांतून उंचावरून मुनीच्या आश्रमाच्या ठिकाणीं रक्तवृष्टि झाली. तें पाहून मातंग क्रोधाविष्ट होऊन वालीला म्हणाला, 'जर तूं माझ्या पर्वतावर येशील, तर तुझें मस्तक तुटलें जाऊन तूं मरण पावशील, यांत संशय नाहीं.' असा शाप झाल्या दिवसापासून हा (वाली) ऋष्यमूक पर्वतावर जात नाहीं. ६५,६६,६७ हें जाणूनच मीही येथें निर्भयपणें राहात आहें. रामा! त्या दुंदुभीचें पर्वतासमान पडलेलें तें

स्तस्य दुंदुभेः पर्वतोपमम् ॥ ६८ ॥ तत्क्षेपणे यदा शक्तः शक्तस्त्वं वालिनो वधे । इत्युक्त्वा दर्शयामास शिरस्तद्गिरिसन्निभम् ॥ ६९ ॥ दृष्ट्वा रामः स्मितं कृत्वा पादांगुष्ठेन चाक्षिपत् । दशयोजनपर्यंतं तदद्भुतमिवाभवत् ॥ ७० ॥ साधु साध्विति संप्राह सुग्रीवो मंत्रिभिः सह । पुनरप्याह सुग्रीवो रामं भक्तपरायणम् ॥ ७१ ॥ एते ताला महासाराः सप्त पश्य रघूत्तम । एकैकं चालयित्वासौ निष्पत्रान्कुरुतेऽजसा ॥७२॥ यदि त्वमेकबाणेन विध्वा छिद्रं करोषि चेत् । हतस्त्वया तदा वाली विश्वासो मे प्रजायते । तथेति धनुरादाय सायकं तत्र संदधे ॥ ७३ ॥ बिभेद च तदा रामः सप्त तालान्महाबलः । तालान्सप्त विनिर्भिद्य गिरिं भूमिं च सायकः ॥ ७४ ॥ पुनरागत्य रामस्य तूणीरे पूर्ववत्स्थितः । ततोऽतिहर्षात्सुग्रीवो राममाहातिविस्मितः ॥७५॥ देव त्वं जगतां नाथः परमात्मा

शिर पहा ! ६८ तें फेंकून देण्याची तुला शक्ति असेल, तरच तूं वालीचा वध करूं शकशील' असें बोलून पर्वतासारखें तें दुंदुभीचें शिर त्यानें ( रामाला ) दाखविलें. ६९ रामानें तें पाहिलें, आणि हांसून पायाच्या अंगठ्यानें दहा योजनें लांब फेंकून दिलें. तीं ( सर्वांस ) अद्भुत गोष्ट वाटली. ७० तें पाहून सुग्रीवानें प्रधानांसह 'शाबास, शाबास' म्हटलें. मग त्या भक्तवत्सल रामाला सुग्रीव आणखी म्हणाला, ७१ 'रघुश्रेष्ठा ! मोठे बळकट असे हे सात ताल आहेत, पहा. हा (वाली) ह्या प्रत्येकाला हालवून सहज पर्णरहित करून टाकितो. ७२ जर तूं एका बाणानें ह्यांना वेधून छिद्र पाडशील, तर तुझ्या हातून वाली मरेल, असा विश्वास माझ्या मनांत उत्पन्न होईल.' 'ठीक आहे' असें म्हणून ( रामानें ) धनुष्य घेतलें आणि त्यावर बाण जोडिला. ७३ त्या महाबल रामानें लगेच सात तालांवर बाण सोडला, तों तो बाण त्या सात तालांचा, पर्वताचा आणि भूमीचाही भेद करून, ७४ पुनः रामाच्या भात्यांत पूर्वींप्रमाणें येऊन राहिला. तेव्हां सुग्रीवाला अत्यंत विस्मय वाटला. तो अत्यानंदानें रामाला म्हणाला, ७५ देवा ! तूं निखिल जगतांचा नाथ परमात्मा आहेस. यांत

१. परमात्माः—( १ ) 'उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः । यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः' ॥–भ. गी. १५, १७. ( २ ) आत्मा क्षेत्रज्ञ इत्युक्तः संयुक्तः प्राकृतैर्गुणैः । तैरेव तु विनिर्मुक्तः परमात्मेत्युदाहृतः' ॥–महाभारत, शांतिपर्व.

**न संशयः। मत्पूर्वकृतपुण्यौघैः संगतोऽद्य मया सह ॥ ७६ ॥ त्वां भजंति महात्मानः संसारविनिवृत्तये। त्वां प्राप्य मोक्षसचिवं प्रार्थयेऽहं कथं भवम् ॥ ७७ ॥ दाराः पुत्रा धनं राज्यं सर्वं त्वन्मायया कृतम्। अतोऽहं देवदेवेश नाकांक्षेऽन्यत्प्रसीद मे ॥ ७८ ॥ आनंदानुभवं त्वाऽद्य प्राप्तोऽहं भाग्यगौरवात्। मृदर्थं यतमानेन निधानमिव सत्पते ॥ ७९ ॥ अनाद्यविद्यासंसिद्धं बंधनं छिन्नमद्य नः। यज्ञदानतपःकर्मपूर्तेष्टादिभिरप्यसौ ॥ ८० ॥ न जीर्यते पुनर्दार्ढ्यं भजते संसृतिः प्रभो। त्वत्पाददर्शनात्सद्यो नाशमेति न संशयः ॥ ८१ ॥ क्षणार्धमपि यच्चित्तं त्वयि तिष्ठत्यचंचलम्। तस्याज्ञानमनर्थानां मूलं नश्यति तत्क्षणात्**

संशय नाहीं. माझ्या पूर्वजन्मार्जित पुण्यसंचयांनींच आज मला तुझा समागम घडला आहे. ७६ संसाराची निवृत्ति करण्याकरितां महात्मे तुझ्या भजनीं लागतात, मग प्रत्यक्ष मोक्षाचा सचिव–मोक्षदायक–अशा तुझी मला प्राप्ति झाली असतां मी तुजकडे संसारसुख कसा बरें मागेन? ७७ स्त्री, पुत्र, धन, राज्य ह्या सर्व गोष्टी तुझ्या मायेनें उत्पन्न झालेल्या आहेत. म्हणून हे देवदेवेशा! मी दुसरी कशाचीही इच्छा करीत नाहीं. केवळ तुझी प्रेमदृष्टि मजवर असो. ७८ मृत्तिकेसाठीं खणीत असतां द्रव्याचा ठेवा सांपडावा, त्याचप्रमाणें हे सज्जनपालका! माझ्या भाग्योदयानें आनंदमूर्ति अशा तुझी प्राप्ति मला झाली आहे. ७९ अनादि अविद्येपासून उत्पन्न झालेलें आमचें भवबंधन आज तुटून गेलें आहे. प्रभो! यज्ञ, दान, तपश्चर्या, इष्टापूर्तादि कृत्यांनींही ही संसृति जीर्ण न होतां उलट वाढतच असते. तुझ्या चरणदर्शनानेंच तत्काळ ती नाश पावते, यांत संशय नाहीं. ८०,८१ ज्याचें चित्त तुझ्या ठायीं अर्ध क्षण कां होईना, पण स्थिर राहातें, त्याचें सर्व अनर्थांचें मूळ असें अज्ञान

१. सदृश उतारा–'प्राणियांप्रती देखें। पूर्वकर्मानुसारिखें। सहजचि पैं सुखदुःखें। प्राप्त होती ॥ जो पूर्वापार मुमुक्षु आहे। तो मी कवण ऐसें पाहे। बहुधा शोध करिताहे। अध्यात्माचा ॥ घेपे संतसज्जनांचा माग। पाहे अपवर्गाचा लाग। फेडी अज्ञानाचा डाग। मानसींचा' ॥–सिद्धांतसंहिता, सोहिरोबानाथ. २. 'कस्ते कांता कस्ते पुत्रः संसारोऽयमतीव विचित्रः। XX मायामयमिदमखिलं हित्वा ब्रह्मपदं त्वं प्रविश विदित्वा' ॥–द्वादशपंजरिकास्तोत्र. ३. विहिरी, धर्मशाळा वगैरे बांधणें. ४. 'तुका म्हणे त्याची पायधुळी मिळे। भवभय पळे वंदितांचि' ॥– तुकाराम, स्फुट अभंग.

॥ ८२ ॥ तत्तिष्ठतु मनो राम त्वयि नान्यत्र मे सदा ॥ ८३ ॥ राम रामेति यद्वाणी मधुरं गायति क्षणम् । स ब्रह्महा सुरापो वा मुच्यते सर्वपातकैः ॥ ८४ ॥ न कांक्षे विजयं राम न च दारसुखादिकम् । भक्तिमेव सदा कांक्षे त्वयि बंधविमोचनीम् ॥ ८५ ॥ त्वन्मायाकृतसंसारस्त्वदंशोऽहं रघूत्तम। स्वपादभक्तिमादिश्य त्राहि मां भवसंकटात् ॥ ८६ ॥ पूर्वं मित्रार्युदासीनास्त्वन्मायावृतचेतसः । आसन्मेऽद्य भवत्पाददर्शनादेव राघव ॥ ८७ ॥ सर्वं ब्रह्मैव मे भाति क्व मित्रं क्व च मे रिपुः ।

तत्क्षणीं नाहींसें होतें. ८२ म्हणून रामा! माझें मन सर्वदा तुझ्या ठायीं जडून राहो, दुसऱ्या कोठेंही नको. ८३ 'राम, राम' असा मधुर जप ज्याची वाणी क्षणभर तरी करिते, तो ब्रह्महत्या करणारा, अगर मद्यप्राशन करणारा, असा असला, तरी सर्व पातकांपासून मुक्त होतो. ८४ रामा! मी शत्रुजयाची इच्छा करीत नाहीं, स्त्रीसुख वगैरेही इच्छीत नाहीं; (संसार) बंधनांतून मुक्त करणारी तुझी भक्ती नित्य घडावी, एवढीच मी इच्छा करीत आहें. ८५ हा संसार तुझ्या मायेनें उत्पन्न झाला आहे, आणि रघूत्तमा! मी तरी तुझाच अंश आहें. म्हणून तूंच आपल्या चरणांची भक्ति मला देऊन या संसाररूपी संकटांतून माझें रक्षण कर. ८६ पूर्वीं माझें चित्त मायेनें वेष्टित झालें असल्याकारणानें हा मित्र, हा शत्रु, हा उदासीन, (हे भेद) अंतःकरणाला वाटत होते. परंतु आज तुझें चरणदर्शन होतांच हे राघवा! सर्व ब्रह्मच मला दिसत आहे. (आतां) मला

१. सदृश वर्णन—'म्हणून राघवा माझें मन । तुझिया पायींच राहो जडून । आणिक वदनात रात्रंदिन । नाम तुझें असावें ॥ अहो या नामाचें चिंतन । आदरें करितां लावून मन । जन तो घोरांहि पातकातून । मुक्त होय क्षणमात्रें ॥'—अध्यात्मरामकथा. २. तेथ सुहृद आणि शत्रु । का उदासु आणि मित्रु । हा भावभेदु विचित्रु । कल्पूं कैंचा ॥ तया बंधु कोण काह्याचा । द्वेषिया कवणु तयाचा । मीचि विश्व ऐसा जयाचा । बोधु जाहला ॥'—ज्ञानेश्वरी ६. ३. 'म्हणोनी तो ब्रह्म होय । न सांडितां मुळींची सोय । तयासि कैंचा भय । अविद्येचा ॥ अविद्याचि झाली विद्या । आणि विद्या मिनली स्वसंवेद्या । ऐसेंचि जेथ सद्या । दिसोनि आलें ॥ आपणचि सर्व झाला । म्हणोनि भेदभाव विझाला । आपणांशींच रिझाला । आपण ऐं तो ॥ '—सिद्धांतसंहिता.

यावत्त्वन्मायया बद्धस्तावद्गुणविशेषता ॥८८॥ सा यावदस्ति नानात्वं तावद्भवति नान्यथा । यावन्नानात्वमज्ञानात्तावत्कालकृतं भयम् ॥८९॥ अतोऽविद्यामुपास्ते यः सोऽन्धे तमसि मज्जति । मायामूलमिदं सर्वं पुत्रदारादिबंधनम् । अतोत्सारय मायां त्वं दासीं तव रघूत्तम ॥९०॥ त्वत्पादपद्मार्पितचित्तवृत्तिस्त्वन्नामसंगीतकथासु वाणी । त्वद्भक्तसेवानिरतौ करौ मे त्वदंगसंगं लभतां मदंगम् ॥ ९१ ॥ त्वन्मूर्तिभक्तान् स्वगुरुं च चक्षुः पश्यत्वजस्रं संशृणोतु कर्णः । त्वज्जन्मकर्माणि च पादयुग्मं व्रजत्वजस्रं तव मंदिराणि ॥ ९२ ॥ अंगानि ते पादरजोविमिश्रतीर्थानि बिभ्रत्वहिशत्रुकेतो । शिरस्त्वदीयं भवपद्मजाद्यैर्जुष्टं पदं राम नमत्वजस्रम् ॥ ९३ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे किष्किंधाकांडे प्रथमः सर्गः ॥ १ ॥

मित्र कुठें आणि शत्रु तरी कुठें ? जोंपर्यंत जीवावर मायेचें आवरण असतें, तोंपर्यंतच ( सत्त्वादि ) गुणांचें त्यावर वर्चस्व असतें. ८७,८८ तें वर्चस्व असतें, तोंपर्यंतच शत्रु, मित्र हा भेदभाव असतो; तें नाहीसें झालें कीं नानापण–भेदबुद्धि–जातेच. ही अज्ञानापासून उत्पन्न झालेली भेदबुद्धि जोंपर्यंत असते, तोंपर्यंतच मृत्यूचें भय असतें. ८९ म्हणून जो अविद्येच्या–मायेच्या–भजनीं लागतो, तो गाढ अंधकारांत पडतो. पुत्र, स्त्री इत्यादि सर्व बंधनें मायामूलक आहेत. म्हणून हे रघूत्तमा ! ह्या तुझ्या माया दासीला दूर कर. ९० माझी चित्तवृत्ति तुझ्या पदकमलीं जडून राहो, माझी वाणी तुझ्या नामाचें आणि तुझ्या कथांचे गायनांत रमो; माझे हात तुझ्या भक्तांची सेवा करण्यांत तत्पर होवोत, आणि माझें शरीर तुझ्या अंगसंगाला लाभो. ९१ माझे नेत्रांना तुझें रूपाचें तुझ्या भक्तांचें आणि स्वतःच्या गुरूचें दर्शन घडो, कानांला तुझ्या अवतारकथा नित्य ऐकायाला मिळोत, आणि माझे पाय तुझ्या मंदिरांला नित्य गमन करोत. ९२ हे गरुडध्वजा ! माझीं अंगें तुझ्या पदधूलीचे कण ज्यांत मिश्र झाले आहेत, अशा तीर्थांचें धारण करोत. रामा ! शंकर, ब्रह्मदेव इत्यादिक ज्याचें सेवन करितात, त्या तुझ्या चरणाला माझें मस्तक निरंतर प्रणाम करो. ९३ ”

**किष्किंधाकांड, प्रथम सर्ग समाप्त.**

१. समानार्थक उतारा–' जिव्हे कीर्तय केशवं मुररिपुं चेतो भज श्रीधरं । पाणिद्वंद्व समर्चयाच्युतकथां श्रोत्रद्वयं त्वं शृणु ॥ कृष्णं लोकय लोचनद्वय हरेर्गच्छाङ्घ्रियुग्मालयं । जिघ्र घ्राण मुकुंदपादतुलसीं मूर्धन् नमाधोक्षजम् ॥ '

## किष्किंधाकांड, सर्ग दुसरा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ इत्थं स्वात्मपरिष्वंगनिर्धूताशेषकल्मषम् ॥ रामः सुग्रीवमालोक्य सस्मितं वाक्यमब्रवीत् ॥ १ ॥ मायां मोहकरीं तस्मिन्वितन्वन् कार्यसिद्धये । सखे त्वदुक्तं यत्तन्मां सत्यमेव न संशयः ॥ २ ॥ किंतु लोका वदिष्यंति मामेवं रघुनंदनः । कृतवान्किं कपींद्राय सख्यं कृत्वाग्निसाक्षिकम् ॥ ३ ॥ इति लोकापवादो मे भविष्यति न संशयः । तस्मादाह्वय भद्रं ते गत्वा युद्धाय वालिनम् ॥ ४ ॥ बाणेनैकेन तं हत्वा राज्ये त्वामभिषेचये । तथेति गत्वा सुग्रीवः किष्किंधोपवनं द्रुतम् ॥ ५ ॥ कृत्वा शब्दं महानादं तमाह्वयत वालिनम् । तच्छ्रुत्वा भ्रातृनिनदं रोषताम्रविलोचनः ॥ ६ ॥ निर्जगाम गृहाच्छीघ्रं सुग्रीवो यत्र वानरः । तमापतंतं सुग्रीवः शीघ्रं वक्षस्यताडयत् ॥ ७ ॥ सुग्रीवमपि मुष्टिभ्यां जघान क्रोधमूर्च्छितः । वाली

श्रीशंकर म्हणाला, “ ( पार्वति ! ) आपल्या आलिंगनानें सुग्रीवाचीं सर्व पातकें नष्ट झालीं आहेत, हें रामाला समजून आलेंच होतें; तरी ( देव ) कार्यसिद्धीसाठीं आपली मोहकारी माया त्याजवर पसरविण्याचें योजून हंसत हंसत श्रीराम त्याला असें बोलला की, ‘ मित्रा ! तूं मला जें कांहीं बोललास, तें अगदीं सत्य आहे, यांत संशय नाहीं. १,२ परंतु लोक मला म्हणतील कीं ‘ रामानें अग्निसाक्षिक कपींद्राशीं—वानरराज सुग्रीवाशीं—सख्य केलें, तें करून त्याला काय मिळवून दिलें ?’ ३ असा लोकापवाद मजवर येईल, यांत संशय नाहीं. म्हणून तूं जाऊन वालीला युद्धाला बोलाव. तुझें कल्याण असो.’ ४ एकाच बाणानें त्याचा वध करून मी तुला राज्याभिषेक करवीन. ‘ ठीक आहे,’ असें म्हणून सुग्रीव किष्किंधेच्या उपवनांत तावडतोब गेला, आणि मोठी आरोळी ठोकून त्यानें वालीला हाक मारिली. तो बंधूचा शब्द ऐकून क्रोधानें वालीचे डोळे लालभडक झाले. ५,६ तो घरांतून बाहेर पडला, आणि सुग्रीव वानर ज्या ठिकाणीं होता, तेथें तावडतोब आला. तो आपल्यावर चालून येत आहे, ( हें पाहून ) सुग्रीवानें त्याच्या वक्षःस्थलावर तत्क्षणीं प्रहार केला. ७ क्रोधानें चवताळून जाऊन वालीनेंही सुग्रीवावर दोन्ही मुष्टींनीं प्रहार

तमपि सुग्रीव एवं क्रुद्धौ परस्परम् ॥ ८ ॥ अयुद्ध्येतामेकरूपौ दृष्ट्वा रामोऽतिविस्मितः । न मुमोच तदा बाणं सुग्रीववधशंकया ॥ ९ ॥ ततो दुद्राव सुग्रीवो वमन् रक्तं भयाकुलः । वाली स्वभवनं यातः सुग्रीवो राममब्रवीत् ॥ १० ॥ किं मां घातयसे राम शत्रुणा भ्रातृरूपिणा । यदि मद्धनने वांछा त्वमेव जहि मां विभो ॥ ११ ॥ एवं मे प्रत्ययं कृत्वा सत्यवादिन् रघूत्तम । उपेक्षसे किमर्थं मां शरणागतवत्सल ॥ १२ ॥ श्रुत्वा सुग्रीववचनं रामः साश्रुविलोचनः । आलिंग्य मास्म भैषीस्त्वं दृष्ट्वा वामेकरूपिणौ ॥ १३ ॥ मित्रघातित्वमाशंक्य मुक्तवान्सायकं न हि । इदानीमेव ते चिह्नं करिष्ये भ्रमशांतये ॥ १४ ॥ गत्वाह्वय पुनः शत्रुं हतं द्रक्ष्यसि वालिनम् । रामोऽहं त्वां शपे भ्रातर्हनिष्यामि रिपुं क्षणात ॥ १५ ॥ इत्याश्वास्य स सुग्रीवं रामो लक्ष्म-

केले. सुग्रीवानेंही ( वालीनें ) त्यावर तसेच प्रहार केले. अशा रीतीनें क्रुद्ध होऊन ते दोघेही परस्परांशी लढले. त्या दोघांचींही रूपें सारखींच असल्याचें पाहून रामाला अत्यंत विस्मय वाटला. आपल्या हातून कदाचित् सुग्रीवाचा वध होईल, अशी त्याला शंका येऊन त्यानें त्या वेळीं बाण सोडला नाहीं. ८,९ तेव्हां सुग्रीवानें भयाकुल होऊन रक्त ओकत तेथून पळ काढला. मग वाली घरीं गेल्यावर सुग्रीव रामाला म्हणाला, १० 'रामा ! बंधुरूपी शत्रूकडून कां बरें मला मारवीत आहेस ? प्रभो ! मला मारण्याची तुझी इच्छा असल्यास तूंच माझा वध कर. ११ शरणागतवत्सल रघूत्तमा ! तूं सत्यवादी आहेस; मग मला विश्वास दाखवून माझी उपेक्षा कां बरें करित आहेस ?' १२ ( हें ) सुग्रीवाचें भाषण ऐकून रामाचे डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले. त्यानें ( सुग्रीवाला ) आलिंगन दिलें, ( आणि म्हटलें, ) 'तूं भिऊं नकोस. तुमचीं दोघांचीं सारखींच रूपें पाहून ( कदाचित् ) मित्राचा वध होईल, या शंकेनें मीं बाण सोडला नाहीं. आतां भ्रम दूर होऊन तुझी ओळख मला पटावी म्हणून तुजवर कांहीं खूण करितों. १३,१४ तूं पुनः जाऊन शत्रूला हाक मार, कीं पहा ! वाली मेलेला पाहशील. बंधो ! तुझी शपथ घेऊन सांगतों कीं, मी राम ( तुझ्या ) शत्रूला क्षणांत मारून टाकीन.' १५ अशा रीतीनें सुग्रीवाला आश्वासन देऊन तो

१. शरणागतवत्सल रामः–' सुग्रीवाची चिंता हरिली मारूनियां बळी वाळी, । शरणागतासि जैसा पाळिसि तैसा न बापही पाळी ' ॥–पंचवटीस्थरामप्रार्थना, मोरोपंत.

णमब्रवीत् । सुग्रीवस्य गले पुष्पमालामामुच्य पुष्पिताम् ॥ १६ ॥ प्रेषयस्व महाभाग सुग्रीवं वालिनं प्रति । लक्ष्मणस्तु तदा बद्ध्वा गच्छ गच्छेति सादरम् ॥ १७ ॥ प्रेषयामास सुग्रीवं सोऽपि गत्वा तथाकरोत् । पुनरप्यद्भुतं शब्दं कृत्वा वालिनमाह्वयत् ॥ १८ ॥ तच्छ्रुत्वा विस्मितो वाली क्रोधेन महता वृतः । बद्ध्वा परिकरं सम्यग्गमनायोपचक्रमे ॥ १९ ॥ गच्छंतं वालिनं तारा गृहीत्वा निषिषेध तम् । न गंतव्यं त्वयेदानीं शंका मेऽतीव जायते ॥ २० ॥ इदानीमेव ते भग्नः पुनरायाति सत्वरः । सहायो बलवांस्तस्य कश्चिन्नूनं समागतः ॥२१॥ वाली तामाह हे सुभ्रु शंका ते व्येतु तद्गता । प्रिये करं परित्यज्य गच्छ गच्छामि तं रिपुम् ॥ २२ ॥ हत्वा शीघ्रं समायास्ये सहाय-

श्रीराम लक्ष्मणाला म्हणाला, 'महाभागा ! सुग्रीवाच्या गळ्यांत फुललेल्या फुलांची माळ घाल, आणि त्याला वालीकडे पाठीव.' त्यावर लक्ष्मणानें (सुग्रीवाच्या गळ्यांत) माळ बांधून, आणि आदरपूर्वक त्याला 'जा, जा !' असें सांगून ( वालीकडे ) पाठविलें. त्यानेंही जाऊन त्याप्रमाणें केलें. पुनः अद्भुत आरोळी मारून त्यानें—सुग्रीवानें—वालीला हाक मारिली. १६,१७,१८ ती ऐकून वालीला विस्मय वाटला. तो अत्यंत क्रोधाला चढला. त्यानें कमर नीट कसिली, आणि बाहेर निघण्याची तयारी केली. १९ वाली बाहेर निघत असतां तारेनें त्याला धरिलें आणि निषेधपूर्वक म्हटलें, 'आपण आतां जाऊं नये;[1] मला मोठी शंका वाटत आहे. २० नुकता तुमच्या हातीं पराभव पावला असूनही तो लागलाच परत येत आहे, त्या अर्थी त्याला कोणीतरी बलवान् साहाय्यकर्ता मिळाला असला पाहिजे, हें खचित आहे.' २१ वाली तिला म्हणाला, 'हे सुंदरि ! त्यासंबंधी तुला शंका नको. प्रिये ! ( माझा ) हात सोड, आणि ( घरांत ) जा. मी त्या शत्रूवर जातों, २२ व त्याचा वध करून

१. समानार्थक उताराः—'आर्य नाथ ! विचारय क्षणं, सहसा गन्तुमितो न युज्यते । न हि चेतसि दीर्घदर्शिनामविवेकेन पदं निधीयते ॥ १ ॥ यत एष पलायितः सकृत् पुनरायाति रणाय तेऽनुजः । सुसहायवता ततोऽमुना भवितव्यं तव नाशमिच्छता ' ॥—रामायण.

स्तस्य को भवेत् । सहायी यदि सुग्रीवस्ततो हत्वोभयं क्षणात् ॥२३॥ आयास्ये मा शुचः शूरः कथं तिष्ठेद्गृहे रिपुम् । ज्ञात्वाप्याह्वयमानं हि हत्वायास्यामि सुंदरि ॥ २४ ॥ ॥ तारोवाच ॥ मत्तोऽन्यच्छृणु राजेंद्र श्रुत्वा कुरु यथोचितम् । आह मामंगदः पुत्रो मृगयायां श्रुतं वचः ॥२५॥ अयोध्याधिपतिः श्रीमान् रामो दाशरथिः किल । लक्ष्मणेन सह भ्रात्रा सीतया भार्यया सह ॥ २६ ॥ आगतो दंडकारण्यं तत्र सीता हृता किल । रावणेन सह भ्रात्रा मार्गमाणोऽथ जानकीम् ॥ २७ ॥ आगतो ऋष्यमूकाद्रिं सुग्रीवेण समागतः । चकार तेन सुग्रीवः सख्यं चानलसाक्षिकम् ॥ २८ ॥ प्रतिज्ञां कृतवान् रामः सुग्रीवाय सलक्ष्मणः । वालिनं समरे हत्वा राजानं त्वां करोम्यहम् ॥ २९ ॥ इति निश्चित्य तौ यातौ निश्चितं शृणु मद्वचः । इदानीमेव ते भग्नः कथं पुनरुपागतः ॥ ३० ॥ अतस्त्वं सर्वथा वैरं त्यक्त्वा सुग्रीवमानय । यौवराज्येऽभि-

लागलाच येतों. त्याला कोण सहाय होणार ? जर कदाचित् कोणाचें साह्य सुग्रीवाला मिळालें असेल, तर दोघांचाही क्षणांत वध करून, २३ मी येतों. शोक करूं नकोस. शत्रु (युद्धार्थ) हाक मारीत आहे हें जाणून कोणता शूर (पुरुष) घरांत बसून राहील ? सुंदरि ! रिपूला मारून मी येतों.' २४ तारा म्हणाली, 'राजेंद्रा ! मी आणखी दुसरें सांगत्यें, तें ऐका, आणि मग आपणाला योग्य वाटेल, तें करा. मृगयेला आपला पुत्र अंगद गेला असतां तेथें जें कांहीं त्यानें ऐकिलें, तें तो मला बोलला आहे. २५ 'अयोध्याधीश दशरथपुत्र श्रीराम, बंधु लक्ष्मण आणि पत्नी सीता यांसहवर्तमान दंडकारण्यांत आला असतां तेथून सीतेला रावणानें चोरून नेलें. त्या जानकीचा तो बंधूसह शोध करीत करीत ऋष्यमूक पर्वतावर आला. तेथें सुग्रीवाची त्याशीं गांठ पडून सुग्रीवानें अग्निसाक्षिक त्याशीं सख्य केलें. २६,२७,२८ लक्ष्मणासह रामानें सुग्रीवाला प्रतिज्ञेवर सांगितलें आहे कीं, 'समरांगणांत वालीचा वध करून मी तुला राजा करीन.' २९ अशा निश्चयानें ते आले आहेत, असें मला निःसंशय वाटत आहे; तरी माझें म्हणणें ऐका. आतांच तुमच्या हातून त्याचा पराभव झाला असतां, तो पुनः आला हें कसें बरें ? ३० म्हणून आपण सर्व प्रकारें वैर सोडून द्यावें, आणि सुग्रीवाला आणून त्याला यौवराज्याचा अभिषेक करावा,

षिंचाशु रामं त्वं शरणं व्रज ॥ ३१ ॥ पाहि मामंगदं राज्यं कुलं च हरिपुंगव । इत्युक्त्वाश्रुमुखी तारा पादयोः प्रणिपत्य तम् ॥ ३२ ॥ हस्ताभ्यां चरणौ धृत्वा रुरोद भयविह्वला । तामालिंग्य तदा वाली सस्नेहमिदमब्रवीत् ॥ ३३ ॥ स्त्रीस्वभावाद्बिभेषि त्वं प्रिये नास्ति भयं मम । रामो यदि समायातो लक्ष्मणेन समं प्रभुः ॥ ३४ ॥ तदा रामेण मे स्नेहो भविष्यति न संशयः । रामो नारायणः साक्षादवतीर्णोऽखिलप्रभुः ॥ ३५ ॥ भूभारहरणार्थाय श्रुतं पूर्वं मयानघे । स्वपक्षः परपक्षो वा नास्ति तस्य परात्मनः ॥ ३६ ॥ आनेष्यामि गृहं साध्वि नत्वा तच्चरणांबुजम् । भजतोऽनुभजत्येष भक्तिगम्यः सुरेश्वरः ॥३७॥ यदि स्वयं समायाति सुग्रीवो हन्मि तं क्षणात । यदुक्तं यौवराज्याय

आणि रामाला शरण जावें. ३१ अहो वानराधीश ! मला, अंगदाला, राज्याला आणि कुलाला पाळा.' असें म्हणून अश्रू मुखावरून वाहत आहेत, अशा स्थितींत तारा त्या (वाली)च्या पायां पडली. ३२ भीतिग्रस्त होऊन तिनें त्याचे पाय धरिले. तिला रडें कोसळलें. तेव्हां वालीनें तिला आलिंगन दिलें आणि प्रेमपूर्वक म्हटलें, ३३ 'स्त्रीस्वभावाला अनुसरून तुला भीति वाटत आहे. प्रिये ! तें भय मला नाही. श्रीराम प्रभु लक्ष्मणासहवर्तमान आला असेल, तर त्या रामाशीं निस्संशय माझा स्नेह होइल. हे निष्पाप तारे ! निखिल सृष्टीचा प्रभु साक्षात् नारायण पृथ्वीचा भार हरण करण्याकरितां अवतीर्ण झाला आहे, हें मला पूर्वीच कळून आलें आहे. त्या परमात्म्या (रामा)ला स्वपक्ष किंवा परपक्ष म्हणून नाहींच. ३४,३५,३६ हे साध्वि ! त्याच्या चरणकमलाला नमन करून मी त्याला घरीं आणीन. तो देवाधिदेव भक्तीनेंच प्राप्त होण्याजोगा असून त्याला जे भजतात, त्यांना तो उलट भजत असतो. ३७ सुग्रीव स्वतः होऊन मजवर चालून आल्यास मी त्याला क्षणांत ठार करीन. आतां त्याला

१. समानार्थक वर्णनः—' तुटे सुग्रीवेंसीं विरोध । श्रीरामासीं होय तें सुहृदसंबंध । तैसा साधीं निजबोध । माझा शब्द जरी करिसी ॥ विरोध तुटे बंधुबंधूंसीं । पूर्ण सख्य होय श्रीरामासीं । यौवराज्य द्यावें सुग्रीवासी । निजहितासी लक्षोनी ॥ ऐसे बोलोनियां पाहे । तारेनें धरिले दोनी पाये । श्रीरामीं सख्यें सुख आहे । करीं लवलाहें कपिराजा ' ॥— भा. रामायण, किष्किंधा. ६. २. ' समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः ' ॥— भ. गीता ९. ३. ' ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ' ॥—भ. गीता ९.

सुग्रीवस्याभिषेचनम् ॥ ३८ ॥ कथमाहूयमानोऽहं युद्धाय रिपुणा प्रिये ।
शूरोऽहं सर्वलोकानां संमतः शुभलक्षणे ॥ ३९ ॥ भीतभीतमिदं वाक्यं
कथं वाली वदेत्प्रिये । तस्माच्छोकं परित्यज्य तिष्ठ सुंदरि वेश्मनि
॥ ४० ॥ एवमाश्वास्य तारां तां शोचंतीमश्रुलोचनाम् । गतो वाली
समुद्युक्तः सुग्रीवस्य वधाय सः ॥ ४१ ॥ दृष्ट्वा वालिनमायांतं सुग्रीवो
भीमविक्रमः । उत्पपात गलेबद्धपुष्पमालः पतंगवत् ॥ ४२ ॥ मुष्टिभ्यां
ताडयामास वालिनं सोऽपि तं तथा । अहन्वाली च सुग्रीवं सुग्रीवो
वालिनं तथा ॥ ४३ ॥ रामं विलोकयन्नेव सुग्रीवो युयुधे युधि ।
इत्येवं युध्यमानौ तौ दृष्ट्वा रामः प्रतापवान् ॥ ४४ ॥ बाणमादाय
तूणीरादैंद्रे धनुषि संदधे । आकृष्य कर्णपर्यंतमदृश्यो वृक्षखंडगः॥४५॥
निरीक्ष्य वालिनं सम्यग्लक्ष्यं तद्धृदयं हरिः। उत्ससर्जाशनिसमं महावेगं

यौवराज्याभिषेक करण्याविषयीं तू सांगतलेस, ३८ तरी प्रिय ! ज्या अर्थी शत्रु होऊन त्यानें युद्धासाठीं मला आव्हान केलें आहे, त्या अर्थी मीं तसें कसें बरें करावें ? हे शुभलक्षणे ! माझें शौर्य सर्व लोकांना कळून आलें आहे. ३९ मग भ्यालासारखा ('तुला यौवराज्य देतों') हे शब्द (मी) वाली त्याला कसें बरें बोलणार ? म्हणून हे सुंदरि ! शोक टाकून दे आणि घरीं रहा.' ४० अशा रीतीनें त्या तारेचें सांत्वन करून वाली सुग्रीवाच्या वधाकरितां उद्युक्त होऊन तेथून निघाला. ह्या वेळीं तारेच्या डोळ्यांतून अश्रूंचा प्रवाह चालला होता व ती शोक करीत होती. ४१ वाली येत आहे, हें पाहून सुग्रीवानें पतंगाप्रमाणें उडी घेतली. तो महापराक्रमी होता. त्याच्या गळ्यांत फुलांची माळ बांधलेली होती. ४२ त्यानें आपल्या दोनी मुष्टींचा प्रहार वालीवर केला. वालीनेंही तसेंच केलें. वालीनें सुग्रीवाला मारिलें, आणि सुग्रीवानेंही वालीवर प्रहार केले. ४३ या युद्धांत रामाकडे नजर ठेऊनच सुग्रीव लढत होता. अशा प्रकारें ते लढत असल्याचें त्या प्रतापवान् रामानें पाहिलें. ४४ तेव्हां त्यानें भात्यांतून बाण काढला आणि तो आपल्या ऐंद्र[1] धनुष्यावर जोडिला. वृक्षांच्या राईआड अदृश्य होऊन त्यानें कर्णापर्यंत धनुष्याची दोरी ओढिली, ४५ आणि वालीकडे निरखून पाहिलें. नंतर त्या (वाली) चे वक्षःस्थलचा नीट नेम धरून त्या महाबलवान् (रामरूप) श्रीहरीनें

१. हें धनुष्य रामाला अगस्त्य मुनीनें दिलें होतें. अरण्यकांड ३, ४५ पहा.



वाली सुग्रीवांचे युद्ध व सुग्रीवाचा किष्किंधा प्रवेश

महाबलः ॥४६॥ बिभेद स शरो वक्षो वालिनः कंपयन्महीम् । उत्पपात
महाशब्दं मुंचन्स निपपात ह ॥४७॥ तदा मुहूर्तं निःसंज्ञो भूत्वा चेतनमाप-
सः । ततो वाली ददर्शाग्रे रामं राजीवलोचनम् । धनुरालंब्य वामेन
हस्तेनान्येन सायकम् ॥ ४८ ॥ बिभ्राणं चीरवसनं जटामुकुटधारि-
णम् । विशालवक्षसं भ्राजद्वनमालाविभूषितम् ॥ ४९ ॥ पीनचार्वायत-
भुजं नवदूर्वादलच्छविम् । सुग्रीवलक्ष्मणाभ्यां च पार्श्वयोः परिसेवितम्
॥ ५० ॥ विलोक्य शनकैः प्राह वाली रामं विगर्हयन् । किं मयापकृतं
राम तव येन हतोऽस्म्यहम् ॥ ५१ ॥ राजधर्ममविज्ञाय गर्हितं कर्म ते
कृतम् । वृक्षखंडे तिरोभूत्वा त्यजता मयि सायकम् ॥ ५२ ॥ यशः

वज्रासारखा अत्यंत वेगवान् असा बाण सोडला. ४६ त्या बाणानें वालीचें
वक्षःस्थल विदीर्ण केलें. नंतर पृथ्वीला कांपवीत व मोठा शब्द करीत तो ( बाण )
वर ( आकाशांत ) उडाला. वालीही खालीं ( पृथ्वीवर ) पडला. ४७ एक मुहूर्त-
पर्यंत तो शुद्धीवर नव्हता. नंतर तो वाली देहभानावर आला, तों आपल्या पुढें
कमलनयन राम डाव्या हातांत धनुष्य व दुसऱ्या ( उजव्या ) हातांत बाण घेऊन
उभा आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. ४८ त्यानें—रामानें—वल्कलें परिधान केलीं
असून ( मस्तकीं ) जटामुकुट धारण केला होता. त्याचें वक्षःस्थल विशाळ असून
त्यावरील शोभिवंत वनमालेनें ( त्याच्या शरीराला ) विशेष शोभा आली होती. ४९
त्याचे भुज भव्य, सुंदर आणि दीर्घ होते; त्याची अंगकांति नवदूर्वादलाप्रमाणें
नीलवर्ण होती. त्याच्या दोहों बाजूंला सुग्रीव आणि लक्ष्मण ( उभे राहून ) त्याची
सेवा करीत होते. ५० रामाला पाहून त्याची निंदा करीत वाली हळू आवाजानें
म्हणाला, ‘ रामा ! मीं तुझा काय अपराध केला आहे, कीं ज्यामुळें तूं माझा वध
केला आहेस ? ५१ वृक्षांच्या राईत आड राहून मजवर बाण सोडल्यानें तुजकडून
राजधर्म न जाणतां निंद्य गोष्ट घडली आहे. ५२ रामा ! चोराप्रमाणें युद्ध करून

१. ‘ कवण देखोनि अपराध । आजि हा केलासि माझा वध ।’ त्वा राजधर्मासि आणिला बाध । ऐशा गर्ह्य कृतीनें ॥ जरी तूं होतासि क्षत्रियवीर । आणि मनुवंशज साचार । तरी तूं का न बा केलें समर । येऊन माझ्या पुढारां ॥ सुग्रीवें काय केलें हित । आणि म्यां कोण केला घात । रामा, कोण रे साधली मात । सांग येणें वधें त्वां ॥’—अध्यात्मरामकथा.

किं लप्स्यसे राम चोरवत्कृतसंगरः । यदि क्षत्रियदायादो मनोर्वंशस-मुद्भवः ॥ ५३ ॥ युद्धं कृत्वा समक्षं मे प्राप्स्यसे तत्फलं तदा । सुग्रीवेण कृतं किं ते मया वा न कृतं किमु ॥ ५४ ॥ रावणेन हृता भार्या तव राम महावने । सुग्रीवं शरणं यातस्तदर्थमिति शुश्रुम ॥ ५५ ॥ बत राम न जानीषे मद्बलं लोकविश्रुतम् । रावणं सकुलं बद्ध्वा ससीतं लंकया सह ॥ ५६ ॥ आनयामि मुहूर्तार्धाद्यदि चेच्छामि राघव । धर्मिष्ठ इति लोकेऽस्मिन् कथ्यसे रघुनंदन ॥ ५७ ॥ वानरं व्याधवद्धत्वा धर्मं कं लप्स्यसे वद । अभक्ष्यं वानरं मांसं हत्वा मां किं करिष्यासि ॥ ५८ ॥ इत्येवं बहु भाषंतं वालिनं राघवोऽब्रवीत् । धर्मस्य गोप्ता लोकेऽस्मिंश्चरामि सशरासनः ॥ ५९ ॥ अधर्मकारिणं हत्वा सद्धर्मं पालयाम्यहं । दुहिता भगिनी भ्रातुर्भार्या चैव तथा स्नुषा

तुला कोणतें यश मिळणार ? जर तूं खरा क्षत्रियवंशज आणि मनुकुलोत्पन्न असशील, तर माझ्या समक्ष उभा राहून युद्ध कर. म्हणजे त्याचें फळ तुला मिळेल. सुग्रीवानें तुझी कोणती बरें कामगिरी केली आहे, आणि मी कोणती केली नाही ? ५३,५४ रामा ! महारण्यांत तुझी पत्नी रावणानें हरून नेली, आणि त्याकरितां तूं सुग्रीवाला शरण गेलास, असें आम्ही ऐकितों. ५५ परंतु रामा ! सर्वत्र पृथ्वीवर माझा पराक्रम प्रसिद्ध असून तो तुला ठाऊक नसावा ना ? राघवा ! जर मी मनांत आणीन, तर अर्ध्या मुहूर्तांत रावणाला सहकुटुंब बांधून सीता आणि लंकानगरीही येथें घेऊन येईन. रघुनंदना ! ह्या लोकांत तूं 'धर्मिष्ठ' म्हणून वर्णिला जातोस, ५६,५७ तरी पारध्याप्रमाणें वानराचा वध करून कोणता धर्म तुला मिळणार आहे, सांग. वानराचें मांस अभक्ष्य असल्याकारणानें मला मारून तूं काय करणार आहेस ?' ५८ अशा प्रकारें वाली पुष्कळ बोलत असतां श्रीराम त्याला म्हणाला, 'धर्मांचा रक्षक म्हणून या लोकांत धनुष्य घेऊन मी फिरत असतों. ५९ अधर्माचें आचरण करणाऱ्यांचा वध करून मी सद्धर्माचें पालन करीत असतों. मलगी.

१. समानार्थक वर्णन —'जे धर्मजात आघवें । युगायुगीं म्या रक्षावें । ऐसा ओघु हा स्वभावें । आद्यु असे ॥ अधर्माची अवधी तोडीं । दोषाचीं लिहिलीं फाडीं । सज्जनाकरवीं गुढी । सुखाची उभवीं ॥ दैत्याचीं कुळें नाशीं । साधूंचा मानु गिंवशीं । धर्मासीं नीतीशीं । शेज भरीं' ॥–ज्ञानेश्वरी ४.

॥ ६० ॥ समा यो रमते तासामेकामपि विमूढधीः । पातकी स तु विज्ञेयः स वध्यो राजभिः सदा ॥ ६१ ॥ त्वं तु भ्रातुः कनिष्ठस्य भार्यायां रमसे बलात् । अतो मया धर्मविदा हतोऽसि वनगोचर ॥६२॥ त्वं कपित्वान्न जानीषे महांतो विचरंति यत् । लोकं पुनानाः संचारै-रतस्तान्नातिभाषयेत् ॥ ६३ ॥ तच्छ्रुत्वा भयसंत्रस्तो ज्ञात्वा रामं रमा-पतिम् । वाली प्रणम्य रभसाद्रामं वचनमब्रवीत् ॥ ६४ ॥ राम राम महाभाग जाने त्वां परमेश्वरम् । अजानता मया किंचिदुक्तं तत्क्षंतुम-र्हसि ॥ ६५ ॥ साक्षात्त्वच्छरघातेन विशेषेण तवाग्रतः । त्यजाम्य-सून्महायोगिदुर्लभं तव दर्शनम् ॥ ६६ ॥ यन्नाम विवशो गृह्णन् म्रिय-माणः परं पदम् । याति साक्षात्स एवाद्य मुमूर्षोर्मे पुरः स्थितः ॥६७॥ देव जानामि पुरुषं त्वां श्रियं जानकीं शुभाम । रावणस्य वधार्थाय

बहीण, बंधुस्त्री आणि सून या सर्व सारख्याच होत. जो मढबुद्धि होऊन ह्यांच्या-पैकीं एकाईशी रममाण होतो, तो पातकी जाणावा. राजांनीं अशाचा सदा वधच करावा. ६०,६१ तूं तर कनिष्ठ बंधूच्या भार्येशी बलात्कारानें रममाण होतोस, म्हणून हे रानवटा ! तुझा मीं धर्म काय तें जाणूनच वध केला आहे. ६२ तूं केवळ वानर असल्यामुळें महात्मे कसें आचरण करतात, तें तुला कळत नाहीं. ते ( पृथ्वी-वर ) संचार करून लोकांना पावन करीत असतात, तरी त्यांना निंदूं नये.' ६३ तें ऐकून वाली भयभीत झाला. राम हा प्रत्यक्ष लक्ष्मीपतिच होय, असें त्यानें जाणलें. वालीनें रामाला तत्काल नमस्कार करून म्हटलें, ६४ 'रामा ! महाभागा रामा ! तूं परमेश्वर आहेस, हें मला कळत आहे. मी अज्ञानामुळें जें कांहीं बोललों असेन, त्याची मला तूं क्षमा करावी. ६५ ( केवढें माझें सुकृत कीं, ) साक्षात् तुझ्या शर-प्रहारानें आणि विशेषेंकरून तुझ्या अग्रभागीं मी प्राण सोडित आहें. तुझें दर्शन महायोग्यांनाही दुर्लभ होय. ६६ मरणोन्मुख स्थितींत पराधीनतेनें कां होईना, ज्याचें नाम घेतल्यानें ( प्राणी ) परम पदाला जातो, तोच आज साक्षात् ( परमेश्वर ) माझ्या मरणसमयी मजसमोर उभा आहे. ६७ देवा ! मी जाणतों की, तूं पुरुष—

१. 'न कळता पद अग्निवरी पडे । न करि दाह असे न कधीं घडे ॥ अजितनाम वदो-त्या मिषें । सकल पातक भस्म करीतसे' ॥—नामसुधा, वामन पंडित.

-जातं त्वां ब्रह्मणार्थितम् ॥ ६८ ॥ अनुजानीहि मां राम यांतं त्वत्पद-मुत्तमम् । मम तुल्यबले बाले अंगदे त्वं दयां कुरु ॥ ६९ ॥ विशल्यं कुरु मे राम हृदयं पाणिना स्पृशन् । तथेति बाणमुद्धृत्य रामः पस्पर्श पाणिना । त्यक्त्वा तद्वानरं देहममरेंद्रोऽभवत्क्षणात् ॥ ७० ॥ वाली रघूत्तमशराभिहतो विमृष्टो रामेण शीतलकरेण सुखाकरेण । सद्यो विमुच्य कपिदेहमनन्यलभ्यं प्राप्तं परं परमहंसगणैर्दुरापम् ॥ ७१ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे किष्किंधाकांडे द्वितीयः सर्गः ॥२॥

परमेश्वर–आहेस, आणि जानकी ही मंगलकारिणी लक्ष्मी आहे. ब्रह्मदेवानें प्रार्थना केल्यावरून रावणाच्या वधाकरितां तूं जन्म घेतला आहेस. ६८ रामा ! तुझ्या परम पदाला मी जात आहें, तरी मला अनुज्ञा दे. मजसारखाच बलवान् माझा ( पुत्र ) बाळ अंगद, त्याजवर दया कर. ६९ रामा ! माझ्या हृदयाला हस्तस्पर्श करून त्यांतील शल्य–बाणाग्र–काढून टाक.' 'बरें आहे', असें म्हणून रामानें बाण ( वालीच्या शरीरांतून ) बाहेर काढला, आणि त्याला हस्तस्पर्श केला. त्याबरोबर वानरदेहाचा त्याग करून तो ( वाली ) तत्काल श्रेष्ठ असा देव झाला. ७० रघूत्तमा-( रामा )च्या शरानें वाली विद्ध झाला असतां रामानें सुखाची खाणच कीं काय, अशा आपल्या शीतळ करानें त्याला–वालीला–स्पर्श केला. त्याबरोबर कपिदेहाचा त्यानें त्याग केला, आणि इतरांस अलभ्य, परमहंस मंडळीलाही दुर्मिळ, अशा पदाला तो प्राप्त झाला. ७१"

**किष्किंधाकांड, दुसरा सर्ग समाप्त.**

१. परमहंसः–अखंड ईशध्यानरत, इंद्रियनिग्रही, वैराग्यशील असा यति. 'चतुर्विधा भिक्षवस्ते कुटीचकबहूदकौ, हंसः परमहंसश्च यो यः पश्चात् स उत्तमः' ॥–महाभारत.

## किष्किंधाकांड, सर्ग तिसरा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ निहते वालिनि रणे रामेण परमात्मना । दुद्रुवुर्वानराः सर्वे किष्किंधां भयविह्वलाः ॥ १ ॥ तारामूचुर्महाभागे हतो वाली रणाजिरे । अंगदं परिरक्षाद्य मंत्रिणः परिनोदय ॥ २ ॥ चतुर्द्वारकपाटादीन् बद्ध्वा रक्षामहे पुरीम् । वानराणां तु राजानमंगदं कुरु भामिनि ॥ ३ ॥ निहतं वालिनं श्रुत्वा तारा शोकविमूर्च्छिता । अताडयत्स्वपाणिभ्यां शिरो वक्षश्च भूरिशः ॥ ४ ॥ किमंगदेन राज्येन नगरेण धनेन वा । इदानीमेव निधनं यास्यामि पतिना सह ॥ ५ ॥ इत्युक्त्वा त्वरिता तत्र रुदती मुक्तमूर्धजा । ययौ तारातिशोकार्ता यत्र भर्तृकलेवरम् ॥ ६ ॥ पतितं वालिनं दृष्ट्वा रक्तैः पांसुभिरावृतम् । रुदती नाथ नाथेति पतिता तस्य पादयोः ॥ ७ ॥ करुणं विलपंती सा ददर्श रघुनंदनम् । राम मां जहि बाणेन येन वाली हतस्त्वया ॥ ८ ॥ गच्छामि पतिसालोक्यं पतिर्मामभिकांक्षते ।

श्रीशंकर म्हणाला, "परमात्म रामानें युद्धांत वालीचा वध केला असतां सर्व वानर भयभीत होऊन किष्किंधेला पळून गेले, १ आणि तारेला म्हणाले, 'महाभागे! वालीचा रणांगणांत वध झाला. आतां अंगदाचें रक्षण कर. मंत्र्यांना (नगररक्षणार्थ) प्रेरणा कर. २ चारी दरवाजांचीं कवाडें बंद करून आम्हीं नगरीचें रक्षण करितों. बाई! अंगदाला वानरांचा राजा कर.' ३ वाली मरण पावल्याचें ऐकून तारा शोकाकुल होऊन मूर्च्छित झाली. आपल्या हातांनीं ती मस्तक आणि ऊर वारंवार बडवून घेऊं लागली. ४ (ती म्हणाली,) 'मला अंगदाशीं, राज्याशीं, नगराशीं आणि धनाशीं काय करायाचें आहे? आतांच मी पतीशीं सहगमन करून मरणार आहें.' ५ असें म्हणून अत्यंत शोकाकुल होत्साती, केश मोकळे सोडून, रडत रडत ती पतिशवाजवळ त्वरेनें गेली. ६ रक्तानें आणि धुळीनें व्याप्त होऊन पडलेल्या वालीला पाहून (तारा) 'हा नाथा! हा नाथा!' असा आक्रोश करीत त्याच्या पायांवर पडली. ७ करुणस्वरानें ती रडत असतां तिच्या दृष्टीला श्रीराम पडला. (ती त्याला म्हणाली,) 'रामा! ज्या बाणानें त्वां वालीला मारलें, त्याच बाणानें मला मारून टाक. ८ मी पति-

**स्वर्गेऽपि न सुखं तस्य मां विना रघुनंदन ॥ ९ ॥ पत्नीवियोगज
दुःखमनुभूतं त्वयानघ । वालिने मां प्रयच्छाशु पत्नीदानफलं भवेत्
॥ १० ॥ सुग्रीव त्वं सुखं राज्यं दापितं वालिघातिना । रामेण
रुमया सार्धं भुंक्ष्व सापत्नवर्जितम् ॥ ११ ॥ इत्येवं विलपंतीं तां
तारां रामो महामनाः । सांत्वयामास दयया तत्त्वज्ञानोपदेशतः ॥१२॥
किं भीरु शोचसि व्यर्थं शोकस्याविषयं पतिम् । पतिस्तवायं देहो वा
जीवो वा वद तत्त्वतः ॥ १३ ॥ पंचात्मको जडो देहस्त्वङ्मांसरुधि-
रास्थिमान् । कालकर्मगुणोत्पन्नः सोऽप्यास्तेऽद्यापि ते पुरः ॥ १४ ॥
मन्यसे जीवमात्मानं जीवस्तर्हि निरामयः । न जायते न म्रियते न**

लोकास जाईन. पति माझी वाट पहात आहेत. रघुनंदना ! स्वर्गांत देखील माझ्यावांचून त्यांना सुख होणार नाहीं. ९ हे निष्पापा ! पत्नीवियोगाचें दुःख कसें असतें, याचा अनुभव तू घेतलाच आहेस. तरी मला शीघ्र वालीला भेटीव, तेणेंकरून तुला पत्नीदानाचें फळ-पुण्य-मिळेल. १० सुग्रीवा ! वालीचा घात करून रामानें तुला राज्य देवविलें आहे. तुला आतां कोणीच शत्रु नाहीं. तरी पत्नी रुमेसह तूं ( आतां ) राज्यभोग घे' ११ अशा प्रकारें शोक करणाऱ्या तारेला त्या मोठ्या मनाच्या रामानें दयेनें तत्त्वज्ञानाचा उपदेश केला आणि तिचें सांत्वन केलें. १२ ( तो म्हणाला, ) 'भित्र्ये ! व्यर्थ शोक कां बरें करीत आहेत ? पति हा शोकाचा विषयच नाही. हा देह तुझा पति, किंवा जीव तुझा पति, तें मला खरें सांग. १३ जडदेह[1] पंचभूतांनी बनलेला असून त्वचा, मांस, रक्त आणि अस्थि यांनी युक्त आहे. काल, कर्मे आणि गुण ( सत्त्वादि ) यांनीं त्याची उत्पत्ति झाली आहे. तो तर तुझ्या पुढेंच आहे. १४ आतां जीव[2] हा आपला ( पति ) मानीत असशील, तर जीव हा निर्विकार आहे तो जन्मत नाहीं,

१. जड देह-'पंचीकृतमहाभूतसंभवं कर्मसंचितम् । शरीरं सुखदुःखानां भोगायतनमुच्यते ' ॥-आत्मबोध, शंकराचार्य. २ जीव-' समुद्र का वायुवशें । तरंगाकार उल्लसे । तो समुद्रांशु ऐसा दिसे । सानिवा जेंवी ॥ तेंवी जडातें जीववितां । देहअहंता उपजविता । मीं जीव गमे पाण्डुसुता । जीवलोकीं ॥ अगा उपजणे निमणे । हें साचचि जे कां मानणे । तो जीवलोकु मी म्हणें । संसारु हन ॥ '-ज्ञानेश्वरी १५

**तिष्ठति न गच्छति ॥ १५ ॥ न स्त्री पुमान्वा षंढो वा जीवः सर्वगतोऽव्ययः । एक एवाद्वितीयोऽयमाकाशवदलेपकः । नित्यो ज्ञानमयः शुद्धः स कथं शोकमर्हति ॥ १६ ॥ तारोवाच ॥ देहोऽचित्काष्ठवद्राम जीवो नित्यश्चिदात्मकः । सुखदुःखादिसंबंधः कस्य स्याद्राम मे वद ॥ १७ ॥ श्रीराम उवाच ॥ अहंकारादिसंबंधो यावद्देहेंद्रियैः सह । संसारस्तावदेव स्यादात्मनस्त्वविवेकिनः ॥ १८ ॥ मिथ्यारोपितसंसारो न स्वयं विनिवर्तते । विषयान्ध्यायमानस्य स्वप्ने मिथ्यागमो यथा ॥ १९ ॥ अनाद्यविद्यासंबंधात्तत्कार्याहंकृतेस्तथा । संसारोऽपार्थकोऽपि स्याद्रागद्वेषादिसंकुलः ॥ २० ॥ मन एव हि संसारो बंधश्चैव**

मरत नाही, राहात नाही, किंवा जातही नाही. १५ तो ( जीव ) स्त्री नाही, पुरुष नाही, किंवा नपुंसकही नाही. तर तो सर्वव्यापी, अव्यय, एक, अद्वितीय आहे. तो आकाशाप्रमाणें सर्वभर व्यापून राहूनहीं निःसंग आहे. तो नित्य, ज्ञानमय व शुद्ध आहे. त्याबद्दल शोक करणें कसें बरें योग्य होईल ?' १६ तारा म्हणाली, ' रामा ! देह हा काष्ठाप्रमाणें जड आहे, आणि आत्मा हा नित्य व चैतन्यस्वरूपी आहे. मग रामा ! सुखदुःखादि संबंध कोणाला आहे तें मला सांग.' १७ श्रीराम म्हणाला, ' जोंपर्यंत देह, इंद्रियें यांजसंबंधी अहंकारादि संबंध वाटत असतो, तोंपर्यंतच अविचारी जीवाला संसार लागलेला असतो. १८ हा संसार मिथ्या आरोपिलेला आहे, तरी तो आपोआप नाहीसा व्हावयाचा नाही. ह्याला दृष्टांत म्हणजे विषयांचें सतत चिंतन करणाऱ्या स्वप्नांतील मनुष्याचा होय. त्याला स्वप्नांत अनेक पदार्थ दिसतात, तथापि स्वप्नस्थिति संपेपर्यंत ते खोटे असें वाटत नाही. १९ अनादि अविद्येच्या—अज्ञानाच्या—योगेंकरून, आणि त्याच अज्ञानाचें कार्य जो अहंकार, त्यापासून संसार होतो. हा ( संसार ) निरर्थक असून राग—प्रीति, द्वेष, इत्यादिकांनीं संकुल—व्याप्त—झालेला आहे. २० हे कल्याणि ! मन हेंच संसार व

१. समानार्थक उतारा —'नासन्न सन्न सदसन्न महन्न चाणु न स्त्री पुमान्न च नपुंसकमेकबीजम् ।'—धन्याष्टकम्—शंकराचार्य. २. सदृश वर्णनः—' अहमाकाशवत् सर्वबहिरंतर्गतोऽच्युतः । सदा सर्वसम शुद्धो निःसंगो निर्मलोऽचलः ॥ '—मनीषापचक. ३. ' दोन मुहूर्तें स्वप्नवृत्ती । त्यामाजी देखे जन्मपंक्ती । तेथे पावला नाना याती । तेंवी मिथ्या प्रतीती भवभावा ॥'—एकनाथी भागवत ११

मनः शुभे । आत्मा मनःसमानत्वमेत्य तद्गतबंधभाक् ॥ २१ ॥ यथा विशुद्धः स्फटिकोऽलक्तकादिसमीपगः । तत्तद्वर्णयुगाभाति वस्तुतो नास्ति रंजनम् ॥ २२ ॥ बुद्धींद्रियादिसामीप्यादात्मनः संसृतिर्बलात् । आत्मा स्वलिंगं तु मनः परिगृह्य तदुद्भवान् ॥ २३ ॥ कामान् जुषन् गुणैर्बद्धः संसारे वर्ततेऽवशः । आदौ मनो गुणान् सृष्ट्वा ततः कर्माण्यनेकधा ॥ २४ ॥ शुक्लोहितकृष्णानि गतयस्तत्समानतः । एवं कर्मवशाज्जीवो भ्रमत्याभूतसंप्लवम् ॥ २५ ॥ सर्वोपसंहृतौ जीवो वासनाभिः स्वकर्मभिः । अनाद्यविद्यावशगास्तिष्ठत्यभिनिवेशतः ॥ २६ ॥ सृष्टिकाले

मन हेंच बंधन होय. आत्मा मनाशी ऐक्य पावून मनावरील बंधनांना भोगणारा होतो. २१ ज्याप्रमाणें अगदी स्वच्छ असा स्फटिकमणि अळता इत्यादि पदार्थांच्या जवळ असला म्हणजे त्या त्या पदार्थांच्या रंगांनी युक्त दिसतो, वस्तुतः त्याला रंग म्हणून नाही; २२ तसेंच बुद्धि, इंद्रियें यांच्या संबंधमात्रेंकरून बळेंच संसाराचें बंधन आत्म्याच्या अंगीं लागत असतें. मीच मन हा भाव धरून, त्या मनापासून उत्पन्न होणाऱ्या उपभोगांचें सेवन करीत आत्मा राहतो, आणि ( रागद्वेषादि ) गुणांनी बद्ध होऊन पराधीनपणें संसारांत पडतो. प्रथमतः मन रागद्वेषादि गुणांना उत्पन्न करून नंतर अनेक प्रकारचीं कर्मे उत्पन्न करितें. २३,२४ ही कर्मे शुक्ल–उत्तम, लोहित–मध्यम, आणि कृष्ण–अधम, अशीं तीन प्रकारची असून त्यांच्या गतिही त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें उत्तम, मध्यम आणि अधम असतात. याप्रमाणें कर्मबंधानुसार जीव हा प्रलयकालपर्यंत भ्रमण करीत असतो. २५ प्रलयकाली सर्वांचा संहार होतो, तेव्हां मीच मन असें मानून वासना आणि स्वकर्मे यांसह अनादि अविद्येच्या ठिकाणी जीव लीन होतो. २६ मग पुनः सृष्टिकाल आला

१. यासबंधी एकनाथस्वामींनीं रूपकद्वारा किती मनोहर वर्णन केलें आहे, पहाः– ‘ चित्रींचेनि हुताशनें । जैं जाळिजती पुरें पट्टणें । कां स्वप्नींचेनि महाधनें । वेव्हारा होणें जागृती ॥ सूर्यासी प्रतिबिंब गिळी । छाया पुरुषातें आकळी । समुद्र बुडे मृगजळी । तैं मज गुणमेळीं बद्धता ॥ बिंबीं प्रतिबिंबीं नाहीं । मध्ये आरिशाचे ठायी । मळ बैसले ते पाहीं । प्रतिबिंबाचे देहीं लागले दिसती ॥ एवं वस्तुता संसार नाहीं । तेथें सुखदु:ख कैंचे कायी । देहेवीण छाया पाहीं । कोणे ठायी उपजेल ॥’–एकनाथी भागवत ११.

**पुनः पूर्ववासनामानसैः सह । जायते पुनरप्येवं घटीयंत्रमिवावशः ॥ २७ ॥ यदा पुण्यविशेषेण लभते संगतिं सताम् । मद्भक्तानां सुशांतानां तदा मद्विषया मतिः ॥ २८ ॥ मत्कथाश्रवणे श्रद्धा दुर्लभा जायते ततः । ततः स्वरूपविज्ञानमनायासेन जायते ॥ २९ ॥ तदाचार्यप्रसादेन वाक्यार्थज्ञानतः क्षणात् । देहेंद्रियमनःप्राणाहंकृतिभ्यः पृथक्स्थितम् ॥ ३० ॥ स्वात्मानुभवतः सत्यमानंदात्मानमद्वयम् । ज्ञात्वा सद्यो भवेन्मुक्तः सत्यमेव मयोदितम् ॥ ३१ ॥ एवं मयोदितं सम्यगालोचयति योऽनिशम् । तस्य संसारदुःखानि न स्पृशंति कदाचन ॥ ३२ ॥ त्वमप्येतन्मया प्रोक्तमालोचय विबुद्धधीः ।**

असतां, तो जीव पूर्वीच्या वासना आणि मनानें केलेली कर्में ह्यांना घेऊन ( अनुसरून ) जन्मास येतो. अशा प्रकारें रहाटगाडग्याप्रमाणें पराधीनतेनें त्याला जन्ममरण ही भोगावी लागत असतात. २७ पुढें जेव्हां कांहीं सुकृतें–पुण्य–उदयास येऊन अत्यंत शांत आणि माझे भक्तींत रममाण होणारे अशा सत्पुरुषांची संगति लाभते, तेव्हांच त्याच्या मनांत मजसंबंधीं प्रेम उत्पन्न होतें. २८ पुढें, माझ्या कथा श्रवण करण्याची आवड प्रथमतः नसते, ती वाढूं लागते व त्यानंतर अनायासानेंच स्वरूपज्ञान प्राप्त होतें. २९ मग सद्गुरूच्या प्रसादानें महावाक्यार्थाचें ज्ञान होऊन क्षणात् आत्मा हा देह, इंद्रियें, मन, प्राण आणि अहंकार यांहून निराळा असून तो शाश्वत, आनंदस्वरूप व द्वैतरहित आहे, ३० असें अनुभवज्ञान प्राप्त होतें, व हें ज्ञान झाल्यानें त्याला लागलीच मुक्ति मिळते. ( तारे ! ) हें तुला मी सांगितलें आहे, तें सत्य आहे. ३१ जो कोणी ह्या माझ्या बोलण्याचा रात्रंदिवस विचार करील, त्याला संसारसंबंधीं दुःखें कधींही स्पर्श करणार नाहींत. ३२ तूं देखील हें मी सांगितलें आहे, त्याचा नीट विचार कर. तेणेंकरून तुझी बुद्धि शुद्ध होऊन दुःख-

१. 'जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च' ॥–भ. गीता २ 'कोटि जन्माची पुण्यसंपत्ती । जरी गांठीं असेल आइती । तैं जोडे माझ्या मताची संगती । सत्संगें भक्ति उल्हासे ॥'–एकनाथी भागवत ११. ३. 'सद्गुरूचा विशिष्ट गुण । शिष्यासि करावें भवतारण । नसावें आवंतण । आन तेथें ॥ अज्ञान आवघें नाशुनी । आत्मज्ञान प्रकाशुनी । जीवदशा उद्धरोनी । तद्रूप कीजे ॥' सिद्धांतसंहिता, सोहिरोबा.

न स्पृश्यसे दुःखजालैः कर्मबंधाद्विमोक्ष्यसे ॥ ३३ ॥ पूर्वजन्मनि ते सुभ्रु कृता मद्भक्तिरुत्तमा । अतस्तव विमोक्षाय रूपं मे दर्शितं शुभे ॥ ३४ ॥ ध्यात्वा मद्रूपमनिशमालोचय मयोदितम् । प्रवाहपतितं कार्यं कुर्वत्यपि न लिप्यसे ॥ ३५ ॥ श्रीरामेणोदितं सर्वं श्रुत्वा तारातिविस्मिता । देहाभिमानजं शोकं त्यक्त्वा नत्वा रघूत्तमम् ॥ ३६ ॥ आत्मानुभवसंतुष्टा जीवन्मुक्ता बभूव ह । क्षणसंगममात्रेण रामेण परमात्मना ॥ ३७ ॥ अनादिबंधं निर्धूय मुक्ता सापि विकल्मषा । सुग्रीवोऽपि च तच्छ्रुत्वा रामवक्त्रात्समीरितम् ॥ ३८ ॥ जहावज्ञानमखिलं स्वस्थचित्तोऽभवत्तदा । ततः सुग्रीवमाहेदं रामो वानरपुंगवम् ॥ ३९ ॥ भ्रातुर्ज्येष्ठस्य पुत्रेण यद्युक्तं सांपरायिकम् । कुरु सर्वं यथान्यायं संस्कारादि ममाज्ञया ॥ ४० ॥ तथेति बलिभिर्मुख्यैर्वानरैः परिणीय

समुदायांचा तुला कधींही स्पर्श होणार नाही, आणि तूं कर्मबंधापासून मुक्त होशील. ३३ हे सुंदरि ! तूं पूर्वजन्मामध्यें माझी उत्तम भक्ति केली आहेस; आणि म्हणूनच हे शुभलक्षणे ! तुला मोक्ष मिळावा यासाठी मी माझें दर्शन तुला दिलें. ३४ माझ्या रूपाचें ध्यान आणि माझ्या उपदेशाचा विचार निरंतर करीत रहा, मग प्राप्त होतील, ती ती कर्मे करूनही तूं निर्लेप[1] राहाशील.' ३५ रामाचें सर्व भाषण ऐकून तारेला अत्यंत विस्मय वाटला. तिनें देहाभिमानापासून होणारा शोक टाकून दिला आणि त्या रघूत्तमाला नमन केलें. ३६ ( अशा रीतीनें ) परमात्म रामाच्या क्षणमात्र समागमानें ती (तारा) आत्मस्वरूपानंदाला प्राप्त होऊन जीवन्मुक्त झाली. ३७ अनादि (अविद्याविषयक) बंधनाला तोडून ती निष्पाप होऊन मुक्ति पावली. रामाच्या तोंडून निघालेली वचनें ऐकून सुग्रीवाचेंही सर्व अज्ञान नाहीसें होऊन त्याचें चित्त तत्काल स्वस्थ झालें. नंतर त्या वानरश्रेष्ठ सुग्रीवाला राम बोलला, ३८, ३९ ' ज्येष्ठ बंधूचा अंत्यविधि यथान्याय सर्वसंस्कारसहित पुत्राकडून तूं करवावा, अशी माझी तुला आज्ञा आहे.' ४० ' होय. तसें करितो.' असें म्हणून ( सुग्रीवानें ) बलवान व मुख्य वानरांना

१. ' जैसा समुद्रीं लवण न पडे । तंव वेगळें अल्प आवडे । मग हाय सिंधूंचिएवढें । मिळे तेव्हां ॥ तैसें संकल्पोनि काढिलें । जयाचें मनचि चैतन्य जाहलें । तेणें एकदेशियें परी व्यापिलें । लोकत्रय ॥ आतां कर्ता कर्म करावें । हें खुंटलें तया स्वभावें । आणि करी जरी आघवें । तरी अकर्ता तो ॥ '—ज्ञानेश्वरी.

तम् । वालिनं पुष्पके क्षिप्त्वा सर्वराजोपचारकैः ॥ ४१ ॥ भेरीदुंदुभिनिर्घोषैर्ब्राह्मणैर्मंत्रिभिः सह । यूथपैर्वानरैः पौरैस्तारया चांगदेन च ॥ ४२ ॥ गत्वा चकार तत्सर्वं यथाशास्त्रं प्रयत्नतः । स्नात्वा जगाम रामस्य समीपं मंत्रिभिः सह ॥ ४३ ॥ नत्वा रामस्य चरणौ सुग्रीवः प्राह हृष्टधीः । राज्यं प्रशाधि राजेंद्र वानराणां समृद्धिमत् ॥ ४४ ॥ दासोऽहं ते पादपद्मं सेवे लक्ष्मणवच्चिरम् । इत्युक्तो राघवः प्राह सुग्रीवं सस्मितं वचः ॥ ४५ ॥ त्वमेवाहं न संदेहः शीघ्रं गच्छ ममाज्ञया । पुरराज्याधिपत्ये त्वं स्वात्मानमभिषेचय ॥ ४६ ॥ नगरं न प्रवेक्ष्यामि चतुर्दश समाः सखे । आगमिष्यति मे भ्राता लक्ष्मणः पत्तनं तव ॥४७॥ अंगदं यौवराज्ये त्वमभिषेचय सादरम् । अहं समीपे शिखरे पर्वतस्य सहानुजः ॥ ४८ ॥ वत्स्यामि वर्षदिवसांस्ततस्त्वं यत्नवान् भव । किंचित्कालं पुरे स्थित्वा सीतायाः परिमार्गणे ॥ ४९ ॥ साष्टांगं प्रणि-

आणवून सर्व राजोपचार वालीच्या अंगावर घातले आणि त्याला पुष्पक विमानांत ठेविलें. ४१ सभोंवार भेरी—नगारे—आणि दुंदुभि—नौबदी—वाजूं लागल्या. या रीतीनें ब्राह्मणमंडळी, मंत्रिजन, मुख्य मुख्य वानरवीर, सर्व नागरिक, तारा आणि अंगद यांसह जाऊन सुग्रीवानें तें सर्व (और्ध्वदेहिक) प्रयत्नपूर्वक यथाशास्त्र केलें. नंतर स्नान करून मंत्रिजनांसह तो रामाकडे गेला. ४२,४३ नंतर संतुष्ट अंतःकरणानें रामचरणी नमन करून सुग्रीव म्हणाला, 'राजेंद्रा! हें सर्वसमृद्धींनी युक्त असें वानरांचें राज्य आपण चालवावें. ४४ आपला दास होऊन लक्ष्मणाप्रमाणें आपल्या पद्कमलाची मी नित्य सेवा करीन.' हें ऐकून राम सुग्रीवाला हंसत म्हणाला, ४५ '(सुग्रीवा!) तूंच तो मी, यांत कांहीं संदेह नाहीं. माझ्या आज्ञेनें लवकर जा, आणि (किष्किंधा) नगरीचा राज्याभिषेक आपणाला करीव. ४६ मित्रा! चवदा वर्षेपर्यंत मी नगरांत प्रवेश करणार नाहीं. तुझ्या राजधानीत माझा बंधु लक्ष्मण येईल. ४७ अंगदाला आदरपूर्वक यौवराज्याभिषेक करीव. मी कनिष्ठ बंधूसह जवळच पर्वताच्या शिखरावर पर्जन्यकाळ संपेपर्यंत राहीन. तोंपर्यंत कांहीं काळ नगरांत राहून नंतर सीतेच्या शोधाचे कामी यत्नास लाग.' ४८,४९

पत्याह सुग्रीवो रामपादयोः । यदाज्ञापयसे देव तत्तथैव करोम्यहम्
॥ ५० ॥ अनुज्ञातश्च रामेण सुग्रीवस्तु सलक्ष्मणः । गत्वा पुरं तथा
चक्रे यथा रामेण चोदितः ॥ ५१ ॥ सुग्रीवेण यथान्यायं पूजितो
लक्ष्मणस्तदा । आगत्य राघवं शीघ्रं प्रणिपत्योपतस्थिवान् ॥ ५२ ॥
ततो रामो जगामाशु लक्ष्मणेन समन्वितः । प्रवर्षणगिरेरूर्ध्वं शिखरं
भूरि विस्तरम् ॥ ५३ ॥ तत्रैकं गह्वरं दृष्ट्वा स्फाटिकं दीप्तिमच्छुभम् ।
वर्षवातातपसहं फलमूलसमीपगम् । वासाय रोचयामास तत्र रामः
सलक्ष्मणः ॥ ५४ ॥ दिव्यमूलफलपुष्पसंयुते मौक्तिकोपमजलौघप-
ल्वले । चित्रवर्णमृगपक्षिशोभिते पर्वते रघुकुलोत्तमोऽवसत् ॥ ५५ ॥
इति श्रीमध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे किष्किंधाकांडे तृतीय सर्गः ।३।

रामाच्या चरणी साष्टांग प्रणिपात करून सुग्रीव ( म्हणाला ), 'देवा ! जशी आपली आज्ञा आहे, तसेंच मी करितों ५० नंतर रामाची अनुज्ञा घेऊन सुग्रीव लक्ष्मणासह ( किष्किधा ) नगरीला आला आणि रामानें सांगितल्याप्रमाणें त्यानें ( सर्व गोष्टी ) केल्या. ५१ त्या वेळीं सुग्रीवानें लक्ष्मणाची यथाविधि पूजा केली. नंतर लक्ष्मण रामाकडे लागलाच आला, आणि प्रणिपात करून सेवेसाठी उभा राहिला. ५२ नंतर लक्ष्मणासहवर्तमान राम प्रवर्षण[1] नांवाच्या उंच व अति विस्तीर्ण शिखरावर गेला. ५३ तेथें एक अत्यंत तेजस्वी, स्फटिकनिर्मित सुंदर गुहा त्याच्या दृष्टीस पडली. तेथें पाऊस, वारा आणि ऊन ही सहन करण्यासारखी असून फळें मूळेंही जवळच होती. ती जागा पसंत करून लक्ष्मणासह आपण तेथेंच रहावें, असें रामानें ठरविलें. ५४ त्या ( प्रवर्षण ) पर्वतावर दिव्य मूळें, फळें आणि फुलें यांची विपुलता असून मोत्यांप्रमाणें स्वच्छ उदकानें भरगच्च भरलेली अनेक लहान लहान सरोवरें होती. ( त्याचप्रमाणें ) चित्रविचित्र पशुपक्ष्यांनी त्या स्थलाला शोभा आली होती. अशा त्या पर्वतावर आपलें निवासस्थल करून तो रघुकुल-श्रेष्ठ श्रीराम तेथें राहिला. ५५ "

**किष्किधाकांड, सर्ग तिसरा समाप्त.**

१. प्रवर्षण–हा प्रस्रवण पर्वत या नांवानें इतर रामायणग्रंथांतून उल्लेखिला आहे. 'जनस्थानमध्यगो गिरिः प्रस्रवणो नाम'–उत्तररामचरित

## किष्किंधाकांड, सर्ग चवथा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ तत्र वार्षिकदिनानि राघवो लीलया मणिगुहासु संचरन् । पक्वमूलफलभोगतोषितो लक्ष्मणेन सहितोऽवसत्सुखम् ॥ १ ॥ वातनुन्नजलपूरितमेघानंतरस्तनितवैद्युतगर्भान् । वीक्ष्य विस्मयमगाद्गजयूथान्यद्वदाहितसुकांचनकक्षान् ॥ २ ॥ नवघासं समास्वाद्य हृष्टपुष्टमृगाद्विजाः । धावंतः परितो रामं वीक्ष्य विस्फारितेक्षणाः ॥ ३ ॥ न चलंति सदाध्याननिष्ठा इव मुनीश्वराः । रामं मानुषरूपेण गिरिकाननभूमिषु ॥ ४ ॥ चरंतं परमात्मानं ज्ञात्वा सिद्धगणा भुवि । मृगपक्षिगणा भूत्वा राममेवानुसेविरे ॥ ५ ॥ सौमित्रिरेकदा राममेकांते ध्यानतत्परम् । समाधिविरमे भक्त्या प्रणयाद्विनयान्वितः ॥ ६ ॥ अब्रवीद्देव ते वाक्यात्पूर्वोक्ताद्विगतो मम । अनाद्यविद्यासंभूतः संशयो हृदि संस्थितः ॥ ७ ॥ इदानीं श्रोतुमिच्छामि क्रियामार्गेण राघव ।

श्रीशंकर म्हणाला, "श्रीराम लक्ष्मणासह पर्जन्यकाळाचे दिवस संपत तोपर्यंत (त्या पर्वतावर) तेथील रत्नांच्या गुहांत मौजेनें फिरून आणि पिकलेली मूळें आणि फळें भक्षण करून आनंदांत राहिला. १ वायुप्रेरित होऊन (आकाशांत सर्वत्र संचार करणारे) पाण्यानें भरलेले मेघ, आणि मधूनमधून गर्जना करून चकचकणाऱ्या विजा, यांयोगें सुवर्णझूल घालून सजलेले हत्तींचे कळपच आपण पाहात आहों कीं काय, असा भास (रामाला) होत होता. त्यामुळें त्याला आश्चर्य वाटलें. २ कोंवळें गवत खाऊन हृष्ट व पुष्ट झालेले पशु आणि पक्षी रामाला पाहून डोळे ताठ उघडून त्याच्या सभोंवती धांवून येत असत. ३ ध्याननिष्ठ मुनिश्रेष्ठ निश्चल असतात, त्याचप्रमाणें ते पशुपक्षी तेथें स्थिर होऊन राहात असत. (त्यावरून) हे कोणी मूळचे सिद्धसमुदाय असून, ते राम म्हणजे प्रत्यक्ष परमात्माच मनुष्यरूपानें पर्वतावरील अरण्यप्रदेशांतून संचार करीत आहे, असें जाणून, पशुपक्ष्यांची रूपें घेऊन त्याची सेवा करीत आहेत की काय, असें वाटत होतें. ४,५ एके वेळी समाधि उतरून राम एकांतांत ध्यानतत्पर बसला असतां लक्ष्मण भक्तिप्रेमपुरस्सर नम्रपणें त्याला म्हणाला, 'देवा, पूर्वी आपण मला केलेल्या उपदेशानें अज्ञानबीजमूलक माझ्या मनांतील संशय दूर झालाच आहे. ६,७ सांप्रत लोकां-

भवदाराधनं लोके यथा कुर्वंति योगिनः ॥ ८ ॥ इदमेव सदा प्राहु-र्योगिनो मुक्तिसाधनम् । नारदोऽपि तथा व्यासो ब्रह्मा कमलसंभवः ॥ ९ ॥ ब्रह्मक्षत्रादिवर्णानामाश्रमाणां च मोक्षदम् । स्त्रीशूद्राणां च राजेंद्र सुलभं मुक्तिसाधनम् । तव भक्ताय मे भ्रात्रे ब्रूहि लोकोपकारकम् ॥ १० ॥ श्रीराम उवाच ॥ मम पूजाविधानस्य नांतोऽस्ति रघुनंदन । तथापि वक्ष्ये संक्षेपाद्यथावदनुपूर्वशः ॥ ११ ॥ स्वगृह्योक्तप्रकारेण द्विजत्वं प्राप्य मानवः । सकाशात्सद्गुरोर्मंत्रं लब्ध्वा मद्भक्तिसंयुतः ॥ १२ ॥ तेन संदर्शितविधिर्मामेवाराधयेत्सुधीः । हृदये वानले वार्चेत्प्रतिमादौ विभावसौ ॥ १३ ॥ शालग्रामशिलायां वा पूजयेन्मामतंद्रितः । प्रातःस्नानं प्रकुर्वीत प्रथमं देहशुद्धये ॥ १४ ॥ वेदतंत्रोदितै-

मध्यें योगी जन ज्या उपासनापद्धतीनें तुझी आराधना करीत असतात, ती ऐकण्याविषयी, हे राघवा! मला इच्छा झाली आहे. ८ अनेक योगी, त्याचप्रमाणें नारद, व्यास[1] आणि कमलयोनि ब्रह्मदेव यांनीही हेंच (तुझें पूजाराधन) मोक्षसाधन असल्याचें सांगितलें आहे. ९ राजेंद्रा! ब्राह्मण, क्षत्रिय इत्यादि वर्णांना, आणि (ब्रह्मचर्यादि) आश्रमांना मोक्ष देणारें, त्याचप्रमाणें स्त्रीशूद्रादिकांना सुलभ असें मुक्तिसाधन म्हटलें म्हणजे हेंच (तुझें पूजाराधन) होय. तुझी भक्ति करणारा मी तुझा भाऊ आहें, तरी लोकोपकारक असा हा उपासनामार्ग तूं मला सांगावा.' १० श्रीराम म्हणाला, 'हे रघुनंदना (लक्ष्मणा)! माझ्या उपासनेचे प्रकारांना मिति नाही. तथापि शास्त्रानुसार क्रमानें ते मी तुला थोडक्यांत सांगतों. ११ आपापल्या गृह्यसूत्रानुसार[2], ब्राह्मणत्व प्राप्त झालें असतां, मनुष्यानें भक्तिपूर्वक सद्गुरूपासून मंत्रोपदेश घ्यावा. १२ मग त्यानें दाखविलेल्या विधीप्रमाणें अंतःकरणपूर्वक माझीच आराधना करावी. ही (माझी आराधना) हृदय, अग्नि, एखादी मूर्ति वगैरे, अथवा सूर्यनारायण यांच्या ठिकाणी करावी. १३ अथवा शालग्राम[3] शिलाही घेऊन निरलसपणें माझें पूजन करावें. प्रथमतः देहशुद्धीसाठीं प्रातःस्नान करावें. १४ वेदांमध्यें

१. व्यास—महाभारताचा कर्ता. 'विव्यास वेदान् यस्मात् स तस्माद् व्यास इति स्मृत.' ॥ २. गृह्यसूत्रें—निरनिराळ्या शाखांचे गृह्याचारविषयक सूत्रात्मक ग्रंथ. ३. विशिष्ट आकाराची स्वयंभू शिलामूर्ति. विष्णु म्हणून इचें पूजन करितात.

मंत्रैर्मृल्लेपनविधानतः । संध्यादि कर्म यन्नित्यं तत्कुर्याद्विधिना बुधः ॥ १५ ॥ संकल्पमादौ कुर्वीत सिद्ध्यर्थं कर्मणां सुधीः । स्वगुरुं पूजयेद्भक्त्या मद्बुद्ध्या पूजको मम ॥ १६ ॥ शिलायां स्नपनं कुर्यात्प्रतिमासु प्रमार्जनम् । प्रसिद्धैर्गंधपुष्पाद्यैर्मत्पूजा सिद्धिदायिका ॥ १७ ॥ अमायिकोऽनुवृत्त्या मां पूजयेन्नियतव्रतः । प्रतिमादिष्वलंकारः प्रियो मे कुलनंदन ॥ १८ ॥ अग्नौ यजेत हविषा भास्करे स्थंडिले यजेत् । भक्तेनोपहृतं प्रीत्यै श्रद्धया मम वार्यपि ॥ १९ ॥ किं पुनर्भक्ष्यभोज्यादि गंधपुष्पाक्षतादिकम् । पूजाद्रव्याणि सर्वाणि संपाद्यैवं समारभेत् ॥ २० ॥ चैलाजिनकुशैः सम्यगासनं परिकल्पयेत् । तत्रोपविश्य देवस्य संमुखे शुद्धमानसः ॥ २१ ॥ ततो न्यासं प्रकुर्वीत मातृकाब-

आणि तंत्रांमध्यें सांगितलेल्या मंत्रांनी मृत्तिका लावणें, इत्यादि विधि आचरून संध्यादिक नित्याची कर्मे समजून घेऊन ती शहाण्यानें यथाविधि करावी. १५ आरंभी कर्मांच्या सिद्धीसाठी शहाण्या मनुष्यानें संकल्प करावा, व मग त्या माझ्या पूजकानें मद्बुद्धीनेंच आपल्या गुरूची भक्तिपूर्वक पूजा करावी. १६ पाषाणप्रतिमा असल्यास तिला स्नान घालावें. मृत्तिकादिकांच्या मूर्ति असल्यास त्यांवर मार्जन करावें नंतर (शास्त्रांत) मानलेल्या गंधपुष्पादिकांनी माझें पूजन करावें; तेणेंकरून सिद्धि प्राप्त होते. १७ दंभवृत्ति सोडून देऊन व नित्यनेम साधून विधिपूर्वक माझी पूजा करावी. कुलनंदना ! प्रतिमेवर अलंकार घातले असतां मला संतोष होतो. १८ अग्नीमध्यें हविर्द्रव्यें टाकून होम करावा. प्रत्यक्ष सूर्याची अगर जमिनीवर सूर्यचित्र काढून त्याची पूजा करावी. भक्तानें श्रद्धापुरस्सर अर्पण केलेल्या केवळ उदकानें देखील माझा संतोष होतो. १९ मग भक्ष्यभोज्यादि पदार्थ आणि गंधपुष्पाक्षता इत्यादिकांनीं मी संतुष्ट होतों, हें वेगळें कशाला सांगितलें पाहिजे ? सर्व पूजाद्रव्यें मिळवून पूजा आरंभावी. २० वस्त्र, चर्म आणि दर्भ यांचे योगें उत्तम आसन सिद्ध करून त्यावर देवाकडे तोंड करून निर्मल अंतःकरणानें बसावें. २१ नंतर अकारादि वर्ण

१. वशिष्ट ग्रंथ. वेदांतील मंत्र ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य याकारितां असून तंत्रांतील मंत्र शूद्रांनीं म्हणावयाचे असतात. २. 'पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति । तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः' ॥-भ. गीता ९. ३. हे वर्ण पन्नास आहेत.

हिरांतरम् । केशवादि ततः कुर्यात्तत्त्वन्यासं ततः परम् ॥ २२ ॥
मन्मूर्तिपंजरन्यासं मंत्रन्यासं ततो न्यसेत् । प्रतिमादावपि तथा कुर्यो-
न्नित्यमतंद्रितः ॥ २३ ॥ कलशं स्वपुरो वामे क्षिपेत्पुष्पादि दक्षिणे ।
अर्घ्यपाद्यप्रदानार्थं मधुपर्कार्थमेव च ॥ २४ ॥ तथैवाचमनार्थं तु न्यसे-
त्पात्रचतुष्टयम् । हृत्पद्मे भानुविमले मत्कलां जीवसंज्ञिताम् ॥ २५ ॥
ध्यायेत्स्वदेहमखिलं तया व्याप्तमरिंदम । तामेवावाहयेन्नित्यं प्रतिमादिषु
मत्कलाम् ॥ २६ ॥ पाद्यार्घ्याचमनीयाद्यैः स्नानवस्त्रविभूषणैः । याव-
च्छक्योपचारैर्वा त्वर्चयेन्माममायया ॥ २७ ॥ विभवे सति कर्पूरकुं-
कुमागरुचंदनैः । अर्चयेन्मंत्रवन्नित्यं सुगंधकुसुमैः शुभैः ॥ २८ ॥
दशावरणपूजां वै ह्यागमोक्तां प्रकारयेत् । नीराजनैर्धूपदीपैर्नैवेद्यैर्बहुवि-
स्तरैः ॥ २९ ॥ श्रद्धयोपहरेन्नित्यं श्रद्धाभुगहमीश्वरः । होमं कुर्यात्प्र-

आणि केशवादि नामानुसार बाह्य आणि आभ्यंतर न्यास, आणि त्यानतर तत्त्व-न्यास करावे. २२ पुढें माझ्या मूर्तीच्या देहावर (महा) न्यास करावा. नंतर मंत्रांतील अक्षरांचा स्वतांच्या व मूर्तीच्याही शरीरावर निरलसपणें न्यास करावा. २३ आपल्या पुढें डाव्या बाजूला ( उदकाचा ) कलश ठेवावा, पुष्पें वगैरे उजवी-कडे ठेवावी. अर्घ्य, पाद्य देण्याकरितां, मधुपर्काकरितां, आणि आचमनाकरितां चार पात्रें ठेवावी. नंतर सूर्यासमान तेजस्वी अशा हृदयकमलांत 'जीव' नांवाच्या माझ्या कलेचें—चित्कलेचें—ध्यान करावें. हे अरिंदमना (लक्ष्मणा)! सगळें आपलें शरीर त्या कलेनें—जीवकलेनें—व्यापलें आहे (असें मनांत आणावें), आणि त्याच माझ्या कलेचें मूर्ति वगैरे ठिकाणी—नित्य आवाहन करावें. २४,२५,२६ पाद्य, अर्घ्य, आचमनीय, इत्यादिकांनी, त्याचप्रमाणें स्नान, वस्त्र, अलंकार वगैरे शक्य त्या उपचारांनी निष्कपटपणें माझें पूजन करावें. २७ ऐश्वर्याची अनुकूलता असल्यास कापूर, केशर, कृष्णागरु, चंदन, आणि उत्तम सुवासिक पुष्पें यांही मत्रांनुसार माझें नित्य अर्चन करावें. २८ शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें दशावरणपूजा करावी. अनेक नीरांजनें, धूप, दीप, नैवेद्य अर्पण करावे. २९ हें सर्व नेहमी श्रद्धेनें मला अर्पण करीत असावें; कारण मी ईश्वर

१. हीं नाम चावीस आहेत. २. न्यास—पूजनांत मंत्रोच्चारसहित शरीराचे ते ते भाग ईश्वरा-र्पण करणे. ३. 'दधि सर्पिर्जलं क्षौद्रं सिता चैतैश्च पंचभिः प्रोच्यते मधुपर्कः.' ४. स्थापना. (याच्या उलट उत्सर्जन ) ५. दशावरणपूजेविषयीं माहिती अगस्त्यसंहितेंत दिली आहे.

यत्नेन विधिना मंत्रकोविदः ॥ ३० ॥ अगस्त्येनोक्तमार्गेण कुंडेनागम-
वित्तमः । जुहुयान्मूलमंत्रेण पुंसूक्तेनाथवा बुधः ॥ ३१ ॥ अथवौपा-
सनाग्नौ वा चरुणा हविषा तथा । तप्तजांबूनदप्रख्यं दिव्याभरणभूषितम्
॥ ३२ ॥ ध्यायेदनलमध्यस्थं होमकाले सदा बुधः । पार्षदेभ्यो बलिं
दत्वा होमशेषं समापयेत् ॥ ३३ ॥ ततो जपं प्रकुर्वीत ध्यायेन्मां यत-
वाक् स्मरन् । मुखवासं च तांबूलं दत्वा प्रीतिसमन्वितः ॥ ३४ ॥
मदर्थे नृत्यगीतादि स्तुतिपाठादि कारयेत् । प्रणमेद्दंडवद्भूमौ हृदये मां
निधाय च ॥ ३५ ॥ शिरस्याधाय मद्दत्तं प्रसादं भावनामयम् ।
पाणिभ्यां मत्पदे मूर्ध्नि गृहीत्वा भक्तिसंयुतः ॥ ३६ ॥ रक्ष मां घोर-
संसारादित्युक्त्वा प्रणमेत्सुधीः । उद्वासयेद्यथापूर्वं प्रत्यग्ज्योतिषि

भावभोक्ता आहें. मंत्रशास्त्रांत निष्णात मनुष्यानें शास्त्राज्ञेला अनुसरून प्रयत्नपूर्वक होम करावा. ३० आगमांत निष्णात अशा मनुष्यानें अगस्त्य मुनीनी सांगितल्याप्रमाणें कुंड तयार करून त्यामध्यें मूलमंत्र अगर पुरुषसूक्त म्हणून होम करावा. ३१ अथवा त्या पूजन केलेल्या अग्नीत चरूंची आहुति देऊन हवन करावें. ( शास्त्र ) जाणत्या मनुष्यानें होमकालीं तापलेल्या सोन्याप्रमाणें दीप्तिमान् व दिव्यालंकारांनीं सुशोभित मूर्ति ( ईश्वर ) अग्नीच्या मध्यभागी उभी आहे, असें कल्पून तिचें ध्यान करावें; मग पार्षद्गणांना ती बलिदानें देऊन बाकी होमकार्याची परिपूर्णता करावी. ३२,३३ नंतर मौन धारण करून माझें ध्यान व स्मरण करीत मंत्राचा जप करावा. मुखवासासाठीं प्रेमपुरस्सर तांबूल अर्पण करावा. ३४ माझ्याकरितां नृत्यगायनादि, त्याचप्रमाणें स्तुतिपाठ वगैरे प्रकार करवावे. हृदयांत माझी मूर्ति ठेवून भूमीवर साष्टांग नमस्कार घालावे. ३५ मींच प्रसाद दिला आहे, अशी कल्पना करून तो मस्तकीं धारण करावा. हातांनी माझे पाय धारण करून ते भक्तिपुरस्सर मस्तकीं ठेवावे. ३६ नंतर त्या बुद्धिशाली पुरुषानें 'घोर संसारापासून माझें रक्षण कर,' असें म्हणून नमस्कार करावा. शेवटीं स्वतःच्या हृदयांतील तेजांत त्या (प्रतिमेंतील) जीवकलेचें स्मरण करून विसर्जन

१. देव भावाचा भोक्ता-' ठेवा जाणीव गुंडून । एथें भावाच प्रमाण ॥ एका अनुसरल्या काज । अवघे जाणें पंढरीराज ॥ तुका म्हणे भावावीण । अवघा बोलती तो शीण ॥' २. ऋग्वेदाच्या दहाव्या मडळातील नव्वदावें सूत्र. ३. भाताची. ४. बाजूला असणारी मंडळी. ५ 'कृष्ण कृष्ण कृपालुस्त्वमगतीनां गतिर्भव । संसारार्णवमग्नानां प्रसीद पुरुषोत्तम ॥'-पाडवगीता.

संस्मरन् ॥ ३७ ॥ एवमुक्तप्रकारेण पूजयेद्विधिवद्यदि । इहामुत्र च संसिद्धिं प्राप्नोति मदनुग्रहात् ॥ ३८ ॥ मद्भक्तो यदि मामेवं पूजां चैव दिने दिने । करोति मम सारूप्यं प्राप्नोत्येव न संशयः ॥ ३९ ॥ इदं रहस्यं परमं च पावनं मयैव साक्षात्कथितं सनातनम् । पठत्यजस्रं यदि वा शृणोति यः स सर्वपूजाफलभाङ् न संशयः ॥ ४० ॥ एवं परात्मा श्रीरामः क्रियायोगमनुत्तमम् । पृष्टः प्राह स्वभक्ताय शेषांशाय महात्मने ॥ ४१ ॥ पुनः प्राकृतवद्रामो मायामालंब्य दुःखितः । हा सीतेति वदन्नैव निद्रां लेभे कथंचन ॥ ४२ ॥ एतस्मिन्नंतरे तत्र किष्किंधायां सुबुद्धिमान् । हनूमान्प्राह सुग्रीवमेकांते कपिनायकम् ॥ ४३ ॥ शृणु राजन्प्रवक्ष्यामि तवैव हितमुत्तमम् । रामेण ते कृतः

करावे. ३७ असे मी सांगितलेल्या प्रकाराने कोणी विधियुक्त पूजन करील, तर माझ्या अनुग्रहामुळें त्याला ह्या लोकी व परलोकीही उत्तम सिद्धि प्राप्त होईल. ३८ माझा भक्त या प्रकारें प्रत्येक दिवशीं माझें पूजन करील, तर त्याला माझें सारूप्य प्राप्त होईल, यांत संशय नाही. ३९ परम गुप्त व अत्यंत पवित्र असा हा पूर्वीपासून चालत आलेला पूजनविधि तुला प्रत्यक्ष मी सांगितला जो ह्याचें नित्य पठण किंवा श्रवण करील, त्याला सर्व पूजाफल मिळेल, यांत संशय नाहीं.' ४० अशा प्रकारें शेषांश लक्ष्मणानें प्रश्न केल्यावरून, तो आपला भक्त आहे, हें जाणून, परात्म श्रीरामानें त्या महात्म्याला अत्युत्तम असा (आपला) पूजाविधि सांगितला. ४१ पुनः मायेचा आश्रय करून प्राकृत मनुष्याप्रमाणें तो दुःख करूं लागला. 'हा सीते' 'हा सीते' म्हणून तो आक्रोश करूं लागला. त्यामुळें कांहीं केल्यानें त्याला झोंप आली नाहीं. ४२ इकडे किष्किंधा नगरींत याच वेळी अत्यंत बुद्धिमान् हनुमान् वानरराज सुग्रीवाला एकांतांत म्हणाला, ४३ 'राजा (सुग्रीवा)! ऐका; मी आपल्याच हिताची गोष्ट सांगत आहें. रामानें आपल्यावर पूर्वी अत्युत्तम उपकार

१. 'अतरीं धरून माझें प्रेम । जरी हा सेविला पूजाक्रम । तरी तो देहांतीं माझेंचि धाम। पावेल बा रे निश्चित ॥ '—अध्यात्मरामकथा. २. क्वचित् स्खलन् क्वचिद् वीक्षन् क्वचिद् धावन् क्वचित् पतन् । उच्चैर्नीचैश्च विक्रोशन् 'सीता' 'सीते'तिवा वदन् ॥' भा. रा. अर. १९.

पूर्वमुपकारो ह्यनुत्तमः ॥ ४४ ॥ कृतघ्नवत्त्वया नूनं विस्मृतः प्रतिभाति मे । त्वत्कृते निहतो वाली वीरस्त्रैलोक्यसंमतः ॥ ४५ ॥ राज्ये प्रतिष्ठितोऽसि त्वं तारां प्राप्तोऽसि दुर्लभाम् । स रामः पर्वतस्याग्रे भ्रात्रा सह वसन्सुधीः ॥ ४६ ॥ त्वदागमनमेकाग्रमीक्षते कार्यगौरवात् । त्वं तु वानरभावेन स्त्रीसक्तो नावबुध्यसे ॥ ४७ ॥ करोमीति प्रतिज्ञाय सीतायाः परिमार्गणम् । न करोषि कृतघ्नस्त्वं हन्यसे वालिवद्द्रुतम् ॥ ४८ ॥ हनूमद्वचनं श्रुत्वा सुग्रीवो भयविह्वलः । प्रत्युवाच हनूमंतं सत्यमेव त्वयोदितम् ॥ ४९ ॥ शीघ्रं कुरु ममाज्ञां त्वं वानराणां तरस्विनाम् । सहस्राणि दशेदानीं प्रेषयाशु दिशो दश ॥ ५० ॥ सप्तद्वीपगतान्सर्वान्वानरानानयंतु ते । पक्षमध्ये समायांतु सर्वे वानरपुंगवाः ॥ ५१ ॥ ये पक्षमतिवर्तंते ते वध्या मे न संशयः । इत्याज्ञाप्य हनूमंतं

केला आहे. ४४ कृतघ्नाप्रमाणे आपण ता विसरलां आहां, असे मला वाटतें. आपल्याचकरितां त्रैलोक्यभर नांवाजलेला वीर जो वाली त्याचा ( रामानें ) वध केला. ४५ आपणाला त्यानें राज्यपद मिळवून दिले आहे. दुर्लभ तारेचीही आपणाला प्राप्ति झाली आहे. तो महाबुद्धिमान् राम बंधूसहवर्तमान पर्वताच्या शिखरावर राहून, ४६ आपलें मोठें कार्य ( हा सुग्रीव ) करील, या आशेनें आपल्या येण्याची वाट पाहात राहिला आहे. परंतु आपण वानरस्वभावाला अनुसरून व स्त्रीसक्त होऊन राहिल्यामुळें त्याची आपणाला जाणीव नाही. ४७ 'सीतेचा शोध लावितों,' अशी प्रतिज्ञा करून, आपण तसें केलें नाही, आपण कृतघ्न झालां, त्या अर्थी आपणही लवकरच वालीप्रमाणेंच वध पावाल.' ४८ हनुमंताचें भाषण ऐकून सुग्रीव भयविह्वल होऊन गेला. तो मारुतीला म्हणाला, 'तूं म्हटलेंस, तें बरोबर आहे. ४९ मी आज्ञा करतों, त्याप्रमाणें तूं कर. अत्यंत जलद गतीचे दहा हजार वानर दहा दिशांना आतां ताबडतोब पाठीव. ५० सातही द्वीपांत राहणाऱ्या सर्व वानरांना त्यांनी घेऊन यावें. समस्त वानरश्रेष्ठांनी पंधरा दिवसांत येथें यावें. ५१ पंधरा दिवसांबाहेर जे ( गांवी ) राहातील, त्यांचा मजकडून वध होईल, यांत

१ सदृश उतारा--' तदेवेदं धनुर्दीप्तं स एवायं शिलीमुखः । वालिन यदि ते द्रष्टुं मतिर्जाता तदुच्यताम् ॥ ' --रामायणमंजरी.

सुग्रीवो गृहमाविशत् ॥ ५२ ॥ सुग्रीवाज्ञां पुरस्कृत्य हनूमान्मंत्रिसत्तमः । तत्क्षणे प्रेषयामास हरीन्दश दिशः सुधीः ॥५३॥ अगणितगुणसत्त्वान्वायुवेगप्रचारान्वनचरगणमुख्यान् पर्वताकाररूपान् । पवनहितकुमारः प्रेषयामास दूतानातिरभसतरात्मा दानमानादितृप्तान् ॥५४॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे किष्किंधाकांडे चतुर्थः सर्गः ॥ ४ ॥

## किष्किंधाकांड, सर्ग पांचवा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ रामस्तु पर्वतस्याग्रे मणिसानौ निशामुखे । सीताविरहजं शोकमसहन्निदमब्रवीत् ॥ १ ॥ पश्य लक्ष्मण मे सीता राक्षसेन हृता बलात् । मृताऽमृता वा निश्चेतुं न जानेऽद्यापि भामिनीम् ॥ २ ॥ जीवतीति मम ब्रूयात्कश्चिद्वा प्रियकृत्स मे । यदि जानामि तां साध्वीं जीवंतीं यत्र कुत्र वा ॥ ३ ॥ हठादेवाहरिष्यामि

संशय नाही. अशा हनुमंताला आज्ञा देऊन सुग्रीव गृहकार्यांत आसक्त झाला. ५२ त्या मंत्रिसत्तम बुद्धिमान् हनुमंतानें सुग्रीवाची आज्ञा वंद्य मानून दाही दिशांकडे ताबडतोब दूत पाठविले. ५३ ( रामकार्य करण्याविषयी ) अत्यंत उत्कंठित अशा त्या वायूच्या प्रिय पुत्रानें—हनुमंतानें—अनंत गुणांचे व अपार सामर्थ्याचे, वायुगतीनें प्रचार करणारे, पर्वतासमान आकाराचे असे जे जे मुख्य वनचर—वानर—होते, त्यांस बोलावण्याकरितां दूत पाठविले. ५४"

**किष्किंधाकांड, चवथा सर्ग समाप्त.**

श्रीमहादेव म्हणाला, " एकदां संध्याकाळचे वेळी श्रीराम पर्वतावर रत्नशिखरी बसला असतां सीतेच्या विरहानें झालेला शोक असह्य होऊन बोलला, १ ' लक्ष्मणा ! पहा. माझी सीता राक्षसानें बलात्कार करून नेली आहे. ती स्त्री मेली आहे, किंवा जीवंत आहे, हें निश्चयपूर्वक मला कांहींच कळत नाही. २ कोणी येऊन ती जीवंत असल्याचें मला सांगेल, तर तो माझा प्रियकर्ता होय ( असें मी समजेन ). ती साध्वी कोठेंतरी जीवंत आहे, असें मला कळेल, ३ तर ( देवांनी

**सुधामिव पयोनिधेः । प्रतिज्ञां शृणु मे भ्रातर्येन मे जनकात्मजा ॥ ४ ॥ नीता तं भस्मसात्कुर्यां सपुत्रबलवाहनम् । हे सीते चंद्रवदने वसंती राक्षसालये ॥ ५ ॥ दुःखार्ता मामपश्यंती कथं प्राणान् धरिष्यसि । चंद्रोऽपि भानुवद्भाति मम चंद्राननां विना ॥ ६ ॥ चंद्र त्वं जानकीं स्पृष्ट्वा करैर्मां स्पृश शीतलैः । सुग्रीवोऽपि दयाहीनो दुःखितं मां न पश्यति ॥ ७ ॥ राज्यं निष्कंटकं प्राप्य स्त्रीभिः परिवृतो रहः । कृतघ्नो दृश्यते व्यक्तं पानासक्तोऽतिकामुकः ॥ ८ ॥ नायाति शरदं पश्यन्नपि मार्गयितुं प्रियाम् । पूर्वोपकारिणं दुष्टः कृतघ्नो विस्मृतो हि माम् ॥ ९ ॥ हन्मि सुग्रीवमप्येवं सपुरं सहबांधवम् । वाली यथा हतो मेऽद्य सुग्री-**

समुद्रमंथन करून ) सागरांतून अमृत काढिलें, त्याप्रमाणें, वाटेल ते श्रम करून, मी तिला आणीन. बंधो ! माझी प्रतिज्ञा ऐक. ज्या कोणी माझी जानकी नेली असेल, त्याला पुत्र, सैन्य, वाहनें या सर्वांसह भस्मसात् करून टाकीन. हे चंद्रवदने सीते ! तुला राक्षसगृहीं राहाणें प्राप्त झालें आहे. ४,५ दुःखाकुल स्थितींत मी तुझ्या दृष्टीस न पडल्यामुळें तूं प्राण कसे बरें धारण करशील ! त्या चंद्राननेवांचून चंद्रही मला सूर्यासारखा ( तापदायक ) वाटत आहे ! ६ चंद्रा ! आपल्या किरणांनीं आधीं जानकीला स्पर्श करून ते ( किरण ) शीतल झाल्यावर, मग त्यांनीं मला स्पर्श कर. सुग्रीव देखील दयाहीन झाला असून माझ्या दुःखावस्थेंत मला भेटत नाहीं ! ७ निष्कंटक असें राज्य मिळाल्यामुळें अति कामुक होऊन स्त्रियांशीं एकांतांत तो रंगून गेला आहे; तो मद्यपानांत गुंग होऊन गेला आहे. तो कृतघ्न झाल्याचें उघड दिसून येत आहे. ८ शरत्काल आल्याचें पाहात असूनही तो माझ्या प्रियेचा ( सीतेचा ) शोध करण्याला येत नाहीं. मी त्यावर पूर्वीं केलेले उपकार विसरून जाऊन तो दुष्ट कृतघ्न झाला आहे ! ९ ( राक्षसांबरोबर ) ह्या सुग्रीवाचा देखील नगर आणि बंधुवर्ग

१. एक सुंदर समानार्थक उतारा —' सौमित्रे ! ननु सेव्यतां तरुतलं चंडांशुरुज्जृंभते' । ' चंडांशोर्निशि का कथा हिमकरश्चन्द्रोयमुन्मीलति ' ॥ ' वत्सैतद्भवता कथं नु विदितं धत्ते कुरंगं यथा ' । ' क्वासि प्रेयसि हा ! कुरंगनयने ! चंद्रानने जानकि ' ॥ २. सदृश वर्णनः—' कर्णे गेयं गले मालामंके रामां मुखे सुराम् । कृत्वा विहरसि व्यक्तं सुहृत्कार्यपराङ्मुखः ' ॥ —वा. रामायण, किष्किंधा. ३०.

वोऽपि तथा भवेत् ॥ १० ॥ इति रुष्टं समालोक्य राघवं लक्ष्मणोऽब्रवीत् । इदानीमेव गत्वाहं सुग्रीवं दुष्टमानसम् ॥ ११ ॥ मामाज्ञापय हत्वा तमायास्ये राम तेंऽतिकम् । इत्युक्त्वा धनुरादाय स्वयं तूणीरमेव च ॥ १२ ॥ गंतुमभ्युद्यतं वीक्ष्य रामो लक्ष्मणमब्रवीत् । न हंतव्यस्त्वया वत्स सुग्रीवो मे प्रियः सखा ॥ १३ ॥ किंतु भीषय सुग्रीवं वालिवन्न हनिष्यसे । इत्युक्त्वा शीघ्रमादाय सुग्रीवप्रतिभाषितम् ॥ १४ ॥ आगत्य पश्चाद्यत्कार्यं तत्करिष्याम्यसंशयम् । तथेति लक्ष्मणोऽगच्छत्त्वरितो भीमविक्रमः ॥ १५ ॥ किष्किंधां प्रति कोपेन निर्दहन्निव वानरान् । सर्वज्ञो नित्यलक्ष्मीको विज्ञानात्मापि राघवः ॥ १६ ॥ सीतामनुशुशोचार्तः प्राकृतः प्राकृतामिव । बुद्ध्यादिसाक्षिणस्तस्य माया-

ह्यांसह वध करतो. वालीप्रमाणे सुग्रीवाचाही आज माझ्या हातून अंत होणार! १० अशा त्या क्रुद्ध झालेल्या रामाला पाहून लक्ष्मण म्हणाला, 'आतांच मी जाऊन त्या दुष्टहृदय सुग्रीवाचा वध करून आपल्याजवळ येतों. मला आज्ञा करा.' असें बोलून लक्ष्मणानें धनुष्य, खड्ग आणि भाता हाती घेतला. ११,१२ (सुग्रीवावर) जाण्याला उद्युक्त झालेल्या लक्ष्मणाला पाहून राम म्हणाला, 'वत्सा! त्वां सुग्रीवाचा वध करूं नये. तो माझा प्रिय मित्र आहे. १३ परंतु 'वालीप्रमाणें मारला जाऊं नकोस,' म्हणून त्याला धाक घाल, आणि त्याचें उत्तर घेऊन सत्वर ये. नंतर जें कांहीं करणें योग्य असेल, तें निस्संशय करीन.' त्यावर 'ठीक आहे,' असें म्हणून तो भीमपराक्रमी लक्ष्मण (किष्किंधेला) गेला. तो इतका संतप्त झाला होता की, हा आता सर्व वानरांना जाळून टाकतो की काय, असा भास होत होता. वस्तुतः राम सर्वज्ञ असून लक्ष्मी—माया—सर्वदा त्यासन्निध आहे. तसाच तो विज्ञानाची केवळ मूर्तिच आहे. १४,१५,१६ (असें असूनही) एकाद्या सामान्य मनुष्यानें आपल्या लौकिक पत्नीबद्दल शोक करावा, त्याप्रमाणें रामानें सीतेकरितां शोक केला. तो—राम—बुद्ध्यादिकांचा साक्षी असून मायेच्या कार्यापलीकडे—मायेस ठाव लागत

१ 'जे निष्कलंक ज्ञानघनानंद । आपणचि आपण स्वतःसिद्ध । निजरूप विशुद्ध स्वसंवेद्य ॥–' परमामृत २. ईश्वर मायेच्या कार्यापलीकडे —'त्वमाद्य पुरुष साक्षादीश्वरः प्रकृते· पर । माया व्युदस्य चिच्छक्त्या कैवल्ये स्थित आत्मनि ॥–' भागवत, स्कंध १.

**कार्यातिवर्तिनः ॥ १७ ॥ रागादिरहितस्यास्य तत्कार्यं कथमुद्भवेत् । ब्रह्मणोक्तमृतं कर्तुं राज्ञो दशरथस्य हि ॥ १८ ॥ तपसः फलदानाय जातो मानुषवेषधृक् । मायया मोहिताः सर्वे जना अज्ञानसंयुताः ॥१९॥ कथमेषां भवेन्मोक्ष इति विष्णुर्विचिंतयन् । कथां प्रथयितुं लोके सर्वलोकमलापहाम् ॥ २० ॥ रामायणाभिधां रामो भूत्वा मानुषचेष्टकः । क्रोधं मोहं च कामं च व्यवहारार्थसिद्धये ॥ २१ ॥ तत्तत्कालोचितं गृह्णन् मोहयत्यवशाः प्रजाः । अनुरक्त इवाशेषगुणेषु गुणवर्जितः ॥२२॥ विज्ञानमूर्तिर्विज्ञानशक्तिः साक्ष्यगुणान्वितः । अतः कामादिभिर्नित्यमवि-**

नाही, असा आहे. १७ तसेच रागादि–प्रेम, लोभ वगैरे–विकार त्याला मुळीच नाहीत; मग अशा ठिकाणी त्यांपासून उत्पन्न होणारा (शोक) कसा बरें संभवेल? तरी ब्रह्मदेवाचें वचन सत्य करण्याकरितां आणि दशरथ राजाला त्याच्या तपश्चर्येचें फल देण्याकरितां (देवानें) मनुष्यवेष धारण केला. सगळे लोक मायेनें मोहित असल्याकारणानें अज्ञानयुक्त आहेत. १८,१९ ह्यांना मोक्ष कसा प्राप्त होईल, ह्यासंबंधी विचार करीत असतां, सर्व लोकांची पापें जिच्या योगानें दूर होतील, अशी 'रामायण' नांवाची कथा आपण लोकांमध्यें प्रसिद्ध करावी, असें (प्रभूनें) मनांत आणिलें, आणि तदनुसार तो विष्णु रामावतार धारण करून मनुष्यरूपानें पृथ्वीवर आला. (देहभावानुरूप) काम, क्रोध, मोह हे विकार तो धारण करितो, आणि अनेक व्यवहारांच्या सिद्ध्यर्थ त्या त्या कालाला उचित असें आचरण करितो आणि अशा रीतीनें तो अवश–गुणाधीन–असणाऱ्या प्रजांना मोहवितो. तो स्वतः गुणरहित–त्रिगुणातीत–असूनही सकल गुणांच्या ठिकाणीं अनुरक्त असल्याचें भासवितो. २०,२१,२२ तो विज्ञानमूर्ति असून त्याची शक्तिही विज्ञानरूपच आहे. तो सर्वांचा साक्षी असून गुणांनी लिप्त होत नाही. म्हणून आकाशाप्रमाणें

१. मायाः—'भ्रमु तो मायेचें निजमूळ। भ्रांतिजळें हे शाड्ळ। भुली हें इचे साजुक फळ। विषय रसाळ सदा फळित ॥'–एकनाथी भागवत ३. २. 'तया (मायया) विलसितेष्वेषु गुणेषु गुणवानिव। अतः प्रविष्ट आभाति विज्ञानेन विजृंभितः' ॥ भागवत स्कंध २. ३. 'अगा आकाश कें नाही। हें न रिघेचि कवणे ठायीं। परी कायिसेनी कहीं। गादिजेना ॥ तैसा सर्वत्र सर्व देहीं। आत्मा असतुचि असे पाहीं। परी संगदोषें एकेंही। लिप्त नोहे'॥—ज्ञानेश्वरी १२

**लिप्तो यथा नभः ॥ २३ ॥ विंदंति मुनयः केचिज्ज्ञानंति सनकादयः । तद्भक्ता निर्मलात्मानः सम्यज्ज्ञानंति नित्यदा ॥ २४ ॥ भक्तचित्तानुसारेण जायते भगवानजः । लक्ष्मणोऽपि तदा गत्वा किष्किंधानगरांतिकम् ॥ २५ ॥ ज्याघोषमकरोत्तीव्रं भीषयन् सर्ववानरान् । तं दृष्ट्वा प्राकृतास्तत्र वानरा वप्रमूर्धनि ॥ २६ ॥ चक्रुः किलकिलाशब्दं धृतपाषाणपादपाः । तान्दृष्ट्वा क्रोधताम्राक्षो वानरान् लक्ष्मणस्तदा ॥२७॥ निर्मूलान्कर्तुमुद्युक्तो धनुरानम्य वीर्यवान् । ततः शीघ्रं समापत्य ज्ञात्वा लक्ष्मणमागतम् ॥ २८ ॥ निवार्य वानरान् सर्वानंगदो मंत्रिसत्तमः । गत्वा लक्ष्मणसामीप्यं प्रणनाम स दंडवत् ॥ २९ ॥ ततोंऽगदं परिष्वज्य लक्ष्मणः प्रियवर्धनः । उवाच वत्स गच्छ त्वं पितृव्याय निवेदय ॥ ३० ॥ मामागतं राघवेण चोदितं रौद्रमूर्तिना । तथेति त्वरितं**

कामादि विकारांचा त्याला कधीही लेप होत नाहीं. २३ त्याचें ज्ञान सनकादिक[1] कांही मुनींना होतें, आणि तेच त्याला प्राप्त करून घेतात. निर्मल अंतःकरणाचे त्याचे भक्तही त्याला सर्वदा उत्तम प्रकारें जाणतात. २४ भगवान् स्वतः अज—जन्मरहित— असून भक्तांच्या इच्छेनुसार जन्म घेतो. ( इकडे ) लक्ष्मणानेंही किष्किंधा नगरीच्या जवळ जाऊन, २५ चापाचा भयकर टणत्कार केला आणि सर्व वानरांना भयभीत करून सोडलें. त्याला पाहून टेंकाडाच्या शिखरावर बसलेल्या प्राकृत वानरांनी पाषाण आणि वृक्ष हातांत घेऊन मोठा किलकिलाट केला. त्या वेळीं त्यांना पाहून लक्ष्मण क्रोधतप्त होऊन त्याचे डोळे लाल झाले. २६,२७ तो वीर्यशाली ( लक्ष्मण ) धनुष्यावर दोरी चढवून त्या वानरांचें निर्मूलन करण्यास सिद्ध झाला. इतक्यांत लक्ष्मण आला आहे, असें जाणून मंत्रिश्रेष्ठ अंगदानें तत्काल त्या सर्व वानरांचें निवारण केलें, आणि लक्ष्मणाजवळ जाऊन त्याला साष्टांग नमस्कार केला. २८,२९ तेव्हा प्रियजनांच्या कल्याणकर्त्या त्या लक्ष्मणानें अंगदाला आलिंगन दिलें, आणि म्हटलें, 'वत्सा ! जा आणि आपल्या चुलत्याला[2] कळीव की, ३० 'राम क्रोधसंतप्त झाला आहे, त्याच्या सांगण्यावरून मी येथें आलों आहें.' 'बरें आहे.'

१. हा ब्रह्मदेवाच्या चार पुत्रांपैकीं एक होता. २. सुग्रीवाला.

गत्वा सुग्रीवाय न्यवेदयत् ॥ ३१ ॥ लक्ष्मणः क्रोधताम्राक्षः पुरद्वारि बहिःस्थितः । तच्छ्रुत्वातीव संत्रस्तः सुग्रीवो वानरेश्वरः ॥३२॥ आहूय मंत्रिणां श्रेष्ठं हनूमंतमथाऽब्रवीत् । गच्छ त्वमंगदेनाशु लक्ष्मणं विनयान्वितः ॥३३॥ सांत्वयन्कोपितं वीरं शनैरानय सादरम् । प्रेषयित्वा हनूमंतं ताराम्राह कपीश्वरः ॥३४॥ त्वं गच्छ सांत्वयंती तं लक्ष्मणं मृदुभाषितैः। शांतमंतःपुरं नीत्वा पश्चाद्दर्शय मेऽनघे ॥ ३५ ॥ भवत्विति ततस्तारा मध्यकक्षं समाविशत् । हनूमानंगदेनैव सहितो लक्ष्मणांतिकम् ॥ ३६ ॥ गत्वा ननाम शिरसा भक्त्या स्वागतमब्रवीत् । एहि वीर महाभाग भवद्गृहमशंकितम् ॥ ३७ ॥ प्रविश्य राजदारादीन् दृष्ट्वा सुग्रीवमेव च । यदाज्ञापयसे पश्चात्तत्सर्वं करवाणि भो ॥ ३८ ॥ इत्युक्त्वा लक्ष्मणं भक्त्या करे गृह्य स मारुतिः । आनयामास नगरमध्याद्राजगृहं प्रति ॥ ३९ ॥ पश्यंस्तत्र महासौधान् यूथपानां समंततः । जगाम भवनं

असें म्हणून सुग्रीवाकडे त्वरित जाऊन अंगदानें झालेला सर्व वृत्तांत त्याला कळविला. ३१ (तो म्हणाला) 'बाहेर पुरद्वारी लक्ष्मण येऊन राहिला आहे. त्याचे डोळे क्रोधानें लाल झाले आहेत.' तें ऐकून तो वानरराज सुग्रीव भयभीत झाला. ३२ मंत्रिश्रेष्ठ हनुमंताला बोलावून तो म्हणाला, 'तूं अंगदाला बरोबर घेऊन लक्ष्मणाकडे लवकर जा, आणि विनयपूर्वक त्या क्रोधसंतप्त वीराचें गोड शब्दांनीं सांत्वन करून त्याला हळूच माझ्या मंदिरीं घेऊन ये.' (अशा रीतीनें) हनुमंताला पाठवून कपिश्रेष्ठ (सुग्रीव) तारेला म्हणाला, ३३,३४ 'अनघे ! तूं जा, आणि आपल्या मधुर वचनांनीं त्या लक्ष्मणाचें सांत्वन कर, आणि शांत झाल्यावर त्याला अंतःपुरांत आणून मला भेटीव.' ३५ 'ठीक आहे' असें म्हणून तारा मधल्या दालनांत आली. इतक्यांत अंगदासहवर्तमान हनुमान लक्ष्मणाजवळ आला. त्यानें भक्तिपूर्वक शिरसा वंदन करून लक्ष्मणाचें स्वागत केलें आणि म्हटलें 'महाभाग वीरा ! हें आपलेंच घर आहे. शंका न धरतां आपण आंत यावें, आणि राजपत्न्यादिकांना व सुग्रीवाला भेटावें. नंतर आपण आज्ञा कराल, त्याप्रमाणें मी करीन.' ३६,३७,३८ असें बोलून मारुतीनें भक्तिपुरस्सर लक्ष्मणाला हातीं धरिलें, आणि नगरामधून (मिरवीत) त्याला राजवाड्यांत आणविलें. ३९ चारी बाजूंनीं वानरनायकांचे मोठमोठे वाडे पाहात पाहात तो लक्ष्मण दुसरें इंद्रमंदिरच कीं काय, अशा त्या राज-

राज्ञः सुरेंद्रभवनोपमम् ॥ ४० ॥ मध्यकक्षे गता तत्र तारा ताराधिपानना । सर्वाभरणसंपन्ना मदरक्तांतलोचना ॥ ४१ ॥ उवाच लक्ष्मणं नत्वा स्मितपूर्वाभिभाषिणी । याहि देवर भद्रं ते साधुस्त्वं भक्तवत्सलः ॥ ४२ ॥ किमर्थं कोपमाकार्षीर्भक्ते भृत्ये कपीश्वरे । बहुकालमनाश्वासं दुःखमेवानुभूतवान् ॥ ४३ ॥ इदानीं बहुदुःखौघाद्भवद्भिरभिरक्षितः । भवत्प्रसादात्सुग्रीवः प्राप्तसौख्यो महामतिः ॥ ४४ ॥ कामासक्तो रघुपतेः सेवार्थं नागतो हरिः । आगमिष्यंति हरयो नानादेशगताः प्रभो ॥ ४५ ॥ प्रेषिता दशसाहस्रा हरयो रघुसत्तम । आनेतुं वानरान् दिग्भ्यो महापर्वतसन्निभान् ॥ ४६ ॥ सुग्रीवः स्वयमागत्य सर्ववानरयूथपैः । वधयिष्यति दैत्यौघान् रावणं च हनिष्यति ॥ ४७ ॥ त्वयैव

मंदिरीं गेला. ४० तेथें मधल्या दालनांत चंद्रवदना तारा सर्व अलंकार अंगावर घालून बसली होती. तिचे नेत्रप्रांत (तारुण्य) मदानें रक्त दिसत होते. ४१ लक्ष्मणाला नमस्कार करून स्मितपूर्वक ती म्हणाली, 'भावोजी ! या, तुमचें कल्याण असो. तुम्ही सत्पुरुष असून भक्तजनांवर अत्यंत कृपा करणारे आहां. ४२ वानरराज–सुग्रीव–तुमचा भक्त व सेवक आहे; त्याजवर तुम्ही कां कोप केला आहे ? विश्रांतिरहित त्यानें फार दिवस केवळ दुःख अनुभवलें आहे. ४३ आपण त्याला आतां मोठ्या दुःखसमूहापासून रक्षिलें आहे. आपल्या कृपेनें या महामति सुग्रीवाला सौख्यप्राप्ति झाली आहे. ४४ जातीनें वानर असल्यामुळें अर्थातच विषयासक्त होऊन रघुपतीच्या सेवेला आला नाही. (तरी) प्रभो ! नानादेशीं असलेले वानर ( आतां ) येतील. ४५ रघुसत्तमा ! महापर्वतसमान (मोठमोठ्या) वानरांना वेगवेगळ्या दिशांहून आणण्याकरितां दहा हजार वानर पाठविले आहेत. ४६ सुग्रीव स्वतः येईल, आणि सर्व वानरसेनापतींकडून दैत्यसमुदायांचा नाश करवील, आणि रावणाचा वध करील ४७ वानरश्रेष्ठ ( सुग्रीव )

१. सदृश उतारा—( १ ) ' नायं लक्ष्मण कोपस्य वचसः परुषस्य च । अहं सुहृत् कपिपतिं सर्वथा प्रणयी तव ॥ '–रामायणमंजरी. ( २ ) सत्त्वयुक्ता हि पुरुषास्त्वद्विधा. पुरुषर्षभ । अविमृश्य न रोषस्य सहसा यान्ति वश्यताम ' ॥–वा. रामायण, किष्किंधा. ३५.

सहितोऽद्यैव गंता वानरपुंगवः। पश्यांतभेवनं तत्र पुत्रदारसुहृद्वृतम्
॥ ४८ ॥ दृष्ट्वा सुग्रीवमभयं दत्त्वा नय सहैव ते। ताराया वचनं श्रुत्वा
कृशक्रोधोऽथ लक्ष्मणः ॥ ४९ ॥ जगामांतःपुरं यत्र सुग्रीवो वानरेश्वरः।
रुमामालिंग्य सुग्रीवः पर्यंके पर्यवस्थितः ॥ ५० ॥ दृष्ट्वा लक्ष्मणमत्यर्थ-
मुत्पपाताातिभीतवत्। तं दृष्ट्वा लक्ष्मणः क्रुद्धो मदविह्वलितेक्षणम्
॥ ५१ ॥ सुग्रीवं प्राह दुर्वृत्त विस्मृतोऽसि रघूत्तमम्। वाली येन हतो
वीरः स बाणोऽद्य प्रतीक्षते ॥ ५२ ॥ त्वमेव वालिनो मार्गं गमिष्यासि
मया हतः। एवमत्यंतपरुषं वदंतं लक्ष्मणं तदा ॥ ५३ ॥ उवाच हनु-
मान् वीरः कथमेवं प्रभाषसे। त्वत्तोऽधिकतरो रामे भक्तोऽयं वानरा-
धिपः ॥ ५४ ॥ रामकार्यार्थमनिशं जागर्ति न तु विस्मृतः। आगताः
परितः पश्य वानराः कोटिशः प्रभो ॥ ५५ ॥ गमिष्यंत्यचिरेणैव
सीतायाः परिमार्गणम्। साधयिष्यति सुग्रीवो रामकार्यमशेषतः ॥५६॥

आपल्याबरोबर आजच ( रामाकडे ) येईल. आमचें अंतःपुर पहा, तेथें पुत्र, स्त्री, इष्टमंडळी ह्यांनी वेष्टित असलेल्या सुग्रीवाला आपण भेटावें, आणि त्याला अभयवचन देऊन आपल्याबरोबर न्यावें. ४८ तारेचें भाषण ऐकून लक्ष्मणाचा कोप शांत झाला. मग अंतःपुरांत जेथें सुग्रीव बसला होता, तेथें तो गेला. ४९ रुमेला आलिंगन देऊन सुग्रीव पलगावर बसला होता. लक्ष्मणाला पाहून अत्यंत भयभीत होऊन तो उठला. ५० (मद्य) मदानें धुंद डोळे झाले आहेत, अशा स्थितीत त्याला—सुग्रीवाला—पाहून लक्ष्मण क्रुद्ध होऊन गेला. तो सुग्रीवाला म्हणाला, ‘ दुष्टा ! तूं रघूत्तमाला विसरलास ना? ५१ वाली ज्या बाणानें मारला गेला, तोच बाण आज तुझी वाट पाहात आहे. माझ्याचकडून तूं मारला जाऊन वालीच्या मार्गाला जाणार !’ ५२ अशा प्रकारें अत्यंत कठोर भाषण लक्ष्मण करीत असतां, वीर हनुमान् त्याला म्हणाला, ‘ आपण असें कसें म्हणतां ? ५३ रामाच्या ठायीं आपल्याहूनही अधिक भक्ति ह्या वानरराजाची आहे. रामकार्याकरितां तो सदासर्वदा तत्पर आहे. तो विसरला नाहीं. ५४ प्रभो ! चोहोंकडून कोट्यवधि वानर आले आहेत, पहा. ५५ ते लवकरच सीतेच्या शोधाकरितां जातील. रामाचें कार्य सुग्रीव पूर्णपणें शेवटाला नेईल.’ ५६

१. ‘ नासत्यवादी न शठा न कृतघ्ना न दुर्जन· । सुग्रीवो रामकार्येऽसौ योगीव ध्यानानेश्चल. ॥ ’ —रामायणमजरी.

श्रुत्वा हनुमतो वाक्यं सौमित्रिर्लज्जितोऽभवत् । सुग्रीवोऽप्यर्घ्यपाद्याद्यैर्लक्ष्मणं समपूजयत् ॥ ५७ ॥ आलिंग्य प्राह रामस्य दासोऽहं तेन रक्षितः । रामः स्वतेजसा लोकान् क्षणार्धेनैव जेष्यति ॥ ५८ ॥ सहायमात्रमेवाहं वानरैः सहितः प्रभो । सौमित्रिरपि सुग्रीवं प्राह किंचिन्मयोदितम् ॥ ५९ ॥ तत्क्षमस्व महाभाग प्रणयाद्भाषितं मया । गच्छामोऽद्यैव सुग्रीव रामस्तिष्ठति कानने ॥ ६० ॥ एक एवातिदुःखार्तो जानकीविरहात्प्रभुः । तथेति रथमारुह्य लक्ष्मणेन समन्वितः । वानरैः सहितो राजा राममेवान्वपद्यत ॥ ६१ ॥ भेरीमृदंगैर्बहुऋक्षवानरैः श्वेतातपत्रैर्व्यजनैश्च शोभितः ॥ नीलांगदाद्यैर्हनुमत्प्रधानैः समावृतो राघवमभ्यगाद्धरिः ॥ ६२ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे किष्किंधाकांडे पंचमः सर्गः ॥ ५ ॥

हे हनुमंताचे भाषण ऐकून लक्ष्मण लज्जित झाला. सुग्रीवानें सुद्धां अर्घ्यपाद्यादिकांनी लक्ष्मणाचें पूजन केलें. ५७ त्यानें लक्ष्मणाला आलिंगन दिलें, आणि म्हटलें, ‘मी रामाचा दास असून त्यानें माझें रक्षण केलें आहे. राम आपल्या तेजानें सगळ्या लोकांना एका क्षणार्धांत जिंकील. ५८ समर्था ! वानरांसह मी त्याचा केवळ नांवाचा साह्यकारी आहें.’ लक्ष्मणही सुग्रीवाला म्हणाला, ‘मी जें कांही थोडें तुला बोललों असेन, ५९ त्याची हे महाभागा ! मला क्षमा कर. तें प्रेमाचें भाषण होतें. सुग्रीवा ! जानकीविरहानें अत्यंत दुःखाकुल होऊन प्रभु राम अरण्यांत एकटाच बसला आहे, तेथें आपण जाऊं.’ ‘होय’ असें म्हणून लक्ष्मणासह राजा सुग्रीव रथांत बसला, आणि वानराना बरोबर घेऊन रामाकडे गेला. ६०, ६१ भेरी, मृदंग, अनेक अस्वलें, वानर, शुभ्र छत्रें, चवऱ्या ह्यांच्या योगें शोभायमान, आणि नीळ, अंगदांसमान मारुतिप्रभृति वानरांनी वेष्टित असा तो वानर सुग्रीव रामाकडे आला. ६२”

**किष्किंधाकांड, सर्ग पांचवा समाप्त.**

## किष्किंधाकांड, सर्ग सहावा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ दृष्ट्वा रामं समासीनं गुहाद्वारि शिलातले । चैलाजिनधरं श्यामं जटामौलिविराजितम् ॥ १ ॥ विशालनयनं शांतं स्मितचारुमुखांबुजम् । सीताविरहसंतप्तं पश्यंतं मृगपक्षिणः ॥ २ ॥ रथाद्दूरात्समुत्पत्य वेगात्सुग्रीवलक्ष्मणौ । रामस्य पादयोरग्रे पेततुर्भक्तिसंयुतौ ॥ ३ ॥ रामः सुग्रीवमालिंग्य पृष्ट्वानामयमंतिके । स्थापयित्वा यथान्यायं पूजयामास धर्मवित् ॥ ४ ॥ ततोऽब्रवीद्रघुश्रेष्ठं सुग्रीवो भक्तिनम्रधीः । देव पश्य समायातीं वानराणां महाचमूम् ॥ ५ ॥ कुलाचलाद्रिसंभूता मेरुमंदरसन्निभाः । नानाद्वीपसरिच्छैलवासिनः पर्वतोपमाः ॥ ६ ॥ असंख्याताः समायांति हरयः कामरूपिणः । सर्वे

श्रीमहादेव म्हणाला, "श्रीराम वल्कल व अजिन परिधान करून गुहाद्वारी शिलातलावर बसला होता. त्याच्या श्याम शरीरावर जटामुकुटानें शोभा आली होती. त्याचे डोळे विशाल आणि चेहरा शांत होता. त्याच्या मुखकमलावर हास्य झळकत होतें. सीताविरहानें संतप्त होऊन तो पशुपक्ष्यांकडे पाहात राहिला होता. (अशा स्थितीत) त्याला दुरून पाहून सुग्रीव आणि लक्ष्मण यांनी लागलेच रथांतून उतरून भक्तिपूर्वक त्याच्या चरणांपुढें साष्टांग वंदन केलें. २,३ धर्मज्ञ रामानें सुग्रीवाला आलिंगन दिलें, कुशल विचारिलें, आणि जवळ बसवून त्याचा यथायोग्य आदरसत्कार केला. ४ (रामविषयक) भक्तीच्या योगानें हृदयांत नम्रता उत्पन्न झाल्यामुळें तो सुग्रीव विनयपूर्वक रघुश्रेष्ठ रामाला म्हणाला, 'देवा! ही पहा वानरांची (केवढी) मोठी सेना येत आहे. ५ यांपैकी कोणी कुलाचलनामक पर्वतावर जन्मलेले असून देहानें मेरुमंदर (पर्वतां)समान आहेत. दुसरे कित्येक अनेक बेटें, नद्या, पर्वत यांवर राहणारे असून आकारानें पर्वतांसमान आहेत. ६ इच्छेस येईल तें रूप धारण करणारे असे असंख्यात वानर येत आहेत. हे सर्व

१. कुलाचल—मुख्य पर्वत हे एकंदर सात आहेत. 'महेंद्रो मलयः सह्यः शुक्तिमान् ऋक्षपर्वतः । विन्ध्यश्च पारियात्रश्च सप्तैते कुलपर्वताः ॥'

वचनं चेदमब्रवीत् ॥ २४ ॥ विचिन्वंतु प्रयत्नेन भवंतो जानकीं शुभाम् । मासादर्वाङ्निवर्तध्वं मच्छासनपुरःसराः ॥ २५ ॥ सीतामदृष्ट्वा यदि वो मासादूर्ध्वं दिनं भवेत् । तदा प्राणांतिकं दंडं मत्तः प्राप्स्यथ वानराः ॥ २६ ॥ इति प्रस्थाप्य सुग्रीवो वानरान् भीमविक्रमान् । रामस्य पार्श्वे श्रीरामं नत्वा चोपविवेश सः ॥ २७ ॥ गच्छंतं मारुतिं दृष्ट्वा रामो वचनमब्रवीत् । अभिज्ञानार्थमेतन्मे ह्यंगुलीयकमुत्तमम् ॥२८॥ मन्नामाक्षरसंयुक्तं सीतायै दीयतां रहः। अस्मिन् कार्ये प्रमाणं हि त्वमेव कपिसत्तम। जानामि सत्त्वं ते सर्वं गच्छ पंथाः शुभस्तव॥२९॥ एवं कपीनां राज्ञा ते विसृष्टाः परिमार्गणे। सीताया अंगदमुखा बभ्रमुस्तत्र तत्र ह ॥३०॥ भ्रमंतो विंध्यगहने ददृशुः पर्वतोपमम । राक्षसं भीषणाकारं भक्ष-

२२,२३,२४ 'तुम्ही प्रयत्नपूर्वक जानकी सतीचा शोध लावावा, आणि माझी आज्ञा लक्ष्यांत ठेवून एक महिन्याच्या आंत सर्वांनी परत यावें. २५ सीतेचा शोध न लावतां महिन्यापलीकडे एक दिवस जरी तुमचा जाईल, तरी त्याबद्दल, हे वानरांनो! तुम्हांला मजपासून मरणाची शिक्षा मिळेल.' २६ या प्रकारें महापराक्रमी वानरांना (देशोदेशी) पाठवून सुग्रीव रामाला वंदन करून त्याच्या जवळ बसला. २७ मारुति जात आहे, असें पाहून राम त्याला म्हणाला, 'माझ्या नांवाची (कोरलेली) अक्षरें असलेली ही सुंदर आंगठी खुणेकरितां म्हणून सीतेला एकांतांत दे. हे कपिश्रेष्ठा! ह्या (माझ्या) कार्यात तूच प्रमाण–सर्वकर्ता–आहेस. तुझें बल केवढें आहे तें मला ठाऊक आहे. तूं जा, तुला मार्ग सुखकारक होवो.' २८,२९ अशा प्रकारें कपिराजानें पाठविलेले अंगद वगैरे वानर सीतेच्या शोधाचे कामीं सर्वत्र भ्रमण करूं लागले. ३० फिरतां फिरतां विंध्यारण्यामध्यें पर्वतासारख्या भयंकर

१. विंध्य–सात कुलपर्वतापैकी एक त्याच्या विषयीं अशी आख्यायिका आहे कीं, मेरुपर्वताप्रमाणे आपल्याही सभोवती सूर्यानें फिरावे, अशी विंध्याचलास इच्छा होऊन तसे करण्याविषयीं त्यानें सूर्यास सांगितले परंतु ही गोष्ट सूर्यानें कबूल केली नाहीं. त्यावरून सूर्यचंद्राचा मार्ग अडविण्याचा उद्देशाने विंध्य सारखा वाढू लागला, त्यामुळें देव भयभीत झाले. पुढें देवाच्या विनंतीवरून अगस्त्य विंध्याकडे गेला व मी दक्षिण दिशेला जात आहे, तरी तूं ठेंगणा होऊन मला वाट द्यावी, व मी परत येईपर्यंत तसेच रहावें अशी विनंति अगस्त्यानें केली व ती विंध्याचलाने मान्य केली. पुढें अगस्त्य गेला तो पुनः आला नाही, व विंध्याचलही वाढला नाहीं.

यंतं मृगान् गजान् ॥३१॥ रावणोऽयमिति ज्ञात्वा केचिद्वानरपुंगवाः। जघ्नुः
किलकिलाशब्दं मुंचंतो मुष्टिभिः क्षणात् ॥ ३२ ॥ नायं रावण इत्यु-
क्त्वा ययुरन्यन्महद्वनम्। तृषार्ताः सलिलं तत्र नाविंदन् हरिपुंगवाः
॥ ३३ ॥ विभ्रमंतो महारण्ये शुष्ककंठोष्ठतालुकाः। ददृशुर्गह्वरं तत्र
तृणगुल्मावृतं महत् ॥ ३४ ॥ आर्द्रपक्षान् क्रौंचहंसान्निःसृतान्ददृशुस्ततः।
अत्रास्ते सलिलं नूनं प्रविशामो महागुहाम् ॥ ३५ ॥ इत्युक्त्वा हनुमा-
नग्रे प्रविवेश तमन्वयुः। सर्वे परस्परं धृत्वा बाहून्बाहुभिरुत्सुकाः॥३६॥
अंधकारे महद्दूरं गत्वाऽपश्यन् कपीश्वराः। जलाशयान्मणिनिभतोयान
कल्पद्रुमोपमान् ॥ ३७ ॥ वृक्षान्पक्वफलैर्नम्रान्मधुद्रोणसमन्वितान्।
गृहान् सर्वगुणोपेतान् मणिवस्त्रादिपूरितान् ॥ ३८ ॥ दिव्यभक्ष्यान्नस-

आकाराचा व मृग, हत्ती इत्यादि पशु भक्षण करणारा एक राक्षस त्यांच्या दृष्टीस पडला. ३१ हा रावण असावा, असें कित्येक वानरवीरांस वाटून त्यांनी किलकिलाट शब्दात मुष्टिप्रहारांनी त्याचा एका क्षणात वध केला. ३२ नंतर 'हा रावण नाही,' असें म्हणून ते दुसऱ्या एका मोठ्या वनात गेले. त्या वानरश्रेष्ठांना अत्यंत तहान लागली होती, त्यांस तेथे पाणी कोठेंही मिळालें नाही. ३३ त्या महारण्यांत भ्रमण करीत असतां त्यांचा कंठ, ओष्ठ आणि तालु हीं शुष्क होऊन गेली. शेवटी गवत व झुडपें यांनीं आच्छादित अशी एक मोठी गुहा त्यांच्या नजरेस पडली. ३४ तीतून ज्यांचे पंख भिजलेले आहेत, असे क्रौंच व हंस पक्षी बाहेर आलेले त्यांनी पाहिले. त्यावरून 'येथें पाणी असलेंच पाहिजे. आपण या महागुहेंत शिरूं या,' ३५ असें म्हणून हनुमान् प्रथमतः आंत शिरला. त्यामागून बाहूंनी परस्परांचे बाहू धरून सगळे जण उत्सुकतेनें आंत गेले. ३६ अंधारांतून बरेंच लांब गेल्यावर स्फटिकतुल्य उदकानें पूर्ण अशी सरोवरें त्या वानराधिपतीच्या दृष्टीला पडली. तसेच पक्व फलांच्या भारानें लवलेले, द्रोणं मापानें मकरंद स्रवणारे, कल्पवृक्षांसमान अनेक वृक्ष तेथें होते. त्याचप्रमाणें सकल साधनांनी युक्त, रत्नवस्त्रादिकांनीं भरलेली, दिव्य भक्ष्य पदार्थांनी सिद्ध, परंतु मनुष्यरहित अशी घरेंही त्या ठिकाणी त्यांच्या नजरेस आली. तें पाहून

१. एक माप. द्रोण म्हणजे चार आढक होतात. 'अष्टमुष्टिर्भवेत् कुंचिः कुंचयोऽष्टौ तु पुष्कलं। पुष्कलानि च चत्वारि आढकः परिकीर्तितः'

हितान्मानुषैः परिवर्जितान् । विस्मितास्तत्र भवने दिव्ये कनकविष्टरे
॥ ३९ ॥ प्रभया दीप्यमानां तु ददृशुः स्त्रियमेकलाम् । ध्यायंतीं चीर-
वसनां योगिनीं योगमास्थिताम् ॥ ४० ॥ प्रणेमुस्तां महाभागां भक्त्या
भीत्या च वानराः । दृष्ट्वा तान्वानरान्देवी प्राह यूयं किमागताः ॥४१॥
कुतो वा कस्य दूता वा मत्स्थानं किं प्रधर्षथ । तच्छ्रुत्वा हनुमानाह
शृणु वक्ष्यामि देवि ते ॥ ४२ ॥ अयोध्याधिपतिः श्रीमान् राजा दश-
रथः प्रभुः । तस्य पुत्रो महाभागो ज्येष्ठो राम इति श्रुतः ॥ ४३ ॥
पितुराज्ञां पुरस्कृत्य सभार्यः सानुजो वनम् । गतस्तत्र हृता भार्या तस्य
साध्वी दुरात्मना ॥ ४४ ॥ रावणेन ततो रामः सुग्रीवं सानुजो ययौ ।
सुग्रीवो मित्रभावेन रामस्य प्रियवल्लभाम् ॥ ४५ ॥ मृगयध्वमिति प्राह
ततो वयमुपागताः । ततो वनं विचिन्वंतो जानकीं जलकांक्षिणः॥४६॥
प्रविष्टा गह्वरं घोरं दैवादत्र समागताः । त्वं वा किमर्थमत्रासि का वा

(ते सर्व वानर) आश्चर्यचकित झाले. तेथें (एका) मंदिरामध्यें दिव्य सुवर्णासनावर ध्यान करीत बसलेली एक योगिनी स्त्री त्यांनी पाहिली. तिची कांति उज्ज्वल होती; तिनें वल्कल परिधान केलें होतें. ती अंतर्ध्यानी रंगून गेली होती. ३७,३८,३९,४०
त्या महाभाग्यशाली स्त्रीला भीतभीत परंतु भक्तिपूर्वक त्या वानरांनीं नमस्कार केला. त्या वानरांना पाहून ती देवी त्यांना म्हणाली, ‘ तुम्ही कशाकरितां आलां आहां ?
४१ तुम्ही कोठून आलां आहां व तुम्ही कोणाचे दूत आहां ? (येथें येऊन) या माझ्या स्थानाला तुम्ही कां त्रास देत आहां ?’ तें ऐकून हनुमंत म्हणाला, ‘ देवि ! मी सांगतों, तें ऐक. ४२ दशरथ नांवाचा ऐश्वर्यसंपन्न व अतिसमर्थ असा, अयोध्येचा राजा होता. त्याचा भाग्यशाली ज्येष्ठ पुत्र राम नांवानें प्रसिद्ध आहे. ४३
पित्याची आज्ञा मान्य करून पत्नी आणि कनिष्ठ बंधु यांसह तो वनास गेला असतां दुष्ट रावणानें त्याच्या साध्वी स्त्रीचें हरण केलें. नंतर राम कनिष्ठ बंधूसहवर्तमान सुग्रीवाकडे आला. सुग्रीवानें मित्रभावास्तव ‘ रामभार्येचा शोध लावा,’ म्हणून सांगितलें. त्यावरून आम्ही वनांत जानकीचा शोध करीत* असतां तहान लागून पाण्याची इच्छा केली, तों दैवयोगानें या भयंकर गुहेंत शिरलों. हे कल्याणिनि !

त्वं वद नः शुभे ॥ ४७ ॥ योगिनी च तथा दृष्ट्वा वानरान् प्राह हृष्टधीः । यथेष्टं फलमूलानि जग्ध्वा पीत्वामृतं पयः ॥ ४८ ॥ आगच्छत ततो वक्ष्ये मम वृत्तांतमादितः । तथेति भुक्त्वा पीत्वा च हृष्टास्ते सर्ववानराः ॥ ४९ ॥ देव्याः समीपं गत्वा ते बद्धांजलिपुटाः स्थिताः । ततः प्राह हनूमंतं योगिनी दिव्यदर्शना ॥ ५० ॥ हेमा नाम पुरा दिव्यरूपिणी विश्वकर्मणः । पुत्री महेशं नृत्येन तोषयामास भामिनी ॥ ५१ ॥ तुष्टो महेशः प्रददाविदं दिव्यपुरं महत् । अत्र स्थिता सा सुदती वर्षाणामयुतायुतम् ॥ ५२ ॥ तस्या अहं सखी विष्णुतत्परा मोक्षकांक्षिणी । नाम्ना स्वयंप्रभा दिव्यगंधर्वतनया पुरा ॥ ५३ ॥ गच्छंती ब्रह्मलोकं सा मामाहेदं तपश्चर । अत्रैव निवसंती

तूं काण आणि येथें कां राहात आहेस, तें आम्हांला सांग. ४४,४५,४६,४७ वानरांना तेथें पाहून त्या योगिनीला संतोष वाटला. ते भुकेलेले जाणून ती म्हणाली, ‘फळें व मूळें यथेच्छ भक्षण करा, व अमृतासारखें गोड पाणी प्या. ४८ नंतर इकडे या, मग मी माझा वृत्तांत मुळापासून तुम्हांला सांगेन.’ ‘ठीक आहे,’ असें म्हणून त्या सर्व वानरांनी फलभक्षण व उदकप्राशन केलें. त्यांना आनंद वाटला. ४९ नंतर देवीजवळ जाऊन ते हात जोडून उभे राहिले. तेव्हां ती दिव्यरूपधारिणी योगिनी हनुमंताला म्हणाली, ५० ‘पूर्वी विश्वकर्म्याची हेमा नांवाची अत्यंत रूपवती अशी एक कन्या होती. त्या स्त्रीनें आपल्या नृत्यानें शंकराला संतुष्ट केलें. ५१ शंकरानें प्रसन्न होऊन तिला हें मोठें दिव्य[1] नगर अर्पण केलें. ती सुंदरी हजारों वर्षसहस्रकालपर्यंत येथें राहिली. ५२ मी तिची मैत्रीण म्हणून असें. मोक्षाची इच्छा धरून मी विष्णूच्या आराधनेंत तत्पर असत्यें. मी दिव्यनामक गंधर्वाची कन्या असून माझें नांव स्वयंप्रभा आहे. ५३ ब्रह्मलोकीं जातांना हेमा मला म्हणाली, ‘तूं येथें राहून तप कर. येथें कोणतेही प्राणी

१. ह्या नगराचें वर्णन एकनाथांनीं पुढीलप्रमाणें केलें आहे —‘हेममय तेथींची क्षिती। हेममय अवघ्या भिंती। हेमदीपिका हेमदीप्ती। पात्रपंक्ती हेममय ॥ विवरीं धनधान्यसमृद्धी। विवरीं परमामृतनदी। विवरामाजी ऋद्धिसिद्धी। सुख त्रिशुद्धि वानरा ॥’—भावार्थ रामायण, किष्किंधाकांड १५.

**त्वं सर्वप्राणिविवर्जिते ॥ ५४ ॥ त्रेतायुगे दाशरथिर्भूत्वा नारायणोऽव्ययः । भूभारहरणार्थाय विचरिष्यति कानने ॥ ५५ ॥ मार्गंतो वानरास्तस्य भार्यामायांति ते गुहाम् । पूजयित्वाथ तान् गत्वा रामं स्तुत्वा प्रयत्नतः ॥ ५६ ॥ यातासि भवनं विष्णोर्योगिगम्यं सनातनम् । इतोऽहं गंतुमिच्छामि रामं द्रष्टुं त्वरान्विता ॥ ५७ ॥ यूयं पिदध्वमक्षीणि गमिष्यथ बहिर्गुहाम् । तथैव चक्रुस्ते वेगाद्गताः पूर्वस्थितं वनम् ॥ ५८ ॥ सापि त्यक्त्वा गुहां शीघ्रं ययौ राघवसन्निधिम् । तत्र रामं ससुग्रीवं लक्ष्मणं च ददर्श ह ॥ ५९ ॥ कृत्वा प्रदक्षिणं रामं प्रणम्य बहुशः सुधीः । आह गद्गदया वाचा रोमांचिततनूरुहा ॥ ६० ॥ दासी तवाहं राजेंद्र दर्शनार्थमिहागता । बहुवर्षसहस्राणि तप्तं मे दुश्चरं तपः । गुहायां दर्शनार्थं ते फलितं मेऽद्य तत्तपः ॥ ६१ ॥ अद्य हि त्वां नमस्यामि मायायाः परतः स्थितम् । सर्वभूतेषु चालक्ष्यं बहिरंतरवस्थितम् ॥ ६२ ॥ योगमायाजवनिकाच्छन्नो मानुषविग्रहः ।**

राहात नाहीत. ५४ साक्षात् निर्विकार नारायण-विष्णु-त्रेतायुगामध्ये दशरथपुत्र होऊन पृथ्वीचा भार हरण करण्याकरितां म्हणून अरण्यांत भ्रमण करील. ५५ त्याच्या स्त्रीचा शोध करीत करीत वानर तुझ्या गुहेंत येतील. त्यांचें प्रयत्नपूर्वक आदरातिथ्य कर आणि मग रामाकडे जाऊन त्याची स्तुति कर. ५६ ( असें केल्यानें ) जेथें योगिजन जातात, त्या सनातन विष्णुपदाला तूं जाशील.' आतां मी रामदर्शन घेण्याकरितां त्वरेनें येथून जाण्याची इच्छा करीत आहें. ५७ तुम्ही डोळे मिटा, म्हणजे गुहेच्या बाहेर जाल.' वानरांनी तसें करतांच ते तत्काळ पूर्वी ज्या वनांत होते, तेथें येऊन पोहोंचले. ५८ ती ( योगिनी )ही गुहा सोडून शीघ्र रामाजवळ आली. तेथें सुग्रीवासह राम व लक्ष्मण यांचें तिला दर्शन झालें. ५९ त्या सुबुद्ध स्त्रीनें रामाला प्रदक्षिणा घातली. तिनें त्याला अनेकवार प्रणाम केले. तिच्या शरीरावर रोमांच उभे राहिले. तिचा कंठ भरून येऊन ती रामाला म्हणाली, ६० राजेंद्रा ! मी तुझी दासी असून तुझ्या दर्शनाकरितां येथें आल्यें आहें. तुझें दर्शन व्हावें, म्हणून कित्येक सहस्र वर्षेपर्यंत गुहेंत राहून मी खडतर असें तप केलें. तें माझें तप आज फळास आलें आहे. ६१ मायेच्या पलीकडे असणारा, सर्व प्राण्यांच्या आंतबाहेर राहूनही कोणाला न दिसून येणारा, असा जो तूं त्या तुला मी नमस्कार करित्यें. ६२ एखादें रूप धारण करणारा नट खऱ्या रूपानें जसा ओळखिला जात

**न लक्ष्यसेऽज्ञानदृशां शैलूष इव रूपधृक् ॥ ६३ ॥ महाभागवतानां त्वं भक्तियोगविधित्सया । अवतीर्णोऽसि भगवन् कथं जानामि तामसी ॥ ६४ ॥ लोके जानातु यः कश्चित्तव तत्त्वं रघूत्तम । ममैतदेव रूपं ते सदा भातु हृदालये ॥ ६५ ॥ राम ते पादयुगलं दर्शितं मोक्ष-दर्शनम् । अदर्शनं भवार्णानां सन्मार्गपरिदर्शनम् ॥ ६६ ॥ धनपुत्र-कलत्रादिविभूतिपरिदर्पितः । अकिंचनधनं त्वाद्य नाभिधातुं जनोऽर्हति ॥ ६७ ॥ निवृत्तगुणमार्गाय निष्किंचनधनाय ते नमः स्वात्मा-भिरामाय निर्गुणाय गुणात्मने ॥ ६८ ॥ कालरूपिणमीशानमादि-**

नाही, त्याप्रमाणें योगमायेच्या पडद्याने आच्छादित होऊन मनुष्यरूपाने तूं वागत आहेस. त्यामुळें अज्ञानी लोकांना तू ओळखूं येत नाहीस. ६३ महाभगवद्भक्तांचा भक्तियोग सिद्ध करण्यासाठी तूं अवतार घेतला आहेस. भगवन्! मी तमोगुणी स्त्री तुझें यथार्थ स्वरूप कसें जाणणार? ६४ हे रघूत्तमा! लोकांमध्यें तुझें यथार्थ स्वरूप जाणणारे कोणी असल्यास असोत; माझ्या हृदयप्रदेशी हेंच तुझें रूप सर्वदा प्रकाशो. ६५ रामा! तुझ्या चरणयुगलाचें आज मला दर्शन दिलेंस, हें (चरणयुगल) पाहिल्याने मोक्ष मिळतो, संसारसमुद्र दृष्टिपार होतात, आणि सन्मार्ग दिसूं लागतात. ६६ हे आदिदेवा! तं निर्धनांचें—सत्पुरुषांचें—धन—आनं-दाचा ठेवा—आहेस. जे लोक धन, पुत्र, स्त्री इत्यादि ऐश्वर्यानें गर्विष्ठ झालेले असतात, ते तुझें स्तवन करण्यास योग्य नाहीत. ६७ प्रवृत्तिमार्गापासून—संसारा-पासून—तूं निवृत्ति आहेस, तूं साधुपुरुषांचें धन आहेस; तूं स्वस्वरूपाचे ठिकाणी रममाण होणारा आहेस, गुणरहित आहेस, तरी तूं गुणात्मक आहेस. ६८ तूं

१. समानार्थक उतारा —'न चास्य कश्चिन्निपुणेन धातुरवैति जन्तुः कुमनीष ऊतीः । नामानि रूपाणि मनोवचोभिः सन्तन्वतो नटचर्यामिवाज्ञः' ॥ भागवत स्कंध १, ३, ३७ २. भगवान्—'उत्पत्तिं प्रलयं चैव भूतानामायतिं गतिम् । वेत्ति विद्यामविद्यां च स वाच्यो भगवा-निति ॥' ३ 'संसारसागरीं तूं तारक ऐसेंचि संत वदतात ॥'—आर्या केकावली ४. 'येणें संसारमार्ग लोपे । आणि सन्मार्गसाधन सोपें । जोडून श्रीरामाच्या कृपे । सहजीं मोक्षास पाविजे ॥ तूंचि राघवा त्रिगुणातीत । होऊनि गुणासी आश्रयभूत । ब्रह्मादि रूपाहीं आविर्भूत । होसी नाना प्रसगीं ॥ प्रिय कीं अप्रिय काहीएक । तुझिया ठायीं न रघुनायक । परी हे मायामोहित लोक । तैसें तैसें भाविती ॥'—अध्यात्म रामकथा.

**मध्यांतवर्जितम् । समं चरंतं सर्वत्र मन्ये त्वां पुरुषं परम् ॥ ६९ ॥ देव ते चेष्टितं कश्चिन्न वेद नृविडंबनम् । न तेऽस्ति कश्चिद्दयितो द्वेष्यो वा पर एव च ॥ ७० ॥ त्वन्मायापिहितात्मानस्त्वां पश्यंति तथाविधम् । अजस्याकर्तुरीशस्य देवतिर्यङ्नरादिषु॥७१॥ जन्मकर्मादिकं यद्यत्तदत्यंत-विडंबनम् । त्वामाहुरक्षरं जातं कथाश्रवणसिद्धये ॥७२॥ केचित्कोसल-राजस्य तपसः फलसिद्धये । कौसल्यया प्रार्थ्यमानं जातमाहुः परे जनाः ॥७३॥ दुष्टराक्षसभूभारहरणायार्थितो विभुः । ब्रह्मणा नररूपेण जातो-ऽयमिति केचन ॥७४॥ शृण्वंति गायंति च ये कथास्ते रघुनंदन । पश्यंति तव पादाब्जं भवार्णवसुतारणम् ॥७५॥ त्वन्मायागुणबद्धाहं व्यतिरिक्तं**

कालरूपी आहेस, तूं सृष्टीचें पालन करणारा आहेस; तूं आदिमध्यान्तरहित आहेस; तूं सर्वत्र समदृष्टीनें वागणारा आहेस, तूं परम पुरुष आहेस, असें मी मानित्यें. ६९ देवा ! तूं मनुष्यरूपाचें अनुकरण करीत आहेस, ही गोष्ट कोणालाही कळत नाही. तुला कोणी प्रिय नाहीं, शत्रु नाही, किंवा ह्यांहून वेगळा—उदासीन—असाही कोणी नाही. ७० तरी तुझ्या मायेनें ज्यांची ज्ञानशक्ति मोहित झाली आहे, ते तशा प्रकारची तुजविषयी भावना करितात. तूं जन्मरहित, अकर्ता, ईश्वर आहेस, तरीही देव, पशुपक्षी, मनुष्य इत्यादि योनींत जन्म घेऊन ती ती कर्मादिकें आचरण करितोस. तें तुझें ( त्या त्या जातीचें ) यथार्थ अनुकरण होय. तूं अक्षर असूनही जन्म घेतोस, याचें कारण असें सांगतात की, तुझ्या भक्तांना ( ईश्वर ) कथाश्रवणसिद्धि प्राप्त करून द्यावी, असें तूं इच्छितोस. ७१,७२ कित्येक लोक ' कोसलराजाला—दशरथाला—त्याच्या तपाचें फल द्यावें. ' म्हणून तूं ( परमात्मा ) अवतरलास ' असें म्हणतात, तर दुसरे लोक ' कौसल्येच्या प्रार्थनेवरून तू जन्माला आलास, ' असें सांगतात. ७३ कित्येक म्हणतात, ' दुष्ट राक्षसांपासून झालेला पृथ्वीचा भार हरण करण्याकरितां ब्रह्मदेवानें प्रार्थना केल्यावरून प्रभु—विष्णु—मनुष्यरूपानें जन्माला आला. ' ७४ हे रघुनंदना ! तुझ्या कथा जे कोणी ऐकतात आणि गातात, त्यांना तुझ्या चरणकमलाचें दर्शन होतें; आणि हें तुझें चरणकमल म्हणजे संसारसागर तरून जाण्याची उत्तम नौकाच होय. ७५ देवा ! तूं गुणांचा आधार असूनही

१. समानार्थक उतारा:—'जन्म कर्म च विश्वात्मन्नजस्याकर्तुरात्मनः । तिर्यङ्नृषिषु यादस्सु तदत्यन्तविडंबनम्॥'—भागवत १,८.२. सद्दशवर्णन —स्वरूपानुसंधानरूपा स्तुतिं य पठेदादराद्भ-क्तिभावो मनुष्य । शृणोतीह वा नित्यमुद्युक्तचित्तो भवेद्विष्णुरत्रैव वेदप्रमाणात् ॥'—विज्ञाननौका.

गुणाश्रयम् ॥ ७६ ॥ कथं त्वां देव जानीयां स्तोतुं वाऽविषयं विभुम् । नमस्यामि रघुश्रेष्ठं बाणासनशरान्वितम् । लक्ष्मणेन सह भ्रात्रा सुग्रीवादिभिरन्वितम् ॥ ७७ ॥ एवं स्तुतो रघुश्रेष्ठः प्रसन्नः प्रणताघहृत् । उवाच योगिनीं भक्तां किं ते मनसि कांक्षितम् ॥ ७८ ॥ सा प्राह राघवं भक्त्या भक्तिं ते भक्तवत्सल । यत्र कुत्रापि जाताया निश्चलां देहि मे प्रभो ॥ ७९ ॥ त्वद्भक्तेषु सदा संगो भूयान्मे प्राकृतेषु न । जिह्वा मे राम रामेति भक्त्या वदतु सर्वदा ॥ ८० ॥ मानसं श्यामलं रूपं सीतालक्ष्मणसंयुतम् । धनुर्बाणधरं पीतवाससं मुकुटोज्ज्वलम् ॥ ८१ ॥ अंगदैर्नूपुरैर्मुक्ताहारैः कौस्तुभकुंडलैः । भांतं स्मरतु मे राम वरं नान्यं वृणे प्रभो ॥ ८२ ॥ श्रीराम उवाच ॥ भवत्वेवं महाभागे गच्छ त्वं बदरीवनम् । तत्रैव मां स्मरंती त्वं त्यक्त्वेदं भूतपंचकम् । मामेव पर-

गुणरहित आहेस. अशा तुला मायागुणानी बद्ध होत्साती मी कशी जाणूं शकणार ? ७६ तसेंच स्तुतीला अविषय अशा तुज सर्वेश्वराची स्तुति तरी मी कशी करणार ? म्हणून धनुष्यबाण हातीं धरणाऱ्या, बंधु लक्ष्मण आणि सुग्रीवादि वानरवीर यांनी परिवेष्टित अशा ( तुला ) रघुश्रेष्ठाला मी नमस्कार करित्यें.' ७७ अशा प्रकारें ( त्या योगिनीनें) स्तुति केली असतां शरणागतांची पापें हरण करणारा तो रघुश्रेष्ठ (श्रीराम) प्रसन्न झाला, आणि त्या आपल्या भक्त अशा योगिनीला म्हणाला, 'तुझ्या मनांत काय इच्छा आहे ?' ७८ त्यावर ती भक्तिपूर्वक रामाला म्हणाली, 'हे भक्तवत्सला ! माझा जन्म कोणत्याही योनीत झाला, तरी माझी भक्ति तुझ्या ठिकाणीं अढळ असावी, एवढें प्रभो ! मला दे. ७९ संसारी लोकांची संगत न घडतां सर्वदा तुझ्या भक्तांचा सहवास मला घडावा, तसेंच माझ्या जिह्वेकडून सर्वदा 'राम राम' असा भक्तिपूर्वक जप होत असावा. ८० सीता आणि लक्ष्मण जवळ आहेत, हातांत धनुष्यबाण धरिले आहेत, पीतांबर परिधान केला आहे, मुकुटानें ( मस्तकाला ) शोभा आली आहे, बाहुभूषणें, नूपुरें, मोत्यांचे हार, कौस्तुभ आणि कुंडलें यांनी जें विराजमान झालें आहे, अशा त्या तुझ्या सांवळ्या रूपाचें चिंतन माझें अंतःकरण करीत राहो. प्रभो रामा ! याहून दुसरा कोणताही वर मला नको.' ८१,८२ श्रीराम म्हणाला, 'महाभागे ! तूं म्हणत्येस तसेंच होईल. आतां तूं बदरीवनाला जा. तेथें माझें चिंतन करीत रहा. म्हणजे या पंचभौतिक शरीराचा त्याग करून लवकरच मला परमा-

मात्मानमचिरात्प्रतिपद्यसे ॥ ८३ ॥ श्रुत्वा रघूत्तमवचोऽमृतसारकल्पं गत्वा तदैव बदरीतरुखंडजुष्टम् । तीर्थे तदा रघुपतिं मनसा स्मरंती त्यक्त्वा कलेवरमवाप परं पदं सा ॥ ८४ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे किष्किंधाकांडे षष्ठः सर्गः ॥ ६ ॥

## किष्किंधाकांड, सर्ग सातवा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ अथ तत्र समासीना वृक्षखंडेषु वानराः । चिंतयंतो विमुह्यंतः सीतामार्गणकर्शिताः ॥ १ ॥ तत्रोवाचांगदः कांश्चिद्वानरान् वानरर्षभः । भ्रमतां गह्वरेऽस्माकं मासो नूनं गतोऽभवत् ॥२॥ सीता नाधिगतास्माभिर्न कृतं राजशासनम् । यदि गच्छाम किष्किंधां सुग्रीवोऽस्मान् हनिष्यति ॥३॥ विशेषतः शत्रुसुतं मां मिषान्निहनिष्यति । मयि तस्य कुतः प्रीतिरहं रामेण रक्षितः ॥ ४ ॥ इदानीं रामकार्यं मे

त्याला तूं पावशील. ८३ रघुश्रेष्ठ श्रीरामाचें तें अमृततुल्य भाषण ऐकून ती-स्वयंप्रभा-लागलीच बदरीवननामक पुण्यस्थळीं गेली. तेथें बोरीच्या झाडांच्या अनेक राई होत्या. तेथें अंतःकरणांत रघुपतीचें स्मरण करीत ती राहिली, आणि अंतीं शरीराचा त्याग करून परम पदाला पोंचली. ८४ ”

**किष्किंधाकांड, सर्ग सहावा समाप्त.**

श्रीशंकर म्हणाला, “इकडे ते वानर झाडांच्या राईंत बसून विचार करूं लागले. त्यांना कांहीं सुचेनासें झालें. सीतेचा शोध करतां करतां ते अगदीं थकून गेले. १ तेव्हां त्या वानरांचा प्रमुख जो अंगद त्यानें कांहीं वानरांना म्हटलें, ‘(सीताशोधार्थ) आम्ही रानोरानीं फिरायाला लागल्यापासून एक महिना तर होऊन गेला. २ आम्हांला सीतेचा शोध लागला नाहीं. त्या अर्थी राजाज्ञा आमच्याकडून पाळिली गेली नाही. आतां आपण किष्किंधेला गेलों, तर सुग्रीव आमचा वध करील. ३ विशेषेंकरून मी शत्रुपुत्र असल्यामुळें ह्या निमित्तानें तो मला मारील. मजवर त्याची प्रीति कुठून असणार ? माझें रक्षण रामानें केलें आहे. ४

न कृतं तन्मिषं भवेत् । तस्य मद्धनने नूनं सुग्रीवस्य दुरात्मनः ॥ ५ ॥ मातृकल्पां भ्रातृभार्यां पापात्मानुभवत्यसौ । न गच्छेयमतः पार्श्वं तस्य वानरपुंगवाः ॥ ६ ॥ त्यक्ष्यामि जीवितं चात्र येन केनापि मृत्युना । इत्यश्रुनयनं केचिद्दृष्ट्वा वानरपुंगवाः ॥ ७ ॥ व्यथिताः साश्रुनयना युवराजमथाब्रुवन् ॥ ८ ॥ किमर्थं तव शोकोऽत्र वयं ते प्राणरक्षकाः । भवामो निवसामोऽत्र गुहायां भयवर्जिताः ॥ ९ ॥ सर्वसौभाग्यसहितं पुरं देवपुरोपमम् । शनैः परस्परं वाक्यं वदतां मारुतात्मजः ॥ १० ॥ श्रुत्वांगदं समालिंग्य प्रोवाच नयकोविदः । विचार्यते किमर्थं ते दुर्विचारो न युज्यते ॥ ११ ॥ राज्ञोऽत्यंतप्रियस्त्वं हि तारापुत्रोऽतिवल्लभः। रामस्य लक्ष्मणात्प्रीतिस्त्वयि नित्यं प्रवर्धते ॥ १२ ॥ अतो न राघवाद्भीतिस्तव राज्ञो विशेषतः । अहं तव हिते सक्तो वत्स नान्यं विचारय

मजकडून रामाचें कार्य झालें नाही, हें त्या दुष्ट सुग्रीवाला आतां मला मारण्याला आयतेंच निमित्त मिळणार आहे. ५ हा पापात्मा आईसमान वडील बंधूच्या पत्नीचा उपभोग घेत आहे. म्हणून हे वानरश्रेष्ठ हो ! ह्यापुढें मी त्याच्या जवळ जाणार नाही. ६ कोणत्या तरी युक्तीनें मरण आणवून मी येथें प्राणत्याग करणार ? असें बोलत असतां (अंगदाच्या) डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. तें पाहून कित्येक वानरवीरांना दुःख झालें. त्यांच्याही डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. ते युवराजाला–अंगदाला–म्हणाले, ७,८ ‘हा काय म्हणून तूं शोक करीत आहेस ? आम्ही तुझे प्राणरक्षक आहों. आम्ही येथें या गुहेंत राहूं या. ह्या ठिकाणीं आम्हांला भीति नाहीं. ९ हे नगर देवनगरासमान असून सर्व ऐश्वर्यांनी भरलेलें आहे.’ अशी त्यांची आपसांत हळू हळू भाषणें चालली असतां तीं मारुतीच्या कानावर गेली. त्या नयनिपुणा( मारुती )नें अंगदाला आलिंगन दिलें, आणि म्हटलें, ‘हे विचार काय म्हणून तुझ्या मनांत येत आहेत ? वाईट विचार तुला योग्य नाहींत. १०,११ तूं तारेचा पुत्र असल्यामुळें राजाला–सुग्रीवाला–अत्यंत प्रिय व आवडता झाला आहेस. रामाचें देखील तुजवरील प्रेम लक्ष्मणाहून अधिक असून तें नित्य वाढत जात आहे. १२ म्हणून तुला रामाची भीति नाही, आणि विशेषेंकरून राजाची–सुग्रीवाची–तर नाहीच; वत्सा ! मी तुझ्या कल्याणाकरितां सदोदित तत्पर आहें. (मजवांचून) दुसऱ्या कोणालाही तूं कांही

॥ १३ ॥ गुहावासश्च निर्भेद्य इत्युक्तं वानरैस्तु यत् । तदेतद्रामबाणा-
नामभेद्यं किं जगत्रये ॥ १४ ॥ ये त्वां दुर्बोधयंत्येते वानरा वानर-
र्षभ । पुत्रदारादिकं त्यक्त्वा कथं स्थास्यंति ते त्वया ॥ १५ ॥ अन्य-
द्गुह्यतमं वक्ष्ये रहस्यं शृणु मे सुत । रामो न मानुषो देवः साक्षान्ना-
रायणोऽव्ययः ॥ १६ ॥ सीता भगवती माया जनसंमोहकारिणी ।
लक्ष्मणो भुवनाधारः साक्षाच्छेषः फणीश्वरः ॥ १७ ॥ ब्रह्मणा
प्रार्थिताः सर्वे रक्षोगणविनाशने । मायामानुषभावेन जाता लोकैकर-
क्षकाः ॥ १८ ॥ वयं च पार्षदाः सर्वे विष्णोर्वैकुंठवासिनः । मनुष्य-
भावमापन्ने स्वेच्छया परमात्मनि ॥ १९ ॥ वयं वानररूपेण जातास्त-
स्यैव मायया । वयं तु तपसा पूर्वमाराध्य जगतां पतिम् ॥ २० ॥
तेनैवानुगृहीताः स्मः पार्षदत्वमुपागताः । इदानीमपि तस्यैव सेवां

विचारूं नकोस. १३ आतां या गुहेंत राहणें निर्भय आहे, म्हणून वानर म्हणत आहेत; तरी तें म्हणणें अयोग्य आहे. जगत्रयामध्यें ह्या रामबाणांना अभेद्य असें काय आहे ? १४ वानरश्रेष्ठा ! जे हे वानर तुला वाईट सल्ला देत आहेत, ते तरी पुत्र, स्त्रिया, इत्यादींना टाकून तुजबरोबर कसे राहणार ? १५ वत्सा ! आणखी एक अत्यंत गुप्त अशी रहस्याची गोष्ट तुला सांगतों. ऐक. राम हा मनुष्य नव्हे. हा साक्षात् निर्विकार प्रभु नारायण होय. १६ सीता ही जगाला मोह घालणारी भगवती माया आहे, आणि लक्ष्मण म्हणजे जगाला आधारभूत असा साक्षात् नाग-राज शेष आहे. १७ राक्षससमुदायांचा नाश करण्याविषयी ब्रह्मदेवानें प्रार्थना केल्यावरून ह्या सर्वांनी मायेनें मनुष्यरूप धारण केलें आहे. ह्यांपैकी प्रत्येक जगाचें रक्षण करण्यालायक आहे. १८ आम्हीही सर्व वैकुंठवासी विष्णूचे अनुचर आहों. त्या परमात्म्यानें स्वेच्छेनें मनुष्यरूप धारण केलें असतां, त्याच्याच मायेनें आम्हीही वानररूपानें जन्मलों. आम्ही पूर्वी तपश्चर्येच्या योगानें जगत्पतीची आराधना केली होती; १९,२० त्यामुळेंच त्यानें आम्हांवर अनुग्रह केल्यावरून हें त्याचें पार्षदत्व—अनुचरत्व—आम्हांला प्राप्त झालें. आतां देखील त्याच्याच मायेला अनुसरून

१. समानार्थक उतारा:—' भारावतरणायान्ये ( आहु. ) भुवो नाव इवोदधौ । सीदन्त्या भूरिभारेण जातो ह्यात्मभुवाऽर्थित ' ॥—भागवत १,८.

कृत्वैव मायया ॥ २१ ॥ पुनर्वैकुंठमासाद्य सुखं स्थास्यामहे वयम् ।
इत्यंगदमथाश्वास्य गता विंध्यं महाचलम् ॥ २२ ॥ विचिन्वंतोऽथ
शनकैर्जानकीं दक्षिणांबुधेः । तीरे महेंद्राख्यगिरेः पवित्रं पादमाययुः
॥ २३ ॥ दृष्ट्वा समुद्रं दुष्पारमगाधं भयवर्धनम् । वानरा भयसंत्रस्ताः
किं कुर्म इति वादिनः ॥ २४ ॥ निषेदुरुदधेस्तीरे सर्वे चिंतासमन्विताः ।
मंत्रयामासुरन्योन्यमंगदाद्या महाबलाः ॥ २५ ॥ भ्रमतामेव नो मासो
गतोऽत्रैव गुहांतरे । न दृष्टो रावणो वाद्य सीता वा जनकात्मजा
॥ २६ ॥ सुग्रीवस्तीक्ष्णदंडोऽस्मान्निहंत्येव न संशयः । सुग्रीववधतोऽ-
स्माकं श्रेयः प्रायोपवेशनम् ॥ २७ ॥ इति निश्चित्य तत्रैव दर्भानास्तीर्य
सर्वतः । उपाविवेशुस्ते सर्वे मरणे कृतनिश्चयाः ॥ २८ ॥ एतस्मिन्नं-
तरे तत्र महेंद्राद्रिगुहांतरात् । निर्गत्य शनकैरागाद्गृध्रः पर्वतसन्निभः
॥ २९ ॥ दृष्ट्वा प्रायोपवेशेन स्थितान्वानरपुंगवान् । उवाच शनकैर्गृध्रः

आपण त्याची सेवा करूं, २१ आणि पुनः वैकुंठाला मिळवून तेथ सुखानें राहूं.' अशा रीतीनें मारुतीनें अंगदाची समजूत केली. पुढें ती मंडळी विंध्य नांवाच्या मोठ्या पर्वतावर गेली. २२ तेथून सावकाश सीतेचा शोध करीत करीत ते दक्षिण-समुद्राच्या तीरावर महेंद्रनामक पर्वताच्या पवित्र पादप्रदेशी येऊन पोंचले. २३ तेथून तो दुष्पार, अगाध आणि भीति वाढविणारा समुद्र पाहून 'आतां काय करायाचें' या विचारानें ते वानर भयभीत होऊन गेले. २४ मग ते महाबलिष्ठ अंगदादि (वीर) चिंताग्रस्त होऊन समुद्राच्या तीरावर बसून राहिले, त्यांनी परस्परांशी विचार केला की, २५ 'फिरता फिरता ह्या गुहेमध्येच आमचा एक महिना निघून गेला. अजून रावणही दृष्टीस पडला नाही, किंवा जनककन्या सीतेचाही पत्ता लागला नाही! २६ भयंकर शिक्षा देणारा सुग्रीव आता आम्हांला ठार मारील, यांत संशय नाही. सुग्रीवाच्या हातून मरण्यापेक्षां प्रायोपवेशनानें प्राणत्याग करणें हेंच अधिक श्रेयस्कर होय.' २७ असें ठरवून त्या सर्वांनीं सर्वत्र दर्भ आंथरले, आणि मरणाचा निश्चय करून ते तेथें बसून राहिले. २८ इतक्यांत त्या महेंद्रपर्वताच्या गुहेंतून पर्वतासमान शरीराचा एक गृध्र बाहेर पडून हळूच तेथें आला. २९ प्रायोपवेशनाच्या संकल्पानें तेथ बसलेल्या त्या वानरश्रेष्ठांना पाहून तो गृध्र सावकाशपणें म्हणाला, 'आज मला मोठाच

प्राप्तो भक्षोऽद्य मे बहुः ॥ ३० ॥ एकैकशः क्रमात्सर्वान् भक्षयामि दिने दिने । श्रुत्वा तद्गृध्रवचनं वानरा भीतमानसाः ॥ ३१ ॥ भक्षयिष्यति नः सर्वानसौ गृध्रो न संशयः । रामकार्यं च नास्माभिः कृतं किंचिद्धरीश्वराः ॥ ३२ ॥ सुग्रीवस्यापि च हितं न कृतं स्वात्मनामपि । वृथानेन वधं प्राप्ता गच्छामो यमसादनम् ॥ ३३ ॥ अहो जटायुर्धर्मात्मा रामस्यार्थे मृतः सुधीः । मोक्षं प्राप दुरावापं योगिनामप्यरिंदमः ॥३४॥ संपातिस्तु तदा वाक्यं श्रुत्वा वानरभाषितम् । के वा यूयं मम भ्रातुः कर्णपीयूषसंनिभम् ॥ ३५ ॥ जटायुरिति नामाद्य व्याहरंतः परस्परम् । उच्यतां वो भयं माभून्मत्तः प्लवगसत्तमाः ॥ ३६ ॥ तमुवाचांगदः श्रीमानुत्थितो गृध्रसन्निधौ । रामो दाशरथिः श्रीमान् लक्ष्मणेन समन्वितः ॥ ३७ ॥ सीतया भार्यया सार्धं विचचार महावने । तस्य सीता हृता साध्वी रावणेन दुरात्मना ॥ ३८ ॥ मृगयां निर्गते रामे

आहार लाभला आहे ! ३० प्रत्येक दिवशी एकएक अशा क्रमानें मी सर्वांचें भक्षण करीन.' तें त्या गृध्राचें भाषण ऐकून वानर मनांत भयभीत झाले. ३१ ( ते म्हणाले, ) 'हा गृध्र आम्हां सर्वांना खाऊन टाकील, यांत संशय नाही. वानरश्रेष्ठ हो ! आमच्याकडून रामकार्य किंचित् देखील झालें नाही. ३२ सुग्रीवाचें किंवा आमचें स्वतःचेंही कांही हित आम्ही साधिलें नाही. ह्या ( गृध्रा ) च्या हातून विनाकारण मरण पावून आम्ही यमसदनाला जाणार ! ३३ अहो ! तो जटायु किती तरी धार्मिक आणि बुद्धिवान् होता ! त्याला रामकार्याकरितां मृत्यु आला. त्यामुळें योग्यांनाही दुर्लभ असें मोक्षपद त्या शत्रुमर्दनाला प्राप्त झालें.' ३४ हें वानरांचें भाषण त्या संपातीनें ऐकिल्यावर ( तो म्हणाला, ) 'वानरश्रेष्ठ हो ! कानाला अमृतासारखें वाटणारें माझ्या भावाचें 'जटायु' नांव घेऊन तुम्ही परस्पर बोलत आहां, तरी तुम्ही कोण आहां ? बोला. माझ्यापासून तुम्हांला कांहीही पीडा होणार नाही.' ३५,३६ त्यावर श्रीमान् अंगद उठला, आणि गृध्राजवळ जाऊन त्याला म्हणाला, 'दशरथपुत्र श्रीमान् राम, लक्ष्मण आणि पत्नी सीता यांसह महारण्यांत फिरत असतां त्याची भार्या, पतिव्रता सीता, दुष्ट रावणानें चोरून नेली. ३७,३८ श्रीराम व लक्ष्मण मृगयेकरितां गेले असतां

१ संपाती हा प्रसिद्ध जटायुनामक गृध्रराजाचा वडील बंधु व गरुडाचा पुत्र होता.

लक्ष्मणे च हृता बलात् । राम रामेति क्रोशंती श्रुत्वा गृध्रः प्रतापवान्
॥ ३९ ॥ जटायुर्नाम पक्षींद्रो युद्धं कृत्वा सुदारुणम् । रावणेन हतो
वीरो राघवार्थं महाबलः ॥ ४० ॥ रामेण दग्धो रामस्य सायुज्यमग-
मत्क्षणात् । रामः सुग्रीवमासाद्य सख्यं कृत्वाग्निसाक्षिकम् ॥ ४१ ॥
सुग्रीववचोदितो हत्वा वालिनं सुदुरासदम् । राज्यं ददौ वानराणां सुग्री-
वाय महाबलः ॥ ४२ ॥ सुग्रीवः प्रेषयामास सीतायाः परिमार्गणे ।
अस्मान्वानरवृंदान्वै महासत्त्वान्महाबलः ॥ ४३ ॥ मासादर्वाङ्निवर्तध्वं
नो चेत्प्राणान्हरामि वः । इत्याज्ञया भ्रमंतोऽस्मिन्वने गह्वरमध्यगाः
॥ ४४ ॥ गतो मासो न जानीमः सीतां वा रावणं च वा । मर्तुं प्रायो-
पविष्टाः स्मस्तीरे लवणवारिधेः ॥ ४५ ॥ यदि जानासि हे पक्षिन्सीतां
कथय नः शुभाम् । अंगदस्य वचः श्रुत्वा संपातिर्हृष्टमानसः ॥ ४६ ॥

सीतेवर बलात्कार करून (तो दुष्ट) तिला घेऊन चालला. तेव्हां ती 'रामा' 'रामा' म्हणून आक्रोश करूं लागली. तो आक्रोश कानी पडतांच प्रतापी जटायु-नामक पक्षिराजानें (त्या रावणाशी) घनघोर युद्ध केलें. त्या युद्धांत रामकार्यार्थ त्या महाबलवान् जटायु वीराला रावणाहाती मृत्यु आला. ३९,४० त्याचें दहन रामानें केलें, त्यामुळें त्याला क्षणांत रामरूपी सायुज्यमुक्ति प्राप्त झाली. (पुढें) रामानें सुग्रीवाकडे येऊन अग्निसाक्षिक त्याच्याशीं सख्य केलें ४१ सुग्रीवाच्या सांगण्यावरून अजिंक्य अशा वालीला महाबलिष्ठ रामानें ठार केलें, आणि वानराचें राज्य सुग्रीवाला दिलें. ४२ पुढें त्या महापराक्रमी सुग्रीवानें महासामर्थ्यवान् आम्हां वानरसमुदायांना सीतेच्या शोधाकरितां पाठविलें. ४३ 'महिना संपण्यापूर्वी परत या, नाहीतर तुमचे प्राण घेईन,' या त्याच्या आज्ञेप्रमाणें फिरत फिरत आम्ही या वनांतील गुहेंत आलों. ४४ एक महिना झाला, तरी सीतेचा किंवा रावणाचा कांहीच वृत्तांत समजला नाही. म्हणून आम्ही प्रायोपवेशनानें मरण्याचा निश्चय करून या क्षारसमुद्राच्या तीरीं बसलों आहों. ४५ हे पक्ष्या! त्या कल्याणिनी सीतेची तुला कांहीं माहिती असेल, तर सांग.' अंगदाचें हें भाषण ऐकून संपातीच्या अंतःकरणाला

१. सलोकता, समीपता, स्वरूपता व सायुज्यता, ह्या चार मुक्ति सायुज्यता—ईश्वरस्वरूपी तद्रूप होऊन जाणे.

उवाच मत्प्रियो भ्राता जटायुः प्लवगेश्वराः । बहुवर्षसहस्रांते भ्रातृवार्ता
श्रुता मया ॥ ४७ ॥ वाक्साहाय्यं करिष्येऽहं भवतां प्लवगेश्वराः ।
भ्रातुः सलिलदानाय नयध्वं मां जलांतिकम् ॥ ४८ ॥ पश्चात्सर्वं शुभं
वक्ष्ये भवतां कार्यसिद्धये । तथेति निन्युस्ते तीरं समुद्रस्य विहंगमम् ।
सोऽपि तत्सलिले स्नात्वा भ्रातुर्दत्वा जलांजलिम् ॥ ४९ ॥ पुनः
स्वस्थानमासाद्य स्थितो नीतो हरीश्वरैः । संपातिः कथयामास वानरा-
न्परिहर्षयन् ॥ ५० ॥ लंका नाम नगर्यास्ते त्रिकूटगिरिमूर्धनि । तत्रा-
शोकवने सीता राक्षसीभिः सुरक्षिता ॥ ५१ ॥ समुद्रमध्ये सा लंका
शतयोजनदूरतः । दृश्यते मे न संदेहः सीता च परिदृश्यते ॥ ५२ ॥
गृध्रत्वाद्दूरदृष्टिर्मे नात्र संशयितुं क्षमम् । शतयोजनविस्तीर्णं समुद्रं यस्तु
लंघयेत ॥ ५३ ॥ स एव जानकीं दृष्ट्वा पुनरायास्यति ध्रुवम् । अह-

आनंद वाटला. ४६ तो म्हणाला, 'वानरश्रेष्ठ हो! तो जटायु म्हणजे माझा प्रिय बंधु होय. अनेक वर्षसहस्रांनी आज मला बंधूची वार्ता कळली. ४७ वानरवीर हो! मी वाचेनें तुमचें साहाय्य करीन, परंतु बंधूला उदक देण्यासाठी (आधी) मला उदकाजवळ न्या. ४८ नंतर तुमच्या कार्यसिद्धीसाठी हितकर असें सर्व वृत्त तुम्हांला सांगेन.' 'ठीक आहे' असें म्हणून त्यांनी त्या (गृध्र) पक्ष्याला समुद्राच्या तीरावर नेलें. त्यानेंही त्या जलांत स्नान केलें, आणि बंधूला जलांजलि दिली. ४९ नंतर त्या वानरवीरांनी त्याला पुनः स्वस्थानी नेलें. तेथें बसल्यावर संपातीनें वानरास माहिती सांगितली, तेणेंकरून त्यास अत्यंत आनंद झाला. ५० (तो म्हणाला,) 'त्रिकूट[1] पर्वताच्या मस्तकावर लंका नांवाची एक नगरी आहे. तेथें अशोकवनामध्यें सीता असून तिच्या संरक्षणाकरितां राक्षसी ठेविल्या आहेत. ५१ ती लंका येथून शंभर योजनांच्या पलीकडे समुद्रामध्यें आहे. तरी ती माझ्या दृष्टीस पडत आहे; सीता देखील मला येथून दिसत आहे, यांत संदेह नाही. ५२ मी गृध्र असल्या-मुळें अर्थातच मी दूरदृष्टि आहें. तेव्हा (मी सांगतों) यासंबंधी शंका घेण्याचें कारणच नाही. शंभर योजनें विस्तीर्ण असा हा समुद्र जो कोणी उल्लंघून जाईल, तोच खरोखर जानकीची भेट घेऊन पुनः येईल, बंधूचा घात करणाऱ्या त्या दुष्ट

१. एक पर्वत. याच्या शिखरावर रावणाची राजधानी लंका ही वसली होती.

मेव दुरात्मानं रावणं हंतुमुत्सहे ॥ ५४ ॥ भ्रातुर्हन्तारमेकाकी किंतु पक्ष-विवर्जितः । यतध्वमतियत्नेन लंघितुं सरितां पतिम् । ततो हंता रघुश्रेष्ठो रावणं राक्षसाधिपम् ॥ ५५ ॥ उल्लंघ्य सिंधुं शतयोजनायतं लंकां प्रविश्याथ विदेहकन्यकाम् । दृष्ट्वा समाभाष्य च वारिधिं पुनस्तर्तुं समर्थः कतमो विचार्यताम् ॥ ५६ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे किष्किंधाकांडे सप्तमः सर्गः ॥ ७ ॥

## किष्किंधाकांड, सर्ग आठवा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ अथ ते कौतुकाविष्टाः संपातिं सर्ववानराः । पप्रच्छुर्भगवन् ब्रूहि स्वमुदंतं त्वमादितः ॥ १ ॥ संपातिः कथयामास स्ववृत्तांतं पुरा कृतम् । अहं पुरा जटायुश्च भ्रातरौ रूढयौवनौ ॥ २ ॥ बलेन दर्पितावावां बलजिज्ञासया खगौ । सूर्यमंडलपर्यंतं

रावणाचा मीच एकट्याने वध करावा, अशी माझी दांडगी इच्छा, परंतु मला पंख नाहीत. अत्यंत श्रमपूर्वक समुद्र उल्लंघून जाण्याचा प्रयत्न करा मग राक्षसाधिपति रावणाचा रघुश्रेष्ठ (राम) वध करील. ५३,५४,५५ शंभर योजनें लांब असा समुद्र ओलांडून, लंकेत शिरून, पुढें जनककन्येला–सीतेला–भेटून, तिच्याशी संभाषण करून आणि पुनः समुद्र तरून जो येईल, असा तुमच्यामध्यें कोणी समर्थ आहे काय? याचा आधी विचार करा. ५६"

### किष्किंधाकांड, सर्ग सातवा समाप्त

श्रीशंकर म्हणाला, "(संपातीचें भाषण ऐकून) सर्व वानर आश्चर्यचकित झाले. त्यांनी संपातीला म्हटलें, 'भगवन्! आपण आपली सर्व हकीकत मुळापासून कथन करावी?' १ (त्यावर) संपातीनें आपण पूर्वी काय काय केलें, तो सारा वृत्तांत सांगितला. तो म्हणाला, 'पूर्वी मी आणि जटायु असे आम्ही दोघे बंधु पूर्ण तारुण्यांत असतां आमच्या अंगच्या बळाचा आम्हांला मोठा गर्व झाला. पुढें कोणाचें सामर्थ्य किती आहे, हें पाहण्याची इच्छा आमच्या मनांत उत्पन्न होऊन आकाशां-

गंतुमुत्पतितौ मदात् ॥ ३ ॥ बहुयोजनसाहस्रं गतौ तत्र प्रतापितः । जटायुस्तं परित्रातुं पक्षैराच्छाद्य मोहतः ॥ ४ ॥ स्थितोऽहं रश्मिभिर्दग्धपक्षोऽस्मिन्विंध्यमूर्धनि । पतितो दूरपतनान्मूर्च्छितोऽहं कपीश्वराः ॥ ५ ॥ दिनत्रयात्पुनः प्राणसहितो दग्धपक्षकः । देशं वा गिरिकूटान्वा न जाने भ्रांतमानसः ॥ ६ ॥ शनैरुन्मील्य नयने दृष्ट्वा तत्राश्रमं शुभम् । शनैः शनैराश्रमस्य समीपं गतवानहम् ॥ ७ ॥ चंद्रमा नाम मुनिराड् दृष्ट्वा मां विस्मितोऽवदत् । संपाते किमिदं तेऽद्य विरूपं केन वा कृतम् ॥ ८ ॥ जानामि त्वामहं पूर्वमत्यंतं बलवानसि । दग्धौ किमर्थं ते

तून फिरत फिरत सूर्यमंडलापर्यंत जाण्याचें आम्ही योजिलें, आणि तारुण्यमदानें ( विचार न करतां ) वर उडालों. २,३ आम्ही कित्येक सहस्र योजनें वर गेलों. तेथें ( रवीच्या प्रखर तेजानें ) जटायूचें शरीर होरपळून गेलें. तें पाहून माझ्या मनांत दया उत्पन्न झाली, आणि त्याचें रक्षण करण्यासाठी त्याला माझ्या पंखाखाली झांकून घेऊन मी तेथेंच उभा राहिलों. त्यामुळें (सूर्य) किरणांनी माझे पंख जळून गेले, आणि मी ह्या विंध्यपर्वताच्या शिखरावर पडलो. वानरश्रेष्ठ हो! उंचावरून पडल्यामुळें मला मूर्च्छा आली. ४,५ तीन दिवसांनी मी पुनः शुद्धीवर आलों; परंतु पंख दग्ध झाल्यामुळें भ्रमिष्ठ होऊन 'हा कोणता देश आहे, किंवा सभोंवती कोणती पर्वतशिखरें आहेत,' हें कांहींच मला कळेना. ६ हळूहळू डोळे उघडून मी पाहिलें, तों तेथें एक पुण्याश्रम माझ्या दृष्टीस पडला. मग मंद पावलें टाकीत मी त्या आश्रमाजवळ गेलों. ७ तेथें चंद्रमा नांवाचा एक मुनिश्रेष्ठ राहात असे. मला पाहून आश्चर्यचकित होऊन तो म्हणाला, 'संपाते! आज तुला काय झालें आहे ? तुझें शरीर कोणी विरूप केलें? ८ पूर्वी तूं अत्यंत बलवान् होतास, ही गोष्ट मला ठाऊक आहे,

१. हा कथाभाग भावार्थरामायणात वेगळ्या तऱ्हेनें आला आहे, तो असा—' माझ्या पंखाची होता होळी । थोर दिधली म्या आरोळी । अरुणें देखता तये वेळी । थोर कळवळी पुत्रस्नेहें ॥ सूर्याप्रती सांगे अरुण । ' माझे पुत्र दोघे जण । स्वामीचे वंदूं येता चरण । पक्षदहन केलें तेजे ' ॥ * * * ' माझे तेजाचे निजदीप्ती । गर्वी तितुके भस्म होती । अरुणा तुझी हे संतती । म्हणोनी सपाती वाचला ॥ होता रामनामश्रवण । उभयपक्षी निरभिमान । पक्ष पावोनि पूर्ण । अगम्य गमन करील ॥ '

पक्षौ कथ्यतां यदि मन्यसे ॥ ९ ॥ ततः स्वचेष्टितं सर्वं कथयित्वाति-
दुःखितः। अब्रुवं मुनिशार्दूलं दह्येऽहं दाववह्निना ॥ १० ॥ कथं धार-
यितुं शक्तो विपक्षो जीवितं प्रभो। इत्युक्तोऽथ मुनिर्वीक्ष्य मां दयार्द्र-
विलोचनः ॥ ११ ॥ शृणु वत्स वचो मेऽद्य श्रुत्वा कुरु यथेप्सितम्।
देहमूलमिदं दुःखं देहः कर्मसमुद्भवः ॥ १२ ॥ कर्म प्रवर्तते देहेऽहं-
बुद्ध्या पुरुषस्य हि। अहंकारस्त्वनादिः स्यादविद्यासंभवो जडः ॥१३॥
चिच्छायया सदा युक्तस्तप्तायःपिंडवत्सदा। तेन देहस्य तादात्म्या-
द्देहश्चेतनवान्भवेत् ॥ १४ ॥ देहोऽहमिति बुद्धिः स्यादात्मनोऽहंकृतेर्ब-
लात्। तन्मूल एष संसारः सुखदुःखादिसाधकः ॥ १५ ॥ आत्मनो

तुझे पंख जळण्याचें काय बरें कारण? तुला सांगणें योग्य वाटत असेल, तर सांग.' ९ तेव्हां मी माझा सर्व वृत्तांत त्या मुनीला सांगितला, आणि अत्यंत दुःखित होऊन म्हटलें, 'मुनिश्रेष्ठा! वणव्याप्रमाणें दुःसह दाहानें मी पोळत आहें. १० प्रभो! पंखावांचून मी प्राण कसे धारण करणार?' असें मी त्या मुनीला सांगितल्यावर त्यानें दयार्द्र दृष्टीनें मजकडे पाहिलें, ११ (आणि म्हटलें) 'वत्सा! आतां मी काय सांगतों तें ऐक, आणि मग तुला वाटेल तें कर. या दुःखाचें मूळ शरीर हेंच होय, आणि शरीर हें कर्मामुळें उत्पन्न होत असतें. १२ देहावर नराची अहंताबुद्धि असते, म्हणूनच त्याच्या हातून कर्म घडत असतें. अहंकार हा अनादि असून अविद्येपासून उत्पन्न झाला आहे; अर्थात् तो जड आहे. १३ (आंचेनें) तप्त झालेल्या लोखंडाच्या (लाल) गोळ्याप्रमाणें अहंकार आहे. तो सदा चैतन्याच्या प्रतिबिंबानें युक्त असतो. त्याच्याशी—अहंकाराशी—देहाचें तादात्म्य झालें असतां देह चैतन्ययुक्त होतो. १४ याच अहंतेच्या गुणानें आत्म्याला 'देह मी' अशी बुद्धि होते, आणि त्यामुळेंच सुखदुःखादिकांची प्राप्ति करून देणारा संसार (भोगावा लागतो). १५ आत्मा वास्तविक निर्विकार आहे, तरी

१ शरीर कर्मामुळे होतें व तें दुःखमूळ आहे —' शरीराचिया संयोगें। गुणत्रयाचिया संगें। कर्माचिया रंगें। रंगाथिला ॥ जेथ पंचभूतांचा कर्दम। तेथ कर्मांचा उपक्रम। दुःख आणि श्रम। आघवा पैं.' ॥—सिद्धांतसंहिता २ 'संसारविकारांचें भान। अभिमानयुक्त करी मन। स्वर्गनरक गमनागमन। देहाभिमान भोगवी ॥ * तेवी देहाची सुखदुःखकथा। कां पापपुण्यादि जे वार्ता। नाहीं जीवशिवाच्या माथां। देहअहंता ते भोगी ॥ '—एकनाथी भागवत.

निर्विकारस्य मिथ्या तादात्म्यतः सदा । देहोऽहं कर्मकर्ताहमिति संकल्प्य सर्वदा ॥ १६ ॥ जीवः करोति कर्माणि तत्फलैर्बद्धयतेऽवशः । ऊर्ध्वाधो भ्रमते नित्यं पापपुण्यात्मकः स्वयम् ॥ १७ ॥ कृतं मयाधिकं पुण्यं यज्ञदानादि निश्चितम् । स्वर्गं गत्वा सुखं भोक्ष्य इति संकल्पवान्भवेत् ॥ १८ ॥ तथैवाध्यासतस्तत्र चिरं भुक्त्वा सुखं महत् । क्षीणपुण्यः पतत्यर्वागनिच्छन्कर्मचोदितः ॥ १९ ॥ पतित्वा मंडले चेंदोस्ततो नीहारसंयुतः । भूमौ पतित्वा व्रीह्यादौ तत्र स्थित्वा चिरं पुनः ॥ २० ॥ भूत्वा चतुर्विधं भोज्यं पुरुषैर्भुज्यते ततः । रेतो भूत्वा पुनस्तेन ऋतौ स्त्रीयोनिसिंचितः ॥ २१ ॥ योनिरक्तेन संयुक्तं जरायुपरिवेष्टितम् । दिनेनैकेन कललं भूत्वा रूढत्वमाप्नुयात् ॥ २२ ॥ तत्पुनः पंचरात्रेण बुद्बुदाकारतामियात् । सप्तरात्रेण तदपि मांसपेशि-

त्याजवर ( अहंकारादिकांशी ) मिथ्या तादात्म्य आरोपिलें जातें, त्यामुळें तो जीव संज्ञा पावून 'मी देह आहें, मी कर्म करीत आहें,' अशा संकल्पानें सर्वदा कर्म करीत राहतो, मग त्यांच्या फलानीं बद्ध होऊन कर्मे चांगलीं वाईट असतील तदनुसार पराधीन होऊन उच्चनीच योनींत नित्य भ्रमण करीत राहतो. १६,१७ 'मी यज्ञदानादि पुष्कळ पुण्यकर्म केलें आहे, तरी स्वर्गांत जाऊन निश्चयानें मी सुख भोगीन,' असा तो संकल्प करितो. १८ असा अध्यास–चिंतन–सतत केल्यानें तो स्वर्गाला जाऊन मोठ्या सुखाचा चिरकाल उपभोग घेतो. परंतु तें त्याचें पुण्य क्षयाला गेलें की, त्याची इच्छा नसतांही, कर्मांच्या प्रेरणेनें तो अधोलोकीं येऊन पडतो. १९ (प्रथम) तो ( जीव ) चंद्रमंडलावर पडतो; तेथून पुनः दवाच्या संगती तो भूमीवर येऊन व्रीहि–तांदूळ–इत्यादि धान्यांत चिरकाळ वसती करितो. २० त्या धान्याचे चार प्रकारचे भोज्य पदार्थ होऊन ते पुरुष भक्षण करितात. त्यापासून रेत उत्पन्न होऊन त्याचा सेक ऋतुकालीं पुरुषाकडून स्त्रीच्या गर्भाशयामध्यें केला जातो. २१ पहिल्या दिवशीं तें रेत योनिरक्तानें मिश्रित होऊन आणि गर्भवेष्टनानें वेष्टिलें जाऊन कलल बनतें, आणि मग ( चिखलाप्रमाणें ) घट्ट होतें. २२ नंतर पांच रात्री गेल्यावर त्याला बुडबुड्यासारखा आकार प्राप्त होतो. सात रात्री झाल्या की, त्याची मांसपेशी

१. 'ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं । क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति.'–भ. गीता ९. २. भक्ष्य, भोज्य, चोष्य ( ऊंस वगैरे ), लेह्य ( श्रीखंड वगैरे ). ३. रुधिर आणि रेत यांचे मिश्रण. ४. पेशी–अंडाकार.

त्वमाप्नुयात् ॥ २३ ॥ पक्षमात्रेण सा पेशी रुधिरेण परिप्लुता । तस्या एवांकुरोत्पत्तिः पंचविंशतिरात्रिषु ॥ २४ ॥ ग्रीवा शिरश्च स्कंधश्च पृष्ठवंशस्तथोदरम् । पंचधांगानि चैकैकं जायंते मासतः क्रमात् ॥ २५ ॥ पाणिपादौ तथा पार्श्वः कटिर्जानु तथैव च । मासद्वयात्प्रजायंते क्रमेणैव न चान्यथा ॥ २६ ॥ त्रिभिर्मासैः प्रजायंते अंगानां संधयः क्रमात् । सर्वांगुल्यः प्रजायंते क्रमान्मासचतुष्टये ॥ २७ ॥ नासा कर्णौ च नेत्रे च जायंते पंचमासतः । दंतपंक्तिर्नखा गुह्यं पंचमे जायते तथा ॥२८॥ अर्वाक्षण्मासतश्छिद्रं कर्णयोर्भवति स्फुटम् । पायुर्मेढ्रमुपस्थं च नाभिश्चापि भवेन्नृणाम् ॥ २९ ॥ सप्तमे मासि रोमाणि शिरः केशास्तथैव च । विभक्तावयवत्वं च सर्वं संपद्यतेऽष्टमे ॥ ३० ॥ जठरे वर्धते गर्भः स्त्रिया एवं विहंगम । पंचमे मासि चैतन्यं जीवः प्राप्नोति सर्वशः ॥३१॥ नाभिसूत्राल्परंध्रेण मातृभुक्तान्नसारतः । वर्धते गर्भगः पिंडो न म्रियेत

बनते. २३ पंधरा दिवस ती पेशी रक्तानें भरलेली असते. पुढें पंचवीस रात्री होऊन गेल्या असतां तिच्यामध्येंच अंकुर उत्पन्न होतो. २४ मान, मस्तक, खांदा, पाठीचा कणा, आणि उदर ही पांच अंगें एक महिना झाला असता क्रमानें त्याला प्राप्त होतात. २५ दोन महिने झाले असतां क्रमानें हात, पाय, बरगड्या, कमर आणि गुडघे ही उत्पन्न होतात त्यांत अन्यथा कांहीं होत नाही. २६ तीन महिने झाले असतां क्रमानें अंगांचे सांधे उत्पन्न होतात. चवथ्या महिन्यांत त्याला क्रमानें सर्व बोटें येतात. २७ पांचव्या महिन्यांत नाक, कान, डोळे, दंतपंक्ति, नखें, गुह्यस्थान ही त्याला प्राप्त होतात. २८ सहाव्या महिन्याचे आरंभीं कानांचीं छिद्रें उद्भवतात. गुद, शिश्न, उपस्थ, आणि नाभि हे अवयव ह्याच महिन्यांत मनुष्यांना प्राप्त होतात. २९ सातव्या महिन्यांत रोमें आणि मस्तकावरील केस उद्भवतात. आठव्या महिन्यांत सर्व अवयव स्पष्टपणें वेगवेगळे उद्भवूं लागतात. ३० हे विहंगा! अशा प्रकारें स्त्रीच्या उदरांत गर्भ वाढत असतो. जीवाला पांचव्या महिन्यांतच चेतनाशक्ति प्राप्त होते. ३१ नाळाच्या सूक्ष्म रंध्रांतून, आईनें खाल्लेल्या अन्नांतील सार गर्भांतील पिंडास पोंचून त्याची वाढ होते,

१ जननेंद्रिय २ रोम–लोम–बारीक केस ३ पक्ष्या ( संपाते ).

स्वकर्मतः ॥ ३२ ॥ स्मृत्वा सर्वाणि जन्मानि पूर्वकर्माणि सर्वशः ।
जठरानलतप्तोऽयमिदं वचनमब्रवीत् ॥ ३३ ॥ नानायोनिसहस्रेषु जाय-
मानोऽनुभूतवान् । पुत्रदारादिसंबंधं कोटिशः पशुबाधवान् ॥ ३४ ॥
कुटुंबभरणासक्त्या न्यायान्यायैर्धनार्जनम् । कृतं नाकरवं विष्णुचिंतां
स्वप्नेऽपि दुर्भगः ॥ ३५ ॥ इदानीं तत्फलं भुंजे गर्भदुःखं महत्तरम् ।
अशाश्वते शाश्वतवद्देहे तृष्णासमन्वितः ॥ ३६ ॥ अकार्याण्येव कृतवान्न
कृतं हितमात्मनः । इत्येवं बहुधा दुःखमनुभूय स्वकर्मतः ॥ ३७ ॥
कदा निष्क्रमणं मे स्याद्गर्भान्निरयसन्निभात् । इत ऊर्ध्वं नित्यमहं विष्णु-

स्वतःच्या कर्मबलानें तो मरत नाही. ३२ मग (मातेच्या) जठरानलानें संतप्त झाल्यावर त्याला आपले सर्व पूर्वजन्म आणि त्यांतील कर्में आठवूं लागतात, आणि मग (पश्चात्तापानें) म्हणतो की, ३३ 'आजपर्यंत अनेक सहस्र योनींत जन्म घेतला, आणि पुत्र, स्त्रिया, इत्यादिकांचा संबंध, त्याचप्रमाणें पशुबांधव यांचें सुख हीं कोट्यावधि वेळां मी अनुभविलीं. ३४ कुटुंबपोषण करण्यांतच आसक्त होऊन गेल्यामुळें न्यायमार्गानें व अन्यायमार्गानेंही धनार्जन केलें, पण स्वप्नांत देखील कधीं मी विष्णूचें चिंतन केलें नाहीं. काय माझें दुर्दैव सांगावें ? ३५ आतां त्याचें फळ म्हणून हें अतिखडतर असें गर्भवासदुःख मी भोगीत आहें. नश्वर शरीराला मी शाश्वत मानिलें, (आशा) तृष्णांनीं व्याप्त होऊन अनेक निषिद्ध कार्यें आचरिलीं, आणि स्वतःचें असें कांहींच हित केलें नाहीं. त्यामुळें कृतकर्मांचें फळ म्हणून मला आजपर्यंत अनेक दुःखें भोगावीं लागलीं. ३६,३७ नरकसमान गर्भवासांतून माझी सुटका केव्हां बरें होईल ? ह्यापुढें मी नित्य विष्णूचेंच पूजन

१. समानार्थक उतारा:–' पुनरपि जननं पुनरपि मरणं पुनरपि जननीजठरे शयनम् '– चर्पटपंजारिका. २. एक सुंदर समानार्थक उतारा:–' चिरं ध्याता रामा क्षणमपि न रामप्रति- कृति', परं पीतं रामाधरमधु न रामाघ्रिसलिलम् । नता रुष्टा रामा यदरचि न रामाय विनतिर्गतं मे जन्माग्र्यं न दशरथजन्मा परिगत ' ॥–सुभाषितरत्नभांडागार. ३. सदृश वर्णन:–' ऐसिये कारागृही प्राणी । पडिला अत्यंत दाटणीं । कळवळोन म्हणे 'चक्रपाणी । सोडवीं येथून आतां॥ देवा सोडविसी येथून । तरी मी स्वहित करीन । गर्भवास हा चुकवीन । पुन्हां न ये येथें ॥–' दासबोध ३,२.

मेवानुपूजये ॥ ३८ ॥ इत्यादि चिंतयन् जीवो योनियंत्रप्रपीडितः । जायमानोऽतिदुःखेन नरकात्पातकी यथा ॥ ३९ ॥ पूतिव्रणान्निपतितः कृमिरेष इवापरः । ततो बाल्यादिदुःखानि सर्वे एवं विभुंजते ॥ ४० ॥ त्वया चैवानुभूतानि सर्वत्र विदितानि च । न वर्णितानि मे गृध्र यौवनादिषु सर्वतः ॥ ४१ ॥ एवं देहोऽहमित्यस्मादभ्यासान्निरयादिकम् । गर्भवासादिदुःखानि भवंत्यभिनिवेशतः ॥४२॥ तस्माद्देहद्वयादन्यमात्मानं प्रकृतेः परम् । ज्ञात्वा देहादिममतां त्यक्त्वात्मज्ञानवान् भवेत् ॥ ४३ ॥ जाग्रदादिविनिर्मुक्तं सत्यज्ञानादिलक्षणम् । शुद्धं बुद्धं सदा शांतमात्मानमवधारयेत् ॥ ४४ ॥ चिदात्मनि परिज्ञाते नष्टे मोहेऽज्ञसंभवे । देहः

करीत राहीन. ३८ असें चिंतीत आहे, तोंच त्याची जन्मवेळ येऊन तो योनिद्वारांत कासावीस होऊं लागतो. मग नरकांतून पातकी सुटावा, त्याप्रमाणें तो तेथून बाहेर पडतो. ३९ दुर्गंधीनें भरलेल्या व्रणांतून—योनिरूप क्षतांतून—तो एखाद्या किड्या'सारखा बाहेर पडतो. त्यानंतर बाल्यादि सर्व दुःखें प्राप्त होतात. अशा रीतीनें सर्व प्राण्यांना दुःख भोगावें लागतें. ४० गृध्रा! यौवनादि अवस्थांमध्यें ( भोगावी लागणारी ) दुःखें तूं भोगिली आहेस, व तीं सर्वांना ठाऊकही आहेत, म्हणून मी त्याचें वर्णन विस्तारानें केलें नाही. ४१ अशा रीतीनें 'देह मी' अशी मति उत्पन्न होऊन अभिमान उत्पन्न होतो, आणि त्यामुळें नरकादि यातना व गर्भवासादि दुःखें प्राप्त होतात. ४२ म्हणून आत्मा स्थूल व सूक्ष्म या दोनीही देहांहून वेगळा असून प्रकृतीच्याही परता आहे, असें जाणून प्राण्यानें देहादिकांवरची ममता सांडावी, आणि आत्मज्ञान—सारें विश्व आत्मरूप आहे हें ज्ञान—संपादावें. ४३ आत्म्याला जाग्रदादि अवस्था नाहीत, त्याचें स्वरूप सद्रूप, चिद्रूप व आनंदरूप आहे. तो सर्वदा शुद्ध, बुद्ध, शांत आहे, असें जाणावें. ४४ चैतन्यमय आत्मस्वरूपज्ञान होऊन अज्ञानापासून उत्पन्न होणारा मोह नष्ट झाला असतां, देह पडो

१. 'ऐसी दुखवोन प्रतिज्ञा केली । तंव जन्मवेळ पुढें आली । माता आक्रंदों लागली । प्रसूतिकाळीं ॥ नाकीं तोंडीं बैसलें मास । मस्तकद्वारें साडी श्वास । तेंही बुजलें विशेष । जन्मकाळीं ॥'— दासबोध ३,२. २. 'सन्त्यन्ये प्रतिबंधाः पुंसः संसारहेतवो दृष्टाः तेषामेवं मूल प्रथमविकारो भवत्यहंकारः'॥ विवेकचूडामणि. ३. जाग्रत्, स्वप्न, सुषुप्ति ह्या तीन अवस्था.

पततु वारब्धकर्मवेगेन तिष्ठतु ॥ ४५ ॥ योगिनो न हि दुःखं वा सुखं
वाज्ञानसंभवम् । तस्माद्देहेन सहितो यावत्प्रारब्धसंक्षयः ॥४६॥ तावत्तिष्ठ
सुखेन त्वं धृतकंचुकसर्पवत् । अन्यद्वक्ष्यामि ते पक्षिन् शृणु मे परमं हितम्
॥४७॥ त्रेतायुगे दाशरथिर्भूत्वा नारायणोऽव्ययः । रावणस्य वधार्थाय
दंडकानागमिष्यति ॥४८॥ सीतया भार्यया सार्धं लक्ष्मणेन समन्वितः ।
तत्राश्रमे जनकजां भ्रातृभ्यां रहिते वने ॥ ४९ ॥ रावणश्चोरवन्नीत्वा
लंकायां स्थापयिष्यति । तस्याः सुग्रीवनिर्देशाद्वानराः परिमार्गणे ॥५०॥
आगमिष्यंति जलधेस्तीरं तत्र समागमः । त्वया तैः कारणवशाद्भवि-
ष्यति न संशयः ॥ ५१ ॥ तदा सीतास्थितिं तेभ्यः कथयस्व यथा-
र्थतः । तदैव तव पक्षौ द्वावुत्पत्स्येते पुनर्नवौ ॥ ५२ ॥ संपाति-
रुवाच ॥ बोधयामास मां चंद्रनामा मुनिकुलेश्वरः । पश्यंतु पक्षौ मे
जातौ नूतनावतिकोमलौ ॥ ५३ ॥ स्वस्ति वोऽस्तु गमिष्यामि सीतां
द्रक्ष्यथ निश्चयम् । यत्नं कुरुध्वं दुर्लंघ्यसमुद्रस्य विलंघने ॥ ५४ ॥

अथवा प्रारब्धक्रमानुसार राहो, ज्ञान्याला अज्ञानजन्य दुःख किंवा सुख यांचा बाधा होत नाही. म्हणून प्रारब्धकर्माचा नाश होईपर्यंत अंगावर कांत धरून राहणाऱ्या सर्पाप्रमाणें देहाचा सांभाळ कर. हे पक्ष्या ! आणखी एक अत्यंत हिताची गोष्ट तुला सांगतों; ती ऐक. ४५,४६,४७ त्रेतायुगामध्यें निर्विकार नारायण[1] दशरथपुत्र होऊन रावणाच्या वधाकरितां दंडकारण्यांत येईल. ४८ त्याच्या बरोबर त्याची पत्नी सीता व (बंधु) लक्ष्मण ही येतील. (एक वेळ) त्या अरण्यात दोघेही बंधु नाहीत, अशी संधि साधून रावण चोरासारखा येऊन आश्रमांत असणाऱ्या सीतेला घेऊन जाईल, आणि लंकेंत ठेवील. पुढें सुग्रीवाच्या आज्ञेवरून तिचा शोध करीत वानर समुद्राच्या तीरावर येतील. तेथें कांहीं कारण घडून त्यांचा व तुझा समागम होईल, यांत संशय नाही. ४९,५०,५१ तेव्हां तूं त्यांना सीतेचें वर्तमान यथार्थतेनें सांग. म्हणजे तत्क्षणीं तुला पुनः दोन नवे पंख उत्पन्न होतील.' ५२ संपाती म्हणाला, 'त्या मुनिकुल-श्रेष्ठ चंद्रनामक मुनीनें मला असा उपदेश केला. हे पहा अत्यंत कोमल असे नवे फुटलेले माझे पंख ! ५३ तुमचें कल्याण असो ! मी आतां जातों. तुमच्या दृष्टीला सीता पडेल, यांत संशय नाही. हा दुर्लंघ्य समुद्र उल्लंघून जाण्याचा तुम्ही यत्न

१ 'आपो नारा इति प्रोक्ता आपो वै नरसूनव. । ता यदस्यायनं पूर्वं तेन नारायण स्मृतः ॥'

यन्नामस्मृतिमात्रतोऽपरिमितं संसारवारांनिधिं तीर्त्वा गच्छति दुर्जनोऽपि परमं विष्णोः पदं शाश्वतम् । तस्यैव स्थितिकारिणस्त्रिजगतां रामस्य भक्ताः प्रिया यूयं किं न समुद्रमात्रतरणे शक्ताः कथं वानराः ॥ ५५ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे किष्किंधाकांडे अष्टमः सर्गः ॥ ८ ॥

## किष्किंधाकांड, सर्ग नववा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ गते विहायसा गृध्रराजे वानरपुंगवाः । हर्षेण महताविष्टाः सीतादर्शनलालसाः ॥ १ ॥ ऊचुः समुद्रं पश्यंतो नक्रचक्रभयंकरम् । तरंगादिभिरुन्नद्धमाकाशमिव दुर्ग्रहम् ॥ २ ॥ परस्परमवोचन्वै कथमेनं तरामहे । उवाच चांगदस्तत्र शृणुध्वं वानरोत्तमाः ॥ ३ ॥ भवंतोऽत्यंतबलिनः शूराश्च कृतविक्रमाः । को वाऽत्र वारिधिं

करा. ५४ वानर हो ! ज्याचें केवळ नामस्मरण केलें असतां दुर्जन देखील अमर्याद संसारसमुद्राला तरून शाश्वत अशा परम विष्णुपदाला जातो, त्याच त्रैलोक्यपालक श्रीरामाचे तुम्ही भक्त असतां तुम्हांला सामान्य समुद्र तरून जातां येणार नाही, हें होईल तरी कसें ? ५५ ”

### किष्किंधाकांड, सर्ग आठवा समाप्त.

श्रीमहादेव म्हणाला, “ गृध्रराज—संपाति—आकाशमार्गानें निघून गेल्यावर सीतेला पाहण्याविषयी उत्कंठित अशा त्या वानरवीरांना अत्यंत हर्ष वाटला. १ जो सुसरींचे समुदायांनी भयंकर दिसत आहे, ज्याच्या लाटा सारख्या उसळत आहेत, ज्याला स्पर्श करणें म्हणजे आकाशाला गवसणी घालण्यासारखें कठीण, अशा त्या समुद्राला पाहून ते आपणांशीं म्हणाले, ‘ हा ( समुद्र ) आम्ही कसा तरून जाणार ? ’ त्यावर अंगद म्हणाला, ‘ वानरवीर हो ! ऐका ! २,३ तुम्ही अत्यंत बलवान्. आणि शूर आहां. तुम्ही अनेक पराक्रम गाजविले आहेत. तुम्हांमध्यें

१. वानर —वान—वनसंबंधि फलादिक गृह्णाति स वानरः । वनसंबंधि फलमूल खाणारा

तीर्त्वा राजकार्यं करिष्यति ॥ ४ ॥ एतेषां वानराणां स प्राणदाता न संशयः । अतोत्तिष्ठतु मे शीघ्रं पुरतो यो महाबलः ॥ ५ ॥ वानराणां च सर्वेषां रामसुग्रीवयोरपि । स एव पालको भूयान्नात्र कार्या विचारणा ॥ ६ ॥ इत्युक्ते युवराजेन तूष्णीं वानरसैनिकाः । आसन्नोचुः किंचिदपि परस्परविलोकिनः ॥ ७ ॥ अंगद उवाच ॥ उच्यतां वै बलं सर्वैः प्रत्येकं कार्यसिद्धये । केन वा साध्यते कार्यं जानीमस्तदनंतरम् ॥ ८ ॥ अंगदस्य वचः श्रुत्वा प्रोचुर्वीरा बलं पृथक् । योजनानां दशारभ्य दशोत्तरगुणं जगुः ॥ ९ ॥ शतादर्वाग्जांबवांस्तु प्राह मध्ये वनौकसाम् । पुरा त्रिविक्रमे देवे पादं भूमानलक्षणम् ॥ १० ॥ त्रिःसप्तकृत्वोऽहमगां प्रदक्षिणविधानतः । इदानीं वार्धकग्रस्तो न शक्नोमि

असा कोण आहे कीं, जो समुद्र उल्लंघून जाऊन राजकार्य करील. ४ तो ह्या सर्व वानरांचा प्राणदाता होईल, यांत संशय नाहीं. म्हणून जो कोणी असा बलवान् ( तुम्हांमध्यें ) असेल, त्यानें लवकर मजपुढें यावें. ५ तो सर्व वानरांचा, तसाच रामसुग्रीवांचाही पालक होईल, यांत संशय नको. ६ युवराजानें—अंगदानें—असें भाषण केल्यावर ते सर्व वानरयोद्धे एकमेकाकडे पाहात स्वस्थ राहिले. कोणी कांहीं बोलेना ! ७ त्यावर अंगद म्हणाला, ‘ तुम्हांपैकीं प्रत्येकानें ह्या कार्यसिद्ध्यर्थ आपापली शक्ति किती आहे, हें सांगावें; नंतर हें कार्य कोणाकडून तडीस जाईल, तें आपणांला समजून येईल.’ ८ अंगदाचें भाषण ऐकून त्या वीरांनीं पृथक् पृथक् आपापलें बळ सांगण्यास आरंभ केला. त्यांनी दहांपासून आरंभ करून एकानें ‘ दहा ’ दुसऱ्यानें ‘ वीस ’ तिसऱ्यानें ‘ तीस ’ योजनें उडेन, अशा रीतीनें एकाहून दहा योजनें दुसऱ्याचीं अधिक, या क्रमानें आपापली शक्ति सांगितली. ९ त्या वनचर मंडळींत जांबवान्[1] होता. त्यानें शंभरांअलीकडील संख्या—नव्वद योजनें—सांगितली. तो म्हणाला, ‘ पूर्वी वामनावतारीं देवाचें पाऊल पृथ्वीच्या लांबीरुंदीइतकें होतें. १० त्या पावलासभोंवती प्रदक्षिणेसारखा एकवीस वेळां मी वाटोळा फिरलों. परंतु सांप्रत वार्धक्यानें मी ग्रस्त झाल्यामुळें समुद्र उल्लंघून जाण्याची शक्ति माझ्यांत

१. हा अस्वलाचा राजा असून अत्यंत पराक्रमी होता. लंकेला वेढा घालण्याचे कामीं ह्याचा बराच उपयोग झाला होता.

विलंघितुम् ॥ ११ ॥ अंगदोऽप्याह मे गंतुं शक्यं पारं महोदधेः । पुन-
र्लंघनसामर्थ्यं न जानाम्यस्ति वा न वा ॥ १२ ॥ तमाह जांबवान्वी-
रस्त्वं राजा नो नियामकः । न युक्तं त्वां नियोक्तुं मे त्वं समर्थोऽसि
यद्यपि ॥ १३ ॥ अंगद उवाच ॥ एवं चेत्पूर्ववत्सर्वे स्वप्स्यामो
दर्भविष्टरे । केनापि न कृतं कार्यं जीवितुं च न शक्यते ॥ १४ ॥
तमाह जांबवान्वीरो दर्शयिष्यामि ते सुत । येनास्माकं कार्यसिद्धिर्भ-
विष्यत्यचिरेण च ॥ १५ ॥ इत्युक्त्वा जांबवान्प्राह हनूमंतमवस्थितम् ।
हनूमन्किं रहस्तूष्णीं स्थीयते कार्यगौरवे ॥ १६ ॥ प्राप्तेऽज्ञेनेव सामर्थ्यं
दर्शयाद्य महाबल । त्वं साक्षाद्वायुतनयो वायुतुल्यपराक्रमः ॥ १७ ॥
रामकार्यार्थमेव त्वं जनितोऽसि महात्मना । जातमात्रेण ते पूर्वं दृष्ट्वोद्यंतं
विभावसुम् ॥ १८ ॥ पक्वं फलं जिघृक्षामीत्युत्प्लुतं बालचेष्टया । योज-
नानां पंचशतं पतितोऽसि ततो भुवि ॥ १९ ॥ अतस्त्वद्बलमाहात्म्यं

नाही.' ११ नंतर अंगदही म्हणाला, 'मी महासागर ओलांडून जाईन, परंतु मला परत येववेल की नाही तें समजत नाही.' १२ त्यावर जांबवान् वीर त्याला म्हणाला, 'तूं शूर आहेस, तूं आमचा राजा असून आमचा नियंता आहेस. जरी तूं समर्थ आहेस, तरी ह्या कामी तुझी योजना करणें मला योग्य नाही.' १३ अंगद म्हणाला, 'असें जर आहे, तर आपण सर्व पूर्वीप्रमाणें दर्भासनांवर (प्राणत्यागाकारितां) बसूं या. कोणीच जर काम करणार नाही, तर जीवंत राहणें शक्य नाही.' १४ त्याला जांबवान् वीर म्हणाला, 'वत्सा! ज्याकडून आपली कार्यसिद्धि लवकर होईल, असा (वानर) मी तुला दाखवितों.' १५ असें बोलून तेथें असलेल्या मारुतीला जांबवान् म्हणाला, 'मारुते! या महत्वाच्या कार्यप्रसंगी तूं असा अज्ञानासारखा एकांतांत स्वस्थ बसला आहेस हें काय? महाबलिष्ठा! आज तुझें सामर्थ्य दाखीव. तूं साक्षात् वायूचा पुत्र असून पराक्रमानेंही वायूसारखाच आहेस.१६,१७ रामकार्यासाठींच तूं निर्माण झाला आहेस. पूर्वकाली तूं जन्माला आलास, तोंच उगवणारा सूर्य तुझ्या दृष्टीला पडला. महापराक्रमी तुला असें वाटलें कीं, हें कांहीं पिकलेलें फळ आहे, तें आपण घ्यावें. असा विचार करून तूं बाळलीलेनें पांचशें योजनें वर उंच उडी मारिलीस, आणि मग तेथून खालीं पडलास. १८,१९ म्हणून

को वा शक्नोति वर्णितुम् । उत्तिष्ठ कुरु रामस्य कार्यं नः पाहि सुव्रत ॥ २० ॥ श्रुत्वा जांबवतो वाक्यं हनूमानतिहर्षितः । चकार नादं सिंहस्य ब्रह्मांडं स्फोटयन्निव ॥ २१ ॥ बभूव पर्वताकारस्त्रिविक्रम इवापरः । लंघयित्वा जलनिधिं कृत्वा लंकां च भस्मसात् ॥ २२ ॥ रावणं सकुलं हत्वानेष्ये जनकनंदिनीम् । यद्वा बध्द्वा गले रज्ज्वा रावणं वामपाणिना ॥ २३ ॥ लंकां सपर्वतां धृत्वा रामस्याग्रे क्षिपाम्यहम् । यद्वा दृष्ट्वैव यास्यामि जानकीं शुभलक्षणाम् ॥ २४ ॥ श्रुत्वा हनुमतो वाक्यं जांबवानिदमब्रवीत् । दृष्ट्वैवागच्छ भद्रं ते जीवंतीं जानकीं शुभाम् ॥ २५ ॥ पश्चाद्रामेण सहितो दर्शयिष्यसि पौरुषम् । कल्याणं भवताद्भद्र गच्छतस्ते विहायसा ॥ २६ ॥ गच्छंतं रामकार्यार्थं वायुस्त्वामनुगच्छतु । इत्याशीर्भिः समामंत्र्य विसृष्टः प्लवगाधिपः

( मी म्हणतों ) तुझ्या बलाचें माहात्म्य कोण वर्णन करूं शकणार ? म्हणून हे सुव्रता ( मारुते ) ! ऊठ, रामाचें कार्य कर, आणि आम्हां सर्वांचें रक्षण कर.' २० जांबवताचें भाषण ऐकून मारुतीला अत्यानंद झाला. त्यानें सिंहनाद केला, त्यामुळें हा ब्रह्मांडगोलाचा जणुं काय स्फोट करीत आहे की काय, असें सर्वांना वाटलें. २१ तो पर्वताकार बनला. तें स्वरूप पाहून हा दुसरा त्रिविक्रम[1]च आहे असा भास झाला. (तो बोलला,) ' समुद्र उल्लंघून लंका जाळूं काय ? २२ रावणाचा सकुटुंब वध करून जानकीला आणूं ? किंवा रावणाच्या गळ्यांत दोरी बांधून डाव्या हातानें पर्वतासह लंकानगरी उचलून ती रामापुढें आणून टाकूं ? किंवा त्या सुलक्षणी जानकीला केवळ पाहून येऊं ?' २३,२४ हनुमंताचें भाषण ऐकून जांबवंत बोलला की, ती शुभलक्षणा जानकी जीवंत आहे, इतकेंच पाहून ये. तुझें कल्याण असो. २५ पुढें रामाच्या बरोबर जाऊन आपला पराक्रम दाखीव. मित्रा ! आकाशमार्गानें जातांना तुझें कल्याण होवो ! २६ रामकार्याकरितां जात असतां वायु तुझ्या मागून येवो !' जांबवंतानें असे आशीर्वाद दिल्यावर त्या वानरवीरांनी

१. दशावतारांतील पांचवा अवतार वामन यानें त्रिपाद भूमि दानशूर बलिराजाकडे मागून दोन पावलांत सर्व भूमि व्यापली, व तिसरे पाऊल बलीच्या मस्तकावर ठेवून त्यास पाताळांत लोटून दिलें. या पराक्रमावरून त्याला ' त्रिविक्रम ' असें नाव पडलें.

महेंद्राद्रिशिरो गत्वा बभूवाद्भुतदर्शनः ॥ २७ ॥ महानगेंद्रप्रतिमो महात्मा सुवर्णवर्णोऽरुणचारुवक्त्रः । महाफणींद्राभसुदीर्घबाहुर्वातात्मजोऽदृश्यत सर्वभूतैः ॥ २८ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे किष्किंधाकांडे नवमः सर्गः ॥ ९ ॥

(मारुतीला) निरोप दिला. नंतर मारुति महेंद्रपर्वताच्या शिखरावर गेला. तेथें त्याचें तें अद्भुत स्वरूप पाहून सर्वांना आश्चर्य वाटलें. २७ या वेळी महापर्वताऐशा देहाचा, सुवर्णासमान अंगकांतीचा, रक्त व सुंदर मुखाचा, मोठ्या नागराजासमान दीर्घ बाहूंचा, असा तो पवनतनय महात्मा मारुति सर्व प्राण्यांच्या नजरेस पडला. २८ ”

किष्किंधाकांड, सर्ग नववा समाप्त.



# अथ सुंदरकांडप्रारंभः ।

## सुंदरकांड, सर्ग पहिला.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ शतयोजनविस्तीर्णं समुद्रं मकरालयम् । लिलंघयिषुरानंदसंदोहो मारुतात्मजः ॥ १ ॥ ध्यात्वा रामं परात्मानमिदं वचनमब्रवीत् । पश्यंतु वानराः सर्वे गच्छंतं मां विहायसा ॥ २ ॥ अमोघं रामनिर्मुक्तं महाबाणमिवाखिलाः । पश्याम्यद्यैव रामस्य पत्नीं जनकनंदिनीम् ॥ ३ ॥ कृतार्थोऽहं कृतार्थोऽहं पुनः पश्यामि राघवम् । प्राणप्रयाणसमये यस्य नाम सकृत्स्मरन् ॥ ४ ॥ नरस्तीर्त्वा भवांभोधिमपारं याति तत्पदम् । किं पुनस्तस्य दूतोऽहं तदंगांगुलिमुद्रिकः ॥ ५ ॥ तमेव हृदये ध्यात्वा लंघयाम्यल्पवारिधिम् । इत्युक्त्वा हनुमान्बाहू प्रसार्यायतवालधिः ॥ ६ ॥ ऋजुग्रीवोर्ध्वदृष्टिः सन्नाकुंचितपदद्वयः ।

श्रीशंकर म्हणाला, " शंभर योजनें—चारशें कोस—लांब पसरलेला समुद्र, त्यांत मकरादिकांची वस्ती, तरी पण आनंदाचें निधानच की काय, अशा त्या वायुपुत्र मारुतीनें तो उल्लंघून जाण्याचा विचार केला. १ परमात्म रामाचें ध्यान करून तो म्हणाला की, ' रामाच्या अमोघ—कधींही व्यर्थ न जाणाऱ्या—बाणाप्रमाणें मी आकाशमार्गानें जात आहें; मला सर्व वानर पाहोत. सर्व वानर हो ! आजच जनकनंदिनी—रामपत्नी—माझ्या दृष्टीस पडेल. २,३ मग मला कृतकृत्य झाल्यासारखें वाटेल. कृतार्थ होतसाता मी पुनः श्रीरामाला भेटेन. प्राणप्रयाणसमयीं ज्याचे नामाचें एकवार स्मरण झालें, तरी देखील मनुष्य अपार संसारसमुद्राला तरून जाऊन त्याच्या पदीं प्राप्त होतो. मी तर त्याचा दूत आहें. मग माझी गोष्ट कशाला ? तसेंच त्याच्या अवयवरूप अंगुलीतील मुद्रिकाही मजजवळ आहे. ४,५ त्याचेंच ध्यान करून मी ह्या अल्प समुद्राला तरून जाईन. ' असें म्हणून मारुतीनें बाहू पसरिले व पच्छ लांब केलें. ६ त्या पवनतल्य ( पराक्रमी ) मारुतीनें मान सरळ करून, वर

१. नामस्मरणमाहात्म्य—' नामे संकटे नासती । नामे विघ्नें निवारती । नामस्मरणे पाविजेती । उत्तम पदें ' ॥—रामदास.

दक्षिणाभिमुखस्तूर्णं पुप्लुवेऽनिलविक्रमः ॥ ७ ॥ आकाशात्त्वरितं देवै-
र्वीक्ष्यमाणो जगाम सः । दृष्ट्वाऽनिलसुतं देवा गच्छंतं वायुवेगतः ॥८॥
परीक्षणार्थं सत्त्वस्य वानरस्येदमब्रुवन् । गच्छत्येष महासत्त्वो वानरो
वायुविक्रमः ॥ ९ ॥ लंकां प्रवेष्टुं शक्तो वा न वा जानीमहे बलम् ।
एवं विचार्य नागानां मातरं सुरसाभिधाम् ॥ १० ॥ अब्रवीद्देवतावृंदः
कौतूहलसमन्वितः । गच्छ त्वं वानरेंद्रस्य किंचिद्विघ्नं समाचर ॥ ११ ॥
ज्ञात्वा तस्य बलं बुद्धिं पुनरेहि त्वरान्विता । इत्युक्ता सा ययौ शीघ्रं
हनुमद्विघ्नकारणात् ॥ १२ ॥ आवृत्य मार्गं पुरतः स्थित्वा वानरमब्रवीत् ।
एहि मे वदनं शीघ्रं प्रविशस्व महामते ॥ १३ ॥ देवैस्त्वं कल्पितो
भक्षः क्षुधासंपीडितात्मनः । तामाह हनुमान्मातरहं रामस्य शासनात्
॥ १४ ॥ गच्छामि जानकीं द्रष्टुं पुनरागम्य सत्वरः । रामाय कुशलं
तस्याः कथयित्वा त्वदाननम् ॥ १५ ॥ निवेक्ष्ये देहि मे मार्गं सुरसायै

दृष्टि लावून, आणि दोन्ही पाय आंखडून दक्षिणेकडे तोंड केलें व एकदम उडी मारिली. ७ तो जाऊं लागला असतां आकाशांतील देवांची दृष्टि त्याजवर पडली. वायुवेगानें जाणाऱ्या पवनतनयाला—मारुतीला—पाहून त्याची शक्ति कसोटीला लावण्याची इच्छा होऊन ते म्हणाले, 'हा महाबुद्धिमान् व वायुपराक्रमी वानर चालला आहे,' ९ तर लंकेंत प्रवेश करण्याला हा समर्थ आहे किंवा नाहीं, हें पाहण्याकरितां ह्याच्या सामर्थ्याची आपण परीक्षा करूं या.' असा विचार करून नागांची आई सुरसा हिला ते सर्व देव मोठ्या उत्सुकतेनें म्हणाले कीं, 'तूं जा, आणि या वानरश्रेष्ठाला कांहीं तरी विघ्न कर. १०,११ त्याचें सामर्थ्य आणि बुद्धि हीं कशी काय आहेत, हें पाहून परत ये.' देवांनी असें सांगितल्यावरून ती ( सुरसा ) हनुमंताला विघ्न करण्याच्या उद्देशानें निघाली. १२ मारुतीचा मार्ग अडवून ती त्याच्यापुढें उभी राहिली आणि म्हणाली, हे महाबुद्धिमंता ! ये, आणि माझ्या मुखांत लवकर प्रवेश कर. १३ माझे प्राण क्षुधेनें व्याकुळ झाले आहेत, तेव्हां देवांनीच माझें भक्ष्य म्हणून तुझी योजना केली असली पाहिजे.' तिला हनुमंत म्हणाला, 'माते ! रामाच्या आज्ञेवरून मी जानकीला शोधण्याकरितां जात आहें; मी लवकरच परत येईन. आधीं रामाला तिचें कुशल कळवितों, आणि मग परत आल्यावर तुझ्या मुखांत शिरतों. माझा रस्ता सोड. तुला सुरसेला

नमोऽस्तु ते । इत्युक्त्वा पुनरेवाह सुरसा क्षुधितास्म्यहम् ॥ १६ ॥
प्रविश्य गच्छ मे वक्त्रं नो चेत्त्वां भक्षयाम्यहम् । इत्युक्तो हनुमानाह
मुखं शीघ्रं विदारय ॥ १७ ॥ प्रविश्य वदनं तेऽद्य गच्छामि त्वरया-
न्वितः । इत्युक्त्वा योजनायामदेहो भूत्वा पुरः स्थितः ॥ १८ ॥
दृष्ट्वा हनूमतो रूपं सुरसा पंचयोजनम् । मुखं चकार हनुमान्
द्विगुणं रूपमादधत् ॥ १९ ॥ ततश्चकार सुरसा योजनानां च विंशतिम् ।
वक्त्रं चकार हनुमांस्त्रिंशद्योजनसंमितम् ॥ २० ॥ ततश्चकार सुरसा
पंचाशद्योजनायतम् । वक्त्रं तदा हनूमांस्तु बभूवांगुष्ठसन्निभः ॥ २१ ॥
प्रविश्य वदनं तस्याः पुनरेत्य पुरः स्थितः । प्रविष्टो निर्गतोऽहं ते वदनं
देवि ते नमः ॥ २२ ॥ एवं वदंतं दृष्ट्वा सा हनूमंतमथाब्रवीत् । गच्छ
साधय रामस्य कार्यं बुद्धिमतां वर ॥ २३ ॥ देवैः संप्रेषिताहं ते बलं
जिज्ञासुभिः कपे । दृष्ट्वा सीतां पुनर्गत्वा रामं द्रक्ष्यसि गच्छ भोः ॥२४॥

माझा नमस्कार असो. मारुतीनें असें सांगितल्यावर सुरसा पुनः म्हणाली, 'मी क्षुधित झाल्यें आहें. १४,१५,१६ माझ्या मुखांत प्रवेश करून ( सुटल्यास ) मग तूं जा. नाही तर मी तुला खाऊन टाकीन.' असें तिनें सांगितल्यावर मारुति तिला म्हणाला, 'उघड लवकर तुझें तोंड. १७ तुझ्या तोंडांत शिरून आतां मी सत्वर निघून जातों.' असें बोलून योजनाइतका लांब देह करून तो ( तिच्या ) पुढें उभा राहिला. १८ हनुमंताचें तें रूप पाहून सुरसेनें आपलें मुख पांच योजनां-इतकें मोठें केलें. हनुमंतानें आपलें शरीर दुप्पट मोठें केलें. १९ त्यावर सुरसेनें आपलें मुख वीस योजनांइतकें लांब केलें. मारुतीनेंही आपलें शरीर तीस योजनां-इतकें ( मोठें ) केलें. २० सुरसेनें नंतर आपलें तोंड पन्नास योजनें लांब केलें. इतक्यांत मारुतीनें आपल शरीर आंगठ्याइतकें लहान केलें. २१ तो तिच्या मुखांत शिरला आणि पुनः बाहेर येऊन तिच्यापुढें उभा राहिला. (तो तिला म्हणाला ) 'देवि! तुझ्या तोंडांत प्रवेश करून हा मी बाहेर आलों. तुला नमस्कार करितों.' २२ असें बोलणाऱ्या मारुतीकडे पाहून ती त्याला म्हणाली, 'तूं बुद्धिमंतांमध्यें श्रेष्ठ आहेस; जा, रामाचें कार्य सिद्धीला ने. २३ वानरा! देवांनी तुझें सामर्थ्य जाणण्याच्या इच्छेनें मला पाठविलें होतें. अरे! सीतेला भेटून तूं आतां पुनः रामाकडे जाशील ( हें सत्य

इत्युक्त्वा सा ययौ देवलोकं वायुसुतः पुनः । जगाम वायुमार्गेण गरुत्मानिव पक्षिराट् ॥ २५ ॥ समुद्रोऽप्याह मैनाकं मणिकांचनपर्वतम् । गच्छत्येष महासत्त्वो हनूमान्मारुतात्मजः ॥ २६ ॥ रामस्य कार्यसिद्ध्यर्थं तस्य त्वं सचिवो भव । सगरैर्वर्धितो यस्मात्पुराहं सागरोऽभवम् ॥ २७ ॥ तस्यान्वये बभूवासौ रामो दाशरथिः प्रभुः । तस्य कार्यार्थसिद्ध्यर्थं गच्छत्येष महाकपिः ॥ २८ ॥ त्वमुत्तिष्ठ जलात्तूर्णं त्वयि विश्राम्य गच्छतु । स तथेति प्रादुरभूज्जलमध्यान्महोन्नतः ॥२९॥ नानामणिमयैः शृंगैस्तस्योपरि नराकृतिः । प्राह यांतं हनूमंतं मैनाकोऽहं महाकपे ॥ ३० ॥ समुद्रेण समादिष्टस्त्वद्विश्रामाय मारुते । आगच्छामृतकल्पानि जग्ध्वा पक्वफलानि मे ॥ ३१ ॥ विश्रम्यात्र क्षणं पश्चाद्गमिष्यसि यथासुखम् । एवमुक्तोऽथ तं प्राह हनूमान्मारुतात्मजः ॥३२॥

आहे). जा तूं आतां.' २४ असें बोलून ती देवलोकाला गेली. वायुपुत्र पुनः पक्षिराज गरुडाप्रमाणें वायुमार्गानें पुढें निघाला. २५ इकडे समुद्रानेंही रत्नकांचनांच्या शिखरांनी शोभणाऱ्या मैनाक पर्वताला सांगितलें की, 'हा महासामर्थ्यवान् वायुपुत्र हनुमान् रामकार्याच्या सिद्धीकरितां जात आहे, तरी तूं त्याला सहाय हो. पूर्वी मला सगरांनी वाढविलें, म्हणून मी 'सागर' झालों आहें. २६,२७ त्याच्या वंशांत हा दशरथपुत्र श्रीराम झाला आहे, आणि त्याच्या—रामाच्या—कार्यसिद्धीकरितां हा महावानर जात आहे. २८ तूं लवकर (पाण्यांतून) वर निघून ये, म्हणजे हा तुझ्या ठिकाणीं—शिखरावर—विश्रांति घेऊन पुढें जाईल.' 'बरें आहे' असें म्हणून तो (मैनाक) अतिशय उंच होऊन पाण्यावर प्रगट झाला. २९ त्यावर अनेक मणिमय शिखरें असून एक मनुष्याकृति होती. तो मनुष्याकार पर्वत (आकाशमार्गें) जाणाऱ्या हनुमंताला म्हणाला, 'वानरश्रेष्ठा! मी मैनाक पर्वत आहें. ३० मारुते! तुला विसांवा देण्याला मला समुद्रानें आज्ञा केली आहे. तर ये आणि माझ्या (पृष्ठभागावरील) पिकलेली अमृततुल्य फळें खा. ३१ क्षणभर येथें विश्रांति घे. आणि मग खुशाल जा.' असें तो—मैनाक—बोलला असतां वायुपुत्र हनुमान त्याला म्हणाला. ३२

१. हा मैनाक पर्वत समुद्रामध्ये प्रथमतः जलाच्छादित असून त्याचीं शिखरें रत्नाचीं व सुवर्णाचीं होती, नंतर समुद्राच्या विनंतीवरून रामकार्यार्थ निघालेल्या मारुतीला विसावा देण्याकरितां तो मैनाक अतिशय उंच होऊन पाण्यावर प्रगट झाला, अशी कथा आहे.

गच्छतो रामकार्यार्थं भक्षणं मे कथं भवेत् । विश्रामो वा कथं मे स्याद्गंतव्यं त्वरितं मया ॥ ३३ ॥ इत्युक्त्वा स्पृष्टशिखरः कराग्रेण ययौ कपिः । किंचिद्दूरं गतस्यास्य छायां छायाग्रहोऽग्रहीत् ॥ ३४ ॥ सिंहिका नाम सा घोरा जलमध्ये स्थिता सदा । आकाशगामिनां छायामाक्रम्याकृष्य भक्षयेत् ॥ ३५ ॥ तया गृहीतो हनुमांश्चिंतयामास वीर्यवान् । केनेदं मे कृतं वेगरोधनं विघ्नकारिणा ॥ ३६ ॥ दृश्यते नैव कोऽप्यत्र विस्मयो मे प्रजायते । एवं विचिंत्य हनूमानधो दृष्टिं प्रसारयत् ॥ ३७ ॥ तत्र दृष्ट्वा महाकायां सिंहिकां घोररूपिणीम् । पपात सलिले तूर्णं पद्भ्यामेवाहनद्रुषा ॥ ३८ ॥ पुनरुत्प्लुत्य हनुमान्दक्षिणाभिमुखो ययौ । ततो दक्षिणमासाद्य कूलं नानाफलद्रुमम् ॥३९॥ नानापक्षिमृगाकीर्णं नानापुष्पलतावृतम् । ततो ददर्श नगरं त्रिकूटाचल-

'रामकार्याकरितां मी जात असतां मला जेवण कुठून सुचणार ? विश्रांतिही मी कशी घेणार? मला त्वरेनें गेलें पाहिजे.' ३३ असें बोलून कराग्रानें पर्वतशिखराला त्यानें स्पर्श केला व मग तो पुढें गेला. थोडें दूर तो गेला, तोंच त्याची छाया एका छायाग्रहानें धरून ओढिली. ३४ हा छायाग्रह म्हणजे सदोदित पाण्यांत राहणारी सिंहिका नांवाची एक भयंकर (राक्षसी) होती. आकाशमार्गानें जाणाऱ्यांची छाया धरून त्यांना खालीं ओढावें व भक्षण करावें असा तिचा क्रम असे. ३५ तिनें त्याला धरिलें, तेव्हां त्या वीर्यशाली मारुतीनें विचार केला, 'माझ्या वेगाला प्रतिबंध करून (रामकार्यांत) विघ्न आणणारा हा कोण बरें असावा? ३६ येथें कोणीच दिसत नाहीं, त्यामुळें मला आश्चर्य वाटत आहे.' असा विचार करून मारुतीनें खाली दृष्टि फेंकली, तों धिप्पाड शरीराची, भयंकर स्वरूपाची, ती सिंहिका त्याच्या दृष्टीस पडली. (मारुतीनें) ताबडतोब पाण्यांत उडी टाकिली, आणि मोठ्या संतापानें लत्तांचे प्रहारांनी त्यानें तिचा वध केला. ३७,३८ पुनः वर आकाशांत उड्डाण करून व दक्षिणाभिमुख होऊन हनुमान् पुढें निघाला, आणि दक्षिणतीरावर येऊन पोंचला. येथें फळांनी भरगच्च भरलेले नानाप्रकारचे वृक्ष होते; ३९ चित्रविचित्र पक्षी व पशु ठिकठिकाणी संचार करीत असून अनेक जातींच्या पुष्पलतांनीं तें स्थान व्याप्त झालें होतें. नंतर त्रिकूट पर्वताच्या शिखरावर त्याला एक नगर

१. छायाग्रह=प्राण्याला त्याची छाया-सावली-धरून ओढणारें पिशाच.

**मूर्धनि ॥ ४० ॥ प्राकारैर्बहुभिर्युक्तं परिखाभिश्च सर्वतः । प्रवेक्ष्यामि कथं लंकामिति चिंतापरोऽभवत् ॥ ४१ ॥ रात्रौ वेक्ष्यामि सूक्ष्मोऽहं लंकां रावणपालिताम् । एवं विचिंत्य तत्रैव स्थित्वा लंकां जगाम सः ॥ ४२ ॥ धृत्वा सूक्ष्मं वपुर्द्वारं प्रविवेश प्रतापवान् । तत्र लंकापुरी साक्षाद्राक्षसीवेषधारिणी ॥ ४३ ॥ प्रविशंतं हनूमंतं दृष्ट्वा लंका व्यतर्जयत् । कस्त्वं वानररूपेण मामनादृत्य लंकिनीम् ॥ ४४ ॥ प्रविश्य चोरवद्रात्रौ किं भवान्कर्तुमिच्छति । इत्युक्त्वा रोषताम्राक्षी पादेनाभिजघान तम् ॥ ४५ ॥ हनुमानपि तां वाममुष्टिनावज्ञयाहनत् । तदैव पतिता भूमौ रक्तमुद्वमती भृशम् ॥ ४६ ॥ उत्थाय प्राह सा लंका हनूमंतं महाबलम् । हनूमन् गच्छ भद्रं ते जिता लंका त्वयानघ॥४७॥ पुराहं ब्रह्मणा प्रोक्ता ह्यष्टाविंशतिपर्यये । त्रेतायुगे दाशरथी रामो नारा-**

दृष्टीस पडलें. ४० त्याच्या सभोंवार अनेक तट असून त्या तटांसभोंवती सर्वत्र खंदक होते. ( तें पाहून ) आपला प्रवेश लंकेंत कसा होणार, ही काळजी मारुतीच्या मनांत उद्भवली. ४१ 'रात्रीच्या वेळीं सूक्ष्म रूप धारण करून रावण राज्य करीत असणाऱ्या ह्या लंकेंत आपण प्रवेश करावा,' असा विचार करून ( रात्र पडेपर्यंत ) तो तेथेंच राहिला, आणि मग तेथून लंकेला जाण्याला निघाला. ४२ सूक्ष्मरूप धारण करून त्या प्रतापशाली मारुतीनें लंकानगराच्या द्वारांत प्रवेश केला. तेथें राक्षसीचा वेष धारण करून साक्षात् लंकापुरी[1] बसलेली होती. ४३ हनुमान् आंत प्रवेश करीत आहे, असें पाहून तिनें त्याला भीति दाखवून म्हटलें, 'मी लंकिनी येथें बसल्यें असतां माझा अनादर करणारा तूं कोण आहेस? चोरासारखा रात्रीच्या वेळीं वानररूपानें आंत शिरून तुझ्या मनांत काय करावयाचें आहे?' असें बोलून, क्रोधानें डोळे लाल झाले आहेत, अशा लंकिनीनें त्या ( मारुती ) ला लाथ मारिली. ४४,४५ हनुमंतानेंही तिची अवज्ञा करून डाव्या मुठीनें तिजवर प्रहार केला. त्यामुळें ती तत्काळ जमिनीवर पडली, आणि सारखी रक्त ओकूं लागली. ४६ ( सावध झाल्यावर ) ती लंका उठली व त्या बलवान् मारुतीला म्हणाली, 'हे निष्पाप हनुमंता! तुझें कल्याण असो! तूं जा. तूं लंकेला जिंकिलें आहेस. ४७ पूर्वी मला ब्रह्मदेवानें सांगितलें होतें की, 'अठ्ठाविसाव्या पर्यायांत[2] त्रेतायुगामध्यें

१ लंकानगरीची प्रत्यक्ष अधिदेवता. २. कृत, त्रेता, द्वापर आणि कलि ही चार युगें संपली असतां एक पर्यय—चौकडी—होतो.

यणोऽव्ययः ॥ ४८ ॥ जनिष्यते योगमाया सीता जनकवेश्मनि । भूभारहरणार्थाय प्रार्थितोऽयं मया क्वचित् ॥ ४९ ॥ सभार्यो राघवो भ्रात्रा गमिष्यति महावनम् । तत्र सीतां महामायां रावणोऽपहरिष्यति ॥ ५० ॥ पश्चाद्रामेण साचिव्यं सुग्रीवस्य भविष्यति । सुग्रीवो जानकीं द्रष्टुं वानरान्प्रेषयिष्यति ॥ ५१ ॥ तत्रैको वानरो रात्रावागमिष्यति तेंऽतिकम् । त्वया च भर्त्सितः सोऽपि त्वां हनिष्यति मुष्टिना ॥ ५२ ॥ तेनाहता त्वं व्यथिता भविष्यसि यदानघे । तदैव रावणस्यांतो भविष्यति न संशयः ॥ ५३ ॥ तस्मात्त्वया जिता लंका जितं सर्वं त्वयानघ । रावणांतःपुरवरे क्रीडाकाननमुत्तमम् ॥ ५४ ॥ तन्मध्येऽशोकवनिका दिव्यपादपसंकुला । अस्ति तस्यां महावृक्षः शिंशपा नाम मध्यगः ॥ ५५ ॥ तत्रास्ते जानकी घोरराक्षसीभिः सुरक्षिता । दृष्ट्वैव गच्छ त्वरितं राघवाय निवेदय ॥ ५६ ॥ धन्याहमप्यद्य चिराय राघवस्म-

निर्विकार नारायण रामरूपानें दशरथपुत्र होणार आहे. ४८ योगमायाही जनकगृहीं सीतारूपानें जन्माला येणार आहे. कारण मी एकदां भूभार हरण करण्याकरितां त्याची प्रार्थना केली होती. ४९ आपल्या पत्नीला आणि बंधूला घेऊन श्रीराम महावनाला जाईल. तेथें महामाया सीतेचें रावण हरण करील. ५० नंतर रामाशी सुग्रीवाचें सख्य होऊन सुग्रीव जानकीच्या शोधासाठी वानर पाठवील. ५१ तेव्हां एक वानर रात्रीच्या वेळी तुजजवळ येईल. तूं त्याला धमकी देशील, आणि तो तुला मुष्टिप्रहार करील. ५२ हे अनघे ! त्याच्या प्रहारानें तूं व्यथित होशील, तेव्हांच रावणाचा नाश होईल, यांत संशय नाही.' ५३ ज्या अर्थी तूं लंका जिंकिली आहेस, त्या अर्थी हे पुण्यशीला ! तूं सर्व कांही जिंकिले आहेस. रावणाच्या सुंदर अंतःपुरानजीक एक उत्तम क्रीडोद्यान आहे. ५४ त्याच्या मध्यभागी दिव्यवृक्षांनीं दाटलेली अशी अशोकवनिका आहे, व तिच्या मध्यभागी शिंशपा नांवाचा एक मोठा वृक्ष आहे. ५५ तेथें ( त्या वृक्षाखालीं ) जानकी आहे. तिच्या संरक्षणाकारितां भयंकर राक्षसिणी ठेविल्या आहेत. तूं तिला भेट आणि मग तावडतोब जाऊन ती गोष्ट श्रीरामाला कळीव. ५६ संसारपाशांतून मुक्त करणारी रामचंद्रस्मृति मला

१. लक्ष्मी. २. क्रीडेसाठीं केलेलें उपवन–बाग. ३. स्वर्गीय वृक्षानीं दाट भरलेली. ४. कोणी ह्याला ' अशोक ' वृक्षही म्हणतात.

तिर्ममासीद्भवपाशमोचनी । तद्भक्तसंगोऽप्यतिदुर्लभो मम प्रसीदतां दाशरथिः सदा हृदि ॥ ५७ ॥ उल्लंघितेऽब्धौ पवनात्मजेन धरासुतायाश्च दशाननस्य । पुस्फोर वामाक्षि भुजश्च तीव्रं रामस्य दक्षांगमतींद्रियस्य ॥ ५८ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे सुंदरकांडे प्रथमः सर्गः ॥ १ ॥

## सुंदरकांड, सर्ग दुसरा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ ततो जगाम हनुमान् लंकां परमशोभनाम् । रात्रौ सूक्ष्मतनुर्भूत्वा बभ्राम परितः पुरीम् ॥ १ ॥ सीतान्वेषणकार्यार्थी प्रविवेश नृपालयम् । तत्र सर्वप्रदेशेषु विविच्य हनुमान्कपिः ॥ २ ॥ नापश्यज्जानकीं स्मृत्वा ततो लंकाभिभाषितम् । जगाम हनुमान् शीघ्रमशोकवनिकां शुभाम् ॥ ३ ॥ सुरपादपसंबाधां रत्नसोपान-

झाली, तसेंच अत्यंत दुर्लभ असा त्याच्या भक्तांचा समागमही मला घडला, म्हणून मला मोठी धन्यता वाटते. तो दाशरथि राम माझ्या हृदयांत सदा प्रसन्नतेनें राहो.' ५७ मारुति समुद्र ओलांडून गेला, त्याच वेळी सीतेचा आणि दशाननाचा—रावणाचा—डावा डोळा आणि डावा हात अत्यंत स्फुरण पावूं लागला. तसेंच त्या अतींद्रिय रामाचेंही उजवें अंग स्फुरण पावूं लागलें. ५८"

**सुंदरकांड, प्रथम सर्ग समाप्त.**

श्रीशंकर म्हणाला, "नंतर मारुति त्या परम सुंदर अशा लंकेंत शिरला. रात्रीच्या वेळीं सूक्ष्म रूप धारण करून तो नगरात सर्वत्र फिरला. १ सीतेचा शोध करण्याच्या इच्छेनें तो (मारुति) राजवाड्यांत शिरला. त्यानें तेथील सर्व प्रदेश शोधून पाहिले, २ तरी त्याला सीता कोठेंच दिसेना. तेव्हां त्याला लंकिनीच्या भाषणाची आठवण झाली. लागलाच तो त्या रमणीय अशोकवनांत गेला. ३ त्या

१ पुरुषाचे उजवें अंग व बायकाचें डावें अंग स्फुरण पावणें म्हणजे शुभशकुन होय, असे मानतात.

वापिकाम् । नानापक्षिमृगाकीर्णां स्वर्णप्रासादशोभिताम् ॥ ४ ॥ फलै-
रानम्रशाखाग्रपादपैः परिवारिताम् । विचिन्वन् जानकीं तत्र प्रतिवृक्षं
मरुत्सुतः ॥ ५ ॥ ददर्शाभ्रंलिहं तत्र चैत्यप्रासादमुत्तमम् । दृष्ट्वा विस्म-
यमापन्नो मणिस्तंभशतान्वितम् ॥ ६ ॥ समतीत्य पुनर्गत्वा किंचिद्दूरं
स मारुतिः । ददर्श शिंशपावृक्षमत्यंतनिबिडच्छदम् ॥ ७ ॥ अदृष्टातप-
माकीर्णस्वर्णवर्णविहंगमम् । तन्मूले राक्षसीमध्ये स्थितां जनकनंदि-
नीम् ॥ ८ ॥ ददर्श हनुमान् वीरो देवतामिव भूतले । एकवेणीं कृशां
दीनां मलिनांबरधारिणीम् ॥ ९ ॥ भूमौ शयानां शोचंतीं राम रामेति
भाषिणीम् । त्रातारं नाधिगच्छंतीमुपवासकृशां शुभाम् ॥ १० ॥
शाखांतच्छदमध्यस्थो ददर्श कपिकुंजरः । कृतार्थोऽहं कृतार्थोऽहं दृष्ट्वा

ठिकाणीं सर्वत्र देवतरू गच्च लागून गेले होते, ठिकठिकाणी विहिरी असून त्यांना रत्नांच्या पायऱ्या होत्या. विविध पशुपक्षी जिकडे तिकडे सर्वत्र व्यापून राहिले होते. अनेक सुवर्णमंदिरांनीं त्या स्थलाला फारच शोभा आली होती. ४ सभोंवार वृक्षांच्या राई लागल्या असून त्यांवरील विपुल फलांनी त्यांची शाखाग्रें अगदीं लवून गेली होतीं. प्रतिवृक्षाखालीं मारुति सीतेचा शोध घेत चालला. ५ इतक्यांत तेथें एक उत्तम देवालय त्याच्या दृष्टीस पडलें. त्याचें शिखर आकाशाला भिडल्याचा भास होत होता. शेंकडों रत्नस्तंभांनी खचित असें तें ( देवालय ) पाहून मारुतीला विस्मय वाटला. ६ तें स्थान उल्लंघून मारुति थोडासा दूर गेला, तोंच एक शिंशपा वृक्ष त्याच्या दृष्टीस पडला. त्याची पानें अत्यंत निबिड–एकाशी एक भिडलेलीं–अशीं होतीं. ७ त्याखालीं सूर्यकिरण म्हणून कधीं दृष्टीस पडत नसत. जिकडे तिकडे सुवर्णवर्ण पक्ष्यांचे थवे दृष्टीस पडत. अशा त्या शिंशपावृक्षाच्या मूळावर राक्षसींमध्यें बसलेल्या सीतेला त्या हनुमान् वीरानें पाहिलें. ही कोणी देवताच पृथ्वीतलावर अवतीर्ण झाली आहे, असें त्याला वाटलें. एकवेणी[1], कृश, मलिन वस्त्र धारण करणारी, जमिनीवर पडून राहिलेली, राम राम म्हणून शोक करणारी, त्राता कोणी न मिळाल्यामुळें उपवासांनी कृश झालेली, अशा त्या कल्याणिनी सीतेला खांदीच्या अग्रभागीं पानांमध्यें ( लपून ) बसलेल्या कपिश्रेष्ठानें–मारुतीनें–पाहिलें. तो म्हणाला, ‘ आज जानकी माझ्या दृष्टीस पडली मी धन्य झालों माझा कार्यभाग सिद्धीस

१. एकवेणी–रामाच्या वियोगप्रसंगीं जी वेणी होती, तशीच पुनः भेट होईपर्यंत सीतेनें ठेविली होती. केंस विंचरणें, वगैरे नित्याच्या क्रिया तिनें पुढें केल्या नाहींत.

जनकनंदिनीम् ॥ ११ ॥ मयैव साधितं कार्यं रामस्य परमात्मनः ।
ततः किलकिलाशब्दो बभूवांतःपुराद्बहिः ॥ १२ ॥ किमेतदिति
सँल्लीनो वृक्षपत्रेषु मारुतिः । आयांतं रावणं तत्र स्त्रीजनैः परिवारितम्
॥ १३ ॥ दशास्यं विंशतिभुजं नीलांजनचयोपमम् । दृष्ट्वा विस्मयमा-
पन्नः पत्रखंडेष्वलीयत ॥ १४ ॥ रावणो राघवेणाशु मरणं मे कथं
भवेत् । सीतार्थमपि नायाति रामः किं कारणं भवेत् ॥ १५ ॥ इत्येवं
चिंतयन्नित्यं राममेव सदा हृदि । तस्मिन्दिनेऽपररात्रौ रावणो राक्षसा-
धिपः ॥ १६ ॥ स्वप्ने रामेण संदिष्टः कश्चिदागत्य वानरः । कामरूप-
धरः सूक्ष्मो वृक्षाग्रस्थोऽनुपश्यति ॥ १७ ॥ इति दृष्ट्वाद्भुतं स्वप्नं
स्वात्मन्येवानुचिंत्य सः । स्वप्नः कदाचित्सत्यः स्यादेवं तत्र करोम्य-
हम् ॥ १८ ॥ जानकीं वाक्शरैर्विद्ध्वा दुःखितां नितरामहम् । करोमि
दृष्ट्वा रामाय निवेदयतु वानरः ॥ १९ ॥ इत्येवं चिंतयन्सीतासमीपम-

गला. ८,९,१०,११ परमात्म्या रामचंद्राचें कार्य माझ्याच हातून सिद्ध झालें.' इतक्यांत अंतःपुरांत होणारा कलकलाट बाहेर ( त्याच्या कानी ) आला. १२ 'हें काय बरें असेल,' असा विचार मनांत येऊन मारुति वृक्षांच्या पानांत लपून राहिला. तों रावण तिकडेच येत आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्याच्या सभोंवती स्त्रियांचा परिवार होता. त्याला दहा मुखें व वीस बाहु असून काळ्या काजळाच्या राशी-सारखा त्याचा देह होता. अशा त्या ( रावणा )ला पाहून ( मारुतीला ) आश्चर्य वाटलें. तो पर्णांच्या जाळींत लपून बसला. १३,१४ इकडे 'रामाच्या हातून मला मरण कसें येईल! तो सीतेकरितां देखील येत नाही, याचें काय बरें कारण असेल?' १५ असा सारखा विचार करीत रावण राहिला होता. ( मारुति लंकेंत आला ) त्याच दिवशीं उत्तररात्रीं त्या राक्षसाधीश रावणाला स्वप्न पडलें. त्यांत रामाच्या आज्ञेनें कोणी एक कामरूपी वानर सूक्ष्मरूप धारण करून आला आहे व तो वृक्षाच्या अग्रावर बसून (सीतेकडे) पाहात आहे असें त्याला दिसून आलें. १६,१७ असें तें अद्भुत स्वप्न पाहिल्यावर त्यानें आपल्याशीं विचार केला कीं, 'कदाचित् हें स्वप्न खरें ठरेल; तरी मी त्याला अशी युक्ति करीन कीं, १८ जानकीला वाग्बाणांनीं अत्यंत दुःख देईन, आणि तें पाहून वानर रामाला कळवील.' १९ असा विचार ...

१. यावरून रावणाची विरोधभक्ति दिसून येते. २. इच्छेनुसार रूप धारण करणारा.

गमद्द्रुतम् । नूपुराणां किंकिणीनां श्रुत्वा सिंजितमंगना ॥ २० ॥ सीता भीता लीयमाना स्वात्मन्येव सुमध्यमा । अधोमुख्यश्रुनयना स्थिता रामार्पितांतरा ॥ २१ ॥ रावणोऽपि तदा सीतामालोक्याह सुमध्यमे । मां दृष्ट्वा किं वृथा सुभ्रु स्वात्मन्येव विलीयसे ॥ २२ ॥ रामो वनचराणां हि मध्ये तिष्ठति सानुजः । कदाचिद्दृश्यते कश्चित्कदाचिन्नैव दृश्यते ॥ २३ ॥ मया तु बहुधा लोकाः प्रेषितास्तस्य दर्शने । न पश्यंति प्रयत्नेन वीक्षमाणाः समंततः ॥ २४ ॥ किं करिष्यासि रामेण निःस्पृहेण सदा त्वयि । त्वया सदालिंगितोऽपि समीपस्थोऽपि सर्वदा ॥२५॥ हृदयेऽस्य न च स्नेहस्त्वयि रामस्य जायते । त्वत्कृतान्सर्वभोगांश्च

(रावण) सीतेजवळ लागलाच गेला. नूपुरांच्या आणि कमरपट्ट्याच्या घागऱ्यांचा शब्द ऐकून सीतादेवी भयभीत झाली. ती सुंदरी भयानें शरीर सांवरून अधोमुख बसली. तिच्या डोळ्यांतून अश्रू येत होते; तिचें अंतःकरण पूर्णपणें रामाकडे लागलें होतें. २०,२१ रावणही त्या वेळीं सीतेला पाहून तिला म्हणाला 'हे सुलोचने ! तुझा कटिप्रदेश किती रमणीय आहे म्हणून सांगूं ! तूं कारण नसतां अशी संकोचानें कां बसली आहेस ? २२ राम कनिष्ठबंधूसह वनचरांमध्ये राहत आहे; कधीं दृष्टीस पडतो, कधीं दृष्टीस पडत नाहीं. २३ त्याला पहाण्यासाठीं मी पुष्कळ लोक नानारूपें देऊन पाठविले. त्यांनी प्रयत्नपूर्वक सर्वत्र शोध केला, परंतु त्यांना तो सांपडला नाहीं. २४ रामाचें तुजवर प्रेम नाहीं; अशा पुरुषाशीं तुला काय करावयाचें आहे ? तूं सर्वदा त्याला आलिंगून राहिलीस किंवा तो सर्वकाल तुझ्याजवळ राहिला, तरी त्याच्या अंतःकरणांत तुजसंबंधीं प्रेम म्हणून उत्पन्नच होत नाहीं. तुझ्या सर्व

१. पैंजणाच्या. २. श्लोक २३–२९ वरवर रामनिंदेनें भरलेले आहेत, तरी त्यातून गूढपणे रामाची स्तुति व्यक्त होत आहे. वनचरामध्यें–रानटी पशूंमध्ये. ( पक्षीं ) वनांत राहणाऱ्या योग्याच्या अंतःकरणात. ३. पहिला अर्थ सरळ आहे. दुसरा–त्याचें दर्शन ध्याननिष्ठ योगी, भक्तजन यानाच मिळते, इतरांना मिळत नाहीं. ४. दुसरा अर्थ–अन्यायमार्गें जाणाऱ्याना रामप्राप्ति होत नाहीं. ५. दुसरा अर्थ–राम पूर्णकाम असल्यामुळें त्याला स्त्रीविषयक प्रेम नाहीं. ६ गूढार्थ–सीता ही आदिमाया होय. माया परमेश्वराच्या आश्रयानें राहाते, व ईश्वरही तिच्या–मायेच्या–समीप असतो, तरी तो मायागुणांवर आसक्त होत नाहीं.

त्वद्गुणानपि राघवः ॥ २६ ॥ भुंजानोऽपि न जानाति कृतघ्नो निर्गु-
णोऽधमः । त्वमानीता मया साध्वी दुःखशोकसमाकुला ॥ २७ ॥
इदानीमपि नायाति भक्तिहीनः कथं व्रजेत् । निःसत्त्वो निर्ममो मानी
मूढः पंडितमानवान् ॥२८॥ नराधमं त्वद्विमुखं किं करिष्यसि भामिनि ।
त्वय्यतीव समासक्तं मां भजस्वासुरोत्तमम् ॥ २९ ॥ देवगंधर्वनागानां
यक्षकिन्नरयोषिताम् । भविष्यसि नियोक्त्री त्वं यदि मां प्रतिपद्यसे
॥ ३० ॥ रावणस्य वचः श्रुत्वा सीतामर्षसमन्विता । उवाचाधो-
मुखी भूत्वा निधाय तृणमंतरे ॥ ३१ ॥ राघवाद्बिभ्यता नूनं भिक्षुरूपं

भोगाचा आणि गुणांचा तो उपभोग घेतो, तरी त्याची जाणीव[1] त्याला नाही. त्याच्या अंगी गुणांचा लवलेश नाहीं. तो कृतघ्न[2] अधम[3] आहे. तुला साध्वीला मी हरण करून आणिलें, तूं दुःखानें आणि शोकानें व्याप्त झाली आहेस, २५,२६,२७ तरी तो अजून येत नाहीं; प्रेमच नाहीं, मग येणार तरी कसा[4] ? तो शक्तिहीन[5], ममताशून्य[6], मानी[7], मूढ[8], आपणाला पंडित[9] समजणारा आहे. २८ मानिनि ( सीते ) ! सर्वस्वी प्रतिकूल अशा त्या नराधम[10] रामाशीं तुला काय करावयाचें आहे? तुझ्या ठिकाणी मी अत्यंत आसक्त आहें, मी दैत्यांचा राजा आहें, तर माझा स्वीकार कर. २९ जर माझा अंगीकार करशील तर तूं देव, गंधर्व, नाग, यक्ष, किन्नर, यांच्या स्त्रियांची धनीण होशील.' ३० हें रावणाचें भाषण ऐकून सीतेला अत्यंत क्रोध आला. तिनें खाली तोंड घातलें, व मध्यें गवताची काडी[11] ठेवून बोलण्यास आरंभ केला. ३१ '( रावणा ! ) तुला रामाची भीति वाटत असल्यामुळें तूं भिक्षुरूप

१. गूढार्थ–उपभोग घेतो, तरी 'मी भोक्ता' हा अभिमान बाळगीत नाही. २. गूढार्थ–कृताचा–संचित, क्रियमाण कर्मांचा ( दर्शनानें ) नाश करतो. ३. गूढार्थ–न धमतीति अधमः अर्थात् शब्दविषय होत नाही असा, अवर्णनीय स्वरूपाचा. ४. माया परमेश्वराच्या आश्रयाने राहाते, परंतु परमेश्वर 'प्रकृतेः परः' मायेहून निराळा, तीवर प्रेम न ठेवणारा असा आहे, हा गूढार्थ ५. शक्तिहीन, ( पक्षी ) गुणरहित. ६. ममत्वहीन, कोठेही आसक्ति न धरणारा. ७. गूढार्थः–'अमानी' असें पद पाडून–त्याचा अहंकाररहित असा अर्थ करावयाचा. ८. मूढ–म–ब्रह्मदेव आणि उ–शंकर, यांनीं ऊढ–मानलेला. ९. गूढार्थः–विद्वानात मान पावणारा. १०. गूढार्थः–नराः अधमाः यस्मात्–मनुष्यापेक्षां श्रेष्ठ. ११. पतिव्रता स्त्रियांना परपुरुषाशीं बोलण्याचा प्रसंग आला असतां मध्यें कांहींतरी वस्तु मध्यस्थ ह्या नात्यानें ठेवून, त्या बोलत असतात.

त्वया धृतम् । रहिते राघवाभ्यां त्वं शुनीव हविरध्वरे ॥ ३२ ॥
हृतवानसि मां नीच तत्फलं प्राप्स्यसेऽचिरात् । यदा रामशराघातवि-
दारितवपुर्भवान् ॥ ३३ ॥ ज्ञास्यसे मानुषं रामं गमिष्यसि यमांतिकम् ।
समुद्रं शोषयित्वा वा शरैर्बद्ध्वाथ वारिधिम् ॥ ३४ ॥ हंतुं त्वां समरे
रामो लक्ष्मणेन समन्वितः । आगमिष्यत्यसंदेहो द्रक्ष्यसे राक्षसाधम
॥ ३५ ॥ त्वां सपुत्रं सहबलं हत्वा नेष्यति मां पुरम् । श्रुत्वा रक्षःपतिः
क्रुद्धो जानक्याः परुषाक्षरम् ॥ ३६ ॥ वाक्यं क्रोधसमाविष्टः खड्गमु-
द्यम्य सत्वरः । हंतुं जनकराजस्य तनयां ताम्रलोचनः ॥ ३७ ॥
मंदोदरी निवार्याह पतिं पतिहिते रता । त्यजैनां मानुषीं दीनां दुःखितां
कृपणां कृशाम् ॥ ३८ ॥ देवगंधर्वनागानां बह्व्यः संति वरांगनाः ।
त्वामेव वरयंत्युच्चैर्मदमत्तविलोचनाः ॥ ३९ ॥ ततोऽब्रवीद्दशग्रीवो
राक्षसीर्विकृताननाः । यथा मे वशगा सीता भविष्यति सकामना ।

धारण केलेंस, आणि ( जवळ कोणी नसतां ) यज्ञांतील हविर्भाग कुत्री हरण करून नेते, त्याप्रमाणें नीचा ! रामलक्ष्मण जवळ नसतांना माझें हरण केलेंस, त्याचें फळ तुला लवकरच मिळेल. जेव्हां रामबाणप्रहारांनी तुझें शरीर विदीर्ण होईल, ३२,३३ तेव्हां रामाच्या मानवी रूपाची खरी योग्यता तुला समजून येईल, व तूं यमसदनी जाशील. समुद्र शुष्क करून किंवा समुद्रावर बाणांचा सेतु बांधून हे राक्षसाधमा ! श्रीराम लक्ष्मणासमवेत तुला रणांगणी ठार मारण्याकरितां निःसंशय येईल, हें तुला दिसून येईलच. ३४,३५ तो तुझा, तुझ्या पुत्रांचा आणि तुझ्या सैन्याचा नाश करून मला नगराला घेऊन जाईल.' हें जानकीचें कठोर भाषण ऐकून त्या राक्षसाधिपतीला क्रोध आला. क्रोधसंतप्त होऊन त्यानें लागलीच आपली तरवार उचलली, आणि जानकीला मारण्यास तो तयार झाला. त्याचे डोळे लाल झाले. ३६,३७ ( इतक्यांत ) पतीचें कल्याण करण्यांत तत्पर अशा मंदोदरीनें पतीचें—रावणाचें—निवारण केलें, आणि म्हटलें, ह्या दीन, दुःखित, कृपण आणि कृश झालेल्या मनुष्यस्त्रीला सोडून द्या. ३८ तारुण्यमदानें ज्यांचे डोळे पाणीदार दिसत आहेत, ज्या आपणालाच वरण्याविषयीं अत्यंत उत्सुक आहेत, अशा देव, गंधर्व, नाग जातीच्या अनेक उत्तमोत्तम स्त्रिया आहेत.' ३९ नंतर रावण तेथें असलेल्या विक्राळ मुखांच्या राक्षसीना म्हणाला, 'सीतेला भीति दाखवून, आदर दाखवून, अगर दुसऱ्या कोणत्याही युक्तीनें ती माझा अभिलाष

तथा यतध्वं त्वरितं तर्जनादरणादिभिः ॥ ४० ॥ द्विमासाभ्यंतरे सीता यदि मे वशगा भवेत् । तदा सर्वसुखोपेता राज्यं भोक्ष्यति सा मया ॥ ४१ ॥ यदि मासद्वयादूर्ध्वं मच्छय्यां नाभिनंदति । तदा मे प्रातराशाय हत्वा कुरुत मानुषीम् ॥ ४२ ॥ इत्युक्त्वा प्रययौ स्त्रीभी रावणोऽतःपुरालयम् । राक्षस्यो जानकीमेत्य भीषयंत्यः स्वतर्जनैः ॥ ४३ ॥ तत्रैका जानकीमाह यौवनं ते वृथा गतम् । रावणेन समासाद्य सफलं तु भविष्यति ॥ ४४ ॥ अपरा चाह कोपेन किं विलंबेन जानकी । इदानीं छेद्यतामंगं विभज्य च पृथक् पृथक् ॥ ४५ ॥ अन्या तु खड्गमुद्यम्य जानकीं हंतुमुद्यता । अन्या करालवदना विदार्यास्यमभीषयत् ॥ ४६ ॥ एवं ता भीषयंतीस्ता राक्षसीर्विकृताननाः । निवार्य त्रिजटा वृद्धा राक्षसी वाक्यमब्रवीत् ॥ ४७ ॥ शृणुध्वं दुष्टराक्षस्यो मद्वाक्यं वो हितं भवेत् । न भीषयध्वं रुदतीं नमस्कुरुत जानकीम् ॥ ४८ ॥ इदानी-

धारण कराल आणि मला वश होइल, असे प्रयत्न करा. ४० दोन महिन्यांच्या आंत सीता मला वश होईल, तर तिला सर्व सुखें प्राप्त होतील, व ती मजसहवर्तमान राज्याचा उपभोग घेईल. ४१ दोन महिने लोटल्यावर माझ्या शय्येवर येण्याचें तिनें आनंदानें न स्वीकारल्यास त्या मानवी स्त्रीला मारून तिच्या मांसानें माझ्या सकाळच्या फराळाची तयारी करा.' ४२ असें बोलून तो–रावण–स्त्रियांसह आपल्या अंतःपुराच्या महालांत गेला. (इकडे) त्या राक्षसिणी जानकी-जवळ येऊन आपापल्या बुद्ध्यनुसार नाना प्रकारांनी तिला भिववूं लागल्या. ४३ त्यांपैकी एक सीतेला म्हणाली, 'तुझें तारुण्य व्यर्थ गेलें, रावणाचा अंगीकार केल्यानें तें सफल होईल!' ४४ दुसरी कोपानें म्हणाली, 'उगीच कशाला वेळ दवडतां! आतांच हिचे वेगवेगळे तुकडे तुकडे करून ते शिजवूं या.' ४५ तिसरी तरवार उगारून जानकीला मारायाला पुढें झाली. दुसरी एक विक्राळ तोंडाची राक्षसी आपलें तोंड पसरून तिला भिववूं लागली. ४६ अशा रीतीनें त्या विद्रूप चेहऱ्याच्या राक्षसी तिला–सीतेला–भिववूं लागल्या असतां त्रिजटा नांवाची एक वृद्ध राक्षसी त्यांचें निवारण करून त्यांना म्हणाली, ४७ 'दुष्ट राक्षसींनो! माझें म्हणणें ऐकून घ्या; त्यांतच तुमचें कल्याण आहे. ह्या रडणाऱ्या जानकीला भिववूं नका. तिला नमस्कार करा. ४८ आतांच माझ्या स्वप्नांत शुभ्र ऐरावतावर बसून

मेव मे स्वप्ने रामः कमललोचनः। आरुह्यैरावतं शुभ्रं लक्ष्मणेन समा-
गतः ॥ ४९ ॥ दग्ध्वा लंकापुरीं सर्वां हत्वा रावणमाहवे। आरोप्य
जानकीं स्वांके स्थितो दृष्टोऽगमूर्धनि ॥ ५० ॥ रावणो गोमयह्रदे
तैलाभ्यक्तो दिगंबरः। अगाहत्पुत्रपौत्रैश्च कृत्वा वदनमालिकाम् ॥५१॥
विभीषणस्तु रामस्य संनिधौ हृष्टमानसः। सेवां करोति रामस्य
पादयोर्भक्तिसंयुतः ॥५२॥ सर्वथा रावणं रामो हत्वा सकुलमंजसा।
विभीषणायाधिपत्यं दत्वा सीतां शुभाननाम्। अंके निधाय स्वपुरीं
गमिष्यति न संशयः ॥ ५३ ॥ त्रिजटाया वचः श्रुत्वा भीतास्ता
राक्षसस्त्रियः। तूष्णीमासंस्तत्र तत्र निद्रावशमुपागताः ॥ ५४ ॥
तर्जिता राक्षसीभिः सा सीता भीतातिविह्वला। त्रातारं नाधिगच्छंती
दुःखेन परिमूर्च्छिता ॥ ५५ ॥ अश्रुभिः पूर्णनयना चिंतयंतीदमब्र-
वीत्। प्रभाते भक्षयिष्यंति राक्षस्यो मां न संशयः। इदानीमेव मरणं

कमलनयन श्रीराम लक्ष्मणासहवर्तमान आला, त्यानें सर्व लंका जाळून टाकिली, युद्धांत रावणाचा वध केला, आणि जानकीला आपल्या मांडीवर घेऊन तो पर्वत-शिखरावर बसला आहे, असें मला दिसलें. ४९, ५० तेलानें चोपडलेला नग्न रावण आपल्या मुखांची माळ हातांत घेऊन पुत्रपौत्रांसह शेणाच्या[1] डोहांत बुडाला आहे. ५१ संतुष्ट अंतःकरणानें विभीषण रामाच्या जवळ राहून भक्तिपूर्वक त्याच्या पायांची सेवा करीत आहे. ( असेंही मीं पाहिलें. ) ५२ श्रीराम रावणाचा सह-कुटुंब वध करील, आणि विभीषणाला राज्य देऊन सुवदना जानकीला मांडीवर घेऊन लवकरच नगराला जाईल, यांत संशय नाहीं.' ५३ त्रिजटेचें भाषण ऐकून त्या राक्षसस्त्रिया घाबरून गेल्या, आणि आपापल्या ठिकाणी स्वस्थ राहिल्या. अशा स्थितींत त्यांना गाढ झोंप लागली. ५४ राक्षसींनी भिवविलेली सीता भयानें विह्वळ होऊन गेली. तेथें तिला त्राता कोणीच न मिळाल्यामुळें दुःखानें ती अत्यंत मूर्च्छित झाली. ५५ तिचे डोळे अश्रूंनीं भरून आले. आपल्याशींच चिंतन करीत ती म्हणाली, ' प्रभातकाली राक्षसी मला खाऊन टाकतील. यांत संशय नाहीं. तर मग

१ शेणखळींत. ( ह्या स्वप्नातील अशुभ चिह्नावरून रावणाचा रामाकडून लवकरच निश्चि-तपणें वध होणार हें त्रिजटा आपणाशीं ठरवून त्या राक्षसिणींस सांगत आहे. )

केनोपायेन मे भवेत् ॥ ५६ ॥ एवं सुदुःखेन परिप्लुता सा विमुक्तकंठं रुदती चिराय । आलंब्य शाखां कृतनिश्चया मृतौ न जानती कंचिदुपायमंगना ॥ ५७ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे सुंदरकांडे द्वितीयः सर्गः ॥ २ ॥

## सुंदरकांड, सर्ग तिसरा.

---

॥ श्रीमहादेव उवाच ॥ उद्बंधनेन वा मोक्ष्ये शरीरं राघवं विना । जीवितेन फलं किं स्यान्मम रक्षोऽधिमध्यतः ॥ १ ॥ दीर्घा वेणी ममात्यर्थमुद्बंधाय भविष्यति । एवं निश्चितबुद्धिं तां मरणायाथ जानकीम् ॥ २ ॥ विलोक्य हनुमान्किंचिद्विचार्यैतदभाषत । शनैः शनैः सूक्ष्मरूपो जानक्याः श्रोत्रगं वचः ॥ ३ ॥ इक्ष्वाकुवंशसंभूतो राजा दशरथो महान् । अयोध्याधिपतिस्तस्य चत्वारो लोकविश्रुताः ॥ ४ ॥

आतांच कोणत्या उपायानें मला मरण येईल बरें ?' ५६ अशा प्रकारें अत्यंत दुःखानें व्याप्त झालेली ती ( सीता ) मरणाचा निश्चय करून हातांत वृक्षाची खांदी धरून उभी राहिली. मोठ्यानें हंबरडा फोडून ती पुष्कळ वेळ रडत राहिली. त्या सुंदरीला उपाय म्हणून कांहींच सुचेना. ५७ "

**सुंदरकांड, सर्ग दुसरा समाप्त.**

श्रीशंकर म्हणाला, "' आपण आतां गळफांस घेऊन देहत्याग करावा ! राम मला अंतरला. आतां ह्या राक्षसांच्या मध्यें राहून जगून तरी काय फळ? १ ही माझी लांब वेणी गळफांस घेण्याला फारच उपयोगी पडेल,' असा मरण्याचा निश्चय जानकीनें केला आहे, २ हें पाहून मारुतीनें आपल्या मनाशीं कांहीं विचार केला, आणि सूक्ष्मरूप धारण करून जानकीच्या कानीं जाईल, अशा हलक्या आवाजानें त्यानें बोलण्यास आरंभ केला. ३ ( तो म्हणाला, ) ' इक्ष्वाकुवंशांत जन्म पावलेला अयोध्याधिपति दशरथ नांवाचा प्रख्यात राजा होऊन गेला. त्याला राम, लक्ष्मण,

पुत्रा देवसमाः सर्वे लक्षणैरुपलक्षिताः । रामश्च लक्ष्मणश्चैव भरतश्चैव शत्रुहा ॥ ५ ॥ ज्येष्ठो रामः पितुर्वाक्याद्दंडकारण्यमागतः । लक्ष्मणेन सह भ्रात्रा सीतया भार्यया सह ॥ ६ ॥ उवास गौतमीतीरे पंचवट्यां महामनाः । तत्र नीता महाभागा सीता जनकनंदिनी ॥ ७ ॥ रहिते रामचंद्रेण रावणेन दुरात्मना । ततो रामोऽतिदुःखार्तो मार्गमाणोऽथ जानकीम् ॥ ८ ॥ जटायुषं पक्षिराजमपश्यत्पातितं भुवि । तस्मै दत्वा दिवं शीघ्रमृष्यमूकमुपागमत् ॥ ९ ॥ सुग्रीवेण कृता मैत्री रामस्य विदितात्मनः । तद्भार्याहारिणं हत्वा वालिनं रघुनंदनः ॥ १० ॥ राज्येऽभिषिच्य सुग्रीवं मित्रकार्यं चकार सः । सुग्रीवस्तु समानाय्य वानरान्वानरप्रभुः ॥ ११ ॥ प्रेषयामास परितो वानरान्परिमार्गणे । सीतायास्तत्र चैकोऽहं सुग्रीवसचिवो हरिः ॥ १२ ॥ संपातिवचनाच्छीघ्रमुल्लंघ्य शतयोजनम् । समुद्रं नगरीं लंकां विचिन्वन् जानकीं शुभाम्

भरत आणि शत्रुघ्न ह्या नांवांचे जगत्प्रसिद्ध चार पुत्र होते. ते सर्व देवासारखे शुभलक्षणसंपन्न होते. ४,५ ह्यांपैकी वडील राम पित्याच्या आज्ञेला अनुसरून बंधु लक्ष्मण आणि पत्नी सीता यांसहवर्तमान दंडकारण्यांत आला. ६ तेथें तो थोर मनाचा (राम) गौतमीच्या तीरावर पंचवटीमध्यें राहात होता. तेथून, राम जवळ नाही, अशी संधि पाहून त्या महाभाग्यशील जनककन्या सीतेचें दुष्ट रावणानें हरण केलें. त्यामुळें अत्यंत दुःखपीडित होऊन रामानें सीतेचा शोध चालविला. ७,८ इतक्यांत पक्षिराज जटायु (मरणोन्मुख स्थितीत) जमिनीवर पडलेला त्याच्या दृष्टीस पडला. त्याला स्वर्गप्राप्ति करवून देऊन राम लागलाच ऋष्यमूक पर्वतावर गेला. ९ तेथें आत्मज्ञानसंपन्न अशा त्या श्रीरामाचें सुग्रीवाशीं सख्य घडलें. पुढें रघुनंदनानें—रामानें—सुग्रीवाच्या पत्नीचें हरण करणाऱ्या वालीचा वध केला, १० आणि सुग्रीवाला राज्याभिषेक करून मित्रकार्य संपादिलें. नंतर वानरराज सुग्रीवानें अनेक वानरांना आणविलें, ११ आणि सीतेच्या शोधाकरितां चारी बाजूंना त्या वानरांना पाठविलें. त्यांपैकी मी एक सुग्रीवाचा सचिव असा वानर आहें. १२ संपातीच्या सांगण्यावरून शंभर योजनें लांबीचा समुद्र शीघ्र उल्लंघन लंका नगरींत त्या सलक्षणी जानकीचा मीं शोध

१. संपाती हा जटायूचा वडील बंधु होता. ह्याचा वृत्तांत किष्किंधाकांड, सर्ग सात, यांत आला आहे.

॥ १३ ॥ शनरशोकवनिकां विचिन्वन् शिंशपातरुम् । अद्राक्षं
जानकीमत्र शोचंतीं दुःखसंप्लुताम् ॥ १४ ॥ रामस्य महिषीं देवीं कृतकृ-
त्योऽहमागतः । इत्युक्त्वोपरराभाथ मारुतिर्बुद्धिमत्तरः ॥ १५ ॥ सीता
क्रमेण तत्सर्वं श्रुत्वा विस्मयमाययौ । किमिदं मे श्रुतं व्योम्नि वायुना
समुदीरितम् ॥ १६ ॥ स्वप्नो वा मे मनोभ्रांतिर्यदि वा सत्यमेव तत् ।
निद्रा मे नास्ति दुःखेन जानाम्येतत्कुतो भ्रमः ॥ १७ ॥ येन मे कर्ण-
पीयूषं वचनं समुदीरितम् । स दृश्यतां महाभागः प्रियवादी ममाग्रतः
॥ १८ ॥ श्रुत्वा तज्जानकीवाक्यं हनुमान्पत्रखंडतः । अवतीर्य शनैः
सीतापुरतः समवस्थितः ॥ १९ ॥ कलविंकप्रमाणांगो रक्तास्यः पीत-
वानरः । ननाम शनकैः सीतां प्रांजलिः पुरतः स्थितः ॥ २० ॥
दृष्ट्वा तं जानकी भीता रावणोऽयमुपागतः । मां मोहयितुमायातो
मायया वानराकृतिः ॥ २१ ॥ इत्येवं चिंतयित्वा सा तूष्णीमासीदधो-

केला. १३ तेथून पुढें अशोकवनिकेंत थोडथोडा शोध घेत असतां, तेथें एका शिंशपा
वृक्षाखाली दुःखमग्न स्थितींत शोक करींत असलेली, रामाची पट्टराणी, देवी जानकी,
माझ्या दृष्टीस पडली, आतां मी आल्याचें सार्थक झालें.' असें बोलून तो महाबुद्धि-
मान् मारुति स्वस्थ बसला. १४,१५ तो सर्व वृत्तांत क्रमवार ऐकून सीतेला आश्चर्य
वाटलें. 'मीं हे ऐकिलेले शब्द आकाशांत वायूनें उच्चारिलेले असतील काय? १६ मी
काय झोंपेंत आहें? की माझ्या मनाला भ्रम झाला आहे? की हें सर्व खरें आहे?
दुःखामुळें झोंप तर मला नाहींच. तसेंच सर्व मला नीट समजत आहे, तेव्हां भ्रम तरी
कसा म्हणावा? १७ माझ्या कानांला अमृतासारखे लागणारे (गोड) शब्द
ज्याच्याकडून उच्चारिले गेले असतील, त्या प्रियंवद महाभाग्यशाली पुरुषानें मज-
समोर प्रगट व्हावें.' १८ हें जानकीचें भाषण ऐकून मारुति त्या पानांच्या जाळीं-
तून हळूच खालीं उतरला, आणि सीतेच्या पुढें उभा राहिला. १९ त्याचें शरीर
चिमणीएवढें, तोंड लाल, आणि अंगकांति पिंवळी होती. असा तो वानर-मारुति-
सीतेला हळूच नमस्कार करून व हात जोडून तिच्यापुढें उभा राहिला. २० त्याला
पाहून जानकीला भीति वाटली. 'मायेनें वानराकार धारण करून हा रावणच मला
मोहित करण्याकरितां आला आहे,' २१ असें तिला वाटून ती तोंड खालीं घालून

मुखी । पुनरप्याह तां सीतां देवि यत्त्वं विशंकसे ॥ २२ ॥ नाहं तथाविधो मातस्त्यज शंकां मयि स्थिताम् । दासोऽहं कोसलेंद्रस्य रामस्य परमात्मनः ॥ २३ ॥ सचिवोऽहं हरींद्रस्य सुग्रीवस्य शुभप्रदे । वायोः पुत्रोऽहमखिलप्राणभूतस्य शोभने ॥ २४ ॥ तच्छ्रुत्वा जानकी प्राह हनूमंतं कृतांजलिम् । वानराणां मनुष्याणां संगतिर्घटते कथम् ॥ २५ ॥ यथा त्वं रामचंद्रस्य दासोऽहमिति भाषसे । तामाह मारुतिः प्रीतो जानकीं पुरतः स्थितः ॥ २६ ॥ ऋष्यमूकमगाद्रामः शबर्या नोदितः सुधीः । सुग्रीवो ऋष्यमूकस्थो दृष्टवान् रामलक्ष्मणौ ॥ २७ ॥ भीतो मां प्रेषयामास ज्ञातुं रामस्य हृद्गतम् । ब्रह्मचारिवपुर्धृत्वा गतोऽहं रामसन्निधिम् ॥ २८ ॥ ज्ञात्वा रामस्य सद्भावं स्कंधोपरि निधाय तौ । नीत्वा सुग्रीवसामीप्यं सख्यं चाकरवं तयोः ॥ २९ ॥ सुग्रीवस्य

स्वस्थ राहिला. तेव्हां मारुति सीतेला पुनः म्हणाला, 'देवि ! तुझ्या मनांत शंका आली आहे, तसा मी नाहीं. माते ! मजविषयीं तुझ्या मनांतील शंका सोडून दे. कोशलदेशचा अधिपति परमात्मा रामचंद्र त्याचा मी दास आहें. २२,२३ हे कल्याणिनि ! कपिराज सुग्रीवाचा मी सचिव आहें, आणि हे सुंदरि ! सर्वांना प्राणरूप असा जो वायु त्याचा मी पुत्र आहें. ' २४ तें ऐकून हात जोडून पुढें उभा असलेल्या मारुतीला जानकी म्हणाली, ' वानरांची आणि मनुष्यांची मैत्री कशी घडावी ?' २५ तूं म्हणतोस ' मी रामचंद्राचा दास आहें.' ( हें कसें व्हावें ? ) ( हें ऐकून ) तेथेंच पुढें असलेल्या मारुतीला संतोष वाटला आणि तो जानकीला म्हणाला, २६ ' शबरीच्या प्रेरणेनें बुद्धिमान् राम ऋष्यमूक पर्वतावर गेला. त्या ऋष्यमूकावर सुग्रीव राहात असे. त्याच्या दृष्टीस रामलक्ष्मण पडले. २७ ( त्यांना पाहून सुग्रीव ) भ्याला, आणि त्यानें रामाचा ( तेथें येण्यांत ) काय उद्देश आहे, हें समजून घेण्याच्या उद्देशानें मला पाठविलें. मी ब्रह्मचाऱ्याचा[1] वेष धारण करून रामाजवळ गेलों. २८ रामाचा शुद्ध अभिप्राय जाणून त्या दोघां ( रामलक्ष्मणां )ना मीं खांद्यावर घेतलें, आणि त्यांना सुग्रीवाजवळ नेऊन त्यांची सुग्रीवाशीं मैत्री घडवून आणली. २९ सुग्रीवाच्या

१. ब्रह्मचारी–' ब्रह्मचारी सदैवैष य इंद्रियजये रतः । '–महाभारत.

हृता भार्या वालिना तं रघूत्तमः । जघानैकेन बाणेन ततो राज्येऽभ्य-
षेचयत् ॥ ३० ॥ सुग्रीवं वानराणां स प्रेषयामास वानरान् । दिग्भ्यो
महाबलान्वीरान् भवत्याः परिमार्गणे ॥ ३१ ॥ गच्छंतं राघवो दृष्ट्वा
मामभाषत सादरम् ॥ ३२ ॥ त्वयि कार्यमशेषं मे स्थितं मारुतनंदन ।
ब्रूहि मे कुशलं सर्वं सीतायै लक्ष्मणस्य च ॥ ३३ ॥ अंगुलीयकमे-
तन्मे परिज्ञानार्थमुत्तमम् । सीतायै दीयतां साधु मन्नामाक्षरमुद्रितम्
॥ ३४ ॥ इत्युक्त्वा प्रददौ मह्यं कराग्रादंगुलीयकम् । प्रयत्नेन मयानीतं
देवि पश्यांगुलीयकम् ॥३५॥ इत्युक्त्वा प्रददौ देव्यै मुद्रिकां मारुतात्मजः।
नमस्कृत्वा स्थितो दूराद्बद्धांजलिपुटो हरिः॥३६॥ दृष्ट्वा सीता प्रमुदिता राम-
नामांकितां तदा । मुद्रिकां शिरसा धृत्वा स्रवदानंदनेत्रजा ॥३७॥ कपे मे
प्राणदाता त्वं बुद्धिमानसि राघवे । भक्तोऽसि प्रियकारी त्वं विश्वासोऽ
स्ति तवैव हि ॥ ३८ ॥ नो चेन्मत्सन्निधिं चान्यं पुरुषं प्रेषयेत्कथम् ।

पत्नीचें वालीनें हरण केलें. त्याचा रघूत्तमा( रामा )नें एकाच बाणानें वध
केला, आणि सुग्रीवाला राज्याभिषेक करविला. पुढें सुग्रीवानें तुझ्या शोधा-
साठीं दाही दिशांना मोठमोठे बलवान् वानर पाठविले. ३०,३१ मला निघतांना
पाहून श्रीराम आदरपूर्वक म्हणाला, ३२ ' हे वायुपुत्रा ! माझे कार्याची सिद्धि
होणें पूर्णपणें तुझ्या हातांत आहे. मी आणि लक्ष्मण दोघेही खुशाल असल्याचें
सीतेला सांग. ३३ आणि खुणेसाठीं म्हणून जीवर माझ्या नांवाची सुंदर अक्षरें कोरलेली
आहेत ती ही माझी उत्तम अंगठी ( तुला देतों, ती) सीतेला दे. ' ३४ असें म्हणून
रामानें आपल्या कराग्रांतून आंगठी काढिली, आणि मला दिली. देवि ! ही पहा,
मी ती जपून आणिली आहे. ' ३५ असें म्हणून वायुपुत्र मारुतीनें ती अंगठी
सीतादेवीला दिली, आणि आपण हात जोडून व नमस्कार करून दूर उभा राहिला.
३६ ती रामनामांकित अंगठी पाहून सीतेला परम आनंद झाला. तिनें ती अंगठी
मस्तकीं धरिली. तिच्या डोळ्यांतून आनंदाश्रू वाहूं लागले. ३७ ( ती म्हणाली, )
'वानरा ! तूं माझा प्राणदाता आहेस; तूं बुद्धिमान् असून रामाचा भक्त व प्रियकर्ता
आहेस. तसाच रामाचा तुजवर विश्वास आहे. ३८ तसें नसतें तर परपुरुषाला

हनूमन्दृष्टमखिलं मम दुःखादिकं त्वया ॥ ३९ ॥ सर्वं कथय रामाय
यथा मे जायते दया। मासद्वयावधि प्राणाः स्थास्यंति मम सत्तम ॥४०॥
नागमिष्यति चेद्रामो भक्षयिष्यति मां खलः। अतः शीघ्रं कपींद्रेण
सुग्रीवेण समन्वितः ॥ ४१ ॥ वानरानीकपैः सार्धं हत्वा रावणमाहवे।
सपुत्रं सबलं रामो यदि मां मोचयेत्प्रभुः ॥ ४२ ॥ तत्तस्य सदृशं वीर्यं
वीर वर्णय वर्णितम्। यथा मां तारयेद्रामो हत्वा शीघ्रं दशाननम् ॥४३॥
तथा यतस्व हनुमन्वाचा धर्ममवाप्नुहि। हनूमानपि तामाह देवि दृष्टो
यथा मया ॥ ४४ ॥ रामः सलक्ष्मणः शीघ्रमागमिष्यति सायुधः।
सुग्रीवेण ससैन्येन हत्वा दशमुखं बलात् ॥ ४५ ॥ समानेष्यति देवि
त्वामयोध्यां नात्र संशयः। तमाह जानकी रामः कथं वारिधिमाततम्
॥ ४६ ॥ तीर्त्वायास्यत्यमेयात्मा वानरानीकपैः सह। हनूमानाह

त्यानें मजजवळ कसें पाठविलें असतें? हनुमंता! माझें दुःख वगैरे सर्व तूं पाहिलेंच आहेस. ३९ हें सर्व तूं रामाला सांग, कीं तेणेंकरून त्याला माझी दया येईल. हे साधुश्रेष्ठा! माझे प्राण केवळ दोन महिने राहतील. ४० (तितक्या मुदतींत) राम आला नाहीं, तर तो दुष्ट मला खाऊन टाकील. म्हणून कपींद्र सुग्रीव आणि दुसरेही वानरनायक यांसह प्रभु राम येईल, आणि तो रावणाचा, पुत्र आणि सैन्य यांसुद्धां युद्धांत वध करून मला सोडवील, ४१,४२ तरच तें त्याच्या वर्णिलेल्या[1] वीर्याला अनुरूप होईल. म्हणून वीरा! त्याला ( स्फुरण येईल, अशा प्रकारें) येथील वृत्तांत वर्णन कर. हनुमंता! रावणाचा वध करून राम मला शीघ्र सोडवील, असा प्रयत्न कर. हनुमंता! वाणीचा उपयोग करून धर्म घडेल, असें कर.' हनुमंत देखील तिला म्हणाला, 'देवि! मी रामाला भेटलों की तो आयुधांसह लक्ष्मणाला आणि ससैन्य सुग्रीवाला घेऊन लागलाच येईल, आणि स्वपराक्रमानें रावणाचा वध करून, ४३,४४,४५ हे देवि! तुला अयोध्येला घेऊन जाईल, यांत संशय नाही.' त्यावर जानकी त्याला म्हणाली, 'पण (एवढ्या) विस्तीर्ण समुद्राला तरून विशाल-स्थूल-स्वरूपाचा[2] राम आपलीं वानरसैन्यें आणि सेनापति यांसह (येथें) कसा येणार?' मारुति

१. वाल्मीकीनें रामायणात वर्णन केलेल्या. २. गर्भितार्थ.—ज्याच्या स्वरूपाला इयत्ता—परिमाण—नाही, जो सर्वव्यापी परमात्मा आहे.

**मे स्कंधावारुह्य पुरुषर्षभौ ॥४७॥ आयास्यतः ससैन्यश्च सुग्रीवो वानरेश्वरः। विहायसा क्षणेनैव तीर्त्वा वारिधिमाततम्। निदहिष्यति रक्षौघांस्त्वत्कृते नात्र संशयः॥ ४८ ॥ अनुज्ञां देहि मे देवि गच्छामि त्वरयान्वितः। द्रष्टुं रामं सह भ्रात्रा त्वरयामि तवांतिकम् ॥ ४९ ॥ देवि किंचिदभिज्ञानं देहि मे येन राघवः। विश्वसेन्मां प्रयत्नेन ततो गंता समुत्सुकः ॥५०॥ ततः किंचिद्विचार्याथ सीता कमललोचना। विमुच्य केशपाशांते स्थितं चूडामणिं ददौ ॥ ५१ ॥ अनेन विश्वसेद्रामस्त्वां कपींद्र सलक्ष्मणः। अभिज्ञानार्थमन्यच्च वदामि तव सुव्रत ॥ ५२ ॥ चित्रकूटगिरौ पूर्वमेकदा रहसि स्थितः। मदंके शिर आधाय निद्राति रघुनंदनः ॥ ५३ ॥ ऐंद्रः काकस्तदागत्य नखैस्तुंडेन चासकृत्। मत्पादांगुष्ठमारक्तं विददारामिषाशया ॥ ५४ ॥ ततो रामः प्रबुद्ध्याथ दृष्ट्वा पादं कृतव्रणम्। केन भद्रे कृतं चैतद्विप्रियं मे दुरात्मना ॥ ५५ ॥**

म्हणाला, ' ते दोघे पुरुषश्रेष्ठ माझ्या खांद्यावर बसून येतील. वानराधिपति सुग्रीव आपल्या सैन्यासह आकाशमार्गानें एका क्षणांत विस्तीर्ण समुद्र उल्लंघून येईल, आणि तुझ्याकरितां सर्व राक्षससमूहांना जाळून भस्म करील, यांत संशय नाही. ४६,४७,४८ देवि ! मला अनुमोदन दे, मी रामाला भेटण्याकरितां सत्वर जातों, आणि बंधूसह तुजकडे त्याला त्वरेनें पाठवितों. ४९ देवि ! मजजवळ कांही तरी खुणेची वस्तु दे, की जिच्यामुळें रामाचा मजवर विश्वास बसेल. ती वस्तु मी जपून ठेवीन, आणि मोठ्या उल्हासानें ( रामाकडे ) जाईन.' ५० नंतर कमललोचन सीतेनें थोडा वेळ विचार केला, आणि मग आपल्या वेणीतील चूडामणि[1] काढून तिनें तो ( मारुतीला ) दिला. ५१ ( ती म्हणाली, ) ' हे कपिश्रेष्ठा ! हा मणि पाहतांच रामलक्ष्मणांचा तुजवर विश्वास बसेल. हे सुव्रता ! खुणेकरितां आणखी एक गोष्ट मी तुला सांगत्यें. ५२ पूर्वी एकदां चित्रकूट पर्वतावर राम एकांतांत माझ्या मांडीवर मस्तक ठेवून निजला होता. ५३ त्या वेळी कावळ्याच्या रूपानें इंद्राचा पुत्र तेथें येऊन त्यानें मांसाच्या आशेनें माझ्या पायाचा किंचित् लाल असा आंगठा आपल्या नखांनीं आणि चोंचीनें वरचेवर प्रहार करून फोडला. ५४ नंतर राम जागा झाला, तेव्हां माझ्या पायाला झालेली जखम त्याच्या दृष्टीस पडून तो म्हणाला, ' कल्याणि ! मला अप्रिय अशी ही गोष्ट कोणत्या दुष्टानें केली ?' ५५

१. मस्तकावर भूषणार्थ धारण केलेलें रत्न. चूडा—मस्तकावरील केस.

इत्युक्त्वा पुरतोऽपश्यद्वायसं मां पुनः पुनः । अभिद्रवंतं रक्तास्यनख-
तुंडं चुकोप ह ॥ ५६ ॥ तृणमेकमुपादाय दिव्यास्त्रेणाभियोज्य तत् ।
चिक्षेप लीलया रामो वायसोपरि तज्ज्वलत् ॥ ५७ ॥ अभ्यद्रवद्वाय-
सश्च भीतो लोकान् भ्रमन्पुनः । इंद्रब्रह्मादिभिश्चापि न शक्यो रक्षितुं
तदा ॥ ५८ ॥ रामस्य पादयोरग्रेऽपतद्भीत्या दयानिधेः । शरणागत-
मालोक्य रामस्तामिदमब्रवीत् ॥ ५९ ॥ अमोघमेतदस्त्रं मे दत्त्वैकाक्षमितो
व्रज । सव्यं दत्वा ततः काक एवं पौरुषवानपि ॥ ६० ॥ उपेक्षते
किमर्थं मामिदानीं सोऽपि राघवः । हनूमानपि तामाह श्रुत्वा सीतानु-
भाषितम् ॥ ६१ ॥ देवि त्वां यदि जानाति स्थितामत्र रघूत्तमः । करि-
ष्यति क्षणाद्भस्म लंकां राक्षसमंडिताम् ॥ ६२ ॥ जानकी प्राह तं
वत्स कथं त्वं योत्स्यसेऽसुरैः । अतिसूक्ष्मवपुः सर्वे वानराश्च भवादृशाः

इतक्यांत ज्याचा ताड, नख आणि चोंच रक्तानें लाल झाला आहेत, व जो माझ्या अंगावर वरचेवर धांवून येत आहे, अशा त्या कावळ्याला रामानें आपल्या अग्रभागीं पाहिलें. ( तें पाहून ) त्याला फार संताप आला. ५६ मग रामानें गवताची एक काडी घेऊन तिच्यावर दिव्य अस्त्राचा प्रयोग केला, आणि ती धगधगीत काडी सहज कावळ्यावर फेंकिली. ती काडी त्या कावळ्यावर पडतांच तो भ्याला, आणि तीनही लोकांत भटकूं लागला. इंद्र, ब्रह्मदेव इत्यादिकांकडूनही आपलें रक्षण होणें शक्य नाहीं, ( हें पाहून ) तो पुनः दयानिधि रामचंद्राकडे आला आणि भयभीत होऊन त्याच्या पायां पडला. तो शरण आलेला पाहून राम त्याला म्हणाला, ५७,५८,५९ ‘ हें माझें अस्त्र अमोघ–कधींही व्यर्थ न जाणारें–आहे. तरी तूं त्याला आपला एक डोळा दे, आणि येथून निघून जा.’ कावळ्यानें ( तें ऐकून ) आपला उजवा डोळा त्या अस्त्राला दिला. ( मग तो तेथून गेला. ) एवढा पराक्रमी असूनही तो श्रीराम सांप्रत माझी कां बरें उपेक्षा करीत आहे ?’ हनुमंतानें देखील सीतेचें भाषण ऐकून तिला म्हटलें, ६०,६१ ‘ देवि ! तूं येथें आहेस, हें जर रघूत्तम रामाला समजलें, तर तो या राक्षसांनीं भरलेल्या लंकेचें क्षणांत भस्म करील.’ ६२ सीता म्हणाली, ‘ वत्सा ! तूं त्या राक्षसांबरोबर कसा लढणार ? तुझें शरीर तर अत्यंत सूक्ष्म आहे. सर्व वानरही

१. मंत्रप्रयोग करून सोडण्याचें शस्त्र. २. ह्या वेळेपासून कावळ्याला एकाक्ष नांव पडलें.

॥ ६३ ॥ श्रुत्वा तद्वचनं देव्यै पूर्वरूपमदर्शयत् । मेरुमंदरसंकाशं रक्षोगणविभीषणम् ॥ ६४ ॥ दृष्ट्वा सीता हनूमंतं महापर्वतसन्निभम् । हर्षेण महताविष्टा प्राह तं कपिकुंजरम् ॥ ६५ ॥ समर्थोऽसि महासत्त्व द्रक्ष्यंति त्वां महाबलम् । राक्षस्यस्ते शुभः पंथा गच्छ रामांतिकं द्रुतम् ॥ ६६ ॥ बुभुक्षितः कपिः प्राह दर्शनात्पारणं मम । भविष्यति फलैः सर्वैस्तव दृष्टौ स्थितैर्हि मे ॥ ६७ ॥ तथेत्युक्तः स जानक्या भक्षयित्वा फलं कपिः । ततः प्रस्थापितोऽगच्छज्जानकीं प्रणिपत्य सः । किंचिद्दूरमथो गत्वा स्वात्मन्येवानुचिंतयत् ॥ ६८ ॥ कार्यार्थमागतो दूतः स्वामिकार्याविरोधतः । अन्यत्किंचिदसंपाद्य गच्छत्यधम एव सः ॥ ६९ ॥ अतोऽहं किंचिदन्यच्च कृत्वा दृष्ट्वाथ रावणम् । संभाष्य च ततो रामदर्श-

तुझ्यासारखेच असणार ?' ६३ हें ( सीतेचें ) भाषण ऐकून मारुतीनें सीता देवीला आपलें पूर्वरूप दाखविलें. तें मेरुमंदर पर्वतांसारखें असून राक्षससमुदायांला ( पाहतांच ) भीति वाटेल, असें होतें. ६४ मोठा पर्वतच की काय, अशा त्या हनुमंताला पाहून सीतेला अत्यंत आनंद झाला. ती त्या कपिश्रेष्ठाला म्हणाली, ६५ ' महासमर्था ( मारुते ) [1] तूं ( अंगीकृत कार्य सिद्धीस नेण्यास ) समर्थ आहेस. महासामर्थ्यवंत अशा तुला ह्या राक्षसी पाहतील, तरी तूं रामाकडे सत्वर निघून जा. तुला मार्ग कल्याणकारक होवो. ' ६६ त्या वानराला–मारुतीला–भूक लागली होती. तो म्हणाला, ' तुझें दर्शन झालें, तरी आतां तुझ्या नजरेसमोर जी जीं फळें आहेत, ती ती सर्व खाऊन टाकून पारणा[2] फेडितों.' ६७ 'ठीक आहे,' असें जानकीनें म्हटल्यावर त्या वानरानें ( तेथील ) फळें भक्षण केली. नंतर जानकीची अनुज्ञा–परवानगी–घेऊन आणि तिला नमस्कार करून तो तेथून निघाला. कांहीं अंतरावर गेल्यावर त्यानें स्वतःशीं विचार केला, ६८ 'स्वामिकार्याकरितां आलेला दूत त्या कार्यांत विरोध न होईल, अशा प्रकारचें कांहीं तरी दुसरें (स्वसामर्थ्यद्योतक) कार्य न करितां परत जाईल, तर तो अधम ( दूत ) होय. ६९ म्हणून मी दुसरें काहीं तरी काम काढून, रावणाला भेटेन, त्याशीं संभाषण करीन, आणि नंतर रामदर्श-

१. मारुतीच्या अद्भुत सामर्थ्याचें व आकाराचें वर्णन किष्किंधाकांड, सर्ग ९ श्लोक २१–२२ यांत आलें आहे, तें:–' चकार नादं सिंहस्य ब्रह्माण्डं स्फोटयन्निव ॥ २१ ॥ बभूव पर्वताकारस्त्रिविक्रम इवापरः ।' २. भुकेची तृप्ति, क्षुधाशांति.

नार्थं व्रजाम्यहम् ॥ ७० ॥ इति निश्चित्य मनसा वृक्षखंडान्महाबलः ।
उत्पाट्याशोकवनिकां निर्वृक्षामकरोत्क्षणात् ॥ ७१ ॥ सीताश्रयनगं
त्यक्त्वा वनं शून्यं चकार सः । उत्पाटयंतं विपिनं दृष्ट्वा राक्षसयोषितः
॥ ७२ ॥ अपृच्छन् जानकीं कोऽसौ वानराकृतिरुद्भटः ॥ ७३ ॥
जानक्युवाच ॥ भवत्य एव जानंति मायां राक्षसनिर्मिताम् । नाह-
मेनं विजानामि दुःखशोकसमाकुला ॥ ७४ ॥ इत्युक्तास्त्वरितं गत्वा
राक्षस्यो भयपीडिताः । हनूमता कृतं सर्वं रावणाय न्यवेदयन् ॥७५॥
देव कश्चिन्महासत्त्वो वानराकृतिदेहभृत् । सीतया सह संभाष्य ह्यशोक-
वनिकां क्षणात् । उत्पाट्य चैत्यप्रासादं बभंजामितविक्रमः ॥ ७६ ॥
प्रासादरक्षिणः सर्वान्हत्वा तत्रैव तस्थिवान् । तच्छ्रुत्वा तूर्णमुत्थाय
वनभंगं महाप्रियम् ॥ ७७ ॥ किंकरान्प्रेषयामास नियुतं राक्षसाधिपः ।

नाला जाईन.' ७० असा मनांत निश्चय करून त्या महाबलवान् वानरानें झाडेंच्या झाडें उपटून काढिली, आणि एका क्षणांत तें सर्व अशोकवन निर्वृक्षें करून सोडिलें. ७१ सीता ज्या वृक्षाच्या आश्रयाला बसली होती, तेवढा मात्र सोडून बाकी सर्व (अशोक) वन त्यानें ओसाड करून टाकिलें. तें वन मारुति ओसाड करीत आहे, हें पाहून त्या राक्षसिणी जानकीला म्हणाल्या, 'हा वानराकृति दांडगट वीर कोण आहे ?' ७२,७३ जानकी म्हणाली, 'राक्षसांनी काय माया निर्माण केली असेल, ती तुम्हांलाच ठाऊक. मी दुःख आणि शोक यांनी पीडित असून हा कोण आहे, हे मला माहीत नाही.' ७४ असें सीतेनें सांगितल्यावर त्या राक्षसिणी भयपीडित होऊन त्वरित रावणाकडे गेल्या, आणि हनुमंतानें केलेल्या सर्व गोष्टी त्यांनीं त्याला कळविल्या. ७५ त्या म्हणाल्या, 'महाराज ! वानराचा देह धारण करणारा महाबलवान् कोणी प्राणी येथें आला आहे, त्यानें सीतेबरोबर संभाषण केलें, क्षणांत अशोक वनिका विध्वस्त केली, आणि तेथील देवालयही भग्न केलें. त्याच्या पराक्रमाला मिति नाही. ७६ वाड्याच्या सर्व रक्षकांना ठार करून तो तेथेंच राहिला आहे. तें वनभंगाचें अत्यंत अप्रिय वृत्त ऐकून (रावण) लागलाच उठला. ७७ त्या राक्षसाधिपतीनें दहा लक्ष सेवक मारुतीवर पाठविले ह्या वेळी मोडलेल्या देवाल-

१. 'मग त अशोकवन कपी मोडी। राक्षसांचे झोडी बळें सैन्य ॥'—अभंग, सीतागीत, मोरोपंत.

र्निर्भग्नचैत्यप्रासादप्रथमांतरसंस्थितः ॥ ७८ ॥ हनुमान्पर्वताकारो लोह-स्तंभकृतायुधः । किंचिल्लांगूलचलनो रक्तास्यो भीषणाकृतिः ॥ ७९ ॥ आपतंतं महासंघं राक्षसानां ददर्श सः । चकार सिंहनादं च श्रुत्वा ते मुमुहुर्भृशम् ॥ ८० ॥ हनूमंतमथो दृष्ट्वा राक्षसा भीषणाकृतिम् । निर्जघ्नुर्विविधास्त्रौघैः सर्वराक्षसघातिनम् ॥ ८१ ॥ तत उत्थाय हनुमान्मुद्गरेण समंततः । निष्पिपेष क्षणादेव मशकानिव यूथपः ॥ ८२ ॥ निहतान्किंकरान् श्रुत्वा रावणः क्रोधमूर्च्छितः । पंच सेनापतींस्तत्र प्रेषयामास दुर्मदान् ॥ ८३ ॥ हनूमानपि तान्सर्वाँल्लोहस्तंभेन चाहनत् । ततः क्रुद्धो मंत्रिसुतान्प्रेषयामास सप्त सः ॥ ८४ ॥ आगतानपि तान्सर्वान्पूर्ववद्वानरेश्वरः । क्षणान्निःशेषतो हत्वा लोहस्तंभेन मारुतिः ॥८५॥ पूर्वस्थानमुपाश्रित्य प्रतीक्षन् राक्षसान् स्थितः । ततो जगाम बलवान्कुमारोऽक्षः प्रतापवान् ॥ ८६ ॥ तमुत्पपात हनुमान् दृष्ट्वाकाशे समुद्गरः ।

याच्या पहिल्या चाकांत ( मारुति ) बसला होता. ७८ त्या हनुमंताचे शरीर पर्वतासारखें होतें. त्यानें आयुध म्हणून एक लोहस्तंभ हातांत घेतला होता. तो आपलें शेंपूट जरा जरा हालवीत होता. त्याचें तोंड रक्तवर्ण व आकृति भयंकर दिसत होती. ७९ आपल्या अंगावर चालून येणारा राक्षसांचा मोठा समुदाय त्यानें—मारुतीनें—पाहिला, आणि सिंहासारखी गर्जना केली. ती ऐकून ते ( राक्षस ) मूर्च्छा येऊन पडले. ८० सर्व राक्षसांचा, घात करणाऱ्या भयंकर आकाराच्या हनुमंताला पाहून त्या राक्षसांनीं अनेक प्रकारच्या अस्त्रप्रहारांनी त्याच्यावर मारा सुरू केला. ८१ नतर मदोन्मत्त हत्तीनें माशा चिरडून टाकाव्या, त्याप्रमाणें हनुमंतानें उठून हातांतील लोखंडी मुद्गरानें भोंवतालच्या सर्वां( राक्षसां )चें पीठ केलें. ८२ आपले सेवक मारले गेले, हें ऐकून रावण क्रोधानें देहभान विसरून गेला. त्यानें मदोन्मत्त असे पांच सेनापति त्या( मारुती )वर पाठविले. ८३ हनुमंतानेंही त्या सगळयांचा ( हातांतील ) लोहस्तंभानें वध केला. त्यावर त्या ( रावणा )नें सात मंत्रिपुत्र पाठविले. ८४ पूर्वींप्रमाणें मारुतीनें ह्या वेळीही आपल्यावर चालून आलेल्या त्या सर्वांचा लोहमुद्गरानें एका क्षणांत वध केला, ८५ आणि पूर्वींच्या ठिकाणी येऊन तो राक्षसांची वाट पाहात राहिला. यानंतर बलवान् व प्रतापी कुमार अक्ष ( मारुतीवर ) चालून आला. ८६ त्याला पाहून हनुमंत हातांत मुद्गर

गगनात्त्वरितो मूर्ध्नि मुद्गरेण व्यताडयत् ॥ ८७ ॥ हत्वा तमक्षं निःशेषं
बलं सर्वं चकार सः ॥ ८८ ॥ ततः श्रुत्वा कुमारस्य वधं राक्षसपुंगवः ।
क्रोधेन महताविष्ट इंद्रजेतारमब्रवीत् ॥ ८९ ॥ पुत्र गच्छाम्यहं तत्र
यत्रास्ते पुत्रहा रिपुः । हत्वा तमथवा बद्ध्वा आनयिष्यामि तेंऽतिकम्
॥ ९० ॥ इंद्रजित्पितरं प्राह त्यज शोकं महामते । मयि स्थिते किमर्थं
त्वं भाषसे दुःखितं वचः ॥ ९१ ॥ बद्ध्वानेष्ये द्रुतं तात वानरं ब्रह्मपा-
शतः । इत्युक्त्वा रथमारुह्य राक्षसैर्बहुभिर्वृतः ॥ ९२ ॥ जगाम वायु-
पुत्रस्य समीपं वीरविक्रमः । ततोऽतिगर्जितं श्रुत्वा स्तंभमुद्यम्य वीर्य-
वान् ॥ ९३ ॥ उत्पपात नभोदेशं गरुत्मानिव मारुतिः । ततो भ्रमंतं
नभसि हनूमंतं शिलीमुखैः ॥ ९४ ॥ विद्ध्वा तस्य शिरोभागमिषुभिश्चा-
ष्टभिः पुनः । हृदयं पादयुगलं षड्भिरेकेन वालधिम ॥ ९५ ॥

घेऊन आकाशांत उडाला, व त्वरेनें त्या (अक्षा)च्या मस्तकावर त्यानें मुद्गराचा प्रहार केला. ८७ अक्षाचा वध करून त्या ( मारुती )नें त्याच्या सर्व सैन्याचा समूळ नाश केला. ८८ कुमार अक्षाचा वध झाल्याचें ऐकून राक्षसश्रेष्ठ ( रावण ) अत्यंत क्रोधाविष्ट झाला. तो इंद्रजिताला म्हणाला, ८९ 'पुत्रा ! जेथें तो माझ्या ( अक्ष ) पुत्राचा वध करणारा शत्रु आहे, तेथें मी जातों. मी त्याचा वध करून किंवा त्याला बांधून तुजजवळ घेऊन येतों.' ९० त्यावर इंद्रजित् पित्याला म्हणाला, 'महामते ! आपण शोकाचा त्याग करावा. मी असतां आपण असें दुःखाचें भाषण कां करितां ? ९१ बाबा ! त्या वानराला ब्रह्मपाशानें बांधून मी सत्वर घेऊन येतों.' असें बोलून तो ( इंद्रजित् ) रथावर चढला. त्यानें आपणाबरोबर पुष्कळ राक्षस घेतले होते. ९२ तो अतिपराक्रमी वीर वायुपुत्राच्या जवळ आला. पुढें (इंद्रजिताची) मोठी गर्जना ऐकून त्या वीर्यशाली मारुतीनें आपला (लोह) स्तंभ उचलला, ९३ आणि गरुडाप्रमाणें आकाशांत उडी घेतली. नंतर आकाशांत भ्रमण करणाऱ्या त्या हनुमंतावर इंद्रजितानें बाणांचे प्रहार केले. त्याच्या मस्तकावर त्यानें आठ बाण मारिले, पुनः हृदयावर आठ बाण मारिले. आणि दोनी पायांवर सहा बाण मारिले. नंतर एका बाणानें

१. समानार्थक वर्णनः–'मारीला समरीं रावणाचा अक्ष, कुमार जो दक्ष रणरंगीं ॥ इंद्रजिताला तो दारूनि सांपडे । हनुमंत पडे ब्रह्मपाशीं ॥'–सीतागीत अभंग, मोरोपंत.

भेदयित्वा ततो घोरं सिंहनादमथाकरोत् । ततोऽतिहर्षाद्धनुमांस्तंभमुद्यम्य वीर्यवान् ॥ ९६ ॥ जघान सारथिं साश्वं रथं चाचूर्णयत्क्षणात् । ततोऽन्यं रथमादाय मेघनादो महाबलः ॥ ९७ ॥ शीघ्रं ब्रह्मास्त्रमादाय बद्ध्वा वानरपुंगवम् । निनाय निकटं राज्ञो रावणस्य महाबलः ॥ ९८ ॥ यस्य नाम सततं जपंति येऽज्ञानकर्मकृतबंधनं क्षणात् । सद्य एव परिमुच्य तत्पदं यांति कोटिरविभासुरं शिवम् ॥ ९९ ॥ तस्यैव रामस्य पदांबुजं सदा हृत्पद्ममध्ये सुनिधाय मारुतिः । सदैव निर्मुक्तसमस्तबंधनः किं तस्य पाशैरितरैश्च बंधनैः ॥ १०० ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे सुंदरकांडे तृतीयः सर्गः ॥ ३ ॥

( इंद्रजितानें ) त्याच्या पुच्छाचा भेद केला, आणि भयंकर सिंहनाद केला. तेव्हां वीर्यशाली मारुतीनें मोठ्या आनंदानें आपला लोहमुद्गर उचलून घेतला, ९४,९५,९६ आणि इंद्रजिताच्या सारथ्याचा वध करून त्याचे घोडे आणि रथ यांचा क्षणांत चुरा करून टाकला. नंतर त्या बलवान् इंद्रजितानें दुसरा रथ आणविला, आणि त्यांत तो बसला. पुढें त्यानें ब्रह्मास्त्र घेऊन त्याचे योगानें त्या वानरवीराला बांधिलें, मग तो बलशाली ( इंद्रजित् ) त्याला राजा रावणाजवळ घेऊन गेला. ९७,९८ ज्याचे नामाचा सतत जप केल्यानें अज्ञानापासून उत्पन्न झालेल्या कर्मबंधांतून मुक्त होऊन कोटिसूर्यांप्रमाणें तेजस्वी व कल्याणकारक अशा त्याच्या—ईश्वराच्या—पदी भक्त तत्काल जाऊन पोंचतात, ९९. त्याच रामाचें चरणकमल मारुतीनें आपल्या हृदयंकमलामध्यें सतत चांगल्या रीतीनें ठेविलें असल्याकारणानें सर्व बंधनांपासून तो आधींच मुक्त होता. ब्रह्मपाश किंवा इतर बंधनें, यांकडून त्याचें काय होणार? १०० ”

**सुंदरकांड, सर्ग तिसरा समाप्त.**

१. समानार्थक उतारा:—‘ नारायणपराः सर्वे न कुतश्चन बिभ्यति । स्वर्गापवर्गनरकेष्वपि तुल्यार्थदर्शिनः ॥’—भागवत.

## सुंदरकांड, सर्ग चवथा.

**॥ श्रीमहादेव उवाच ॥ यांतं कपींद्रं धृतपाशबंधनं विलोकयंतं नगरं विभीतवत् । अताडयन्मुष्टितलैः सुकोपनाः पौराः समंतादनुयांत ईक्षितुम् ॥ १ ॥ ब्रह्मास्त्रमेनं क्षणमात्रसंगमं कृत्वा गतं ब्रह्मवरेण सत्वरम् । ज्ञात्वा हनूमानपि फल्गुरज्जुभिर्धृतो ययौ कार्यविशेषगौरवात् ॥२॥ सभांतरस्थस्य च रावणस्य तं पुरो निधायाह बलारिजित्तदा । बद्धो मया ब्रह्मवरेण वानरः समागतोऽनेन हता महासुराः ॥ ३ ॥ यद्युक्तमत्रार्य विचार्य मंत्रिभिर्विधीयतामेष न लौकिको हरिः । ततो विलोक्याह स राक्षसेश्वरः प्रहस्तमग्रे स्थितमंजनाद्रिभम् ॥ ४ ॥ प्रहस्त पृच्छैनमसौ किमागतः किमत्र कार्यं कुत एव वानरः । वनं किमर्थं सकलं विनाशितं**

श्रीमहादेव म्हणाला, "(पाशांत बद्ध झाल्यावर,) तें पाशबंधन (हातांत) धरून कपिश्रेष्ठ—मारुति—भ्यालयासारखा नगराकडे पाहात जात असतां, अत्यंत क्रुद्ध झालेले नागरिक जन त्याला पाहण्याकरितां चारी बाजूंनी त्याच्यामागें आले, आणि त्याला मुष्टितलांनी मारूं लागले. १ इकडे ब्रह्मदेवाचा ( मारुतीला ) वर असल्यामुळें त्या ब्रह्मास्त्रानें मारुतीच्या शरीराला क्षणमात्र स्पर्श केला, आणि लगेच तें निघून गेलें. आपल्या भोंवती केवळ फुसक्या दोऱ्यांचेंच बंधन राहिलें आहे, ही गोष्ट मारुतीला ठाऊक होती; तथापि त्याला कांहीं विशिष्ट कार्य साधावयाचें असल्यामुळें तो ( तशा स्थितीतही ) पुढें चालला. २ या वेळीं रावण आपल्या सभेमध्यें बसला होता, त्याच्या पुढें इंद्रजितानें मारुतीला उभें केलें आणि म्हटलें, 'ब्रह्मवरानें मजकडून बद्ध झालेला वानर येथें आला आहे. ह्यानें अनेक मोठमोठ्या दैत्यांचा वध केला आहे. ३ महाराज! मंत्र्यांचा सल्ला घेऊन जें कांहीं करावयाचें असेल—शिक्षा द्यावयाची असेल—तें आपण आतां करावें. हा कांहीं सामान्य वानर नव्हे.' हें ऐकून राक्षसेश्वर रावणानें ( मारुतीकडे ) पाहिलें, आणि समोरच बसलेल्या प्रहस्ताला तो म्हणाला. हा प्रहस्त म्हणजे एक काजळाचा पर्वतच आहे कीं काय, असा भास होत असे. ४ (रावण म्हणाला,) 'प्रहस्ता! हा वानर कां आला आहे, येथें त्याचें काय काम आहे, हा कोठून आला, सर्व वनाचा नाश यानें कां केला, आणि बलात्कार करून माझे राक्षस यानें कां

१ लंकावासी राक्षस. २. आपल्या ब्रह्मास्त्रापासून तुला कधींही पीडा होणार नाहीं, असा.

हताः किमर्थं मम राक्षसा बलात् ॥ ५ ॥ ततः प्रहस्तो हनुमंतमादरात्पप्रच्छ केन प्रहितोऽसि वानर । भयं च ते मास्तु विमोक्ष्यसे मया सत्यं वदस्वाखिलराजसंनिधौ ॥ ६ ॥ ततोऽतिहर्षात्पवनात्मजो रिपुं निरीक्ष्य लोकत्रयकंटकासुरम् । वक्तुं प्रचक्रे रघुनाथसत्कथां क्रमेण रामं मनसा स्मरन्मुहुः ॥ ७ ॥ शृणु स्फुटं देवगणाद्यमित्र हे रामस्य दूतोऽहमशेषहृत्स्थितेः । यस्याखिलेशस्य हृताधुना त्वया भार्या स्वनाशाय शुनेव सद्धविः ॥ ८ ॥ स राघवोऽभ्येत्य मतंगपर्वतं सुग्रीवमैत्रीमनलस्य संनिधौ । कृत्वैकबाणेन निहत्य वालिनं सुग्रीवमेवाधिपतिं चकार तम् ॥ ९ ॥ स वानराणामधिपो महाबली महाबलैर्वानरयूथकोटिभिः । रामेण सार्धं सह लक्ष्मणेन भो प्रवर्षणेऽमर्षयुतोऽवतिष्ठते ॥१०॥ संचोदितास्तेन महाहरीश्वरा धरासुतां मार्गयितुं दिशो दश । तत्राहमेकः पवनात्मजः कपिः सीतां विचिन्वञ्छनकैः समागतः ॥११॥

मारिले आहेत, हें याला विचार.' ५ नंतर प्रहस्तानें मारुतीला आदरपूर्वक विचारिलें, 'हे वानरा! तुला कोणी पाठविलें? तुला भिण्याचें कारण नाही. मी तुला सोडून देईन. जो कांही खरा वृत्तांत असेल, तो या राजराजेश्वरा (रावणा) पुढे सांग.' ६ तें ऐकून वायुपुत्र मारुतीला अत्यंत हर्ष वाटला. आपला शत्रु व तिन्ही लोकांना कंटकासमान भासणारा अशा त्या दैत्याला–रावणाला–मारुतीनें न्याहाळून पाहिलें, आणि चित्तांत रामाचें वारंवार स्मरण करून श्रीरामचंद्राची मंगल कथा सांगण्यास त्यानें प्रारंभ केला. ७ (तो म्हणाला,) 'हे देवगणादिकांच्या शत्रो! नीट ऐक. सर्वांच्या हृदयांत वास करणाऱ्या श्रीरामाचा मी दूत आहें. (यज्ञांतील) पवित्र होमद्रव्य पळविणाऱ्या कुत्र्याप्रमाणें आपला स्वतःचाच नाश करून घेण्यासाठी त्रैलोक्याधीश रामाची पत्नी तूं चोरून आणिली आहेस. ८ त्या राघवानें–रामानें–मतंग पर्वतावर येऊन अग्नीच्या सन्निध सुग्रीवाशी मैत्री केली, आणि एकाच बाणानें वालीचा वध करून त्या सुग्रीवाला (वानरांचा) अधिपति केलें. ९ अरे! तो महाबलवान् वानरांचा राजा क्रोधाविष्ट होऊन वानरांचे कोट्यवधि कळप घेऊन रामलक्ष्मणांसह प्रवर्षण पर्वतावर राहिला आहे. १० त्यानें पृथ्वीच्या कन्येला–सीतेला–शोधण्याकरितां मोठमोठे वानरवीर दश दिशांना पाठविले आहेत. त्यांपैकी मी एक वानर आहें. मी वायुपुत्र–मारुति–असून सीतेचा शोध करीत हळूहळू येथें आलों. ११

**दृष्टा मया पद्मपलाशलोचना सीता कपित्वाद्विपिनं विनाशितम् । दृष्ट्वा ततोऽहं रभसा समागतान्मां हंतुकामान् धृतचापसायकान् ॥ १२ ॥ मया हतास्ते परिरक्षितं वपुः प्रियो हि देहोऽखिलदेहिनां प्रभो । ब्रह्मास्त्रपाशेन निबध्य मां ततः समागमन्मेघनिनादनामकः ॥ १३ ॥ स्पृष्ट्वैव मां ब्रह्मवरप्रभावतस्त्यक्त्वा गतं सर्वमवैमि रावण । तथाप्यहं बद्ध इवागतो हितं प्रवक्तुकामः करुणारसार्द्रधीः ॥ १४ ॥ विचार्य लोकस्य विवेकतो गतिं न राक्षसीं बुद्धिमुपैहि रावण । दैवीं गतिं संसृतिमोक्षहैतुकीं समाश्रयात्यंतहिताय देहिनः ॥१५॥ त्वं ब्राह्मणो ह्युत्तमवंशसंभवः पौलस्त्यपुत्रोऽसि कुबेरबांधवः। देहात्मबुद्ध्यापि च पश्य राक्षसो नास्यात्मबुद्ध्या किमु राक्षसो**

कमलपत्राक्षी सीता येथें माझ्या दृष्टीस पडली. वानरजातीच्या स्वभावाला अनुसरून मी वनाचा विध्वंस केला. त्यामुळें हातांत धनुष्यबाण घेऊन मला मारण्याच्या इच्छेनें वेगानें आलेले(राक्षस) पाहून मी त्यांचा वध केला, आणि स्वतःच्या शरीराचें रक्षण केलें. राजा ! सर्व प्राण्यांना आपलें शरीर हें प्रिय असतेंच. पुढें मेघनाद[1] नांवाचा ( राक्षस ) ब्रह्मास्त्रपाशानें मला बांधून येथें घेऊन आला. १२,१३ ब्रह्मदेवाच्या वरप्रभावानें त्या अस्त्रानें मला केवळ स्पर्श केला, आणि तें निघून गेलें. रावणा ! हें सर्व मला ठाऊक असूनही तुला कांहीं ( हिताच्या ) गोष्टी सांगाव्या, ह्याच उद्देशानें बांधल्यासारखा होऊन मी येथें आलों. तुजविषयी करुणा उत्पन्न होऊन माझें चित्त अत्यंत कळवळलें आहे. १४ रावणा ! विचारपूर्वक वागल्यानें लोकांना सद्गति मिळते, हा गोष्ट लक्ष्यांत आण, आणि राक्षसी बुद्धीचा स्वीकार करूं नकोस. संसारांतून मुक्त होण्याला साधनभूत अशा दैवी मार्गाचा–परपीडा[2] न करणें ह्याचा–आश्रय कर. त्यांतच तुझ्या आत्म्याचें अत्यंत कल्याण आहे. १५ तूं ब्राह्मण असून तुझा जन्म उत्तम कुलांत झालेला आहे. तूं पौलस्त्याचा पुत्र असून कुबेराचा बंधु आहेस, नीट पहा, देहात्मबुद्धीनें–देह[3] हाच आत्मा अशा बुद्धीनें–पाहिलेंस, तरी तूं राक्षस नाहीस ( ब्राह्मण आहेस ); उलट आत्मबुद्धीनें–आत्मा देहाहून वेगळा आहे, असें मानिलेंस, तरी तूं राक्षस नाहींस, हें वेगळें कशाला सांगितलें

१. इंद्रजित्. २. 'परोपकार पुण्याय, पापाय परपीडनम्'. ३. देह हाच आत्मा हा बुद्धि अज्ञानमूलक होय:–' आरिसां मुख जैसें । बिंबलिया नाव असे । देहीं बसणें तैसें । आत्मतत्त्वा ॥ तया देहा म्हणती मेटी । हे सपायी निर्जीव गोठी । वारिया वाळुवें गाठी । केही आहे ॥ '–ज्ञानेश्वरी १३.

**न हि ॥१६॥ शरीरबुद्धींद्रियदुःखसंततिर्न ते न च त्वं तव निर्विकारतः। अज्ञानहेतोश्च तथैव संततेरसत्त्वमस्याः स्वपतो हि दृश्यवत्॥१७॥इदं तु सत्यं तव नास्ति विक्रिया विकारहेतुर्न च तेऽद्वयत्वतः । यथा नभः सर्वगतं न लिप्यते तथा भवान्देहगतोऽपि सूक्ष्मकः । देहेंद्रियप्राणशरीरसंगत- स्त्वात्मेति बुद्ध्वाखिलबंधभाग्भवेत् ॥ १८ ॥ चिन्मात्रमेवाहमजोऽहमक्षरो ह्यानंदभावोऽहमिति प्रमुच्यते । देहोऽप्यनात्मा पृथिवीविकारजो न प्राण आत्मानिल एष एव सः ॥ १९ ॥ मनोऽप्यहंकारविकार एव नो न चापि बुद्धिः प्रकृतेर्विकारजा। आत्मा चिदानंदमयोऽविकारवान्देहादिसं- घाद्व्यतिरिक्त ईश्वरः ॥ २० ॥ निरंजनो मक्त उपाधितः सदा ज्ञात्वैव-**

पाहिजे ? १६ शरीरें, बुद्धि, इंद्रियें ह्यांपासून उद्भवणारी दुःखें तुला लागत नाहींत; कारण, दुःखपरंपरा ज्याचे धर्म तें ( चित्त ) तूं नव्हस. तूं ( आत्मा ) निर्विकारी आहेस. प्राण्याला स्वप्नांत दिसणारे पदार्थ ( वस्तुतः असत्य असतात ), त्याचप्र- माणें ही दुःखसंतति अज्ञानमूलक असल्यामुळें असत्य आहे. १७ तुझें स्वरूप सत्य आहे; तुला विकार म्हणून नाही. तुझ्या ठिकाणीं द्वैत नसल्याकारणानें विका- राचें कारण ( अज्ञान तें ) संभवत नाही. ज्याप्रमाणें आकाश सर्वत्र भरलेलें असून कशानेंही लिप्त होत नाही, त्याचप्रमाणें अत्यंत सूक्ष्म होत्साता तूं देहांत वास करू- नही दुःखादिकांनी लिप्त होत नाहीस. सूक्ष्म शरीर, इंद्रियें, प्राण, स्थूल शरीर ह्यांचा संबंध घडून, प्राणी ह्यांनाच अज्ञानानें आत्मा असें मानितो, आणि त्यामुळें सर्व प्रकारच्या बंधनांत सांपडतो. १८ मी चैतन्यरूप आहें, मी जन्मरहित आहें, मी अक्षर—नाशरहित—आहें, मी आनंदमय आहें, असा विचार झाला की प्राणी मुक्त होतो. देह पृथ्वीच्या विकारापासून उत्पन्न झाला असल्यामुळें तो आत्मा नाहीं. प्राणही आत्मा नाही, कारण तो प्राण म्हणजे केवळ वायु होय. १९ मन हा अहंका- राचा विकार म्हणून तें आत्मा नव्हे. बुद्धि देखील आत्मा नव्हे; कारण ती प्रकृ- तीच्या विकारापासून उद्भवते. आत्मा[३] चैतन्यरूप, आनंदमय, विकाररहित, देहादि समुदायाहून निराळा, सर्वशक्तिमान्, अलिप्त, सर्वदा उपाधींपासून मुक्त, असें ज्ञान

१. शरीर ( स्थूल देह ), बुद्धि ( सूक्ष्मदेह ), आणि नेत्रादि इंद्रियें. २. समानार्थक उतारा:-' अहोरात्रें जैसी । येती जाती आकाशी । आत्मसत्ते तैसी । देहें जाण ॥ '—ज्ञानेश्वरी १३. ३. आत्मा.—' एवं वृत्ति इंद्रिय विषय । हाचि त्रिगुणसमुदाय । आत्मा यासी प्रकाश- मय । साक्षिमात्र ॥ वृत्ति उठता जाणावे । इंद्रियासी प्रकाशावें । विषय तेही अवलोकावे ।

मात्मानमितो विमुच्यते । अतोहमात्यंतिकमोक्षसाधनं वक्ष्ये शृणुष्वावहितो महामते ॥ २१ ॥ विष्णोर्हि भक्तिः सुविशोधनं धियस्ततो भवेज्ज्ञानमतीव निर्मलम् । विशुद्धतत्त्वानुभवो भवेत्ततः सम्यग्विदित्वा परमं पदं व्रजेत् ॥ २२ ॥ अतो भजस्वाद्य हरिं रमापतिं रामं पुराणं प्रकृतेः परं विभुम् । विसृज्य मौर्ख्यं हृदि शत्रुभावनां भजस्व रामं शरणागतप्रियम् । सीतां पुरस्कृत्य सपुत्रबांधवो रामं नमस्कृत्य विमुच्यसे भयात् ॥२३॥ रामं परात्मानमभावयन् जनो भक्त्या हृदिस्थं सुखरूपमद्वयम् । कथं परं तीरमवाप्नुयाज्जनो भवांबुधेर्दुःखतरंगमालिनः ॥ २४ ॥ नो चेत्त्वमज्ञानमयेन वह्निना ज्वलंतमात्मानमरक्षितारिवत् । नयस्यधोऽधः

झालें म्हणजे पुरुष संसारांतून मुक्त होतो. म्हणून महामते ( रावणा )[१] मोक्षाचें निश्चित असें साधन मी तुला सांगतों. लक्ष्य देऊन ऐक. २०, २१ विष्णूची भक्ति हें चित्ताला शुद्ध करण्याचें उत्तम साधन होय. ( अशा रीतीनें ) चित्त शुद्ध झालें असतां अत्यंत निर्मल असें ज्ञान प्राप्त होतें. त्या ज्ञानापासून परम शुद्ध असा तत्त्वानुभव प्राप्त होतो. अशा प्रकारें ज्याला उत्तम तत्त्वज्ञान लाधतें, त्याला परम पदाची प्राप्ति होते. २२ म्हणून तूं आतां रामाची भक्ति कर. हा राम म्हणजे साक्षात् लक्ष्मीपति विष्णु होय. हा प्रकृतीपासून अलिप्त असून सर्वव्यापी पुराणपुरुष आहे. शरणागत भक्तजनांविषयी त्याला फार प्रेम आहे. म्हणून हृदयांतील मूर्खपणा व शत्रुभाव सोडून सीतेला पुढें कर, आणि त्या श्रीरामाचा पुत्रबांधवांसह आश्रय कर, त्याला नमस्कार कर; असें केल्यानें भयापासून तूं मुक्त होशील. २३ राम हा परमात्मा आहे, तो सर्वांच्या हृदयांत राहणारा असून सुखरूप व अद्वितीय आहे, अशी भक्तिपूर्वक भावना जो कोणी ठेवीत नाही, तो मनुष्य दुःखरूपी लाटांनी तुडुंब भरलेल्या संसारसमुद्राच्या परतीराला कसा जाऊन पोंचेल ? २४ अशी भक्तिपूर्वक भावना तूं ठेविली नाहींस, तर अज्ञानरूप अग्नीनें जळणाऱ्या आत्म्याचें शत्रूप्रमाणें अरक्षण केल्यासारखें होईल, आणि आपण स्वतः केलेल्या पातकांनी तूं त्या आत्म्याला

स्वप्रकाशकत्व ॥ जसा ठाणवईचा दिवा । तण प्रकाश मात्र करावा । घरींचा चोर की परावा । नेणे सहसा ॥ तेवीं आत्मा ज्ञानरूपक । सामान्यत्वे प्रकाशक । परी सुखदुःखाचें कौतुक । साक्षीसी नाहीं ॥ '– प्राकृत सदाचार.

१. संसार तरण्याला भक्ति हेंच साधनः–' न ह्यतोऽन्य· शिव· पंथा विशत संसृताविह । वासुदेवे भगवति भक्तियोगो यतो भवेत् ॥ '–भागवत, स्कंध २

स्वकृतैश्च पातकैर्विमोक्षशंका न च ते भविष्यति ॥२५॥ श्रुत्वामृतास्वादसमानभाषितं तद्वायुसूनोर्दशकंधरोऽसुरः। अमृष्यमाणोऽतिरुषा कपीश्वरं जगाद रक्तांतविलोचनो ज्वलन् ॥ २६ ॥ कथं ममाग्रे विलपस्यभीतवत् प्लवंगमानामधमोऽसि दुष्टधीः । क एष रामः कतमो वनेचरो निहन्मि सुग्रीवयुतं नराधमम् ॥ २७ ॥ त्वां चाद्य हत्वा जनकात्मजां ततो निहन्मि रामं सहलक्ष्मणं ततः । सुग्रीवमग्रे बलिनं कपीश्वरं सवानरं हन्म्यचिरेण वानर । श्रुत्वा दशग्रीववचः स मारुतिर्विवृद्धकोपेन दहन्निवासुरम् ॥ २८ ॥ न मे समा रावणकोटयोऽधम रामस्य दासोऽहमपारविक्रमः। श्रुत्वातिकोपेन हनूमतो वचो दशाननो राक्षसमेवमब्रवीत् ॥ २९ ॥ पार्श्वे स्थितं मारय खंडशः कपिं पश्यंतु सर्वेऽसुरमित्रबांधवाः । निवारयामास ततो विभीषणो महासुरं सायुधमुद्यतं वधे । राजन्वधार्हो न

अधोगतीला नेशील, मग मोक्षाची आशा करण्यास तुला जागाच राहणार नाही.' २५ तें वायुपुत्राचें अमृतासारखें गोड भाषण त्या दशमुखी असुरानें—रावणानें—ऐकतांच त्याला अत्यंत संताप आला. तें ( भाषण ) त्याला सहन झालें नाही. त्याचे नेत्रप्रांत क्रोधानें लाल झाले, त्याच्या अंगाचा भडका झाला. तो त्या कपिश्रेष्ठा—( मारुती )ला म्हणाला, २६ ‘ तूं हलकट दुष्ट बुद्धीचा वानर आहेस, माझ्यापुढें धिटाईनें कसली बडबड चालविली आहेस? राम तो काय? आणि तो वनचर (सुग्रीव) तरी काय? मी त्या नराधमा ( रामा ) ला आणि त्या सुग्रीवालाही ठार मारीन ! २७ हे वानरा ! आज आधीं तुला मारून टाकितों, नंतर जानकीला, त्यानंतर लक्ष्मणासह रामाला, त्यामागून बलवान् कपिराज सुग्रीवाला, आणि त्याबरोबरच त्याच्या सर्व वानरांना लवकरच मारून टाकितों.' हें रावणाचें भाषण ऐकून मारुतीचा कोप अत्यंत वाढला. तो त्या राक्षसाला—रावणाला—जाळून टाकितो की काय असें वाटलें. २८ ( तो म्हणाला, ) ‘ अधमा ! ( तुझ्यासारखे ) कोट्यवधि रावण झाले, तरी त्यांची माझ्या ( एकट्याशी ) तुलना करतां येणार नाही. मी रामाचा दास असून माझ्या पराक्रमाला अंत नाही. ' हें मारुतीचें भाषण ऐकून रावणाला अत्यंत क्रोध आला, आणि तो जवळच असलेल्या एका राक्षसाला म्हणाला, ‘ ह्या वानराला मारून त्याचे तुकडे तुकडे कर. राक्षसांचे सर्व मित्र आणि बांधव पाहोत. ' तेव्हां शस्त्र उगारून ( मारुतीचा ) वध करण्यास उद्युक्त झालेल्या त्या महादैत्याचें विभीषणानें निवारण

भवेत्कथंचन प्रतापयुक्तैः परराजवानरः ॥ ३० ॥ हतेऽस्मिन्वानरे दूते वार्ता को वा निवेदयेत् । रामाय त्वं यमुद्दिश्य वधाय समुपस्थितः ॥ ३१ ॥ अतो वधसमं किंचिदन्यच्चिंतय वानरे । सचिह्नो गच्छतु हरिर्यं दृष्ट्वायास्यति द्रुतम् ॥ ३२ ॥ रामः सुग्रीवसहितस्ततो युद्धं भवेत्तव । विभीषणवचः श्रुत्वा रावणोऽप्येतदब्रवीत् ॥ ३३ ॥ वानराणां हि लांगूले महामानो भवेत्किल । अतो वस्त्रादिभिः पुच्छं वेष्टयित्वा प्रयत्नतः ॥ ३४ ॥ वह्निना योजयित्वैनं भ्रामयित्वा पुरेऽभितः । विसर्जयत पश्यंतु सर्वे वानरयूथपाः ॥ ३५ ॥ तथेति शणपट्टैश्च वस्त्रैरन्यैरनेकशः । तैलाक्तैर्वेष्टयामासुर्लांगूलं मारुतेर्दृढम् ॥ ३६ ॥ पुच्छाग्रे किंचिदनलं दीपयित्वाथ राक्षसाः । रज्जुभिः सुदृढं बद्ध्वा धृत्वा तं बलिनोऽसुराः ॥ ३७ ॥ समंताद् भ्रामयामासुश्चोरोऽयमिति वादिनः ।

केलें. ( तो रावणाला म्हणाला, ) ‘ राजन् ! प्रतापी पुरुषांनी परराजाकडून आलेल्या वानराचा वध कधीही करूं नये. २९,३० या दूत वानराला मारिलें असतां, ज्याला उद्देशून तुम्ही हा वध करण्यास सिद्ध झालां आहां, त्या रामाला ही वार्ता कोण जाऊन सांगणार ? ३१ म्हणून या वानराला वधासारखी दुसरी कांही तरी शिक्षा देण्याचें मनांत आणा. तुम्ही ( असें ) केल्याची कांही तरी निशाणी घेऊन हा जावो. तें चिन्ह दृष्टीस पडतांच राम सुग्रीवासह लागलाच निघून येईल. नतर तुम्हांशीं त्याचें युद्ध होईल.’ विभीषणाचें भाषण ऐकून रावणही म्हणाला, ३२,३३ ‘ वानरांना मोठी मानास्पद वाटणारी वस्तु म्हणजे शेपटी होय. म्हणून प्रयत्नपूर्वक ह्याच्या शेपटीला वस्त्रें वगैरे बांधवून, ३४ त्याला अग्नि लावा, आणि त्याला नगरांत ( अशा स्थितीत ) सर्वत्र फिरवा, आणि मग सोडून द्या. सर्व वानरसेनापति ( हें ) पाहोत.’ ३५ ‘ बरें आहे, ’ असें म्हणून त्या राक्षसांनी तेलांत भिजलेल्या तागाच्या फडक्यांनी आणि अनेक प्रकारच्या दुसऱ्या वस्त्रांनीं मारुतीचें शेपूट घट्ट बांधून टाकिलें, ३६ आणि पुच्छाग्राला थोडासा अग्नि[१] लावला. त्या बलवान् राक्षसांनी त्या ( मारुती )ला दोऱ्यांनी बळकट आंवळून धरिलें, ३७ आणि ‘ हा चोर आहे. ’ असें आरडत नगरांत चोहोंकडे फिरविलें. वाद्यांचे गजरांत ते त्याला

१. सदृश वर्णन —‘ रावणें वानर मानुनेया तुच्छ । पेटविलें पुच्छ जाळावया ॥ पुच्छ पेटताचि हनुमंत उडे । लंकेमध्यें हुडे वाडे जाळी ॥ देवानीं वदनीं घातली आगोळा । लंकेची रांगोळी । पाहोनिया ॥ ’—सीतागीत अभंग, मोरोपंत.

तूर्यघोषैर्घोषयंतस्ताडयंतो मुहुर्मुहुः ॥ ३८ ॥ हनूमतापि तत्सर्वं सोढं किंचिच्चिकीर्षुणा । गत्वा तु पश्चिमद्वारसमीपं तत्र मारुतिः ॥३९॥ सूक्ष्मो बभूव बंधेभ्यो निःसृतः पुनरप्यसौ । बभूव पर्वताकारस्तत उत्प्लुत्य गोपुरम् ॥ ४० ॥ तत्रैकं स्तंभमादाय हत्वा तान् रक्षिणः क्षणात् । विचार्य कार्यशेषं स प्रासादाग्राद्गृहाद्गृहम् ॥ ४१ ॥ उत्प्लुत्योत्प्लुत्य संदीप्तपुच्छेन महता कपिः । ददाह लंकामखिलां साट्टप्रासादतोरणाम् ॥ ४२ ॥ हा तात पुत्र नाथेति क्रंदमानाः समंततः । व्याप्ताः प्रासादशिखरेऽप्यारूढा दैत्ययोषितः ॥ ४३ ॥ देवता इव दृश्यंते पतंत्यः पावकेऽखिलाः । विभीषणगृहं त्यक्त्वा सर्वं भस्मीकृतं पुरम् ॥ ४४ ॥ तत उत्प्लुत्य जलधौ हनूमान्मारुतात्मजः । लांगूलं मज्जयित्वांतः स्वस्थचित्तो बभूव सः ॥ ४५ ॥ वायोः प्रियसखित्वाच्च सीतया प्रार्थितोऽनलः । न ददाह हरेः पुच्छं बभूवात्यंतशीतलः ॥ ४६ ॥

सारखे बडवीत होते. ३८ परंतु कांहीतरी ( चमत्कार ) करण्याचे मनांत आणून मारुतीनें तें सर्व सहन केलें. पश्चिमद्वाराशी येतांच मारुतीनें अगदी सूक्ष्म स्वरूप धारण केलें, आणि ( अशा रीतीनें ) तो बंधनांतून निसटला. नंतर पुनः पर्वतासारखें रूप धारण करून मारुतीनें नगराच्या वेशीवर उडी मारिली. ३९,४० तेथील एक खांब त्यानें उपटून ( हातात ) घेतला, आणि त्याच्या योगानें एका क्षणांत आपल्या रक्षणासाठी ठेविलेल्या रक्षकांना त्यानें मारून टाकिलें. पुढें शिल्लक राहिलेलें ( लंका जाळण्याचें ) कार्य करावें, असा विचार करून ह्या वाड्यावरून त्या वाड्यावर, ह्या घरावरून त्या घरावर, तो उड्या मारीत चालला. ( जातां जातां ) आपल्या पेटलेल्या प्रचंड पुच्छाच्या योगानें त्या वानरानें—मारुतीनें—बाजार, वाडे, वेशी यांसह समग्र लंका नगरीला आग लाविली. ४१,४२ दैत्यांच्या स्त्रिया वाड्यांच्या शिखरांवर चढून बसल्या होत्या. त्यांनी चोहोंकडून हायहाय ! बाबा ! पुत्रा ! अहो नाथ ! असा आक्रोश केला. ४३ त्या सर्व स्त्रियांना पाहून अग्नीमध्यें ह्या देवताच पडत आहेत की काय, असें वाटत होतें. एकट्या विभीषणाचें घर सोडून बाकी सगळें नगर मारुतीनें भस्म करून टाकिलें. ४४ नंतर तो वायुपुत्र हनुमंत उडी मारून समुद्रावर आला, आणि त्यानें आपलें पुच्छ पाण्यांत बुडविलें. ह्या वेळीं त्याच्या चित्ताला मोठी स्वस्थता वाटली. ४५ ( हनुमंताचा पिता ) वायु आपला प्रिय मित्र असल्यामुळें, आणि सीतेनें तशी प्रार्थना केली असल्यामुळें, अग्नीनें वानरा-( मारुती )चें पुच्छ भाजिलें नाहीं. उलट तो अत्यंत शीतल होऊन राहिला. ४६

यन्नामसंस्मरणधूतसमस्तपापास्तापत्रयानलमपीह तरंति सद्यः । तस्यैव किं रघुवरस्य विशिष्टदूतः संतप्यते कथमसौ प्रकृतानलेन ॥ ४७ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे सुंदरकांडे चतुर्थः सर्गः ॥ ४ ॥

## सुंदरकांड, सर्ग पांचवा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ ततः सीतां नमस्कृत्य हनूमानब्रवीद्वचः । आज्ञापयतु मां देवी भवती रामसन्निधिम् ॥ १ ॥ गच्छामि रामस्त्वां द्रष्टुमागमिष्यति सानुजः । इत्युक्त्वा त्रिः परिक्रम्य जानकीं मारुतात्मजः ॥ २ ॥ प्रणम्य प्रस्थितो गंतुमिदं वचनमब्रवीत् । देवि गच्छामि भद्रं ते तूर्णं द्रक्ष्यसि राघवम् ॥ ३ ॥ लक्ष्मणं च ससुग्रीवं वानरायुतकोटिभिः । ततः प्राह हनूमंतं जानकी दुःखकर्शिता ॥ ४ ॥ त्वां दृष्ट्वा विस्मृतं

ज्याचें नामस्मरण केल्यानें लोकांची सकल पापें नाहीशी होतात, आणि ते तापत्रयरूपी अग्नीलाही तत्काल तरून जातात, त्याच रघुनाथाचा मुख्य दूत लौकिक अग्नीनें कसा बरें संतप्त होईल ? ४७ ”

**सुंदरकांड, सर्ग चवथा समाप्त.**

श्रीमहादेव म्हणाला, “ नंतर सीतेला नमस्कार करून हनुमंत तिला बोलला, ‘ तू मला रामाकडे जाण्याला आज्ञा दे. १ मी ( आतां ) जातों, तुझ्या भेटीला कनिष्ठ बंधूसह राम येईल. ’ असें बोलून मारुतीनें जानकीला तीन प्रदक्षिणा केल्या, २ आणि नमस्कार करून तो जायाला निघाला. ( निघतांना ) तो म्हणाला, ‘ देवि ! मी जातों. तुझें कल्याण होईल. राम, लक्ष्मण, सुग्रीव आणि त्याबरोबर दशसहस्र वानरांचे कोट्यवधि थवे, यांची तुला लवकरच भेट होईल. ’ त्यावर दुःखानें कृश झालेली जानकी हनुमंताला म्हणाली, ३, ४ ‘ तुझी भेट झाल्यानें मी दुःख

1. नामस्मरणानें सकलपापनाशन.–‘ नामे दोष जळती । नामें पापी उद्धरती ॥ ’–कान्हूपात्रा. ( २ ) ‘ ते सभाग्या मनुष्येषु कृतार्था नृप निश्चितम् । स्मरंति स्मारयंतो ये हरेर्नाम कलौ युगे । ’–भागवत.

**दुःखमिदानीं त्वं गमिष्यसि । इतः परं कथं वर्ते रामवार्ताश्रुतिं विना ॥ ५ ॥ मारुतिरुवाच ॥ यद्येवं देवि मे स्कंधमारोह क्षणमात्रतः । रामेण योजयिष्यामि मन्यसे यदि जानकि ॥ ६ ॥ सीतोवाच ॥ रामः सागरमाशोष्य बद्ध्वा वा शरपंजरैः । आगत्य वानरैः सार्धं हत्वा रावणमाहवे ॥ ७ ॥ मां नयेद्यदि रामस्य कीर्तिर्भवति शाश्वती । अतो गच्छ कथं चापि प्राणान्संधारयाम्यहम् ॥ ८ ॥ इति प्रस्थापितो वीरः सीतया प्रणिपत्य ताम् । जगाम पर्वतस्याग्रे गंतुं पारं महोदधेः ॥ ९ ॥ तत्र गत्वा महासत्त्वः पादाभ्यां पीडयन् गिरिम् । जगाम वायुवेगेन पर्वतश्च महीतलम् ॥ १० ॥ ततो महीसमानत्वं त्रिंशद्योजनमुच्छ्रितः । मारुतिर्गगनांतस्थो महाशब्दं चकार सः ॥ ११ ॥ तं श्रुत्वा वानराः सर्वे ज्ञात्वा**

विसरलें होत्यें. आतां तूं तर जात आहेस. ह्यापुढें रामवार्ता ऐकायाला मिळणार नाहीं, तरी माझें कसें होणार ? ' ५ मारुति म्हणाला, ' देवि ! असें आहे, तर माझ्या खांद्यांवर बैस. हे जानकी ! तुझी इच्छा असल्यास एका क्षणांत तुझी रामाची भेट करून देतों. ' ६ सीता म्हणाली, ' राम समुद्राचें शोषण करून किंवा बाणसमूहांच्या योगें त्यावर सेतु बांधून वानरांसह येथें येईल, आणि युद्धांत रावणाचा वध करून, ७ मला घेऊन जाईल, तर रामाची कीर्ति ( पृथ्वीवर ) चिरकाल राहील. म्हणून तूं जा, मी कसें तरी प्राणधारण करीन. ' ८ अशा रीतीनें सीतेनें जाण्याला निरोप दिल्यावर त्या ( वानर )वीरानें तिला प्रणिपात केला, आणि महासमुद्राच्या पलीकडे जाण्याकरितां म्हणून पर्वताच्या शिखरावर गेला. ९ तेथें गेल्यावर त्या महाबलाढ्य मारुतीनें पायांनी पर्वताला दाबलें, आणि वायुवेगानें पुढें चालता झाला. त्याच्या भारानें पर्वत जमिनीत इतका दबून गेला की, १० तो तीस योजनें उंच होता, तरी आतां पृथ्वीच्या सपाटीबरोबरीचा झाला. मारुतीनें आकाशांतून जात असतां मोठी गर्जना केली. ११ ती ऐकून सर्व वानरांना मारुति आला, असें वाटलें व त्यांना

१. ' पृष्ठमारोह मे देवि ! मा विकाक्षस्य शोभने ! । योगमन्विच्छ रामेण शशांकेनेव रोहिणी ॥ '–वा. रामायण, सुंदरकांड. २ यदि रामो दशग्रीवमिह हत्वा सराक्षसम् । मामितो गृह्य गच्छेत तत्तस्य सदृशं भवेत् ॥ '–सुंदरकांड, वा. रामायण. ३. हनुमान् उठता महाबळी । पर्वत दडपला पायातळी । सर्प दडपती पाताळीं । वमिती ते काळीं विषगरळा ॥ '–भा. रामायण, सुंदरकांड २३.

मारुतिमागतम् । हर्षेण महताविष्टाः शब्दं चक्रुर्महास्वनम् ॥ १२ ॥
शब्देनैव विजानीमः कृतकार्यः समागतः । हनूमानेव पश्यध्वं वानरा
वानरर्षभम् ॥ १३ ॥ एवं ब्रुवत्सु वीरेषु वानरेषु स मारुतिः । अवतीर्य
गिरेर्मूर्ध्नि वानरानिदमब्रवीत् ॥ १४ ॥ दृष्टा सीता मया लंका धर्षिता
च सकानना । संभाषितो दशग्रीवस्ततोऽहं पुनरागतः ॥ १५ ॥ इदानी-
मेव गच्छामो रामसुग्रीवसंनिधिम् । इत्युक्त्वा वानराः सर्वे हर्षेणालिंग्य
मारुतिम् ॥ १६ ॥ केचिच्चुचुंबुर्लांगूलं ननृतुः केचिदुत्सुकाः । हनूमता
समेतास्ते जग्मुः प्रस्रवणं गिरिम् ॥ १७ ॥ गच्छंतो ददृशुर्वीरा वनं
सुग्रीवरक्षितम् । मधुसंज्ञं तदा प्राहुरंगदं वानरर्षभाः ॥ १८ ॥ क्षुधिताः
स्मो वयं वीर देह्यनुज्ञां महामते । भक्षयामः फलान्यद्य पिबामोऽमृतव-
न्मधु ॥ १९ ॥ संतुष्टा राघवं द्रष्टुं गच्छामोऽद्यैव सानुजम् ॥ २० ॥
**अंगद उवाच** ॥ हनूमान्कृतकार्योऽयं पिबतैतत्प्रसादतः । जक्षध्वं
फलमूलानि त्वरितं हरिसत्तमाः ॥ २१ ॥ ततः प्रविश्य हरयः पातुमा-

पराकाष्ठेचा हर्ष झाला. त्यांनी मोठा भुभुःकार केला. १२ ते आपसांत म्हणाले, 'हे वानरांनो! वानरपुंगव हनुमंतच हा होय. पहा! ह्याच्या शब्दावरूनच समजत आहे की, हा कार्य करून आला आहे.' १३ असें ते वानरवीर बोलत असतां मारुति पर्वताच्या शिखरावर उतरला, आणि वानरांना म्हणाला की, १४ 'सीता माझ्या दृष्टीस पडली, लंकेचा आणि तेथील उपवनाचा मी नाश केला, मी रावणाशी संभाषण केलें, आणि नंतर पुनः इकडे आलों. १५ आतांच आपण राम आणि सुग्रीव यांच्या भेटीला जाऊं या?' असें म्हणून त्या सर्व वानरांनी आनंदानें मारुतीला आलिंगन दिलें. १६ कित्येकांनी त्याच्या पुच्छाचें चुंबन घेतलें; कित्येक मोठ्या उत्कंठेनें नाचूं लागले. नंतर ते सर्व मारुतीसह प्रस्रवण पर्वतावर गेले. १७ तेथें जात असतां सुग्रीवानें राखून ठेविलेलें 'मधु' नांवाचें वन त्यांच्या दृष्टीस पडलें. तेव्हां ते वानरवीर अंगदाला म्हणाले, १८ 'वीरा (अंगदा)! तूं महाबुद्धिमान् आहेस. आम्ही भुकेलेले आहों, आम्हांला अनुज्ञा दे. आज आम्ही येथील फळें खातों व अमृतासारखें (गोड) मद्य पितों. १९ संतुष्ट मनानें आतांच आम्ही कनिष्ठ बंधूसह रामाला भेटण्याला जाऊं?' २० अंगद म्हणाला, 'वानरश्रेष्ठ हो! हा हनुमंत कार्य करून आला आहे, ह्याच्या कृपेचें फळ म्हणून येथील मद्य प्राशन करा. चला त्वरित, आणि फळें मूळें भक्षण करा.' २१ नंतर वानर (त्या उपवनांत) शिरले, आणि त्यांनी मद्यप्राशन करण्यास

रेभिरे मधु । रक्षिणस्ताननादृत्य दधिवक्त्रेण नोदितान् ॥ २२ ॥ पिबतस्ताडयामासुर्वानरान्वानरर्षभाः । ततस्तान्मुष्टिभिः पादैश्चूर्णयित्वा पपुर्मधु ॥ २३ ॥ ततो दधिमुखः क्रुद्धः सुग्रीवस्य स मातुलः । जगाम रक्षिभिः सार्धं यत्र राजा कपीश्वरः ॥ २४ ॥ गत्वा तमब्रवीद्देव चिरकालाभिरक्षितम् । नष्टं मधुवनं तेऽद्य कुमारेण हनूमता ॥ २५ ॥ श्रुत्वा दधिमुखेनोक्तं सुग्रीवो हृष्टमानसः । दृष्ट्वागतो न संदेहः सीतां पवननंदनः ॥ २६ ॥ नो चेन्मधुवनं द्रष्टुं समर्थः को भवेन्मम । तत्रापि वायुपुत्रेण कृतं कार्यं न संशयः ॥ २७ ॥ श्रुत्वा सुग्रीववचनं हृष्टो रामस्तमब्रवीत् । किमुच्यते त्वया राजन्वचः सीताकथान्वितम् ॥ २८ ॥ सुग्रीवस्त्वब्रवीद्वाक्यं देव दृष्टावनीसुता । हनूमत्प्रमुखाः सर्वे प्रविष्टा

आरभ केला. दधिवक्त्रानें पाठविलेल्या रक्षकांना ते मुळींच जुमानीनात. २२ तें (वनरक्षक) वानरवीर ह्या मद्य पिणाऱ्या वानरांना मारू लागले. तेव्हां त्यांनीही त्या रक्षकांना बुक्यांनीं आणि लाथांनी मारून चोपलें, आणि (पुनः) मद्यप्राशन चालविलें. २३ तेव्हां दधिमुखाला क्रोध आला. हा (दधिमुख) सुग्रीवाचा मामा होता. तो त्या रक्षकांना बरोबर घेऊन जेथें वानरराज (सुग्रीव) होता, त्या ठिकाणी गेला. २४ (तेथें) जाऊन तो त्याला म्हणाला, 'राजा! फार दिवस रक्षण करून ठेविलेल्या तुझ्या मधुवनाची कुमारा-(अंगदा) नें व हनुमंतानें नासाडी केली.' २५ दधिमुखानें सांगितलेला वृत्तांत ऐकून सुग्रीवाच्या मनाला आनंद झाला. (तो म्हणाला,) 'वायुपुत्र सीतेला भेटून आला असला पाहिजे, यांत संशय नाही. २६ असें नसतें, तर माझ्या मधुवनाकडे नजर टाकण्याची कोणाला शक्ति होती? त्यांतही हें कार्य मारुतीकडूनच झालें असलें पाहिजे, यांत शंका नाहीं.' २७ सुग्रीवाचें भाषण कानीं जाऊन रामाला आनंद झाला. तो सुग्रीवाला म्हणाला, 'राजा! सीतेची गोष्ट काढून दधिवक्त्राजवळ जें तूं भाषण केलेंस, तें काय होतें?' २८ सुग्रीव म्हणाला, 'देवा! हनुमंत वगैरे सर्व वानर आज मधुवनांत शिरले आहेत, त्या अर्थी त्यांना सीतेची भेट

१ समानार्थक उताराः—' खादंति केचिद् विहरंति केचिन् नदंति केचित् प्रवदति केचित् गायंति केचित् प्रणमंति केचित् क्रुध्यति केचित् प्रलपंति केचित् ॥ पठंति केचित् प्रचरंति केचित् प्लवंति केचित् प्रपतंति केचित् । पिबंति केचित् प्रवदंति केचिन् नृत्यंति केचित् प्लवगाः प्रहृष्टाः ॥'-भा. रामायण, सुंदरकाड २४.

मधुकाननम् ॥ २९ ॥ भक्षयंति स्म सकलं ताडयंति स्म रक्षिणः ।
अकृत्वा देव कार्यं ते द्रष्टुं मधुवनं मम ॥ ३० ॥ न समर्थास्ततो देवी
दृष्टा सीतेति निश्चितम् । रक्षिणो वो भयं मास्तु गत्वा ब्रूत
ममाज्ञया ॥ ३१ ॥ वानरानंगदमुखानानयध्वं ममांतिकम् । श्रुत्वा
सुग्रीववचनं गत्वा ते वायुवेगतः ॥ ३२ ॥ हनुमत्प्रमुखानूचुर्गच्छ-
तेश्वरशासनात् । द्रष्टुमिच्छति सुग्रीवः सरामो लक्ष्मणान्वितः ॥ ३३ ॥
युष्मानतीव हृष्टास्ते त्वरयंति महाबलाः । तथेत्यंबरमासाद्य ययुस्ते वान-
रोत्तमाः ॥ ३४ ॥ हनूमंतं पुरस्कृत्य युवराजं तथांगदम् । रामसुग्रीव-
योरग्रे निपेतुर्भुवि सत्वरम् ॥ ३५ ॥ हनूमान् राघवं प्राह दृष्टा सीता
निरामया । साष्टांगं प्रणिपत्याग्रे रामं पश्चाद्धरीश्वरम् ॥ ३६ ॥ कुशलं
प्राह राजेंद्र जानकी त्वां शुचाऽन्विता । अशोकवनिकामध्ये शिंशपामूल-

झाली असली पाहिजे. २९ त्यांनी सगळे (मधुवन) खाऊन टाकिलें व रक्षकांनाही ताडन केलें. देवा! तुझें कार्य केल्याशिवाय माझ्या मधुवनाकडे पाहणें देखील त्यांना शक्य नव्हतें. म्हणून सीता देवीचा शोध त्यांना लागला आहे, ही गोष्ट निश्चित आहे.' (तो रक्षकांना म्हणाला,) 'रक्षकांनो! तुम्ही भिऊं नका. माझ्या आज्ञेवरून त्या अंगदादिकांना माझ्याजवळ घेऊन या.' सुग्रीवाचें भाषण ऐकून ते (रक्षक) वायुवेगानें (तेथून) गेले. ३०,३१,३२ ते हनुमंत वगैरे वानरांला म्हणाले, 'सुग्रीव रामलक्ष्मणांसह तुम्हांला भेटूं इच्छीत आहे, तरी राजा (सुग्रीवा)च्या आज्ञेला मानून (त्याकडे) जा. ३३ महाबलवान् वीर हो! त्यांना अत्यंत हर्ष झाला असून त्यांनी तुम्हांला त्वरेनें बोलाविलें आहे.' 'ठीक आहे,' असें म्हणून आकाशांत उड्डाण करून ते वानरश्रेष्ठ (तिकडे) जाण्यास निघाले. ३४ नंतर हनुमंताला व युवराज अंगदाला पुढें करून रामसुग्रीवांच्या अग्रभागी ते (सर्व) भूमीवर त्वरित उतरले. ३५ हनुमान् रामाला (पाहतांच) म्हणाला, 'मी सीतेला भेटलों, ती खुशाल आहे.' असें सांगून त्यानें आधीं रामाला आणि नंतर वानरराज सुग्रीवाला साष्टांग प्रणिपात केला. ३६ (तो म्हणाला,) 'राजेंद्रा! जानकीनें आपली खुशाली तुला (माझ्या तोंडीं) कळविली आहे. ती शोकानें व्याप्त झाली असून अशोकवनिकेमध्यें शिंशपावृक्षाच्या मूळाचा आश्रय करून (बसली)

माश्रिता ॥ ३७ ॥ राक्षसीभिः परिवृता निराहारा कृशा प्रभो । हा राम
राम रामेति शोचंती मलिनांबरा ॥ ३८ ॥ एकवेणी मया दृष्टा शनैरा-
श्वासिता शुभा । वृक्षशाखांतरे स्थित्वा सूक्ष्मरूपेण ते कथाम् ॥ ३९ ॥
जन्मारभ्य तवात्यर्थं दंडकागमनं तथा । दशाननेन हरणं जानक्या
रहिते त्वयि ॥ ४० ॥ सुग्रीवेण यथा मैत्री कृत्वा वालिनिबर्हणम् ।
मार्गणार्थं च वैदेह्याः सुग्रीवेण विसर्जिताः ॥ ४१ ॥ महाबला महासत्त्वा
हरयो जितकाशिनः । गताः सर्वत्र सर्वे वै तत्रैकोऽहमिहागतः ॥ ४२ ॥
अहं सुग्रीवसचिवो दासोऽहं राघवस्य हि । दृष्टा यज्जानकी भाग्यात्प्र-
यासः फलितोऽद्य मे ॥ ४३ ॥ इत्युदीरितमाकर्ण्य सीता विस्फारिते-
क्षणा । केन वा कर्णपीयूषं श्रावितं मे शुभाक्षरम् ॥ ४४ ॥ यदि सत्यं
तदायातु मद्दर्शनपथं तु सः । ततोऽहं वानराकारः सूक्ष्मरूपेण जानकीम्

आहे. ३७ प्रभो ! तिच्या सभोंवतीं राक्षसींचा वेढा आहे. तिनें अन्नत्याग केल्या-
मुळें ती कृश झाली आहे. तिनें मलिन वस्त्र धारण केलें असून 'हा रामा !
रामा ! रामा !' असा सारखा शोक चालविला आहे. ३८ ती एकवेणी असल्याचें
मला दिसून आलें. पुढें मी वृक्षाच्या फांदीवर सूक्ष्मरूपानें बसून तुझी कथा वर्णन
केली, आणि तिचें सावकाशपणें आश्वासन केलें. ३९ जन्मापासूनची तुझी कथा
विस्तारपूर्वक मी तिला सांगितली. ती अशीः—तूं दंडकारण्यांत आलास, पुढें तूं जवळ
नसतां जानकीला दशाननानें हरण करून नेलें, ४० नंतर तूं सुग्रीवाशीं मैत्री करून
वालीचा वध केलास, जानकीच्या शोधाकरितां सुग्रीवानें महाबलवान्, महाचतुर,
इंद्रीयनिग्रही वानर पाठविले, ते सर्व वेगवेगळया दिशांस गेले; त्यांपैकीं मी एक इकडे
( लंकेंत ) आलों. ४१, ४२ मी सुग्रीवाचा सचिव असून रामाचा दास आहें.
भाग्यानें जानकी माझ्या दृष्टीस पडली, त्यामुळें माझा प्रयत्न आज सफळ झाला
आहे.' ४३ हें माझें बोलणें ऐकून सीतेनें ( आनंदानें ) डोळे उघाडिले, व
म्हटलें, 'कानांला अमृतासारखे गोड लागणारे हे मंगल शब्द कोणीं बरें मला ऐक-
विले ? ४४ हें खरें असेल तर त्या( बोलणाऱ्या )नें माझ्या दृष्टिमार्गांत प्रगट
व्हावें.' हें ऐकून माझ्या सूक्ष्मरूप वानराकारांतच मी जानकीला प्रणाम केलाः

१. या प्रसंगाचें मारुतीचें भाषण भावार्थरामायणांत दिलें आहे, तें—'दृष्टा सा जनकात्मजा रघुपते ! युष्मत्प्रसादान्मया । लंका नाम पुरी समुद्रजठरे तत्राऽस्ति वीर प्रभो ! । राहुग्रस्तनिशापतेरिव कलालावण्यहीनप्रभा । सीताजीवनहेतु किं वद सखे ! रामामृतं मानसे ॥'

॥ ४५ ॥ प्रणम्य प्रांजलिर्भूत्वा दूरादेव स्थितः प्रभो । पृष्टोऽहं सीतया कस्त्वमित्यादि बहुविस्तरम् ॥ ४६ ॥ मया सर्वं क्रमेणैव विज्ञापितमरिंदम । पश्चान्मयार्पितं देव्यै भवद्दत्तांगुलीयकम् ॥ ४७ ॥ तेन मामतिविश्वस्ता वचनं चेदमब्रवीत् । यथा दृष्टास्मि हनुमन्पीड्यमाना दिवानिशम् ॥ ४८ ॥ राक्षसीनां तर्जनैस्तत्सर्वं कथय राघवे । मयोक्तं देवि रामोऽपि त्वच्चिंतापरिनिष्ठितः ॥ ४९ ॥ परिशोचत्यहोरात्रं त्वद्वार्तां नाधिगम्य सः । इदानीमेव गत्वाहं स्थितिं रामाय ते ब्रुवे ॥ ५० ॥ रामः श्रवणमात्रेण सुग्रीवेण सलक्ष्मणः । वानरानीकपैः सार्धमागमिष्यति तेंऽतिकम् ॥ ५१ ॥ रावणं सकुलं हत्वा नेष्यति त्वां स्वकं पुरम् । अभिज्ञां देहि मे देवि यथा मां विश्वसेद्विभुः ॥ ५२ ॥ इत्युक्ता सा शिरोरत्नं चूडापाशे स्थितं प्रियम् । दत्वा काकेन यद्वृत्तं चित्रकूटगिरौ

आणि हात जोडून दूर उभा राहिलों. हे प्रभो ! त्या वेळीं सीतेनें ' तूं कोण, ' इत्यादि अनेक प्रश्न विस्तारानें मला विचारिले. ४५, ४६ हे शत्रुनाशना ! मी त्या सर्वांची उत्तरें क्रमशः ( सीतेला ) नम्रतापूर्वक निवेदन केली. नंतर मीं आपण दिलेली अंगठी देवीला दिली. ४७ त्यायोगें तिचा मजवर पूर्ण विश्वास बसून ती म्हणाली कीं, ' राक्षसिणी अनेक प्रकारें माझा छळ करीत आहेत व भिववीत आहेत, हें हनुमंता ! तूं पाहिलें आहेसच. हें सर्व तूं श्रीरामचंद्राला कळीव. ' मी म्हटलें, ' देवि ! राम देखील तुझी एकसारखी काळजी करीत आहे. ४८, ४९ तुझी वार्ता त्याला कांहींच न कळल्यामुळें तो अहोरात्र शोक करीत आहे. आतांच मी जाऊन तुझी सर्व स्थिति रामाला कळवितों. ५० तुझा वृत्तांत ऐकतांक्षणी राम सुग्रीव, लक्ष्मण, आणि वानरसेनापति यांना बरोबर घेऊन तुझ्याकडे येईल, ५१ आणि रावणाचा सहकुटुंब वध करून तुला आपल्या राजधानीला घेऊन जाईल. देवि ! जेणेंकरून प्रभु ( रामचंद्र ) मजवर विश्वास ठेवील, अशी कांहीं तरी खूण दे. ' ५२ असें मी सांगितल्यावर तिनें आपल्या केशपाशांतील आवडता चूडामणि काढून मला दिला, आणि पूर्वीं चित्रकूट पर्वतावर घडलेली कावळ्याची[1] गोष्ट, ( खूणगोष्ट म्हणून ) सांगि–

१ काककथा —' सुखसुप्ता त्वया साधं जानकी पूर्वमुत्थिता । वायसः सहसोत्पत्य विददार स्तनांतरम् ॥ स तं प्रदीप्तं चिक्षेप दर्भं तं वायसं प्रति । ततस्तु वायसं दीप्तः स दर्भोऽनुजगाम ह ॥ ततस्तस्याक्षि काकस्य हिनस्ति स्म स दक्षिणम् ॥ '–सुंदरकांड, वा. रामायण.

पुरा ॥ ५३ ॥ तदप्याहाश्रुपूर्णाक्षी कुशलं ब्रूहि राघवम् । लक्ष्मणं ब्रूहि मे किंचिद्दुरुक्तं भाषितं पुरा ॥ ५४ ॥ तत्क्षमस्वाज्ञभावेन भाषितं कुलनंदन । तारयेन्मां यथा रामस्तथा कुरु कृपान्वितः ॥ ५५ ॥ इत्युक्त्वा रुदती सीता दुःखेन महतावृता । मयाप्याश्वासिता राम वदता सर्वमेव ते ॥ ५६ ॥ ततः प्रस्थापितो राम त्वत्समीपमिहागतः । तदागमनवेलायामशोकवनिकां प्रियाम् ॥ ५७ ॥ उत्पाट्य राक्षसांस्तत्र बहून्हत्वा क्षणादहम् । रावणस्य सुतं हत्वा रावणेनाभिभाष्य च ॥ ५८ ॥ लंकामशेषतो दग्ध्वा पुनरप्यगमं क्षणात् । श्रुत्वा हनूमतो वाक्यं रामोऽत्यंतप्रहृष्टधीः ॥ ५९ ॥ हनूमंस्ते कृतं कार्यं देवैरपि सुदुष्करम् । उपकारं न पश्यामि तव प्रत्युपकारिणः ॥ ६० ॥ इदानीं ते प्रयच्छामि सर्वस्वं मम मारुते । इत्यालिंग्य समाकृष्य गाढं वानरपुंगवम् ॥ ६१ ॥ सार्द्रनेत्रो रघुश्रेष्ठः परां प्रीतिमवाप सः । हनू-

तली. ५३ डोळ्यात अश्रू भरून आले आहेत, अशा स्थितीत तिनें मला आणखीही सांगितलें की, 'रामाला माझी खुशाली कळीव, आणि लक्ष्मणाला सांग की, पूर्वी मी जे कांहीं तुला वाईट शब्द बोलल्यें असेन, ५४ त्यांची क्षमा कर. हे कुलनंदना ! अजाणपणानें ते शब्द माझ्या तोंडून निघाले होते. तू आतां मजवर दया करून जेणेंकरून राम मला सोडवील, तसें कर.' ५५ असें बोलून सीता रडूं लागली. तिला पराकाष्ठेचें दुःख झालें. रामा ! मीही तुझी सर्व हकीकत सांगून तिला आश्वासन दिलें. ५६ रामा ! नंतर तिची अनुज्ञा घेऊन मी तुजकडे यावयास निघालों. तेथून येतेवेळी रावणाची प्रिय अशोकवाटिका मी उपटून टाकिली, क्षणांत तेथील पुष्कळ राक्षसांचा वध केला, रावणाच्या मुलाला ठार केलें, रावणाशी संभाषण केलें, ५७, ५८ आणि सगळी लंका जाळून पुन. लगेच (इकडे) आलों ! हनुमंताचें भाषण ऐकून रामाला अत्यंत आनंद झाला. ५९ (तो म्हणाला,) 'हनुमंता ! देवांना देखील अत्यंत दुष्कर असें कार्य तूं केलें आहेस. मजवर त्वां केलेल्या उपकाराची फेड मजकडून कशी होणार तें मला समजत नाही. ६० मारुते ! माझें सर्वस्व म्हणून जें कांही मजजवळ आहे, तें मी आतां तुला देतों.' असें म्हणून त्या वानरश्रेष्ठाला (राम नें) जवळ ओढून गाढ आलिंगन दिलें. ६१ त्या रघुश्रेष्ठा (रामा) च्या डोळयांत आनंदाश्रु आले व त्याला मोठा आनंद वाटला. मग भक्तवत्सल श्रीराम हनु-

मंतमुवाचेदं राघवो भक्तवत्सलः ॥ ६२ ॥ परिरंभो हि मे लोके दुर्लभः परमात्मनः । अतस्त्वं मम भक्तोऽसि प्रियोऽसि हरिपुंगव ॥ ६३ ॥ यत्पादपद्मयुगलं तुलसीदलाद्यैः संपूज्य विष्णुपदवीमतुलां प्रयांति । तेनैव किं पुनरसौ परिरब्धमूर्ती रामेण वायुतनयः कृतपुण्यपुंजः ॥६४॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे सुंदरकांडे पंचमः सर्गः ॥५॥

मंताला म्हणाला, ६२ 'वानरश्रेष्ठा' मी परमात्मा आहें; अशा माझें आलिंगन लोकांत कोणाला प्राप्त होणें म्हणजे अत्यंत दुर्लभ गोष्ट होय. (हें तुला मिळालें, त्या अर्थी) तूं माझा भक्त व आवडता आहेस.' ६३ ज्याच्या पदकमलयुगलाची तुलसीपत्रादिकांनी पूजा केली असतां, अनुपम अशा विष्णुपदाची प्राप्ति होते, त्याच रामचंद्रानें अनेक पुण्यराशि संचित करून ठेवणाऱ्या वायुपुत्राच्या शरीराला आलिंगन दिलें, त्या अर्थी त्या मारुतीला तें विष्णुपद प्राप्त झालें, हें वेगळें कशाला सांगितलें पाहिजे ? ६४"

**सुंदरकांड, अध्याय पांचवा समाप्त.**



# अथ युद्धकांडप्रारंभः ॥

## युद्धकांड, सर्ग पहिला.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ यथावद्भाषितं वाक्यं श्रुत्वा रामो हनूमतः । उवाचानंतरं वाक्यं हर्षेण महता वृतः ॥ १ ॥ कार्यं कृतं हनुमता देवैरपि सुदुष्करम् । मनसापि यदन्येन स्मर्तुं शक्यं न भूतले ॥ २ ॥ शतयोजनविस्तीर्णं लंघयेत्कः पयोनिधिम् । लंकां च राक्षसैर्गुप्तां को वा धर्षयितुं क्षमः ॥ ३ ॥ भृत्यकार्यं हनुमता कृतं सर्वमशेषतः । सुग्रीवस्येदृशो लोके न भूतो न भविष्यति ॥ ४ ॥ अहं च रघुवंशश्च लक्ष्मणश्च कपीश्वरः । जानक्या दर्शनेनाद्य रक्षिताः स्मो हनूमता ॥ ५ ॥ सर्वथा सुकृतं कार्यं जानक्याः परिमार्गणम् । समुद्रं मनसा स्मृत्वा सीदतीव मनो मम ॥ ६ ॥ कथं नक्रझषाकीर्णं समुद्रं शतयोजनम् । लंघ-

श्रीमहादेव म्हणाला, " मारुतीचे समग्र भाषण ऐकून रामाला अत्यंत हर्ष झाला, आणि तो म्हणाला, १ ' देवांना देखील अत्यंत दुष्कर असें कार्य मारुतीनें केलें. भूतलावर दुसऱ्या कोणाला ' हें कार्य सिद्धीस नेईन, ' हा विचार देखील मनांत आणणें शक्य नाही. २ शंभर योजनें विस्तीर्ण अशा समुद्राला उल्लंघून जाईल, असा कोण आहे? त्याचप्रमाणें अनेक राक्षसांनी रक्षण केलेल्या लंकेची धूळधाण करण्याला कोण बरें समर्थ आहे? ३ सेवकानें जें कांही करावयाचें तें सर्व मारुतीनें केलें आहे. अशा प्रकारचा हा सुग्रीवास मिळालेला ( सेवक ) आजपर्यंत दुसऱ्या कोणाला जगांत लाभला नाही, व पुढेंही लाभणार नाही. ४ मारुतीला जानकीचें दर्शन झालें, अर्थात्च त्याजकडून आज माझें, रघुवंशाचें, लक्ष्मणाचें आणि कपीश्वरा (सुग्रीवा)चें रक्षण झालें ( असें म्हटलें पाहिजे ). ५ जानकीचा शोध लावण्याचें काम मारुतीनें सर्वस्वी चांगल्या प्रकारें केलें आहे. समुद्राचें ( केवळ ) स्मरण होतांच माझें मन दुःखाकुल होऊन जातें. ६ सुसरी, मगर यांनी भरलेला शतयोजन विस्ताराचा समुद्र

१ रघुवंश—रघु हा सूर्यवंशातील एक प्रख्यात राजा होता. हा दिलीपाचा पुत्र व अजाचा बाप होता. त्यानें मिळविलेल्या दिग्विजयावरून त्याचें नाव सर्व वंशास पडले.

यित्वा रिपुं हन्यां कथं द्रक्ष्यामि जानकीम् ॥ ७ ॥ श्रुत्वा तु रामवचनं
सुग्रीवः प्राह राघवम् । समुद्रं लंघयिष्यामो महानक्रझषाकुलम् ॥ ८ ॥
लंकां च विधमिष्यामो हनिष्यामोऽद्य रावणम् । चिंतां त्यज रघुश्रेष्ठ
चिंता कार्यविनाशिनी ॥ ९ ॥ एतान्पश्य महासत्त्वान् शूरान्वानरपुंग-
वान् । त्वत्प्रियार्थं समुद्युक्तान्प्रवेष्टमपि पावकम् ॥ १० ॥ समुद्रतरणे
बुद्धिं कुरुष्व प्रथमं ततः । दृष्ट्वा लंकां दशग्रीवो हत इत्येव मन्महे ॥११॥
न हि पश्याम्यहं कंचित्त्रिषु लोकेषु राघव । गृहीतधनुषो यस्ते तिष्ठेदभि-
मुखो रणे ॥ १२ ॥ सर्वथा नो जयो राम भविष्यति न संशयः ।
निमित्तानि च पश्यामि तथाभूतानि सर्वशः ॥ १३ ॥ सुग्रीववचनं
श्रुत्वा भक्तिवीर्यसमन्वितम् । अंगीकृत्याब्रवीद्रामो हनूमंतं पुरःस्थितम्
॥ १४ ॥ येन केन प्रकारेण लंघयामो महार्णवम् । लंकास्वरूपं मे ब्रूहि
दुःसाध्यं देवदानवैः ॥ १५ ॥ ज्ञात्वा तस्य प्रतीकारं करिष्यामि कपीश्वर ।

मी कसा तरून जाणार, शत्रूचा वध कसा करणार, आणि जानकीला कसा भेटणार' ७
रामाचें भाषण ऐकून सुग्रीव रामाला म्हणाला, 'मोठमोठ्या सुसरी, मगर ह्यांनी
समुद्र व्याप्त असला, तरी त्याला उल्लंघून आम्ही जाणार ८ तसेच लंकेची
नासाडी करून टाकणार, आणि लवकरच रावणाचा वध करणार. हे रघुश्रेष्ठा !
काळजीमुळें कार्याचा नाश होतो, म्हणून काळजी टाकून दे. ९ हे पहा महा-
सामर्थ्यवान् आणि शूर असे वानरवीर. तुला जें कांहीं इष्ट असेल, तें करण्यास
हे तयार आहेत, तुझ्यासाठी अग्नींत प्रवेश करण्यासही हे सिद्ध आहेत. १० प्रथमतः
समुद्र तरून जाण्याची युक्ति शोधून काढ; की पुढें लंका दृष्टीस पडतांच रावण
मेलाच, असें आम्ही समजूं. ११ हे राघवा ! धनुष्य घेऊन सज्ज झालेल्या तुजपुढें
रणांगणांत उभा राहील, असा तीनही लोकांत कोणी मला दिसत नाही. १२
रामा ! आमचा सर्वथा जय होणार, यांत संशय नाही. सर्वत्र मला निमित्तें—शकुन-
देखील तशीच ( चांगली ) दिसून येत आहेत.' १३ भक्ति आणि वीर्य यांनी
युक्त असें तें सुग्रीवाचे भाषण ऐकून रामानें ( त्याचें म्हणणें ) कबूल केलें, आणि
पुढें उभा असलेल्या हनुमंताला तो म्हणाला, १४ 'कांहीं ना कांहीं युक्तीनें
आपण महासागर उतरून जाऊंच. त्याआधीं देवदानवांनाही प्रवेश करण्यास कठीण
अशा त्या लंकेचें स्वरूप—बाह्य देखावा—कसें काय आहे, तें मला सांग. १५ तें समजलें
म्हणजे, हे कपीश्वरा ! ( लंकेच्या ) नाशाचा उपाय मला योजतां येईल.'

श्रुत्वा रामस्य वचनं हनूमान्विनयान्वितः ॥ १६ ॥ उवाच प्रांजलिर्देव
यथा दृष्टं ब्रवीमि ते । लंका दिव्या पुरी देव त्रिकूटशिखरे स्थिता ॥१७॥
स्वर्णप्राकारसहिता स्वर्णाट्टालकसंयुता । परिखाभिः परिवृता पूर्णाभि-
र्निर्मलोदकैः ॥ १८ ॥ नानोपवनशोभाढ्या दिव्यवापीभिरावृता । गृहै-
र्विचित्रशोभाढ्यैर्मणिस्तंभमयैः शुभैः ॥ १९ ॥ पश्चिमद्वारमासाद्य गज-
वाहाः सहस्रशः । उत्तरे द्वारि तिष्ठंति साश्ववाहाः सपत्तयः ॥ २० ॥
तिष्ठंत्यर्बुदसंख्याकाः प्राच्यामपि तथैव च । दक्षिणो राक्षसा वीर द्वारं
दक्षिणमाश्रिताः ॥ २१ ॥ मध्यकक्षेऽप्यसंख्याता गजाश्वरथपत्तयः ।
रक्षयंति सदा लंकां नानास्त्रकुशलाः प्रभो ॥ २२ ॥ संक्रमैर्विविधैर्लंका

रामाचें भाषण ऐकून हनुमंतानें नम्रतापूर्वक हात जोडले, आणि तो म्हणाला, 'देवा! मी जें कांहीं पाहिलें आहे, तें तुला नीट सांगतों. देवा! दिव्य लंकानगरी त्रिकूटपर्वताच्या शिखरावर वसलेली आहे. १६,१७ तिला सुवर्णाचे तट असून आंत सोन्यानें बांधलेली राजमंदिरें आहेत. तसेंच तिच्या सभोंवतीं निर्मल उदकांनीं भरलेले खंदक आहेत. १८ नाना प्रकारच्या उपवनांनीं तिला शोभा आली असून ठिकठिकाणीं उत्तम विहिरी आहेत. तेथें रत्नस्तंभांची उत्तम गृहें असून त्यांची शोभा विलक्षण आहे. १९ पश्चिमेकडील दरवाजावर हजारों हत्ती आणि घोडे असून उत्तर दरवाजावर घोडेस्वार, पायदळ आणि हत्तीघोडे आहेत. २० हे वीरा! पूर्वेकडे व तसेंच दक्षिणेकडील द्वारावर दहा कोटि राक्षसवीर रक्षक म्हणून राहात असतात. २१ प्रभो! मध्यभागच्या बुरजावर असंख्यात हत्ती, घोडे, रथ आणि पायदळ असून अनेक प्रकारच्या अस्त्रांत कुशल असे वीर सर्वकाळ लंकेचें रक्षण करीत आहेत. २२ लंकेंत अनेक प्रकारच्या चोरवाटा असून तीसभोंवतीं अनेक तोफा—प्रत्येक

१. भावार्थरामायणात लंकेचे वर्णन विस्तारानें दिलें आहे, त्यातील लहानसा उतारा.—
'समुद्रमध्यगिरीचे माथां । वसावया लंकानाथा । लंका करवी विधाता । दुर्गकर्ता विश्वकर्मा ॥
पूर्वद्वारी दहासहस्र । निधडे निःशंक निशाचर । शूळहस्ती खड्गधर । अति दुर्धर ते द्वारीं ॥
पश्चिमद्वारीं महाशूर । अर्बुदांत महावीर । शस्त्रास्त्रीं प्रवीण निशाचर । ते द्वारीं द्वार रक्षिती ॥
लक्षानुलक्ष निधडे वीर । रथ गज वाजी महाशूर । ते रक्षिती दक्षिणद्वार । अहोरात्र गर्जोनी॥
उत्तर द्वाराचा पैं धाक । स्वयें वाहे दशमुख । येणें द्वारें रघुकुलटिळक । आवश्यक येईल ॥
शतानुशतें शतानुसहस्री । गुल्मोगुल्मी हारोहारीं । स्वयें रावण सहपरिवारीं । उत्तरद्वारी संरक्षी॥'

शतघ्नीभिश्च संयुता । एवं स्थितेऽपि देवेश शृणु मे तत्र चेष्टितम् ॥२३॥
दशाननबलौघस्य चतुर्थांशो मया हतः । दग्ध्वा लंकां पुरीं स्वर्णप्रासादो
धर्षितो मया ॥ २४ ॥ शतघ्न्यः संक्रमाश्चैव नाशिता मे रघूत्तम । देव
त्वद्दर्शनादेव लंका भस्मीकृता भवेत् ॥ २५ ॥ प्रस्थानं कुरु देवेश
गच्छामो लवणांबुधेः । तीरं सह महावीरैर्वानरौघैः समंततः ॥ २६ ॥
श्रुत्वा हनूमतो वाक्यमुवाच रघुनंदनः । सुग्रीव सैनिकान्सर्वान्प्रस्थाना-
याभिनोदय ॥ २७ ॥ इदानीमेव विजयो मुहूर्तः परिवर्तते । अस्मिन्मु-
हूर्ते गत्वाहं लंकां राक्षससंकुलाम् ॥ २८ ॥ सप्राकारां सुदुर्धर्षां नाय-
शामि सरावणाम् । आनेष्यामि च सीतां मे दक्षिणाक्षि स्फुरत्यधः
॥ २९ ॥ प्रयातु वाहिनी सर्वा वानराणां तरस्विनाम् । रक्षंतु यूथपाः
सेनामग्रे पृष्ठे च पार्श्वयोः ॥ ३० ॥ हनूमंतमथारुह्य गच्छाम्यग्रेऽगदं
ततः । आरुह्य लक्ष्मणो यातु सुग्रीव त्वं मया सह ॥ ३१ ॥ गजो
गवाक्षो गवयो मैंदो द्विविद एव च । नलो नीलः सुषेणश्च जांबवांश्च

तोफ शंभर वीरांचा वध करील, अशा—ठेविल्या आहेत. देवश्रेष्ठा ! असें आहे तरी मी तेथें काय काय गोष्टी केल्या, तें ऐक. २३ रावणाच्या सैन्यसमूहाचा चवथा भाग मी नाहीसा केला, लंकापुरी जाळिली, आणि तेथील सुवर्णमंदिराची दुर्दशा केली. २४ रघूत्तमा ! तोफा आणि चोरवाटा ह्यांचा मी नायनाट केला. देवा ! तुझ्या केवळ दर्शनानें लंकापुरीचें भस्म होईल. २५ देवेशा ! निघा. चारी बाजूंनी, महावीर असे वानरसमुदाय घेऊन आपण क्षीरसमुद्राच्या तीरी जाऊं ? २६ मारुतीचें भाषण ऐकून राम म्हणाला, ‘ सुग्रीवा ' आपल्या सर्व सैनिकांना निघण्याला आज्ञा दे. २७ आतांच विजयमुहूर्त आहे. तरी ह्या मुहूर्तावर निघून मी अनंत राक्षससमुदायांनी आणि अनेक तटांनी अजिंक्य अशा लंकेचा रावणासह नाश करीन आणि सीतेला घेऊन येईन. माझ्या उजव्या डोळ्याची खालची पापणी स्फुरत आहे. २८,२९ वेगवान् अशा वानरांची सर्व सेना पुढें जाऊं द्या. वानरसमुदायांचे अधिपति पुढें, मागें व बाजूंना चालून सैन्याचें रक्षण करोत. ३० हनुमंताच्या खांद्यावर बसून मी पुढें निघतों. मागून अंगदाच्या खांद्यावर बसून लक्ष्मणाला येऊं द्या. सुग्रीवा ! तूं माझ्याबरोबर चल. ३१ गज, गवाक्ष, गवय, मैंद, द्विविद, नल, नील, सुषेण

**तथापरे ॥ ३२ ॥ सर्वे गच्छंतु सर्वत्र सेनायाः शत्रुघातिनः । इत्याज्ञाप्य हरीन् रामः प्रतस्थे सहलक्ष्मणः ॥ ३३ ॥ सुग्रीवसहितो हर्षात्सेनामध्यगतो विभुः । वारणेंद्रनिभाः सर्वे वानराः कामरूपिणः ॥३४॥ क्ष्वेलंतः परिगर्जंतो जग्मुस्ते दक्षिणां दिशम् । भक्षयंतो ययुः सर्वे फलानि च मधूनि च ॥ ३५ ॥ ब्रुवंतो राघवस्याग्रे हनिष्यामोऽद्य रावणम् । एवं ते वानरश्रेष्ठा गच्छंत्यतुलविक्रमाः ॥ ३६ ॥ हरिभ्यामुह्यमानौ तौ शुशुभाते रघूत्तमौ । नक्षत्रैः सेवितौ यद्वच्चंद्रसूर्याविवांबरे ॥ ३७ ॥ आवृत्य पृथिवीं कृत्स्नां जगाम महती चमूः । प्रस्फोटयंतः पुच्छाग्रानुद्वहंतश्च पादपान् ॥३८॥ शैलानारोहयंतश्च जग्मुर्मारुतवेगतः । असंख्याताश्च सर्वत्र वानराः परिपूरिताः ॥३९॥ हृष्टास्ते जग्मुरत्यर्थं रामेण**

आणि दुसरे सर्व शत्रुनाशक सेनापति चारी बाजूंनी निघोत. वानरांना अशी आज्ञा देऊन राम लक्ष्मणासह निघाला. ३२,३३ प्रभु रामचंद्र हर्षानें सैन्याच्या मध्यभागी चालत असून त्याच्या बरोबर सुग्रीव होता. मोठमोठ्या हत्तीसारखे त्या वानरांचे देह असून, इच्छेस येईल, तें रूप त्यांना घेतां येत असे. ३४ ते शूरांसारखे डौलानें चालत व गर्जना करीत दक्षिण दिशेकडे निघाले. ( वाटेंत सांपडतील तीं ) फळें आणि मद्य भक्षण करीत ते जात होते. ३५ प्रत्येक जण रामापुढें येऊन 'मी रावणाला मारून टाकितों,' असें सांगत होता. अशा प्रकारें ते अतुलपराक्रमी वानरश्रेष्ठ जात होते. ३६ दोघां वानरांच्या खांद्यांवर बसून रामलक्ष्मण चालले आहेत, हें पाहून आकाशांत एकाच वेळी चंद्रसूर्य उगवून त्यांसभोंवती नक्षत्रें चकाकत आहेत की काय, असा भास होत होता. ३७ सर्व पृथ्वीला आच्छादून ती मोठी सेना चालली होती. कित्येक ( वानर ) आपली पुच्छाग्रें आपटीत, तर कित्येक झाडें उपटून घेत असत. ३८ पर्वतांवर चढून वायुवेगानें धांवत सुटणारे असे असंख्यात वानर सर्वत्र भरून राहिले होते. ३९ रामाकडून

१. सदृश वर्णन-'कपी सुग्रिवें सर्व भूमंडळीचे । बहू आणिले वीर मेरूबळाचे । विरापाठिसी भार कोट्यानुकोटी । रिसा वानराची असभाव्य दाटी ॥ अती आदरें स्कधभागि विरानें । रघूनायका घेतलें मारुतीनें । सुमित्रासुतालागिं त्या अंगदानें । प्रभू चालिले ते बळी थोर मानें ॥'-रामायण, युद्धकाड, रामदास.

परिपालिताः। गता चमूर्दिवारात्रं क्वचिन्नासज्जत क्षणम् ॥४०॥ काननानि विचित्राणि पश्यन्मलयसह्ययोः। ते सह्यं समतिक्रम्य मलयं च तथा गिरीन् ॥४१॥ आययुश्चानुपूर्व्येण समुद्रं भीमनिःस्वनम्। अवतीर्य हनूमंतं रामः सुग्रीवसंयुतः॥४२॥ सलिलाभ्याशमासाद्य रामो वचनमब्रवीत्। आगताः स्मो वयं सर्वे समुद्रं मकरालयम् ॥ ४३ ॥ इतो गंतुमशक्यं नो निरुपायेन वानराः। अत्र सेनानिवेशोऽस्तु मंत्रयामोऽस्य तारणे ॥ ४४ ॥ श्रुत्वा रामस्य वचनं सुग्रीवः सागरांतिके। सेनां न्यवेशयत्क्षिप्रं रक्षितां कपिकुंजरैः ॥ ४५ ॥ ते पश्यंतो विषेदुस्तं सागरं भीमदर्शनम्। महोन्नततरंगाढ्यं भीमनक्रभयंकरम् ॥ ४६ ॥ अगाधं गगनाकारं सागरं वीक्ष्य दुःखिताः। तरिष्यामः कथं घोरं सागरं वरुणालयम् ॥ ४७ ॥ हंतव्योऽस्माभिरद्यैव रावणो राक्षसाधमः। इति चिंताकुलाः सर्वे राम-

त्यांचें रक्षण होत असल्यामुळें ते आनंदानें चालले होते. ती सेना अहोरात्र चालत असे. कोठें क्षणभरही थांबून राहात नसे. ४० मलय व सह्य पर्वतांवरील विचित्र अरण्यें पाहात राम चालला होता. ते ( सर्व ) सह्य व मलयपर्वताला मागें टाकून क्रमानें समुद्रावर येऊन पोंचले समुद्राची भयंकर गर्जना चालली होती मारुतीच्या खांद्यावरून खाली उतरून रामानें सुग्रीवाला बरोबर घेतलें, आणि पाण्याजवळ येऊन तो म्हणाला, ‘ मगरांचें वसतिस्थान अशा समुद्रावर आपण सर्व येऊन पोंचलों. ४१,४२,४३ वानर हो ' निरुपायानें ह्यापुढें आतां आपणांला जातां येणार नाही. सध्या सेनेचा तळ येथेंच असूं द्या. हा ( समुद्र ) तरून जाण्याचा उपाय आपण योजूं या. ’ ४४ रामाचें भाषण ऐकून सुग्रीवानें लागलाच समुद्राजवळ सैन्याचा तळ दिला. त्या सेनेचें रक्षण मोठमोठे वानर करीत होते. ४५ त्या भयंकर दिसणाऱ्या समुद्राला पाहून सर्वांना दुःख झालें. मोठमोठ्या उंच लाटा ज्यावर उसळत आहेत, भयंकर सुसरींनीं ज्याचें स्वरूप उग्र दिसत आहे, ४६ ज्याच्या खोलीला ठाव नाही, ज्याचा आकार आकाशासारखा आहे, अशा त्या समुद्राला पाहून ते सर्व दुःखित झाले. वरुणाचें वसतिस्थान अशा या भयंकर स्वरूपाच्या समुद्राला आम्ही कसे तरून जाणार ? ४७ त्या राक्षसाधमा रावणाचा वध आजच आम्ही केला पाहिजे. ’

१. मलय हा पर्वत हिंदुस्थानच्या दक्षिणेस असून ह्याची चंदनाकरिता प्रसिद्धी आहे. ‘ मलये भिल्लपुरंध्री चंदनतरुकाष्ठमिंधनं कुरुते.’

**पार्श्वे व्यवस्थिताः ॥ ४८ ॥ रामः सीतामनुस्मृत्य दुःखेन महता वृतः । विलप्य जानकीं सीतां बहुधा कार्यमानुषः ॥ ४९ ॥ अद्वितीयश्चिदात्मैकः परमात्मा सनातनः । यस्तु जानाति रामस्य स्वरूपं तत्त्वतो जनः ॥ ५० ॥ तं न स्पृशति दुःखादि किमुतानंदमव्ययम् । दुःखहर्षभयक्रोधलोभमोहमदादयः ॥ ५१ ॥ अज्ञानलिंगान्येतानि कुतः संति चिदात्मनि । देहाभिमानिनो दुःखं न देहस्य चिदात्मनः ॥ ५२ ॥ संप्रसादे द्वयाभावात्सुखमात्रं हि दृश्यते । बुद्ध्याद्यभावात्संशुद्धे दुःखं तत्र न दृश्यते । अतो दुःखादिकं सर्वं बुद्धेरेव न संशयः ॥ ५३ ॥ रामः परात्मा पुरुषः पुराणो नित्योदितो नित्यसुखो निरीहः । तथापि माया-**

अशा चिंतनें व्याप्त होऊन ते सगळे रामाजवळ येऊन राहिले. ४८ सीतेचें स्मरण होऊन रामाला अत्यंत दुःख झालें. ( विशिष्ट ) कार्यासाठी मनुष्यरूप घेणाऱ्या त्या श्रीरामानें सीतेसाठी बराच शोक केला. ४९ राम हा अद्वितीय, चैतन्यरूप, एक, सनातन, परमात्मा होय. रामाचें स्वरूपज्ञान ज्या पुरुषाला यथार्थतः होतें, ५० त्याला दुःखादिकांचा संपर्कही होत नाही. मग त्या आनंदरूप, अव्यय परमात्म्याला होणारच नाही, हें वेगळें कशाला सांगितलें पाहिजे ? दुःखं, हर्ष, भय, क्रोध, लोभ, मोह, मद इत्यादि ही अज्ञानाची चिन्हें आहेत. ज्ञानस्वरूपी परमात्म्याच्या ठिकाणी ही कोठून असणार ? देहाभिमान बाळगणाऱ्या पुरुषाला दुःखें लागू होतात. देहाभिमान नाहीं, अशा ज्ञानरूपी आत्म्याला ती नाहीत ५१,५२ ज्ञान झालें असतां, दुसरा म्हणून कोणी नसल्यामुळें केवळ सुखच दिसून येतें, त्याचप्रमाणें शुद्ध आत्मस्वरूपी बुद्ध्यादिकांच्या अभावी दुःख कधींही दिसून येत नाही. यावरून दुःखादि सर्व बुद्धीपासूनच होत असतें, यांत संशय नाही. ५३ राम हा परात्मा, पुराण पुरुष, नाशरहित, नित्यसुखरूपी, निर्व्यापार आहे. तरी अज्ञानी लोक त्याला

१. समानार्थक उतारा:–' दुःख, हर्ष, क्रोध, भीती । लोभमोहादि हीं कउती । चिद्रूपातें स्पर्शू येती । अज्ञानचिन्हें सर्वही ॥ दुःखें तो देहाभिमानियातें । चिद्रूपासि कैंचे होतें । म्हणूनि सर्वी झटून येथें । त्यास प्रसन्न करावें ॥ चिदात्मा प्रसन्न झालियावर । द्वय तें तत्काळ होतें दूर । आणि सुखचि एक अपार । प्रतीत होतें जनाते ॥'–अध्यात्मरामकथा २. ' विशेष दृश्याचिये चाडी । गुंतता बुद्धि होय वेडी । मग जीव करोनी काबाडी । हिंडवी पैं ॥ संसाराचिया आशा । लावुनी हिंडवी दाही दिशा । आणि आपण क्लेशा । पात्र करी ॥'–सिद्धांतसहिता सोहिरोबानाथकृत

गुणसंगतोऽसौ सुखीव दुःखीव विभाव्यतेऽबुधैः ॥ ५४ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकांडे प्रथमः सर्गः ॥ १ ॥

## युद्धकांड, सर्ग दुसरा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ लंकायां रावणो दृष्ट्वा कृतं कर्म हनूमता । दुष्करं दैवतैर्वापि ह्रिया किंचिदवाङ्मुखः ॥ १ ॥ आहूय मंत्रिणः सर्वानिदं वचनमब्रवीत् । हनूमता कृतं कर्म भवद्भिर्दृष्टमेव तत् ॥ २ ॥ प्रविश्य लंकां दुर्धर्षां दृष्ट्वा सीतां दुरासदाम् । हत्वा च राक्षसान्वीरानक्षं मंदोदरीसुतम् ॥ ३ ॥ दग्ध्वा लंकामशेषेण लंघयित्वा च सागरम् । युष्मान्सर्वानतिक्रम्य स्वस्थोऽगात्पुनरेव सः ॥ ४ ॥ किं कर्तव्यमितोऽस्माभिर्यूयं मंत्रविशारदाः । मंत्रयध्वं प्रयत्नेन यत्कृतं मे हितं भवेत् ॥ ५ ॥ रावणस्य वचः श्रुत्वा राक्षसास्तमथाब्रवन् । देव शंका कुतो

मायागुणांशी आसक्त असल्याच समजतात, आणि म्हणूनच तो त्यांना सुखी किंवा दुःखी पुरुषांसारखा वाटतो. ५४ ”

**युद्धकांड, प्रथम सर्ग समाप्त**

श्रीशंकर म्हणाला, “ लंकेमध्यें हनुमंतानें देवांनाही दुष्कर असें कार्य केलें, ते पाहून अर्थातच रावणानें लज्जेनें तोंड खालीं घातलें. १ त्यानें आपल्या सर्व मंत्र्यांना बोलावून म्हटलें कीं, ‘ हनुमंतानें केलेलें कृत्य तुम्ही पाहिलेंच आहे. २ अलंघ्य लंकेमध्यें प्रवेश करून, दुष्प्राप सीतेला भेटून, अनेक वीर राक्षसांना मारून, मंदोदरीसुताचा—अक्षाचा—वध करून, ३ पूर्णपणें लंका जाळून, समुद्र उल्लंघून आणि तुम्हां सर्वांस तुच्छ करून तो स्वस्थपणें परत गेला आहे. ४ आतां पुढें आम्हीं काय करायाचें ? तुम्ही चांगले मंत्रज्ञ-मसलत देणारे—आहां; तरी माझें कल्याण होईल, असा प्रयत्नपूर्वक कांहीतरी उपाय शोधून काढा. ’ ५ रावणाचें भाषण ऐकून राक्षस त्याला म्हणाले, ‘ राजन् ! आपण रणांगणावर लोकपालांनाही जिंकिलें असतां

१. ही रावणाची पत्नी होय परम पातिव्रत्याबद्दल हिची प्रसिद्धी असून ‘ प्रातःस्मरणातील पाच पतिव्रतांत हिचा उल्लेख आहे ‘ अहल्या द्रौपदी सीता तारा मंदोदरी तथा । पंचकन्या स्मरेन्नित्यं महापातकनाशिनी. ॥’

**रामात्तव लोकजितो रणे ॥ ६ ॥ इंद्रस्तु बद्ध्वा निक्षिप्तः पुत्रेण तव पत्तने । जित्वा कुबेरमानीय पुष्पकं भुज्यते त्वया ॥ ७ ॥ यमो जितः कालदंडाद्भयं नाभूत्तव प्रभो । वरुणो हुंकृतेनैव जितः सर्वेऽपि राक्षसाः ॥ ८ ॥ मयो महासुरो भीत्या कन्यां दत्वा स्वयं तव । त्वद्वशे वर्ततेऽद्यापि किमुतान्ये महासुराः ॥ ९ ॥ हनूमद्धर्षणं यत्तु तदवज्ञाकृतं च नः । वानरोऽयं किमस्माकमस्मिन्पौरुषदर्शने ॥ १० ॥ इत्युपेक्षितमस्माभिर्धर्षणं तेन किं भवेत् । वयं प्रमत्ताः किं तेन वंचिताः स्मो हनूमता ॥ ११ ॥ जानीमो यदि तं सर्वे कथं जीवन् गमिष्यति । आज्ञापय जगत्कृत्स्नमवानरममानुषम् ॥ १२ ॥ कृत्वायास्यामहे सर्वे प्रत्येकं वा नियोजय । कुंभकर्णस्तदा प्राह रावणं राक्षसेश्वरम् ॥ १३ ॥**

रामाची भीति आपणांस कां म्हणून वाटावा? ६ इंद्राला बांधून त्याला आपल्या पुत्रानें नगरांत आणून ठेविलें आहे. कुबेराला जिंकून आणि त्याचें पुष्पक विमान आणून त्याचा उपभोग आपण घेत आहां. ७ प्रभो! यमाला जिंकिल्यामुळें (त्याच्या) कालपाशाची भीति आपणांला उरली नाही. वरुणाला नुसत्या हुंकारानेंच आपण जिंकिलें आहे. सर्व राक्षसांनाही आपण जिंकून टाकिलें आहे. ८ महासुर जो मय, त्यानें तुमच्या भीतीस्तव आपली कन्या तुम्हांला देऊन तो तुम्हांला अगदी वश होऊन राहिला आहे. मग इतर महादैत्यांची ती कथा काय? ९ हनुमंतानें जो विध्वंस केला, तो केवळ आम्ही त्याच्याकडे दुर्लक्ष्य केल्यामुळें.' ह्या (क्षुद्र) वानरावर आम्ही पराक्रम तो काय दाखवावयाचा!' १० ह्या विचारानें त्यानें केलेल्या (थोड्या) नासधुसीची आम्ही उपेक्षा केली. 'त्याच्यानें (फारसें) काय होणार आहे! तो (वानर) काय करणार,' असें म्हणून निष्काळजी राहिल्यामुळें आम्हांला त्या हनुमंतानें फसविलें. ११ आम्हां सर्वांना जर (तो असें करणार) हें आधी कळलें असतें, तर तो येथून जीवंत कसा गेला असता? आपण आज्ञा द्या, की सर्व जगांतील वानर आणि मनुष्यें नाहीशी करून आम्ही सर्व परत येतों. नाही तर एकएकाची (ह्या कामी) योजना करा.' ह्या प्रसंगी राक्षसाधिपति रावणाला कुंभकर्ण म्हणाला, १२, १३

१. कुंभकर्ण हा परम पराक्रमी व महाबलिष्ठ राक्षस रावणाचा बंधु असून त्याने इंद्रादिक देवानाही भयभीत करून सोडलें होतें. इंद्रपदाकरिता त्यानें उग्र तपश्चर्या करून ब्रह्मदेवाला प्रसन्न करून घेतलें. त्यावर ब्रह्मदेवानें 'वर माग' म्हणून सांगितलें असता हा 'इंद्रपद'

आरब्धं यत्त्वया कर्म स्वात्मनाशाय केवलम् । न दृष्टोऽसि तदा भाग्यात्त्वं रामेण महात्मना ॥ १४ ॥ यदि पश्यति रामस्त्वां जीवन्नायासि रावण । रामो न मानुषो देवः साक्षान्नारायणोऽव्ययः ॥ १५ ॥ सीता भगवती लक्ष्मी रामपत्नी यशस्विनी । राक्षसानां विनाशाय त्वया नीता सुमध्यमा ॥१६॥ विषपिंडमिवागीर्य महामीनो यथा तथा । आनीता जानकी पश्चात्त्वया किं वा भविष्यति ॥१७॥ यद्यप्यनुचितं कर्म त्वया कृतमजानता । सर्वं समं करिष्यामि स्वस्थचित्तो भव प्रभो ॥ १८ ॥ कुंभकर्णवचः श्रुत्वा वाक्यमिंद्रजिदब्रवीत् । देहि देव ममानुज्ञां हत्वा रामं सलक्ष्मणम् । सुग्रीवं वानरांश्चैव पुनर्यास्यामि तेंऽतिकम् ॥ १९ ॥ तत्रागतो भागवतप्रधानो विभीषणो बुद्धिमतां वरिष्ठः । श्रीरामपादद्वय एकतानः

( रावणा ! ) जें काम तू आरंभिलें आहेस, त्यांत तू स्वतः नाशच पावणार आहेस. त्या ( सीताहरणाचे ) वेळी तूं महात्म्या रामाच्या दृष्टीस पडला नाहीस, हें तुझें भाग्यच होय १४ जर रामानें तुला पाहिलें असतें, तर हे रावणा ! तूं जीवंत म्हणून आलाच नसतास. राम हा मनुष्य नसून तो देव, साक्षात् निर्विकार नारायण आहे. १५ रामपत्नी यशस्विनी सीता ही प्रत्यक्ष भगवती लक्ष्मी होय. त्या सिंहकटी सीतेला आणिलेंस, त्यामुळें सर्व राक्षसांचा विनाश होणार आहे. १६ मोठा मासा कां असेना, विषपिंड गिळून त्याची जी स्थिति होते, तशीच स्थिति जानकीला आणल्यानें तुझी झाली आहे. आतां मागाहून 'कसें होईल' ( म्हणून तूं दुःखांत पडला आहेस ) १७ प्रभो ! अज्ञानानें जरी हें अयोग्य कर्म तुझ्या हातून घडलें आहे, तरी मी सर्व यथास्थित करीन, तूं स्वस्थ रहा.' १८ कुंभकर्णाचें भाषण ऐकून इंद्रजित् बोलला, 'महाराज ! मला परवानगी द्या. मी रामाला, लक्ष्मणाला, सुग्रीवाला आणि सर्व वानरांना मारून पुनः आपल्याजवळ येतों.' १९ इतक्यांत महाभगवद्भक्त आणि परम बुद्धिमान् विभीषण तेथें आला. रामचरणयुगली त्याची चित्तवृत्ति एकाग्र होऊन गेली होती. देवकात्र रावणाला त्यानें प्रणाम केला आणि तो

मागणार, तोंच देवाच्या प्रेरणेने सरस्वती त्याच्या जिव्हेवर अधिष्ठित होऊन तिनें त्याजकडून 'निद्रापद' मागविलें. हा एकदा झोपीं गेला असता निदान सहा महिने तरी उठत नसे.

१. विभीषण जन्माने दैत्य होता, तरी परम रामभक्त होता. रावणाच्या दुष्ट कृत्यास कंटाळून त्यानें रामाचा आश्रय केला रावणवधानंतर रामानें विभीषणाला लंकाराज्यावर बसविलें.

प्रणम्य देवारिमुपोपविष्टः ॥ २० ॥ विलोक्य कुंभश्रवणादिदैत्यान्मत्त-
प्रमत्तानतिविस्मयेन । विलोक्य कामातुरमप्रमत्तो दशाननं प्राह विशुद्ध-
बुद्धिः ॥ २१ ॥ न कुंभकर्णेन्द्रजितौ च राजंस्तथा महापार्श्वमहोदरौ
तौ । निकुंभकुंभौ च तथातिकायः स्थातुं न शक्ता युधि राघवस्य
॥२२॥ सीताभिधानेन महाग्रहेण ग्रस्तोऽसि राजन् न च ते विमोक्षः ।
तामेव सत्कृत्य महाधनेन दत्वाभिरामाय सुखी भव त्वम् ॥ २३ ॥
यावन्न रामस्य शिताः शिलीमुखा लंकामभिव्याप्य शिरांसि रक्षसाम् ।
छिंदंति तावद्रघुनायकस्य भो तां जानकीं त्वं प्रतिदातुमर्हसि ॥ २४ ॥
यावन्नगाभाः कपयो महाबला हरींद्रतुल्या नखदंष्ट्रयोधिनः । लंकां
समाक्रम्य विनाशयंति ते तावद्द्रुतं देहि रघूत्तमाय ताम् ॥ २५ ॥
जीवन्न रामेण विमोक्ष्यसे त्वं गुप्तः सुरेंद्रैरपि शंकरेण । न देवराजांक-

त्याच्या जवळ बसला २० कुंभकर्णादि एकापेक्षां एक मदोन्मत्त अशा दैत्यांना तेथें पाहून विभीषणाला अत्यंत विस्मय वाटला. रावण कामातुर झाला आहे, हें जाणून तो कर्तव्यदक्ष आणि निर्मल बुद्धीचा (विभीषण) म्हणाला, २१ 'राजा! कुंभकर्ण, इंद्रजित्, तसेच महापार्श्व, महोदर, त्याप्रमाणेंच निकुंभ, कुंभ, आणि अतिकाय हे समरांगणी रामापुढें टिकाव धरण्यास समर्थ नाहीत. २२ सीतानामक मोठ्या ग्रहानें तुला ग्रासिलें आहे, त्यापासून तुझी सुटका होणें अशक्य आहे. तरीही सत्कारपूर्वक विपुल धन देऊन सीतेला रामाच्या स्वाधीन कर आणि तूं सुखी हो. २३ रामाच्या तीक्ष्ण बाणांनी लंका व्यापून जाऊन राक्षसांची शिरें तुटलीं नाहींत, तोंपर्यंत जानकीला रघुनायका (रामा) ला परत नेऊन देणें तुला योग्य आहे. २४ जोंपर्यंत पर्वतसमान शरीरांचे, नखें आणि दाढा ह्या शस्त्रांनी लढणारे, सिंहसदृश पराक्रमाचे महाबलिष्ठ वानर लंकेवर चाल करून तिचा नाश करूं लागले नाहीत, तोंपर्यंत लवकर सीतेला नेऊन रघूत्तमा (रामा) च्या स्वाधीन कर. २५ मोठमोठ्या देवांनी तुझें रक्षण केलें, प्रत्यक्ष शंकरानें तुला पाठीं घातलें, किंवा इंद्राच्या मांडीवर जाऊन

१. सदृश वर्णन-'कपी वीर ते दूरि टाकूनि शंका । मिळाले करायासि निर्मूळ लंका ॥ त्रिकूटाचलू दृश्य नाहीं तयाला । तई जानकी भेटवा राघवाला ॥ रणीं तीव्र त्या राघवाचेनि बाणा । तुटों लागती तूमचे पादपाणी ॥ धडें मस्तकें मेदमासें चिडाणी । न होता सिता भेटवा चापपाणी ॥'- युद्धकांड, रामदास.

गतो न मृत्योः पाताललोकानपि संप्रविष्टः ॥ २६ ॥ शुभं हितं पवित्रं च विभीषणवचः खलः । प्रतिजग्राह नैवासौ म्रियमाण इवौषधम् ॥ २७ ॥ कालेन नोदितो दैत्यो विभीषणमथाब्रवीत् । मद्दत्तभोगैः पुष्टांगो मत्समीपे वसन्नपि ॥ २८ ॥ प्रतीपमाचरत्येष ममैव हितकारिणः । मित्रभावेन शत्रुर्मे जातो नास्त्यत्र संशयः ॥ २९ ॥ अनार्येण कृतघ्नेन संगतिर्मे न युज्यते । विनाशमभिकांक्षंति ज्ञातीनां ज्ञातयः सदा ॥ ३० ॥ योऽन्यस्त्वेवंविधं ब्रूयाद्वाक्यमेकं निशाचरः । हन्मि तस्मिन् क्षणे एव धिक् त्वां रक्षःकुलाधमम् ॥ ३१ ॥ रावणेनैवमुक्तः सन्परुषं स विभीषणः । उत्पपात सभामध्याद्गदापाणिर्महाबलः ॥ ३२ ॥ चतुर्भिर्मंत्रिभिः सार्धं गगनस्थोऽब्रवीद्वचः । क्रोधेन महताविष्टो रावणं दशकंधरम् । मा विनाशमुपैहि त्वं प्रियवादिनमेव माम् ॥ ३३ ॥ धिक्करोषि तथापि त्वं ज्येष्ठो भ्राता पितुः समः । कालो राघवरूपेण जातो दश-

बसलास, अथवा मृत्युलोकीं किंवा पाताळलोकीं दडून राहिलास, तरी रामाच्या हातून तूं जीवंत सुटणार नाहीस.' २६ हें सौम्य, पवित्र आणि कल्याणप्रद विभीषणाचें भाषण होतें, तरी मरणोन्मुख प्राणी औषधाचा (त्याग करितो), त्याप्रमाणें त्या दुष्टानें त्या ( उपदेशा ) चा स्वीकार केला नाहीं. २७ कालाची प्रेरणा होऊनच की काय, तो दैत्य—रावण—नंतर विभीषणाला म्हणाला, 'मींच दिलेल्या उपभोगांनीं पुष्टांग होऊन हा मजजवळ राहात आहे. २८ मी ह्याचें हित करीत असूनही हा मजवर उलटला आहे. हा मित्रपणा दाखवीत आहे, तरी हा माझा शत्रु झाला आहे, यांत संशय नाहीं. २९ ह्या नीच कृतघ्नाशीं संगति करणें मला योग्य नाहीं. ज्ञाति ज्ञातिजनांचा नाश होण्याची सर्वदा इच्छा करणारच. ३० दुसरा कोणी राक्षस जर अशा प्रकारचें एक वाक्य बोलेल, तर मी त्याचा तत्क्षणीं वध करीन. राक्षसकुलाधमा ! तुला धिक्कार असो !' ३१ रावणानें अशा प्रकारें कठोर शब्दांनीं निंदा केल्यावर हातांत गदा घेऊन तो महाबलवान् विभीषण आपल्या चार मंत्र्यांसह सभेंतून उडाला, आणि अत्यंत क्रोधाविष्ट होत्साता आकाशांत उभा राहून त्या दशमुखी रावणाला म्हणाला, '( रावणा ! ) तूं नाश करून घेऊं नकोस.' मी तुला कल्याणाची गोष्ट सांगत असतांही तूं माझा धिक्कार केलास. तरीही तूं माझा ज्येष्ठ बंधु असल्याकारणानें तूं मला पित्यासमान आहेस. रामरूपानें साक्षात् काल दशरथाच्या घरीं प्रकट

रथालये ॥ ३४ ॥ काली सीताभिधानेन जाता जनकनंदिनी । तावु-
भावागतावत्र भूमेर्भारापनुत्तये ॥ ३५ ॥ तेनैव प्रेरितस्त्वं तु न शृणोषि
हितं मम । श्रीरामः प्रकृतेः साक्षात्परस्तात्सर्वदा स्थितः ॥ ३६ ॥
बहिरंतश्च भूतानां समः सर्वत्रः संस्थितः । नामरूपादिभेदेन तत्त-
न्मय इवामलः ॥ ३७ ॥ यथा नानाप्रकारेषु वृक्षेष्वेको महानलः ।
तत्तदाकृतिभेदेन भिद्यतेऽज्ञानचक्षुषाम् ॥ ३८ ॥ पंचकोशादिभेदेन
तत्तन्मय इवाबभौ । नीलपीतादियोगेन निर्मलः स्फटिको यथा
॥ ३९ ॥ स एव नित्यमुक्तोऽपि स्वमायागुणबिंबितः । कालः प्रधानं
पुरुषोऽव्यक्तं चेति चतुर्विधः ॥ ४० ॥ प्रधानपुरुषाभ्यां स जगत्कृत्स्नं
सृजत्यजः । कालरूपेण कलनां जगतः कुरुतेऽव्ययः ॥ ४१ ॥ काल-
रूपी स भगवान् रामरूपेण मायया । ब्रह्मणा प्रार्थितो देवस्त्वद्वधार्थ-

झाला आहे. ३२,३३,३४ त्याचप्रमाणें काली सीता नांवानें जनककन्या झाली आहे. भूभार हरण करण्यासाठीं हीं दोघें येथें आलीं आहेत. ३५ त्या (रामा)-कडूनच प्रेरणा होऊन तूं माझें हितकर भाषण ऐकत नाहीस. श्रीराम हा सर्वसाक्षी असूनही सर्वदा प्रकृतीच्या पर—पलीकडे—असतो. ३६ तो सर्व भूतांच्या आंतबाहेर समस्वरूपानें संचरून राहिला आहे. नामरूपादि भेदानें तो तसतसा त्या त्या स्वरूपानें भासमान होतो. तो अमल—रागलोभादि मलरहित—आहे. ३७ ज्याप्रमाणें मोठा अग्नि अनेक प्रकारच्या वृक्षांच्या ठिकाणीं (लागला असतां) त्यांच्या त्यांच्या (लहानमोठ्या) आकृतिभेदानें अज्ञानदृष्टि जनांना त्या त्या आकारांचा दिसतो, त्याचप्रमाणें पंचकोशादि[1] भेदांमुळें परमात्मा त्या त्या स्वरूपानें भासत असतो. ह्याला दुसरा दृष्टांत म्हणजे निर्मल स्फटिकाचा होय. तो स्फटिक नील, पीत, वगैरे ज्या पदार्थांशीं समागम पावतो, त्या पदार्थाच्या वर्णाचा दिसत असतो. ३८,३९ तो परमात्मा नित्यमुक्त असूनही स्वतांच्या मायागुणांत प्रतिबिंबित होऊन काल, प्रधान, पुरुष आणि अव्यक्त अशा चार प्रकारांचा होतो. ४० तो जन्मरहित (परमात्मा) प्रधानपुरुषांपासून सारें जग निर्माण करितो; आणि स्वतः निर्वि-कार असूनही कालरूपानें जगाचा संहार करितो. ४१ तो कालस्वरूपी भगवान्, ब्रह्मदेवानें प्रार्थना केल्यावरून तुझ्या वधाकरितां मायेनें रामरूप घेऊन येथें आला

१. पांच कोशः—अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनंदमय हे पंचकोश.

मिहागतः ॥ ४२ ॥ तदन्यथा कथं कुर्यात्सत्यसंकल्प ईश्वरः ॥ ४३ ॥ हनिष्यति त्वां रामस्तु सपुत्रबलवाहनम् । हन्यमानं न शक्नोमि द्रष्टुं रामेण रावण ॥ ४४ ॥ त्वां राक्षसकुलं कृत्स्नं ततो गच्छामि राघवम् । मयि याते सुखीभूत्वा रमस्व भवने चिरम् ॥ ४५ ॥ विभीषणो रावणवाक्यतः क्षणाद्विसृज्य सर्वं सपरिच्छदं गृहम् । जगाम रामस्य पदारविंदयोः सेवाभिकांक्षी परिपूर्णमानसः ॥ ४६ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकांडे द्वितीयः सर्गः ॥ २ ॥

## युद्धकांड, सर्ग तिसरा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ विभीषणो महाभागश्चतुर्भिर्मंत्रिभिः सह । आगत्य गगने रामसंमुखे समवस्थितः ॥ १ ॥ उच्चैरुवाच भो स्वामिन् राम राजीवलोचन । रावणस्यानुजोऽहं ते दारहर्तुर्विभीषणः ॥ २ ॥

आहे. ४२ तो सत्यसंकल्प ईश्वर आपला हेतु अन्यथा कसा बरें करील? ४३ राम तुझा पुत्र, सैन्य आणि वाहनें ह्यांसह वध करणार. रावणा! रामाकडून तुझा आणि सगळ्या राक्षसकुलाचा वध झालेला मी पाहूं शकणार नाही. म्हणून मी राघवाकडे जातों. मी गेल्यावर तूं सुखी होऊन आपल्या घरांत चिरकाल आनंद कर. ४४,४५ रावणाच्या बोलण्यावरून विभीषणानें एका क्षणांत सर्व सामग्रीनें युक्त अशा आपल्या गृहाचा त्याग केला. रामाच्या चरणकमलयुगलाची सेवा करण्याच्या इच्छेनें तो ( रामाकडे ) गेला. आतां त्याचे सर्व मनोरथ पूर्ण झाले. ४६ ”

**युद्धकांड, दुसरा सर्ग समाप्त.**

श्रीशंकर म्हणाला, “ महाभाग्यशाली विभीषण आपल्या चार मंत्र्यांसह येऊन रामासमोर आकाशांत उभा राहिला, १ आणि मोठ्यानें म्हणाला, ‘ कमलनयन रामचंद्र स्वामिन्! तुझ्या स्त्रीचें हरण करणाऱ्या रावणाचा मी कनिष्ठ बंधु आहें. माझें

**नाम्ना भ्रात्रा निरस्तोऽहं त्वामेव शरणं गतः । हितमुक्तं मया देव तस्य चाविदितात्मनः ॥ ३ ॥ सीतां रामाय वैदेहीं प्रेषयेति पुनः पुनः । उक्तोऽपि न शृणोत्येव कालपाशवशं गतः ॥ ४ ॥ हंतुं मां खड्गमादाय प्राद्रवद्राक्षसाधमः । ततोऽचिरेण सचिवैश्चतुर्भिः सहितो भयात् ॥ ५ ॥ त्वामेव भवमोक्षाय मुमुक्षुः शरणं गतः । विभीषणवचः श्रुत्वा सुग्रीवो वाक्यमब्रवीत् ॥ ६ ॥ विश्वासार्हो न ते राम मायावी राक्षसाधमः । सीताहर्तुर्विशेषेण रावणस्यानुजो बली ॥ ७ ॥ मंत्रिभिः सायुधैरस्मान् विवरे निहनिष्यति । तदाज्ञापय मे देव वानरैर्हन्यतामयम् ॥ ८ ॥ ममैवं भाति ते राम बुद्ध्या किं निश्चितं वद । श्रुत्वा सुग्रीववचनं रामः सस्मितमब्रवीत् ॥ ९ ॥ यदीच्छामि कपिश्रेष्ठ लोकान्सर्वान्सहेश्वरान् । निमिषार्धेन संहन्यां सृजामि निमिषार्धतः ॥ १० ॥ अतो**

नांव विभीषण असून मला भावानें घालवून दिल्यावरून मी तुलाच शरण आलों आहें. देवा ! त्या ( रावणा ) ला आत्मज्ञान नाहीं, म्हणून मी त्याला हिताची गोष्ट सांगितली. २,३ 'जनककन्या सीतेला रामाकडे पाठवून दे,' म्हणून मी त्याला पुनः पुनः सांगितलें, तरी तो ऐकत नाही. तो कालपाशाच्या स्वाधीन झाला आहे. ४ मला ठार मारण्याकरितां तो राक्षसाधम तरवार घेऊन धांवून आला, तेव्हां मी भ्यालों, आणि चार सचिवांस घेऊन संसारांतून माझी सुटका व्हावी म्हणून लागलाच तुला शरण आलों मी मुमुक्षु आहें.' विभीषणाचें भाषण ऐकून सुग्रीव बोलला, ५,६ 'रामा ! (हा) कपटी नीच राक्षस तुझ्या विश्वासाला पात्र नाही. विशेषतः सीता हरण करणाऱ्या रावणाचा हा कनिष्ठ बंधु असून हा बलवानही तसाच आहे. ७ हत्यारें घेऊन सज्ज असलेले मंत्री ह्याच्या बरोबर आहेत, त्यांच्या मदतीनें हा आम्हांला गुहेमध्यें मारून टाकील. तरी देवा ! ह्याला वानरांकडून मारविण्याची मला आज्ञा दे. ८ रामा ! मला असें वाटत आहे; तुझ्या बुद्धीला निश्चयपूर्वक काय वाटत असेल तें सांग.' सुग्रीवाचें भाषण ऐकून रामाला हंसूं आलें. तो म्हणाला, ९ 'कपिश्रेष्ठा ! जर मी मनांत आणीन, तर अर्ध्या क्षणांत लोकपालांसह सर्व त्रैलोक्याचा नाश करीन, किंवा निमिषार्धांत सर्व

१. चिरजीवी म्हणून वर्णिलेल्या सात पुरुषात विभीषणाची गणना केली आहेः—'अश्वत्थामा बलिर्व्यासो हनूमांश्च विभीषणः । कृपः परशुरामश्च सप्तैते चिरजीविनः ॥' २. सदृश उताराः—'तरी मी काळु गा हें फुडे । लोक संहारावयालागीं वाढें । सैंघ पसरिलीं आहाती तोंडें । आतां ग्रासीन हें आघवें ॥'—ज्ञानेश्वरी ११.

मयाऽभयं दत्तं शीघ्रमानय राक्षसम् ॥ ११ ॥ सकृदेव प्रपन्नाय तवा-
स्मीति च याचते । अभयं सर्वभूतेभ्यो ददाम्येतद्व्रतं मम ॥ १२ ॥
रामस्य वचनं श्रुत्वा सुग्रीवो हृष्टमानसः । विभीषणमथानाय्य दर्शया-
मास राघवम् ॥ १३ ॥ विभीषणस्तु साष्टांगं प्रणिपत्य रघूत्तमम् ।
हर्षगद्गदया वाचा भक्त्या च परयान्वितः ॥ १४ ॥ रामं श्यामं विशा-
लाक्षं प्रसन्नमुखपंकजम् । धनुर्बाणधरं शांतं लक्ष्मणेन समन्वितम्
॥ १५ ॥ कृतांजलिपुटो भूत्वा स्तोतुं समुपचक्रमे ॥ १६ ॥ विभीषण
उवाच ॥ नमस्ते राम राजेंद्र नमः सीतामनोरम । नमस्ते चंडकोदंड
नमस्ते भक्तवत्सल ॥ १७ ॥ नमोऽनंताय शांताय रामायामिततेजसे ।
सुग्रीवमित्राय च ते रघूणां पतये नमः ॥ १८ ॥ जगदुत्पत्तिनाशानां
कारणाय महात्मने । त्रैलोक्यगुरवेऽनादिगृहस्थाय नमो नमः ॥ १९ ॥

सृष्टि नवी उत्पन्न करीन. १० म्हणून मी त्याला अभय दिलें आहे. त्या राक्षसाला लवकर घेऊन ये. ११ 'मी तुझा आहें' असें केवळ एकदां याचनापूर्वक जो म्हणतो व मला शरण येतो, तो कोणत्याही स्थितीतला असला, तरी मी त्याला अभय देतों. हें माझें व्रत आहे.' १२ हें रामाचें भाषण ऐकून सुग्रीवाच्या मनाला आनंद झाला. त्यानें विभीषणाला आणविलें आणि रामाला भेटविलें. १३ विभीषणानें रघूत्तमा-( रामा )ला साष्टांग नमस्कार घातला. हर्षानें त्याचा कंठ दाटून आला. त्याच्या अंतःकरणांत अत्यंत भक्ति उद्भवली. १४ त्या श्यामवर्ण, विशालाक्ष, प्रसन्नमुखकमल, धनुर्बाणधारी, सलक्ष्मण आणि शांत रामापुढें तो ( विभीषण ) हात जोडून उभा राहिला, आणि नंतर त्यानें ( रामाची ) स्तुति करण्यास प्रारंभ केला. १५,१६ विभीषण म्हणाला, 'राजेंद्रा रामा ! तूं सीतेचें मन रमविणारा आहेस. तुझें धनुष्य प्रचंड आहे. हे भक्तवत्सला ! तुला नमस्कार असो. १७ तूं अनंत आहेस, तूं शांत आहेस, तुझें तेज अपरिमित आहे, तूं सुग्रीवाचा मित्र आहेस. तूं रघुकुलाचा पति आहेस. अशा तुला रामाला नमस्कार असो. १८ तूं महात्मा आहेस, तूं जगाच्या उत्पत्तीचें व नाशाचें कारण आहेस. तूं त्रैलोक्याचा गुरु आहेस. तूं अनादि काळापासूनचा

१. 'सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज । अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥'–भ. गीता १८,६६.

त्वमादिर्जगतां राम त्वमेव स्थितिकारणम् । त्वमंते निधनस्थानं स्वेच्छाचारस्त्वमेव हि ॥ २० ॥ चराचराणां भूतानां बहिरंतश्च राघव । व्याप्यव्यापकरूपेण भवान् भाति जगन्मयः ॥ २१ ॥ त्वन्मायया हृतज्ञाना नष्टात्मानो विचेतसः । गतागतं प्रपद्यंते पापपुण्यवशात्सदा ॥ २२ ॥ तावत्सत्यं जगद्भाति शुक्तिकारजतं यथा । यावन्न ज्ञायते ज्ञानचेतसा नान्यगामिना ॥ २३ ॥ त्वदज्ञानात्सदा युक्ताः पुत्रदारगृहादिषु । रमंते विषयान्सर्वानंते दुःखप्रदान्विभो ॥ २४ ॥ त्वमिंद्रोऽग्निर्यमो रक्षो वरुणश्च तथानिलः । कुबेरश्च तथा रुद्रस्त्वमेव पुरुषोत्तम ॥ २५ ॥ त्वमणो-

गृहस्थाश्रमी आहेस. तुला नमस्कार असो. १९ रामा! सर्व जगतांचा उत्पादक, संरक्षक व शेवटी लयस्थानही तूंच आहेस. तूं स्वतःच्या इच्छेप्रमाणें वागणारा आहेस. २० राघवा! तूं स्थावरजंगमात्मक सर्व भूतांच्या बाहेर व आंत व्याप्यव्यापकरूपानें भरलेला आहेस. म्हणून तूं जगन्मय भासतोस. २१ तुझ्या मायेनें ज्यांचें ज्ञान हरण केलें आहे, व त्यामुळें ज्यांचा आत्मा नष्ट झालेला असतो, त्याचें मन विपरीत मार्गाकडे—प्रवृत्तिमार्गाकडे—लागलें असतें. ते आपापल्या पापपुण्यांच्या बळेंकरून सर्वदा जन्ममृत्युरूप[3] परंपरा पावत असतात. २२ जोंपर्यंत तुझ्या ठिकाणी एकाग्रपणें ज्ञाननिष्ठ होऊन प्राण्यांचें मन लागत नाही, तोंपर्यंत शिंपेच्या तुकड्यावर रुप्याचा भास व्हावा, त्याप्रमाणें त्यांना जग सत्य वाटत असतें. २३ प्रभो! तुझें ज्ञान न झाल्यामुळें ते पुत्र, स्त्रिया, गृहें इत्यादिकाच्या ठिकाणी आसक्त होऊन अंती दुःखदायक अशा विषयसुखांत रमत असतात. २४ इंद्र, अग्नि, यम, निर्ऋति, वरुण, वायु, कुबेर, त्याचप्रमाणें रुद्र, हे सारे (श्रीरामा!) तूंच होस. पुरुषोत्तमही तूंच होस. २५ ईश्वरा! तूं सूक्ष्मा-

१. सदृश वर्णनः—' सर्गस्थितिप्रलयहेतुमचिंत्यशक्तिं विश्वेश्वरं विदितविश्वमनंतमूर्तिम् । निर्मुक्तबंधनमपारसुखाबुराशिं श्रीवल्लभं विमलबोधघनं नमामि ॥ '—वाक्यवृत्ति, शंकराचार्यकृत २. मायाः—' हे नसतेनि रूपें रूपा आली । सत्यासत्ये गरोदर झाली । तेथ असत्याचीं पिलीं । स्वयें व्याली असंख्य ॥ रज्जुसर्पमाथ्याचा मणी । काढूनि लेइली ती लेणीं । शुक्तिकारजतपैंजणीं । चाले रुणझुणी खळखळत ॥ '—एकनाथी भागवत ३. ३. ' उदोअस्ताचेनि प्रमाणे । जैसें सूर्यासी पडे भंवणें । तैशीं ही जन्ममरणें । अतिदारुणे स्वयें सोशी ॥ '—एकनाथी भागवत ३. ४. ह्याच्या उलट ज्ञान्याची स्थितिः—' असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु ॥ '—भ. गीता. ५. समानार्थक उतारा:—' त्वं ब्रह्मा त्वंविष्णुस्त्वं रुद्रस्त्वमिंद्रस्त्वं सूर्यस्त्वं चंद्रमाः '—गणपत्यर्थवशीर्ष. ६ ' अणोरणीयान् महतो महीयान्. '

रप्यणीयांश्च स्थूलात् स्थूलतरः प्रभो । त्वं पिता सर्वलोकानां माता धाता त्वमेव हि ॥ २६ ॥ आदिमध्यांतरहितः परिपूर्णोऽच्युतोऽव्ययः । त्वं पाणिपादरहितश्चक्षुःश्रोत्रविवर्जितः ॥ २७ ॥ श्रोता द्रष्टा ग्रहीता च जवनस्त्वं खरांतक । कोशेभ्यो व्यतिरिक्तस्त्वं निर्गुणो निरुपाश्रयः ॥ २८ ॥ निर्विकल्पो निर्विकारो निराकारो निरीश्वरः । षड्भावरहितोऽनादिः पुरुषः प्रकृतेः परः ॥ २९ ॥ मायया गृह्यमाणस्त्वं मनुष्य इव भाव्यसे । ज्ञात्वा त्वां निर्गुणमजं वैष्णवा मोक्षगामिनः ॥ ३० ॥ अहं त्वत्पादसद्भक्तिनिःश्रेणीं प्राप्य राघव । इच्छामि ज्ञानयोगाख्यं सौधमारोढुमीश्वर ॥ ३१ ॥ नमः सीतापते राम नमः कारुणिकोत्तम । रावणारे नमस्तुभ्यं त्राहि मां भवसागरात् ॥ ३२ ॥ ततः

हून सूक्ष्म व स्थूलाहून स्थूल आहेस. तूं सर्व लोकांचा पिता, माता आणि धाता–पोषण करणारा–आहेस. २६ तुला आदि नाही, मध्य नाहीं, आणि अंतही नाही. तूं ( परमात्मा ) परिपूर्ण, अच्युत आणि अव्यय आहेस. तुला हात, पाय, नेत्र व कर्ण ही नाहींत. २७ तरीही तूं ऐकतोस, पाहतोस, ग्रहण करितोस, व धांवतोस. तूं खर राक्षसाचा नाश केला आहेस. तूं ( अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय, व आनंदमय ह्या ) पांच कोशांहून वेगळा आहेस. तूं निर्गुण आहेस. तुला दुसऱ्या कोणाचाही आश्रय नाही. २८ तूं निर्विकल्प, निर्विकार, निराकार, निरीश्वर, षड्भावहीन, अनादि, प्रकृतीहून पर, असा पुरुष आहेस. २९ मायेच्या योगानें तूं मनुष्यासारखा दिसत आहेस; जे वैष्णव तूं निर्गुण आणि जन्मरहित आहेस, असें ओळखतात, ते मोक्ष पावतात. ३० ईश्वरा राघवा ! तुझ्या चरणांची उत्तम भक्ति हीच निःश्रेणी–शिडी–मिळवून तिच्या योगें ज्ञानयोगनामक राजवाड्याच्या शिखरावर चढावें अशी माझी इच्छा आहे. ३१ सीतापते रामा ! परम दयावंता ! रावणांतका ! तुला माझा नमस्कार असो. संसारसमुद्रापासून माझें रक्षण कर.' ३२

१. 'पिताहमस्य जगतो माता धाता पितामह ॥'–भ. गीता ९,१७. २. 'परि या तुझिया रूपाआतु । जी उणीव एक असे देखतु । जे आदि मध्य अतु । तीन्ही नाहीं ॥'–ज्ञानेश्वरी ११.
३. 'अपाणिपादो जवनो ग्रहीता पश्यत्यचक्षुः स शृणोत्यकर्णः ।'–श्वेताश्वतरोपनिषत्.
४. जेथें अमुक स्वरूप आहे असें कळत नाहीं. ५. ज्याला दुसरा कोणी ईश्वर–पूज्य–नाहीं.
६. 'वासुदेवे भगवति भक्तियोगः प्रयोजितः । जनयत्याशु वैराग्यं ज्ञानं यत्तदहैतुकम् ॥'–भागवत.

प्रसन्नः प्रोवाच श्रीरामो भक्तवत्सलः । वरं वृणीष्व भद्रं ते वांछितं वरदोऽस्म्यहम् ॥ ३३ ॥ विभीषण उवाच ॥ धन्योऽस्मि कृतकृत्योऽस्मि कृतकार्योऽस्मि राघव । त्वत्पाददर्शनादेव विमुक्तोऽस्मि न संशयः ॥ ३४ ॥ नास्ति मत्सदृशो धन्यो नास्ति मत्सदृशः शुचिः । नास्ति मत्सदृशो लोके राम त्वन्मूर्तिदर्शनात् ॥ ३५ ॥ कर्मबंधविनाशाय त्वज्ज्ञानं भक्तिलक्षणम् । त्वद्ध्यानं परमार्थं च देहि मे रघुनंदन ॥ ३६ ॥ न याचे राम राजेंद्र सुखं विषयसंभवम् । त्वत्पादकमले सक्ता भक्तिरेव सदास्तु मे ॥ ३७ ॥ ओमित्युक्त्वा पुनः प्रीतो रामः प्रोवाच राक्षसम् । शृणु वक्ष्यामि ते भद्र रहस्यं मम निश्चितम् ॥ ३८ ॥ मद्भक्तानां प्रशांतानां योगिनां वीतरागिणाम् । हृदये सीतया नित्यं वसाम्यत्र न संशयः

( ही स्तुति ऐकून ) भक्तवत्सल श्रीराम प्रसन्न झाला. तो म्हणाला, ‘ तुझें कल्याण असो. पाहिजे तो वर माग. मी वर देण्यास सिद्ध आहें.’ ३३ विभीषण म्हणाला, ‘ राघवा ! मी धन्य झालों, मी कृतकृत्य झालों, माझें कार्य सिद्धीला गेलें; तुझ्या चरणदर्शनानेंच मी मुक्त झालों आहें, यांत संशय नाहीं. ३४ माझ्यासारखा धन्य कोणी नाहीं; माझ्यासारखा पवित्र कोणी नाहीं. रामा ! तुझ्या मूर्तीच्या दर्शनानें जगतांत माझ्यासारखा ( भाग्यवान् ) दुसरा कोणीच नाहीं. ३५ रघुनंदना ! कर्मबंधन तुटण्याकरितां भक्तीपासून उत्पन्न होणारें तुझ्या स्वरूपाचें ज्ञान आणि परमार्थाचें–मोक्षाचें–साधन जें तुझें ध्यान, तें मला दे. ३६ राजेंद्रा रामा ! मी विषयसुख तुजकडे मागत नाहीं. तुझ्या पदकमलाचे ठायीं माझी भक्ति सर्वकाळ जडून राहो.’ ३७ रामचंद्र संतुष्ट होऊन ‘ बरें आहे ’ असें म्हणाला, आणि पुनः राक्षसाला–विभीषणाला–म्हणाला, ‘ ( विभीषणा ! ) तुझें कल्याण असो. मी तुला माझें रहस्य स्पष्ट सांगतों, ऐक. ३८ ह्या जगांत जे माझे भक्त अत्यंत शांत, योगनिष्ठ आणि वैराग्यरत असे असतात, त्यांच्या हृदयामध्यें मी सीतेसहवर्तमान सर्वदा वास

१ परमेश्वराची भक्तवत्सलता–‘ माझे भक्त मज अनुसरले चित्तें । त्याहूनि पढियंतें मज नाहीं ॥ मी त्याचा सोयरा ते माझे सांगाती । करीं त्या एकांतीं सुखगोष्टी ॥’–तीर्थावळी.
२. ज्ञानापेक्षां भक्ति हें सुलभ व निर्विघ्न साधनः—‘ माझिये प्राप्तीलागुनी । भक्ति ज्ञान मार्ग दोन्ही । ज्ञान अत्यंत कठिणपणीं । भक्ति निर्विघ्नीं पाववी मज ॥ ’—एकनाथी भागवत ११

॥ ३९ ॥ तस्मात्त्वं सर्वदा शांतः सर्वकल्मषवर्जितः । मां ध्यात्वा मोक्ष्यसे नित्यं घोरसंसारसागरात् ॥४०॥ स्तोत्रमेतत्पठेद्यस्तु लिखेद्यः शृणुयादपि । मत्प्रीतये ममाभीष्टं सारूप्यं समवाप्नुयात् ॥ ४१ ॥ इत्युक्त्वा लक्ष्मणं प्राह श्रीरामो भक्तभक्तिमान् । पश्यत्विदानीमेवैष मम संदर्शने फलम् ॥४२॥ लंकाराज्येऽभिषेक्ष्यामि जलमानय सागरात् । यावच्चंद्रश्च सूर्यश्च यावत्तिष्ठति मेदिनी ॥ ४३ ॥ यावन्मम कथा लोके तावद्राज्यं करोत्वसौ । इत्युक्त्वा लक्ष्मणेनांबु ह्यानाय्य कलशेन तम् ॥ ४४ ॥ लंकाराज्याधिपत्यार्थमभिषेकं रमापतिः । कारयामास सचिवैर्लक्ष्मणेन विशेषतः ॥ ४५ ॥ साधु साध्विति ते सर्वे वानरास्तुष्टुवुर्भृशम् । सुग्रीवोऽपि परिष्वज्य विभीषणमथाब्रवीत् ॥ ४६ ॥ विभीषण वयं सर्वे रामस्य परमात्मनः । किंकरास्तत्र मुख्यस्त्वं भक्त्या रामपरिग्रहात् । रावणस्य विनाशे त्वं साहाय्यं कर्तुमर्हसि ॥ ४७ ॥ विभी-

करितों; यांत संशय नाही. ३९ म्हणून तं सर्वदा शांत आणि सर्वपापरहित असल्यामुळें माझ्या नित्य ध्यानानें भयंकर संसारसागरांतून मुक्त होशील.४० जो कोणी माझ्या प्रीत्यर्थ मला प्रिय अशा ह्या ( तूं केलेल्या ) स्तोत्राचें पठन करील, तें लिहील, किंवा श्रवण करील, त्याला माझी सरूपता प्राप्त होईल.' ४१ असें बोलून भक्तजनांवर प्रेम करणाऱ्या रामानें लक्ष्मणाला म्हटलें, 'माझ्या दर्शनाचें फळ काय, तें आतांच ह्याला दिसून येईल! ४२ ह्याला मी लंकाराज्यावरचा अभिषेक ( आतांच ) करितों, तरी समुद्राचें उदक घेऊन ये. जोंपर्यंत पृथ्वीवर चंद्र आणि सूर्य आहेत, त्याचप्रमाणें पृथ्वी जोंपर्यंत विद्यमान आहे, जोंपर्यंत माझी कथा जगामध्यें राहणार आहे, तोंपर्यंत हा लंकेचें राज्य करो.' असें बोलून रामानें लक्ष्मणाकडून कलशांत पाणी आणविलें, आणि त्या लक्ष्मीपति ( रामा )नें त्या ( विभीषणा ) चे मंत्र्यांकडून व विशेषतः लक्ष्मणाकडून लंकाराज्याधिकाराचा त्याला अभिषेक करविला. ४३,४४, ४५ तेव्हां 'ठीक,' 'ठीक,' म्हणून त्या सर्व वानरांनी अत्यंत प्रशंसा केली. सुग्रीवानें देखील विभीषणाला आलिंगन दिलें, आणि म्हटलें, ४६ 'विभीषणा! आम्ही सव परमात्मा रामाचे सेवक आहों; रामाचा भक्तिपूर्वक आश्रय केल्यामुळें त्या सर्वांत तूं मुख्य आहेस. आतां रावणाचा वध करण्याचे कामीं तूं ( रामाला ) साहाय्य करावें.' ४७

षण उवाच ॥ अहं कियान्सहायत्वे रामस्य परमात्मनः । किं तु दास्यं करिष्येऽहं भक्त्या शक्त्या ह्यमायया ॥ ४८ ॥ दशग्रीवेण संदिष्टः शुको नाम महासुरः । संस्थितो ह्यंबरे वाक्यं सुग्रीवमिदमब्रवीत् ॥४९॥ त्वामाह रावणो राजा भ्रातरं राक्षसाधिपः । महाकुलप्रसूतस्त्वं राजासि वनचारिणाम् ॥ ५० ॥ मम भ्रातृसमानस्त्वं तव नास्त्यर्थविप्लवः । अहं यदहरं भार्यां राजपुत्रस्य किं तव ॥ ५१ ॥ किष्किंधां याहि हरिभिर्लंका शक्या न दैवतैः । प्रातुं किं मानवैरल्पसत्त्वैर्वानरयूथपैः ॥ ५२ ॥ तं प्रापयंतं वचनं तूर्णमुत्प्लुत्य वानराः । प्रापद्यंत तदा क्षिप्रं निहंतुं दृढमुष्टिभिः ॥ ५३ ॥ वानरैर्हन्यमानस्तु शुको राममथाब्रवीत् । न दूतान् घ्नंति राजेंद्र वानरान्वारय प्रभो ॥ ५४ ॥ रामः श्रुत्वा तदा

बिभीषण म्हणाला, 'परमात्मा रामाला साहाय्य करण्याचें तं मी काय करणार ? तथापि भक्तिपूर्वक आणि निष्कपटपणें यथाशक्ति मी त्याची सेवा करीन.' ४८ इतक्यांत रावणाचा निरोप घेऊन आलेला शुक नांवाचा महादैत्य येऊन आकाशात उभा राहिला, आणि सुग्रीवाला म्हणाला, ४९ '(सुग्रीवा !) तूं रावणाचा बंधु[1] असल्यामुळें त्या राक्षसाधिपतानं तुला सांगितलें आहे की, 'तूं मोठ्या कुळांत जन्मलेला असून वनचरांचा राजा आहेस. ५० मी तुला भावाप्रमाणें मानीत असून तुझ्या कोणत्याही वस्तूचा नाश मजकडून झाला नाही. मी राजपुत्रा (रामा)-ची पत्नी हरण करून आणिली, त्याचा तुजकडे काय संबंध ? ५१ वानरांसहवर्तमान किष्किंधेला जा, देवांनाही लंका मिळविणें शक्य नाही, मग अल्पशक्तीच्या मानवांचें किंवा वानरसेनापतीचें तेथें काय चालणार ? ५२ तो (शुक) अशा प्रकारें रावणाचा निरोप कळवीत आहे, इतक्यांत वानरांनी शीघ्र उड्या मारिल्या, आणि लागलीच बळकट मुष्टिप्रहारांनी त्यांनी त्याला मारण्यास प्रारंभ केला. ५३ वानर मारीत असतां शुक रामाला म्हणाला, 'महासमर्था राजेंद्रा ! दूतांना कोणी मारीत[2] नसतात. आपल्या वानरांचें निवारण कर.' ५४ शुकाचें भाषण व शोक

१. वाली व रावण परस्परांना बंधु मानीत असत. अर्थात् वालीचा भाऊ सुग्रीव हाही रावणाचा बंधु होतो. २. 'उद्यतेष्वपि शस्त्रेषु दूतो वदति नान्यथा । सदैवावध्यभावेन यथार्थस्य हि वाचकः ॥'—हितोपदेश.

वाक्यं शुकस्य परिदेवितम् । मावधिष्टेति रामस्तान्वारयामास वानरान्
॥ ५५ ॥ पुनरंबरमासाद्य शुकः सुग्रीवमब्रवीत् । ब्रूहि राजन्दशग्रीवं
किं वक्ष्यामि व्रजाम्यहम् ॥ ५६ ॥ सुग्रीव उवाच ॥ यथा वाली
मम भ्राता तथा त्वं राक्षसाधम । हंतव्यस्त्वं मया यत्नात्सपुत्रबलवाहनः
॥ ५७ ॥ ब्रूहि मे रामचंद्रस्य भार्यां हृत्वा क्व यास्यसि । ततो रामा-
ज्ञया धृत्वा शुकं बध्वान्वरक्षयत् ॥ ५८ ॥ शार्दूलोऽपि ततः पूर्वं दृष्ट्वा
कपिबलं महत् । यथावत्कथयामास रावणाय स राक्षसः ॥ ५९ ॥
दीर्घचिंतापरो भूत्वा निःश्वसन्नास मंदिरे । ततः समुद्रमावेक्ष्य रामो
रक्तांतलोचनः ॥ ६० ॥ पश्य लक्ष्मण दुष्टोऽसौ वारिधिर्मामुपागतम् ।
नाभिनंदति दुष्टात्मा दर्शनार्थं ममानघ ॥ ६१ ॥ जानाति मानुषोऽयं
मे किं करिष्यति वानरैः । अद्य पश्य महाबाहो शोषयिष्यामि वारिधिम्
॥ ६२ ॥ पादेनैव गमिष्यंति वानरा विगतज्वराः । इत्युक्त्वा क्रोधता-

ऐकून '(ह्याला) मारूं नका,' असें म्हणून रामानें त्या वानरांचें निवारण केलें. ५५ पुनः आकाशांत जाऊन शुक सुग्रीवाला म्हणाला, 'राजा (सुग्रीवा)! मी रावणाला काय सांगूं, तें बोल. हा मी चाललों.' ५६ सुग्रीव म्हणाला, 'राक्षसाधमा जसा वाली माझा बंधु, तसाच तूंही आहेस. म्हणून (त्याच्याप्रमाणेंच) वाटेल ते उपाय योजून मी तुला पुत्र, सैन्य आणि वाहनें यांसह ठार मारावें, हेंच योग्य होय. ५७ (त्याला) माझा निरोप सांग की, रामाची पत्नी घेऊन तूं कुठें जाणार तें मला सांग.' असें बोलून (सुग्रीवानें) रामाज्ञेनें त्या शुकाला बांधविलें, आणि सुरक्षित ठिकाणी नेऊन ठेविलें. ५८ (दुसऱ्या कोणी) शार्दूल नावाच्या दैत्यानें तें मोठें वानरांचें सैन्य पाहून, शुकदैत्य येण्यापूर्वींच, सर्व वृत्तांत रावणाला विदित केला. ५९ त्यामुळें रावणाला मोठी चिंता लागून राहिली; तो दीर्घ सुस्कारे टाकीत मंदिरांत बसून राहिला. इकडे रामानें समुद्राला पाहून नेत्रप्रांत (रागानें) लाल केले. ६० (आणि म्हटलें) 'अनघा लक्ष्मणा! हा समुद्र किती दुष्ट आहे पहा! मी जवळ आलों असतांही हा दुष्ट अंतःकरणाचा (समुद्र) माझा सत्कार करीत नाहीं, की दर्शनही घेत नाहीं. ६१ त्याला वाटत असावें की, हा राम केवळ मनुष्य होय, ह्याच्यानें वानरां-कडून आपलें काय (वांकडें) होणार? महाबाहो (लक्ष्मणा)! पहा, आज मी या समुद्राला सुकवून टाकणार आहें. ६२ (असें केल्यानें) वानर निष्काळजी होऊन पायींच (समुद्राच्या) पार जातील.' असें बोलून रामानें क्रोधानें डोळे लाल

श्चाक्ष आरोपितधनुर्धरः ॥ ६३ ॥ तूणीराद्बाणमादाय कालाग्निसदृश-प्रभम् । संधाय चापमाकृष्य रामो वाक्यमथाब्रवीत् ॥ ६४ ॥ पश्यंतु सर्वभूतानि रामस्य शरविक्रमम् । इदानीं भस्मसात्कुर्यां समुद्रं सरितां पतिम् ॥ ६५ ॥ एवं ब्रुवति रामे तु सशैलवनकानना । चचाल वसुधा द्यौश्च दिशश्च तमसावृताः ॥ ६६ ॥ चुक्षुभे सागरो वेलां भयाद्योजन-मत्यगात् । तिमिनक्रझषा मीनाः प्रतप्ताः परितत्रसुः ॥ ६७ ॥ एतस्मि-न्नंतरे साक्षात्सागरो दिव्यरूपधृक् । दिव्याभरणसंपन्नः स्वभासा भासयन् दिशः ॥ ६८ ॥ स्वांतस्थदिव्यरत्नानि कराभ्यां परिगृह्य सः । पादयोः पुरतः क्षिप्त्वा रामस्योपायनं बहु ॥ ६९ ॥ दंडवत्प्रणिपत्याह रामं रक्तां-तलोचनम् । त्राहि त्राहि जगन्नाथ राम त्रैलोक्यरक्षक ॥ ७० ॥ जडोऽहं राम ते सृष्टः सृजता निखिलं जगत् । स्वभावमन्यथा कर्तुं कः शक्तो देव-

केले आणि त्याने धनुष्यावर दोरी चढविली. ६३ भात्यातून प्रलयकालच्या अग्नी-सारखा बाण काढून त्यानें धनुष्यावर जोडिला, आणि ( दोरी ) ओढून तो बोलला, ६४ ‘ सर्व भूतें ( आज ) रामाच्या बाणाचा पराक्रम पाहोत ! या नदीपति समुद्राचें मी भस्म करून टाकतों. ’ ६५ रामाला हें बोलतांना ऐकून पर्वत, उपवनें अरण्यें यांसह पृथ्वी कंपित झाली. आकाश आणि दिशा अंधकारानें व्याप्त झाल्या. ६६ समुद्र खवळला. भयानें मर्यादेचें उल्लंघन करून तो एक योजन पुढें सरकला. त्यामुळें मासे, सुसरी आणि मगर संतप्त होऊन व्याकुळ झाले. ६७ इत-क्यांत साक्षात् समुद्र दिव्यरूप धारण करून आणि उत्तम अलंकार अंगावर घालून आपल्या कांतीनें सर्व दिशांना प्रकाशित करीत ( रामाकडे आला ). ६८ आपल्या पोटांतील सुंदर रत्नें हातांत घेऊन तो मोठा ( रत्नांचा ) नजराणा त्यानें रामाच्या पायांपुढें ठेविला, ६९ आणि क्रोधानें नेत्रप्रांत लाल झाले आहेत, अशा त्या रामाला साष्टांग नमस्कार घालून (म्हणाला,) ‘हे जगन्नाथा ! त्रैलोक्यरक्षका रामा ! माझें रक्षण कर, माझें रक्षण कर. ७० सर्व जगाची उत्पत्ति करतांना, हे रामा ! तूंच मला स्वतः जड असा निर्माण केलास. तो देवनिर्मित माझा ( जड ) स्वभाव आतां

१. समानार्थक वर्णन—‘ बहु क्षोभला राम जाळूं निघाला । पुढें सिंधु भेटावया शीघ्र आला ॥ म्हणे स्वामिया थोर अन्याय जाला । समुद्रासि हो शीघ्र पाल्हाण घाला ॥ नळाचेनि हस्तें जळीं चंड शीळा । गिरीशृंग तर्तील हो जी भुपाळा ॥ वदे निश्चयें आदरें तो समुद्रु । तई थोर आनंदला रामचंद्रु ॥ ’—युद्धकांड, रामदासकृत.

**निर्मितम् ॥७१॥ स्थूलानि पञ्चभूतानि जडान्येव स्वभावतः। सृष्टानि भव- तैतानि त्वदाज्ञां लंघयंति न ॥ ७२ ॥ तामसादहमो राम भूतानि प्रभवंति हि। कारणानुगमात्तेषां जडत्वं तामसं स्वतः ॥ ७३ ॥ निर्गुणस्त्वं निराकारो यदा मायागुणान्प्रभो । लीलयांगीकरोषि त्वं तदा वैराज- नामवान् ॥ ७४ ॥ गुणात्मनो विराजश्च सत्त्वाद्देवा बभूविरे । रजो- गुणात्प्रजेशाद्या मन्योर्भूतपतिस्तव ॥ ७५ ॥ त्वामहं मायया छन्नं लीलया मानुषाकृतिम् । जडबुद्धिर्जडो मूर्खः कथं जानामि निर्गुणम् ॥ ७६ ॥ दंड एव हि मूर्खाणां सन्मार्गप्रापकः प्रभो । भूतानाममरश्रेष्ठ पशूनां लगुडो यथा ॥ ७७ ॥ शरणं ते व्रजामीश शरण्यं भक्तव- त्सल । अभयं देहि मे राम लंकामार्गं ददामि ते ॥ ७८ ॥ श्रीराम**

कोण बरें अन्यथा करणार ? ७१ स्थूल पंच भूतें स्वभावतःच जड आहेत. ही तूंच निर्माण केली आहेस. ती तुझी आज्ञा मोडीत नाहीत. ७२ रामा ! तामस अहंकारा- पासून भूतें उत्पन्न होतात. तेव्हां मूळाला अनुसरूनच ह्यांच्या आंगी जडत्व स्वतः- सिद्ध असतें. ७३ प्रभो ! तूं निर्गुण निराकार असून लीलेनें जेव्हां माया- गुणांचा स्वीकार करितोस, तेव्हां तुला वैराज हें नांव प्राप्त होतें. ७४ त्या त्रिगुणात्मक विराट् देहाच्या सत्त्वगुणापासून देव झाले, रजोगुणापासून प्रजापति वगैरे निर्माण झाले, तसाच भूतपति रुद्र हा तुझ्या क्रोधापासून झाला आहे. ७५ तुझें स्वरूप मायेनें आच्छादिलेलें असून तूं मनुष्यरूप धारण केलें आहेस; अशा स्थितीत तुझ्या निर्गुण स्वरूपाला मी जडबुद्धि, अज्ञानी व मूर्ख कसा बरें जाण- णार ? ७६ प्रभो देवश्रेष्ठा ! पशूंना मार्गावर आणण्यास काठीचा उपयोग करावा लागतो, त्याचप्रमाणें मूर्ख प्राण्यांना सन्मार्गावर आणण्यास दंड हेंच योग्य साधन होय. ७७ भक्तवत्सला ईशा ! तूं शरणागतांचें कल्याण करणारा आहेस, म्हणून मी तुला शरण आलों आहें. रामा ! मला अभय दे. लंकेला जाण्याला मी तुला

१. 'मूर्ख ते सन्मार्गास याया। दंडाचे साधन आहे राया। पशुचि एसे जाणिजे, जया। बुद्धि नाहींच तिळाची प्रभो ! ॥ मी विनम्र तुझे चरणीं। मजचि अभय देइजे क्षणीं। लंकापुरींत जायालागुनी। मार्ग मी तूतें देतसें ॥-अध्यात्मरामकथा.

उवाच ॥ अमोघोऽयं महाबाणः कस्मिन्देशे निपात्यताम् । लक्ष्यं दर्शय मे शीघ्रं बाणस्यामोघपातिनः ॥ ७९ ॥ रामस्य वचनं श्रुत्वा करे दृष्ट्वा महाशरम् । महोदधिर्महातेजा राघवं वाक्यमब्रवीत् ॥ ८० ॥ रामोत्तरप्रदेशे तु द्रुमकुल्य इति श्रुतः । प्रदेशस्तत्र बहवः पापात्मानो दिवानिशम् ॥ ८१ ॥ बाधंते मां रघुश्रेष्ठ तत्र ते पात्यतां शरः । रामेण सृष्टो बाणस्तु क्षणादाभीरमंडलम् ॥ ८२ ॥ हत्वा पुनः समागत्य तूणीरे पूर्ववत्स्थितः । ततोऽब्रवीद्रघुश्रेष्ठं सागरो विनयान्वितः ॥ ८३ ॥ नलः सेतुं करोत्वस्मिन् जले मे विश्वकर्मणः । सुतो धीमान् समर्थोऽस्मिन्कार्ये लब्धवरो हरिः ॥ ८४ ॥ कीर्ति जानंतु ते लोकाः सर्वलोकमलापहाम् । इत्युक्त्वा राघवं नत्वा ययौ सिंधुरदृश्यताम् ॥ ८५ ॥ ततो रामस्तु सुग्रीवलक्ष्मणाभ्यां समन्वितः । नलमाज्ञापयच्छीघ्रं वानरैः सेतुबंधने ॥ ८६ ॥ ततोऽतिहृष्टः प्लवगेंद्रयूथपैर्महानगेंद्रप्रतिमैर्युतो नलः । बबंध

मार्ग देतों.' ७८ राम म्हणाला, 'हा माझा महाबाण अमोघ–व्यर्थ न जाणारा-आहे. तरी तो कोणत्या प्रदेशावर सोडूं (तें सांग). हा बाण व्यर्थ न पडणारा असल्यामुळें ह्याला लक्ष्य–नेम मारण्याचें ठिकाण–दाखीव.' ७९ रामाचें भाषण ऐकून आणि त्याच्या हातांत महाशर पाहून तो महातेजस्वी महासागर रामाला म्हणाला, ८० 'रामा! उत्तरप्रदेशीं द्रुमकुल्य नांवाचा प्रसिद्ध प्रदेश आहे. तेथें पुष्कळ पापी लोक राहात असून ते अहर्निश मला पीडा देत असतात. रघुश्रेष्ठा! हा तुझा बाण तेथें पडूं द्या.' नंतर रामानें बाण सोडला. त्या बाणानें क्षणांत त्या भिल्लांच्या समुदायाचा नाश केला, आणि पुनः तो भात्यांत पूर्ववत् येऊन राहिला. नंतर समुद्रानें विनयपूर्वक त्या रघुश्रेष्ठा (श्रीरामा)ला म्हटलें, ८१,८२,८३ 'विश्वकर्म्याचा पुत्र जो नल त्यानें या माझ्या उदकावर सेतु बांधावा. तो चतुर व ह्या कामी समर्थ असा वानर आहे. शिवाय त्याला ब्रह्मदेवाकडून तसा वरही मिळाला आहे. ८४ हा सेतु बांधल्यानें तुझी कीर्ति लोकांना कळून येईल. तुझी कीर्ति सर्व लोकांचीं पापें नाहीशीं करिते.' असें म्हणून समुद्रानें रामाला प्रणाम केला, आणि तो अदृश्य झाला. ८५ नंतर सुग्रीव आणि लक्ष्मण यांसह रामानें वानरांच्या साह्यानें सेतु बांधण्याची नळाला आज्ञा केली. ८६ तेव्हां नळाला पराकाष्ठेचा आनंद झाला. त्यानें पर्वतसमान प्रचंड शरीराच्या अनेक वानरसेनापतींचें साह्य

सेतुं शतयोजनायतं सुविस्तृतं पर्वतपादपैर्दृढम् ॥ ८७ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकांडे तृतीयः सर्गः ॥ ३ ॥

## युद्धकांड, सर्ग चवथा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ सेतुमारभमाणस्तु तत्र रामेश्वरं शिवम् । संस्थाप्य पूजयित्वाह रामो लोकहिताय च ॥ १ ॥ प्रणमेत्सेतुबंधं यो दृष्ट्वा रामेश्वरं शिवम् । ब्रह्महत्यादिपापेभ्यो मुच्यते मदनुग्रहात् ॥ २ ॥ सेतुबंधे नरः स्नात्वा दृष्ट्वा रामेश्वरं हरम् । संकल्पनियतो भूत्वा गत्वा वाराणसीं नरः ॥ ३ ॥ आनीय गंगासलिलं रामेशमभिषिच्य च । समुद्रे क्षिप्ततद्भारो ब्रह्म प्राप्नोत्यसंशयम् ॥ ४ ॥ कृतानि प्रथमेनाह्ना योजनानि चतुर्दश । द्वितीयेन तथा चाह्ना योजनानि तु विंशतिः ॥५॥

घेतलें आणि पर्वत आणि वृक्ष यांच्या योगें शंभर योजनें लांब असा विस्तीर्ण सेतु बांधला. ८७ ”

**युद्धकांड, तिसरा सर्ग समाप्त.**

श्रीमहादेव म्हणाला, “ सेतु बांधण्यास आरंभ करितांना रामानें तेथें ‘ रामेश्वर ’ म्हणून शिवलिंगाची स्थापना केली, आणि त्याची पूजा केली. लोकहिताकरितां ( त्यानें वर असा दिला कीं, ) ‘ जो कोणी रामेश्वर लिंगाचें दर्शन घेईल, आणि सेतुबंधास वंदन करील, तो माझ्या अनुग्रहानें–कृपेनें–ब्रह्महत्यादि पापांपासून मुक्त होईल. १,२ सेतुबंधाचे ठिकाणी मनुष्यानें स्नान करून रामेश्वरलिंगाचें दर्शन घ्यावें, संकल्पपूर्वक काशीस[1] जाऊन तेथील गंगोदक आणून रामेश्वरास अभिषेक करावा, आणि उरलेलें उदक, पात्र वगैरे समुद्रांत टाकावें. असें केल्यानें निःसंशय ब्रह्मप्राप्ति होते. ’ ३.४ ( नलानें ) पहिल्या दिवशी चवदा योजनें सेतु बांधला,

१. काशी–गंगानदीवरील एक प्रसिद्ध पवित्र क्षेत्रस्थान. हें मोक्षदायक म्हणून वर्णिलेल्या सात क्षेत्रस्थलांतील एक आहे. तीं सात क्षेत्रें:–‘ अयोध्या मथुरा माया काशी कांचिरवंतिका पुरी द्वारावती चैव सप्तैता मोक्षदायिकाः ॥ ’

तृतीयेन तथा चाह्ना योजनान्येकविंशतिः । चतुर्थेन तथा चाह्ना द्वाविंशतिरिति श्रुतम् ॥ ६ ॥ पंचमेन त्रयोविंशद्योजनानि समंततः । बबंध सागरे सेतुं नलो वानरसत्तमः ॥ ७ ॥ तेनैव जग्मुः कपयो योजनानां शतं द्रुतम् । असंख्याताः सुवेलाद्रिं रुरुधुः प्लवगोत्तमाः ॥ ८ ॥ आरुह्य मारुतिं रामो लक्ष्मणोऽप्यंगदं तथा । दिदृक्षू राघवो लंकामारुरोहाचलं महत् ॥ ९ ॥ दृष्ट्वा लंकां सुविस्तीर्णां नानाचित्रध्वजाकुलाम् । चित्रप्रासादसंबाधां स्वर्णप्राकारतोरणाम् ॥ १० ॥ परिखाभिः शतघ्नीभिः संक्रमैश्च विराजिताम् । प्रासादोपरि विस्तीर्णप्रदेशे दशकंधरः ॥ ११ ॥ मंत्रिभिः सहितो वीरैः किरीटदशकोज्ज्वलः । नीलाद्रिशिखराकारः कालमेघसमप्रभः ॥ १२ ॥ रत्नदंडैः सितच्छत्रैरनेकैः परिशोभितः । एतस्मिन्नंतरे बद्धो मुक्तो रामेण वै शुकः ॥ १३ ॥ वानरैस्ताडितः

दुसरे दिवशी वीस योजनें, ५ तिसरे दिवशी एकवीस योजनें, चवथे दिवशीं बावीस योजनें, असें ऐकण्यांत आहे. ६ पांचवे दिवशी तेवीस, ( प्रत्येक दिवशी एक योजन अधिक ) अशा प्रमाणानें त्या वानरश्रेष्ठ नलानें समुद्रावर सर्वत्र सेतु बांधला. ७ त्या सेतूवरून ते असंख्यात वानर शंभर योजनें समुद्र हांहां म्हणतां ओलांडून गेले. नंतर त्या वानरश्रेष्ठांनी सुवेळ[1] पर्वताला वेढा दिला. ८ मारुतीवर राम आरूढ झाला, व लक्ष्मण अंगदावर आरूढ झाला. लंका पाहण्याच्या इच्छेनें राम त्या पर्वतावर उंच चढला. ९ (तेथून) ती अत्यंत विस्तीर्ण लंका (रामानें) पाहिली. तेथें नाना प्रकारच्या चित्रविचित्र ध्वजा फडकत होत्या, सुंदर वाडे एकमेकांना लागून राहिले होते; भोंवतालचे तट व तोरणें सुवर्णाची होतीं. १० सभोंवार खंदक असून ठिकठिकाणीं तोफा ठेविल्या होत्या. मधून मधून पूलही होते; त्यामुळें त्या नगरीला सुंदर शोभा आली होती. ह्या समयी राजवाड्याच्या विस्तीर्ण माडीवर दशमुख रावण बसला होता. ११ दहा मुकुटांनी तो तेजःपुंज दिसत होता. तो आपल्या पराक्रमी मंत्र्यांसहित बसला होता. त्याची अंगकांति कृष्णमेघासारखी असून त्याचा आकार नीलपर्वताचे शिखरासमान भासत होता. १२ रत्नांच्या दांड्यानीं युक्त अशीं अनेक शुभ्र छत्रें त्याजवर धरिलीं होतीं; त्यांमुळें तो विशेषच शोभत होता. इतक्यांत वानरांनीं बांधून आणि बराच मार देऊन मुक्त केलेला शुक[2] तेथें आला. त्याला पाहून हंसत

१. त्रिकूटपर्वत. २. या नांवाचा रावणाकडील दूत. पृष्ठ ३९१ पहा.

सम्यक् दशाननमुपागतः । प्रहसन् रावणः प्राह पीडितः किं परैः शुक
॥ १४ ॥ रावणस्य वचः श्रुत्वा शुको वचनमब्रवीत् । सागरस्योत्तरे
तीरेऽब्रुवं ते वचनं यथा । तत उत्प्लुत्य कपयो गृहीत्वा मां क्षणात्ततः
॥ १५ ॥ मुष्टिभिर्नखदंतैश्च हंतुं लोप्तुं प्रचक्रमुः । ततो मां राम रक्षेति
क्रोशंतं रघुपुंगवः ॥ १६ ॥ विसृज्यतामिति प्राह विसृष्टोऽहं कपीश्वरैः ।
ततोऽहमागतो भीत्या दृष्ट्वा तद्वानरं बलम् ॥ १७ ॥ राक्षसानां बलौ-
घस्य वानरेंद्रबलस्य च । नैतयोर्विद्यते संधिर्देवदानवयोरिव ॥ १८ ॥
पुरप्राकारमायांति क्षिप्रमेकतरं कुरु । सीतां वास्मै प्रयच्छाशु
युद्धं वा दीयतां प्रभो ॥ १९ ॥ मामाह रामस्त्वं ब्रूहि रावणं मद्वचः
शुक । यद्बलं च समाश्रित्य सीतां मे हृतवानसि ॥ २० ॥ तद्दर्शय

हंसत रावण म्हणाला, 'शुका! शत्रूंकडून तुला पीडा झाली काय?' १३,१४ रावणाचें भाषण ऐकून शुक बोलला, 'समुद्राच्या उत्तरतीरावर (जाऊन) मी आपला निरोप (सुग्रीवाला) बरोबर सांगितला. नंतर त्या वानरांनी तत्क्षणीं मला धरिलें, आणि मुष्टींनीं, नखांनी आणि दांतांनी मारून माझे लचके तोडण्यास प्रारंभ केला. तेव्हां 'रामा! माझें रक्षण कर,' म्हणून मी आक्रोश केल्यावर 'ह्याला सोडा' असें तो रघुश्रेष्ठ राम बोलला, आणि मला त्या वानरवीरांनीं सोडिलें. तें वानरसैन्य पाहून मी भयभीत झालों, आणि इकडे निघून आलों. १५,१६,१७ राक्षसांचा सेनासमुदाय आणि वानर-श्रेष्ठांचें सैन्य यांचा संधि होणें, म्हणजे देवदानवांच्या सख्याइतकेंच (कठिण) आहे. १८ (वानर) नगराच्या कोटावर येत आहेत; तरी दोन्हींपैकी कोणती ती एक गोष्ट कर. एक सीता तरी त्याला लवकर नेऊन दे; अगर प्रभो! युद्धाला तयार हो. १९ रामानें मला सांगितलें आहे कीं, 'शुका! रावणाला माझा असा निरोप सांग की, ज्या बळाच्या जोरावर तूं माझ्या सीतेचें हरण केलें आहेस, २० तें बळ

१. कविवर्य मोरोपंतानीं ह्या प्रसंगाचे सुंदर वर्णन केलें आहे—'तो शुक मनुजपतीतें गेला वंदुनि दशाननापाशीं । नमुनि म्हणे, मी जाउनि सांपडलों वानराचिया पाशीं ॥ दाशरथी वीराधिप, त्यासीं कोणी नसे तुलायाला । यालागिं राक्षसेंद्रा! युद्धेच्छा हे नसो तुला याला ॥ रघुनाथाची महिषी सोडावी, हेच मूळ कलहाला । हा लाभ मुख्य रामप्रीतिसुधा पी, त्यजीं विषयहाला ॥'—मोरोपंत, मंत्ररामायण.

यथाकामं ससैन्यः सहबांधवः । श्वःकाले नगरीं लंकां सप्राकारां सतोरणाम् ॥ २१ ॥ राक्षसं च बलं पश्य शरैर्विध्वंसितं मया । घोररोषमहं मोक्ष्ये बलं धारय रावण ॥ २२ ॥ इत्युक्त्वोपरराामाथ रामः कमललोचनः । एकस्थानगता यत्र चत्वारः पुरुषर्षभाः ॥ २३ ॥ श्रीरामो लक्ष्मणश्चैव सुग्रीवश्च विभीषणः । एत एव समर्थास्ते लंकां नाशयितुं प्रभो ॥ २४ ॥ उत्पाट्य भस्मीकरणे सर्वे तिष्ठंतु वानराः । तस्य यादृग् बलं दृष्टं रूपं प्रहरणानि च ॥ २५ ॥ वधिष्यति पुरं सर्वमेकस्तिष्ठंतु ते त्रयः । पश्य वानरसेनां तामसंख्यातां प्रपूरिताम् ॥ २६ ॥ गर्जन्ति वानरास्तत्र पश्य पर्वतसान्निभाः । न शक्यास्ते गणयितुं प्राधान्येन ब्रवीमि ते ॥ २७ ॥ एष योऽभिमुखो लंकां नदंस्तिष्ठति वानरः । यूथपानां सहस्राणां शतेन परिवारितः ॥ २८ ॥ सुग्रीवसेनाधिपतिर्नीलो नामाग्निनंदनः । एष पर्वतश्रृंगाभः पद्मकिंजल्कसन्निभः ॥२९॥ स्फोटयत्यभिसंरब्धो लांगूलं च पुनः पुनः । युवराजोंऽगदो

तुझें सैन्य आणि बांधव यांसह आता मला खुशाल दाखीव. उद्यांच्या दिवशी कोट आणि वेशी यांसह सर्व लंकानगरीचा आणि राक्षससैन्याचा शरांनी विध्वंस करीन, तें पहा. मी भयंकर क्रोध सोडीन; रावणा ! धीर धरून रहा.' २१,२२ असें बोलून तो कमललोचन राम उगा राहिला. तेथें चौघे पुरुषश्रेष्ठ एकत्र जमले आहेत. २३ राजा ! श्रीराम, लक्ष्मण, सुग्रीव आणि विभीषण हे चौघेच तुझ्या सर्व लंकेचा नाश करण्यास समर्थ आहेत. २४ लंकेचा नाश करण्याचे कामीं, दुसरे वानर तर राहूंद्यात. एकट्या रामाचें जें बळ, स्वरूप आणि त्याचीं शस्त्रें जीं मी पाहिली आहेत, त्यांवरून ( सांगतों कीं ) तो एकटाच सगळ्या नगराचा नाश करील. त्या तिघांची जरूर नाही. वानरांची असंख्यात सेना सर्वत्र भरून राहिली आहे, ती पहा. २५,२६ तेथील पर्वतसमान वानर कसे गर्जना करीत आहेत, तें पहा. त्यांची गणना करणें देखील शक्य नाही. तरी मुख्य मुख्य मंडळी सांगतों. २७ हा लंकेकडे तोंड करून गर्जना करीत जो उभा आहे, आणि ज्याच्या सभोंवतीं शेंकडो सहस्र सेनाधिपति आहेत, २८ तो सुग्रीवाचा सेनापति नील नांवाचा असून तो अग्नीचा पुत्र आहे. त्याचा आकार पर्वतशिखरासारखा असून त्याची अंगकांति कमळाच्या केशरासारखी आहे. २९ अत्यंत क्षुब्ध होऊन आपलें

नाम वालिपुत्रोऽतिवीर्यवान् ॥ ३० ॥ येन दृष्टा जनकजा रामस्यातीव वल्लभा । हनूमानेष विख्यातो हतो येन तवात्मजः ॥३१॥ श्वेतो रजतसंकाशो महाबुद्धिपराक्रमः । तूर्णं सुग्रीवमागम्य पुनर्गच्छति वानरः ॥३२॥ यस्त्वेष सिंहसंकाशः पश्यत्यतुलविक्रमः । रंभो नाम महासत्त्वो लंकां नाशयितुं क्षमः ॥ ३३ ॥ एष पश्यति वै लंकां दिधक्षन्निव वानरः । शरभो नाम राजेंद्र कोटियूथपनायकः ॥३४॥ पनसश्च महावीर्यो मैंदश्च द्विविदस्तथा । नलश्च सेतुकर्तासौ विश्वकर्मसुतो बली ॥ ३५ ॥ वानराणां वर्णने वा संख्याने वा क ईश्वरः । शूराः सर्वे महाकायाः सर्वे युद्धाभिकांक्षिणः ॥ ३६ ॥ शक्ताः सर्वे चूर्णयितुं लंकां रक्षोगणैः सह । एतेषां बलसंख्यानं प्रत्येकं वच्मि ते शृणु ॥ ३७ ॥ एषां कोटिसहस्राणि नव पंच च सप्त च । तथा शंखसहस्राणि तथार्बुदशतानि

शेंपूट वारंवार आपटीत आहे, तो अतिवीर्यवान् वालिपुत्र युवराज अंगद होय. ३० रामाच्या अत्यंत प्रिय जानकीची ज्यानें भेट घेतली, आणि तुझ्या पुत्राचा वध ज्यानें केला, तो हा विख्यात मारुति ( पहा ). ३१ रुप्यासारख्या कांतीचा, ज्याची बुद्धि आणि पराक्रम थोर आहेत, आणि जो सुग्रीवाकडे येऊन लवकर परत जात आहे, तो श्वेतनामक वानर होय. ३२ जो हा अतुलपराक्रमी सिंहासारखा पहात आहे, तो रंभ नांवाचा महाबुद्धिमान् वानर आहे. तो एकटाच लंकेचा नाश करूं शकेल. ३३ लंकेला जाळून टाकण्याच्या इच्छेनेंच तिजकडे पाहणारा हा शरभ नांवाचा वानर आहे. राजेंद्रा ! हा कोटि वानरांच्या सेनापतींचा नायक आहे. ३४ महावीर्यशाली पनस, मैंद, द्विविद, ( समुद्रावर ) सेतु बांधणारा विश्वकर्म्याचा बलवान् पुत्र नल ( हेही पहा ). ३५ वानरांचें वर्णन किंवा गणती कोण बरें करूं शकणार ? हे सगळे शूर, शरीरानें धिप्पाड, आणि युद्धाविषयीं अत्यंत उत्सुक असे आहेत. ३६ हे सर्व राक्षसांसह लंकेचें चूर्ण करून टाकणारे आहेत. ह्या प्रत्येकाचें सैन्य किती आहे, तें आतां सांगतों ऐक. ३७ ह्या प्रत्येकाचे हाताखालीं एकवीस सहस्र कोटि. हजारों शंखे. आणि शेकडों अर्बुद इतकें सैन्य आहे.

१. शंख—१००००००००००००० इतकी संख्या. २. दहा कोटि.

च ॥ ३८ ॥ सुग्रीवसचिवानां ते बलमेतत्प्रकीर्तितम् । अन्येषां तु बलं नाहं वक्तुं शक्तोऽस्मि रावण ॥ ३९ ॥ रामो न मानुषः साक्षादादिनारायणः परः । सीता साक्षाज्जगद्धेतुश्चिच्छक्तिर्जगदात्मिका ॥ ४० ॥ ताभ्यामेव समुत्पन्नं जगत्स्थावरजंगमम् । तस्माद्रामश्च सीता च जगतस्तस्थुषश्च तौ ॥ ४१ ॥ पितरौ पृथिवीपाल तयोर्वैरी कथं भवेत् । अजानता त्वयाऽऽनीता जगन्मातैव जानकी ॥ ४२ ॥ क्षणनाशिनि संसारे शरीरे क्षणभंगुरे । पंचभूतात्मके राजंश्चतुर्विंशतितत्त्वके ॥ ४३ ॥ मलमांसास्थिदुर्गंधभूयिष्ठेऽहंकृतालये । कैवास्था व्यतिरिक्तस्य काये तव जडात्मके ॥ ४४ ॥ यत्कृते ब्रह्महत्यादिपातकानि कृतानि ते । भोगभोक्ता तु यो देहः स देहोऽत्र पतिष्यति ॥ ४५ ॥ पुण्यपापे समायातो

३८ हें मी सुग्रीवाच्या सचिवांचें बल तुला सांगितलें. रावणा ! दुसऱ्यांच्या सामर्थ्याचें वर्णन करण्याला मी समर्थ नाहीं. ३९ राम हा मनुष्य नसून तो साक्षात् परमात्मा आदिनारायण होय. सीता ही साक्षात् जगताचें कारण, जगत्स्वरूपी चिच्छक्ति आहे. ४० त्यांच्यापासूनच हें सर्व स्थावरजंगमात्मक जगत् निर्माण झालें आहे. म्हणून राम आणि सीता ही चराचर सृष्टीचीं मातापिता होत. पृथ्वीपालका ( रावणा ) ! त्याच्याशीं कोण वैर करूं शकणार ? जगन्माताच अशी जी जानकी तिला तूं आणलेंस, हा तुझा केवळ अविचार होय. ४१,४२ हा संसार क्षणांत नाश पावणारा आहे. देहही क्षणभंगुर आहे. राजन् ! तो देह पंचभूतात्मक असून चोवीस तत्त्वांचा बनलेला आहे. ४३ ह्यांत मल, मांस, हाडें, दुर्गंध यांचाच विशेषेंकरून भरणा असून हा अहंकाराचें स्थान आहे. अशा तुजहून भिन्न जड देहाची त्वां ( सचेतनानें ) कां आस्था बाळगावी ? ४४ ज्याकरितां ब्रह्महत्यादि पातकें तूं केलीस, तो भोग भोगणारा देह तर येथेंच पडणार आहे. ४५ सुख आणि दुःख

१. ' अनंता ! तुझे गोल तारे तुझे ! । तुझें रूप ब्रह्मांड ! सार तुझें ! ॥'—भा. रा. तांबे ( २ ) ' सर्वं जगदिदं त्वत्तो जायते । '—गणपत्यथर्वशीर्ष. २. ' पिताहमस्य जगतो माता धाता पितामहः ।'—भ. गीता. ३. चोवीस तत्त्वें—१ प्रकृति, १ बुद्धि, १ अहंकार, ५ तन्मात्रा, १ मन, ५ ज्ञानेंद्रियें, ५ कर्मेंद्रियें आणि ५ महाभूतें. ४. ' स्थूल देह अस्थिमांसाचा । जन्मला हा रक्तरेताचा । त्याशीं मी म्हणतां वाचा । लाज कां न वाटे ? ॥ शुक्र शोणित लाळ । स्वेद मूत्रासी आप मूळ । हा आत्मा नव्हे केवळ । द्रवत्वरूपें ॥ '—प्राकृत सदाचार.

जीवेन सुखदुःखयोः । कारणे देहयोगादिनाऽऽत्मनः कुरुतोऽनिशम् ॥ ४६ ॥ यावद्देहोऽस्मि कर्तास्मीत्यात्माऽहंकुरुतेऽवशः । अध्यासात्तावदेव स्याज्जन्मनाशादिसंभवः ॥ ४७ ॥ तस्मात्त्वं त्यज देहादावभिमानं महामते । आत्मातिनिर्मलः शुद्धो विज्ञानात्माऽचलोऽव्ययः ॥४८॥ स्वाज्ञानवशतो बंधं प्रतिपद्य विमुह्यति । तस्मात्त्वं शुद्धभावेन ज्ञात्वात्मानं सदा स्मर ॥ ४९ ॥ विरतिं भज सर्वत्र पुत्रदारगृहादिषु । निरयेष्वपि भोगः स्याच्छ्वसूकरतनावपि ॥ ५० ॥ देहं लब्ध्वा विवेकाढ्यं द्विजत्वं च विशेषतः । तत्रापि भारते वर्षे कर्मभूमौ सुदुर्लभम् ॥ ५१ ॥ को विद्वानात्मसात्कृत्वा देहं भोगानुगो भवेत् । अतस्त्वं ब्राह्मणो भूत्वा

ह्यांच्या प्राप्तीची कारणे जी पुण्य, पाप ही जीवाबरोबर येतात; व त्यांच्यामुळच देहाचा संबंध वगैरे होऊन आत्म्याला सर्वदा सुखदुःखें भोगावी लागतात. ४६ जोंपर्यंत परवश झालेला आत्मा 'मी देह आहें,' 'मी कर्ता आहें,' असा अभिमान धारण करितो, तोंपर्यंतच त्याच्या मिथ्याज्ञानामुळें त्याला जन्म, मृत्यु वगैरे ही भोगावीं लागतात. ४७ म्हणून हे महाबुद्धिमंता! तूं देहादिकांवरील अभिमान सोडून दे. आत्मा अत्यंत निर्मल, शुद्ध, ज्ञानमय, निश्चल, आणि निर्विकार आहे. ४८ त्याला अज्ञानाच्या योगेंकरून–स्वस्वरूपज्ञान नसल्याकारणानें–जन्मादि संबंध घडून मोह पडतो. ह्याकरितां विशुद्ध भावानें आत्मज्ञान जोडून घे, आणि सर्वदा त्याचें चिंतन कर. ४९ सर्वत्र पुत्र, स्त्रिया, गृह इत्यादिकांविषयीं वैराग्य धारण कर. कारण, नरकांत काय आणि कुत्रीं, डुकरें या शरीरांत काय, (इंद्रियांचे) भोग म्हणून भोगायाचे असतातच. ५० आधी नरदेह दुर्लभ, त्यांतही विशेषेंकरून विवेकयुक्त ब्राह्मणत्व, आणि तेंही भरतखंडनामक कर्मभूमींत प्राप्त होणें, म्हणजे अत्यंत दुर्लभ होय. तें मिळालें असतां, ५१ कोणता विद्वान् मनुष्य देहावर आत्मबुद्धि ठेवून देह मी असें मानून, भोगाच्या मागें लागेल? तरी तुला ब्राह्मणजन्म

१. 'आत्मा देहावेगळा असता । मी देहचि वाटे नेणतां । हे मुख्य जाणावी अहंता । बंधासी मूळ ॥'–प्रा. सदाचार. २. सदृश वर्णनः—'देहाचाचि आला वीट । तेथें फळहेतूची खुंटली वाट । योग ज्ञाना पैं धोवट । ऐसे करीं ॥ अज्ञानचि मुद्दलीं नासलें । तेथ अन्यथा ज्ञान हारपलें । तेथ पुनः येणें लोपलें । जन्माचें पैं ॥'—सिद्धांतसंहिता, सोहिरोबानाथ. ३. सदृश उताराः—'पटुत्व सकलेंद्रियीं, मनुजता, सुवंशीं जनी । द्विजत्वहि दिलें भलें, बहु अलभ्य जें कीं जनीं ॥'—केकावलि, मोरोपंत.

पौलस्त्यतनयश्च सन् ॥ ५२ ॥ अज्ञानीव सदा भोगाननुधावसि किं मुधा ।
इतः परं वा त्यक्त्वा त्वं सर्वसंगं समाश्रय ॥ ५३ ॥ राममेव परात्मानं
भक्तिभावेन सर्वदा । सीतां समर्प्य रामाय तत्पादानुचरो भव ॥ ५४ ॥
विमुक्तः सर्वपापेभ्यो विष्णुलोकं प्रयास्यसि । नो चेद्गमिष्यसेऽधोधः
पुनरावृत्तिवर्जितः । अंगीकुरुष्व मद्वाक्यं हितमेव वदामि ते ॥ ५५ ॥
सत्संगतिं कुरु भजस्व हरिं शरण्यं श्रीराघवं मरकतोपलकांतिकांतम् ।
सीतासमेतमनिशं धृतचापबाणं सुग्रीवलक्ष्मणविभीषणसेवितांघ्रिम् ॥ ५६ ॥
इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकांडे चतुर्थः सर्गः ॥ ४ ॥

## युद्धकांड, सर्ग पांचवा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ श्रुत्वा शुकमुखोद्गीतं वाक्यमज्ञाननाश-

प्राप्त झाला असतां, आणि त्यांतहि पौलस्त्याचा तूं पुत्र असतां, ५२ अज्ञानासारखा नित्य भोगांचे मागें व्यर्थ लागला आहेस, तें काय म्हणून ? यापुढें तरी सर्वसंगपरित्याग करून भक्तिपूर्वक, परात्मा जो राम त्याचाच सर्वदा आश्रय कर, सीता रामाला नेऊन दे, आणि त्याच्या चरणांची सेवा कर. ५३,५४ असें केलें असतां तूं सर्व पापांपासून मुक्त होऊन विष्णुलोकाला जाशील. असें न केल्यास उत्तरोत्तर खाली खाली—अधोलोकीं—तुला जावें लागेल; वर येण्याची आशाच करणें नको. माझ्या हितप्रद बोधाचा स्वीकार कर. ५५ ( रावणा ! ) साधूंची संगति धर, जो भक्तांची संकटें दूर करतो, जो शरणागतांचें कल्याण करतो, ज्याची अंगकांति पाचेच्या खड्यासारखी सुंदर आहे, ज्याच्यासमवेत सीता आहे, ज्याच्या हातांत नित्य धनुष्यबाण आहेत, ज्याच्या चरणांची सेवा सुग्रीव, लक्ष्मण आणि विभीषण करीत असतात, त्या रामचंद्राची भक्ति करीत जा. ५६ ”

**युद्धकांड, सर्ग चवथा समाप्त.**

श्रीमहादेव म्हणाला, “ शुकाच्या मुखांतून निघालेले शब्द ऐकून रावणाचे डोळे क्रोधानें लाल होऊन गेले. ( शुकाला ) तो जाळीत आहे की काय, असा भास

१. ‘श्रीराम रामेति जना ये जपन्ति च सर्वदा, तेषां भुक्तिश्च मुक्तिश्च भविष्यति न संशयः ॥’—सनत्कुमारसंहिता.

नम् । रावणः क्रोधताम्राक्षो दहन्निव तमब्रवीत् ॥ १ ॥ अनुजीव्य सुदुर्बुद्धे गुरुवद्भाषसे कथम् । शासिताहं त्रिजगतां त्वं मां शिक्षन्न लज्जसे ॥ २ ॥ इदानीमेव हन्मि त्वां किंतु पूर्वकृतं तव । स्मरामि तेन रक्षामि त्वां यद्यपि वधोचितम् ॥ ३ ॥ इतो गच्छ विमूढ त्वमेवं श्रोतुं न मे क्षमम् । महाप्रसाद इत्युक्त्वा वेपमानो गृहं ययौ ॥ ४ ॥ शुकोऽपि ब्राह्मणः पूर्वं ब्राह्मिष्ठो ब्रह्मवित्तमः । वानप्रस्थविधानेन वने तिष्ठन् स्वकर्मकृत् ॥ ५ ॥ देवानामभिवृद्ध्यर्थं विनाशाय सुरद्विषाम् । चकार यज्ञवितितिमविच्छिन्नां महामतिः ॥ ६ ॥ राक्षसानां विरोधोऽभूच्छुको देवहितोद्यतः । वज्रदंष्ट्र इति ख्यातस्तत्रैको राक्षसो महान् ॥ ७ ॥ अंतरं प्रेप्सुरातिष्ठच्छुकापकरणोद्यतः । कदाचिदागतोऽगस्त्यस्तस्याश्रमपदं मुनेः ॥ ८ ॥ तेन संपूजितोऽगस्त्यो भोजनार्थं निमंत्रितः । गते स्नातुं मुनौ

झाला. तें ( शुकाचें ) भाषण म्हणजे अज्ञानाचा नाश करणारें ( उपदेश ) वचन होतें. रावण त्याला म्हणाला, १ ( शुका ! ) तूं अत्यंत दुष्ट बुद्धीचा आहेस. तूं चाकर असून गुरूसारखें भाषण करीत आहेस, हें कसें ? मी त्रैलोक्याचें शासन करणारा असून तूं मला उपदेश करीत आहेस ! ह्याची तुला लाज कशी वाटत नाहीं ? २ आतांच मी तुझा वध केला असता, परंतु तुझे पूर्वील उपकार स्मरून तूं वधार्ह असतांही तुझें रक्षण करीत आहें. ३ मूर्खा ! येथून निघून जा. अशा प्रकारचें तुझें भाषण मला ऐकून घेणें योग्य नव्हे.' 'हा आपला मजवर मोठा अनुग्रहच आहे,' असें बोलून ( भीतीनें ) कांपत कांपत शुक घरी गेला. ४ शुक देखील पूर्वजन्मीं ब्राह्मण असून वेदनिष्णात व परमब्रह्मज्ञानी होता. तो वानप्रस्थधर्मानुसार कर्मे आचरण करून वनांत राहात असे. ५ देवांच्या उत्कर्षासाठी व देवशत्रूंच्या —दैत्यांच्या—नाशासाठी त्या महाबुद्धिमान् शुकानें एकामागून एक असे अनेक यज्ञ केले. ६ देवांचें हित करण्यांत शुक तत्पर असल्याकारणानें त्याच्याशीं राक्षस विरोध करूं लागले. त्यांत वज्रदंष्ट्र नांवाचा एक प्रख्यात महाराक्षस होता. ७ शुकाला अपकार करण्याविषयीं उत्कंठित होऊन, तशी संधि केव्हां मिळते, ह्याची तो वाट पहात राहिला होता. एके वेळीं त्या मुनीच्या आश्रमांत अगस्त्यमुनि आला. ८ त्याचें आदरातिथ्य करून शुकानें त्यास भोजनास राहण्यास सांगितलें. पढें मुनि

१. वानप्रस्थ—ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ आणि सन्यास ह्या चार आश्रमांतील तिसरा आश्रम. वाने—वनसमूहे—प्रतिष्ठते सः वानप्रस्थः. २. पृष्ठ १८२ वरील १ टीप पहा.

कुंभसंभवे प्राप्य चांतरम् ॥ ९ ॥ अगस्त्यरूपधृक् सोऽपि राक्षसः शुक-
मब्रवीत् । यदि दास्यसि मे ब्रह्मन् भोजनं देहि सामिषम् ॥ १० ॥
बहुकालं न भुक्तं मे मांसं छागांगसंभवम् । तथेति कारयामास मांस-
भोज्यं सविस्तरम् ॥ ११ ॥ उपविष्टे मुनौ भोक्तुं राक्षसोऽतीव सुंदरम् ।
शुकभार्यावपुर्धृत्वा तां चांतर्मोहयन् खलः ॥ १२ ॥ नरमांसं ददौ तस्मै
सुपक्वं बहुविस्तरम् । दत्त्वैवांतर्दधे रक्षस्ततो दृष्ट्वा चुकोप सः ॥ १३ ॥
अमेध्यं मानुषं मांसमगस्त्यः शुकमब्रवीत् । अभक्ष्यं मानुषं मांसं दत्तवा-
नसि दुर्मते ॥ १४ ॥ मह्यं त्वं राक्षसो भूत्वा तिष्ठ त्वं मानुषाशनः ।
इति शप्तः पुरो भीत्या प्राहागस्त्यं मुने त्वया ॥ १५ ॥ इदानीं भाषितं
मेऽद्य मांसं देहीति विस्तरम् । तथैव दत्तं मे देव किं मे शापं प्रदास्यसि
॥ १६ ॥ श्रुत्वा शुकस्य वचनं मुहूर्तं ध्यानमास्थितः । ज्ञात्वा रक्षःकृतं
सर्वं ततः प्राह शुकं सुधीः ॥ १७ ॥ तवापकारिणा सर्वं राक्षसेन

स्नानाला गेला असतां, संधि साधून त्या ( वज्रदंष्ट्र ) राक्षसानें अगस्त्याचा वेष धारण केला, आणि शुकाकडे येऊन त्याला म्हटलें, ‘ ब्रह्मन्, मला तुम्ही भोजन देणारच, तरी त्यांत मांस असावें. ९, १० बरेंच दिवसांत बोकडाच्या शरीराचें मांस मी खाल्लें नाहीं. ’ ‘ बरें आहे, ’ असें म्हणून ( शुकानें ) मांसाचे सर्व पदार्थ तयार करविले. ११ पुढें अगस्त्य भोजनास बसला असतां त्या राक्षसानें शुक-पत्नीला मोहवश केलें, व तिच्यासारखें सुंदर रूप धारण केलें, १२ आणि नर-मांसाचे तयार केलेले अनेक पदार्थ त्याला वाढिले. ते वाढून होतांच तो राक्षस गुप्त झाला. तें ( नरमांस ) पाहून अगस्त्याला क्रोध आला. १३ तो शुकाला म्हणाला, ‘ नरमांस अपवित्र आहे. दुर्मते ! तें अभक्ष्य नरमांस तूं मला दिलें आहेस. म्हणून तूं राक्षस होऊन मनुष्यमांस भक्षण करीत जा. ’ असा शाप होतांच शुक घाबरला. तो अगस्त्याला म्हणाला, ‘ मुने ! आपण आतांच मला सांगितलें की, ‘ आज मुख्यत्वें मांसाचें भोजन असावें. त्याप्रमाणेंच मीं आपणाला भोजन घातलें. देवा ! मला शाप काय म्हणून देतां ?’ १४, १५, १६ शुकाचें भाषण ऐकून अगस्त्यमुनि थोडा वेळ ध्यानस्थ बसला. राक्षसानें केलेला सर्व प्रकार त्याच्या ध्यानांत आला. नंतर तो बुद्धिमान् ( अगस्त्य ) शुकाला म्हणाला, १७ ‘तुला अपकार करूं इच्छिणाऱ्या राक्षसानें

कृतं त्विदम् । अविचार्यैव मे दत्तः शापस्ते मुनिसत्तम ॥ १८ ॥
तथापि मे वचोऽमोघमेवमेव भविष्यति । राक्षसं वपुरास्थाय
रावणस्य सहायकृत् ॥ १९ ॥ तिष्ठ तावद्यदा रामो दशानन-
वधाय हि । आगमिष्यति लंकायाः समीपं वानरैः सह ॥ २० ॥ प्रेषितो
रावणेन त्वं चारो भूत्वा रघूत्तमम् । दृष्ट्वा शापाद्विनिर्मुक्तो बोधयित्वा
च रावणम् ॥ २१ ॥ तत्त्वज्ञानं ततो मुक्तः परं पदमवाप्स्यसि । इत्यु-
क्तोऽगस्त्यमुनिना शुको ब्राह्मणसत्तमः ॥ २२ ॥ बभूव राक्षसः सद्यो
रावणं प्राप्य संस्थितः । इदानीं चाररूपेण दृष्ट्वा रामं सहानुजम् ॥ २३ ॥
रावणं तत्त्वविज्ञानं बोधयित्वा पुनर्द्रुतम् । पूर्ववद्ब्राह्मणो भूत्वा स्थितो
वैखानसैः सह ॥ २४ ॥ ततः समागमद्वृद्धो माल्यवान् राक्षसो
महान् । बुद्धिमान्नीतिनिपुणो राज्ञो मातुः प्रियः पिता ॥ २५ ॥ प्राह
तं राक्षसं वीरं प्रशांतेनांतरात्मना । शृणु राजन्वचो मेऽद्य श्रुत्वा कुरु

हें सर्व केलें आहे. मुनिसत्तमा ! अविचारानें मीं तुला हा शाप दिला आहे. १८
तथापि माझें भाषण निश्चयानें सत्यच होणार ( तें अन्यथा व्हावयाचें नाही ). तरी
तूं राक्षसदेह धारण करून रामचंद्र येईपर्यंत रावणाला साह्य करीत रहा. राव-
णाचा वध करण्याकरितां वानरांना बरोबर घेऊन श्रीराम लंकेसमीप येईल. १९, २०
तेव्हां रावण तुला आपला दूत म्हणून रघुश्रेष्ठा (रामा) कडे पाठवील. तेथें रामाचें दर्शन
होतांच तूं शापमुक्त होशील. पुढें तूं रावणाला तत्त्वज्ञानाचा उपदेश करशील,
आणि मुक्त होत्साता परम पदाला जाशील.’ असें तो अगस्त्यमुनि त्या ब्राह्मणश्रेष्ठ
शुकाला बोलला. २१,२२ ( त्याप्रमाणें ) तत्काल शुकाला राक्षसरूप प्राप्त झालें,
आणि तो रावणाचा आश्रय करून राहिला. आतां त्यानें दूतरूपानें जाऊन कनिष्ठ
बंधूसह रामाचें दर्शन घेतलें, २३ आणि ( तेथून येऊन ) रावणाला तत्त्वज्ञानाचा
उपदेश केला. त्यामुळें तो तत्काल पूर्ववत् ब्राह्मण होऊन ऋषींसह पुनः राहूं लागला.
२४ यानंतर माल्यवान् नांवाचा एक मोठा वृद्ध राक्षस रावणाजवळ आला. तो मोठा
बुद्धिमान् आणि नीतिशास्त्रांत निपुण होता. शिवाय तो राजाच्या—रावणाच्या—आईचा
प्रिय पिता होता. २५ त्यानें त्या पराक्रमी राक्षसवीराला—रावणाला—सांगितलें,
‘ राजा ! आतां मी सांगतों, तें शांत चित्तानें ऐकून घे. मग तुला वाटेल, तसें

यथेप्सितम् ॥ २६ ॥ यदा प्रविष्टा नगरीं जानकी रामवल्लभा । तदादि पुर्यां दृश्यंते निमित्तानि दशानन ॥ २७ ॥ घोराणि नाशहेतूनि तानि मे वदतः शृणु । खरस्तनितनिर्घोषा मेघा अतिभयंकराः ॥ २८ ॥ शोणितेनाभिवर्षंति लंकामुष्णेन सर्वदा । रुदंति देवलिंगानि स्विद्यंति प्रचलंति च ॥ २९ ॥ कालिका पांडुरैर्दंतैः प्रहसत्यग्रतः स्थिता । खरा गोषु प्रजायंते मूषका नकुलैः सह ॥ ३० ॥ मार्जारेण तु युध्यंति पन्नगा गरुडेन तु । करालो विकटो मुंडः पुरुषः कृष्णपिंगलः ॥ ३१ ॥ कालो गृहाणि सर्वेषां काले काले त्ववेक्षते । एतान्यन्यानि दृश्यंते निमित्तान्युद्भवंति च ॥ ३२ ॥ अतः कुलस्य रक्षार्थं शांतिं कुरु दशानन । सीतां सत्कृत्य सधनां रामायाशु प्रयच्छ भोः ॥ ३३ ॥ रामं

कर. २६ दशानना ! रामाची प्रिय भार्या जानकी इचा प्रवेश लंकेंत झाला, तेव्हांपासून ह्या नगरीत भयंकर अशी ( अशुभ ) चिन्हें दिसत आहेत. त्यांवरून ही पुरी नाशाला जाणार हें दिसून येत आहे. ती अशुभ चिह्नें कोणती तें सांगतों. आकाशांत भयंकर मेघ गर्दभस्वर काढून गर्जना करितात, २७,२८ व सर्वकाळ लंकेवर उष्ण रक्ताचा वर्षाव करितात. देवांच्या मूर्ति रडतात, घामाघूम होतात, आणि स्थळ सोडतात. २९ कालिका पुढें उभी राहून आपले पांढरे दांत बाहेर काढते आणि हंसत सुटते गाईंच्या पोटीं गर्दभ येतात; उंदीर व मुंगूस मांजरांबरोबर युद्ध करितात, आणि सर्प गरुडाशीं लढतात. क्रूर, भयंकर, मुंडलेला, काळ्या पिंगट वर्णाचा, काळपुरुष सर्वांच्या घरांत वेळोवेळी डोकावतो. ही व दुसरी अनेक दुश्चिह्नें दिसतात व उद्भवतात, ३०,३१,३२ म्हणून हे दशानना ! कुलाच्या रक्षणाकरितां कांहीं शांति कर अरे ! धनासह सत्कारपूर्वक सीता रामाला लवकर नेऊन दे. ३३ राम

१. कालिका-शुंभनिशुंभनामक दैत्यापासून देवास अत्यंत ताप झाला असता ते सर्व पार्वतीकडे गेले आणि त्यांनीं तिची आराधना केली. त्या देवाच्या एकत्रित तेजाचा संचार तिच्या शरीरांत होऊन तीपासून महासरस्वती प्रकट झाली. पुढें तिच्या कवचातून दुसरी देवी प्रकट झाली, ती कालिका होय. ' तस्यां विनिर्गतायां तु कृष्णाभूत् साऽपि पार्वती । कालिकेति समाख्याता हिमालयसमाश्रिता ॥ '-सप्तशती २. सर्व नामांत रामनामच श्रेष्ठ-' परमेश्वरनामानि सन्त्यनेकानि पार्वति । परंतु रामनामेदं सर्वेषामुत्तमोत्तमम् । नारायणादिनामानि कीर्तितानि बहून्यपि । आत्मा तेषां च सर्वेषां रामनामप्रकाशकः ॥ '

नारायणं विद्धि विद्वेषं त्यज राघवे । यत्पादपोतमाश्रित्य ज्ञानिनो
भवसागरम् ॥ ३४ ॥ तरंति भक्तिपूतांतास्ततो रामो न मानुषः ।
भजस्व भक्तिभावेन रामं सर्वहृदालयम् ॥ ३५ ॥ यद्यपि त्वं दुराचारो
भक्त्या पूतो भविष्यसि । मद्वाक्यं कुरु राजेंद्र कुलकौशलहेतवे ॥ ३६ ॥
तत्तु माल्यवतो वाक्यं हितमुक्तं दशाननः । न मर्षयाति दुष्टात्मा कालस्य
वशमागतः ॥ ३७ ॥ मानवं कृपणं राममेकं शाखामृगाश्रयम् । समर्थं
मन्यसे केन हीनं पित्रा मुनिप्रियम् ॥ ३८ ॥ रामेण प्रेषितो नूनं भाषसे
त्वमनर्गलम् । गच्छ वृद्धोऽसि बन्धुस्त्वं सोढं सर्वं त्वयोदितम् ॥ ३९ ॥
इतो मत्कर्णपदवीं दहत्येतद्वचस्तव । इत्युक्त्वा सर्वसचिवैः सहितः
प्रस्थितस्तदा ॥ ४० ॥ प्रासादाग्रे समासीनः पश्यन्वानरसैनिकान् ।
युद्धायायोजयत्सर्वराक्षसान्समुपस्थितान् ॥ ४१ ॥ रामोऽपि धनुरादाय

नारायण आहे, असें समज. त्या राघवाविषयी द्वेषबुद्धि सोडून दे. त्याच्या चरणरूप नौकेचा आश्रय करून ज्ञानी लोकांची अंतःकरणें भक्तीनें पवित्र होतात, आणि ते भव-सागर तरून जातात. राम हा मनुष्य नव्हे. म्हणून सर्वांच्या हृदयांत राहणाऱ्या त्या रामचंद्राचें भक्तिभावेंकरून भजन कर. ३४,३५ जरी तूं दुराचरणी आहेस, तरी भक्तीच्या योगें पवित्र होशील. राजेंद्रा! तुझ्या कुलाचें कल्याण व्हावें, म्हणून माझ्या म्हणण्याप्रमाणें वाग.' ३६ माल्यवानानें असें हितकारक उपदेशाचें भाषण केलें, तरी तें त्या दशाननाला—रावणाला—सहन झालें नाहीं. तो दुष्ट हृदयाचा रावण मृत्यूच्या अधीन झाला होता. ३७ 'राम म्हणजे एक यःकश्चित् दीन मनुष्य, त्याला आधार म्हणजे माकडांचा, त्याला पिताही नाही, त्याला प्रिय म्हणजे ( वनांतील ) मुनि. अशा त्या रामाला तूं समर्थ समजतोस, हें कसें ? ३८ तुला खरोखर रामानें पाठविलें असावें, म्हणून तूं हें असें निष्प्रतिबंधपणें बोलत आहेस. तूं जा; तूं म्हातारा व आमचा आप्त असल्यामुळें तुझें सर्व बोलणें मीं सोशिलें आहे. ३९ ह्या तुझ्या भाषणानें माझ्या कानांची आग करून सोडिली आहे.' असें बोलून व सचिवांसह ( रावण ) तेथून निघून गेला. ४० राजवाड्याच्या शिखरावर बसून व वानरसैनिकांना पाहून, जवळ असलेल्या सर्व राक्षसांना युद्धार्थ सिद्ध होण्याची त्यानें आज्ञा केली. ४१ रामानें देखील लक्ष्मणानें आणलेलें

लक्ष्मणेन समाहृतम् । दृष्ट्वा रावणमासीनं कोपेन कलुषीकृतः ॥४२॥ किरीटिनं समासीनं मंत्रिभिः परिवेष्टितम् । शशांकार्धनिभेनैव बाणेनैकेन राघवः ॥ ४३ ॥ श्वेतच्छत्रसहस्राणि किरीटदशकं तथा । चिच्छेद निमिषार्धेन तदद्भुतमिवाभवत् ॥ ४४ ॥ लज्जितो रावणस्तूर्णं विवेश भवनं स्वकम् । आहूय राक्षसान् सर्वान्प्रहस्तप्रमुखान् खलः ॥ ४५ ॥ वानरैः सह युद्धाय नोदयामास सत्वरः । ततो भेरीमृदंगाद्यैः पणवानकगोमुखैः ॥ ४६ ॥ महिषोष्ट्रैः खरैः सिंहैर्द्वीपिभिः कृतवाहनाः । खड्गशूलधनुःपाशयष्टितोमरशक्तिभिः ॥ ४७ ॥ लक्षिताः सर्वतो लंकां प्रतिद्वारमुपाययुः । तत्पूर्वमेव रामेण नोदिता वानरर्षभाः ॥ ४८ ॥ उद्यम्य गिरिश्रृंगाणि शिखराणि महांति च । तरूंश्चोत्पाट्य विविधान्युद्धाय हरियूथपाः ॥ ४९ ॥ प्रेक्षमाणा रावणस्य तान्यनीकानि भागशः । राघव-

धनुष्य हाती घेतलें. रावणाला ( राजवाड्यावर ) बसलेला पाहून राम क्रोधानें अत्यंत क्षुब्ध झाला. ४२ रावण मुकुट घालून बसला होता, त्याच्या सभोंवती त्याचे मंत्री बसले होते. ( अशा त्या रावणावर ) अर्धचंद्राकार एक बाण टाकून रामानें त्याची हजारों शुभ्र छत्रें आणि दहा मुकुट निमिषार्धांत छेदून टाकिले. तें कृत्य ( सर्वांना ) आश्चर्यकारक वाटलें. ४३,४४ रावण लज्जित होऊन तत्काल आपल्या मंदिरांत गेला. त्या दुष्टानें प्रहस्त वगैरे सर्व राक्षसांना बोलाविलें, ४५ आणि त्वरेनें त्यांना वानरांशी युद्ध करण्याला जाण्याची आज्ञा दिली. लगेच भेरीमृदंगादि, तशींच पणव, आनक, गोमुख वाद्यें वाजूं लागली. ४६ रेडे, उंट, गाढव, सिंह, वाघ या वाहनांवर बसून आणि खड्ग, शूल, धनुष्यें, पाश, यष्टि, तोमर आणि शक्ति ही हत्यारें हातीं घेऊन राक्षस निघाले, ४७ असें सर्वत्र दिसूं लागलें. अशा रीतीनें ते ( राक्षस ) लंकेच्या प्रत्येक वेशीवर येऊन पोंचले. त्याआधींच रामानें आपल्या वानरश्रेष्ठांना ( युद्धार्थ ) निघण्याची आज्ञा केली होती. ४८ त्याप्रमाणें पर्वतांची शृंगें आणि मोठमोठालीं शिखरें, तसेंच नानाप्रकारचे वृक्ष उपटून घेऊन वानरसेनापतिही सज्ज झाले. ४९ ती रावणाची सैन्यें तकड्यातकड्यांनी येत आहेत:

१. हा एक रावणसेनापति होता. २. नौबती ३. पणव, आनक, गोमुख हीं रणवाद्ये आहेत. सदृश उतारा–' ततः शंखाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः ॥ '–भ. गीता. ४. सोटगे बरच्या. ६ भाले.

प्रियकामार्थं लंकामारुरुहुस्तदा ॥ ५० ॥ ते द्रुमैः पर्वताग्रैश्च मुष्टिभिश्च प्लवंगमाः । ततः सहस्रयूथाश्च कोटियूथाश्च यूथपाः ॥ ५१ ॥ कोटीशतयुताश्चान्ये रुरुधुर्नगरं भृशम् । आप्लुवंतः प्लवंतश्च गर्जंतश्च प्लवंगमाः ॥ ५२ ॥ रामो जयत्यतिबलो लक्ष्मणश्च महाबलः । राजा जयति सुग्रीवो राघवेणानुपालितः ॥ ५३ ॥ इत्येवं घोषयंतश्च समं युयुधिरेऽरिभिः । हनूमानंगदश्चैव कुमुदो नील एव च ॥ ५४ ॥ नलश्च शरभश्चैव मैंदो द्विविद एव च । जांबवान्दधिवक्त्रश्च केसरी तार एव च ॥ ५५ ॥ अन्ये च बलिनः सर्वे यूथपाश्च प्लवंगमाः । द्वाराण्युत्प्लुत्य लंकायाः सर्वतो रुरुधुर्भृशम् । तदा वृक्षैर्महाकायाः पर्वताग्रैश्च वानराः ॥ ५६ ॥ निजघ्नुस्तानि रक्षांसि नखैर्दंतैश्च वेगिताः । राक्षसाश्च तदा भीमा द्वारेभ्यः सर्वतो रुषा ॥ ५७ ॥ निर्गत्य भिंदिपालैश्च खड्गैः शूलैः

हें पाहून ( वानरवीर ) रामाचें कल्याण करण्याचे इच्छेनें लंकेवर चढले ५० कोणी हातांत वृक्ष घेतले होते, तर कोणी पर्वतशिखरें घेतली होती; कोणी आपल्या मुष्टी वळून धरल्या होत्या. कोणा सेनापतीचे हाताखाली सहस्र, तर कोणाचे हाताखाली कोटी, शतकोटी असे सेनासमूह होते. अशा प्रकारें त्या सर्वांनी नगराला पूर्ण वेढा घातला. ते वानर वर खालीं सारख्या उड्या मारीत व गर्जना करीत राहिले होते. ५१,५२ ‘ अतिबलवान् रामाचा जयजयकार असो, ’ ‘ महाबलिष्ठ लक्ष्मणाचा जयजयकार असो, ’ ‘ रामानें रक्षण केलेल्या सुग्रीवाचा जयजयकार असो, ’ अशा रीतीनें जयघोष करीत ते शत्रूंबरोबर लढूं लागले. हनुमंत, अंगद, कुमुद, नील, नल, शरभ, मैंद, द्विविद, जांबवान्, दधिवक्त्र, केसरी, तार, आणि दुसरेही बलवंत वानर अशा सर्व सेनापतींनी लंकेच्या वेशीवर उड्या मारल्या, आणि ते चारी बाजूंनीं नगराला पूर्णपणें वेढा घालून राहिले. ५३, ५४, ५५, ५६ त्या प्रचंड शरीराच्या वानरांनी-कांहींनीं मोठ्या वृक्षांनीं आणि पर्वताग्रांनी, तर कित्येकांनीं आपल्या नखांनी आणि दांतांनीं—त्या राक्षसांना मोठ्या त्वेषानें प्रहार केले. तेव्हां त्या महाकाय आणि महाबल अशा भयंकर राक्षसानी क्रोधानें सर्वत्र वेशीबाहेर येऊन गोफणी, तरवारी,

१. ‘ जयतितरा श्रीरामः सुग्रीवो जयति लक्ष्मणो जयति । ऐसें कपि गर्जेति, तों लंका कांपे धरूनियां भय ती. ॥ ’—मोरोपंत.

**परश्वधैः । निजघ्नुर्वानरानीकं महाकाया महाबलाः ॥ ५८ ॥ राक्षसांश्च तथा जघ्नुर्वानरा जितकाशिनः । तदा बभूव समरो मांसशोणितकर्दमः ॥ ५९ ॥ रक्षसां वानराणां च संबभूवाद्भुतोपमः । ते हयैश्च गजैश्चैव रथैः कांचनसंनिभैः ॥ ६० ॥ रक्षोव्याघ्रा युयुधिरे नादयंतो दिशो दश । राक्षसाश्च कपींद्राश्च परस्परजयैषिणः ॥ ६१ ॥ राक्षसान्वानरा जघ्नुर्वानरांश्चैव राक्षसाः । रामेण विष्णुना दृष्टा हरयो दिविजांशजाः ॥ ६२ ॥ बभूवुर्बलिनो हृष्टास्तदा पीतामृता इव । सीताभिमर्शपापेन रावणेनाभिपालितान् ॥ ६३ ॥ हतश्रीकान्हतबलान् राक्षसान् जघ्नुरोजसा । चतुर्थांशावशेषेण निहतं राक्षसं बलम् ॥ ६४ ॥ स्वसैन्यं निहतं दृष्ट्वा मेघनादोऽथ दुष्टधीः । ब्रह्मदत्तवरः श्रीमानंतर्धानं गतोऽसरः ॥ ६५ ॥ सर्वास्त्रकुशलो व्योम्नि ब्रह्मास्त्रेण समंततः ।**

शूल, आणि कुऱ्हाडा यांच्या योगें वानरसैन्यावर मारा केला. ५७, ५८ इकडे त्या जयशील वानरांनीं राक्षसांना इतका मार दिला कीं, त्या रणांगणावर मांस आणि रक्त यांचा सर्वत्र चिखल होऊन राहिला. ५९ हें राक्षसांचें आणि वानरांचें युद्ध इतकें विलक्षण झालें कीं, त्याला उपमाच देतां येणार नाहीं. ते राक्षसश्रेष्ठ, कोणी घोड्यांवर, कोणी हत्तीवर, तर कोणी सुवर्णसदृश रथांत बसून लढत होते. त्यांनी आपल्या गर्जनांनी दाही दिशा भरून टाकिल्या. राक्षस काय आणि वानर काय, दोघे एकमेकांस जिंकण्याची इच्छा धरून राहिले होते. ६०, ६१ वानर राक्षसांना मारीत, त्याचप्रमाणें राक्षसही वानरांना मारीत असत. वानर देवांचे अंशावतार असल्यामुळें, आणि त्यांतही त्या विष्णुरूपी रामचंद्राची त्यांवर ( कृपा ) दृष्टि असल्यामुळें, ते अमृत प्राशन केल्याप्रमाणें बलवान् आणि आनंदी झाले होते. उलट पक्षी राक्षसांचा पालक रावण होता, तरी त्यानें सीतेचें हरण हें पापकर्म केल्यामुळें त्यांचें तेज आणि त्यांची वीरश्री नष्ट झाली होती. अशा त्या राक्षसांचा ( वानरांनीं ) रणांत पराक्रमानें लढून वध केला. शेवटीं सर्व राक्षससैन्याचा चवथा भाग अवशिष्ट राहिला, इतका त्याचा नाश झाला. ६२,६३,६४ आपलें सैन्य मारिलेलें पाहून ब्रह्मदेवाच्या वरानें वीरश्री पावलेला दुष्टबुद्धीचा मेघनाद[1] अंतर्धान पावला.६५ आकाशांतून चारी बाजूंनीं ब्रह्मास्त्रासह नाना प्रकारचीं शस्त्रें सोडून तो वानरसैन्याला

१. रावणाचा ज्येष्ठ पुत्र इंद्रजित्, ह्याने इंद्राला बांधून लंकेत नेलं होतं.

नानाविधानि शस्त्राणि वानरानीकमर्दयन् ।। ६६ ।। ववर्ष शरजाला
तदद्भुतमिवाभवत् । रामोऽपि मानयन्ब्राह्ममस्त्रमस्त्रविदां वरः ।। ६७
क्षणं तूष्णीमुवासाथ ददर्श पतितं बलम् । वानराणां रघुश्रेष्ठश्चुकोपानल
सन्निभः ।। ६८ ।। चापमानय सौमित्रे ब्रह्मास्त्रेणासुरं क्षणात् । भस्म
करोमि मे पश्य बलमद्य रघूत्तम ।। ६९ ।। मेघनादोऽपि तच्छ्रुत्वा राम
वाक्यमतंद्रितः । तूर्णं जगाम नगरं मायया मायिकोऽसुरः ।। ७०
पतितं वानरानीकं दृष्ट्वा रामोऽतिदुःखितः । उवाच मारुतिं शीघ्रं गत
क्षीरमहोदधिम् ।। ७१ ।। तत्र द्रोणगिरिर्नाम दिव्यौषधिसमुद्भवः । तम
नय द्रुतं गत्वा संजीवय महामते ।। ७२ ।। वानरौघान्महासत्त्वान्कीर्तिर
सुस्थिरा भवेत् । आज्ञाप्रमाणमित्युक्त्वा जगामानिलनंदनः ।। ७३
आनीय च गिरिं सर्वान्वानरान्वानरर्षभः । जीवयित्वा पुनस्तत्र स्थाप

पीडा देऊं लागला. सर्व अस्त्रविद्येंत तो कुशल होता. ६६ त्यानें बाणांची वृ सारखी चालविली. तो देखावा सर्वांना अत्यंत आश्चर्यकारक वाटला. इकडे अस्त्र वेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असा तो श्रीराम ब्रह्मास्त्राला मान देण्यासाठीं म्हणून क्षणभर स्वस बसला, तों वानरसैन्य पतन पावल्याचें त्याला दिसून आलें. त्यामुळें तो इतका क्रु झाला कीं, तो अग्नीसारखा लाल झाला. ६७,६८ ( तो लक्ष्मणाला म्हणाला, ) 'लक्ष्मणा धनुष्य आण[1]; ब्रह्मास्त्राच्या योगें या राक्षसाला एका क्षणांत भस्म करून टाकितो हे रघूत्तमा ( लक्ष्मणा )! माझें सामर्थ्य केवढें आहे, तें आज पहा!' ६९ रामा भाषण त्या कपटी मायावी राक्षसानें ऐकिलें, आणि तो लागलाच सावधपणें नगरां पातला. ७० वानरसैन्य पडलेलें पाहून रामाला अत्यंत दुःख झालें. तो मारुतीस म्हणाला, 'क्षीरमहासागरावर लवकर जा. ७१ तेथें द्रोणगिरि नांवाचा पर्वत असून त्याव अनेक दिव्य औषधींची उत्पत्ति आहे. लवकर जा, आणि त्या पर्वताला घेऊन ये, आणि हे महाबुद्धिमंता ( मारुते )! या महापराक्रमी वानरसैन्याला जीवंत कर. असें केल्यां तुझी कीर्ति (जगांत ) चिरकाल स्थिर राहील.' 'आपली आज्ञा प्रमाण,' असें म्हणून तो वायुपुत्र तेथून निघाला. ७२, ७३ त्या वानरश्रेष्ठानें ( द्रोणागिरि ) आणिला, सर्व वानरांना जीवंत केलें, आणि जागच्या जागी पुनः पर्वताची स्थापना करून तो लागला

१. या वेळीं रामाच्या हातांत धनुष्य होतें. तथापि क्रोधाच्या भरांत त्याला भान राहिलें नसल्यामुळें तो लक्ष्मणाला ' धनुष्य आण, ' म्हणून सांगत आहे.

यित्वा ययौ द्रुतम् ॥ ७४ ॥ पूर्ववद्भैरवं नादं वानराणां बलौघतः । श्रुत्वा विस्मयमापन्नो रावणो वाक्यमब्रवीत् ॥ ७५ ॥ राघवो मे महान् शत्रुः प्राप्तो देवविनिर्मितः । हंतुं तं समरे शीघ्रं गच्छंतु मम यूथपाः ॥७६॥ मंत्रिणो बांधवाः शूरा ये च मत्प्रियकांक्षिणः । सर्वे गच्छंतु युद्धाय त्वरितं मम शासनात् ॥ ७७ ॥ ये न गच्छंति युद्धाय भीरवः प्राण-विप्लवात् । तान्हनिष्याम्यहं सर्वान्मच्छासनपराङ्मुखान् ॥७८॥ तच्छ्रुत्वा भयसंत्रस्ता निर्जग्मू रणकोविदाः । अतिकायः प्रहस्तश्च महानादमहोदरौ ॥ ७९ ॥ देवशत्रुर्निकुंभश्च देवांतकनरांतकौ । अपरे बलिनः सर्वे ययुर्युद्धाय वानरैः ॥ ८० ॥ एते चान्ये च बहवः शूराः शतसहस्रशः । प्रविश्य वानरं सैन्यं ममंथुर्बलदर्पिताः ॥ ८१ ॥ भुशुंडीभिंदिपालैश्च बाणैः खड्गैः परश्वधैः । अन्यैश्च विविधैरस्त्रैर्निजघ्नुर्हरियूथपान् ॥ ८२ ॥

परत आला. ७४ वानरांच्या सेनासमूहाची पूर्ववत् गर्जना ऐकून रावणाला विस्मय वाटला, आणि तो म्हणाला, ७५ 'देवांनी निर्माण केलेला माझा मोठा शत्रु राघव-रामचंद्र-येथें प्राप्त झाला आहे. त्याला समरांगणी मारण्याकरितां माझे सेनापतींनी त्वरित निघावें. ७६ माझे मंत्री, माझे बांधव, आणि माझें प्रिय व्हावें अशी इच्छा करणारे जे कोणी शूर पुरुष असतील, त्या सर्वांनी युद्धाला त्वरित निघून जावें, अशी माझी आज्ञा आहे. ७७ प्राणनाश होईल, या भीतीनें जे कोणी युद्धाला जाणार नाहीत, त्या माझी आज्ञा मोडणाऱ्या सर्वांचा मी वध करीन.' ७८ तें ऐकून सर्व युद्धनिपुण राक्षस भयभीत होऊन लढण्याकरितां निघाले. अतिकाय, प्रहस्त, महानाद, महोदर, देवशत्रु, निकुंभ, देवांतक, नरांतक, आणि दुसरेही सर्व बलसंपन्न राक्षस वानरांशी युद्ध करण्याकरितां निघाले. ७९, ८० हे आणि आपल्या बलाचा अभिमान बाळगणारे दुसरेही पुष्कळ शेंकडों हजारों शूर (राक्षस) वानरसेनेंत शिरून तिचा नाश करीत सुटले. ८१ भुशुंडींनी, गोफणीनीं, बाणांनी, तरवारीनी, कुऱ्हाडीनीं आणि दुसऱ्या अनेक प्रकारच्या अस्त्रांनी त्यांनी वानरसेनापतींवर मारा केला. ८२

१ या रावणसेनेचें मोरोपंतांनीं केलेले वर्णनः—' निशिचरनायकबल हें चतुरग सुरासुरांसि अनिवार, । यात सहस्र सहस्रांचि एकैकाचा स्वकीय परिवार. ॥ '—मं. रामायण.
२. एक अस्त्र.

ते पादपैः पर्वताग्रैर्नखदंष्ट्रैश्च मुष्टिभिः । प्राणैर्विमोचयामासुः सर्वराक्षसयूथपान् ॥ ८३ ॥ रामेण निहताः केचित्सुग्रीवेण तथापरे । हनूमता चांगदेन लक्ष्मणेन महात्मना । यूथपैर्वानराणां ते निहताः सर्वराक्षसाः ॥८४॥ रामतेजः समाविश्य वानरा बलिनोऽभवन् । रामशक्तिविहीनानामेवं शक्तिः कुतो भवेत् ॥ ८५ ॥ सर्वेश्वरः सर्वमयो विधाता मायामनुष्यत्वविडंबनेन । सदा चिदानंदमयोऽपि रामो युद्धादिलीलां वितनोति मायाम् ॥ ८६ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकांडे पंचमः सर्गः ॥ ५ ॥

## युद्धकांड, सर्ग सहावा.

श्रीमहादेव उवाच ॥ श्रुत्वा युद्धे बलं नष्टमतिकायमुखं महत् । रावणो दुःखसंतप्तः क्रोधेन महता वृतः ॥ १ ॥ निधायेंद्रजितं लंकार-

त्यां ( वानरां )नीहीं वृक्षांनीं, पर्वताग्रांनी, आपल्या नखांनी, दाढांनी, आणि मुष्टिप्रहारांनी सर्व राक्षससेनापतींचे प्राण हरण केले. ८३ कित्येक राक्षसांचा वध रामानें केला, कित्येकांचा सुग्रीवानें केला, तर कांहींचा मारुतीनें, कांहींचा अंगदानें, तर कांहींचा महापराक्रमी लक्ष्मणानें वध केला. अशा प्रकारें सर्व राक्षस वानरसेनापतींकडून मारिले गेले. ८४ रामतेजाचा संचार अंगांत झाल्यामुळें ते वानर बलाढ्य झाले होते, हें तेज—सामर्थ्य—रामाकडून त्यांस प्राप्त झालें नसतें, तर त्यांना इतकी शक्ति कोठून आली असती? ८५ राम हा सर्वेश्वर, सर्वरूपी, सृष्टिकर्ता होय. तो नित्य चैतन्यघन आणि आनंदमय आहे, तरी मायेनें मनुष्यरूपाचें अनुकरण करून युद्धादिलीलारूप आपली माया विस्तारीत आहे. ८६ ”

**युद्धकांड, अध्याय पांचवा समाप्त.**

श्रीमहादेव म्हणाला, “ अतिकायादिकांचें तें सर्व प्रचंड सैन्य युद्धात पतन पावल्याचें ऐकून रावण दुःखसंतप्त होऊन गेला. त्याचा क्रोध अनावर झाला. १ त्या महातेजस्वी राक्षसानें—रावणानें—लंकेच्या रक्षणाकरितां इंद्रजिताची योजना

१. अतिकाय हा एक रावणपुत्र होता. हा लक्ष्मणाचे हातून मारला गेला.

क्षणार्थं महाद्युतिः। स्वयं जगाम युद्धाय रामेण सह राक्षसः॥ २॥ दिव्यं स्यंदनमारुह्य सर्वशस्त्रास्त्रसंयुतम्। राममेवाभिदुद्राव राक्षसेंद्रो महाबलः॥ ३॥ वानरान्बहुशो हत्वा बाणैराशीविषोपमैः। पातयामास सुग्रीवप्रमुखान्यूथनायकान्॥४॥गदापाणिं महासत्त्वं तत्र दृष्ट्वा विभीषणम्। उत्ससर्ज महाशक्तिं मयदत्तां विभीषणे॥ ५॥ तामापतंतीमालोक्य विभीषणविघातिनीम्। दत्ताभयोऽयं रामेण वधार्हो नायमासुरः॥ ६॥ इत्युक्त्वा लक्ष्मणो भीमं चापमादाय वीर्यवान्। विभीषणस्य पुरतः स्थितोऽकंप इवाचलः॥७॥ सा शक्तिर्लक्ष्मणतनुं विवेशामोघशक्तितः। यावंत्यः शक्तयो लोके मायायाः संभवंति हि॥ ८॥ तासामाधारभूतस्य लक्ष्मणस्य महात्मनः। मायाशक्त्या भवेत्किं वा शेषांशस्य हरेस्तनोः॥ ९॥ तथापि मानुषं भावमापन्नस्तदनुव्रतः। मूर्च्छितः पतितो भूमौ तमादातुं दशाननः॥ १०॥ हस्तैस्तोलयितुं शक्तो न बभूवातिवि-

करून तो आपण स्वतः रामाबरोबर लढण्याकरितां निघाला. २ सर्व शस्त्रास्त्रांनी युक्त अशा दिव्य रथावर आरूढ होऊन, तो महाबलवान् राक्षसराज रामावर चालून गेला. सर्पांसारखे (विषारी) बाण टाकून त्यानें अनेक वानरांना ठार केलें, आणि सुग्रीवादि सेनानायकांना जमिनीवर लोळविलें. ४ तेथें महासामर्थ्यवान् विभीषण हातांत गदा घेऊन (लढण्याला) आलेला पाहून (रावणानें) त्याजवर मयासुरानें[1] दिलेली महाशक्ति सोडिली. ५ विभीषणाचा घात करण्यासाठीं येणारी ती शक्ति पाहून 'ह्याला रामानें अभय दिलें आहे, हा असुर वधाला योग्य नाहीं.' ६ असें म्हणून तो वीर्यशाली लक्ष्मण भयंकर धनुष्य घेऊन विभीषणाच्या पुढें पर्वता-सारखा निश्चळ उभा राहिला. ७ ती शक्ति अमोघ सामर्थ्याची–कधींही व्यर्थ न जाणारी–होती. ती लक्ष्मणाच्या शरीरांत शिरली. मायेपासून निर्माण होणाऱ्या जितक्या शक्ति जगांत आहेत, त्या सर्वांचा आधार महात्मा लक्ष्मण होता. कारण, तो शेषांश असून परमेश्वराची विभूति होता. त्यापुढें त्या मायाशक्तीचें सामर्थ्य काय चालणार? ८, ९ तथापि धारण केलेल्या मनुष्यरूपास अनुकूल असें वर्तन ठेवणें योग्य असल्यामुळें मूर्च्छित होऊन तो जमिनीवर पडला. इतक्यांत रावण त्याला उचलण्याला पाहूं लागला. १० त्यानें हातांनीं त्याला तोलून धरण्याचा

1. मयासुर–रावणाचा सासरा व मंदोदरीचा बाप. हा राक्षसांचा शिल्पी होता.

स्मितः । सर्वस्य जगतः सारं विराजं परमेश्वरम् ॥ ११ ॥ कथं लोका-
श्रयं विष्णुं तोलयेल्लघुराक्षसः । ग्रहीतुकामं सौमित्रिं रावणं वीक्ष्य
मारुतिः ॥ १२ ॥ आजघानोरसि क्रुद्धो वज्रकल्पेन मुष्टिना । तेन मुष्टि-
प्रहारेण जानुभ्यामपतद्भुवि ॥ १३ ॥ आस्यैश्च नेत्रश्रवणैरुद्वमन् रुधिरं
बहु । विघूर्णमाननयनो रथोपस्थ उपाविशत् ॥ १४ ॥ अथ लक्ष्मण-
मादाय हनूमान् रावणार्दितम् । आनयद्रामसामीप्यं बाहुभ्यां परिगृह्य
तम् ॥ १५ ॥ हनूमतः सुहृत्त्वेन भक्त्या च परमेश्वरः । लघुत्वमगम-
द्देवो गुरूणां गुरुरप्यजः ॥ १६ ॥ सा शक्तिरपि तं त्यक्त्वा ज्ञात्वा
नारायणांशजम् । रावणस्य रथं प्रागाद्रावणोऽपि शनैस्ततः ॥ १७ ॥
संज्ञामवाप्य जग्राह बाणासनमथो रुषा । राममेवाभिदुद्राव दृष्ट्वा रामोऽपि
तं क्रुधा ॥ १८ ॥ आरुह्य जगतां नाथो हनूमंतं महाबलम् । रथस्थं

प्रयत्न केला, तरी तो हालेना, हें पाहून रावणाला अत्यंत विस्मय वाटला. जो सर्व जगाचें सार, विराट्रूपी परमेश्वर, सर्व लोकांचा आधार अशा त्या ( लक्ष्मणरूप ) विष्णूला तो क्षुद्र राक्षस कसा बरें उचलूं शकणार ? लक्ष्मणाला रावण धरूं इच्छित आहे, हें मारुतीनें पाहिलें, ११,१२ तेव्हां त्यानें क्रुद्ध होऊन आपल्या वज्रतुल्य मुष्टीच्या योगें रावणाच्या वक्षःस्थलावर प्रहार केला. त्यामुळें तो ( रावण ) गुड-घ्यांवर पडला. १३ त्याच्या ( दहा ) तोंडांतून, डोळ्यांतून, आणि कानातून सारखें रक्त वाहूं लागलें. तो डोळे फिरवूं लागला. ( अशा स्थितीत ) तो रथांत जाऊन बसला. १४ इकडे रावणानें जखमी केलेल्या लक्ष्मणाला हनुमंतानें बाहूंनी उचलून धरून रामाजवळ आणिलें. १५ तो अजन्मा परमेश्वर ( लक्ष्मण ) सर्व जड पदा-र्थांत अतिशय जड–वजनदार–असूनही हनुमंताच्या प्रेमामुळें आणि भक्तीमुळें हलका झाला. १६ ( लक्ष्मण ) हा नारायणांशभूत आहे, असें जाणून ती शक्ति त्या ( लक्ष्मणा ) ला टाकून रावणाच्या रथाकडे परतली. नंतर रावणही हळूहळू शुद्धीवर आला. त्यानें रागानें लागलेंच धनुष्य ( हातीं ) घेतलें, आणि तो रामावर चालून गेला. त्याला पाहून रामालाही क्रोध आला. १७,१८ त्या रथांत बसलेल्या रावणाला पाहून, तो जगन्नाथ राघव–राम–महाबलवान् हनुमंताच्या खांद्यावर बसला,

१. ज्या परमेश्वराचें विराट्–स्थूल जग–हें रूप आहे. २. ' महतो महीयान्, '

रावणं दृष्ट्वा अभिदुद्राव राघवः ॥ १९ ॥ ज्याशब्दमकरोत्तीव्रं वज्रनिष्पेषनिष्ठुरम् । रामो गंभीरया वाचा राक्षसेंद्रमुवाच ह ॥ २० ॥ राक्षसाधम तिष्ठाद्य क्व गमिष्यसि मे पुरः । कृत्वापराधमेवं मे सर्वत्र समदर्शिनः ॥ २१ ॥ येन बाणेन निहता राक्षसास्ते जनालये । तेनैव त्वां हनिष्यामि तिष्ठाद्य मम गोचरे ॥ २२ ॥ श्रीरामस्य वचः श्रुत्वा रावणो मारुतात्मजम् । वहंतं राघवं संख्ये शरैस्तीक्ष्णैरताडयत् ॥ २३ ॥ हतस्यापि शरैस्तीक्ष्णैर्वायुसूनोः स्वतेजसा । व्यवर्धत पुनस्तेजो ननर्द च महाकपिः ॥ २४ ॥ ततो दृष्ट्वा हनूमंतं सव्रणं रघुसत्तमः । क्रोधमाहारयामास कालरुद्र इवापरः ॥ २५ ॥ साश्वं रथं ध्वजं सूतं शस्त्रौघं धनुरंजसा । छत्रं पताकां तरसा चिच्छेद शितसायकैः ॥ २६ ॥ ततो महाशरेणाशु रावणं रघुसत्तमः । विव्याध वज्रकल्पेन पाकारिरिव पर्वतम् ॥ २७ ॥ रामबाणहतो वीरश्चचाल च मुमोह च । हस्तान्निपति-

आणि (रावणावर) चाल करून गेला. १९ धनुष्याच्या दोरीचा टणत्कार करून विजेच्या कडकडाटासारख्या कठोर नादांत गंभीर वाणीनें राम त्या राक्षसाधिपतीला म्हणाला, २० 'राक्षसाधमा! थांब; आतां माझ्या पुढून तूं कोठें जाशील? माझी सर्वत्र समदृष्टि असूनही तूं माझा भयंकर अपराध केला आहेस. २१ जनस्थानीं[1] तुझे राक्षस ज्या बाणानें मारिले, त्याच बाणानें आज तुझा वध करितों. मजसमोर उभा रहा.' २२ श्रीरामाचें भाषण ऐकून, रावणानें युद्धांत रामाला (खांद्यावर) वाहून नेणाऱ्या मारुतीवर तीक्ष्ण बाणांचे प्रहार केले. २३ त्या तीक्ष्ण बाणांनी मारुति घायाळ झाला, तरी त्याचें तेज त्याच्या स्वतःच्या वीर्यामुळें (कमी न होतां) वाढतच गेलें. त्या महाकपीनें मोठ्यानें गर्जना केली. २४ हनुमंताला व्रण झाले आहेत, असें पाहतांच त्या रघुश्रेष्ठा(रामा)ला इतका संताप झाला कीं, हा दुसरा कालरुद्रच[2] आहे कीं काय, असें (सर्वांस) वाटलें. २५ त्यानें तीक्ष्ण बाण सोडून रावणाचा रथ, घोडे, ध्वज, सारथि, शस्त्रसमूह, धनुष्य, छत्र, पताका ही सर्व हांहां म्हणतां क्षणांत तोडून टाकिलीं. २६ नंतर इंद्रानें पर्वतावर, त्याप्रमाणें रघुवीरानें तत्काल रावणावर वज्रासारखा महाबाण टाकून त्याला जर्जर केलें. २७ रामबाणानें विद्ध झालेला (रावण) वीर कांपूं लागला. त्याला मूर्च्छा आली. त्याच्या हातांतून धनुष्य

१. दंडकारण्याचा भाग. २ प्रलयकालचा रुद्र.

तश्चापस्तं समीक्ष्य रघूत्तमः ॥ २८ ॥ अर्धचंद्रेण चिच्छेद तत्किरीटं रविप्रभम् । अनुजानामि गच्छ त्वमिदानीं बाणपीडितः ॥२९॥ प्रविश्य लंकामाश्वास्य श्वः पश्यसि बलं मम । रामबाणेन संविद्धो हतदर्पोऽथ रावणः ॥ ३० ॥ महत्या लज्जया युक्तो लंकां प्राविशदातुरः । रामोऽपि लक्ष्मणं दृष्ट्वा मूर्च्छितं पतितं भुवि ॥ ३१ ॥ मानुषत्वमुपाश्रित्य लीलयानुशुशोच ह । ततः प्राह हनूमंतं वत्स जीवय लक्ष्मणम् ॥ ३२ ॥ महौषधीः समानीय पूर्ववद्वानरानपि । तथेति राघवेणोक्तो जगामाशु महाकपिः ॥ ३३ ॥ हनूमान्वायुवेगेन क्षणात्तीर्त्वा महोदधिम् । एतस्मिन्नंतरे चारा रावणाय न्यवेदयन् ॥३४॥ रामेण प्रेषितो देव हनूमान् क्षीरसागरम् । गतो नेतुं लक्ष्मणस्य जीवनार्थं महौषधीः ॥ ३५ ॥ श्रुत्वा तच्चारवचनं राजा चिंतापरोऽभवत् । जगाम रात्रावेकाकी कालनेमिगृहं

गळून पडले. त्याला ( त्या स्थितींत ) पाहून रघूत्तमा( रामा )नें एक अर्धचंद्राकार बाण टाकून त्याचा सूर्यासारखा तेजस्वी मुकुट तोडून टाकिला, ( आणि त्याला म्हटलें ) ' 'तूं आतां बाणानें विद्ध झाला आहेस. तुला मी जाण्याला परवानगी देतों. २८,२९ लंकेंत जाऊन एक दिवस विश्रांति घे, म्हणजे उद्यां माझें बल काय आहे, तें पाहशील.' रामाच्या बाणानें जर्जर झालेल्या रावणाचा ( अशा रीतीनें ) गर्व उतरल्यावर, ३० त्याला मोठी लाज वाटली. तो व्याकुळ होऊन लंकेंत गेला. लक्ष्मण मूर्च्छित होऊन जमिनीवर पडला आहे, हें पाहून रामही स्वीकारलेल्या मनुष्यस्वभावाला अनुसरून शोक करूं लागला. नंतर तो मारुतीला म्हणाला, 'वत्सा ! पूर्वीप्रमाणें दिव्य औषधी आण, आणि लक्ष्मणाला आणि वानरांना जीवंत कर.' रामानें असें सांगितल्यावर 'ठीक आहे,' असें बोलून तो महाकपि मारुति तत्काल निघाला. ३१,३२,३३ क्षणमात्रांत मारुति वायुवेगानें महासागर ओलांडून गेला. इतक्यांत हेरांनी येऊन रावणाला कळविलें कीं, ३४ 'देवा ! लक्ष्मणाला जीवंत उठविण्यासाठी म्हणून महौषधि आणण्याकरितां रामानें पाठविलेला हनुमान् क्षीरसमुद्राकडे गेला आहे.' ३५ तें हेरांचें भाषण ऐकून राजा ( रावणा )ला मोठी चिंता लागून राहिली. तो तत्काल रात्रीच्या वेळीं एकटाच

१. सदृश वर्णनः—'पाप विगतश्री तूं झालासि, सदा जगद्विनाशरत, । शरतल्पीं तुज निज विन, परत खळा ! त्वरित हो रणोपरत. ॥ '—मोरोपंत, मंत्ररामायण.

क्षणात् ॥ ३६ ॥ गृहागतं समालोक्य रावणं विस्मयान्वितः । कालनेमिरुवाचेदं प्रांजलिर्भयविह्वलः । अर्घ्यादिकं ततः कृत्वा रावणस्याग्रतः स्थितः ॥ ३७ ॥ किं ते करोमि राजेंद्र किमागमनकारणम् । कालनेमिमुवाचेदं रावणो दुःखपीडितः ॥ ३८ ॥ ममापि कालवशतः कष्टमेतदुपस्थितम् । मया शक्त्या हतो वीरो लक्ष्मणः पतितो भुवि ॥ ३९ ॥ तं जीवयितुमानेतुमोषधीर्हनुमान् गतः । यथा तस्य भवेद्विघ्नं तथा कुरु महामते ॥ ४० ॥ मायया मुनिवेषेण मोहयस्व महाकपिम् । कालात्ययो यथा भूयात्तथा कृत्वेहि मंदिरे ॥ ४१ ॥ रावणस्य वचः श्रुत्वा कालनेमिरुवाच तम् । रावणेश वचो मेऽद्य शृणु धारय तत्त्वतः ॥ ४२ ॥ प्रियं ते करवाण्येव न प्राणान् धारयाम्यहम् । मारीचस्य यथारण्ये पुराभून्मृगरूपिणः ॥४३॥ तथैव मे न संदेहो भविष्यति दशानन । हताः

कालनेमीच्या घरीं गेला. ३६ घरी आलेल्या रावणाला पाहून कालनेमीला आश्चर्य वाटलें. त्यानें अर्घ्यादिक उपचार रावणाला अर्पण केले, आणि नंतर भयभीत होत्साता रावणापुढें उभा राहून आणि हात जोडून म्हणाला, ३७ 'राजेंद्रा ! मी तुमचें कोणतें कार्य केलें पाहिजे ? आपण कशाकरितां आलां ?' त्यावर तो दुःखपीडित रावण कालनेमीला म्हणाला, ३८ 'कालवशेंकरून मजवरही आपत्ति आली आहे ! ती अशी की, माझ्या शक्तीनें लक्ष्मण घायाळ होऊन जमिनीवर पडला. ३९ त्याला जीवंत करण्यासाठी ओषधी आणण्याकरितां हनुमान् गेला आहे. तरी जेणेंकरून त्याला विघ्न होईल, असें कर. तूं मोठा बुद्धिमान् आहेस. ४० कपटानें मुनिवेष धारण करून तूं त्या महावानराला मोहित कर, आणि जेणेंकरून त्याला जाण्याला विलंब होईल असें कर. मग तूं आपल्या मंदिरीं परत ये.' ४१ रावणाचें भाषण ऐकून कालनेमि त्याला म्हणाला, 'राजा रावणा ! मी आपणांला सांगतों, तें ऐका, आणि खरें समजून लक्ष्यांत ठेवा. ४२ आपल्याला प्रिय असेल, तें मी करीन. आपल्याकरितां प्राणही वेंचीन, परंतु हरणाचें रूप धारण करून अरण्यांत गेलेल्या मारीचाची पूर्वीं जी स्थिति झाली, ४३ तीच माझी स्थिति होणार, यांत संशय नाहीं. हे दशानना ! आपले

१. कालनेमि हा रावणाचा चुलता होता. मारुतीचा वध करण्याचे कामीं रावणानें याची योजना केली होती. २. मारीचाची कथा अरण्यकांड, सर्ग ७ यांत आली आहे.

पुत्राश्च पौत्राश्च बांधवा राक्षसाश्च ते ॥ ४४ ॥ घातयित्वाऽसुरकुलं जीवितेनापि किं तव । राज्येन वा सीतया वा किं देहेन जडात्मना ॥ ४५ ॥ सीतां प्रयच्छ रामाय राज्यं देहि विभीषणे । वनं याहि महाबाहो रम्यं मुनिगणाश्रयम् ॥ ४६ ॥ स्नात्वा प्रातः शुभजले कृत्वा संध्यादिकाः क्रियाः । तत एकांतमाश्रित्य सुखासनपरिग्रहः ॥ ४७ ॥ विसृज्य सर्वतः संगमितरान्विषयान्बहिः । बहिःप्रवृत्ताक्षगणं शनैः प्रत्यक् प्रवाहय ॥ ४८ ॥ प्रकृतेर्भिन्नमात्मानं विचारय सदानघ । चराचरं जगत्कृत्स्नं देहबुद्धींद्रियादिकम् ॥ ४९ ॥ आब्रह्मस्तंबपर्यंतं दृश्यते श्रूयते च यत् । सैषा प्रकृतिरित्युक्ता सैव मायेति कीर्तिता ॥ ५० ॥ सर्गस्थितिविनाशानां जगद्वृक्षस्य कारणम् । लोहितश्वेतकृष्णादि प्रजाः सृजति सर्वदा ॥ ५१ ॥ कामक्रोधादिपुत्राद्यान्हिंसातृष्णादिकन्यकाः । मोहय-

पुत्र, पौत्र, बांधव वगैरे अनेक राक्षस मारले गेले. ४३,४४ राक्षसकुलाचा नाश करवून तुम्हांला जगायाचें तरी कशाकरितां ? राज्य, सीता किंवा जडस्वरूपी देह ही तुम्हांला कोणत्या कामाला येणार आहेत ? ४५ रामाला सीता नेऊन द्या, आणि राज्य विभीषणाला द्या. महाबाहो ( रावणा ) ! मुनिगणांनीं आश्रय केलेल्या रम्य वनांत राहण्याला तुम्ही जा. ४६ प्रातःकाळी पवित्र उदकांत स्नान करा. संध्यादिक क्रिया आचरा, आणि नंतर एकांतांत सुखासन घालून बसा. ४७ सर्व आसक्ति सोडून द्या, इतर विषयांना दूर करा, बाहेरील विषयांकडे ओढ घेणाऱ्या इंद्रियसमूहाला हळूहळू अंतर्मुख वळवून घ्यां. ४८ हे अनघा ! आत्मा प्रकृतीहून भिन्न आहे, ह्याचा नित्य विचार करा. देह, बुद्धि, इंद्रियें इत्यादि स्थावरजंगमात्मक सर्व जग, ४९ ब्रह्मदेवापासून तों अतिसूक्ष्म कीटकापर्यंत जें म्हणून दृष्टीला पडतें, अथवा ऐकण्यांत येतें, तें सर्व ही प्रकृति होय. तिलाच 'माया' असें म्हटलें आहे. ५० जगद्वृक्षाच्या उत्पत्तिस्थितिसंहारांना कारण म्हणजे प्रकृतिच होय. तीच रक्त, श्वेत, आणि कृष्ण ( वर्णांच्या ) प्रजा निर्माण करीत असते. ५१ कामक्रोधादिक हे तिचे पुत्र असून हिंसा, तृष्णा वगैरे कन्या आहेत. आत्मा व्यापक व ज्ञानरूप आहे, तरी

१. मृत्तिकारूपी. २. तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेंद्रियक्रियः । उपविश्यासने युंज्याद्योगमात्मविशुद्धये ॥'–गीता ६. ३. रक्त–तांबड्या (राजस), श्वेत–पांढऱ्या ( सात्विक ), कृष्ण–काळ्या ( तामस ).

त्यनिशं देवमात्मानं स्वैर्गुणैर्विभुम् ॥ ५२ ॥ कर्तृत्वभोक्तृत्वमुखान् स्वगुणानात्मनीश्वरे । आरोप्य स्ववशं कृत्वा तेन क्रीडति सर्वदा ॥५३॥ शुद्धोऽप्यात्मा यया युक्तः पश्यतीव सदा बहिः । विस्मृत्य च स्वमात्मानं मायागुणविमोहितः ॥ ५४ ॥ यदा सद्गुरुणा युक्तो बोध्यते बोधरूपिणा । निवृत्तदृष्टिरात्मानं पश्यत्येव सदा स्फुटम् ॥५५॥ जीवन्मुक्तः सदा देही मुच्यते प्राकृतैर्गुणैः । त्वमप्येवं सदात्मानं विचार्य नियतेंद्रियः ॥ ५६ ॥ प्रकृतेरन्यमात्मानं ज्ञात्वा मुक्तो भविष्यसि । ध्यातुं यद्यसमर्थोऽसि सगुणं देवमाश्रय ॥५७॥ हृत्पद्मकर्णिके स्वर्णपीठे मणिगणान्विते । मृदुश्लक्ष्णतरे तत्र जानक्या सह संस्थितम् ॥ ५८ ॥ वीरासनं विशालाक्षं विद्युत्पुंजनिभाम्बरम् । किरीटहारकेयूरकौस्तुभादिभिरन्वितम् ॥ ५९ ॥ नूपुरैः कटकैर्भातं तथैव वनमालया । लक्ष्मणेन धनुर्द्वद्वकरेण परि-

ही त्याला आपल्या गुणांनी सृष्टि उत्पन्न करून त्यायोगे नित्य मोहितें करिते. ५२ आत्म्यावर कर्ता, भोक्ता इत्यादि आपलीं सर्व लक्षणें आरोपून ही त्याला आपल्या स्वाधीन करून घेते, आणि त्याच्याबरोबर सर्वदा क्रीडा करीत असते. ५३ आत्मा वास्तविक शुद्ध आहे, तरीही तिचा—प्रकृतीचा—समागम घडला असतां मायेच्या गुणांनी मोहित होऊन तो स्वस्वरूप विसरून जातो, आणि सदा बहिर्मुख होतो,—बाह्य विषय भोगू लागतो. ५४ पुढें ज्ञानरूप सद्गुरूची गांठ पडून जेव्हां त्याला त्याकडून बोध केला जातो, तेव्हां त्याची दृष्टि विषयांपासून पराङ्मुख होते आणि शुद्ध आत्मस्वरूप त्याच्या नित्य दृष्टीस पडतें. ५५ अशा रीतीनें प्राणी देहीच जीवन्मुक्त होऊन प्रकृतीच्या गुणांपासून मुक्त होतो. म्हणून ( रावणा ! ) तूं देखील इंद्रियदमन करून आत्मविचार करीत रहा. ५६ आत्मा प्रकृतीहून निराळा आहे, हें ज्ञान झाल्यानें तूं मुक्त होशील. आतां असें ध्यान करण्याला तूं असमर्थ असशील, तर सगुण देवस्वरूपाचा आश्रय कर. ५७ हृदयकमलाच्या गाभ्यांत रत्नगणांनीं जडित, मृदु आणि स्निग्ध अशा सुवर्णसिंहासनावर जानकीसह राम बसला आहे, ५८ त्यानें वीरासन घातलें आहे, त्याचे नेत्र विशाल आहेत, त्याचें वस्त्र विद्युल्लतापुंजासारखें आहे, त्याच्या शरीरावर किरीट, हार, केयूर—बाहुभूषणें—कौस्तुभ, इत्यादि अलंकार विलसत आहेत, ५९ पैंजण, कडीं आणि वनमाला यांच्या योगें त्याच्या शरीराला शोभा आली आहे, दोनें धनुष्यें हातांत घेऊन लक्ष्मण त्याची

१. 'मी, माझें,' ही बुद्धि उत्पन्न करिते. २. रामाचें व स्वतःचें अशीं दोन धनुष्यें.

सेवितम् ॥६०॥ एवं ध्यात्वा सदात्मानं रामं सर्वहृदि स्थितम् । भक्त्या परमया युक्तो मुच्यते नात्र संशयः ॥ ६१ ॥ शृणु वै चरितं तस्य भक्तैर्नित्यमनन्यधीः । एवं चेत्कृतपूर्वाणि पापानि च महांत्यपि । क्षणादेव विनश्यंति यथाग्नेस्तूलराशयः ॥ ६२ ॥ भजस्व रामं परिपूर्णमेकं विहाय वैरं निजभक्तियुक्तः । हृदा सदा भावितभावरूपमनामरूपं पुरुषं पुराणम् ॥ ६३ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकांडे षष्ठः सर्गः ॥ ६ ॥

## युद्धकांडे सर्ग सातवा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ कालनेमिवचः श्रुत्वा रावणोऽमृतसन्निभम् । जज्वाल क्रोधताम्राक्षः सर्पिरद्भिरिवाग्निमत् ॥ १ ॥ निहन्मि त्वां दुरात्मानं

सेवा करीत आहे, ६० अशा सर्वांच्या हृदयांत वास करणाऱ्या आत्मरूपी श्रीरामाचें जो कोणी नित्य ध्यान करितो, त्याची रामावर परम भक्ति जडते, आणि तो मुक्त होतो, यांत संशय नाही. ६१ भक्तजनांच्या संगतीत एकनिष्ठेनें त्या रामचरित्राचें श्रवण कर. असें केल्यानें पूर्वी तुजकडून महापातकें घडली असतील, तरी तीं, अग्नीकडून कापसाच्या राशी जळून खाक होतात, त्याप्रमाणें क्षणांत नाहीशीं होतील.[1] ६२ राम हा परिपूर्ण, एक–अद्वितीय–पुराण पुरुष आहे, तो ( योगिजनांकडून ) सत्तारूपानें सर्वदा हृदयांत चिंतिला जातो, त्याला नामरूप हा भेद नाही. अशा रामाला वैर सोडून परमभक्तिपूर्वक भजत जा. ६३ ”

**युद्धकांड, अध्याय सहावा समाप्त.**

श्रीमहादेव म्हणाला, “ अमृतासारखें ( हितकर ) कालनेमीचें भाषण ऐकून रावण संतापला. त्याचे डोळे क्रोधानें लाल झाले. तापलेले तुपांत पाणी टाकल्यानें तें जसें अधिकच पेट घेतें. तशी त्याची स्थिति झाली. १ ( तो म्हणाला. ) ‘ माझी

१. ‘ चरितं रघुनाथस्य शतकोटिप्रविस्तरम् । एकैकमक्षरं पुंसां महापातकनाशनम् ॥ ’ –रामरक्षा.

मच्छासनपराङ्मुखम् । परैः किंचिद्गृहीत्वा त्वं भाषसे रामकिंकरः ॥२॥
कालनेमिरुवाचेदं रावणं देव किं क्रुधा । न रोचते मे वचनं यदि
गत्वा करोमि तत् ॥ ३ ॥ इत्युक्त्वा प्रययौ शीघ्रं कालनेमिर्महासुरः ।
नोदितो रावणेनैव हनूमद्विघ्नकारणात् ॥ ४ ॥ स गत्वा हिमवत्पार्श्वे
तपोवनमकल्पयत् । तत्र शिष्यैः परिवृतो मुनिवेषधरः खलः ॥ ५ ॥
गच्छतो मार्गमासाद्य वायुसूनोर्महात्मनः । ततो गत्वा ददर्शाथ हनूमाना-
श्रमं शुभम् ॥ ६ ॥ चिंतयामास मनसा श्रीमान्पवननंदनः । पुरा न
दृष्टमेतन्मे मुनिमंडलमुत्तमम् ॥ ७ ॥ मार्गो विभ्रंशितो वा मे भ्रमो
वा चित्तसंभवः । यद्वाविश्याश्रमपदं दृष्ट्वा मुनिमशेषतः ॥ ८ ॥

आज्ञा मोडणाऱ्या तुला दुष्टाला मी ठार करितों. शत्रूकडून कांहीं (लांच वगैरे) घेऊन तूं रामाचा सेवक झाला आहेस, आणि म्हणूनच असें भाषण करीत आहेत.' २ त्यावर कालनेमि रावणाला म्हणाला, 'राजन् ! आपण कशाला रागावतां ? जर माझं भाषण आपणाला आवडत नसेल, तर (आपण सांगतां, त्याप्रमाणें) जाऊन करितों.' ३ असें बोलून मारुतीला विघ्न करण्याची रावणाज्ञा घेऊन तो महासुर कालनेमि तत्काल तेथून निघाला. ४ हिमालयाच्या समीप जाऊन तेथें त्यानें एक तपोवन तयार केलें. तेथें तो दुष्ट मुनिवेष धारण करून शिष्यपरिवारासह राहिला. ५ महात्मा मारुति ज्या वाटेनें जावयाचा तीच वाट रोधून तो कालनेमि राहिला. मारुति तेथून जात असतां तो रम्य आश्रम[1] त्याच्या दृष्टीस पडला. ६ तें पाहून त्या वैभवशाली मारुतीनें विचार केला, 'हें उत्तम आश्रमस्थान ह्यापूर्वी माझ्या पाहण्यांत आलें नाहीं. ७ माझा रस्ता चुकला, किंवा माझ्या चित्ताला भ्रम झाला (कांहीं समजत नाहीं). असो. आपण आतां या आश्रमांत शिरावें, सगळ्या मुनींना भेटावें,८

१ ह्या आश्रमाचें एकनाथांनीं केलेलें वर्णनः—'तेथें जावोनी रक्षोगण । केला आश्रम निर्माण । फळें जळें संपूर्ण । वृक्षारोपण अतिरम्य ॥ आपण घेवोनि अग्निहोत्र । तापसवेषें निशाचर । दिसे उपवासी निरंतर । गेले उदर खपाटीं ॥ माथां जटांचा सभार । परिधान त्यासी वल्कलांबर । वक्त्रीं वाढले श्मश्रु फार । अतिविचित्र भासती ॥ हातीं घेवोनी जपमाळी । बुबुळे नेलीं भंवयांतळीं । जैसी खेचरी मुद्रा लाविली । तैसी शैली दिसताहे ॥ उदकामाजी असे बक । जैसा कोणी सात्त्विक । जळवासी पुण्यश्लोक । ऐखा देख दिसतसे ॥'— भा. रामायण, युद्धकांड ४५.

पीत्वा जलं ततो यामि द्रोणाचलमनुत्तमम् । इत्युक्त्वा प्रविवेशाथ सर्वतो योजनायतम् ॥ ९ ॥ आश्रमं कदलीशालखर्जूरपनसादिभिः । समावृतं पक्वफलैर्नम्रशाखैश्च पादपैः ॥१०॥ वैरभावविनिर्मुक्तं शुद्धं निर्मललक्षणम् । तस्मिन्महाश्रमे रम्ये कालनेमिः स राक्षसः ॥ ११ ॥ इंद्रयोगं समास्थाय चकार शिवपूजनम् । हनूमानभिवाद्याह गौरवेण महासुरम् ॥ १२ ॥ भगवन् रामदूतोऽहं हनूमान्नाम नामतः । रामकार्येण महता क्षीराब्धिं गंतुमुद्यतः ॥ १३ ॥ तृषा मां बाधते ब्रह्मन्नुदकं कुत्र विद्यते । यथेच्छं पातुमिच्छामि कथ्यतां मे मुनीश्वर ॥ १४ ॥ तच्छ्रुत्वा मारुतेर्वाक्यं कालनेमिस्तमब्रवीत् । कमंडलुगतं तोयं मम त्वं पातुमर्हसि ॥१५॥ भुंक्ष्व चेमानि पक्वानि फलानि तदनंतरम् । निवसस्व सुखेनात्र निद्रामेहि त्वरास्तु मा ॥ १६ ॥ भूतं भव्यं भविष्यं च जानामि तपसा स्वयम् । उत्थितो लक्ष्मणः सर्वे वानरा रामवीक्षिताः ॥१७॥ तच्छ्रुत्वा

जल प्राशन करावे, आणि मग त्या उत्तमोत्तम द्रोणपर्वताकडे जावे.' असें बोलून औरस चौरस चार कोस लांब, अशा त्या आश्रमांत मारुति शिरला. ९ त्या आश्रमांत केळी, शाल, खर्जूर, फणस, इत्यादि वृक्ष सर्वत्र लागलेले असून त्यांवरील पक्व फलांनीं त्यांच्या शाखा वांकून गेल्या होत्या. १० तें स्थान वैरभावरहित होतें. तेथें सर्वत्र पवित्रता आणि निर्मलता दिसत होती. त्या आश्रमांत कपटयोगाचा स्वीकार करून कालनेमि शंकराचें पूजन करीत होता. हनुमंतानें आदरपूर्वक त्या महासुराला वंदन केलें, आणि म्हटलें, ११,१२ 'भगवन् ! मी हनुमान् नांवाचा रामदूत आहें. रामाचें महत्वाचें कार्य करण्याचें योजून मी क्षीरसमुद्राकडे जात आहें. १३ ब्रह्मन् ! मी तहानेनें व्याकुळ झालों आहें. पाणी कोठें आहे बरें ? पोटभर पाणी पिण्याची माझी इच्छा आहे. तर मुनिश्रेष्ठा ! ( तें कोठें आहे ) मला सांगा.' १४ तें मारुतीचें भाषण ऐकून कालनेमि त्याला म्हणाला, 'माझ्या कमंडलूंतील उदक प्राशन कर, १५ हीं पक्व फळें खा, नंतर सुखानें येथें रहा, आणि निद्रा घे. इतकी त्वरा करण्याचें कारण नाहीं. १६ तपश्चर्येच्या योगें मी स्वतः भूत, वर्तमान आणि भविष्य सारें जाणतों. लक्ष्मण उठला असून सर्व वानरही रामदर्शनानें जीवंत झाले आहेत.' १७ तें ऐकून

हनुमानाह कमंडलुजलेन मे । न शाम्यत्यधिका तृष्णा ततो दर्शय मे जलम् ॥१८॥ तथेत्याज्ञापयामास बटुं मायाविकल्पितम् । बटो दर्शय विस्तीर्णं वायुसूनोर्जलाशयम् ॥ १९ ॥ निमील्य चाक्षिणी तोयं पीत्वा-गच्छ मर्मांतिकम् । उपदेक्ष्यामि ते मंत्रं येन द्रक्ष्यसि चौषधीः ॥२०॥ तथेति दर्शितं शीघ्रं बटुना सलिलाशयम् । प्रविश्य हनुमांस्तोयमपिबन्मीलितेक्षणः ॥२१॥ ततश्चागत्य मकरी महामाया महाकपिम् । अग्रसत्तं महावेगान्मारुतिं घोररूपिणी ॥ २२ ॥ ततो ददर्श हनुमान् ग्रसंतीं मकरीं रुषा । दारयामास हस्ताभ्यां वदनं सा ममार ह ॥२३॥ ततोऽन्तरिक्षे ददृशे दिव्यरूपधरांगना । धान्यमालीति विख्याता हनूमंतमथाब्रवीत् ॥ २४ ॥ त्वत्प्रसादादहं शापाद्विमुक्तास्मि कपीश्वर । शप्ताहं मुनिना पूर्वमप्सरा कारणांतरे ॥ २५ ॥ आश्रमे यस्तु ते दृष्टः कालनेमिर्महासुरः । रावणप्रहितो

हनुमंत म्हणाला, 'मला फार तहान लागली आहे. कमंडलूंतील उदकानें ती भागत नाहीं. म्हणून मला पाण्याचें ठिकाण दाखवा.' १८ 'बरें आहे,' असें म्हणून कालनेमीनें मायेनें निर्माण केलेल्या एका बटूला आज्ञा दिली, 'बटो ! या वायुपुत्राला विस्तीर्ण असा जलाशय–सरोवर–दाखीव. १९ मग (कालनेमि मारुतीला म्हणाला,) 'डोळे मिटून पाणी पी, आणि नंतर मजजवळ ये. मी तुला मंत्रोपदेश करीन, तेणेंकरून तुला ओषधी दिसतील.' २० 'ठीक आहे,' असें म्हणून बटूनें दाखविलेल्या सरोवरांत मारुति शिरला, आणि डोळे मिटून पाणी पिऊं लागला. २१ तोंच एक भयंकर स्वरूपाची महामाया मकरी तेथें आली, आणि त्या महावानरा (मारुती)ला भराभर गिळूं लागली. २२ तेव्हां हनुमंतानें डोळे उघडून पाहिलें कीं, आपणाला मकरी-सुसर–गिळीत आहे. मारुतीला क्रोध आला, आणि त्यानें दोन्ही हातांनीं त्या सुसरीचें तोंड फाडून टाकिलें. त्यामुळें ती तत्काल मरण पावली. २३ इतक्यांत आकाशामध्यें एक दिव्यरूपी स्त्री दिसली. ती धान्यमाली या नांवानें प्रसिद्ध होती. ती हनुमंताला म्हणाली, २४ 'कपिश्रेष्ठा ! तुझ्या प्रसादानें मी शापविमुक्त झाल्यें आहे. मी एक अप्सरा असून कांहीं कारणानें एका मुनीनें मला शाप दिला होता. २५ आश्रमामध्यें जो (मुनि) तूं पाहिलास, तो कालनेमि नांवाचा महादैत्य आहे. हे निष्पापा !

१. 'अवज्ञातो मया शक्र (?) स्तेनाहं पतिता भुवि । गच्छ ग्राही भवस्वेति शप्ताहं तेन वानर ॥ यदा वीरं हनुमंतं ग्रहीष्यसि जलेचरा । तदा शापाद्विमोक्षस्ते भविष्यति न संशयः ॥'–आ. रामायण.

मार्गे विघ्नं कर्तुं तवानघ ॥ २६ ॥ मुनिवेषधरो नासौ मुनिर्विप्रविहिंसकः ॥
जहि दुष्टं गच्छ शीघ्रं द्रोणाचलमनुत्तमम् ॥ २७ ॥ गच्छाम्यहं ब्रह्म-
लोकं त्वत्स्पर्शाद्धतकल्मषा । इत्युक्त्वा सा ययौ स्वर्गं हनूमानप्यथाश्रमम्
॥ २८ ॥ आगतं तं समालोक्य कालनेमिरभाषत । किं विलंबेन महता
तव वानरसत्तम ॥ २९ ॥ गृहाण मत्तो मंत्रांस्त्वं देहि मे गुरुदक्षिणाम् ।
इत्युक्तो हनुमान्मुष्टिं दृढं बद्ध्वाह राक्षसम् ॥ ३० ॥ गृहाण दक्षिणामेता-
मित्युक्त्वा निजघान तम् । विसृज्य मुनिवेषं स कालनेमिर्महासुरः ॥३१॥
युयुधे वायुपुत्रेण नानामायाविधानतः । महामायिकदूतोऽसौ हनूमान्मा-
यिनां रिपुः ॥ ३२ ॥ जघान मुष्टिना शीर्ष्णि भग्नमूर्धा ममार सः ।
ततः क्षीरनिधिं गत्वा दृष्ट्वा द्रोणं महागिरिम् ॥ ३३ ॥ अदृष्ट्वा चौषधी-
स्तत्र गिरिमुत्पाट्य सत्वरः । गृहीत्वा वायुवेगेन गत्वा रामस्य

तुझ्या मार्गांत तुला विघ्न करावें, म्हणून रावणानें त्याला पाठविलें आहे. २६ तो मुनिवेषधारी मुनि नसून ब्राह्मणांची हत्या करणारा ( राक्षस ) आहे. त्याचा सत्वर वध कर, आणि त्वरित अत्युत्तम द्रोणापर्वतावर जा. २७ तुझ्या स्पर्शानें माझ्या पातकांचा नाश झाला आहे. मी आतां ब्रह्मलोकीं जात्यें.' असें बोलून ती स्वर्गाला गेली, आणि हनुमंतही आश्रमांत आला. २८ तो आलेला पाहून कालनेमि म्हणाला, 'वानरश्रेष्ठा ! तुला कां बरें इतका पुष्कळ विलंब लागला ? २९ तूं माझ्यापासून मंत्र घे, आणि मला गुरुदक्षिणा दे.' असें तो बोलला असतां मारुतीनें मूठ घट्ट आंवळिली आणि त्या राक्षसाला म्हटलें, ३० 'ही घे दक्षिणा !' असें बोलून मारुतीनें त्याजवर एक ( मुष्टीचा ) प्रहार केला. तत्काल त्या महासुर कालनेमीनें मुनिवेष सोडून दिला, ३१ आणि तो वायुपुत्र मारुतीबरोबर लढूं लागला. नाना मायाप्रकार योजून तो ( राक्षस ) लढला. परंतु हा मारुति महामायिकाचा-रामाचा दूत आणि मायावी—कपटी—राक्षसांचा शत्रु होता. ३२ त्यानें ( कालनेमीच्या ) मस्तकावर मुष्टिप्रहार करतांच मस्तक फुटून तो ( दैत्य ) मरण पावला. नंतर मारुति क्षीरसमुद्रावर गेला. तेथें महागिरि द्रोण त्याच्या दृष्टीस पडला; ३३ परंतु त्यावर ओषधी त्याला दिसल्या नाहींत. मग हनुमंतानें त्या पर्वतालाच उपटून घेतलें,

१. कपटयुक्त. २. जगाचें आदिकारण माया, तिला स्वाधीन ठेवणारा.





लक्ष्मण युद्धांत पडला म्हणून मारुति द्रोणाचल आणीत आहे

सन्निधिम्॥३४॥उवाच हनुमान् राममानीतोऽयं महागिरिः। यद्युक्तं कुरु देवेश विलंबो नात्र युज्यते॥ ३५॥ श्रुत्वा हनूमतो वाक्यं रामः संतुष्ट-मानसः। गृहीत्वा चौषधीः शीघ्रं सुषेणेन महामतिः॥ ३६॥ चिकित्सां कारयामास लक्ष्मणाय महात्मने । ततः सुप्तोत्थित इव बुद्ध्वा प्रोवाच लक्ष्मणः॥ ३७॥ तिष्ठ तिष्ठ क्व गंतासि हन्मीदानीं दशानन । इति ब्रुवंतमालोक्य मूर्ध्न्यवघ्राय राघवः॥ ३८॥ मारुतिं प्राह वत्साद्य त्वत्प्रसादान्महाकपे। निरामयं प्रपश्यामि लक्ष्मणं भ्रातरं मम॥ ३९॥ इत्युक्त्वा वानरैः सार्धं सुग्रीवेण समन्वितः । विभीषणमतेनैव युद्धाय समवस्थितः॥ ४०॥ पाषाणैः पादपैश्चैव पर्वताग्रैश्च वानराः । युद्धा-याभिमुखा भूत्वा ययुः सर्वे युयुत्सवः॥ ४१॥ रावणो विव्यथे राम-बाणैर्विद्धो महासुरः । मातंग इव सिंहेन गरुडेनेव पन्नगः॥ ४२॥

आणि तो वायुवेगाने रामाजवळ आला. ३४ मग मारुति रामाला म्हणाला, 'देवेशा! महापर्वत—द्रोणाचल—मीं आणिला आहे. आतां जें करणें योग्य असेल, तें करावें. ह्या कामीं विलंब करणें योग्य नाहीं.' ३५ हनुमंताचें भाषण ऐकून रामाच्या मनाला संतोष झाला. मग महाबुद्धिमंत रामानें तत्काल (पर्वतावरील) ओषधि काढिल्या, आणि सुषेणा[1]करवीं त्या महात्मा लक्ष्मणाची चिकित्सा करविली. तेव्हां जागृत झाल्याप्रमाणे लगेच उठून लक्ष्मण म्हणाला, ३६, ३७ 'दशानना! थांब थांब. तूं कोठें जाशील? तुझा आतां वध करितों.' असें लक्ष्मण बोलत आहे, हें पाहून रामानें त्याला मस्तकाचे ठिकाणीं हुंगिलें. ३८ नंतर तो मारुतीला म्हणाला, 'वत्सा महाकपे! आज तुझ्या प्रसादानें माझा बंधु लक्ष्मण कुशल स्थितींत माझ्या दृष्टीस पडत आहे!' ३९ इतकें बोलून वानरांसह सुग्रीवाला बरोबर घेऊन विभीषणाच्याच मतानु-सार (राम) युद्धाला उभा राहिला. ४० लढण्याची अत्युत्कंठा धरून ते सर्व वानर पाषाण, वृक्ष, पर्वतांचीं शिखरें घेऊन युद्धाभिमुख होऊन निघाले. ४१ (त्या रणांत) रामाचे बाण लागून महासुर रावण घायाळ झाला. सिंहाकडून हत्तीची अगर गरुडा-कडून सर्पाची गाळण उडावी, त्याप्रमाणें रामाकडून रावणाची स्थिति झाली. ४२

१. सुषेण हा एक प्रख्यात वैद्य होता. 'तंव तो भेषजवेत्ता सुषेणनामा विशल्यकरणीला शोधी, मग तीणें त्या धर्मसुताचा स्वहस्त परिणीला.॥'—मोरोपंत, मंत्ररामायण.

अभिभूतोऽगमद्राजा राघवेण महात्मना । सिंहासने समाविश्य राक्षसानिदमब्रवीत् ॥ ४३ ॥ मानुषेणैव मे मृत्युमाह पूर्वं पितामहः । मानुषो हि न मां हंतुं शक्तोऽस्ति भुवि कश्चन ॥ ४४ ॥ ततो नारायणः साक्षान्मानुषोऽभून्न संशयः । रामो दाशरथिर्भूत्वा मां हंतुं समुपस्थितः ॥४५॥ अनरण्येन यत्पूर्वं शप्तोऽहं राक्षसेश्वरः । उत्पत्स्यते च मद्वंशे परमात्मा सनातनः ॥४६॥ तेन त्वं पुत्रपौत्रैश्च बांधवैश्च समन्वितः । हनिष्यसे न संदेह इत्युक्त्वा मां दिवं गतः ॥ ४७ ॥ स एव रामः संजातो मदर्थे मां हनिष्यति । कुंभकर्णस्तु मूढात्मा सदा निद्रावशं गतः ॥ ४८ ॥ तं विबोध्य महासत्त्वमानयंतु ममांतिकम् । इत्युक्तास्ते महाकायास्तूर्णं गत्वा तु यत्नतः ॥ ४९ ॥ विबोध्य कुंभश्रवणं निन्यू रावणसन्निधिम् । नमस्कृत्य स राजानमासनोपरि संस्थितः ॥ ५० ॥ तमाह रावणो राजा भ्रातरं

महात्म्या राघवाकडून पराभव झाला असतां राजा (रावण) तेथून गेला, आणि सिंहासनावर बसून तो राक्षसांना बोलला, ४३ ' पूर्वी ब्रह्मदेवानें मनुष्याच्याच हातून मला मृत्यु येणार, असें सांगितलें आहे. पृथ्वीवर माझा वध करील, असा कोणीही मनुष्य नाहीं. ४४ म्हणून साक्षात् नारायण मनुष्य झाला आहे, यांत संशय नाही. तो दशरथपुत्र राम होऊन माझ्या वधाकरितां येथें आला आहे. ४५ राक्षसश्रेष्ठ हो ! अनरण्यानें पूर्वी मला शाप दिला आहे की, ' माझ्या वंशांत सनातन परमात्मा अवतार घेईल, ४६ आणि त्याजकडून तुझा पुत्र, पौत्र, बांधव या सर्वांसह वध होईल, यांत संशय नाही. ' असें बोलून तो–अनरण्य–स्वर्गाला गेला. ४७ तोच हा राम माझ्याकरितां उत्पन्न झाला असून तो माझा वध करणार. कुंभकर्ण हा तर अगदीं मूर्ख असून सर्वदा निद्रावश झालेला असतो ! ४८ तो महासामर्थ्यवान् आहे. त्याला जागा करून मजजवळ आणा. ' रावणानें असें सांगितलें असतां, ते प्रचंड देह धारण करणारे ( राक्षस ) लागलेच गेले, आणि त्यांनीं नाना प्रयत्नांनीं कुंभकर्णाला जागा करून त्याला रावणाजवळ नेलें. त्यानें राजा ( रावणा ) ला नमस्कार केला, आणि तो आसनावर बसला. ४९, ५० त्या आपल्या बंधूला रावण राजा

१. अनरण्याचा रावणास शापः—' उत्पत्स्यते कुले ह्यस्मिन्निक्ष्वाकूणां महात्मनाम् । रामो दाशरथिर्नाम यस्ते प्राणान् हरिष्यति ॥'.

दीनया गिरा । कुंभकर्ण निबोध त्वं महत्कष्टमुपस्थितम् ॥ ५१ ॥ रामेण
निहताः शूराः पुत्राः पौत्राश्च बांधवाः । किं कर्तव्यमिदानीं मे मृत्युकाल
उपस्थिते ॥ ५२ ॥ एष दाशरथी रामः सुग्रीवसहितो बली । समुद्रं
सबलस्तीर्त्वा मूलं नः परिकृंतति ॥ ५३ ॥ ये राक्षसा मुख्यतमास्ते
हता वानरैर्युधि । वानराणां क्षयं युद्धे न पश्यामि कदाचन ॥ ५४ ॥
नाशयस्व महाबाहो यदर्थं परिबोधितः । भ्रातुरर्थे महासत्त्व कुरु कर्म
सुदुष्करम् ॥ ५५ ॥ श्रुत्वा तद्रावणेंद्रस्य वचनं परिदेवितम् । कुंभकर्णो
जहासोच्चैर्वचनं चेदमब्रवीत् ॥ ५६ ॥ पुरा मंत्रविचारे ते गदितं यन्म-
या नृप । तदद्य त्वामुपगतं फलं पापस्य कर्मणः ॥ ५७ ॥ पूर्वमेव
मया प्रोक्तो रामो नारायणः परः । सीता च योगमायेति बोधितोऽपि
न बुध्यसे ॥ ५८ ॥ एकदाहं वने सानौ विशालायां स्थितो निशि ।
दृष्टो मया मुनिः साक्षान्नारदो दिव्यदर्शनः ॥ ५९ ॥ तमब्रुवं महाभाग

दीनवाणीनें बोलला, 'कुंभकर्णा! मजवर मोठें संकट कोसळलें आहे, त्याचा कांहीं विचार कर. ५१ माझे शूर पुत्र, पौत्र, बांधव, यांचा रामानें वध केला आहे. सांप्रत माझा मृत्युसमय आला आहे, याला आतां मी काय करावें? ५२ हा बलवान् दाशरथि राम सुग्रीवास बरोबर घेऊन सैन्यासहवर्तमान समुद्र उल्लंघून इकडे आला असून तो आमचीं मुळें खणून काढीत आहे! ५३ आमचे मुख्य मुख्य राक्षस वानरांकडून रणांगणावर मारिले गेले. वानरांचा युद्धामध्यें वध झाल्याचें मला कधींच ठाऊक नाहीं. ५४ महाबाहो! (शत्रूचा) नाश कर. ह्याचकरितां तुला जागें केलें आहे. तूं महापराक्रमी आहेस. हें दुष्कर कर्म आहे, तरी बंधूकरितां तें हातीं घे.' ५५ तें रावणराजाचें शोकाचें भाषण ऐकून कुंभकर्ण मोठ्यानें हंसला. तो म्हणाला, ५६ 'राजा! पूर्वीं गुप्त मसलत चालली असतां मी जें तुला सांगितलें होतें, तेंच तुझ्या पापकर्माचें फळ आज तुला प्राप्त झालें आहे. ५७ मी तुला पूर्वींच सांगितलें होतें कीं, राम हा परमात्मा नारायण व सीता ही योगमाया आहे. तुला मीं बोध केला, तरी तूं शहाणा झाला नाहींस. ५८ एकदां रात्रीच्या वेळीं अरण्यांत पर्वतशिखरी एका विस्तीर्ण शिलेवर मी बसलों होतों. तेथें दिव्यज्ञानी साक्षात नारद मुनि माझ्या दृष्टीस पडला. ५९ मीं त्याला विचारिलें. 'महाभाग[1]!

1. मोठ्या भाग्याचा, षड्गुणैश्वर्यसंपन्न.

कुतो गंतासि मे वद । इत्युक्तो नारदः प्राह देवानां मंत्रणे स्थितः
॥ ६० ॥ तत्रोत्पन्नमुदंतं ते वक्ष्यामि शृणु तत्त्वतः । युवाभ्यां पीडिता
देवाः सर्वे विष्णुमुपागताः ॥ ६१ ॥ ऊचुस्ते देवदेवेशं स्तुत्वा भक्त्या
समाहिताः । जहि रावणमक्षोभ्यं देव त्रैलोक्यकंटकम् ॥ ६२ ॥ मानु-
षेण मृतिस्तस्य कल्पिता ब्रह्मणा पुरा । अतस्त्वं मानुषो भूत्वा जहि
रावणकंटकम् ॥ ६३ ॥ तथेत्याह महाविष्णुः सत्यसंकल्प ईश्वरः ।
जातो रघुकुले देवो राम इत्यभिविश्रुतः ॥ ६४ ॥ स हनिष्यति वः
सर्वानित्युक्त्वा प्रययौ मुनिः । अतो जानीहि रामं त्वं परं ब्रह्म सना-
तनम् ॥ ६५ ॥ त्यज वैरं भजस्वाद्य मायामानुषविग्रहम् । भजतो
भक्तिभावेन प्रसीदति रघूत्तमः ॥ ६६ ॥ भक्तिर्जनित्री ज्ञानस्य भक्ति-
र्मोक्षप्रदायिनी । भक्तिहीनेन यत्किंचित्कृतं सर्वमसत्समम् ॥ ६७ ॥

आपण कोठून आलां ? मला सांगा.' असें मी बोललों असतां तो म्हणाला, 'देवांच्या मसलती चालल्या असतां मी तेथें होतों. ६० तेथें घडलेला खरा वृत्तांत तुला सांगतों, ऐक. तुम्हीं[1] दोघांनी देवांना त्रास दिल्यामुळें ते विष्णूकडे गेले. ६१ अंतःकरण-पूर्वक त्या देवाधिदेवाची स्तुति करून ते देव म्हणाले, 'देवा ! हा रावण दुरासद[2] असून त्रैलोक्याला शत्रूसारखा झाला आहे. ह्याचा वध कर. ६२ मनुष्याच्या हातून त्याचा वध व्हावयाचा, अशी ब्रह्मदेवानें पूर्वीं योजना करून ठेविली आहे, म्हणून तूं मनुष्यरूप धारण करून ह्या रावणरूप शत्रूचा नाश कर. ६३ त्यावर तो सत्य-संकल्प ईश्वर महाविष्णु 'बरें आहे,' असें म्हणाला. त्याप्रमाणें रघुकुलामध्यें तो देव राम नांवानें अवतीर्ण झाला आहे. ६४ तो तुम्हां सर्वांचा वध करील.' असें सांगून तो ( नारद ) मुनि गेला. म्हणून राम हा सनातन परब्रह्म होय, हें समज ६५ वैराचा त्याग कर, आणि आतां त्या मायेनें मनुष्यरूप धारण करणाऱ्या रामाची भक्ति कर. भक्तिभावानें[3] भजणाऱ्याला रघुश्रेष्ठ राम प्रसन्न होतो. ६६ भक्ति ही ज्ञानाची जननी आहे, व भक्ति ही मोक्षदायिनी आहे. भक्तिहीनानें जरी कांहीं केलें, तरी तें

१. तू ( कुंभकर्ण ) व रावण या दोघांनीं. २. अजिंक्य. ३. 'न तपोभिर्न वेदैश्च न ज्ञानेनापि कर्मणा । हरिर्हि साध्यते भक्त्या प्रमाणं तत्र गोपिकाः ॥'–भागवतमाहात्म्य. ४. सदृश उतारा–'अंतर्बहिर्यदि हरिस्तपसा ततः किम् । नांतर्बहिर्यदि हरिस्तपसा ततः किम्' ... 'अतर्बाह्ये हरिर्यस्य तस्य किं तपसा सुत । नांतर्बाह्ये हरिर्यस्य तस्य किं तपसा वृथा ॥'–ब्रह्मवैवर्तपुराण. ( २ ) 'स कर्ता सर्वधर्माणां भक्तो यस्तव केशव । स कर्ता सर्वपापानां यो न भक्तस्तवाच्युत ॥'.

अवतारा: सुबहवो विष्णोर्लीलानुकारिणः । तेषां सहस्रसदृशो रामो ज्ञानमयः शिवः ॥ ६८ ॥ रामं भजंति निपुणा मनसा वचसा निशम् । अनायासेन संसारं तीर्त्वा यांति हरेः पदम् ॥ ६९ ॥ ये राममेव सततं भुवि शुद्धसत्त्वा ध्यायंति तस्य चरितानि पठंति संतः । मुक्तास्त एव भवभोगमहाहिपाशैः सीतापतेः पदमनंतसुखं प्रयांति ॥ ७० ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकांडे सप्तमः सर्गः ॥ ७ ॥

## युद्धकांड, सर्ग आठवा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ कुंभकर्णवचः श्रुत्वा भ्रुकुटीविकटाननः । दशग्रीवो जगादेदमासनादुत्पतन्निव ॥१॥ त्वमानीतो न मे ज्ञानबोधनाय सुबुद्धिमान् । मया कृतं समीकृत्य युध्यस्व यदि रोचते ॥२॥ नोचेद्गच्छ सुषुप्त्यर्थं निद्रा त्वां बाधतेऽधुना । रावणस्य वचः श्रुत्वा कुंभकर्णो

न केल्यासारखेंच होय. ६७ आजवर विष्णूनें अनेक अवतार घेतले असून तदनुरूप त्यानें लीला केल्या आहेत. अशा सहस्र अवतारांसमान हा ज्ञानरूप व कल्याणरूप रामावतार आहे. ६८ जे शहाणे लोक मनानें आणि वाणीनें रामाचें रात्रंदिवस भजन करितात, ते अनायासानें संसार तरून जातात, आणि हरिपदीं प्राप्त होतात. ६९ जे साधुपुरुष सतत शुद्धभावानें पृथ्वीवर रामाचें ध्यान करितात, आणि त्याच्या चरित्राचें पठण करितात, ते संसाररूपी महासर्पाच्या पाशांतून मुक्त होऊन ( अंतीं ) सीतापतीच्या अनंत सौख्यार्थदायक पदाला पावतात. ७० ”

**युद्धकांड, सर्ग सातवा समाप्त.**

श्रीमहादेव म्हणाला, “ कुंभकर्णाचें भाषण ऐकून रावणानें भुंवया चढविल्या. त्याचें मुख भयंकर दिसूं लागलें. हा आसनावरून उडी टाकितो कीं काय, असा सर्वांस भास झाला. तो बोलला, १ ‘ तूं थोर बुद्धिमान् आहेस, यासाठीं मला कांहीं उपदेश करावास, म्हणून मीं तुला बोलावून आणिलें नाहीं. तुला रुचत असेल, तर मीं जें केलें आहे, तें मान्य करून युद्ध कर. २ असें नसेल, तर जा झोंप घ्यायला, तुला आतां झोंपेची बाधा होत असेल. ’ रावणाचें बोलणें ऐकून त्या

महाबलः ॥ ३ ॥ रुष्टोयऽमिति विज्ञाय तूर्णं युद्धाय निर्ययौ । स लंघयित्वा प्राकारं महापर्वतसन्निभः ॥ ४ ॥ निर्ययौ नगरात्तूर्णं भीषयन्हरिसैनिकान् । स ननाद महानादं समुद्रमभिनादयन् ॥ ५ ॥ वानरान्कालयामास बाहुभ्यां भक्षयन् रुषा । कुंभकर्णं तदा दृष्ट्वा सपक्षमिव पर्वतम् ॥६॥ दुद्रुवुर्वानराः सर्वे कालांतकमिवाखिलाः । भ्रमंतं हरिवाहिन्यां मुद्गरेण महाबलम् ॥ ७ ॥ कालयंतं हरीन्वेगाद्भक्षयंतं समंततः । चूर्णयंतं मुद्गरेण पाणिपादैरनेकधा ॥८॥ कुंभकर्णं तदा दृष्ट्वा गदापाणिर्विभीषणः । ननाम चरणं तस्य भ्रातुर्ज्येष्ठस्य बुद्धिमान् ॥ ९ ॥ विभीषणोऽहं भ्रातुर्मे दयां कुरु महामते । रावणस्तु मया भ्रातर्बहुधा परिबोधितः ॥१०॥ सीतां देहीति रामाय रामः साक्षाज्जनार्दनः । न शृणोति च मां हंतुं खड्गमुद्यम्य

महाबलवान् कुंभकर्णाला, हा रुष्ट झाला आहे, असें कळून आलें. ( रावणाच्या रोषभयानें ) तो लागलाच युद्धाला निघाला. त्याचें शरीर महापर्वताकार होतें. वानरांस भिववीत, नगराचा कोट ओलांडून तो लगेच बाहेर आला; आणि समुद्रांतून प्रतिध्वनि उठेल, अशी मोठी गर्जना त्यानें केली. ३, ४, ५ क्रोधानें दोनी हातांनीं वानरांस धरावें व खाऊन टाकावें, असा तो त्यांस त्रास देऊं लागला. तो ( कुंभकर्ण ) पंखयुक्त पर्वतासारखा दिसत असे. त्यास पाहून हा मृत्युच आला काय, असें वाटून ते सर्व वानर पळूं लागले. ६ मुद्गर हातांत घेऊन तो महाबलवान् कुंभकर्ण वानरसैन्यांत फिरत असे. ७ कित्येक वानरांना त्रासवून सोडावें, आसपास सांपडतील त्यांस खाऊन टाकावें, कित्येकांचें मुद्गरानें चूर्ण करावें, तर कित्येकांना अनेक प्रकारीं बुक्क्यानीं आणि लाथांनी मारावें, असा त्याचा क्रम होता. ८ असा तो कुंभकर्ण त्याच वेळीं हातांत गदा घेऊन तेथें आलेल्या विभीषणाच्या नजरेस पडला. त्या बुद्धिमान् विभीषणानें वडील बंधूच्या पायांवर लोटांगण घातलें. ९ तो म्हणाला, ' मी विभीषण तुझा बंधु आहें. महामते ! मजवर दया कर. बंधो ! रावणाला मीं अनेक प्रकारें बोध केला कीं, १० ‘सीता रामाला अर्पण कर, राम हा साक्षात् जनार्दन–परमेश्वर–आहे.' परंतु त्यानें माझें ऐकिलें

१. सदृश वर्णनः–' नगरीप्राकारातें लघुनि आला असा महाशूळ; । नासाश्वासें त्याच्या उडती कपिवीर ते, जसा तूळ. ॥ '–मोरोपंत, मंत्ररामायण.

चोक्तवान् ॥ ११ ॥ धिक् त्वां गच्छेति मां हत्वा पदा पापिभिरावृतः
चतुर्भिर्मंत्रिभिः सार्धं रामं शरणमागतः ॥१२॥ तच्छ्रुत्वा कुंभकर्णोऽपि
ज्ञात्वा भ्रातरमागतम् । समालिंग्य च वत्स त्वं जीव रामपदाश्रयात्
॥ १३ ॥ कुलसंरक्षणार्थाय राक्षसानां हिताय च । महाभागवतोऽसि
त्वं पुरा मे नारदाच्छ्रुतम् ॥ १४ ॥ गच्छ तात ममेदानीं दृश्यते न च
किंचन । मदीयो वा परो वापि मदमत्तविलोचनः ॥ १५ ॥ इत्युक्तोऽ-
श्रुमुखो भ्रातुश्चरणावभिवंद्य सः । रामपार्श्वमुपागत्य चिंतापर उपस्थितः
॥ १६ ॥ कुंभकर्णोऽपि हस्ताभ्यां पदाभ्यां पेषयन्हरीन् । चचार वानरीं
सेनां कालयन् गंधहस्तिवत् ॥ १७ ॥ दृष्ट्वा तं राघवः क्रुद्धो वायव्यं
शस्त्रमादरात् । चिक्षेप कुंभकर्णाय तेन चिच्छेद राक्षसः ॥१८॥ समुद्गरं

नाहीं. मला मारण्याकरतां तरवार उपसून तो बोलला, ११ ‘तुला धिक्कार असो ! तूं जा.’ असें बोलून पापी ( राक्षस ) मंडळींत बसलेल्या ( रावणा ) नें मला लाथ मारिली. तेव्हां माझ्या चौघां मंत्र्यांसह मी रामाला शरण आलों.’ १२ तें ऐकून कुंभकर्णाला आपला बंधु विभीषण आला असल्याचें समजलें. त्यानें ( विभी- षणाला ) आलिंगन दिलें आणि म्हटलें, ‘वत्सा ! तूं रामपदाचा आश्रय केला आहेस. राक्षसांच्या कुलाचें संरक्षण आणि कल्याण व्हावें, यासाठीं तूं जीवंत रहा. तूं महाभगवद्भक्त असल्याचें मी पूर्वींच नारदाच्या तोंडून ऐकिलें आहे. १३,१४ बाबा ! तूं जा, मला आतां मदीय आणि परकीय कांहीच दिसेनासें झालें आहे. ( रण )मदानें माझे डोळे धुंद झाले आहेत.’ १५ असें कुंभकर्णानें सांगितलें असतां विभीषणाच्या मुखावर अश्रू दिसूं लागले. त्यानें बंधूच्या चरणांना वंदन केलें, आणि तो रामाजवळ येऊन चिंताक्रांत उभा राहिला. १६ इकडे कुंभकर्ण हातांनीं आणि पायांनीं वानरांना चुरडीत वानरसेनेंत फिरूं लागला. गंधहस्ती जसा गजसमू- हाची त्रेधा करून सोडतो, त्याप्रमाणें कुंभकर्णानें वानरांची स्थिति केली. १७ त्याला पाहून रामाला क्रोध आला. रामानें वायव्य शस्त्राची योजना करून तें लक्ष्य- पूर्वक कुंभकर्णावर सोडिलें, आणि त्यायोगें मुद्गरासह त्याचा उजवा हात तोडून टाकिला.

१. गंधगज. याच्या गंडस्थलांतून वाहणाऱ्या मदाचा वास येतांच इतर हत्ती भिऊन पळत सुटतात. २. वायव्यास्त्राची. ह्याची देवता वायु आहे.

दक्षहस्तं तेन घोरं ननाद सः । स हस्तः पतितो भूमावनेकान-
र्दयन्कपीन् ॥ १९ ॥ पर्यंतमाश्रिताः सर्वे वानरा भयवेपिताः । राम-
राक्षसयोर्युद्धं पश्यंतः पर्यवस्थिताः ॥ २० ॥ कुंभकर्णश्छिन्नहस्तः शाल-
मुद्यम्य वेगतः । समरे राघवं हंतुं दुद्राव तमथोऽच्छिनत् ॥ २१ ॥
शालेन सहितं वामहस्तमैंद्रेण राघवः । छिन्नबाहुमथायांतं नर्दंतं वीक्ष्य
राघवः ॥ २२ ॥ द्वावर्धचंद्रौ निशितावादायास्य पदद्वयम् । चिच्छेद
पतितौ पादौ लंकाद्वारि महास्वनौ ॥ २३ ॥ निकृत्तपाणिपादोऽपि कुंभ-
कर्णोऽतिभीषणः । वडवामुखवद्वक्रं व्यादाय रघुनंदनम् ॥ २४ ॥
अभिदुद्राव निनदन्राहुश्चंद्रमसं यथा । अपूरयत्सिताग्रैश्च सायकैस्तद्र-
घूत्तमः ॥ २५ ॥ शरपूरितवक्त्रोऽसौ चुक्रोशातिभयंकरः । अथ सूर्य-

त्यामुळें कुंभकर्णानें भयंकर गर्जना केली. तो हात जमिनीवर पडत असतांनाही अनेक वानर त्याखाली चिरडले गेले. १८,१९ इतका वेळ निर्भयपणें त्याजवळ राहणारे सर्व वानर आतां भयकंपित होऊन रामराक्षसांचें युद्ध पहात स्तब्ध उभे राहिले. २० कुंभकर्णाचा एक हात तुटला, तरी दुसऱ्या हातांत एक वृक्ष उपटून घेऊन तो रणांगणावर रामाला मारण्याकरितां त्याच्यावर वेगानें धावून गेला. परंतु रामानें इंद्रास्त्र सोडून तो ( कुंभकर्णाचा ) डावा हातही वृक्षासकट तोडून टाकिला. दोनी हात तुटलेल्या स्थितींतही ( कुंभकर्ण ) आपल्यावर गर्जना करीत यत आहे, असें पाहून ( रामानें ) दोन तीक्ष्ण अर्धचंद्राकार बाण घेऊन त्यांच्या योगें त्याचे दोनी पाय तोडून टाकिले. नंतर ते पाय मोठा शब्द करीत लंकेच्या द्वारांत येऊन पडले. २१,२२,२३ दोनी हात व दोनी पाय तुटले, तरीही तो अत्यंत भयंकर कुंभकर्ण वडवामुखाप्रमाणें आपलें तोंड पसरून राहु चंद्रावर धांवून जातो, त्याप्रमाणें रघु-नंदना ( रामा ) वर धांवून गेला. त्यावर तीक्ष्ण अग्रांचे बाण मारून रघूत्तम रामानें तें तोंड भरून टाकिलें. २४,२५ बाणांनी तोंड भरलें गेल्यावर तो अतिभयंकर ( कुंभकर्ण ) मोठ्यानें आक्रोश करूं लागला. नंतर ( रामानें ) सूर्यासारखा तेजस्वी

१. कुंभकर्णाचे हात फार लांब असल्यामुळें त्याच्या पंज्याजवळ जे असत, त्यांनाच त्याला मारतां येत असे. पंजापासून लांब असणारे वानर सुखानें त्याच्या बगलेखालून फिरत. परंतु आतां हात तुटल्यामुळें ते भयभीत झाले. २. समुद्राच्या पोटांत शंभर योजनें विस्तीर्ण असलेलें वडवाग्नीचें कुंड.

प्रतीकाशमैंद्रं शरमनुत्तमम् ॥ २६ ॥ वज्राशनिसमं रामश्चिक्षेपासुर-
मृत्यवे। स तत्पर्वतसंकाशं स्फुरत्कुंडलदंष्ट्रकम् ॥ २७ ॥ चकर्त रक्षोधि-
पतेः शिरो वृत्रमिवाशनिः। तच्छिरः पतितं लंकाद्वारि कायो महोदधौ
॥ २८ ॥ शिरोऽस्य रोधयद्द्वारं कायो नक्राद्यचूर्णयत्। ततो देवाः
सऋषयो गंधर्वाः पन्नगाः खगाः ॥ २९ ॥ सिद्धा यक्षा गुह्यकाश्च
अप्सरोभिश्च राघवम्। ईडिरे कुसुमासारवर्षैतश्चाभिनंदिताः ॥ ३० ॥
आजगाम तदा रामं द्रष्टुं देवमुनीश्वरः। नारदो गगनात्तूर्णं स्वभासा
भासयन्दिशः ॥ ३१ ॥ राममिंदीवरश्याममुदारांगं धनुर्धरम्। ईषत्ताम्र-
विशालाक्षमैंद्रास्त्रांचितबाहुकम् ॥ ३२ ॥ दयार्द्रदृष्ट्या पश्यंतं वानरान्
शरपीडितान्। दृष्ट्वा गद्गदया वाचा भक्त्या स्तोतुं प्रचक्रमे ॥ ३३ ॥
**नारद उवाच** ॥ देवदेव जगन्नाथ परमात्मन्सनातन। नारायणा-

अत्युत्तम ऐंद्र बाण घेऊन, तो दैत्य मरावा, या उद्देशानें त्याजवर टाकिला. तो बाण म्हणजे प्रत्यक्ष इंद्रवज्र किंवा वीज होती (असें वाटत होतें). तें कुंभकर्णाचें मस्तक पर्वतासारखें (प्रचंड) होतें. त्यावर कुंडलें व दाढा चकाकत होत्या. इंद्रवज्रानें वृत्रासुराला ठार मारिलें, त्याचप्रमाणें इंद्रास्त्रानें त्या राक्षसाधिपतीचें मस्तक तोडून टाकिलें. तें मस्तक लंकेच्या दरवाजांत येऊन पडलें व शरीर महासागरांत पडलें. २६,२७,२८ त्याचें मस्तक पडल्यानें लंकाद्वार बंद झालें. धडानेंही (सागरांतील नक्रादिकांचें चूर्ण केलें. तेव्हां देव, ऋषि, गंधर्व, सर्प, पक्षी, सिद्ध, यक्ष, गुह्यक, अप्सरा या सर्वांनी आनंदित होऊन पुष्पसमुदायांनीं रामावर वृष्टि करून त्याची स्तुति केली. २९,३० या प्रसंगीं देवर्षि नारद रामाला भेटण्याकरितां आकाशांतून त्वरेनें आला. त्याच्या अंगकांतीनें दिशा उज्ज्वल दिसत होत्या. ३१ रामाची अंगकांति नीलकमलाप्रमाणें श्याम होती; त्याच्या शरीरावर औदार्याचें तेज झळकत होतें, त्यानें हातांत धनुष्य धारण केलें होतें; त्याचे नेत्र किंचित् रक्तवर्ण आणि विशाल होते, दुसऱ्या हातांत त्यानें ऐंद्रास्त्र धरिलें होतें. ३२ शरपीडित वानरांकडे तो दयार्द्र दृष्टीनें पाहात होता. अशा रामाला पाहून नारदाचा कंठ भरून आला. त्यानें भक्तिपूर्वक रामाची स्तुति करण्यास आरंभ केला. ३३ नारद म्हणाला, 'देवाधिदेवा! तूं जगन्नाथ आहेस, तूं सनातन[2] परमात्मा आहेस, तूं सकलाधार[3] नारायण आहेस, तूं

१. ह वणन वाचून गाततील (११-२२) ' गधवयक्षासुरसद्धसघा वाक्षत त्वा विस्मताश्चैव सर्वे ' या श्लोकाची आठवण होते. २. ' सनातनस्त्वं पुरुषो मतो मे ॥ '-भ. गीता ११.
३. ' त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ॥ '-भ. गीता ११.

खिलाधार विश्वसाक्षिन्नमोऽस्तु ते ॥ ३४ ॥ विशुद्धज्ञानरूपोऽपि
त्वं लोकानतिवंचयन् । मायया मनुजाकारः सुखदुःखादिमानिव ॥३५॥
त्वं मायया गुह्यमानः सर्वेषां हृदि संस्थितः । स्वयं ज्योतिःस्वभावस्त्वं
व्यक्त एवामलात्मनाम् ॥ ३६ ॥ उन्मीलयन् सृजस्येतन्नेत्रे राम जग-
त्रयम् । उपसंह्रियते सर्वं त्वया चक्षुर्निमीलनात् ॥ ३७ ॥ यस्मिन्सर्व-
मिदं भाति यतश्चैतच्चराचरम् । यस्मान्न किंचिल्लोकेऽस्मिंस्तस्मै ते ब्रह्मणे
नमः ॥३८॥ प्रकृतिं पुरुषं कालं व्यक्ताव्यक्तस्वरूपिणम् । यं जानंति
मुनिश्रेष्ठास्तस्मै रामाय ते नमः ॥ ३९ ॥ विकाररहितं शुद्धं ज्ञानरूपं
श्रुतिर्जगौ । त्वां सर्वजगदाकारमूर्तिं चाप्याह सा श्रुतिः ॥४०॥ विरोधो
दृश्यते देव वैदिको वेदवादिनाम् । निश्चयं नाधिगच्छंति त्वत्प्रसादं
विना बुधाः ॥४१॥ मायया क्रीडतो देव न विरोधो मनागपि । रश्मि-

सर्व विश्वाचा साक्षी आहेस; तुला नमस्कार असो. ३४ विशुद्ध ज्ञान हेंच तुझें रूप आहे. तथापि मायेनें मनुष्यावतार घेऊन आपणालाही सुखदुःखादि भोगावीं लागत असल्याचें दाखवून लोकांना तूं फसवीत आहेस. ३५ मायेनें आच्छादित होऊन तूं सर्वांच्या हृदयांत वास करीत असतोस; तुझें स्वरूप स्वयंप्रकाश आहे. ज्यांचीं अंतःकरणें शुद्ध आहेत, त्यांनाच तूं स्पष्टपणें दिसून येतोस. ३६ रामा ! तूं जेव्हां नेत्र उघडतोस, तेव्हां हें त्रैलोक्य निर्माण करितोस. जेव्हां तूं आपले डोळे मिटतोस, तेव्हां त्याचा प्रलय होतो. ३७ ज्याच्या ठिकाणी हें सर्व ( जग ) भासतें, ज्याच्यापासून ह्या चराचर( विश्वा )चे उत्पत्तिस्थितिलय होतात, ज्याहून ह्या लोकांत दुसरें असें कांही नाहीं, अशा ब्रह्मरूपा तुला नमस्कार असो. ३८ प्रकृति, पुरुष, व्यक्त व अव्यक्त काल हीं ज्याचीं रूपें आहेत, असें मोठमोठे मुनि समजतात, असा जो तूं त्या तुला रामाला नमस्कार असो. ३९ तुझें स्वरूप विकाररहित, शुद्ध-ज्ञानरूप आहे, असें श्रुति सांगते. तीच श्रुति सर्व जगदाकार म्हणजेच तूं असेंही म्हणते. ४० देवा ! असा वेदवादी पुरुषांचा श्रुतिमतांत विरोध दिसून येतो. ( असा विरोध नाही ही) निश्चित गोष्ट तुझ्या कृपेवांचून अज्ञानी जनांस कळावयाची नाहीं. ४१ देवा ! तूं मायेच्या योगानें क्रीडा करीत असल्यामुळें हा (श्रुतिमतांतील) विरोध राहात नाहीं. ज्या

१. 'गतिर्भर्ता प्रभुः साक्षी ॥'—भ. गीता ९. २. सर्वं जगदिदं त्वत्तो जायते, सर्वं जगदिदं त्वत्तस्तिष्ठति, सर्वं जगदिदं त्वयि लयमेष्यति । '—गणपत्यथर्वशीर्ष. ३. व्यक्त काल—निमेषापासून संवत्सर, वगैरे. ४. अणूपासून क्षणापर्यंत.

जालं रवेर्यद्वद्दृश्यते जलवद् भ्रमात् ॥४२॥ भ्रांतिज्ञानात्तथा राम त्वयि सर्वं प्रकल्प्यते । मनसोऽविषयो देव रूपं ते निर्गुणं परम् ॥४३॥ कथं दृश्यं भवेद्देव दृश्याभावे भजेत्कथम् । अतस्तवावतारेषु रूपाणि निपुणा भुवि ॥ ४४ ॥ भजंति बुद्धिसंपन्नास्तरंत्येव भवार्णवम् । कामक्रोधादयस्तत्र बहवः परिपंथिनः ॥ ४५ ॥ भीषयंति सदा चेतो मार्जारा मूषकं यथा । त्वन्नाम स्मरतां नित्यं त्वद्रूपमपि मानसे ॥ ४६ ॥ त्वत्पूजानिरतानां ते कथामृतपरात्मनाम् । त्वद्भक्तसंगिनां राम संसारो गोष्पदायते ॥ ४७ ॥ अतस्ते सगुणं रूपं ध्यात्वाहं सर्वदा हृदि । मुक्तश्चरामि लोकेषु पूज्योऽहं सर्वदैवतैः ॥ ४८ ॥ राम त्वया महत्कार्यं कृतं देवहितेच्छया । कुंभकर्णवधेनाद्य भूभारोऽयं गतः प्रभो ॥ ४९ ॥

प्रमाणें भ्रमामुळें रविकिरणसमूह जलासारखा (मृगजळ) दिसतो, त्याचप्रमाणें रामा! तुझ्या ठिकाणीं भ्रांतिज्ञानानें हें सर्व (जग) कल्पिलें जात आहे. देवा! तुझें अत्यंत निर्गुणस्वरूप मनाला अविषय—न समजण्याजोगें—आहे. ४२, ४३ तें कसें दिसेल? तें स्वरूप अव्यक्त—दिसण्याजोगें नसल्यामुळें—भक्ति तरी कशी करावी? म्हणून मतिमान् लोक पृथ्वीवर वेगवेगळे अवतार घेऊन जीं रूपें तूं धारण करतोस, त्यांचें भजन करीत असतात. आणि मग तेच लोक बुद्धिसंपन्न होऊन भवसागर तरून जातात. येथेंही कामक्रोधादिक[1] अनेक शत्रु आहेत. ४४, ४५ हे मांजरें उंदरांना भिवावितात, त्याचप्रमाणें मनाला नित्य भिवावितात. तुझें नामस्मरण करणाऱ्या लोकांच्या अंतःकरणापुढें तुझें रूपही नित्य व्यक्त होतें. ४६ रामा! जे लोक तुझी पूजा करण्यांत तत्पर असतात, तुझें चरितामृत सेवन करण्यांत उत्कंठित असतात, आणि तुझ्या भक्तांची संगति धरितात, त्यांना संसार म्हणजे गोष्पदासारखा[3] वाटूं लागतो. ४७ म्हणून मी सर्वदा तुझ्या सगुणरूपाचें चित्तांत ध्यान करून मुक्त होत्साता त्रैलोक्यांत फिरत असतों. आणि त्यामुळेंच मी सर्व दैवतांनाही पूज्य झालों आहें. ४८ रामा! देवांचें हित योजून तूं मोठें कार्य केलें आहेस. प्रभो! कुंभकर्णाचा वध केल्यानें आजवर पृथ्वीला झालेला भार नाहींसा झाला आहे.

१. काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर, हे षड्रिपु. २. सदृश वर्णनः—'भक्त्यावेश्य मनो यस्मिन् वाचा यन्नाम कीर्तयन्। त्यजन् कलेवरं योगी मुच्यते कामकर्मभिः॥'—भागवत १,९. ३. गोष्पद—चिखलांत उमटलेलें गाईचें पाऊल.

श्वो हनिष्यति सौमित्रिरिंद्रजेतारमाहवे। हनिष्यसेऽथ राम त्वं परश्वो दश-
कंधरम् ॥५०॥ पश्यामि सर्वं देवेश सिद्धैः सह नभोगतः। अनुगृह्णीष्व
मां देव गमिष्यामि सुरालयम् ॥ ५१ ॥ इत्युक्त्वा राममामंत्र्य नारदो
भगवानृषिः। ययौ देवैः पूज्यमानो ब्रह्मलोकमकल्मषम् ॥५२॥ भ्रातरं
निहतं श्रुत्वा कुंभकर्णं महाबलम्। रावणः शोकसंतप्तो रामेणाक्लिष्टकर्मणा
॥५३॥ मूर्च्छितः पतितो भूमावुत्थाय विललाप ह। पितृव्यं निहतं श्रुत्वा
पितरं चातिविह्वलम् ॥५४॥ इंद्रजित्प्राह शोकार्तं त्यज शोकं महामते। मयि
जीवति राजेंद्र मेघनादे महाबले ॥ ५५॥ दुःखस्यावसरः कुत्र देवांतक
महामते। व्येतु ते दुःखमखिलं स्वस्थो भव महीपते ॥५६॥ सर्वं समीकरि-
ष्यामि हनिष्यामि च वै रिपून्। गत्वा निकुंभिलां सद्यस्तर्पयित्वा हुताशनम्
॥५७॥ लब्ध्वा रथादिकं तस्मादजेयोऽहं भवाम्यरेः। इत्युक्त्वा त्वरितं गत्वा

४९ रामा! उद्यां युद्धामध्ये लक्ष्मण इंद्रजिताला मारील, आणि परवां तू त्या दशाननाचा वध करिशील. ५० देवेशा! हा सर्व प्रकार मी सिद्धांसह[1] आकाशांतून पाहीन. देवा! मजवर कृपा कर. मी देवलोकाला जातों.' ५१ असें बोलून देवांनाही पूज्य अशा त्या भगवान् नारद ऋषींनीं रामाचा निरोप घेतला, आणि ते निष्पाप अशा ब्रह्मलोकीं गेले. ५२ आपला महाबलिष्ठ बंधु कुंभकर्ण रामानें अनायासें मारिला, ही गोष्ट ऐकून रावण शोकसंतप्त झाला. ५३ मूर्च्छा येऊन तो जमिनीवर पडला. नंतर शुद्धीवर येऊन त्यानें नाना प्रकारें विलाप केला. चुलता मरण पावला, आणि पिता अत्यंत व्याकुळ आहे, हें ऐकून त्या शोकाकुलाला—पित्याला—इंद्रजित् म्हणाला, 'महामते! शोक सोडून द्या. राजेंद्रा! मी महाबलवान् मेघनाद जीवंत असतां, आपल्याला शोक करण्याचें काय कारण? महामते! आपण देवांचाही नाश करणारे आहां. पृथ्वीपते! आपलें सर्व दुःख नाहींसें होवो! आपण स्वस्थ व्हा! ५४,५५,५६ मी शत्रूंना मारीन, आणि त्यांची आमची स्थिति सारखी करीन. आधीं निकुंभिलेला[2] जाऊन अग्नीला प्रसन्न करून घेतों. ५७ त्या अग्नीपासून रथादि साहित्य संपादन करितों. असें केल्यानें मी शत्रूला अजिंक्य होईन.' असें बोलून इंद्रजित त्या निर्देश केलेल्या निकुंभिलेच्या

१. सिद्ध—एक देवयोनि. २. निकुंभिला—लंकेच्या पश्चिम दरवाजावरील विवर.

निर्दिष्टं हवनस्थलम् ॥ ५८ ॥ रक्तमाल्यांबरधरो रक्तगंधानुलेपनः । निकुंभिलास्थले मौनी हवनायोपचक्रमे ॥ ५९ ॥ विभीषणोऽथ तच्छ्रुत्वा मेघनादस्य चेष्टितम् । प्राह रामाय सकलं होमारंभं दुरात्मनः ॥ ६० ॥ समाप्यते चेद्धोमोऽयं मेघनादस्य दुर्मतेः । तदाऽजेयो भवेद्राम मेघनादः सुरासुरैः ॥ ६१ ॥ अतः शीघ्रं लक्ष्मणेन घातयिष्यामि रावणिम् । आज्ञापय मया सार्धं लक्ष्मणं बलिनां वरम् । हनिष्यति न संदेहो मेघनादं तवानुजः ॥ ६२ ॥ श्रीरामचंद्र उवाच ॥ अहमेवागमिष्यामि हंतुमिंद्रजितं रिपुम् । आग्नेयेन महास्त्रेण सर्वराक्षसघातिना ॥ ६३ ॥ विभीषणोऽपि तं प्राह नासावन्यैर्निहन्यते । यस्तु द्वादश वर्षाणि निद्राहारविवर्जितः ॥ ६४ ॥ तेनैव मृत्युर्निर्दिष्टो ब्रह्मणास्य दुरात्मनः । लक्ष्मणस्तु अयोध्याया निर्गम्यायात्त्वया सह ॥ ६५ ॥ तदादि निद्रा-

होमस्थली गेला. ५८ त्यानें तांबडी फुलें आणि वस्त्रें धारण केली, रक्तगंधाची उटी अंगाला लाविली, मौन व्रत घेतलें, आणि तेथें हवन करण्यास प्रारंभ केला ५९ इकडे विभीषणाला इंद्रजितानें आरंभिलेल्या कार्याची वार्ता समजली. तेव्हां त्या दुरात्म्यानें आरंभिलेल्या होमाची सर्व कथा त्यानें रामाला सांगितली. ६० (तो म्हणाला,) 'ह्या दुष्टानें आरंभिलेला होम समाप्तीस जाईल, तर रामा! हा मेघनाद देवांना आणि असुरांनाही अजिंक्य होईल. ६१ म्हणून मी लवकर ह्या रावणपुत्राचा लक्ष्मणाकडून वध करवितों. बलवंतांमध्यें श्रेष्ठ अशा लक्ष्मणाला माझ्याबरोबर येण्यास आज्ञा दे. तो तुझा कनिष्ठ बंधु इंद्रजिताचा वध करील, यांत संशय नाहीं.' ६२ राम म्हणाला, 'इंद्रजित् शत्रूचा वध करण्याकरितां मीच येतों. सर्व राक्षसांचा घात करण्याविषयीं समर्थ अशा आग्नेयास्त्रानें मी तें कार्य करीन.' ६३ त्यावर विभीषणानें त्याला सांगितलें कीं, 'हा ( इंद्रजित् ) दुसऱ्या कोणाच्या हातून मारला जाणार नाहीं. जो बारा वर्षेपर्यंत निद्रा व आहार यांचा त्याग करून राहिला असेल, ६४ त्याच्याच हातून ह्या दुष्टाचा वध होणार, असें ब्रह्मदेवानें नेमिलें आहे. लक्ष्मण तुझ्याबरोबर अयोध्येंतून निघून आला, तेव्हांपासून हे रघूत्तमा! तो तुझ्या सेवेंत असल्यामुळें निद्रा आणि

१. 'हें सार मायामय, याचें कापट्य जाणतों ह्यो ! मी, । मोहुनि, निकुंभिलेला जाउनि बसला असेल तो होमी ॥ होमांतीं दिव्य श्रीस्यंदन जन्मेल भव्य कामगम । मग मर्त्यामर्त्यांला दुर्जय होईल, तो महानिगम. ॥'—मोरोपंत, मंत्ररामायण.

हारादीन्न जानाति रघूत्तम । सेवार्थं तव राजेंद्र ज्ञातं सर्वमिदं मया ॥ ६६ ॥ तदाज्ञापय देवेश लक्ष्मणं त्वरया मया । हनिष्यति न संदेहः शेषः साक्षाद्धराधरः ॥ ६७ ॥ त्वमेव साक्षाज्जगतामधीशो नारायणो लक्ष्मण एव शेषः । युवां धराभारनिवारणार्थं जातौ जगन्नाटकसूत्रधारौ ॥ ६८ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकांडे अष्टमः सर्गः ॥ ८ ॥

## युद्धकांड, सर्ग नववा.

श्रीमहादेव उवाच ॥ विभीषणवचः श्रुत्वा रामो वाक्यमथाब्रवीत् । जानामि तस्य रौद्रस्य मायां कृत्स्नां विभीषण ॥ १ ॥ स हि ब्रह्मास्त्रविच्छूरो मायावी च महाबलः । जानामि लक्ष्मणस्याऽपि स्वरूपं मम सेवनम् ॥ २ ॥ ज्ञात्वैवासमहं तूर्ष्णीं भविष्यत्कार्यगौरवात् ।

आहार हीं त्याला ठाऊकही नाहींत. हें सर्व मी जाणतों. ६५,६६ म्हणून देवेशा ! लक्ष्मणाला मजबरोबर येण्याची सत्वर आज्ञा द्या. हा ( लक्ष्मण ) त्या (इंद्रजिता )ला ठार करील, यांत संशय नाहीं. तो ( लक्ष्मण ) साक्षात् पृथ्वीला धारण करणारा शेष आहे. ६७ ( रामा ! ) तूं तर साक्षात् सर्व जगतांचा-चतुर्दश भुवनांचा-अधीश नारायण आहेस, आणि लक्ष्मण म्हणजे प्रत्यक्ष शेष होय. तुम्ही दोघे जगद्रूपी नाटकाचे सूत्रधार असून पृथ्वीचा भार निवारण करण्याकरितां म्हणूनच (पृथ्वीवर) अवतरलां आहां. ६८ ”

**युद्धकांड, आठवा सर्ग समाप्त.**

श्रीमहादेव म्हणाला, “ विभीषणाचें भाषण ऐकून राम बोलला, विभीषणा ! त्या तामसी ( राक्षसाचें ) सर्व कपट मला ठाऊक आहे. १ तो ब्रह्मास्त्रविद्यानिपुण आहे, शूर आहे, महाबलवान् आहे, तसाच मायावी-कपटी-आहे. लक्ष्मणाचें स्वरूप, व तो माझी करीत असलेली सेवा मला कळत आहे. २ हें समजत असूनही मी स्वस्थ राहिलों, ह्याचें कारण म्हणजे त्याच्या हातून पुढें होणारी महत्वाची कामगिरी

१. सप्त स्वर्गलोक व सप्त पाताल लोक मिळून चतुर्दश भुवनें. २. ब्रह्मास्त्राचा उपक्रम व उपसंहार जाणणारा, तें टाकावें कसें व परत घ्यावें कसें, ह्याचें बरोबर ज्ञान असणारा.

इत्युक्त्वा लक्ष्मणं प्राह रामो ज्ञानवतां वरः ॥ ३ ॥ गच्छ लक्ष्मण सैन्येन महता जहि रावणिम् । हनूमत्प्रमुखैः सर्वैर्यूथपैः सह लक्ष्मण ॥ ४ ॥ जांबवानृक्षराजोऽयं सह सैन्येन संवृतः । विभीषणश्च सचिवैः सह त्वामभियास्यति ॥ ५ ॥ अभिज्ञस्तस्य देशस्य जानाति विवराणि सः । रामस्य वचनं श्रुत्वा लक्ष्मणः सविभीषणः ॥ ६ ॥ जग्राह कार्मुकं श्रेष्ठमन्यद्भीमपराक्रमः । रामपादांबुजं स्पृश्य हृष्टः सौमित्रिरब्रवीत् ॥ ७ ॥ अद्य मत्कार्मुकान्मुक्ताः शरा निर्भिद्य रावणिम् । गमिष्यंति हि पातालं स्नातुं भोगावतीजले ॥ ८ ॥ एवमुक्त्वा स सौमित्रिः परिक्रम्य प्रणम्य तम् । इंद्रजिन्निधनाकांक्षी ययौ त्वरितविक्रमः ॥ ९ ॥ वानरैर्बहुसाहस्रैर्हनूमान्पृष्ठतोऽन्वगात् । विभीषणश्च सहितो मंत्रिभिस्त्वरितं ययौ ॥ १० ॥ जांबवत्प्रमुखा ऋक्षाः सौमित्रिं त्वरयान्वयुः । गत्वा निकुंभिलादेशं लक्ष्मणो वानरैः सह ॥ ११ ॥ अपश्यद्बलसंघातं

हें होय.' असें बोलून त्या महाज्ञानी रामानें लक्ष्मणाला म्हटलें, ३ 'लक्ष्मणा ! मोठें सैन्य घेऊन जा, आणि इंद्रजिताचा वध कर. लक्ष्मणा ! मारुति वगैरे सर्व सेनापति बरोबर घे. ४ सकल सैन्यासह अश्वलांचा राजा जांबवान्, तसाच विभीषणही आपल्या मंत्र्यांसह तुजबरोबर येईल. ५ त्या देशाचा तो माहितगार आहे. तेथील विवरांचीही त्याला माहिती आहे.' रामाचें तें भाषण ऐकून ( तसें करण्याचें ) लक्ष्मणानें विभीषणासह मान्य केलें. ६ त्या भीमपराक्रमी लक्ष्मणानें दुसरें मोठें धनुष्य हातांत घेतलें. मग रामाच्या पदकमलाला वंदन करून लक्ष्मण आनंदानें बोलला, ७ 'आज माझ्या धनुष्यापासून सुटलेले बाण इंद्रजिताचें ( मस्तक ) छेदून ( पातालांतील ) भोगावती नदीच्या उदकांत स्नान करण्याकरितां जातील !' ८ इतकें बोलून लक्ष्मणानें रामाला प्रदक्षिणा घालून नमस्कार केला, आणि इंद्रजिताला मारण्याची इच्छा धरून तो त्वरितचालीनें निघाला. ९ त्याच्या मागून अनेक सहस्र वानर घेऊन मारुति निघाला. विभीषणही मंत्र्यांसह त्वरित निघाला. १० तसेच जांबवान् वगैरे रीसें लक्ष्मणामागून त्वरेनें निघाले. ( अशा रीतीनें ) लक्ष्मण वानरांसह निकुंभिलाँ प्रदेशीं पोंचला. ११ इतक्यांत लांबूनच राक्षसांनीं भरलेला

१. पातालगंगा. २. अस्वल. ३. निकुंभिला नांवाची गुहा.

दूराद्राक्षससंकुलम् । धनुरायम्य सौमित्रिर्यत्तोऽभूद्भूरिविक्रमः ॥ १२ ॥ अंगदेन च वीरेण जांबवान् राक्षसाधिपः । तदा विभीषणः प्राह सौमित्रिं पश्य राक्षसान् ॥ १३ ॥ यदेतद्राक्षसानीकं मेघश्यामं विलोक्यते । अस्यानीकस्य महतो भेदने यत्नवान् भव ॥ १४ ॥ राक्षसेंद्रसुतोऽप्यस्मिन् भिन्ने दृश्यो भविष्यति । अभिद्रवाशु यावद्वै नैतत्कर्म समाप्यते ॥ १५ ॥ जहि वीर दुरात्मानं हिंसापरमधार्मिकम् । विभीषणवचः श्रुत्वा लक्ष्मणः शुभलक्षणः ॥ १६ ॥ ववर्ष शरवर्षाणि राक्षसेंद्रसुतं प्रति । पाषाणैः पर्वताग्रैश्च वृक्षैश्च हरियूथपाः ॥ १७ ॥ निर्जघ्नुः सर्वतो दैत्यांस्तेऽपि वानरयूथपान् । परश्वधैः शितैर्बाणैरसिभिर्यष्टितोमरैः ॥ १८ ॥ निर्जघ्नुर्वानरानीकं तदा शब्दो महानभूत् । स संप्रहारस्तुमुलः संजज्ञे हरिरक्षसाम् ॥ १९ ॥ इंद्रजित्स्वबलं सर्वमर्द्यमानं

एक सैन्यसमूह त्याच्या दृष्टीस पडला. त्यावर तो महापराक्रमी लक्ष्मण आपलें धनुष्य सज्ज करून तयार झाला. १२ त्याच्या बरोबर अंगद वीर व जांबवान् हेही सिद्ध झाले. तेव्हां राक्षसाधिप विभीषण लक्ष्मणाला म्हणाला, '( लक्ष्मणा ! ) हे पहा राक्षस. १३ हें जें मेघांसारखें श्यामवर्ण राक्षससैन्य दिसत आहे, त्या मोठ्या सैन्याला फोडण्याचा प्रयत्न कर. १४ या सैन्याची वाताहात झाली असतां तो राक्षस राजपुत्र इंद्रजित् तुझ्या दृष्टीस पडेल. त्यानें आरंभिलेलें ( अनुष्ठान )कर्म संपलें नाहीं, तोंवर त्याच्या अंगावर जा. १५ हे वीरा ! त्या दुष्टाचा वध कर. हिंसा करणें म्हणजे मोठें धर्मकार्य होय, असें त्याला वाटतें.' त्या सुलक्षणी लक्ष्मणानें विभीषणाचें भाषण ऐकून, १६ त्या राक्षसाधिपतीच्या पुत्रावर बाणाची एकसारखी वृष्टि केली. ( त्याबरोबर ) वानरसेनापतींनीं पाषाण, पर्वतशिखरें आणि वृक्ष यांचा चारी बाजूंनी दैत्यांवर मार केला. त्यांनींही वानरसेनापतींवर आणि त्यांच्या सेनेवर कुऱ्हाडी, तीक्ष्ण बाण, तरवारी, काठ्या आणि तोमर यांचा वर्षाव केला. त्या शस्त्रांचा मोठा खणखणाट होत होता. तें वानरांचें आणि राक्षसांचें युद्ध मोठें भयंकर झालें. १७,१८,१९ आपलें सर्व सैन्य रणांगणावर शत्रुकडून मार

१. भाले. २. इंद्रजित् व लक्ष्मण यांमधील युद्धाचें तुलसीदासजींनीं वर्णन केलें आहेः— ' मारु मारु धरु धरु धरु मारू । सीस तोरि गहि भुजा उपारू । असिरव पूरि रही नवखंडा । धावहिँ जहँ तहँ रुंड प्रचंडा ॥ लछिमन मेघनाद दोउ जोधा । भिरहिँ परसपर करि अति क्रोधा । एकहिँ एक सकहिँ नहिँ जीती । निसिचर छल बलकरइ अनीति ॥ '

विलोक्य सः । निकुंभिलां च होमं च त्यक्त्वा शीघ्रं विनिर्गतः
॥ २० ॥ रथमारुह्य सधनुः क्रोधेन महतागमत् । समाह्वयित्वा
सौमित्रिं युद्धाय रणमूर्धनि ॥ २१ ॥ सौमित्रे मेघनादोऽहं मया
जीवन्न मोक्ष्यसे । तत्र दृष्ट्वा पितृव्यं स प्राह निष्ठुरभाषिणम् ॥ २२ ॥
इहैव जातः संवृद्धः साक्षाद् भ्राता पितुर्मम । यस्त्वं स्वजनमुत्सृज्य पर-
भृत्यत्वमागतः ॥ २३ ॥ कथं द्रुह्यसि पुत्राय पापीयानसि दुर्मतिः ।
इत्युक्त्वा लक्ष्मणं दृष्ट्वा हनूमत्पृष्ठतः स्थितम् ॥२४॥ उद्यदायुधनिस्त्रिंशे
रथे महति संस्थितः । महाप्रमाणमुद्यम्य घोरं विस्फारयन्धनुः ॥२५॥
अद्य वो मामका बाणाः प्राणान्पास्यंति वानराः । ततः शरं दाशरथिः
संधायामित्रकर्शनः ॥२६॥ ससर्ज राक्षसेंद्राय क्रुद्धः सर्प इव श्वसन् ।
इंद्रजिद्रक्तनयनो लक्ष्मणं समुदैक्षत ॥२७॥ शक्राशनिसमस्पर्शैर्लक्ष्मणे-

स्थात असल्याचें पाहून निकुंभिला आणि होम टाकून देऊन इंद्रजित बाहेर पडला. २० मोठ्या क्रोधानें रथांत बसून व धनुष्य हातीं घेऊन तो आला, आणि रणभूमीवर लक्ष्मणाला युद्धाला बोलावून म्हणाला, २१ 'लक्ष्मणा ! मी इंद्रजित् आहें. तुझी माझ्या हातून जीवंत सुटका होणार नाहीं.' इतक्यांत तेथें चुलत्याला—विभीषणाला—पाहून (इंद्रजित) त्याला निष्ठुरतेनें बोलला. २२ तो म्हणाला, 'तूं माझ्या पित्याचा साक्षात् बंधु असून ह्याच लंकेंत जन्माला आलास व वाढलास, आणि आतां आपल्या स्वजनांना सोडून तूं शत्रूची सेवा करूं लागला आहेस. २३ मी तुला पुत्रासारखा असून तूं माझा द्वेष करीत आहेस ! तूं महान् पापी, दुर्मति आहेस.' असें बोलून हनुमंताच्या पाठीवर बसलेल्या लक्ष्मणाला त्यानें पाहिलें. २४ या वेळीं तो ( इंद्रजित् ) मोठ्या रथांत बसला होता. त्यांत अनेक आयुधें आणि तरवारी सज्ज करून ठेवलेल्या होत्या. मोठ्या आकारा[1]चें एक धनुष्य उचलून घेऊन त्याचा त्यानें भयंकर टणत्कार केला. २५ ( तो म्हणाला, ) 'वानरांनो, आज माझे बाण तुमच्या प्राणांचें प्राशन करणार.' इकडे शत्रूला हायहाय करविणाऱ्या लक्ष्मणानेंही धनुष्यावर बाण जोडला, २६ आणि तो राक्षसश्रेष्ठावर सोडला. या वेळीं तो क्रुद्ध होऊन फूत्कार टाकणाऱ्या सर्पाप्रमाणें दिसत होता. इंद्रजिताचे डोळे ( क्रोधानें ) लाल झाले. त्यानें लक्ष्मणाकडे पाहिलें, २७ तोंच लक्ष्मणानें सोडलेले, इंद्राच्या वज्रासमान, तीक्ष्ण

१. हे धनुष्य साडेसात वितीं लांब होते, असें पुराणांतरीं वर्णन आहे.

नाहतः शरैः। मुहूर्तमभवन्मूढः पुनः प्रत्याहृतेंद्रियः ॥ २८ ॥ ददर्शावस्थितं वीरं वीरो दशरथात्मजम्। सोऽभिचक्राम सौमित्रिं क्रोधसंरक्तलोचनः ॥ २९ ॥ शरान्धनुषि संधाय लक्ष्मणं चेदमब्रवीत्। यदि ते प्रथमे युद्धे न दृष्टो मे पराक्रमः ॥ ३० ॥ अद्य त्वां दर्शयिष्यामि तिष्ठेदानीं व्यवस्थितः। इत्युक्त्वा सप्तभिर्बाणैरभिविव्याध लक्ष्मणम् ॥३१॥ दशभिश्च हनूमंतं तीक्ष्णधारैः शरोत्तमैः। ततः शरशतेनैव संप्रयुक्तेन वीर्यवान् ॥ ३२ ॥ क्रोधद्विगुणसंरब्धो निर्बिभेद विभीषणम्। लक्ष्मणोऽपि तथा शत्रुं शरवर्षैरवाकिरत् ॥ ३३ ॥ तस्य बाणैः सुसंविद्धं कवचं कांचनप्रभम्। व्यशीर्यत रथोपस्थे तिलशः पतितं भुवि ॥ ३४ ॥ ततः शरसहस्रेण संक्रुद्धो रावणात्मजः। बिभेद समरे वीरं लक्ष्मणं भीमविक्रमम् ॥ ३५ ॥ व्यशीर्यतापतद्दिव्यं कवचं लक्ष्मणस्य च। कृतप्रतिकृतान्योन्यं बभूवतुरभिद्रुतौ ॥३६॥ अभीक्ष्णं निःश्वसंतौ तौ युध्येतां

बाण अंगाला लागून ( इंद्रजित् ) मुहूर्तमात्र मूर्च्छित झाला. पण तो लागलाच शुद्धीवर आला. २८ दशरथपुत्र वीर ( लक्ष्मण ) आपल्यापुढें उभा आहे, असें पाहून क्रोधानें लाल डोळे करून तो वीर ( इंद्रजित् ) लक्ष्मणावर धांवून गेला. २९ त्यानें धनुष्यावर बाण जोडला, आणि लक्ष्मणाला म्हटलें, ' प्रथम युद्धांत माझा पराक्रम तुझ्या दृष्टीस पडला नाहीं, तरी तो आज मी तुला दाखवितों. माझ्यापुढें आतां व्यवस्थितपणें उभा रहा. ' असें बोलून इंद्रजितानें लक्ष्मणाला सात बाण मारिले. ३०, ३१ तसेच तीक्ष्ण धारेचे दहा उत्तम बाण त्यानें मारुतीवर सोडिले. नंतर दुप्पट क्रोधसंतप्त झालेल्या त्या वीर्यशाली इंद्रजितानें विभीषणावर शंभर बाण टाकून त्याला जर्जर केलें. लक्ष्मणानेंही तशीच शत्रूवर सारखी शरवृष्टि केली. ३२, ३३ त्या लक्ष्मणाच्या बाणांनीं इंद्रजिताचें सोन्यासारखें शोभिवंत कवच—चिलखत-तुटून रथांत पडलें. त्याजवर पुनः ( लक्ष्मणाचे ) बाण पडून त्याचे तिळाएवढे तुकडे होऊन तें जमिनीवर पडलें. ३४ नंतर अतिक्रोधाविष्ट होऊन इंद्राजितानें रणभूमीवर त्या भीमपराक्रमी लक्ष्मण वीराला सहस्र बाण मारिले. ३५ त्यामुळें लक्ष्मणाचें दिव्य कवच तुटून पडलें. पुढें त्या दोघांनीं एकमेकांच्या अंगावर धांवून जाऊन परस्परांचें उसनें फेडिलें. ३६ त्या दोघांमध्यें तुमुल युद्ध झालें. दोघेही सारखे

तुमुलं पुनः । शरसंवृतसर्वांगौ सर्वतो रुधिरोक्षितौ ॥ ३७ ॥ सुदीर्घकालं तौ वीरावन्योन्यं निशितैः शरैः । अयुध्येतां महासत्त्वौ जयाजयविवर्जितौ ॥ ३८॥ एतस्मिन्नंतरे वीरो लक्ष्मणः पंचभिः शरैः । रावणेः सारथिं साश्वं रथं च समचूर्णयत् ॥ ३९ ॥ चिच्छेद कार्मुकं तस्य दर्शयन्हस्तलाघवम् । सोऽन्यत्तु कार्मुकं भद्रं सज्यं चक्रे त्वरान्वितः ॥४०॥ तच्चापमपि चिच्छेद लक्ष्मणस्त्रिभिराशुगैः । तमेव छिन्नधन्वानं विव्याधानेकसायकैः ॥ ४१ ॥ पुनरन्यत्समादाय कार्मुकं भीमविक्रमः । इन्द्रजिल्लक्ष्मणं बाणैः शितैरादित्यसन्निभैः ॥ ४२ ॥ बिभेद वानरान्सर्वान्बाणैरापूरयन्दिशः । तत ऐंद्रं समादाय लक्ष्मणो रावणिं प्रति ॥ ४३ ॥ संधायाकृष्य कर्णांतं कार्मुकं दृढनिष्ठुरम् । उवाच लक्ष्मणो वीरः स्मरन् रामपदांबुजम् ॥ ४४ ॥ धर्मात्मा सत्यसंधश्च रामो दाशरथिर्यदि । त्रिलोक्यामप्रतिद्वंद्वस्तदेनं जहि

दोघे श्वास टाकीत होते. दोघांच्याही सर्वांगांवर बाणांचे घाय लागून ते पूर्णपणे रक्तानें न्हाले होते. ३७ पुष्कळ वेळपर्यंत परस्परांवर तीक्ष्ण बाण टाकून ते दोघे महापराक्रमी वीर लढले. पण जय किंवा अपजय कोणाच्याही वांट्यास येईना. ३८ लक्ष्मण वीरानें पांच बाण टाकून इंद्रजिताचा सारथि, तसाच त्याचा रथ आणि घोडे यांचा चूर केला. ३९ त्याचप्रमाणें त्याचें धनुष्यही (आपल्या बाणानें,) तोडून टाकून (लक्ष्मणानें) आपलें हस्तचापल्य दाखविलें. त्यावर (इंद्रजितानें) लागलेंच दुसरें उत्तम धनुष्य सज्ज केलें. ४० लक्ष्मणानें त्या धनुष्याचाही तीन बाण टाकून छेद केला. धनुष्य तुटून पडलें असतांही त्यानें त्या आयुधहीन झालेल्या (इंद्रजिता)वर अनेक बाण सोडिले. ४१ त्यावर त्या भीमविक्रमी इंद्रजितानें दुसरें धनुष्य घेतलें, आणि आपल्या सूर्यासारख्या दिव्य बाणांनी लक्ष्मणाला विंधिलें. त्यानें चारी दिशांना बाणांचा पूर करून वानरांची धूळधाण केली. तेव्हां लक्ष्मणानें ऐंद्र शराची धनुष्यावर योजना केली, आणि तो इंद्रजितावर रोंखून धनुष्य दृढ धरिलें, आणि रामाचे चरणकमलाचें स्मरण करून आकर्ण दोरी ओढिली. ४२, ४३, ४४ तो म्हणाला, '(या भूमीवर) दाशरथि राम जर धर्मात्मा, सत्यप्रतिज्ञ आणि त्रैलोक्यांत अद्वितीय वीर असेल. तर (हे बाणा!) तं ह्या इंद्राजिताचा वध

१. या प्रसंगाचें एकनाथांनी केलेलें सुंदर वर्णनः—' श्रीराम धर्माधर्मातीत । तोचि धर्मात्मा सुनिश्चित । येणें सत्यें शिरःपान । हो रणांत शत्रूचा ॥ श्रीराम सत्यासत्यातीत । श्रीराम

रावणिम् ॥४५॥ इत्युक्त्वा बाणमाकर्णाद्विकृष्य तमजिह्मगम् । लक्ष्मणः समरे वीरः ससर्जेंद्रजितं प्रति ॥ ४६ ॥ स शरः सशिरस्त्राणं श्रीमज्ज्वलितकुंडलम् । प्रमथ्येंद्रजितः कायात्पातयामास भूतले ॥ ४७ ॥ ततः प्रमुदिता देवाः कीर्तयंतो रघूत्तमम् । ववर्षुः पुष्पवर्षाणि स्तुवंतश्च मुहुर्मुहुः ॥ ४८ ॥ जहर्ष शक्रो भगवान्सह देवैर्महर्षिभिः । आकाशेऽपि च देवानां शुश्रुवे दुंदुभिस्वनः ॥ ४९ ॥ विमलं गगनं चासीत्स्थिराभूद्विश्वधारिणी । निहतं रावणिं दृष्ट्वा जयजल्पसमन्वितः ॥ ५० ॥ गतश्रमः स सौमित्रिः शंखमापूरयद्रणे । सिंहनादं ततः कृत्वा ज्याशब्दमकरोद्विभुः ॥ ५१ ॥ तेन नादेन संहृष्टा वानराश्च गतश्रमाः । वानरेंद्रैश्च सहितः स्तवद्भिर्हृष्टमानसैः ॥ ५२ ॥ लक्ष्मणः परितुष्टात्मा ददर्शाभ्येत्य

कर. ' ४५ असें बोलून तो सरळ जाणारा बाण आकर्ण ओढून रणांगणावर त्या वीर लक्ष्मणानें इंद्रजिताच्या अंगावर सोडला ४६ त्या बाणानें ( कानांतील ) चमकणारीं कुंडलें आणि शिरस्त्राण, यांसहित इंद्रजिताचें सुंदर मस्तक धडापासून वेगळें केलें आणि जमिनीवर पाडिलें. ४७ त्या वेळीं देवांना परमानंद होऊन ते रघूत्तमा-(रामा)ची कीर्ति गाऊं लागले. त्याची वारंवार स्तुति करून त्यांनी स्वर्गांतून त्याजवर पुष्पवृष्टि केली. ४८ भगवान् इंद्र, सकल देव आणि महर्षि यांना हर्ष झाला, आणि आकाशांत देवांचे दुंदुभि वाजूं लागून त्यांचा नाद ऐकूं येऊं लागला. ४९ आकाश स्वच्छ झालें, आणि पृथ्वी इंद्रजित् मेल्याचें पाहून स्थिर झाली. ( सर्वांकडून ) लक्ष्मणाचा जयजयकार झाला. ५० लक्ष्मणाला ( आतां ) श्रम दूर झाल्यासारखें वाटून त्यानें रणभूमीवर शंख वाजविला. नंतर सिंहनाद करून त्या शक्तिमान् लक्ष्मणानें धनुष्याच्या दोरीचा टणत्कार केला. ५१ तो नाद ऐकून वानरांना हर्ष होऊन त्यांनाही श्रम दूर झाल्याचें वाटलें. वानरवीरांच्या अंतःकरणांना हर्ष वाटून त्यांनी (लक्ष्मणाची) स्तुति करण्यास प्रारंभ केला. ५२ लक्ष्मणाचेंही मन संतुष्ट झालें. तो

सत्याचे निजसत्य । जरी हें श्रीरामसत्यव्रत । हो शिरःपात शत्रूचा ॥ श्रीराम स्त्रीपुरुषातीत । तोचि स्त्रीपुरुष समस्त । हेंचि श्रीरामाचें निजव्रत । तरी हो शिरःपात शत्रूचा ॥'—भा रामायण.

१. ' तेव्हां जयजयशब्दे गर्जति मुनि सिद्ध देवगंधर्व । पर्व अपूर्व तयांला जाले, आनंद पावले सर्व ॥ ते दुंदुभि वाजविती, धिमिधिमिधिमि देवलोक आनंदे, । गंधर्व करिति तननन, तत्थैथैयेय अप्सरावृंदें ॥'—मोरोपंत, मंत्ररामायण.

राघवम् । हनूमद्राक्षसाभ्यां च सहितो विनयान्वितः ॥ ५३ ॥ ववंदे भ्रातरं रामं ज्येष्ठं नारायणं विभुम् । त्वत्प्रसादाद्रघुश्रेष्ठ हतो रावणिराहवे ॥ ५४ ॥ श्रुत्वा तल्लक्ष्मणाद्भक्त्या तमालिंग्य रघूत्तमः । मूर्ध्न्यवघ्राय मुदितः सस्नेहमिदमब्रवीत् ॥ ५५ ॥ साधु लक्ष्मण तुष्टोऽस्मि कर्म ते दुष्करं कृतम् । मेघनादस्य निधने जितं सर्वमरिंदम ॥ ५६ ॥ अहोरात्रैस्त्रिभिर्वीरः कथंचिद्विनिपातितः । निःसपत्नः कृतोऽस्म्यद्य निर्यास्यति हि रावणः ॥ ५७ ॥ पुत्रशोकान्मया योद्धुं तं हनिष्यामि रावणम् । मेघनादं हतं श्रुत्वा लक्ष्मणेन महाबलम् ॥ ५८ ॥ रावणः पतितो भूमौ मूर्च्छितः पुनरुत्थितः । विललापातिदीनात्मा पुत्रशोकेन रावणः ॥ ५९ ॥ पत्रस्य गुणकर्माणि संस्मरन्पर्यदेवयत । अद्य

वानरांसह परतला. मग लक्ष्मणाने हनुमान् आणि बिभीषण यांना बरोबर घेऊन नम्रतापूर्वक रामाची भेट घेतली, ५३ व सर्वव्यापी साक्षात् नारायण, असा आपला ज्येष्ठ बंधु राम, त्याला वंदन केलें. ( तो म्हणाला, ) 'रघुश्रेष्ठा! आज रणांगणावर रावणपुत्रा ( इंद्रजिता )चा वध झाला आहे, ही तुझी कृपा होय.' ५४ लक्ष्मणाच्या तोंडून ती गोष्ट ऐकून रामाला आनंद झाला. त्यानें प्रेमपूर्वक त्याला आलिंगन दिलें, आणि मस्तकाच्या ठिकाणी हुंगून स्नेहपुरस्सर म्हटलें, ५५ 'लक्ष्मणा ! फार चांगलें केलेंस. तूं दुष्कर कार्य शेवटास नेलेंस, याबद्दल मला संतोष वाटत आहे. मेघनाद मृत्यु पावला, त्यामुळें हे शत्रुमर्दना ! आम्हीं सर्व जिंकल्यासारखें झालें आहे. ५६ तीन दिवस आणि तीन रात्री कष्टानें युद्ध करून तूं त्या वीराला भूमीला मिळविलेंस ! आज तूं माझे सर्व शत्रू नाहीसे केले आहेस. आतां रावण पुत्रशोकामुळें माझ्याबरोबर लढण्यास येईल. त्या रावणाचा मी वध करीन.' इकडे लक्ष्मणानें महाबलवान् इंद्रजिताचा वध केला असें ऐकून, ५७, ५८ रावण मूर्च्छित होऊन जमिनीवर पडला. ( बऱ्याच वेळानें ) पुनः शुद्धीवर येऊन तो अत्यंत दीन होऊन पुत्रशोकानें विलाप करूं लागला. ५९ मुलाचे गुण आणि त्याची ( पराक्रमादि ) कृत्यें आठवून तो शोक करूं लागला. तो म्हणाला, 'इंद्रजित् मेल्याचें कळलें की, आज

१. 'सभामडपा वार घालुान मट । भुमा पाटता चार दु खे ललाट । मुखे बोलता इंद्रजीतू 'निमाला । पुरीमाजि तो थोर आकांत जाला ॥ तया रावणा मूर्छना सांवरेना । भुमीं अंग घाली कदा आवरेना । स्त्रियापुत्रकन्यादिकें तोंड घेती । प्रसंगीं तये थोर जाली रुदंती ॥ '— युद्धकांड, रामदास.

देवगणाः सर्वे लोकपाला महर्षयः ॥ ६० ॥ हतमिंद्रजितं ज्ञात्वा सुखं स्वप्स्यंति निर्भयाः । इत्यादि बहुशः पुत्रलालसो विललाप ह ॥ ६१ ॥ ततः परमसंक्रुद्धो रावणो राक्षसाधिपः । उवाच राक्षसान्सर्वान्विनाशयिषुराहवे ॥ ६२ ॥ स पुत्रवधसंतप्तः शूरः क्रोधवशं गतः । संवीक्ष्य रावणो बुद्ध्या हन्तुं सीतां प्रदुद्रुवे ॥ ६३ ॥ खड्गपाणिमथायांतं क्रुद्धं दृष्ट्वा दशाननम् । राक्षसीमध्यगा सीता भयशोकाकुलाभवत् ॥ ६४ ॥ एतस्मिन्नंतरे तस्य सचिवो बुद्धिमान् शुचिः । सुपार्श्वो नाम मेधावी रावणं वाक्यमब्रवीत् ॥ ६५ ॥ ननु नाम दशग्रीव साक्षाद्वैश्रवणानुजः । वेदविद्याव्रतस्नानः स्वकर्मपरिनिष्ठितः ॥ ६६ ॥ अनेकगुणसंपन्नः कथं स्त्रीवधमिच्छसि । अस्माभिः सहितो युद्धे हत्वा रामं च लक्ष्मणम् । प्राप्स्यसे जानकीं शीघ्रमित्युक्तः स न्यवर्तत ॥ ६७ ॥ ततो दुरात्मा

सर्व देवगण, लोकपाल, आणि मोठमोठे ऋषि, निर्भय होऊन सुखानें झोप घेतील.' इत्यादि बहुत प्रकारें त्या पुत्रवत्सल रावणानें शोक[1] केला. ६०,६१ नंतर अत्यंत क्रोधसंतप्त होऊन सर्व राक्षसांचा रणांगणी नाश करण्याचीच जणुं इच्छा धारण करून त्यानें त्यांस युद्धास जाण्याची आज्ञा केली. ६२ पुत्रवधानें अत्यंत संतप्त होऊन तो क्रोधाधीन झाला. त्यानें विचार करून सीतेला मारण्याचें ठरविलें, आणि तो तिजवर धांवून गेला. ६३ तरवार हातांत घेऊन आपणाकडे येणाऱ्या क्रोधाविष्ट रावणाला पाहून राक्षसीमध्यें बसलेली सीता भयभीत होऊन शोक करूं लागली. ६४ इतक्यांत त्या रावणाचा बुद्धिमान्, पवित्र आचरणाचा व विचारी, सुपार्श्व नांवाचा मंत्री जवळच होता, तो रावणाला बोलला, ६५ 'दशमुखा (रावणा)! तूं प्रत्यक्ष कुबेराचा कनिष्ठ बंधु आहेस, वेदविद्या व व्रतें यांत तूं निष्णात आहेस, स्वकर्माचरणांत तूं दक्ष आहेस, ६६ तूं अनेकगुणसंपन्न आहेस; असें असून स्त्रीवधाची इच्छा करीत आहेस, हें काय! आम्हांला बरोबर घेऊन चल, आणि रणांगणी रामाचा आणि लक्ष्मणाचा वध कर; म्हणजे तेव्हांच तुला सीतेची प्राप्ति होईल.' असें त्या ( सुपार्श्वा ) नें सांगितलें. तेव्हां रावण माघारा फिरला. ६७ नंतर त्या सहद्रा-

१. रावणाचा शोक–' दुःखें गडबडा लोळे । केश सुटले मोकळे । अश्रुधारा स्रवती डोळे । लाळ गळे दशमुखीं ॥ पुत्रशोकें अति संतप्त । नेत्रद्वारा अश्रु स्रवत । क्रोधें गरगरां नेत्र भ्रमत । अवघे पळत अति धाकें ॥ '–भा. रामायण.

सुहृदा निवेदितं वचः सुधर्म्यं प्रतिगृह्य रावणः । गृहं जगामाशु शुचा विमूढधीः पुनः सभां च प्रययौ सुहृद्वृतः ॥ ६८ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकांडे नवमः सर्गः ॥ ९ ॥

## युद्धकांड, सर्ग दहावा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ स विचार्य सभामध्ये राक्षसैः सह मंत्रिभिः । निर्ययौ येऽवशिष्टास्तै राक्षसैः सह राघवम् ॥ १ ॥ शलभः शलभैर्युक्तः प्रज्वलंतमिवानलम् । ततो रामेण निहताः सर्वे ते राक्षसा युधि ॥ २ ॥ स्वयं रामेण निहतस्तीक्ष्णबाणेन वक्षसि । व्यथितस्त्वरितं लंकां प्रविवेश दशाननः ॥ ३ ॥ दृष्ट्वा रामस्य बहुशः पौरुषं चाप्यमानुषम् । रावणो मारुतेश्चैव शीघ्रं शुक्रांतिकं ययौ ॥ ४ ॥ नमस्कृत्य दशग्रीवः शुक्रं प्रांजलिरब्रवीत् । भगवन् राघवेणैवं लंका राक्ष-

(सुपार्श्वा)चें न्याय्य बोलणें मान्य करून रावण घरी गेला. शोकामुळें त्याची बुद्धि मूढ होऊन गेली होती. तो लागलाच आप्तेष्टांना बरोबर घेऊन सभेंत आला. ६८"

**युद्धकांड, अध्याय नववा समाप्त.**

श्रीमहादेव म्हणाला, " सभेमध्यें राक्षसमंत्र्यांशीं मसलत करून उरलेल्या राक्षसांस बरोबर घेऊन तो ( रावण ) रामावर चालून गेला. १ तेव्हां पतंगानें पतंगांना घेऊन प्रदीप्त अग्नीवर चाल करून जावें, त्याप्रमाणें ( ही रावणाची कृति झाली. ) ते सर्व राक्षस रामाकडून रणांगणावर मारिले गेले. २ रावणाला, स्वतः रामाकडून, वक्षःस्थळीं प्रहार झाला; त्यामुळें तो व्यथित होऊन त्वरित लंकेला परत गेला. ३ रामाचा आणि मारुतीचा अलौकिक पराक्रम वरचेवर पाहून रावण त्वरेनें शुक्राचार्याकडे गेला. ४ रावणानें शुक्राचार्याला नमस्कार केला, आणि हात जोडून तो बोलला. ' भगवन् ! लंकेचा आणि राक्षस सेनापतींचा रामाकडन अशा प्रकारें नाश

१. शुक्राचार्य हा दैत्याचा गुरु होता. आपल्या मंत्रसिद्धीच्या–संजीविनी विद्येच्या–योगेंकरून तो रणांगणावर मेलेल्या असुरांना पुनः सजीव करीत असे.

सयूथपैः ॥ ५ ॥ विनाशिता महादैत्या निहताः पुत्रबांधवाः ।
कथं मे दुःखसंदोहस्त्वयि तिष्ठति सद्गुरौ ॥ ६ ॥ इति विज्ञापितो
दैत्यगुरुः प्राह दशाननम् । होमं कुरु प्रयत्नेन रहसि त्वं दशानन
॥ ७ ॥ यदि विघ्नो न चेद्धोमे तर्हि होमानलोत्थितः ॥ ८ ॥ महान्
रथश्च वाहाश्च चापतूणीरसायकाः । संभविष्यंति तैर्युक्तस्त्वमजेयो
भविष्यसि ॥ ९ ॥ गृहाण मंत्रान्मद्दत्तान् गच्छ होमं कुरु
द्रुतम् । इत्युक्तस्त्वरितं गत्वा रावणो राक्षसाधिपः ॥ १० ॥
गुहां पातालसदृशीं मंदिरे स्वे चकार ह । लंकाद्वारकपाटादि बद्ध्वा सर्वत्र
यत्नतः ॥ ११ ॥ होमद्रव्याणि संपाद्य यान्युक्तान्याभिचारिके । गुहां
प्रविश्य चैकांते मौनी होमं प्रचक्रमे ॥१२॥ उत्थितं धूममालोक्य महांतं
रावणानुजः । रामाय दर्शयामास होमधूमं भयाकुलः ॥ १३ ॥ पश्य
राम दशग्रीवो होमं कर्तुं समारभत् । यदि होमः समाप्तः स्यात्तदाऽजेयो

झाला आहे. माझे मोठमोठे दैत्य, पुत्र, बांधव त्यानें ठार केले. आपल्यासारख्या माझ्या सद्गुरूसमक्ष ही दुःखपरंपरा मजवर कोसळावी, हें कसें ? ' ५, ६ अशी रावणाची विज्ञापना ऐकून दैत्यगुरु ( शुक्राचार्य ) रावणाला म्हणाला, ' दशानना ! तूं प्रयत्नपूर्वक एकांतीं होम कर. ७ तुझ्या होमांत जर कांहीं विघ्न आलें नाहीं, तर त्या होमाग्नीपासून एक मोठा रथ, घोडे, धनुष्य आणि बाणांनीं भरलेला भाता हीं उत्पन्न होतील. तीं तुला लाधलीं असतां तूं अजिंक्य होशील. ८, ९ मी तुला मंत्र देतों, ते घे; आणि जाऊन लवकर होम कर. ' असें ( शुक्राचार्यांनें ) सांगितलें असतां राक्षसाधिपति रावण तेथून तत्काल निघाला. १० त्यानें पाताळासारखी एक गुहा आपल्या स्वतःच्या मंदिरांत तयार केली. त्यानें लंकेचीं द्वारें, कवाडें वगैरे चारी बाजूंनीं प्रयत्नपूर्वक लावून घेतलीं. ११ त्या अघोरे अनुष्ठानाकरितां सांगितलेली होमद्रव्यें त्यानें संपादन केलीं, आणि गुहेंत प्रवेश करून मौनव्रतानें एकांतांत होम आरंभिला. १२ तेथून निघालेला मोठा धूर पाहून रावणानुज ( विभीषण ) भयभीत झाला. त्यानें तो होमधूर रामाला दाखवून म्हटलें, १३ ' रामा ! पहा, रावणानें होम करण्यास प्रारंभ केला आहे. हा होम शेवटास जाईल, तर रावण अजिंक्य

१. या जारणमारण अनुष्ठानानें रामाला मारण्याचा रावणाचा उद्देश होता.

भविष्यति ॥ १४ ॥ अतो विघ्नाय होमस्य प्रेषयाशु हरीश्वरान् । तथेति रामः सुग्रीवसंमतेनांगदं कपिम् ॥ १५ ॥ हनूमत्प्रमुखान्वीरानादिदेश महाबलान् । प्राकारं लंघयित्वा ते गत्वा रावणमंदिरम् ॥१६॥ दशकोट्यः प्लवंगानां गत्वा मंदिररक्षकान् । चूर्णयामासुरश्वांश्च गजांश्च न्यहनन् क्षणात् ॥ १७ ॥ ततश्च सरमा नाम प्रभाते हस्तसंज्ञया । विभीषणस्य भार्या सा होमस्थानमसूचयत् ॥ १८ ॥ गुहापिधानपाषाणमंगदः पादघट्टनैः । चूर्णयित्वा महासत्त्वः प्रविवेश महागुहाम् ॥ १९ ॥ दृष्ट्वा दशाननं तत्र मीलिताक्षं दृढासनम् । ततोऽगदाज्ञया सर्वे वानरा विविशुर्द्रुतम् ॥२०॥ तत्र कोलाहलं चक्रुस्ताडयंतश्च सेवकान् । संभारांश्चिक्षिपुस्तस्य होमकुंडे समंततः ॥ २१ ॥ स्रुवमाच्छिद्य हस्ताच्च रावणस्य बलाद्रुषा । तेनैव संजघानाशु हनूमान् प्लवगाग्रणीः ॥ २२ ॥ घ्नंति दंतैश्च काष्ठैश्च वानरास्तमितस्ततः । न जहौ रावणो ध्यानं हतोऽपि विजिगीषया

होईल. १४ म्हणून या होमांत विघ्न करण्यासाठी मोठमोठे वानर त्वरित पाठवून दे.' 'ठीक आहे', असें म्हणून रामानें सुग्रीवाच्या संमतीनें अंगद वानराला आणि हनुमान् वगैरे महाबलवान् वीरांना ( तिकडे जाण्याला ) आज्ञा दिली. त्याप्रमाणें तट ओलांडून ते रावणाच्या मंदिराकडे गेले. १५,१६ त्या दहा कोटि वानरांनी तेथें जाऊन पहारेकऱ्यांचें चूर्ण केलें, आणि तेथील घोडे आणि हत्ती क्षणांत मारून टाकिले. १७ नंतर प्रभातकाळी विभीषणाची पत्नी सरमा हिनें हस्तसंज्ञेनें ( वानरांना ) होमस्थान दाखविलें. १८ गुहेच्या तोंडी आच्छादन म्हणून ठेविलेली मोठी शिळा महापराक्रमी अंगदानें पादप्रहारांनी फोडून टाकिली, आणि तो त्या महागुहेंत शिरला. १९ तेथें डोळे मिटून व दृढासन घालून बसलेला रावण दृष्टीस पडतांच अंगदाच्या आज्ञेनें सर्व वानर लगेच आंत शिरले. २० त्या वानरांनी मोठा कल्लोळ करून तेथील सेवकांना छेडिलें, आणि चारी बाजूंनीं सगळें साहित्य होमकुंडांत फेंकून दिलें. २१ वानरश्रेष्ठ मारुतीने क्रोधानें रावणाच्या हातांतील स्रुची[1] बळजबरीनें हिसकावून घेतली, आणि तिनेंच तो रावणाला मारूं लागला. २२ त्या वानरांनी सर्वत्र दातांनी त्याचे चावे घेतले, आणि त्याला लांकडांनी बडविलें; इतका मार बसला तरीही ( शत्रूला ) जिंकण्याच्या इच्छेनें त्या रावणानें आपलें ध्यान

१. यज्ञांतील लाकडी पळी. हिच्यातून होमाग्नींत तूप घालितात. ही बहुधा पळस किंवा खदिराची केलेली असते.

॥२३॥ प्रविश्यांतःपुरे वेश्मन्यंगदो वेगवत्तरः । समानयत्केशबंधे धृत्वा मंदोदरीं शुभाम् ॥ २४ ॥ रावणस्यैव पुरतो विलपंतीमनाथवत् । विददारांगदस्तस्याः कंचुकं रत्नभूषितम् ॥ २५ ॥ मुक्ता विमुक्ताः पतिताः समंताद्रत्नसंचयैः । श्रोणिसूत्रं निपातितं त्रुटितं रत्नचित्रितम् ॥ २६ ॥ कटिप्रदेशाद्विस्रस्ता नीवी तस्यैव पश्यतः । भूषणानि च सर्वाणि पतितानि समंततः ॥२७॥ देवगंधर्वकन्याश्च नीता हृष्टैः प्लवंगमैः । मंदोदरी रुरोदाथ रावणस्याग्रतो भृशम् ॥ २८ ॥ क्रोशंती करुणं दीना जगाद दशकंधरम् । निर्लज्जोऽसि परैरेवं केशपाशे विकृष्यते ॥ २९ ॥ भार्या तवैव पुरतः किं जुहोषि न लज्जसे । हन्यते पश्यतो यस्य भार्या पापैश्च शत्रुभिः ॥ ३० ॥ मर्तव्यं तेन तत्रैव जीवितान्मरणं वरम् । हा मेघनाद ते माता क्लिश्यते बत वानरैः ॥३१॥ त्वयि जीवति मे दुःखमीदृशं च कथं

सोडलें नाही. २३ पुढें अंगद त्वरेनें राजवाड्यांतील अंतःपुरांत शिरला, आणि त्या कल्याणिनी मंदोदरीच्या वेणीला हात घालून तो तिला ( तेथें ) घेऊन आला. २४ रावणाच्या पुढें ती अनाथासारखी शोक करूं लागली असतां, अंगदानें तिची रत्नभूषित कंचुकी फाडून टाकिली. २५ त्याबरोबर ( कंचुकी )वरील मोत्यें आणि अनेक रत्नें तुटून सर्वत्र गळून पडलीं. तिचा चित्रविचित्र रत्नांनी विभूषित कमरपट्टाही तुटून पडला. २६ त्या ( रावणा )च्या समोर तिची निरी कटिप्रदेशापासून सुटली, आणि तिचे सगळे अलंकार ठिकठिकाणी पडले. २७ त्या आनंदित वानरांनीं देवांच्या आणि गंधर्वांच्या कन्यांनाही त्या होमस्थानीं आणिलें होतें. इकडे मंदोदरी रावणाच्या अग्रभागीं अत्यंत शोक करूं लागली. २८ ती दीनासारखी करुणस्वरानें आक्रोश करीत रावणाला म्हणाली, ‘ तुम्ही निर्लज्ज आहां ! तुमच्यापुढें पत्नीला केशपाश धरून प्रत्यक्ष शत्रु ओढीत असतां तुम्ही होम करीत बसलां आहां ! तुम्हांला लाज वाटत नाहीं ना ? दुष्ट शत्रु डोळ्यांसमक्ष बायकोला मारीत असतां ( ज्याच्यानें कांहीं करवत नाही ) त्यानें तेथेंच मरावें. त्यानें जगण्यापेक्षां मरणेंच फार बरें ! मेघनादा ! हाय हाय ! तुझ्या मातेचा वानर छळ करीत आहेत ! २९, ३०, ३१ तूं जीवंत असतास, तर असा दुःखप्रसंग मजवर कसा आला असता ? जीविताची आशा

१ ‘ अहो ! समक्षाचि ज्याची नारी । पीडिती निःशंक त्याचे अरी । तेणें तेथेंचि मरावें परी । मुख तें दावूं नयेचि ॥ ’–अध्यात्मरामकथा.

भवेत् । भार्या लज्जा च संत्यक्ता भर्त्रा मे जीविताशया ॥३२॥ श्रुत्वा तद्देवितं राजा मंदोदर्या दशाननः । उत्तस्थौ खड्गमादाय त्यज देवीमिति ब्रुवन् ॥ ३३ ॥ जघानांगदमव्यग्रः कटिदेशे दशाननः । ततोत्सृज्य ययुः सर्वे विध्वस्य हवनं महत् ॥ ३४ ॥ रामपार्श्वमुपागम्य तस्थुः सर्वे प्रहर्षिताः । रावणस्तु ततो भार्यामुवाच परिसांत्वयन् ॥ ३५ ॥ दैवाधीनमिदं भद्रे जीवता किं न दृश्यते । त्यज शोकं विशालाक्षि ज्ञानमालंब्य निश्चितम् ॥ ३६ ॥ अज्ञानप्रभवः शोकः शोको ज्ञानविनाशकृत् । अज्ञानप्रभवाहंधीः शरीरादिष्वनात्मसु ॥ ३७ ॥ तन्मूलः पुत्रदारादिसंबंधः संसृतिस्ततः । हर्षशोकभयक्रोधलोभमोहस्पृहादयः ॥ ३८ ॥ अज्ञानप्रभवा ह्येते जन्ममृत्युजरादयः । आत्मा तु केवलः शुद्धो व्यतिरिक्तो ह्यलेपकः ॥ ३९ ॥ आनंदरूपो ज्ञानात्मा सर्वभावविवर्जितः । न संयोगो वा

धरून माझ्या पतीनीं बायको आणि लाज ही दोनी सोडिली आहेत.' ३२ तो मंदोदरीचा विलाप ऐकून राजा रावण उठला. हातांत खड्ग घेऊन 'सोड देवीला,' असें म्हणत, न गडबडतां, त्यानें अंगदाच्या कटिप्रदेशावर प्रहार केला. त्याबरोबर सगळे ( वानर ) त्या मोठ्या हवनकर्माचा विध्वंस करून तें स्थान टाकून पळाले, ३३, ३४ आणि आनंदित होऊन रामाजवळ येऊन उभे राहिले. इकडे पत्नीचें—मंदोदरी—सांत्वन करीत रावण म्हणाला, ३५ प्रिये ! हें ( सर्व कांहीं ) दैवाधीन आहे. अशी कोणती गोष्ट आहे कीं ती जगांत राहणाऱ्या प्राण्यावर येणार नाहीं ? तरी हे विशालनेत्रे ! शोकाचा त्याग कर, आणि आत्मज्ञानाचा आश्रय कर. ३६ शोक हा अज्ञानापासून होत असतो, शोक ज्ञानाचा नाश करितो. शरीरादि जड पदार्थांवर 'अहं' ही बुद्धि होण्यालाही कारण अज्ञान होय. ३७ पुत्र, स्त्री इत्यादि संबंध आणि पुढें संसार हीं सर्व तन्मूलकच आहेत. हर्ष, शोक, भय, क्रोध, लोभ, मोह, काम, स्पृहा इत्यादि सर्व, त्याचप्रमाणें जन्म, मृत्यु, जरा हीं देखील अज्ञानापासूनच उद्भवतात. आत्मा तर एक, शुद्ध, सर्वांहून—मायाकार्याहून—भिन्न, अलिप्त, ३८ आनंदरूप, ज्ञानमय, सर्वभावविरहित असा आहे त्या सत्स्वरूप

१. 'अवश्यंभाविनो भावा भवंति महतामपि ।'—हितोपदेश. २. 'मूळीं समूळ मिथ्या अज्ञान । अज्ञानजन्य विषयभान । तें देखोनि भुलले जन । पडिलें विस्मरण स्वस्वरूपीं ॥ स्वस्वरूप विसरून जाण । देहीं स्फुरे जें मीपण । अत्यंत दृढतर अज्ञान । तो देहाभिमान उद्धवा ॥ '—एकनाथी भागवत. ३. 'आकाश जैसें घटांतरीं । न लिंपेचि त्या त्या विकारीं । तैसा आत्मा चराचरीं । निर्विकाररूपें ॥ '—प्राकृत सदाचार.

वियोगो वा विद्यते केनाचित्सतः ॥ ४० ॥ एवं ज्ञात्वा स्वमात्मानं त्यज शोकमनिन्दिते । इदानीमेव गच्छामि हत्वा रामं सलक्ष्मणम् ॥४१॥ आगमिष्यामि नोचेन्मां दारयिष्यति सायकैः । श्रीरामो वज्रकल्पैश्च ततो गच्छामि तत्पदम् ॥ ४२ ॥ तदा त्वया मे कर्तव्या क्रिया मच्छासनात्प्रिये । सीतां हत्वा मया सार्धं त्वं प्रवेक्ष्यसि पावकम् ॥ ४३ ॥ एवं श्रुत्वा वचस्तस्य रावणस्यातिदुःखिता । उवाच नाथ मे वाक्यं शृणु सत्यं तथा कुरु ॥ ४४ ॥ शक्यो न राघवो जेतुं त्वया चान्यैः कदाचन । रामो देववरः साक्षात्प्रधानपुरुषेश्वरः ॥ ४५ ॥ मत्स्यो भूत्वा पुरा कल्पे मनुं वैवस्वतं प्रभुः । ररक्ष सकलापद्भ्यो राघवो भक्तवत्सलः ॥ ४६ ॥ रामः कूर्मोऽभवत्पूर्वं लक्षयोजनविस्तृतः । समुद्रमथने पृष्ठे दधार कनकाचलम् ॥ ४७ ॥ हिरण्याक्षोऽतिदुर्वृत्तो

आत्मतत्त्वाला संयोग नाही आणि वियोगही नाही. ३९, ४० याप्रमाणें स्वकीय आत्माचें स्वरूप जाणून हे सच्छीले ( मंदोदरि ) ! शोक टाक. आतांच मी जातों, आणि त्या रामलक्ष्मणांचा वध करून, येतों. ४१ असें न झाल्यास श्रीराम आपल्या वज्रसमान बाणानी माझा घात करील, म्हणजे मी त्याच्या पदाला जाईन. ४२ प्रिये ! तसें झाल्यास माझें तुला सांगणें आहे की, तूं माझें एक कार्य करावेंस; इतकेंच की सीतेला मारून मग तूं माझ्याबरोबर अग्नीत प्रवेश करावा. ’ ४३ हें त्या रावणाचें भाषण ऐकून ( मंदोदरीला ) अत्यंत दुःख झालें. ती म्हणाली, ‘ नाथा ! माझें म्हणणें नीट ऐका, आणि त्याप्रमाणें करा. ४४ आपल्याला काय, किंवा दुसऱ्या कोणाला काय, रामाचा पराभव करतां येणें, केव्हांही शक्य नाही. राम साक्षात् प्रधान पुरुष ईश्वर आहे. ४५ ह्या भक्तवत्सल प्रभु राघवानें पूर्वीं एका कल्पांत मत्स्य होऊन वैवस्वत मनूला सर्व संकटापासून रक्षिलें ४६ पूर्वी ह्या रामानें लक्ष योजनें विस्तीर्ण कूर्मशरीर धारण करून समुद्रमंथनसमयीं सुवर्णाचलाला-मंदराला—पाठीवर उचलून धरिलें. ४७ एके

१. ब्रह्मदेवाचा एक दिवस. २. सातवा व मद्य कालचा मनु ह्याच मन्वंतरांत पृथ्वीवर जलप्रलय होऊन सर्व जीवांचा सहार झाला, त्या वेळीं विष्णूनें मत्स्यावतार धारण करून ह्याचें व ह्याबरोबर सात ऋषींचें रक्षण केलें, असें वर्णन आहे. ३. देवदानवांचें युद्ध होऊन देवांची सर्व संपत्ति दानवांनीं समुद्रांत टाकिली, ती काढण्याकरितां देवांनीं व दैत्यांनीं समुद्रमंथन केलें त्या वेळीं मंदरपर्वताचा देवांनीं मंथनदंड करून

**हतोऽनेन महात्मना । क्रोधरूपेण वपुषा क्षोणीमुद्धरता क्वचित् ॥ ४८ ॥ त्रिलोककंटकं दैत्यं हिरण्यकशिपुं पुरा । हतवान्नारसिंहेन वपुषा रघुनंदनः ॥ ४९ ॥ विक्रमैस्त्रिभिरेवासौ बलिं बद्ध्वा जगत्त्रयम् । आक्रम्यादात्सुरेंद्राय भृत्याय रघुसत्तमः ॥ ५० ॥ राक्षसाः क्षत्रियाकारा जाता भूमेर्भरावहाः । तान्हत्वा बहुशो रामो भुवं जित्वा ह्यदान्मुनेः ॥ ५१ ॥ स एव सांप्रतं जातो रघुवंशे परात्परः । भवदर्थे रघुश्रेष्ठो मानुषत्वमुपागतः ॥५२॥ तस्य भार्या किमर्थं वा हृता सीता वनाद्बलात् ।**

प्रसंगी ह्या महात्म्याने वराहरूप धारण करून पृथ्वीस वर ओढून काढलें, आणि अत्यंत दुर्वृत्त अशा हिरण्याक्ष दैत्याला ठार मारिलें. ४८ पूर्वी त्रैलोक्याला कांट्यासारखा छळणारा जो हिरण्यकशिपु, त्याचा या रघुनंदनानें नारसिंहरूप धारण करून वध केला. ४९ ह्या रघूत्तमानें बलीला बद्ध करून घेऊन तीनच पावलांनीं त्रैलोक्याचें आक्रमण केलें, आणि तें आपल्या सेवकाला—देवेंद्राला—दिलें. ५० क्षत्रियस्वरूपी राक्षस निर्माण होऊन त्यांचा पृथ्वीला भार झाला, त्या वेळी ह्या रामानें (परशुरामरूपानें) त्या क्षत्रियांचा अनेक वेळां सहार करून पृथ्वी जिंकिली, आणि ती मुनीला—कश्यपाला—दिली. ५१ तोच परमात्मा सांप्रत रघुकुलामध्यें अवतरला आहे. तोच रघुश्रेष्ठ राम होय. त्या (परमात्म्या) ला तुझ्याकरितां मनुष्यरूप घ्यावें लागलें. ५२ त्याची स्त्री सीता, हिला वनांतून बलात्कार करून

समुद्रमंथन केलें. पुढें अतिभारानें मंदर समुद्रतळी जाऊं लागला. तेव्हां देवाच्या प्रार्थनेवरून विष्णूनें कूर्मावतार धारण करून मंदराचलास आपल्या पाठीवर घेतलें.

१. ब्रह्मदेवाच्या नाकातून उत्पन्न झालेल्या हिरण्याक्ष दैत्याच्या वधाकरितां विष्णूनें वराहरूप घेऊन समुद्रात एक सहस्र वर्षें त्या दैत्याशीं युद्ध केलें, व त्यास मारून त्याने पाताळात घातलेली पृथ्वी दाढेच्या अग्रभागाने उचलून ती पूर्वस्थानीं आणून ठेविली. २. हा प्रख्यात भगवद्भक्त प्रल्हाद याचा पिता होय. ३. बलि हा विष्णुभक्त प्रल्हादाचा नातू होता. ह्यानें इंद्रपदाकरितां शंभर यज्ञ करण्याचें ठरवून नव्वाण्णव केले. शंभरावा सुरू करणार, तों त्याला विघ्न करण्याकरिता देवेंद्राच्या विनंतीवरून विष्णूनें अदितीच्या पोटीं जन्म घेतला. हाच वामनावतार होय ४. हा परशुरामावतार होय. परशुरामानें एकवीस वेळा पृथ्वी निःक्षत्रिय केली. ५. हा एक प्रख्यात ऋषि होता. ह्याच्या अदिति व दिति या नांवांच्या दोन स्त्रिया होत्या. ह्यामुळें तो देवांचा व तसाच दैत्याचाही जनक होता. त्याची संतति पुष्कळ, आणि विविध—सर्प, पक्षी, पशु, मनुष्यें, देव इत्यादि प्रकारची—होती.

मम पुत्रविनाशार्थं स्वस्याऽपि निधनाय च ॥ ५३ ॥ इतःपरं वा वैदेहीं प्रेषयस्व रघूत्तमे । विभीषणाय राज्यं तु दत्त्वा गच्छामहे वनम् ॥ ५४ ॥ मंदोदरीवचः श्रुत्वा रावणो वाक्यमब्रवीत् । कथं भद्रे रणे पुत्रान् भ्रातॄन् राक्षसमंडलम् । घातयित्वा राघवेण जीवामि वनगोचरः ॥ ५५ ॥ रामेण सह योत्स्यामि रामबाणैः सुशीघ्रगैः । विदार्यमाणो यास्यामि तद्विष्णोः परमं पदम् ॥ ५६ ॥ जानामि राघवं विष्णुं लक्ष्मीं जानामि जानकीम् । ज्ञात्वैव जानकी सीता मयानीता वनाद्बलात् । रामेण निधनं प्राप्य यास्यामीति परं पदम् ॥ ५७ ॥ विमुच्य त्वां तु संसाराद्गमिष्यामि सह प्रिये ॥ ५८ ॥ परानंदमयी शुद्धा सेव्यते या मुमुक्षुभिः । तां गतिं तु गमिष्यामि हतो रामेण संयुगे ॥५९॥ प्रक्षाल्य कल्मषाणीह मुक्तिं यास्यामि दुर्लभाम् ॥ ६० ॥ क्लेशादिपंचकतरंगयुगं भ्रमाढ्यं

आणिलेंत, त्याचें काय बरें कारण ? हें तुमचें कृत्य म्हणजे माझ्या पुत्राचा नाश आणि स्वतः तुमचें मरण, इतक्याचकरितां होय. ५३ ह्यापुढें तरी त्या जनकतनयेला रघूत्तमाकडे पाठवा, आणि राज्य विभीषणाला द्या. मग आपण वनांत जाऊं.' ५४ मंदोदरीचें बोलणें ऐकून रावण म्हणाला 'हें कल्याणिनि ! रणांत रामाकडून पुत्रांचा, बंधूंचा आणि राक्षससमूहांचा घात करवून आतां वनांत जाऊन मी कसा बरें राहूं ? ५५ म्हणून मी रामाबरोबर युद्ध करीन; त्याचे शीघ्रगतीचे बाणांनीं माझें शरीर विदीर्ण झालें असतां, मी विष्णूच्या त्या परमपदास प्राप्त होईन. ५६ राम हा विष्णु व जानकी ही लक्ष्मी होय, हें मी जाणतों. हें जाणूनच मीं बलात्कारानें जनककन्या सीतेला वनांतून आणिलें. कारण, तेणेंकरून रामाच्या हातून मरण पावून मी परम पदाला जाईन. ५७ प्रिये ! तुला सोडून व ह्या संसाराचा त्याग करून यापूर्वीं मृत झालेल्या बांधवांस बरोबर घेऊन मी जाईन. ५८ मुमुक्षु ज्या परानंदरूप गतीला जातात, त्या गतीला रामानें माझा रणांगणीं वध केला असतां मी जाईन. ५९ (तेणेंकरून) येथील सर्व पातक धुतलीं जाऊन मी दुर्लभ अशा मुक्तीला प्राप्त करून घेईन. ६० हा संसार म्हणजे समुद्रच होय. ह्यांत क्लेशादि[1] पंचक ह्या लाटा असून सुखदुःखें हे भोंवरे

१. क्लेशादिपंचकः—अविद्या, अस्मिता ( आहेपणा ), राग, द्वेष, अभिमान; आणि याच पांचांपासून उद्भवणाऱ्या स्थूलवृत्ति.

दारात्मजाप्तधनबंधुझषाभियुक्तम् । और्वानलाभनिजरोषमनंगजालं संसारसागरमतीत्य हरिं व्रजामि ॥ ६१ ॥ इति श्रीमध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकांडे दशमः सर्गः ॥ १० ॥

## युद्धकांड, सर्ग अकरावा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ इत्युक्त्वा वचनं प्रेम्णा राज्ञीं मंदोदरीं तदा । रावणः प्रययौ योद्धुं रामेण सह संयुगे ॥ १ ॥ दृढं स्यंदनमास्थाय वृतो घोरैर्निशाचरैः । चक्रैः षोडशभिर्युक्तं सवरूथं सकूबरम् ॥ २ ॥ पिशाचवदनैर्घोरैः खरैर्युक्तं भयावहम् । सर्वास्त्रशस्त्रसहितं सर्वोपस्करसंयतम ॥ ३ ॥ निश्चक्रामाथ सहसा रावणो भीषणाकृतिः ।

आहेत; स्त्री, पुत्र, आप्त, द्रव्य, बंधु, इत्यादि त्यांतील जलजंतु आहेत. क्रोध हा त्यांत राहात असणारा वडवानल होय. त्यांत मदनरूपी जाळें पसरिलेलें आहे. अशा संसारसमुद्राला तरून मी हरिपदीं जातों. ६१ ”

**युद्धकांड, सर्ग दहावा समाप्त.**

श्रीशंकर म्हणाला, “ राणी मंदोदरीशी असें प्रेमपूर्वक भाषण करून रामाबरोबर रणांगणावर युद्ध करण्याकरितां रावण गेला. १ तो आपल्या रथांत बसला. त्याच्या बरोबर अनेक भयंकर राक्षस होते. तो रथ अतिशय बळकट असून त्याला सोळा चाकें, छपरी व जोखड ही होतीं. २ त्याला गाढव जोडले होते. त्यांचीं तोंडें पिशाचांसारखीं भयंकर होतीं, त्यामुळें तो रथ पाहतांच भीति वाटत असे. आंत सर्व शस्त्रें, अस्त्रें व इतर सकल साहित्य तयार करून ठेविलें होतें. ३ ( अशा रथांत बसून ) तो भयंकर स्वरूपाचा रावण एकदम निघाला.

१. या प्रसंगाचें एकनाथांनीं केलेलें वर्णनः—‘ रणनोवरा दशशिरी । पर्णावया मोक्षनारी । निघालासे झडकरी । अनुहतगजरी लावोनियां ॥ सन्नद्ध चतुरंगसेना । सवें सकल युद्धरचना । शस्त्रास्त्रांची विवंचना । खडतर जाणा सांगातें ॥ विचित्र कवचांचे भार । खड्ग तोमर लहुडी- चक्र । गदा मुद्गल अपार । सवें गाढे भार चालिले ॥ ’—भा. रामायण.

आयांतं रावणं दृष्ट्वा भीषणं रणकर्कशम् । संत्रस्ताभूत्तदा सेना वानरी
रामपालिता ॥ ४ ॥ हनूमानथ चोत्प्लुत्य रावणं योद्धुमाययौ । आगत्य
हनुमान् रक्षोवक्षस्यतुलविक्रमः ॥ ५ ॥ मुष्टिबंधं दृढं बद्ध्वा ताडयामास
वेगतः । तेन मुष्टिप्रहारेण जानुभ्यामपतद्रथे ॥ ६ ॥ मूर्च्छितोऽथ
मुहूर्तेन रावणः पुनरुत्थितः । उवाच च हनूमंतं शूरोऽसि मम संमतः
॥ ७ ॥ हनूमानाह तं धिङ्मां यस्त्वं जीवसि रावण । त्वं तावन्मुष्टिना
वक्षो मम ताडय रावण ॥ ८ ॥ पश्चान्मया हतः प्राणान्मोक्ष्यसे नात्र
संशयः । तथेति मुष्टिना वक्षो रावणेनाऽपि ताडितः ॥ ९ ॥ विघूर्ण-
माननयनः किंचित्कश्मलमाययौ । संज्ञामवाप्य कपिराट् रावणं हंतुमु-
द्यतः ॥ १० ॥ ततोऽन्यत्र गतो भीत्या रावणो राक्षसाधिपः । हनू-
मानंगदश्चैव नलो नीलस्तथैव च ॥ ११ ॥ चत्वारः समवेताऽग्रे दृष्ट्वा
राक्षसपुंगवान् । अग्निवर्णं तथा सर्परोमाणं खड्गरोमकम् ॥ १२ ॥ तथा

त्या उग्र व रणांगणावर निर्दयतेनें वागणाऱ्या रावणाला येतांना पाहून रामाच्या देखरेखीखाली असलेली वानरसेना भिऊन गेली. ४ नंतर मारुतीनें उडी मारिली, व तो रावणाशी युद्ध करण्यास पुढें आला. जवळ येतांच त्या अतुलपराक्रमी हनुमंतानें राक्षसाच्या–रावणाच्या–छातीवर घट्ट मूठ आवळून जोरानें प्रहार केला. त्या मुष्टिप्रहारानें रावण रथांत गुडघ्यांवर पडला. ५,६ त्यामुळें त्याला मूर्च्छा आली. नंतर कांहीं वेळानें पुनः सावध होऊन तो मारुतीला म्हणाला ' तूं शूर आहेस, त्यामुळें तूं मला मान्य आहेस. ७ त्यावर मारुति त्याला म्हणाला, 'रावणा! ( माझा मुष्टिप्रहार सोसूनही तूं ) जीवंत राहिलास, त्या अर्थीं मला धिक्कार असो! आतां रावणा! तूं माझ्या वक्षावर मुष्टिप्रहार कर. ८ कारण मीं तुला मारल्यावर तूं प्राणत्याग करिशील, यांत संशय नाही.' 'ठीक आहे,' असें म्हणून रावणानें ( मारुतीच्या ) वक्षःस्थलावर प्रहार केला. ९ त्यामुळें मारुतीनें डोळे फिरविले, त्याला थोडा वेळ मूर्च्छा आली. शुद्धीवर येऊन तो वानरश्रेष्ठ रावणाला मारण्याला सज्ज झाला. १० तेव्हां राक्षसाधिपति रावण भयभीत होऊन दुसऱ्या ठिकाणीं गेला. मग हनुमान्, अंगद, नल आणि नील हे चौघे एकत्र ( सैन्य करून ) राहिले असतां त्यांना आपल्या समोर अग्निर्वर्ण[1], सर्परोमा[2], खड्गरोमा[3] आणि वृश्चिकरोमा[4] हे चार मोठे राक्षस

१. अग्नीच्या रंगाचा. २. सर्पासारखे केंस अंगावर असणारा. ३. तरवारीसारख्या केंसाचा. ४. विंचवासारखे ज्याचे केंस असा.

दृष्टिकरोमाणं निर्जघ्नुः क्रमशोऽसुरान् । चत्वारश्चतुरो हत्वा राक्षसान् भीमविक्रमान् ॥ १३ ॥ सिंहनादं पृथक्कृत्वा रामपार्श्वमुपागताः । ततः क्रुद्धो दशग्रीवः संदश्य दशनच्छदम् ॥ १४ ॥ विवृत्य नयने क्रूरो राममेवान्वधावत । दशग्रीवो रथस्थस्तु रामं वज्रोपमैः शरैः ॥ १५ ॥ आजघान महाघोरैर्धाराभिरिव तोयदः । रामस्य पुरतः सर्वान्वानरानपि विव्यथे ॥१६॥ ततः पावकसंकाशैः शरैः कांचनभूषणैः । अभ्यवर्षद्रणे रामो दशग्रीवं समाहितः ॥ १७ ॥ रथस्थं रावणं दृष्ट्वा भूमिष्ठं रघुनंदनम् । आहूय मातलिं शक्रो वचनं चेदमब्रवीत् ॥ १८ ॥ रथेन मम भूमिष्ठं शीघ्रं याहि रघूत्तमम् । त्वरितं भूतलं गत्वा कुरु काय ममानघ ॥ १९ ॥ एवमुक्तोऽथ तं नत्वा मातलिर्देवसारथिः । ततो हयैश्च संयोज्य हरितैः स्यंदनोत्तमम् ॥ २० ॥ स्वर्गाज्जयार्थं रामस्य ह्यपचक्राम मातलिः । प्रांजलिर्देवराजेन प्रेषितोऽस्मि रघूत्तम ॥ २१ ॥

दृष्टीस पडले. त्यां ( चार वानरवीरां )नीं त्या महापराक्रमी राक्षसांना क्रमानें ठार मारिलें. अशा रीतीनें त्या चौघांचा वध केल्यावर ते चौघे ( वानर ) वेगवेगळे सिंहनाद करीत रामाजवळ आले. इकडे रावण क्रुद्ध होऊन करकर दांत खाऊं लागला. ११, १२, १३, १४ त्यानें डोळे वटारिले; मग तो क्रूर ( रावण ) रामावर धांवून गेला. रावण रथांत बसला होता. तेथून त्यानें वज्रासारखे भयंकर बाण रामावर सोडिले. मेघानें उदकाच्या धारांची वृष्टि करावी, तशी महाघोर बाणवृष्टि रावण करीत होता. त्या ( रावणा )नें रामाच्या पुढ्यांत सर्व वानरांना त्रासवून सोडिलें. १५, १६ रामानें अग्नीसारखे सोन्यानें मढविलेले बाण घेऊन त्यांची वृष्टि मोठ्या दक्षतेनें रावणावर केली. १७ रावण रथांत बसलेला व राम जमिनीवर उभा असलेला पाहून इंद्रानें मातलीला[1] हांक मारून सांगितलें कीं, १८ 'माझा रथ घेऊन भूमीवर उभा असलेल्या रामाकडे सत्वर जा. पृथ्वीतलावर लवकर जाऊन, हे निष्पापा! एवढें माझें कार्य कर.' १९ असें इंद्रानें सांगितल्यावर त्याला प्रणाम करून देवसारथि मातलीनें त्या उत्तम रथाला हिरवे घोडे जोडले, २० आणि रामाचा जय व्हावा, या उद्देशानें तो मातलि स्वर्गांतून रामाकडे आला. अशा त्या रथांत बसून आलेला मातलि हात जोडून रामाला म्हणाला, 'रघूत्तमा! देवराजा( इंद्रा )नें मला

१. मातलि—इंद्राचा सारथि.

रथोऽयं देवराजस्य विजयाय तव प्रभो । प्रेषितश्च महाराज धनुरैंद्रं च भूषितम् । अभेद्यं कवचं खड्गं दिव्यतूणीयुगं तथा ॥ २२ ॥ आरुह्य च रथं राम रावणं जहि राक्षसम् । मया सारथिना देव वृत्रं देवपतिर्यथा ॥ २३ ॥ इत्युक्तस्तं परिक्रम्य नमस्कृत्य रथोत्तमम् । आरुरोह रथं रामो लोकाँल्लक्ष्म्या नियोजयन् ॥ २४ ॥ ततोऽभवन्महायुद्धं भैरवं रोमहर्षणम् । महात्मनो राघवस्य रावणस्य च धीमतः ॥ २५ ॥ आग्नेयेन च आग्नेयं दैवं दैवेन राघवः । अस्त्रं राक्षसराजस्य जघान परमास्त्रवित् ॥२६॥ ततस्तु ससृजे घोरं राक्षसं चास्त्रमस्त्रवित् । क्रोधेन महताविष्टो रामस्योपरि रावणः ॥२७॥ रावणस्य धनुर्मुक्ताः सर्पा भूत्वा महाविषाः । शराः कांचनपुंखाभा राघवं परितोऽपतन् ॥२८॥ तैः शरैः सर्पवदनैर्वमद्भिरनलं मुखैः । दिशश्च विदिशश्चैव व्याप्तास्तत्र तदाऽभवन् ॥ २९ ॥ रामः सर्पांस्ततो दृष्ट्वा समंतात्परिपूरितान् । सौपर्णमस्त्रं तद्घोरं

पाठविलें आहे. २१ हा रथ इंद्राचा असून तो त्यानें तुझा विजय व्हावा म्हणून पाठविला आहे. महाराज ! तसेंच हें सुंदर इंद्रधनुष्य, अभेद्य कवच, हा खड्ग आणि हीं दिव्य भात्यांची जोडी, हींही तुजकरितां पाठविलीं आहेत. २२ रामा ! तूं ( या ) रथावर आरोहण कर, आणि देवपति ( इंद्रानें ) वृत्राचा केला, तसा तूं त्या रावण राक्षसाचा वध कर. मी तुला सारथि होतों'. २३ असें ( मातलीनें ) सांगितल्यावर त्या उत्तम रथाला रामानें प्रदक्षिणा घालून नमस्कार केला, आणि लोकांना आनंदवीत तो त्यावर चढला. २४ नंतर महात्मा राम आणि बुद्धिमान् रावण यांमध्यें भयंकर, अंगावर कांटा उभा करणारें युद्ध झालें. २५ ( रावणाच्या ) आग्नेयास्त्रावर आग्नेयास्त्र, व इंद्रास्त्रावर इंद्रास्त्र सोडून परम अस्त्रवेत्त्या रामानें राक्षसाधिपतीच्या त्या अस्त्रांचा भंग केला. २६ पुढें त्या अस्त्रनिपुण रावणानें अत्यंत क्रुद्ध होऊन रामावर एका भयंकर राक्षसी अस्त्राची योजना केली. २७ रावणाच्या धनुष्यापासून सुटलेल्या बाणांपासून भयंकर विषारी सर्प उत्पन्न होऊन ते चारी बाजूंनीं रामावर येऊन पडत असत. त्या बाणांचे पृष्ठभाग सुवर्णानें मढविलेले होते. २८ त्या सर्पमुख बाणांच्या तोंडांतून अग्नि बाहेर पडून त्यायोगें सर्व दिशा आणि विदिशा[1] व्यापून जात असत. २९ सर्वत्र भरून राहिलेल्या सर्पांना पाहून रामानें त्या अस्त्राहूनही भयंकर असें गरुडास्त्र

१ [illegible] ह्या दिशा. आग्नेय नैर्ऋत्य, वायव्य, ईशान्य ह्या विदिशा.

पुरः प्रावर्तयद्रणे ॥ ३० ॥ रामेण मुक्तास्ते बाणा भूत्वा गरुडरूपिणः ।
चिच्छिदुः सर्पबाणांस्तान्समंतात्सर्पशत्रवः ॥ ३१ ॥ अस्त्रे प्रतिहते युद्धे
रामेण दशकंधरः । अभ्यवर्षत्ततो रामं घोराभिः शरवृष्टिभिः ॥ ३२ ॥
ततः पुनः शरानीकै राममक्लिष्टकारिणम् । अर्दयित्वा तु घोरेण मातलिं
प्रत्यविध्यत ॥ ३३ ॥ पातयित्वा रथोपस्थे रथकेतुं च कांचनम् ।
ऐन्द्रानश्वानभ्यहनद्रावणः क्रोधमूर्च्छितः ॥ ३४ ॥ विषेदुर्देवगंधर्वा-
श्चारणाः पितरस्तथा । आर्ताकारं हरिं दृष्ट्वा व्यथिताश्च महर्षयः ॥ ३५ ॥
व्यथिता वानरेंद्राश्च बभूवुः सविभीषणाः । दशास्यो विंशतिभुजः प्रगृही-
तशरासनः ॥ ३६ ॥ ददृशे रावणस्तत्र मैनाक इव पर्वतः । रामस्तु
भ्रुकुटिं बद्ध्वा क्रोधसंरक्तलोचनः ॥ ३७ ॥ कोपं चकार सदृशं निर्द-
हन्निव राक्षसम् । धनुरादाय देवेंद्रधनुराकारमद्भुतम् ॥ ३८ ॥
गृहीत्वा पाणिना बाणं कालानलसमप्रभम् । निर्दहन्निव चक्षुर्भ्यां ददृशे

रणांगणावर अग्रभागी सोडिलें. ३० रामानें सोडलेले बाण गरुडरूपी होऊन त्या सर्पशत्रु( रामाच्या ) बाणांनीं सर्पबाणांना चोहोंकडून विच्छिन्न केलें. ३१ युद्धांत रामाकडून आपल्या अस्त्राचा पराभव झालेला पाहून रावणानें रामावर बाणांची भयंकर वृष्टि केली. ३२ तिचा प्रतिकार किमपीही क्लेश न पावतां राम करीत होता. तरी रावणानें पुनः बाणवृष्टि करून त्या रामाला त्रासविलें, आणि एक भयंकर बाण मातलीवर टाकिला. ३३ रावणानें क्रोधाविष्ट होऊन रामाच्या रथाचा सुवर्णध्वज रथाच्या पिछाडीस पाडिला, आणि इंद्राच्या घोड्यांना जर्जर केलें. ३४ रामाच्या शरीराला इजा झाल्याचें पाहून देव, गंधर्व, चारण, पितर आणि महर्षि हे सर्व व्यथित झाले. ३५ विभीषणासह सर्व वानरश्रेष्ठ चिंतातुर झाले. तो दहा तोंडांचा, वीस हातांचा, धनुष्य घेऊन असलेला रावण मैनाकपर्वतासारखा दिसत होता. रामाचे डोळे क्रोधानें लाल झाले. त्यानें भ्रुकुटि चढवून, ३६, ३७ त्या प्रसंगाला अनुरूप असा कोप धारण केला. त्यावरून तो त्या राक्षसाला—रावणाला—जाळून टाकीत आहे की काय, असा भास झाला. मग रामानें इंद्रधनुष्याच्या आकाराचें अद्भुत धनुष्य घेऊन, ३८ प्रलयकालच्या अग्नीसारखा बाण हातांत धारण केला, आणि जवळच असलेल्या शत्रूवर त्यानें आपली नजर टाकिली. त्या वेळीं राम आपल्या दृष्टिपातानें शत्रूचें भस्म करितो

रिपुमंतिके ॥३९॥ पराक्रमं दर्शयितुं तेजसा प्रज्वलन्निव । प्रचक्रमे काल-
रूपी सर्वलोकस्य पश्यतः ॥ ४० ॥ विकृष्य चापं रामस्तु रावणं
प्रतिविध्य च । हर्षयन्वानरानीकं कालांतक इवाबभौ ॥ ४१ ॥ क्रुद्धं
रामस्य वदनं दृष्ट्वा शत्रुं प्रधावतः । तत्रसुः सर्वभूतानि चचाल च
वसुंधरा ॥ ४२ ॥ रामं दृष्ट्वा महारौद्रमुत्पातांश्च सुदारुणान् । त्रस्तानि
सर्वभूतानि रावणं चाविशद्भयम् ॥ ४३ ॥ विमानस्थाः सुरगणाः
सिद्धगंधर्वकिन्नराः ॥ ४४ ॥ ददृशुः सुमहायुद्धं लोकसंवर्तकोपमम् । ऐन्द्र-
मस्त्रं समादाय रावणस्य शिरोऽच्छिनत् ॥ ४५ ॥ मूर्धानो रावणस्याथ
बहवो रुधिरोक्षिताः । गगनात्प्रपतंति स्म तालादिव फलानि हि ॥४६ ॥
न दिनं न च वै रात्रिर्न संध्या न दिशोऽपि वा । प्रकाशंते न तद्रूपं

की काय असें वाटलें. ३९ पुढें सर्व लोकांच्या देखत सर्व शरीर तेजानें जणुं काय प्रदीप्त झालें आहे, अशा त्या कालरूपी रामानें आपला पराक्रम दाखविण्यास आरंभ केला. ४० रामानें धनुष्य ओढून रावणावर बाण मारिला. तेव्हां वानरसैन्याला अत्यंत आनंद झाला. या वेळी राम कालांतकासारखा दिसला. ४१ शत्रूवर धावून जाणाऱ्या रामाचा क्रुद्ध चेहरा पाहून सर्व प्राण्यांना भीति वाटली, आणि पृथ्वी कांपूं लागली. ४२ रामाचें तें महाभयंकर स्वरूप आणि ते अत्यंत दारुण उत्पात पाहून सर्व भूतांना त्रास झाला, व रावणालाही भीति उत्पन्न झाली. ४३ देवसमुदाय, सिद्ध, गंधर्व, किन्नर हे विमानांत बसून जगाच्या प्रलयासारखें हें ( भयंकर ) युद्ध पाहात होत. ( शेवटीं ) ऐंद्रास्त्र घेऊन त्यायोगें रामानें रावणाचें शिर छेदिलें. ४४,४५ तालाच्या वृक्षावरून फळें पडावी, त्याप्रमाणें रक्तानें भिजलेलीं तीं रावणाचीं अनेक मस्तकें आकाशांतून खालीं पडलीं. ४६ युद्ध चाललें असतां रात्र कळेना, कीं दिवस कळेना, संध्याकाळ कळेना, कीं दिशा कळेना, अशी स्थिति झाली. तरी त्या युद्धांत रावणावर कांहीं परिणाम झाल्यासारखें

१. समानार्थक वर्णन:—'झाले सुर भयपरवश, उत्पातांहि फार पावले जनन । जन न करी जयनिश्चय, म्हणती 'भामें भविष्य आज न न ॥'–मंत्ररामायण, मोरोपंत. २. मूळांत 'न तद्रूपं दृश्यते तत्र संगरे' असे आहे. त्यात 'तद्रूपं' याचा अर्थ 'त्याचा परिणाम' असा घ्यावयाचा.

दृश्यते तत्र संगरे ॥ ४७ ॥ ततो रामो बभूवाथ विस्मयाविष्टमानसः । शतमेकोत्तरं छिन्नं शिरसां चैकवर्चसाम् ॥ ४८ ॥ न चैव रावणः शांतो दृश्यते जीवितक्षयात् । ततः सर्वास्त्रविद्धीरः कौसल्यानंदवर्धनः ॥ ४९ ॥ अस्त्रैश्च बहुभिर्युक्तश्चिंतयामास राघवः । यैर्यैर्बाणैर्हता दैत्या महासत्त्वपराक्रमाः ॥ ५० ॥ त एते निष्फलं याता रावणस्य निपातने । इति चिंताकुले रामे समीपस्थो विभीषणः ॥ ५१ ॥ उवाच राघवं वाक्यं ब्रह्मदत्तवरो ह्यसौ । विच्छिन्ना बाहवोऽप्यस्य विच्छिन्नानि शिरांसि च ॥ ५२ ॥ उत्पत्स्यंति पुनः शीघ्रमित्याह भगवानजः । नाभिदेशेऽमृतं तस्य कुंडलाकारसंस्थितम् ॥ ५३ ॥ तच्छोषयानलास्त्रेण तस्य मृत्युस्ततो भवेत् । विभीषणवचः श्रुत्वा रामः शीघ्रपराक्रमः ॥ ५४ ॥ पावकास्त्रेण संयोज्य नाभिं विव्याध रक्षसः । अनंतरं च चिच्छेद शिरांसि च महाबलः ॥५५॥ बाहूनपि च संरब्धो

दिसून आलें नाहीं. ४७ तेव्हां रामाचें अंतःकरण आश्चर्यचकित झालें. ( तो आपल्याशी म्हणाला, ) ‘ रावणाची समान तेजाची एकशें एक मस्तकें तोडून टाकिलीं, ४८ तरी जीवित संपून तो देह टाकीत नाही—मरत नाही. ( हें आश्चर्य होय ).’ त्या कौसल्यानंदवर्धक रामाला सर्व अस्त्रांचें ज्ञान होतें, तो पराक्रमी होता, त्याच्या जवळ अनेक अस्त्रें होती, तरीही त्या राघवाला काळजी वाटूं लागली की, ‘ ज्या ज्या बाणांनी मोठमोठे बलवान् आणि पराक्रमी दैत्य ( मजकडून ) मारले गेले, ४९।५० ते ते सर्व ( आज ) रावणाच्या वधाच्या कामी निष्फळ झाले आहेत ! ’ अशा प्रकारें राम चिंताकुल झाला असतां विभीषण जवळच होता, ५१ तो रामाला म्हणाला, ‘ ह्याला ब्रह्मदेवानें वर दिला आहे. ह्याचे तुटून पडलेले बाहू व छेदलेली मस्तकें पुनः लवकरच उद्भूत होतील, असें भगवान् ब्रह्मदेवानें सांगितलें आहे. ह्याच्या नाभीच्या ठिकाणीं कुंडलाच्या आकारासमान अमृत ठेवलेलें आहे. ५२, ५३ तें पावकास्त्राचा उपयोग करून शोषून घे. तेणेंकरून त्याला मरण येईल. ’ हें विभीषणाचें भाषण ऐकून त्या शीघ्रपराक्रमी रामाचें अग्न्यस्त्राची योजना करून त्या राक्षसाच्या—रावणाच्या—नाभीचा छेद केला, आणि नंतर त्या महाबलिष्ठानें त्याचीं मस्तकें तोडून टाकिलीं. ५४, ५५ त्या स्वव-

रावणस्य रघूत्तमः । ततो घोरां महाशक्तिमादाय दशकंधरः ॥ ५६ ॥
विभीषणवधार्थाय चिक्षेप क्रोधविह्वलः । चिच्छेद राघवो बाणैस्तां
शितैर्हेमभूषितैः ॥ ५७ ॥ दशग्रीवशिरश्छेदात्तदा तेजो विनिर्गतम् ।
म्लानरूपो बभूवाथ छिन्नैः शीर्षैर्भयंकरैः ॥ ५८ ॥ एकेन मुख्यशिरसा
बाहुभ्यां रावणो बभौ । रावणस्तु पुनः क्रुद्धो नानाशस्त्रास्त्रवृष्टिभिः
॥ ५९ ॥ ववर्ष रामं तं रामस्तथा बाणैर्ववर्ष च । ततो युद्धमभूद्घोरं
तुमुलं लोमहर्षणम् ॥ ६० ॥ अथ संस्मारयामास मातली राघवं तदा ।
विसृज्यास्त्रं वधायास्य ब्राह्मं शीघ्रं रघूत्तम ॥ ६१ ॥ विनाशकालः
प्रथितो यः सुरैः सोऽद्य वर्तते । उत्तमांगं न चैतस्य छेत्तव्यं राघव
त्वया ॥ ६२ ॥ नैव शीर्ष्णि प्रभो वध्यो वध्य एव हि मर्मणि । ततः
संस्मारितो रामस्तेन वाक्येन मातलेः ॥ ६३ ॥ जग्राह सशरं दीप्तं

ळलेल्या ( रामानें ) रावणाचे बाहूही तोडून टाकिले. नंतर क्रोधसंतप्त होऊन रावणानें भयंकर अशी महाशक्ति घेतली, आणि विभीषणाला मारण्याच्या उद्देशानें ती त्याजवर टाकिली. सुवर्णभूषित तीक्ष्ण बाणांच्या योगें ती शक्ति रामानें तोडून काढिली. ५६, ५७ रावणाचीं ( नऊ ) मस्तकें तुटली गेल्यामुळें आतां त्याचें तेज निघून गेलें. तीं भयंकर मस्तकें छिन्न होऊन तो म्लान दिसूं लागला. ५८ एक मुख्य मस्तक व दोन बाहू हीच आतां शिल्लक राहिलीं होती, तरी तो त्यांनी अजूनही शोभत होता. पुनः क्रुद्ध होऊन रावणानें रामावर नाना प्रकारच्या शस्त्रास्त्रांचा वर्षाव केला. रामानेंही तशीच त्याच्यावर बाणवृष्टि केली. नंतर अंगावर कांटा उभा राहील, असें भयंकर युद्ध झालें. ५९, ६० इतक्यांत मातलीनें रामाला आठवण करून देऊन सांगितलें कीं, ' रघूत्तमा ! ह्याच्या वधाकरितां ब्रह्मास्त्र लवकर सोड. ६१ देवांनी ह्याचा विनाशकाल ठरविला आहे, तो आज आला आहे. राघवा ! ह्याचें मस्तक तूं तोडूं नकोस.' ६२ मस्तकावर प्रहार केल्यानें हा मरणार नाहीं, काळजावरच आघात केल्यास हा मरेल मातलीच्या ह्या भाषणानें रामाला आठवण करून दिल्यावर, ६३ त्या ( रामानें ) सर्पाप्रमाणें निश्वास टाकणारा एक तेजस्वी बाण घेतला. ह्या बाणाच्या

पुनि दसकंठ क्रुद्ध है छाँडी सक्ति प्रचंड । चली बिभीषन सनमुख मन हुँ काल कर दंड ॥'–तुलसीदास रामायण.

निश्वसंतमिवोरगम् । यस्य पार्श्वे तु पवनः फले भास्करपावकौ ॥६४॥ शरीरमाकाशमयं गौरवे मेरुमंदरौ । पर्वस्वपि च विन्यस्ता लोकपाला महौजसः ॥ ६५ ॥ जाज्वल्यमानं वपुषा भातं भास्करवर्चसा । तमुग्रमस्त्रं लोकानां भयनाशनमद्भुतम् ॥ ६६ ॥ अभिमंत्र्य ततो रामस्तं महेषुं महाभुजः । वेदप्रोक्तेन विधिना संदधे कार्मुके बली ॥ ६७ ॥ तस्मिन्संधीयमाने तु राघवेण शरोत्तमे । सर्वभूतानि वित्रेसुश्चचाल च वसुंधरा ॥ ६८ ॥ स रावणाय संक्रुद्धो भृशमानम्य कार्मुकम् । चिक्षेप परमायत्तस्तमस्त्रं मर्मघातिनम् ॥ ६९ ॥ स वज्र इव दुर्धर्षो वज्रपाणिविसर्जितः । कृतांत इव घोरास्यो न्यपतद्रावणोरसि ॥७०॥ स निमग्नो महाघोरः शरीरांतकरः परः । विभेद हृदयं तूर्णं रावणस्य महात्मनः ॥ ७१ ॥ रावणस्याहरत्प्राणान्विवेश धरणीतले । स शरो रावणं हत्वा रामतूणीरमाविशत् ॥ ७२ ॥ तस्य हस्तात्पपाताशु सशरं कार्मुकं महत् ।

पार्श्वभागीं–बाजूस–वायु, आणि अग्रभागीं सूर्य आणि अग्नि काढिले होते. ६४ त्याचें शरीर आकाशमय असून, तो मेरुमंदरांसारखा जड होता. त्याच्या प्रत्येक पर्वावर महातेजस्वी लोकपालांना बसविलें होतें. ६५ त्याचें अंग अत्यंत प्रज्वलित होतें, तेज सूर्यासारखें होतें. लोकांची भीति नाहींशी करणारें तें अद्भुत उग्र अस्त्र त्या महाबाणावर वेदोक्त विधीनें अभिमंत्रित करून महाबाहु बलवान् रामानें तो बाण धनुष्यावर जोडिला. ६६,६७ तो उत्तम बाण धनुष्यावर रामाकडून जोडला जात असतां, सर्व भूतें अत्यंत त्रस्त झाली, आणि पृथ्वी कंपित झाली. ६८ मग रावणावर परम क्रुद्ध झालेल्या रामानें तें धनुष्य यत्नपूर्वक अत्यंत लवविलें, आणि तो मर्मघातक बाण( रावणा)वर टाकिला. ६९ वज्रपाणी इंद्रानें पाठविलेला तो वज्रासमान दुर्धर, कृतांतच की काय, असा भयंकर मुखाचा बाण, रावणाच्या वक्षावर पडला, ७० व आंत घुसला. शरीराचा नाश करणाऱ्या त्या महाभयंकर उत्तम बाणानें महासामर्थ्यवान् रावणाचें हृदय तत्काल भेदून टाकिलें. ७१ रावणाचे प्राण हरण करून त्यानें पृथ्वीतलांत प्रवेश केला. रावणाच्या वधानंतर तो बाण पुनः रामाच्या भात्यांत येऊन बसला. ७२ या वेळीं रावणाच्या हातांतून त्याचें मोठें धनुष्य बाणासह खालीं पडलें, आणि तो राक्षसनाथ ( बाणा-

गतासुर्भ्रमिवेगेन राक्षसेंद्रोऽपतद्भुवि ॥ ७३ ॥ तं दृष्ट्वा पतितं भूमौ हतशेषाश्च राक्षसाः । हतनाथा भयत्रस्ता दुद्रुवुः सर्वतोदिशम् ॥ ७४ ॥ दशग्रीवस्य निधनं विजयं राघवस्य च । ततो विनेदुः संहृष्टा वानरा जितकाशिनः ॥ ७५ ॥ वदंतो रामविजयं रावणस्य च तद्वधम् । अथांतरिक्षे व्यनदत्सौम्यस्त्रिदशदुंदुभिः ॥ ७६ ॥ पपात पुष्पवृष्टिश्च समंताद्राघवोपरि । तुष्टुवुर्मुनयः सिद्धाश्चारणाश्च दिवौकसः ॥ ७७ ॥ अथांतरिक्षे ननृतुः सर्वतोऽप्सरसो मुदा । रावणस्य च देहोत्थं ज्योतिरादित्यवत्स्फुरत् ॥ ७८ ॥ प्रविवेश रघुश्रेष्ठं देवानां पश्यतां सताम् । देवा ऊचुरहो भाग्यं रावणस्य महात्मनः ॥ ७९ ॥ वयं तु सात्त्विका देवा विष्णोः कारुण्यभाजनाः । भयदुःखादिभिर्व्याप्ताः संसारे परिवर्तिनः ॥ ८० ॥ अयं तु राक्षसः क्रूरो ब्रह्महातीव तामसः । परदाररतो

पासून ) उत्पन्न झालेल्या भ्रमणवेगामुळे गतप्राण होऊन जमिनीवर पडला. ७३ तो ( रावण ) जमिनीवर ( मरून ) पडलेला पाहून आपला नाथ हत झाल्यामुळें उरलेल्या राक्षसांनी भयभीत होऊन सर्व दिशांकडे पळ काढला ७४ रावणाचें मरण व रामाचा विजय झाल्याचें पाहून त्या जयशाली वानरांनी आनंदित होऊन गर्जना करण्यास प्रारंभ केला. ७५ कोणी 'रामाचा विजय झाला,' तर कोणी 'रावण ठार झाला,' अशी बोलणी सुरू झाली. इतक्यांत आकाशामध्यें देवदुंदुभि सौम्य शब्दांत वाजूं लागला. ७६ चारी बाजूंनीं रामावर पुष्पवृष्टि झाली. मुनि, सिद्ध, चारण आणि देव ह्यांनी (रामाची) स्तुति करण्यास प्रारंभ केला. ७७ आकाशांत सर्वत्र अप्सरा आनंदानें नृत्य करूं लागल्या. रावणाच्या शरीरांतून सूर्याप्रमाणें चमकणारें तेज निघून त्यानें सर्व देवांसमक्ष रघुश्रेष्ठ रामस्वरूपात प्रवेश केला. तेव्हां देव म्हणाले, ' ह्या महात्म्या रावणाचें भाग्य किती म्हणून सांगावें? ७८,७९ विष्णूच्या दयेला पात्र असूनही आम्ही सात्त्विक देव, भयदुःखादिकांनीं व्याप्त होऊन संसारचक्रांत फिरत असतों. ८० हा ( रावण ) तर राक्षस. क्रूर ब्रह्महत्या करणारा. अत्यंत तामसी. परस्त्रीरत.

१. रावणवधविषयक सुंदर वर्णन —' रावणतनु जगतीवर, रामावर देवपुष्पवृष्टि गळे, । बाष्पें निशाचरांचे, अमरांचे, जाहले निरुद्ध गळे. ॥ ' रघुनाथो जयति ' असे गर्जति सुर, सिद्ध, हर्षले सर्व, । दुंदुभि वाजति, नाचति वराप्सरा, कीर्ति गाति गंधर्व. ॥'–मोरोपंत, मंत्ररामायण.

विष्णुद्वेषी तापसहिंसकः ॥ ८१ ॥ पश्यत्सु सर्वभूतेषु राममेव प्रविष्टवान् ।
एवं ब्रुवत्सु देवेषु नारदः प्राह सुस्मितः ॥ ८२ ॥ शृणुतात्र सुरा यूयं
धर्मतत्त्वविचक्षणाः । रावणो राघवद्वेषादनिशं हृदि भावयन् ॥ ८३ ॥
भृत्यैः सह सदा रामचरितं द्वेषसंयुतः । श्रुत्वा रामात्स्वनिधनं भया-
त्सर्वत्र राघवम् ॥ ८४ ॥ पश्यन्ननुदिनं स्वप्ने राममेवानुपश्यति । क्रोधोऽपि
रावणस्याशु गुरुबोधाधिकोऽभवत् ॥ ८५ ॥ रामेण निहतश्चांते निर्धूता-
शेषकल्मषः । रामसायुज्यमेवाप रावणो मुक्तबंधनः ॥ ८६ ॥ पापिष्ठो वा
दुरात्मा परधनपरदारेषु सक्तो यदि स्यान्नित्यं स्नेहाद्भयाद्वा रघुकुल-
तिलकं भावयन्संपरेतः । भूत्वा शुद्धांतरंगो भवशतजनितानेकदोषैर्विमुक्तः
सद्यो रामस्य विष्णोः सुरवरविनुतं याति वैकुंठमाद्यम् ॥ ८७ ॥ हत्वा

विष्णुद्वेषी, तसाच तपस्व्यांचा घात करणारा; ८१ इतके असूनही सर्व प्राण्यांसमक्ष राम-स्वरूपाला पावला.' असें देव बोलत असतां नारदाला हंसू येऊन तो म्हणाला, ८२ 'देवांनो! तुम्ही धर्मतत्त्व जाणतच आहां. तरी ह्या गोष्टीतील रहस्य मी तुम्हांला सांगतों, ऐका. रामाच्या वैरामुळें रावण रात्रंदिवस अंतःकरणांत त्या( रामा )चें चिंतन करी, ८३ व द्वेषबुद्धीनें सेवकांसह सर्वदा रामचरित्र ऐकत असे. रामाहातीं आप-णाला मृत्यु येणार, ही गोष्ट ऐकून भयामुळें त्याला सर्वत्र रामच दिसत होता. स्वप्नांत देखील प्रत्येक दिवशी त्याला राम दिसत असे. त्या ( रावणा ) च्या मनांत राम-विषयक क्रोध होता, तरी तो त्याला गुरूपदेशापेक्षां देखील अधिक लवकर फलद्रूप झाला. ८४,८५ शेवटीं तो रावण रामाकडून मारला जाऊन त्याचीं सर्व पापें नाहीशी झालीं, आणि रामस्वरूपीं सायुज्यमुक्तीला पावून सर्व बंधनांपासून मुक्त झाला. ८६ कोणी कितीही पापी असो, किंवा दुष्ट मनाचा असो, किंवा परधन आणि परस्त्री यांवर आसक्ति ठेवणारा असो, तो जर स्नेहानें किंवा भयानें रघुकुलतिलका ( श्रीरामा )चें नित्य चिंतन करीत राहील, तर मृत्यु आल्यावर शुद्धांतर होऊन त्याचीं शेंकडों जन्मींचीं अनेक पातकें नाहींशीं होतील, आणि तो तत्काल मोठमोठ्या देवांनीं गाइलेल्या रामरूपी विष्णूच्या वैकुंठ नांवाच्या आद्यपदाला पावेल. ८७ त्रैलोक्याला

१. सदृश वर्णनः—' ब्रह्मघ्नो गुरुतल्पगोऽपि पुरुषः स्तेयी सुरापोऽपि वा । मातृभ्रातृवि-हिंसकोऽपि सततं भोगैकबद्धातुरः । नित्यं स्तोत्रमिदं जपन् रघुपतिं भक्त्या हृदिस्थं स्मरन् ध्यायन् मुक्तिमुपैति किं पुनरसौ स्वाचारयुक्तो नरः ॥'—बालकांड, सर्ग ५, श्लोक ६५ पहा.

युद्धे दशास्यं त्रिभुवनविषमं वामहस्तेन चापं भूमौ विष्टभ्य तिष्ठन्नितरकरधृतं भ्रामयन्बाणमेकम् । आरक्तोपांतनेत्रः शरदलितवपुः सूर्यकोटिप्रकाशो वीरश्रीबंधुरांगस्त्रिदशपतिनुतः पातु मां वीरराम: ॥ ८८ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकांड एकादशः सर्गः॥११॥

## युद्धकांड, सर्ग बारावा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ रामो विभीषणं दृष्ट्वा हनूमंतं तथांगदम् । लक्ष्मणं कपिराजं च जांबवंतं तथा परान् ॥ १ ॥ परितुष्टेन मनसा सर्वानेवाब्रवीद्वचः । भवतां बाहुवीर्येण निहतो रावणो मया ॥ २ ॥ कीर्तिः स्थास्यति वः पुण्या यावच्चंद्रदिवाकरौ । कीर्तयिष्यंति भवतां कथां त्रैलोक्यपावनीम् ॥ ३ ॥ जयोपेतां कलिहरां यास्यंति परमां गतिम् । एतस्मिन्नंतरे दृष्ट्वा रावणं पतितं भुवि ॥ ४ ॥ मंदोदरीमुखाः

दुःख देणाऱ्या रावणाचा युद्धांत वध केल्यावर, रामानें डाव्या हातानें धनुष्य भूमीवर टेंकलें, आणि दुसऱ्या हातांत धरलेला एक बाण फिरवीत तो उभा राहिला. त्याचे नेत्रप्रांत आरक्त दिसत होते. त्याचें शरीर बाणांनी विदारित झालें होतें. त्याची अंगकांति कोटिसूर्यांप्रमाणें दीप्तिमंत दिसत होती. त्याच्या (सर्व) उंचसखल शरीरावर वीरश्री झळकत होती; देवेंद्र त्याची स्तुति करीत होता. असा तो वीर राम माझें रक्षण करो. ८८"

**युद्धकांड, सर्ग अकरावा समाप्त.**

श्रीमहादेव म्हणाला, " विभीषण, हनुमान्, अंगद, लक्ष्मण, कपिराज ( सुग्रीव ), जांबवान् आणि इतर ( वानर ) यांना पाहून रामाच्या अंत:करणाला संतोष वाटला. तो सर्वांना म्हणाला, ' तुमच्या बाहुवीर्याच्या साहाय्यानें मीं रावणाला मारिलें. १,२ चंद्रसूर्य आहेत, तोंपर्यंत तुमची पुण्यकीर्ति जगांत राहील. त्रैलोक्याला पवित्र करणाऱ्या आणि कलिदोषांना दूर सारणाऱ्या तुमच्या जयकीर्तीच्या कथांचें जे कीर्तन करितील, ते परम गतीला—मोक्षपदाला—जातील. ' इतक्यांत रावण ( मृत होऊन ) जमिनीवर पडला आहे. असें पाहून मंदोदरी वगैरे रावणानें प्रतिपाळ केलेल्या सर्व

सर्वाः स्त्रियो रावणपालिताः। पतिता रावणस्याग्रे शोचंत्यः पर्यदेवयन्
॥ ५ ॥ विभीषणः शुशोचार्तः शोकेन महता वृतः। पतितो रावणस्याग्रे
बहुधा पर्यदेवयत् ॥ ६ ॥ रामस्तु लक्ष्मणं प्राह बोधयस्व विभीषणम्।
करोतु भ्रातृसंस्कारं किं विलंबेन मानद ॥ ७ ॥ स्त्रियो मंदोदरीमुख्याः
पतिता विलपंति च। निवारयतु ताः सर्वा राक्षसी रावणप्रियाः ॥ ८ ॥
एवमुक्तोऽथ रामेण लक्ष्मणोऽगाद्विभीषणम्। उवाच मृतकोपांते पतितं
मृतकोपमम् ॥ ९ ॥ शोकेन महताविष्टं सौमित्रिरिदमब्रवीत्। यं शोचसि
त्वं दुःखेन कोऽयं तव विभीषण ॥ १० ॥ त्वं वास्य कतमः सृष्टेः
पुरेदानीमतः परम्। यद्वत्तोयौघपतिताः सिकता यांति तद्वशाः ॥ ११ ॥
संयुज्यंते वियुज्यंते तथा कालेन देहिनः। यथा धानासु वै धाना

स्त्रिया शोकानें (भूमीवर) अंग टाकून विलाप करूं लागल्या. ३,४,५ विभीषणानें-ही अत्यंत शोकपीडित होऊन अनेक प्रकारें विलाप केला. त्यानें रावणापुढें जमिनीवर लोळण घेतली. ६ तेव्हां रामानें लक्ष्मणाला सांगितलें कीं, 'तूं मान्यांचा मान करणारा आहेस. तरी विभीषणाला उपदेशाच्या गोष्टी सांग.' त्यानें बंधूचें उत्तरकार्य करावें—(आतां) विलंब कशाला? ७ मंदोदरीप्रभृति स्त्रिया जमिनीवर पडून विलाप करीत आहेत, त्या रावणाच्या प्रिय अशा सर्व राक्षसी स्त्रियांचें त्यानें—विभीषणानें—सांत्वन करावें.' ८ असें रामानें सांगितल्यावर लक्ष्मण विभीषणाकडे गेला आणि (रावणाच्या) शवापाशी प्रेततुल्य पडलेल्या त्याला बोलला. ९ तो (विभीषण) मोठ्या शोकानें विव्हल झाला होता. लक्ष्मण त्याला म्हणाला, 'विभीषणा! एवढ्या दुःखानें तूं ज्याच्याकरितां शोक करीत आहेस, तो तुझा कोण आहे, सांग पाहूं? १० सृष्टीच्या पूर्वीं तूं त्याचा कोण लागत होतास? सध्यां त्याच्याशीं तुझा काय संबंध आहे व पुढें काय असणार, हें सांग बरें. पाण्याच्या प्रवाहांत पडलेले सिकताकण ज्याप्रमाणें ओघाला वश होऊन कांहीं काळ एकत्र जमून राहातात आणि नंतर

१. रावणस्त्रियाचा शोक—'शोकग्रस्त प्रमदा, 'हा नाथ!' असे म्हणोनि त्या रडती। उररीकृतशोकभरा कुररीसम एकदाचि आरडती॥ अपराध काय झाला? रुसवा केला दयानिधे! का जी?। अमृत प्राशन करवुनि पाजावी काय शेवटीं काजी?॥'-मोरोपंत, मंत्ररामायण. २. समानार्थक उतारा:-'कस्त्वं कोऽहं कुत आयातः। XX 'नाहं न त्वं नायं लोकस्तदपि किमर्थं क्रियते शोकः॥'—चर्पटपंजरिकास्तोत्र.

भवंति न भवंति च ॥ १२ ॥ एवं भूतेषु भूतानि प्रेरितानीशमायया ।
त्वं चेमे वयमन्ये च तुल्याः कालवशोद्भवाः ॥ १३ ॥ जन्ममृत्यू यदा
यस्मात्तदा तस्माद्भविष्यतः । ईश्वरः सर्वभूतानि भूतैः सृजति हंत्यजः
॥ १४ ॥ आत्मसृष्टैरस्वतंत्रैरनपेक्षोऽपि बालवत् । देहेन देहिनो जीवा
देहाद्देहोऽभिजायते ॥ १५ ॥ बीजादेव यथा बीजं देहान्य इव शाश्वतः ।
देहिदेहविभागोऽयमविवेककृतः पुरा ॥ १६ ॥ नानात्वं जन्म नाशश्च
क्षयो वृद्धिः क्रियाफलम् । द्रष्टुराभांत्यतद्धर्मा यथाग्नेर्दारुविक्रियाः ॥१७॥
त इमे देहसंयोगादात्मना भांत्यसद्ग्रहात् । यथा यथा तथा चान्यद्ध्यायतो–

फांकतात, त्याचप्रमाणें कालगतीनें प्राण्यांचे संयोग आणि वियोग हे घडून येत असतात. ( भट्टीत ) दाणे टाकिले असतां ते जसे खालीं वर उडत असतात, ११,१२ तद्वतच ईश्वराच्या मायेनें प्रेरित झालेल्या प्राण्यांचे प्राण्यांशीं संबंध असतात. तूं, हे आम्ही व दुसरेही सर्व, यांना कालगतीनें जन्म घ्यावे लागतात. १३ ज्या वेळीं, ज्यापासून जन्ममृत्यु व्हावयाचे असतील, त्या वेळीं त्यापासून ते होणारच. अजन्मा ईश्वर भूतांना निर्माण करून त्यांच्या द्वारा अनेक जीवांची उत्पत्ति करवितो, व आपण उत्पन्न केलेल्या आणि स्वस्वाधीन ठेवलेल्या या भूतांशीं मुलें क्रीडा करतात, त्याप्रमाणें निरपेक्षपणानें क्रीडा करितो. देहाच्या योगानें जीव देहवान् होतात. जसें बीजापासून बीज उद्भवतें, त्याप्रमाणें एका देहापासून दुसरा देह उत्पन्न होतो. जीव देहाहून वेगळा व नित्य आहे. देहदेहिविभाग मुळींच अविवेकामुळें उत्पन्न झाला आहे. १४,१५,१६ जसे काष्ठाचे ( लांबीरुंदी हे ) धर्म–विकार–अग्नीच्या ठायीं नसूनही त्यावर दिसतात, त्याप्रमाणें ( देहाचे ) नानात्व, जन्म, नाश, क्षय, वृद्धि, ( सुखदुःखरूप ) कर्मफळें, हे भाव द्रष्ट्यावर–जीवावर–भासतात. १७ ते ( नानात्वादि ) धर्म, देहाचा अंतःकरणाशीं संयोग होऊन, ( अहंतारूपी ) चुकीच्या ग्रहामुळें, जीवावर दिसून येतात. असत्य, सत्य किंवा ह्याहून कांहीं वेगळी वस्तु असो, जिचें प्राणी सतत आग्रहपूर्वक ध्यान करितो, तिचे ते ते सत्य कीं

१. ‘अनित्ये प्रियसवासे ससारे चक्रवद्गतौ । पथि संगतमेवैतद्भ्राता माता पिता सखा ॥’–महाभारत. ( २ ) ‘पाथस्थ घराशी आला । प्रात.काळीं उठोनि गेला ॥ बाळीं घराचार माडिला । तो सर्वेचि मोडुनि गेला ॥’–एकनाथ. २ ‘यथानलो दारुषु भिन्न ईयते यथानिलो देहगतः पृथक् स्थित· ॥ यथा नभ· सर्वगतं न सज्जते तथा पुमान् सर्वगुणाश्रयः परः ॥’–भागवत.

**सत्सदाग्रहात् ॥१८॥ प्रसुप्तस्यानहंभावात्तदा भाति न संसृतिः। जीवतोऽपि तथा तद्वद्विमुक्तस्यानहंकृतेः ॥ १९ ॥ तस्मान्मायामनोधर्मं जह्यहंममता-भ्रमम् । रामभद्रे भगवति मनो धेह्यात्मनीश्वरे ॥ २० ॥ सर्वभूतात्मनि परे मायामानुषरूपिणि । बाह्येंद्रियार्थसंबंधात्त्याजयित्वा मनः शनैः ॥ २१ ॥ तत्र दोषान्दर्शयित्वा रामानंदे नियोजय । देहबुद्ध्या भवेद्भ्राता पिता माता सुहृत्प्रियः ॥ २२ ॥ विलक्षणं यदा देहाज्ज्ञानात्यात्मानमात्मना । तदा कः कस्य वा बंधुर्भ्राता माता पिता सुहृत् ॥२३॥ मिथ्याज्ञानवशाज्जाता दारागारादयः सदा । शब्दादयश्च विषया विविधाश्चैव संपदः ॥ २४ ॥ बलं कोशो भृत्यवर्गो राज्यं भूमिः सुतादयः।**

मिथ्या धर्म त्याच्यावर दिसून येतात. १८ निद्रेमध्यें असतां अहंकार नसल्यामुळें जीवाला संसार भासत नाहीं. त्याचप्रमाणें जीवंत असतांही जो अहंकाराचा त्याग करितो, तो मुक्तच होय. (त्याला संसार नाहीं.) १९ म्हणून 'अहं' आणि 'मम' हा जो मायेचा मनावर आलेला धर्म, त्याचा त्याग कर, आणि सर्वशक्तिमान्, भगवान्, परमात्मा रामचंद्र, त्याच्या ठिकाणी चित्त ठेव. २० राम हा सर्व भूतांच्या अंतर्यामी राहाणारा आहे. त्या परमात्म्या रामानें मायेनें मनुष्यरूप धारण केलें आहे. तरी बाह्य इंद्रियविषयांच्या संबंधापासून हळूहळू मनाला काढून घे. २१ त्या विषयांच्या ठिकाणी दोष आहेत, हें लक्ष्यांत आणून रामचंद्राच्या आनंदरूपी चित्त ठेव. बंधु, पिता, माता, मित्र, प्रिय ही सर्व देहात्मबुद्धीमुळें आहेत. २२ देहाहून आत्मा वेगळा आहे, असें एकदा आत्मज्ञान झालें, म्हणजे मग बंधु कोण, आणि कोणाचा ? भ्राता, माता, पिता, मित्र हे सर्व संबंध वांया होतात. २३ स्त्री, गृह इत्यादि गोष्टी, शब्दादिविषय आणि अनेक प्रकारच्या संपदा हें सर्व मिथ्याज्ञानामुळेंच उद्भवलें आहे. २४ सैन्य, कोश, सेवकगण, राज्य, भूमि, पुत्र वगैरे ह्या सर्व

१. 'भिंगुरटी कीटकीतें धरी । कोंडी भिंतीमाजिले घरीं । ते मरणभयें ध्यान करी निरंतरी भ्रमरीचें ॥ तेणें तीव्रध्यानें ती कीटी । होउनी ठाके भिंगुरटी । गगना चढे उठा उठीं । प्रत्यक्ष दृष्टीं देखिजे ॥'–एकनाथ. २. 'ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।'–भ. गीता

अज्ञानजत्वात्सर्वे ते क्षणसंगमभंगुराः ॥ २५ ॥ अथोत्तिष्ठ हृदा रामं भावयन् भक्तिभावितम् । अनुवर्तस्व राज्यादि भुंजन्प्रारब्धमन्वहम् ॥ २६ ॥ भूतं भविष्यदभजन्वर्तमानमथाचरन् । विहरस्व यथान्यायं भवदोषैर्न लिप्यसे ॥ २७ ॥ आज्ञापयति रामस्त्वां यद्भातुः सांपरायिकम् । तत्कुरुष्व यथाशास्त्रं रुदतीश्चापि योषितः ॥ २८ ॥ निवारय महाबुद्धे लंकां गच्छंतु मा चिरम् । श्रुत्वा यथावद्वचनं लक्ष्मणस्य विभीषणः ॥ २९ ॥ त्यक्त्वा शोकं च मोहं च रामपार्श्वमुपागमत् । विमृश्य बुद्ध्या धर्मज्ञो धर्मार्थसहितं वचः ॥३०॥ रामस्यैवानुवृत्त्यर्थमुत्तरं पर्यभाषत । नृशंसमनृतं क्रूरं त्यक्तधर्मव्रतं प्रभो ॥३१॥ नार्होऽस्मि देव संस्कर्तुं परदाराभिमर्शिनम् । श्रुत्वा तद्वचनं प्रीतो रामो वचनमब्रवीत् ॥ ३२ ॥ मरणांतानि वैराणि निवृत्तं नः प्रयोजनम । क्रियतामस्य संस्कारो ममा-

गोष्टी अज्ञानापासून उत्पन्न झाल्या आहेत. त्यांचा समागम क्षणमात्र असून त्यांचा नाश हा ठरलेलाच आहे. २५ म्हणून तूं (आतां) ऊठ, आणि भक्तिभावानें प्राप्त होणाऱ्या रामाचें ध्यान कर, आणि प्रारब्धभोगानुसार राज्यादि कार्य नित्य चालीव. २६ भूत किंवा भविष्य किंवा वर्तमान कालाचा विचार न करितां यथान्याय वागत जा. तेणेंकरून संसारदोष तुला लागणार नाहींत. २७ बंधूचें जें उत्तरकार्य करावयाचें आहे, तें शास्त्रानुसार कर, आणि शोक करीत असणाऱ्या स्त्रियांचें निवारण कर—समजूत घाल. तूं मोठा सुज्ञ आहेसच. त्यांना लवकर लंकेंत जाऊं दे.' विभीषणानें लक्ष्मणाचें सर्व भाषण ऐकून २८,२९ शोक आणि मोह यांचा त्याग केला. तो धर्मज्ञ होता. धर्म आणि अर्थ यांनीं युक्त अशा लक्ष्मणाच्या भाषणाचा मनांत नीट विचार करून तो रामाकडे गेला. ३० रामाचीच सेवा करण्याच्या दृढनिश्चयानें तो रामाला म्हणाला, 'प्रभो ! ह्या घातकी, खोडसाळ, क्रूर, धर्मव्रतविहीन आणि परदारासक्त पुरुषाचें उत्तरकार्य करणें योग्य नाहीं.' हें त्याचें—विभीषणाचें—भाषण ऐकून रामाला संतोष झाला. तो म्हणाला, ३१,३२ 'वैर मरणाबरोबर संपत असतें. आमचें कार्य पूर्ण झालें. तरी त्याचें उत्तरकार्य कर. हा तुला तसाच

१. 'सर्व या वस्तु क्षणभंगुर । मनाचे धरून बसती घर । मिथ्याज्ञानेंचि हा संसार भासतो साच जिवातें ॥ '—अध्यात्मरामकथा. २. 'योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेंद्रियः । सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥ '—भ. गीता.

ध्येष यथा तव ॥ ३३ ॥ रामाज्ञां शिरसा धृत्वा शीघ्रमेव विभीषणः । सांत्ववाक्यैर्महाबुद्धिं राज्ञीं मंदोदरीं तदा ॥३४॥ सांत्वयामास धर्मात्मा धर्मबुद्धिर्विभीषणः । त्वरयामास धर्मज्ञः संस्कारार्थं स्वबांधवान् ॥३५॥ चित्यां निवेश्य विधिवत्पितृमेधविधानतः । आहिताग्नेर्यथाकार्यं रावणस्य विभीषणः ॥ ३६ ॥ तथैव सर्वमकरोद्बंधुभिः सह मंत्रिभिः । ददौ च पावकं तस्य विधियुक्तं विभीषणः ॥३७॥ स्नात्वा चैवार्द्रवस्त्रेण तिलान्दर्भाभिमिश्रितान् । उदकेन च संमिश्रान्प्रदाय विधिपूर्वकम् ॥ ३८ ॥ प्रदाय चोदकं तस्मै मूर्ध्ना चैनं प्रणम्य च । ताः स्त्रियोऽनुनयामास सांत्वमुक्त्वा पुनः पुनः ॥ ३९ ॥ गम्यतामिति ताः सर्वा विविशुर्नगरं तदा । प्रविष्टासु च सर्वासु राक्षसीषु विभीषणः ॥४०॥ रामपार्श्वमुपागत्य तदातिष्ठद्विनीतवत । रामोऽपि सह सैन्येन ससग्रीवः सलक्ष्मणः ॥४१॥ हर्षं

मलाहा आहे.' ३३ रामाज्ञा शिरसा मान्य करून विभीषणानें लागलच त्या महाबुद्धिमती राणी मंदोदरीचें सांत्वनपर शब्दांनी समाधान केलें. विभीषण धर्मात्मा असल्यामुळें त्याची सर्वदा धर्माकडे मनःप्रवृत्ति असे, व धर्माचें पूर्ण ज्ञानही त्याला होतें. त्यानें उत्तरकार्याच्या निमित्तानें सकल बंधुजनांना त्वरेनें आणविलें. ३४,३५ मग ( रावणाचें शव ) चितेवर ठेवून पितृयज्ञविधीस अनुसरून, अग्निहोत्र्याचें करतात, त्याप्रमाणें यथाशास्त्र बंधुजन आणि मंत्रिवर्ग यांसह रावणाचें और्ध्वदेहिक विभीषणानें केलें, व शवास विधियुक्त अग्नि दिला. ३६,३७ नंतर त्यानें स्नान केलें, आणि ओलेत्यानें दर्भमिश्रित तिलोदक करून तें विधिपूर्वक अर्पण केलें. ३८ पुढें त्यानें जलांजलि दिली, आणि शिरसाष्टांग नमस्कार केला. मग पुनःपुनः सांत्वनाच्या गोष्टी सांगून त्या स्त्रियांचें त्यानें समाधान केलें, आणि त्यांस ( लंकेला ) जावयास सांगितलें. नंतर त्या स्त्रिया लंकेंत गेल्या. ३९,४० ( इतकें झाल्यावर ) विभीषण रामाजवळ आला, आणि नम्रपणें उभा राहिला. इकडे पूर्वी वृत्रासुर मारिल्यानें इंद्राला जसा हर्ष झाला, तसाच राम, त्याचें सैन्य, सुग्रीव आणि लक्ष्मण, यांना

१. वृत्र हा एक प्रख्यात असुर कृतयुगांत होऊन गेला. कालेयनामक दैत्याच्या साह्यानें त्यानें पृथ्वीला व स्वर्ग लोकाला अत्यंत पीडिलें. इंद्रालाही तो दुर्जय झाला होता. पुढें विष्णूनें आपलें तेज इंद्राच्या शरीरांत घातल्यावर इंद्रानें वृत्राचा वध केला, अशी कथा आहे.

लेभे रिपून्हत्वा यथा वृत्रं शतक्रतुः । मातलिश्च तदा रामं परिक्रम्याभिवंद्य च ॥४२॥ अनुज्ञातश्च रामेण ययौ स्वर्गं विहायसा । ततो हृष्टमना रामो लक्ष्मणं चेदमब्रवीत् ॥४३॥ विभीषणाय मे लंकाराज्यं दत्तं पुरैव हि । इदानीमपि गत्वा त्वं लंकामध्ये विभीषणम् ॥ ४४ ॥ अभिषेचय विप्रैश्च मंत्रवद्विधिपूर्वकम् । इत्युक्तो लक्ष्मणस्तूर्णं जगाम सह वानरैः ॥ ४५ ॥ लंकां सुवर्णकलशैः समुद्रजलसंयुतैः । अभिषेकं शुभं चक्रे राक्षसेंद्रस्य धीमतः ॥४६॥ ततः पौरजनैः सार्धं नानोपायनपाणिभिः । विभीषणः ससौमित्रिरुपायनपुरस्कृतः ॥४७॥ दंडप्रणाममकरोद्रामस्याक्लिष्टकर्मणः । रामो विभीषणं दृष्ट्वा प्राप्तराज्यं मुदान्वितः ॥ ४८ ॥ कृतकृत्यमिवात्मानममन्यत सहानुजः । सुग्रीवं च समालिंग्य रामो वाक्यमथाब्रवीत् ॥ ४९ ॥ सहायेन त्वया वीर जितो मे रावणो महान् । विभीषणोऽपि लंकायामभिषिक्तो मयानघ ॥ ५० ॥ ततः प्राह हनूमंतं पार्श्वस्थं विनया-

शत्रूंचा वध झाल्यानें, हर्ष झाला. या वेळी मातलीनेंही रामाला प्रदक्षिणा घातली आणि नमस्कार केला. ४१,४२ मग रामाचें अनुमोदन घेऊन तो आकाशमार्गें स्वर्गाला गेला. नंतर आनंदित होऊन राम लक्ष्मणाला म्हणाला, ४३ ‘ मी विभीषणाला लंकाराज्य पूर्वींच दिलें आहे. तर आतां तूं जा, आणि लंकेमध्यें विभीषणाला ब्राह्मणांकडून यथाविधि मंत्रपूर्वक अभिषेक करीव.’ रामानें असें सांगितल्यावर लक्ष्मण वानरांसह ताबडतोब लंकेला निघाला. तेथें त्यानें समुद्रजलानें भरलेले सुवर्णकलश आणविले, व त्या जलानें बुद्धिमान् राक्षसेंद्राला उत्तम प्रकारें अभिषेक केला. ४४,४५,४६ मग नाना प्रकारच्या भेटी हातांत घेऊन लक्ष्मण आणि पौरजन यांसहवर्तमान विभीषण रामाच्या भेटीला आला. ४७ त्यानें ते नजराणे पुढें करून रामाला साष्टांग नमस्कार घातला. कोणतीही गोष्ट म्हटली म्हणजे त्यासंबंधीं रामाला क्लेश वाटत नसे. विभीषण ( लंका )राज्याधिष्ठित झाल्याचें पाहून रामाला आनंद झाला. ४८ त्याला व लक्ष्मणालाही आपण कृतकृत्य झालों असें वाटलें. रामानें सुग्रीवाला आलिंगन दिलें आणि म्हटलें, ४९ ‘ हे निष्पाप वीरा ! तूं सहाय झालास, म्हणूनच मजकडून त्या महान् रावणाचा पराभव झाला, आणि विभीषण लंकेंत राज्याभिषिक्त झाला. ५० नंतर जवळच नम्रपणें उभा असलेल्या हनमंताला राम म्हणाला.

१. ‘ किये सुखी कहि बानी सुधासम बल तुम्हार । रिपु हयो ! पायो विभीषण राजु । तिहुँ

न्वितम् । विभीषणस्यानुमते गच्छ त्वं रावणालयम् ॥ ५१ ॥ जानक्यै सर्वमाख्याहि रावणस्य वधादिकम् । जानक्याः प्रतिवाक्यं मे शीघ्रमेव निवेदय ॥ ५२ ॥ एवमाज्ञापितो धीमान् रामेण पवनात्मजः । प्रविवेश पुरीं लंकां पूज्यमानो निशाचरैः ॥ ५३ ॥ प्रविश्य रावणगृहं शिंशपामूलमाश्रिताम् । ददर्श जानकीं तत्र कृशां दीनामनिंदिताम् ॥ ५४ ॥ राक्षसीभिः परिवृतां ध्यायंतीं राममेव हि । विनयावनतो भूत्वा प्रणम्य पवनात्मजः ॥ ५५ ॥ कृतांजलिपुटो भूत्वा प्रह्वो भक्त्याग्रत स्थितः । तं दृष्ट्वा जानकी तूष्णीं स्थित्वा पूर्वस्मृतिं ययौ ॥ ५६ ॥ ज्ञात्वा तं रामदूतं सा हर्षात्सौम्यमुखी भवत् । स तां सौम्यमुखीं दृष्ट्वा तस्यै पवननंदनः । रामस्य भाषितं सर्वमाख्यातुमुपचक्रमे ॥ ५७ ॥ देवि रामः ससुग्रीवो विभीषणसहायवान् । कुशली वानराणां च सैन्यैश्च सहलक्ष्मणः

'विभीषणाच्या अनुमतीनें तूं रावणाच्या वाड्यांत जा, ५१ रावणाचा वध झाला, इत्यादि गोष्टी जानकीला कळीव, आणि जानकी उत्तर देईल, तें शीघ्र येऊन मला कळीव.' ५२ अशी रामाची आज्ञा झाल्यावर वायुपुत्रा(मारुती) नें लंकापुरीमध्यें प्रवेश केला. सर्व वानरांनीं ह्या वेळीं त्याचा आदरसत्कार केला. ५३ रावणाच्या वाड्यांत प्रवेश करून शिंशपा वृक्षाच्या मूळाचा आश्रय करून बसलेल्या जानकीची ( मारुतीनें ) भेट घेतली. ती निष्पाप सीता कृश व दीन झालेली दिसत होती. ५४ तिच्या सभोंवती राक्षसीचा वेढा असून, तिनें केवळ रामाचें ध्यान चालविलें होतें. त्या पवनतनया(मारुती) नें नम्रतापूर्वक तिला प्रणाम केला. ५५ त्यानें हात जोडले, आणि नम्रतेनें भक्तिपूर्वक (तिच्या) पुढें तो उभा राहिला. त्याला पाहून जानकी (क्षणभर) स्तब्ध राहिली. तितक्यांत तिला पूर्वगोष्टींचें स्मरण झालें. ५६ हा रामाचा दूत आहे, असें जाणून तिला हर्ष झाला, व तिचें मुख प्रसन्न झालें. तिचें तें प्रसन्न मुख पाहून मारुतीनें रामाचा समग्र निरोप तिला सांगण्यास प्रारंभ केला. ५७ 'देवि ! सुग्रीव, सहाय झालेला विभीषण, वानरांचीं सैन्यें आणि लक्ष्मण यांसह राम

पुर जस तुम्हारो नित नयो ॥' ( केवळ तुमच्याच बळावर मी शत्रुवध केला, आणि विभीषणाला राज्य मिळालें. ही तुमची कीर्ति त्रैलोक्यांत नित्य अभिनव अशी गाजत राहील. ). —तुलसीदास रामायण.

॥ ५८ ॥ रावणं ससुतं हत्वा सबलं सह मंत्रिभिः । त्वामाह कुशलं
रामो राज्ये कृत्वा विभीषणम् ॥ ५९ ॥ श्रुत्वा भर्तुः प्रियं वाक्यं हर्ष-
गद्गदया गिरा । किं ते प्रियं करोम्यद्य न पश्यामि जगत्त्रये ॥ ६० ॥
समं ते प्रियवाक्यस्य रत्नान्याभरणानि च । एवमुक्तस्तु वैदेह्या प्रत्युवाच
प्लवंगमः ॥ ६१ ॥ रत्नौघाद्विविधाद्वापि देवराज्याद्विशिष्यते । हतशत्रुं विज-
यिनं रामं पश्यामि सुस्थिरम् ॥ ६२ ॥ तस्य तद्वचनं श्रुत्वा मैथिली प्राह
मारुतिम् । सर्वे सौम्या गुणाः सौम्य त्वय्येव परिनिष्ठिताः ॥ ६३ ॥
रामं द्रक्ष्यामि शीघ्रं मामाज्ञापयतु राघवः । तथेति तां नमस्कृत्य
ययौ द्रष्टुं रघूत्तमम् ॥ ६४ ॥ जानक्या भाषितं सर्वं रामस्याग्रे न्यवेदयत् ।
यन्निमित्तोऽयमारंभः कर्मणां च फलोदयः ॥ ६५ ॥ तां देवीं शोकसंतप्तां
द्रष्टुमर्हसि मैथिलीम् । एवमुक्तो हनुमता रामो ज्ञानवतां वरः ॥ ६६ ॥

खुशाल आहे. ५८ रामानें रावणाचा पुत्र, सैन्य आणि मंत्री यांसह वध केला, आणि विभीषणाला राज्यावर बसविलें. त्यानें ( माझ्या तोंडीं ) तुला कुशल कळविलें आहे.' ५९ पतीचा प्रेमाचा निरोप ऐकून तिचा कंठ भरून आला. ती सद्गदित वाणीनें म्हणाली, 'काय करून आज मी तुला संतोषवूं? तुझ्या प्रियवाक्याची बरोबरी करील, अशी तुला देण्यालायक जगांत एकही वस्तु मला दिसत नाही. रत्नें आणि भूषणें ( या आनंदाची फेड करण्यास ) वांया होत.' जानकीनें असें सांगितल्यावर मारुति म्हणाला, ६०, ६१ 'विविध रत्नसमूहांपेक्षां किंवा देवराज्यापेक्षांही शत्रूला मारून व जय मिळवून सुस्थिर झालेल्या रामाचें दर्शन घेतों, यांतच मोठा लाभ मी समजतों.' ६२ मारुतीचें हें भाषण ऐकून जानकी त्याला म्हणाली, 'हे सौम्य ( हनुमंता )! सौम्यगुण म्हणून जे कांहीं आहेत, ते सर्व तुझ्याच ठिकाणीं वसत आहेत. ६३ रामाला मी केव्हां पाहीन, असें मला झालें आहे, तरी रामानें ( तशा ) शीघ्र आज्ञा द्यावी ( असें कर ). 'बरें आहे,' असें म्हणून ( मारुतीनें ) तिला प्रणाम केला, आणि तो रघूत्तमाच्या भेटीसाठीं निघाला. ६४ ( रामाकडे येऊन ) जानकीचें सर्व भाषण रामाच्या पुढें ( मारुतीनें ) निवेदन केलें. तो म्हणाला, 'जिच्याकरितां एवढ्या कार्याला आरंभ केला, आणि जी या सर्व कर्मांची फलप्राप्ति होय, त्या शोकसंतप्त जानकीदेवीला ( आणवून ) तूं भेटावें, हें योग्य आहे.' असें

मायासीतां परित्यक्तुं जानकीमनले स्थिताम् । आदातुं मनसा ध्यात्वा रामः प्राह विभीषणम् ॥ ६७ ॥ गच्छ राजन् जनकजामानयाशु ममांतिकम् । स्नातां विरजवस्त्राढ्यां सर्वाभरणभूषिताम् ॥ ६८ ॥ विभीषणोऽपि तच्छ्रुत्वा जगाम सहमारुतिः । राक्षसीभिः सुवृद्धाभिः स्नापयित्वा तु मैथिलीम् ॥ ६९ ॥ सर्वाभरणसंपन्नामारोप्य शिबिकोत्तमे । याष्टीकैर्बहुभिर्गुप्तां कंचुकोष्णीषिभिः शुभाम् ॥ ७० ॥ तां द्रष्टुमागताः सर्वे वानरा जनकात्मजाम् । तान्वारयंतो बहवः सर्वतो वेत्रपाणयः ॥ ७१ ॥ कोलाहलं प्रकुर्वंतो रामपार्श्वमुपाययुः । दृष्ट्वा तां शिबिकारूढां दूरादथ रघूत्तमः ॥ ७२ ॥ विभीषण किमर्थं ते वानरान्वारयंति हि । पश्यंतु वानराः सर्वे मैथिलीं मातरं यथा ॥ ७३ ॥ पादचारेण सा यातु जानकी मम सन्निधिम् । श्रुत्वा तद्रामवचनं शिबिकादवरुह्य सा ॥ ७४ ॥ पादचारेण शनकैरागता रामसन्निधिम् । रामोऽपि दृष्ट्वा तां

हनुमंताने सांगितल्यावर त्या ज्ञानश्रेष्ठ रामानें मायासीतेचा त्याग करून अग्नींत असलेल्या जानकीला प्रकट करावें, असें मनांत आणिलें. मग राम विभीषणाला म्हणाला,६५,६६, ६७ 'राजा ! तूं जा आणि जानकीला मजजवळ लवकर घेऊन ये. तिला स्नान घालून, निर्मल वस्त्रें नेसवून आणि सर्वालंकारांनीं भूषवून ( आण ).' ६८ तें ऐकून विभीषण मारुतीसह ( तिकडे ) गेला. त्यानें अत्यंत वृद्ध अशा राक्षसीच्या हातीं जानकीला स्नान घातलें, ६९ सर्व अलंकार लेवविले, आणि उत्तम पालखींत बसविलें. त्या सुंदरीबरोबर सरंक्षणासाठीं म्हणून अनेक भालदार होते. त्यांच्या अंगांत कंचुक-पायघोळ आंगरखे-व डोक्यावर पागोटीं होतीं. ७० त्या जनकजेला पाहण्याकरितां सर्व वानर ( धांवून ) आले असतां अनेक वेत्रधारे त्यांना सर्व बाजूंला सारीत असत. ७१ मोठा कल्लोळ करीत ते सर्व रामाजवळ आले. मेण्यांत बसून आलेल्या तिला-जानकीला-दुरूनच पाहून राम ( म्हणाला ), ७२ 'विभीषणा ! ते ( तुझे लोक ) वानरांना काय म्हणून निवारीत आहेत ? सर्व वानरांनीं मातेप्रमाणें जानकीचें दर्शन घ्यावें. ७३ सीतेनें मजजवळ पायीं चालत यावें.' हें रामाचें बोलणें ऐकून ती ( सीता ) पालखींतून खालीं उतरली, ७४ आणि पायी चालत हळूहळू रामाकडे आली रामानेंही विशिष्ट कार्यासाठीं निर्माण केलेल्या त्या माया-

१. भालदार-काठीवाले. वेत्र-काठी. ( हातांत ) काठी धरणार. २. लोकांना दर्शन घेण्यास सोपें पडावें, म्हणून.

मायासीतां कार्यार्थेनिर्मिताम् ॥ ७५ ॥ अवाच्यवादान्बहुशः प्राह तां रघुनंदनः । अमृष्यमाणा सा सीता वचनं राघवोदितम् ॥ ७६ ॥ लक्ष्मणं प्राह मे शीघ्रं प्रज्वालय हुताशनम् । विश्वासार्थं हि रामस्य लोकानां प्रत्ययाय च ॥ ७७ ॥ राघवस्य मतं ज्ञात्वा लक्ष्मणोऽपि तदैव हि । महाकाष्ठचयं कृत्वा ज्वालयित्वा हुताशनम् ॥ ७८ ॥ रामपार्श्वमुपागम्य तस्थौ तूष्णीमरिंदमः । ततः सीता परिक्रम्य राघवं भक्तिसंयुता ॥ ७९ ॥ पश्यतां सर्वलोकानां देवराक्षसयोषिताम् । प्रणम्य देवताभ्यश्च ब्राह्मणेभ्यश्च मैथिली ॥ ८० ॥ बद्धांजलिपुटा चेदमुवाचाग्निसमीपगा । यथा मे हृदयं नित्यं नापसर्पति राघवात् ॥ ८१ ॥ तथा लोकस्य साक्षी मां सर्वतः पातु पावकः । एवमुक्त्वा तदा सीता परि-

सीतेकडे पाहिलें, ७५ आणि मग तो रघुनंदन (राम) तिला अनेक न उच्चारण्याजोगे दुःशब्द बोलला. ते राघवानें उच्चारिलेले शब्द सीतेला सहन झाले नाहीत. ७६ ती लक्ष्मणाला म्हणाली, 'माझ्याकरितां लवकर अग्नि पेटवा. रामाचा विश्वास पटावा, आणि लोकांची खात्री व्हावी याकरितां ( मी दिव्य करित्यें ). ' ७७ रामाची ( त्या कृत्याला ) अनुमति आहे, हें जाणून लक्ष्मणानेंही लागलीच मोठी काष्ठांची रास रचिली, आणि अग्नि पेटविला. ७८ नंतर तो शत्रुंजय ( लक्ष्मण ) रामाजवळ जाऊन उभा राहिला. पुढें सर्व लोक आणि देव व राक्षसस्त्रिया यांसमक्ष सीतेनें भक्तिपूर्वक रामाला प्रदक्षिणा घातली, देवतांना आणि ब्राह्मणांना नमस्कार केले, ७९,८० आणि अग्नीजवळ जाऊन व हात जोडून सीता म्हणाली, 'माझे हृदयांत रामावांचून दुसरा विचार कधीहीं आला नाहीं, ८१ ( ही गोष्ट खरी असेल ) तरी लोकसाक्षी अग्नि माझें सर्वथा रक्षण करो.' असें म्हणून सीतेनें अग्नीला प्रदक्षिणा घातली.

१. तूं परपुरुषाच्या-रावणाच्या-घरीं राहिलीस, तूं भ्रष्ट झालीस, अशा प्रकारचे. २. ह्या वेळच्या सीतेच्या स्थितीचे एकनाथानीं केलेलें वर्णनः—' ते जवळी आलिया पाठीं । राम न पाहे दृष्टीं । स्फुंदत पडलीसे गोरटी । श्रीराम पोटीं कठिण भारी ॥ देखोनि जानकीची अवस्था । सौमित्र वोसडला चित्ता । निज पालवें तत्त्वतां । होय झांकिता निजवदना ॥ ' —भा. रामायण, युद्धकांड ६८.

क्रम्य हुताशनम् ॥ ८२ ॥ विवेश ज्वलनं दीप्तं निर्भयेन हृदा सती ॥ ८३ ॥ दृष्ट्वा ततो भूतगणाःससिद्धाः सीतां महावह्निगतां भृशार्ताः। परस्परं प्राहुरहो स सीतां रामः श्रियं स्वां कथमत्यजज्ज्ञः ॥ ८४ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकांडे द्वादशः सर्गः ॥ १२ ॥

## युद्धकांड, सर्ग तेरावा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ ततः शक्रः सहस्राक्षो यमश्च वरुणस्तथा। कुबेरश्च महातेजाः पिनाकी वृषवाहनः ॥ १ ॥ ब्रह्मा ब्रह्मविदां श्रेष्ठो मुनिभिः सिद्धचारणैः। पितरो ऋषयः साध्या गंधर्वाप्सरसोरगाः ॥ २ ॥ एते चान्ये विमानाग्र्यैराजग्मुर्यत्र राघवः। अब्रुवन्परमात्मानं रामं प्रांजलयश्च ते ॥ ३ ॥ कर्ता त्वं सर्वलोकानां साक्षी विज्ञानविग्रहः। वसूनामष्टमोऽसि त्वं रुद्राणां शंकरो भवान् ॥ ४ ॥ आदिकर्तासि लोकानां

८२ आणि मग पेटलेल्या अग्नींत त्या पातिव्रतेनें प्रवेश केला. तिच्या अंतःकरणाला भीति म्हणून वाटली नाही. ८३ त्या घोर अग्नीमध्यें सीतेनें प्रवेश केला. हें पाहून सर्व सिद्ध आणि भूतगण अत्यंत उद्विग्न झाले आणि परस्परांशीं म्हणाले, 'ही सीता म्हणजे प्रत्यक्ष लक्ष्मी; मग राम एवढा ज्ञानी असून त्यानें त्या सीतेचा त्याग केला हें कसें ? ८४' "

**युद्धकांड, बारावा अध्याय समाप्त.**

श्रीमहादेव म्हणाला, " पुढें सहस्रनयन इंद्र, यम, वरुण, महातेजस्वी कुबेर, वृषवाहन शंकर, १ ब्रह्मवेत्त्यांत श्रेष्ठ असा ब्रह्मदेव, मुनि, सिद्ध[1], चारण, पितर, ऋषि, साध्य, गंधर्व, अप्सरा, सर्प, २ हे व दुसरेही अनेक उत्तम विमानांत बसून राम होता त्या ठिकाणीं आले, आणि हात जोडून परमात्म्या रामाला म्हणाले, ३ 'तूं सर्व लोकांचा कर्ता[2] आहेस, ( त्यांच्या कर्मांचा ) तूं साक्षी[3] आहेस, तूं ज्ञानरूपी[4] आहेस, तूं वसूंपैकीं आठवा[5] आहेस. तूं रुद्रांमध्यें शंकर[6] आहेस. ४ सर्व लोकांचा आदिकर्ता

१. सिद्ध, साध्य त्यांची गणना देवयोनींत होत असून चारण, गंधर्व हे देवाचे गायक होत. २. 'त्वमेव केवलं कर्तासि'–गणपत्यथर्वशीर्ष. ३. 'गतिर्भर्ता प्रभुः साक्षी।'–भ. गीता. ४. 'ज्ञानं ज्ञानवतामहम्।'–भ. गीता. ५. 'वसूनां पावकश्चास्मि।' –भ. गीता. अष्टवसु– आप, ध्रुव, सोम, धर, अनिल, अनल, प्रत्यूष, प्रभास. ६ 'रुद्राणां शंकरश्चास्मि'। –भ. गीता.

ब्रह्मा त्वं चतुराननः । अश्विनौ घ्राणभूतौ ते चक्षुषी चंद्रभास्करौ ॥५॥ लोकानामादिरंतोऽसि नित्य एकः सदोदितः । सदा शुद्धः सदा बुद्धः सदा मुक्तोऽगुणोऽद्वयः ॥ ६ ॥ त्वन्मायासंवृतानां त्वं भासि मानुषविग्रहः । त्वन्नाम स्मरतां राम सदा भासि चिदात्मकः ॥ ७ ॥ रावणेन हृतं स्थानमस्माकं तेजसा सह । त्वयाद्य निहतो दुष्टः पुनः प्राप्तं पदं स्वकम् ॥ ८ ॥ एवं स्तुवत्सु देवेषु ब्रह्मा साक्षात्पितामहः । अब्रवीत्प्रणतो भूत्वा रामं सत्यपथे स्थितम् ॥ ९ ॥ ब्रह्मोवाच ॥ वंदे देवं विष्णुमशेषस्थितिहेतुं त्वामध्यात्मज्ञानिभिरंतर्हृदि भाव्यम् । हेयाहेयद्वंद्वविहीनं परमेकं सत्तामात्रं सर्वहृदिस्थं दृशिरूपम् ॥ १० ॥ प्राणापानौ निश्चयबुद्ध्या हृदि रुद्ध्वा छित्त्वा सर्वं संशयबंधं विषयौघान् । पश्यंतीशं

चतुर्मुख ब्रह्मदेव तूं आहेस, अश्विनीकुमार तुझ्या नाकपुड्या आहेत. चंद्रसूर्य तुझे नेत्र आहेत. ५ तूं लोकांचा आद्यंत आहेस. तूं सर्वदा उदय पावलेला आहेस. तूं नित्य शुद्ध, ज्ञानस्वरूप, नित्य मुक्त, निर्गुण आणि अद्वय असा आहेस. ६ तुझ्या मायेनें जे वेष्टिलेले आहेत, त्यांना तूं मनुष्याकार दिसतोस. ( परंतु ) तुझें नामस्मरण करणाऱ्यांना तूं सर्वदा चिद्रूप वाटतोस. ७ रावणानें आमचें स्थान आणि आमचें तेज–पराक्रम–ह्यांचें हरण केलें होतें, परंतु आज तुझ्याकडून त्या दुष्टाचा वध झाला असल्यामुळें आमचें पद आम्हांला पुनः मिळालें आहे. ' ८ अशा प्रकारें देव स्तुति करीत असतां साक्षात् पितामह ब्रह्मदेव नम्र होऊन सत्यमार्गांत नित्य राहणाऱ्या रामाला बोलला. ९ ब्रह्मदेव म्हणाला, 'विष्णुरूपा देवा ! तं सर्वांच्या रक्षणाचें कारण आहेस; अध्यात्मज्ञानसंपन्न ( योगी ) हृदयांत तुझें ध्यान करीत असतात; –त्यांना तूं ध्येय आहेस–तुझ्या ठिकाणीं त्याज्य व ग्राह्य हा भेद नाहीं; तूं परिपूर्ण एक, सत्तारूप, सर्वांच्या हृदयांत वास करणारा, ज्ञानरूप असा आहेस. १० निश्चयबुद्धीनें प्राण आणि अपान ह्या वायूंना हृदयांत रोधून, त्याचप्रमाणें सर्व संशयबंधांचा आणि विषयसमूहांचा छेद करून योगिजन तमोगुणाचा निरास करितात, आणि रत्न-

१. चक्षुः सूर्योऽजायत. २. 'सर्गाणामादिरन्तश्च ।' –भ गीता. ३. त्याज्य–दुःख, ग्राह्य–सुख. ४. हे पाच आहेत. ते–प्राण, अपान, समान, व्यान, उदान. ( हृदि प्राणो गुदेऽपानः समानो नाभिसंस्थितः । उदानो कंठदेशस्थो व्यानः सर्वशरीरगः ' ॥

यं गतमोहा यतयस्तं वंदे रामं रत्नकिरीटं रविभासम् ॥११॥ मायातीतं माधवमाद्यं जगदादिं मानातीतं मोहविनाशं मुनिवंद्यम् । योगिध्येयं योगविधानं परिपूर्णं वंदे रामं रंजितलोकं रमणीयम् ॥ १२ ॥ भावाभावप्रत्ययहीनं भवमुख्यैर्योगासक्तैरर्चितपादांबुजयुग्मम् । नित्यं शुद्धं बुद्धमनंतं प्रणवाख्यं वंदे रामं वीरमशेषासुरदावम् ॥ १३ ॥ त्वं मे नाथो नाथितकार्याखिलकारी मानातीतो माधवरूपोऽखिलधारी । भक्त्या गम्यो भावितरूपो भवहारी योगाभ्यासैर्भावितचेतःसहचारी ॥ १४ ॥ त्वामाद्यंतं लोकततीनां परमीशं लोकानां नो लौकिकमानैरधिगम्यम ।

किरीट धारण करून सूर्यासमान शोभणाऱ्या ज्या तुझे दर्शन घेतात, त्या तुला माझें वंदन असो. ११ जो मायातीत आहे, जो लक्ष्मीचा पति आहे, जो पुरातन आहे, जो जगाचें आदिकारण आहे, जो अमेय—परिमाणातीत—आहे, जो मोहाचा नाश करितो, ज्याला सर्व मुनि वंदन करितात, ज्याचें योगिजन ध्यान करितात, ज्यानें योगमार्गाची प्रवृत्ति केली, जो परिपूर्ण आहे, जो स्वतः रमणीय असून इतरांना रमवितो, अशा त्या रामाला ( तुला ) मी वंदन करितों. १२ भावाभाव—अस्ति-नास्ति हे दोन्ही अनुभव—ज्यासंबंधीं नाहींत, योगासक्त होऊन—विषयभोगांवर आसक्त न राहातां—शंकरप्रभृति देव ज्याच्या चरणकमलयुगलाचें अर्चन करितात, जो नित्य, निर्मल, ज्ञानघन, अनंत, प्रणवाचा—ओंकाराचा—संज्ञक आहे, जो सकल दैत्यांचा वणव्यासारखा नाश करणारा होय, त्या रामवीराला मी वंदन करितों. १३ तूं माझा नाथ आहेस, माझीं सर्व प्रार्थित कार्यें तूं तडीला नेलीं आहेस, तूं प्रमाणातीत आहेस, तूं लक्ष्मीपति—विष्णुरूपी—आहेस, तूं चराचराचा आश्रय आहेस, तूं भक्तीनें प्राप्त होतोस, ध्यान केलें असतां तूं संसाराचा नाश करतोस, योगाभ्यासानें ज्यांची अंतःकरणें शुद्ध झालीं आहेत, त्यांच्याचबरोबर तूं फिरतोस—त्यांनाच कळतोस. १४ तूं लोकसमुदायांचा उत्पत्तिकर्ता व लयकर्ता आहेस; तसाच तूं लोकांचा मुख्य पालनकर्ता आहेस; लौकिक

१ सदृश वर्णनः—' निर्लिप्तं च निरीहं च परमात्मानमीश्वरम् । नित्यं सत्यं च परमं भगवंतं सनातनम् ॥ यं सृष्टेरादिभूतं च सर्वबीजं परात्परम् । योगिनस्तं प्रपद्यंते भगवंतं सनातनम् ॥ '—श्रीकृष्णस्तोत्र. २. सदृश उताराः—' ज्ञाता तूं, दाता तूं, त्राता तूं, वीर धीर भर्ता तूं, । जनपीडाहर्ता तूं, श्रीरामा ! मुख्य विश्वकर्ता तूं. ॥ '—आर्याकेकावलि. मोरोपंत.

भक्तिश्रद्धाभावसमेतैर्भजनीयं वंदे रामं सुंदरमिंदीवरनीलम् ॥ १५ ॥
को वा ज्ञातुं त्वामतिमानं गतमानं मायासक्तो माधव शक्तो मुनिमान्यम्।
वृंदारण्ये वंदितवृंदारकवृंदं वंदे रामं भवमुखवंद्यं सुखकंदम् ॥ १६ ॥
नानाशास्त्रैर्वेदकदंबैः प्रतिपाद्यं नित्यानंदं निर्विषयज्ञानमनादिम् । मत्सेवार्थं
मानुषभावं प्रतिपन्नं वंदे रामं मरकतवर्णं मथुरेशम्॥ १७ ॥ श्रद्धायुक्तो
यः पठतीमं स्तवमाद्यं ब्राह्मं ब्रह्मज्ञानविधानं भुवि मर्त्यः । रामं श्यामं
कामितकामप्रदमीशं ध्यात्वा ध्याता पातकजालैर्विगतः स्यात् ॥ १८ ॥
श्रुत्वा स्तुतिं लोकगुरोर्विभावसुः स्वांके समादाय विदेहपुत्रिकाम् ।
विभ्राजमानां विमलारुणद्युतिं रक्तांबरां दिव्यविभूषणान्विताम् ॥ १९ ॥
प्रोवाच साक्षी जगतां रघूत्तमं प्रपन्नसर्वार्तिहरं हुताशनः । गृहाण देवीं

प्रमाणांनीं तूं कळण्याजोगा नाहीस; भक्ति, श्रद्धा आणि भाव यांनीच ज्याचें भजन करितां येतें, त्या नीलकमलासमान श्यामवर्ण सुंदर ( तुला ) रामाला मी वंदन करितों. १५ हे माधवा ! तूं प्रमाणातीत आहेस, तुझ्या स्वरूपाला इयत्ता नाहीं. ( मायेनें ) इंद्रियासक्त झालेल्या लोकांना तुझ ज्ञान कसें होणार ? तूं मुनिजनांना मान्य आहेस, शंकरादि देवांनाही तूं वंद्य आहेस, तरी वृंदावनांत ( कृष्णावतारसमयी ) देवसमुदायाला तूं वंदन करीत होतास. तूं सुखकंद आहेस; अशा तुज रामाला मी वंदन करितों. १६ नाना शास्त्रें आणि वेदसमुदाय तुझें वर्णन करितात, तूं नित्यानंदरूप व निर्विषयज्ञानरूप आहेस, तूं अनादि आहेस, माझ्या कार्यासाठीं तूं मनुष्यरूप धारण केलें आहेस. मथुरापति असतां पाचेसारखा नीलवर्ण ( धारण करणाऱ्या ) रामा ! तुला वंदन करितों. १७ भक्तांच्या इच्छित वासना परिपूर्ण करणाऱ्या श्यामवर्ण रामाचें ध्यान करून, ब्रह्मज्ञान प्राप्त करून देणाऱ्या ब्रह्मदेवाचे ह्या आद्य स्तवनाचा जो मनुष्य पृथ्वीवर श्रद्धापूर्वक पाठ करील, आणि त्याचें चिंतन करील, त्याचीं सर्व पापें नाहींशी होतील.' १८ लोकगुरु ( ब्रह्मदेवानें ) केलेली ही स्तुति ऐकतांच जानकीला अंकावर घेऊन अग्नि प्रकट झाला. ती (जानकी) तेजःपुंज दिसत होती. तिची कांति निर्मल व अरुणासारखी किंचित् रक्तवर्णाची होती. तिनें रक्तवस्त्र परिधान केलें होतें, व दिव्य अलंकार धारण केले होते. १९ शरणागतांची सकल दुःखें हरण करणाऱ्या त्या रघूत्तमा( रामा )ला सर्व जगतांचा साक्षी अग्नि म्हणाला, 'हे रघुनाथा ! पूर्वी तूं वनामध्यें देवी जानकीला

१. प्रेम, विश्वास आणि भाव-निश्चयबुद्धि, यांहींकरून. २. अमुकच असें सांगता येत नाहीं, असे ज्ञान हें ज्याचें रूप. ३. श्रीकृष्ण.

रघुनाथ जानकीं पुरा त्वया मय्यवरोपितां वने ॥ २० ॥ विधाय माया-
जनकात्मजां हरे दशाननप्राणविनाशनाय च । हतो दशास्यः सह पुत्र-
बांधवैर्निराकृतोऽनेन भरो भुवः प्रभो ॥ २१ ॥ तिरोहिता सा प्रतिबिंब-
रूपिणी कृता यदर्थं कृतकृत्यतां गता । ततोऽतिहृष्टां परिगृह्य जानकीं
रामः प्रहृष्टः प्रतिपूज्य पावकम् ॥२२॥ स्वांके समावेश्य सदानपायिनीं
श्रियं त्रिलोकीजननीं श्रियः पतिः । दृष्ट्वाथ रामं जनकात्मजायुतं श्रिया
स्फुरंतं सुरनायको मुदा ॥ २३ ॥ भक्त्या गिरा गद्गदया समेत्य
कृतांजलिः स्तोतुमथोपचक्रमे ॥ इंद्र उवाच ॥ भजेऽहं सदा राम-
मिंदीवराभं भवारण्यदावानलाभाभिधानम् । भवानीहृदा भावितानंदरूपं
भवाभावहेतुं भवादिप्रपन्नम् ॥ २४ ॥ सुरानीकदुःखौघनाशैकहेतुं

माझ्या स्वाधीन केली होतीस, तिचा ( आतां ) तूं स्वीकार कर. २० ( रामरूपा ) हरे ! रावणाचे प्राण हरण करण्याकरितां मायासीता निर्माण करून तूं रावणाचा पुत्रबांधवांसह वध केलास, आणि तेणेंकरून हे प्रभो ! पृथ्वीचा भार दूर केलास. २१ छायारूप सीता ज्या कार्याकरितां निर्माण केली होती, तें कार्य सिद्धीला गेलें. त्यामुळें ती कृतकृत्य झाली ( व अंतर्धान पावली ). ' हें ऐकून रामाला आनंद झाला. त्यानें अग्नीची पूजा केली, २२ आणि परम हर्षभरित सीतेचा स्वीकार करून त्या लक्ष्मीपतीनें तिला मांडीवर बसविलें. ती सीता म्हणजे त्रैलोक्यजननी, अविनाशी लक्ष्मीच होय. जानकीसहित कांतीनें उज्ज्वल शोभणाऱ्या रामाला पाहून सुरनायक इंद्राला आनंद वाटला. तो रामाजवळ आला आणि भक्तिपूर्वक हात जोडून सद्गदित वाणीनें रामाची स्तुति करण्यास त्यानें प्रारंभ केला. २३ इंद्र म्हणाला, ' राम नीलकमलवर्ण आहे, त्याचें नांव संसाररूपी अरण्याला दावानला-सारखें–नाश करणारें–आहे. त्याच्या आनंदरूपाचें चिंतन पार्वती अंतःकरणांत करीत असते. तो संसाराचा नाश होण्याचें कारण आहे. शंकरादि देव त्याला शरण येत असतात. २४ देवगणांच्या दुःखपरंपरेचा नाश करणारा हा एक राम होय

१. ' नतावनधृतव्रत ! ज्वलन तूंचि बाधा-वनीं ' । -मो. केकावलि. २. ' विरूपाक्ष-श्यामुपदिशति यन्नाम शिवदं सहस्र यन्नाम्ना पठति गिरिजा प्रत्युषसि वै ।' –रामचंद्राष्टक.

नराकारदेहं निराकारमीड्यम् । परेशं परानंदरूपं वरेण्यं हरिं राममीशं भजे भारनाशम् ॥ २५ ॥ प्रपन्नाखिलानंददोहं प्रपन्नं प्रपन्नार्तिनिःशेषनाशाभिधानम् । तपोयोगयोगीशभावाभिभाव्यं कपीशादिमित्रं भजे राममित्रम् ॥ २६ ॥ सदा भोगभाजां सुदूरे विभांतं सदा योगभाजामदूरे विभांतम् । चिदानंदकंदं सदा राघवेशं विदेहात्मजानंदरूपं प्रपद्ये ॥ २७ ॥ महायोगमायाविशेषानुयुक्तो विभासीश लीलानराकारवृत्तिः । त्वदानंदलीलाकथापूर्णकर्णाः सदानंदरूपा भवंतीह लोके ॥ २८ ॥ अहं मानपानाभिमत्तप्रमत्तो न वेदाखिलेशाभिमानाभिमानः । इदानीं भवत्पादपद्मप्रसादात्त्रिलोकाधिपत्याभिमानो विनष्टः ॥ २९ ॥ स्फुरद्रत्नकेयूरहाराभिरामं धराभारभूतासुरानीकदावम् ।

हा निराकार असूनहि मनुष्यदेह धारण करून आला आहे. हा स्तुत्य आहे. हा (पृथ्वीचा) भार नाहींसा करणारा आहे. अशा परमसमर्थ, परानंदरूप, श्रेष्ठ, रामरूप हरीला मी भजतों. २५ राम भक्ताधीन असून हा शरणागतांना सकलानंद देणारा आहे; त्याचें नांवच असें आहे की, तें त्या शरणागतांची दुःखें निःशेष नाहीशीं करितें; तपाच्या योगें योग साधणारे योगीश सत्तारूपानें त्याचें चिंतन करीत असतात; तो सुग्रीवादिकांचा मित्र झाला; अशा त्या रामरूपी सूर्याचें मी भजन करितों. २६ भोगांवर मन ठेवणाऱ्या लोकांना हा राम दूर वाटतो. परंतु योगाभ्यासी लोकांना अगदी जवळ—हातांत—आहेसा वाटतो. हा सर्वदा चिदानंदकंद आहे. ह्याचें रूप जनककन्येला आनंदविणारें आहे. ह्या रघूत्तम रामाला मी शरण जातों. २७ रामा ! तूं योगमायेच्या विशेषांनी युक्त होतोस, त्या वेळीं लीलेसाठीं नराकारवृत्ति धारण करून वागतोस. तुझ्या आनंददायक लीलाचरित्रांच्या श्रवणानें ह्या लोकीं ज्यांचे कान भरून जातात, ते नित्य आनंदरूप होतात. २८ वैभवाभिमानरूपी मद्यप्राशनानें मी अत्यंत उन्मत्त झालों होतों. सर्व श्रीमंत लोक अभिमान बाळगतात, तसाच अभिमान मलाही वाटून मी तुला जाणलें नाही. परंतु आतां तुझ्या पदकमलाच्या कृपेनें 'त्रैलोक्याचा अधिपति' म्हणून मला वाटणारा गर्व नाहीसा झाला आहे. २९ ज्याच्या शरीरावर रत्नांची बाहुभूषणें व हार चमकत आहेत, व त्यामुळें ज्याचें स्वरूप रमणीय वाटत आहे,

१. 'निर्गुणश्च निराकारः साकारः सगुणः स्वयम् ।'—कृष्णस्तोत्र. २. 'प्रभो ! शरण आलें यावरि न व्हा कधीं वांकडे ।'—मो. केकावलि. (२) 'अनन्यासि रक्षीतसे चापपाणी ।'—रामदास. ३. ब्रह्मानंदाचें उत्पत्तिस्थान. ४. सत्त्व, रज, तम, इत्यादि विशेष गुणांनीं.

शरच्चंद्रवक्त्रं लसत्पद्मनेत्रं दुरावारपारं भजे राघवेशम् ॥ ३० ॥ सुराधीशनीलाभ्रनीलांगकांतिं विराधादिरक्षोवधाल्लोकशांतिम् । किरीटादिशोभं पुरारातिलाभं भजे रामचंद्रं रघूणामधीशम् ॥ ३१ ॥ लसच्चंद्रकोटिप्रकाशादिपीठे समासीनमंके समाधाय सीताम् । स्फुरद्धेमवर्णां तडित्पुंजभासां भजे रामचंद्रं निवृत्तार्तितंद्रम् ॥ ३२ ॥ ततः प्रोवाच भगवान्भवान्या सहितो भवः । रामं कमलपत्राक्षं विमानस्थो नभःस्थले ॥ ३३ ॥ आगमिष्याम्ययोध्यायां द्रष्टुं त्वां राज्यसत्कृतम् । इदानीं पश्य पितरमस्य देहस्य राघव ॥ ३४ ॥ ततोऽपश्यद्विमानस्थं रामो दशरथं पुरः । ननाम शिरसा पादौ मुदा भक्त्या सहानुजः ॥ ३५ ॥ आलिंग्य मूर्ध्न्यवघ्राय रामं दशरथोऽब्रवीत् । तारितोऽस्मि त्वया वत्स संसाराद्दुःखसागरात ॥ ३६ ॥ इत्युक्त्वा पुनरालिंग्य ययौ रामेण

पृथ्वीला भार झालेल्या दैत्यसैन्यांना जो वणव्यासारखा वाटतो, ज्याचे मुख शरदृतूंतील चंद्राप्रमाणें आहे, ज्याचे नेत्र कमळाप्रमाणें शोभणारे आहेत, ज्याच्या माहिम्याचा थांग कोणासही लागणें अत्यंत कठीण आहे, अशा राघवेशाला मी भजतों. ३० इंद्रनील मण्याप्रमाणें किंवा मेघाप्रमाणें ज्याची कांति श्यामवर्ण आहे, विराधादि राक्षसांचा वध करून ज्याणें लोकांत शांति प्रस्थापित केली आहे, किरीटादिकांनीं ज्याला शोभा आली आहे, शंकराला जो अलभ्य लाभासारखा वाटतो, त्या रघुपति रामचंद्राला मी भजतों. ३१ जिचा वर्ण सुवर्णासमान तेजःपुंज आहे, व जिची कांति विद्युल्लतापुंजासारखी आहे, त्या सीतेला अंकावर घेऊन कोटिचंद्रांप्रमाणें शोभणाऱ्या उत्तम सिंहासनावर बसणाऱ्या रामचंद्राला मी भजतों. रामचंद्रापासून दुःख आणि आळस ही दूर असतात. ३२ ( याप्रमाणें इंद्राची स्तुति झाल्यावर ) पार्वतीसह विमानांत बसून आकाशमार्गें जात असलेल्या शंकरांनी त्या कमलपत्राक्ष रामाला म्हटलें, ३३ ‘ रामा ! तुझा अयोध्येमध्यें राज्याभिषेकसमारंभ होईल, तो पाहण्याला मी येणार आहें. सांप्रत या तुझ्या देहाचा जनक जो दशरथ त्याला ( ह्या विमानांत ) पहा.’ ३४ तेव्हां विमानांत अग्रभागीं बसलेला दशरथ रामाच्या दृष्टीस पडला. कनिष्ठ बंधू ( लक्ष्मणा ) सह त्यानें भक्तिपुरस्सर व आनंदपूर्वक पित्याच्या चरणीं शिरसाष्टांग वंदन केलें. ३५ दशरथानें रामाला आलिंगन दिलें, आणि मस्तकाच्या ठिकाणी हुंगून म्हटलें, ‘ वत्सा ! ह्या संसाराच्या दुःखरूप सागरांतून तूं मला तारिलेंस.’ ३६ असें म्हणून पुनः (दशरथानें) रामाला आलिंगन दिलें. मग रामानें पूजा

पूजितः । रामोऽपि देवराजं तं दृष्ट्वा प्राह कृतांजलिम् ॥ ३७ ॥ मत्कृते
निहतान्संख्ये वानरान्पतितान् भुवि । जीवयाशु सुधावृष्ट्या सहस्राक्ष
ममाज्ञया ॥ ३८ ॥ तथेत्यमृतवृष्ट्या तान् जीवयामास वानरान् । ये
ये मृता मृधे पूर्वं ते ते सुप्तोत्थिता इव । पूर्ववद्बलिनो हृष्टा रामपार्श्वमु-
पाययुः ॥ ३९ ॥ नोत्थिता राक्षसास्तत्र पीयूषस्पर्शनादपि । विभी-
षणस्तु साष्टांगं प्रणिपत्याब्रवीद्वचः ॥ ४० ॥ देव मामनुगृह्णीष्व मयि
भक्तिर्यदा तव । मंगलस्नानमद्य त्वं कुरु सीतासमन्वितः ॥ ४१ ॥
अलंकृत्य सह भ्रात्रा श्वो गमिष्यामहे वयम् । विभीषणवचः श्रुत्वा
प्रत्युवाच रघूत्तमः ॥ ४२ ॥ सुकुमारोऽतिभक्तो मे भरतो मामवेक्षते ।
जटावल्कलधारी स शब्दब्रह्मसमाहितः ॥ ४३ ॥ कथं तेन विना
स्नानमलंकारादिकं मम । अतः सुग्रीवमुख्यांस्त्वं पूजयाशु विशेषतः
॥ ४४ ॥ पूजितेषु कपींद्रेषु पूजितोऽहं न संशयः । इत्युक्तो राघवे-

केल्यावर (दशरथ) निघून गेला. इकडे राम आपल्यापुढे हात जोडून उभा असलल्या देवेंद्राला पाहून म्हणाला, ३७ 'सहस्राक्षा[1] मजकरितां लढाईंत मरून जमिनीवर पडलेल्या वानरांना अमृतवृष्टि करून लवकर सजीव कर, अशी माझी तुला आज्ञा आहे.' ३८ 'ठीक आहे,' असें म्हणून अमृतवृष्टि करून (इंद्रानें) त्या वानरांना जीवंत केलें. पूर्वी युद्धांत जे जे मेले होते, ते ते निद्रेंतून जागे होऊन उठल्यासारखे आनंदानें रामाजवळ आले. आतां ते सर्व पूर्ववत् बलवान् दिसत होते. ३९ तेथें राक्षसांना अमृताचा स्पर्श झाला, तरी ते उठले नाहीत. विभीषणानें रामाला साष्टांग नमस्कार केला आणि म्हटलें, ४० 'देवा ! मजवर कृपा करा. ज्या अर्थी मजवर आपलें प्रेम आहे, त्या अर्थी (माझ्या इच्छेकरितां) आपण आज सीतेसह मंगलस्नान करा. ४१ आणि मग अंगावर अलंकार घालून (आपल्या) वधूसह आपण उद्यां अयोध्येला जाऊं.' विभीषणाचें भाषण ऐकून रघूत्तम (राम) म्हणाला, ४२ 'माझा सुकुमार परम भक्त भरत माझी वाट पाहात राहिला आहे. त्यानें जटा आणि वल्कलें धारण केली असून तो शब्दब्रह्माच्या[2] ध्यानांत सर्वदा निमग्न असतो. ४३ त्यावांचून मंगलस्नान, अलंकारादिक गोष्टी मी कशा बरें कराव्या? म्हणून तूं विशेषतः सुग्रीवादि वानरांचा सत्कार सत्वर कर. ४४ वानरश्रेष्ठांचा सत्कार केलास, म्हणजेच माझा सत्कार केलास,

१. इंद्रा! (इंद्राला सहस्र नयनं असल्याची कथा प्रसिद्ध आहे.) २. शब्दब्रह्म—ओंकार.

**णाशु स्वर्णरत्नांबराणि च ॥ ४५ ॥ ववर्ष राक्षसश्रेष्ठो यथाकामं यथारुचि । ततस्तान्पूजितान्दृष्ट्वा रामो रत्नैश्च यूथपान् ॥ ४६ ॥ अभिनंद्य यथान्यायं विससर्ज हरीश्वरान् । विभीषणसमानीतं पुष्पकं सूर्यवर्चसम् ॥ ४७ ॥ आरुरोह ततो रामस्तद्विमानमनुत्तमम् । अंके निधाय वैदेहीं लज्जमानां यशस्विनीम् ॥ ४८ ॥ लक्ष्मणेन सह भ्रात्रा विक्रांतेन धनुष्मता । अब्रवीच्च विमानस्थः श्रीरामः सर्ववानरान् ॥ ४९ ॥ सुग्रीवं हरिराजं च अंगदं च विभीषणम् । मित्रकार्यं कृतं सर्वं भवद्भिः सह वानरैः ॥ ५० ॥ अनुज्ञाता मया सर्वे यथेष्टं गंतुमर्हथ । सुग्रीव प्रतियाह्याशु किष्किंधां सर्वसैनिकैः ॥ ५१ ॥ स्वराज्ये वस लंकायां मम भक्तो विभीषण । न त्वां धर्षयितुं शक्ताः सेंद्रा अपि दिवौकसः**

यात संशय नाही.' असे रामानें सांगितल्यावर राक्षसश्रेष्ठ विभीषणानें सुवर्ण, रत्नें आणि वस्त्रें यांची वानरांवर त्यांच्या त्यांच्या आवडीनुसार यथेच्छ वृष्टि केली. नंतर रत्नांनी वानरसेनापतींचा ( विभीषणाकडून ) सत्कार झाल्याचें पाहून ४५,४६ रामानें त्या वानरश्रेष्ठांचें रीतसर अभिनंदन केलें, आणि त्यांना जाण्यास निरोप दिला. मग विभीषणानें आणलेल्या त्याच्या सूर्यासारख्या तेजःपुंज अत्युत्तम पुष्पक विमानांत राम आरूढ झाला. त्यानें सीतेला मांडीवर घेतलें होतें. ह्या वेळी त्या कीर्तिसंपन्न ( सीतेच्या ) चेहऱ्यावर लज्जाभाव दिसत होता. ४७,४८ रामाजवळच पराक्रमी बंधु ( लक्ष्मण ) धनुष्य घेऊन बसला होता. मग श्रीराम विमानांतून सर्व वानरांना, कपिराज सुग्रीवाला, अंगदाला, आणि विभीषणाला म्हणाला, ' तुम्ही सर्वांनी वानरांसह येऊन मित्रकार्य केलें. ४९,५० मी तुम्हां सर्वांना परवानगी देतों, तुम्ही वाटेल तेथें आतां सुखानें जा. सुग्रीवा ! सर्व सैनिकांसह तूं शीघ्र किष्किंधेला जा. ५१ विभीषणा ! तूं लंकेंत आपल्या राज्यांत जाऊन रहा. तूं माझा भक्त असल्यामुळें इंद्रासह देव चालत आले, तरीही त्यांच्यानें

१. पुष्पक विमान हें मूळचें कुबेराचें होतें. त्यापासून तें रावणानें हरण केलें. पुढें रावणवधानंतर तें रामाकडे आलें. २. या प्रसंगाचें मोरोपंतांचें सुंदर वर्णनः—' जेव्हां नृपति जनाला आज्ञा दे जावयासि गेहातें, । विरहासहिष्णु रडति, म्हणुनि म्हणे त्यास तो ' उगे ' हातें ॥ '—मोरोपंत, मंत्ररामायण.

॥ ५२ ॥ अयोध्यां गंतुमिच्छामि राजधानीं पितुर्मम । एवमुक्तास्तु रामेण वानरास्ते महाबलाः ॥ ५३ ॥ ऊचुः प्रांजलयः सर्वे राक्षसश्च विभीषणः । अयोध्यां गंतुमिच्छामस्त्वया सह रघूत्तम ॥ ५४ ॥ दृष्ट्वा त्वामभिषिक्तं तु कौसल्यामभिवाद्य च । पश्चाद्वृणीमहे राज्यमनुज्ञां देहि नः प्रभो ॥ ५५ ॥ रामस्तथेति सुग्रीव वानरैः सविभीषणः । पुष्पकं सहनूमांश्च शीघ्रमारोह सांप्रतम् ॥ ५६ ॥ ततस्तु पुष्पकं दिव्यं सुग्रीवः सह सेनया । विभीषणश्च सामात्यः सर्वे चारुरुहुर्द्रुतम् ॥ ५७ ॥ तेष्वारूढेषु सर्वेषु कौबेरं परमासनम् । राघवेणाभ्यनुज्ञातमुत्पपात विहायसा ॥ ५८ ॥ बभौ तेन विमानेन हंसयुक्तेन भास्वता । प्रहृष्टश्च तदा रामश्चतुर्मुख इवापरः ॥ ५९ ॥ ततो बभौ भास्करबिंबतुल्यं कुबेरयानं तपसानुलब्धम् । रामेण शोभां नितरां प्रपेदे सीतासमेतेन सहानुजेन ॥ ६० ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकांडे त्रयोदशः सर्गः ॥ १३ ॥

तुझे काही अनिष्ट होऊं शकणार नाही. ५२ माझ्या पित्याच्या अयोध्या राजधानीला जाण्याची माझी इच्छा आहे.' असें रामानें सांगितलें असतां ते महाबलवान् वानर आणि राक्षस( राज ) विभीषण हात जोडून म्हणाले, 'रघूत्तमा ! तुझ्या बरोबर आमच्याही मनांत अयोध्येस यावयाचें आहे. ५३,५४ तुला राज्याभिषेक झाल्याचें पाहून आणि कौसल्येला वंदन करून नंतर आम्ही आपआपल्या राज्यांला जाऊं. प्रभो ! आम्हांला ( एवढी ) अनुज्ञा दे.' ५५ 'बरें आहे,' असें म्हणून राम बोलला, 'सुग्रीवा ! वानर, विभीषण आणि हनुमान् या सर्वांसह तूं आतां लवकर पुष्पकां-( विमानां )त बस.' ५६ मग सैन्यासह सुग्रीव आणि अमात्यांसह विभीषण असे सर्व त्या पुष्पक विमानांत ताबडतोब चढले. ५७ सर्व जण चढून बसल्यावर रामानें आज्ञा दिली, आणि तें कुबेराचें उत्तम विमान आकाशमार्गें जाण्यास निघालें. ५८ त्या तेजस्वी विमानाला हंस जोडला होता. त्यामुळें आंत बसलेला आनंदित राम दुसरा ब्रह्मदेवच की, काय असा भास होत होता. ५९ कुबेरानें तपश्चर्येनें मिळविलेलें तें विमान या वेळीं आकाशांत सूर्यबिंब चमकावें, तसें चमकत होतें. सीता आणि लक्ष्मण यांस घेऊन राम त्यांत बसल्यामुळें त्यास विशेषच शोभा आली होती. ६० ”

**युद्धकांड, अध्याय तेरावा समाप्त.**

## युद्धकांड, सर्ग चवदावा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ पातयित्वा ततश्चक्षुः सर्वतो रघुनंदनः। अब्रवीन्मैथिलीं सीतां रामः शशिनिभाननाम् ॥ १ ॥ त्रिकूटशिखराग्रस्थां पश्य लंकां महाप्रभाम्। एतां रणभुवं पश्य मांसकर्दमपंकिलाम् ॥ २ ॥ असुराणां प्लवंगानामत्र वैशसनं महत्। अत्र मे निहतः शेते रावणो राक्षसेश्वरः ॥ ३ ॥ कुंभकर्णेंद्रजिन्मुख्याः सर्वे चात्र निपातिताः। एष सेतुर्मया बद्धः सागरे सलिलाशये ॥ ४ ॥ एतच्च दृश्यते तीर्थं सागरस्य महात्मनः। सेतुबंधमिति ख्यातं त्रैलोक्येन च पूजितम् ॥५॥ एतत्पवित्रं परमं दर्शनात्पातकापहम्। अत्र रामेश्वरो देवो मया शंभुः प्रतिष्ठितः ॥ ६ ॥ अत्र मां शरणं प्राप्तो मंत्रिभिश्च विभीषणः। एषा सुग्रीवनगरी किष्किंधा चित्रकानना ॥ ७ ॥ तत्र रामाज्ञया ताराप्रमुखा हरियोषितः। आनयामास सुग्रीवः सीतायाः प्रियकाम्यया ॥ ८ ॥

श्रीमहादेव म्हणाला, " ( विमानांतून जात असतां ) राम सर्वत्र दृष्टि टाकून पहात होता. तो चंद्रवदन जनकतनयेला—सीतेला—म्हणाला, १ 'त्रिकूट पर्वताच्या शिखरावर असलेली ही अत्यंत शोभायमान लंका नगरी पहा. मांसाचा चिखल दाटून राहिलेली ही रणभूमि पहा. २ ह्या ठिकाणी असुरांचें आणि वानरांचें मोठें युद्ध झालें. राक्षसराज रावण मजकडून मारला जाऊन येथेंच पडला आहे. ३ कुंभकर्ण, इंद्राजित् वगैरे सर्वही येथेंच मारिले गेले. जलराशि सागरावर मीं सेतु बांधिला तो हा ( पहा ). ४ महाप्रसिद्ध सागरतीर्थ तें हें दिसत आहे. तें सेतुबंध या नांवानें प्रसिद्ध असून त्रैलोक्य त्याला वंदन करीत असतें. ५ हें अत्यंत पवित्र असून केवळ दर्शन घेतल्यानें पातक हरण करितें. या स्थलीं रामेश्वर म्हणून शिवलिंग मी स्थापिलें आहे. ६ येथें बिभीषण आपल्या मंत्र्यांसह मला शरण आला. चित्रविचित्र अरण्यांनीं युक्त सुग्रीवनगरी किष्किंधा ती ही ( पहा ).' ७ तेथें सीतेच्या संतोषाकरितां रामाच्या आज्ञेवरून सुग्रीवानें तारा[1] वगैरे वानरस्त्रियांना आणविलें. ८

१. तारा—वालीची पत्नी, रुमा—सुग्रीवाची पत्नी, व इतर वानरस्त्रिया, यांना.

ताभिः सहोत्थितं शीघ्रं विमानं प्रेक्ष्य राघवः । प्राह चाद्रिमृष्यमूकं पश्य
वाल्यत्र मे हतः ॥ ९ ॥ एषा पंचवटी नाम राक्षसा यत्र मे हताः ।
अगस्त्यस्य सुतीक्ष्णस्य पश्याश्रमपदे शुभे ॥ १० ॥ एते ते तापसाः
सर्वे दृश्यंते वरवर्णिनि । असौ शैलवरो देवि चित्रकूटः प्रकाशते ॥११॥
अत्र मां कैकयीपुत्रः प्रसादयितुमागतः । भरद्वाजाश्रमं पश्य दृश्यते यमु-
नातटे ॥ १२ ॥ एषा भागीरथी गंगा दृश्यते लोकपावनी । एषा सा
दृश्यते सीते सरयूर्यूपमालिनी ॥ १३ ॥ एषा सा दृश्यतेऽयोध्या प्रणामं
कुरु भामिनि । एवं क्रमेण संप्राप्तो भरद्वाजाश्रमं हरिः ॥ १४ ॥ पूर्णे
चतुर्दशे वर्षे पंचम्यां रघुनंदनः । भरद्वाजं मुनिं दृष्ट्वा ववंदे सानुजः
प्रभुः ॥ १५ ॥ पप्रच्छ मुनिमासीनं विनयेन रघूत्तमः । शृणोषि कच्चि-
द्भरतः कुशल्यास्ते सहानुजः ॥ १६ ॥ सुभिक्षा वर्ततेऽयोध्या जीवंति

त्या स्त्रियांना घेऊन लागलेच ते विमान पुढें चालू लागलें. तें पाहून राम म्हणाला, '( सीते ! ) हा ऋष्यमूक पर्वत पहा. येथें वालीचा वध मी केला. ९ हीं पंचवटी म्हणतात, ती पहा. ह्या ठिकाणीं मी ( पुष्कळ ) राक्षस मारिले. कल्याणि ! हीं पहा अगस्त्य[1] आणि सुतीक्ष्ण[2] यांचीं आश्रमांची ठिकाणें. १० सुंदरि ! हे आतां तपस्वी ऋषि दिसूं लागले. देवि ! हा ( पहा ) पर्वतश्रेष्ठ चित्रकूट दिसत आहे. ११ येथें कैकेयीसुत ( भरत ) मला प्रसन्न करून परतविण्यास आला होता. ह्या यमुनातटावर भरद्वाजाश्रम[3] दिसत आहे पहा. १२ ही येथें सर्व लोकांना पावन करणारी भागीरथी गंगा दिसत आहे. सीते ! तीरावर यज्ञस्तंभांच्या माळा लागून राहिल्या आहेत, अशी ही सरयू[4] नदी दिसत आहे. १३ ही अयोध्या ( इकडे ) दिसत आहे. हे मानिनि ! तिला नमस्कार कर.' अशा क्रमानें रामचंद्र भरद्वाजाश्रमाला आला. १४ चवदावं वर्ष पूर्ण होतांच पंचमी तिथीला रघुनंदन रामानें कनिष्ठ बंधूसह भरद्वाज मुनींचें दर्शन घेतलें, आणि त्यांना वंदन केलें. १५ मुनि ( आश्रमांत ) बसले होते, त्यांना रघूत्तमा( रामा )नें विनयपूर्वक विचारिलें, ' भरतासंबंधी कांहीं वर्तमान आपल्या कानावर आलें आहे काय ? तो कनिष्ठ बंधू-( शत्रुघ्ना )सह खुशाल आहे ना ? १६ अयोध्यानगरींत सुबत्ता आहे ना ? माझ्या

१. अगस्त्य ऋषि—अरण्यकांड, सर्ग ३ श्लोक ८–५० पहा. २. सुतीक्ष्ण ऋषि—अरण्यकांड सर्ग २, श्लोक २६–४१ पहा. ३. भरद्वाज—अयोध्याकांड सर्ग ८, श्लोक ४१–६०. ४. सरयू नदी. हिच्या काठीं अयोध्यानगरी होती.

च हि मातरः । श्रुत्वा रामस्य वचनं भरद्वाजः प्रहृष्टधीः ॥ १७ ॥
प्राह सर्वे कुशलिनो भरतस्तु महामनाः । फलमूलकृताहारो जटावल्कलधारकः ॥ १८ ॥ पादुके सकलं न्यस्य राज्यं त्वां सुप्रतीक्षते । यद्यत्कृतं त्वया कर्म दंडके रघुनंदन ॥ १९ ॥ राक्षसानां विनाशं च सीताहरणपूर्वकम् । सर्वं ज्ञातं मया राम तपसा ते प्रसादतः ॥ २० ॥ त्वं ब्रह्म परमं साक्षादादिमध्यांतवर्जितः । त्वमग्रे सलिलं सृष्ट्वा तत्र सुप्तोऽसि भूतकृत् ॥ २१ ॥ नारायणोऽसि विश्वात्मन्नराणामंतरात्मकः । त्वन्नाभिकमलोत्पन्नो ब्रह्मा लोकपितामहः ॥ २२ ॥ अतस्त्वं जगतामीशः सर्वलोकनमस्कृतः । त्वं विष्णुर्जानकी लक्ष्मीः शेषोऽयं लक्ष्मणाभिधः ॥ २३ ॥ आत्मना सृजसीदं त्वमात्मन्येवात्ममायया । न सज्जसे

माता सुखांत राहात आहेत ना ? ' रामाचें भाषण ऐकून भरद्वाजाच्या अंतःकरणाला आनंद झाला. १७ तो म्हणाला, '( रामा ! ) सर्व मंडळी खुशाल आहे. मोठ्या मनाचा भरत फळेंमूळें भक्षण करून राहिला आहे. जटा आणि वल्कलें त्यानें धारण केलीं आहेत. १८ तुझ्या पादुकांवर सकळ राज्य सोंपवून—पादुका राजासनीं ठेवून—तो तुझी वाट पहात राहिला आहे. रघुनंदना ! दंडकारण्यांत तूं ज्या ज्या गोष्टी केल्यास, १९ सीतेला हरण करावयाला (रावणाला ) तूं कसें लावलेंस आणि नंतर राक्षसांचा विनाश कसा केलास, ह्या सर्व गोष्टी माझ्या तपाच्या योगें, त्याचप्रमाणें तुझ्या प्रसादानें मला कळून आल्या आहेत. २० तूं साक्षात् परब्रह्म आहेस, तूं आदिमध्यांतरहित आहेस. प्रथमतः उदक उत्पन्न करून, तूं त्यांत राहिलास. म्हणूनच तूं '[1]नारायण ' म्हटला आहेस. तूं सृष्टिकर्ता आहेस. हे विश्वात्मन् ! तूं नरांचा अंतर्यामी आहेस. सर्व लोकांचा पितामह ब्रह्मदेव तुझ्या नाभिकमलापासून उत्पन्न झाला आहे. २१,२२ म्हणून तूं सर्व जगतांचा ईश असून सर्व लोक तुला नमस्कार करितात. तूं विष्णू असून जानकी ही लक्ष्मी आहे. तसा शेष हाच लक्ष्मण नांवाचा ( तुझा बंधु ) होय. २३ तूं आत्म्याच्या योगें आत्म्याच्या ठिकाणींच आपल्या मायेकडून ही सृष्टि निर्मितोस. आकाश कोठेंही न [2]चिकटतां जसें

१. नार म्हणजे उदकसमूह, आणि अयन आश्रय, अर्थात् उदकांत राहणारा. नार म्हणजे जीवसमूह, तो आहे अयन—वसतिस्थान ज्याचें तो नारायण, असाही दुसरा नारायण शब्दाचा अर्थ होतो. २. ' अहमाकाशवत् सर्वबहिरंतर्गतोऽच्युतः । सदा सर्वसमः शुद्धो निःसंगो निर्मलोऽचलः ॥ '—आत्मबोध.

नभावत्त्वं चिच्छक्त्या सर्वसाक्षिकः ॥ २४ ॥ बहिरंतश्च भूतानां त्वमेव रघुनंदन । पूर्णोऽपि मूढदृष्टीनां विच्छिन्न इव लक्ष्यसे ॥ २५ ॥ जगत्त्वं जगदाधारस्त्वमेव परिपालकः । त्वमेव सर्वभूतानां भोक्ता भोज्यं जगत्पते ॥ २६ ॥ दृश्यते श्रूयते यद्यत्स्मर्यते वा रघूत्तम । त्वमेव सर्वमखिलं त्वद्विनान्यन्न किंचन ॥ २७ ॥ माया सृजति लोकांश्च स्वगुणैरहमादिभिः । त्वच्छक्तिप्रेरिता राम तस्मात्त्वय्युपचर्यते ॥ २८ ॥ यथा चुंबकसान्निध्याच्चलंत्येवायआदयः । जडास्तथा त्वया दृष्टा माया सृजति वै जगत् ॥ २९ ॥ देहद्वयमदेहस्य तव विश्वं रिरक्षिषोः । विराट् स्थूलं शरीरं ते सूत्रं सूक्ष्ममुदाहृतम् ॥ ३० ॥ विराजः संभवंत्येते अवताराः

सर्वत्र व्यापून राहिलें आहे, त्याचप्रमाणे तूं कोठेंही आसक्त नाहींस, तरी आपल्या ज्ञानशक्तीनें सर्वसाक्षी आहेस. २४ हे रघुनंदना! तूं सर्व जीवांच्या आंतेंबाहेर भरून राहिला आहेस. तूं पूर्ण आहेस, तथापि मूढमति लोक तुझ्या स्वरूपाला मर्यादा आहे, असें समजतात. २५ तूंच जगत्, तूंच जगाचा आधार, आणि तूंच ( जगाचा ) परिपालक आहेस. हे जगत्पते! सर्व भूतांचा भोक्ता आणि भोज्य तूंच आहेस. २६ हे रघूत्तमा! जें कांही दिसलें जातें, ऐकिलें जातें, अथवा आठविलें जातें, तें सर्व तूंच आहेस. तुझ्यावांचून दुसरें कांहींच नाही. २७ माया आपल्या अहंकारादि गुणांनीं लोकांना निर्माण करिते. पण रामा! त्या मायेला तुझ्याच शक्तीकडून प्रेरणा होत असते. आणि म्हणूनच सृष्टिकर्तृत्वादि तुजवर लादलें जातें. २८ चुंबकाच्या सान्निध्यानें ज्याप्रमाणें लोखंड वगैरे चळण पावतें, त्याप्रमाणें तुझी दृष्टि पडली असतां ही जड माया सृष्टि उत्पन्न करिते. २९ तूं स्वतः देहरहित आहेस, तरी जगाच्या स्थितीकरितां तूं दोन देह धारण करीत असतोस. विराट् हें तुझें स्थूलरूप असून हिरण्यगर्भ हें तुझें सूक्ष्मरूप असें म्हटलें आहे. ३० हे रघुनंदना! तुझ्या विराट् स्वरूपापासून हे हजारों अवतार उत्पन्न होतात. व तें (विशिष्ट)

१. ' दारापत्यक्षत्रावित्ताद्दूरः साक्षी नित्यः प्रत्यगात्मा शिवोऽहम् । ' शंकराचार्यकृत आत्मपंचकम्. २. ' अग्नि काष्ठें खाये । तें काष्ठचि अग्नि होये । तैसें मरतें मारितें पाहें । स्वरूप माझें ॥ हें आंतबाहेर मियां कोंदलें । जग निखिल माझेंचि वोतिलें । '–ज्ञानेश्वरी अ. ९. ३. ' प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः । '–भ. गीता ३. ४. ' स्वमायेचें आडवस्त्र । लावूनि एकला खेळवी सूत्र । बाहेरी नटी छाया विचित्र । चौऱ्यांशीं लक्ष ॥ '—ज्ञानेश्वरी १८.

सहस्रशः । कार्योते प्रविशंत्येव विराजं रघुनंदन ॥ ३१ ॥ अवतार-
कथां लोके ये गायंति गृणंति च । अनन्यमनसो मुक्तिस्तेषामेव रघू-
त्तम ॥ ३२ ॥ त्वं ब्रह्मणा पुरा भूमेर्भारहाराय राघव । प्रार्थितस्तपसा
तुष्टस्त्वं जातोऽसि रघोः कुले ॥ ३३ ॥ देवकार्यमशेषेण कृतं ते राम
दुष्करम् । बहुवर्षसहस्राणि मानुषं देहमाश्रितः ॥ ३४ ॥ कुर्वन्दुष्कर-
कर्माणि लोकद्वयहिताय च । पापहारीणि भुवनं यशसा पूरयिष्यसि
॥ ३५ ॥ प्रार्थयामि जगन्नाथ पवित्रं कुरु मे गृहम् । स्थित्वाद्य भुक्त्वा
सबलः श्वो गमिष्यसि पत्तनम् ॥ ३६ ॥ तथेति राघवोऽतिष्ठत्तस्मि-
न्नाश्रम उत्तमे । ससैन्यः पूजितस्तेन सीतया लक्ष्मणेन च ॥ ३७ ॥
ततो रामश्चिंतयित्वा मुहूर्तं प्राह मारुतिम् । इतो गच्छ हनूमंस्त्वमयोध्यां
प्रति सत्वरः ॥ ३८ ॥ जानीहि कुशली कच्चिज्जनो नृपतिमंदिरे ।
शृंगवेरपुरं गत्वा ब्रूहि मित्रं गुहं मम ॥ ३९ ॥ जानकीलक्ष्मणोपेत-

कार्य संपतांच पुनः तुझ्या विराट्स्वरूपांत प्रवेश करितात. ३१ हे रघूत्तमा ! जे लोक तुझ्या अवतारकथा अंतःकरणपूर्वक पृथ्वीवर गातात, आणि वर्णन करितात, त्यांनाच मुक्ति मिळते. ३२ राघवा ! ब्रह्मदेवानें तपश्चर्या करून पृथ्वीचा भार हरण करण्याकरितां पूर्वी तुझी प्रार्थना केली होती. त्या त्याच्या तपानें संतुष्ट होऊन तूं रघुकुलामध्यें जन्माला आलास. ३३ रामा ! देवांचें दुष्कर कार्य तूं पूर्णपणें केलेंस. ह्यापुढें मनुष्यदेहाचा आश्रय करून अनेक सहस्र वर्षेपर्यंत उभय लोकांच्या कल्याणासाठीं दुष्कर व पापहारक कर्मे करीत राहून जगभर कीर्ति पसरशील. ३४,३५ जगन्नाथा ! माझें गृह—आश्रम—पवित्र कर, अशी माझी तुला प्रार्थना आहे. आजचा दिवस सैन्या-सह येथें राहून व भोजन करून उद्यां तूं नगराला जावें.' ३६ 'बरें आहे,' असें म्हणून राम ( त्या दिवशी ) त्या उत्तम आश्रमांत राहिला. ( भरद्वाजानें ) सीता, लक्ष्मण व सैन्य या सर्वांसहित रामाचा उत्तम सत्कार केला. ३७ नंतर रामानें क्षणभर विचार केला आणि मारुतीला म्हटलें, ' मारुते ! तूं येथून अयोध्येला सत्वर निघून जा. ३८ राजवाड्यांतील सर्व लोकांचा समाचार घे. नंतर शृंगवेरपुराला जा, आणि तेथें माझा मित्र गुह असतो, त्याला भेटून त्याच्याशीं बोल. त्याला सांग कीं, ३९ 'जानकी आणि लक्ष्मण

मागतं मां निवेदय । नंदिग्रामं ततो गत्वा भ्रातरं भरतं मम ॥ ४० ॥
दृष्ट्वा ब्रूहि सभार्यस्य सभ्रातुः कुशलं मम । सीतापहरणादीनि
रावणस्य वधादिकम् ॥ ४१ ॥ ब्रूहि क्रमेण मे भ्रातुः सर्वं तत्र
विचेष्टितम् । हत्वा शत्रुगणान्सर्वान्सभार्यः सहलक्ष्मणः ॥ ४२ ॥
उपयाति समृद्धार्थः सह ऋक्षहरीश्वरैः । इत्युक्त्वा तत्र वृत्तांतं भरतस्य
विचेष्टितम् ॥ ४३ ॥ सर्वं ज्ञात्वा पुनः शीघ्रमागच्छ मम सन्निधिम् ।
तथेति हनुमांस्तत्र मानुषं वपुरास्थितः ॥ ४४ ॥ नंदिग्रामं ययौ
तूर्णं वायुवेगेन मारुतिः । गरुत्मानिव वेगेन जिघृक्षन् भुजगोत्तमम्
॥ ४५ ॥ शृंगवेरपुरं प्राप्य गुहमासाद्य मारुतिः । उवाच मधुरं वाक्यं
प्रहृष्टेनांतरात्मना ॥ ४६ ॥ रामो दाशरथिः श्रीमान्सखा ते सह सीतया ।
सलक्ष्मणस्त्वां धर्मात्मा क्षेमी कुशलमब्रवीत् ॥ ४७ ॥ अनुज्ञातोऽद्य
मुनिना भरद्वाजेन राघवः । आगमिष्यति तं देवं द्रक्ष्यसि त्वं रघूत्तमम्

यांसहवर्तमान मी आलों आहें. तेथून पुढें नंदिग्रामाला[1] जा, आणि माझा बंधु भरत याला भेटून मी, माझी पत्नी (सीता) आणि बंधु (लक्ष्मण), खुशाल आहों, असें सांग. सीताहरणादि कथा, आणि रावणवध वगैरे मी व माझ्या भावानें केलेल्या सर्व गोष्टी त्याला क्रमानें सांग. आणि सर्व शत्रुगणांचा वध करून कृतकृत्य होत्साता राम पत्नी आणि (बंधु) लक्ष्मण, त्याचप्रमाणें मोठमोठे अस्वल आणि वानर यांसह येत आहे, हा वृत्तांत त्यास सांग, आणि मग भरताची सर्व हकीकत समजून घेऊन सत्वर मजजवळ ये.' 'ठीक आहे,' असें म्हणून मारुतीनें तेथेंच मनुष्यशरीर धारण केलें. ४०,४१,४२,४३,४४ मग तो मारुति वायुवेगानें नंदिग्रामाला जाण्याला निघाला. गरुड जसा मोठ्या सापाला धरण्यासाठीं अत्यंत वेगानें धांवत सुटतो, त्याप्रमाणें (ह्या वेळीं तो मारुति दिसला). ४५ शृंगवेरपुराला येऊन मारुतीनें गुहाची भेट घेतली, आणि आनंदित अंतःकरणानें त्यानें (रामाचा) गोड निरोप गुहाला कळविला. ४६ तो (म्हणाला,) 'तुझा मित्र धर्मात्मा श्रीमान् दाशरथि राम यानें सीता आणि लक्ष्मण यांसह आपण सुखरूप आहें, अशी कुशलवार्ता तला कळविली आहे. ४७ आज भरद्वाज मुनींची अनुज्ञा घेऊन राम इकडे येणार आहे. तेव्हां त्या रघूत्तमाची व तुझी भेट होईलच.'

१. अयोध्येजवळील एक गाव. या ठिकाणीं रामाचा वनवास संपेपर्यंत भरत राहिला होता.

॥ ४८ ॥ एवमुक्त्वा महातेजाः संप्रहृष्टतनूरुहम् । उत्पपात महावेगो वायुवेगेन मारुतिः ॥ ४९ ॥ सोऽपश्यद्रामतीर्थं च सरयूं च महानदीम् । तामतिक्रम्य हनुमान्नंदिग्रामं ययौ मुदा ॥ ५० ॥ क्रोशमात्रे त्वयोध्यायाश्चीरकृष्णाजिनांबरम् । ददर्श भरतं दीनं कृशमाश्रमवासिनम् ॥५१॥ मलपंकविदिग्धांगं जटिलं वल्कलांबरम् । फलमूलकृताहारं रामचिंतापरायणम् ॥ ५२ ॥ पादुके ते पुरस्कृत्य शासयंतं वसुंधराम् । मंत्रिभिः पौरमुख्यैश्च काषायांबरधारिभिः ॥ ५३ ॥ वृतदेहं मूर्तिमंतं साक्षाद्धर्ममिव स्थितम् । उवाच प्रांजलिर्वाक्यं हनूमान्मारुतात्मजः ॥ ५४ ॥ यं त्वं चिंतयसे रामं तापसं दंडके स्थितम् । अनुशोचसि काकुत्स्थः स त्वां कुशलमब्रवीत् ॥ ५५ ॥ प्रियमाख्यामि ते देव शोकं त्यज सुदारुणम् । अस्मिन्मुहूर्ते भ्रात्रा त्वं रामेण सह संगतः ॥ ५६ ॥ समरे रावणं

४८ असे म्हणून तो महातेजस्वी व महावेगवान् मारुति वायुवेगानें तेथून उठला. मारुतीचें भाषण ऐकून (गुहाच्या) अंगावर आनंदानें रोमांच उभे राहिले. ४९ पुढें मारुतीला (मार्गांत) रामतीर्थ व महानदी सरयू लागली. तिला उल्लंघून मारुति आनंदानें नंदिग्रामाला गेला. ५० हा गांव अयोध्येपासून एक कोसावर आहे. तेथें वल्कलें आणि हरिणचर्म परिधान करणारा, दीन आणि कृश होऊन आश्रमांत राहणारा भरत (मारुतीच्या) दृष्टीस पडला. ५१ त्याचें शरीर मळ आणि चिखल यांनीं माखलेलें होतें. त्यानें मस्तकावर जटा वाढविल्या होत्या, व अंगावर वल्कलें धारण केलीं होती. फळें आणि मूळें खाऊन तो सर्वदा रामाचे चिंतनांत निमग्न असे. ५२ (रामानें दिलेल्या) पादुका पुढें ठेवून तो पृथ्वीचें शासन करीत असे. त्याच्या भोंवता त्याचे मंत्री आणि मुख्यमुख्य नागरिक जन काषायवस्त्रें परिधान करून बसले होते. हा शरीरधारी प्रत्यक्ष धर्मच आहे, असें पाहणाराला वाटत असे. त्याला वायुसुत मारुतीनें हात जोडिले, आणि म्हटलें, ५३, ५४ '(भरता!) ज्या दंडकारण्यवासी तापसवृत्ति रामाचें तूं चिंतन करीत आहेस, आणि ज्याकरितां तूं खेद करीत आहेस, त्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामानें आपली खुशाली (माझ्या तोंडीं) तुला कळविली आहे. ५५ राजा ! मी तुला आनंदाची वार्ता सांगतों. हा अति भयंकर शोक सोडून दे. ह्या आजच्याच मुहूर्तावर राम तुला

हत्वा रामः सीतामवाप्य च । उपयाति समृद्धार्थः ससीतः सहलक्ष्मणः ॥५७॥ एवमुक्तो महातेजा भरतो हर्षमूर्च्छितः । पपात भुवि चास्वस्थः कैकेयीप्रियनंदनः ॥ ५८ ॥ आलिंग्य भरतः शीघ्रं मारुतिं प्रियवादिनम् । आनंदजैरश्रुजलैः सिषेच भरतः कपिम् ॥ ५९ ॥ देवो वा मानुषो वा त्वमनुक्रोशादिहागतः । प्रियाख्यानस्य ते सौम्य ददामि ब्रुवतः प्रियम् ॥ ६० ॥ गवां शतसहस्रं च ग्रामाणां च शतं वरम् । सर्वाभरणसंपन्ना मुग्धाः कन्यास्तु षोडश ॥ ६१ ॥ एवमुक्त्वा पुनः प्राह भरतो मारुतात्मजम् । बहूनीमानि वर्षाणि गतस्य सुमहद्वनम् ॥ ६२ ॥ शृणोम्यहं प्रीतिकरं मम नाथस्य कीर्तनम् । कल्याणी बत गाथेयं लौकिकी प्रतिभाति मे ॥ ६३ ॥ एति जीवंतमानंदो नरं वर्षशतादपि । राघवस्य हरीणां च कथमासीत्समागमः ॥ ६४ ॥ तत्त्वमाख्याहि भद्रं ते विश्व-

भेटेल ! ५६ रणांगणावर रावणाचा वध करून आणि सीतेचा प्राप्ति करून घेऊन कृतकृत्य होत्साता राम, सीता आणि लक्ष्मण यांसह जवळ येत आहे.' ५७ असें मारुतीनें सांगितल्यावर तो महातेजस्वी कैकेयीसुत भरत आनंदभरानें मूर्च्छा येऊन भूमीवर निश्चेष्ट पडला. ५८ (सावध झाल्यावर) भरतानें लगेच त्या प्रियवार्ता सांगणाऱ्या मारुतीला आलिंगन दिलें. भरताच्या डोळ्यांतून आनंदाचे अश्रुपूर इतके लोटले कीं, त्या जलांनी भरतानें मारुतीला न्हाणिलें (असें वाटलें). ५९ भरत म्हणाला, 'बा ! तूं देव आहेस, कीं मनुष्य आहेस ? मजवर कृपा करून ज्या अर्थी तूं येऊन प्रियवार्ता सांगितलीस, त्या अर्थी प्रियकथन करणाऱ्या तुला मी शतसहस्र गाई, शंभर उत्तम गांव, आणि सर्वालंकारांनीं विभूषित अशा सुंदर सोळा कन्या देतों.' ६०, ६१ असें बोलून भरत पुनः त्या वायुपुत्राला म्हणाला, '(राम) अत्यंत घोर अरण्यांत जाऊन आज बरींच वर्षें लोटली. ६२ माझ्या प्रभूची परम सुखकर वार्ता आज मी ऐकत आहें ! लोकांमध्यें एक उक्ति प्रसिद्ध आहे, तिचा खरेपणा आतां मला दिसून येत आहे. ६३ ती (उक्ति) ही कीं, मनुष्य जीवंत राहिल्यास शंभर वर्षांनी कां होईना, त्याला आनंदाचा दिवस येतो. आतां राम आणि वानर यांचा समागम कसा घडला, ६४ तें मला सांग, तुझें कल्याण असो.

१. या प्रसगींचें मोरोपंतांचें सुंदर वर्णन:—' आलिंगुनियां श्रीमन्मारुतिला कांचनासनीं अर्ची, । प्रार्थुनि म्हणे ' कृपाळा ! मालविली शोकवह्निची अर्ची ॥ मद्दुःखसागराचा अगस्त्य तूं, काय बा तुझें नाव ? । चिंतानदींत बुडता, दैवें कोठूनि धावली नाव ? ॥'—मंत्ररामायण.

सेयं वचस्तव । एवमुक्तोऽथ हनुमान् भरतेन महात्मना ॥ ६५ ॥
आचचक्षेऽथ रामस्य चरितं कृत्स्नशः क्रमात् । श्रुत्वा तु परमानंदं भरतो
मारुतात्मजात् ॥६६॥ आज्ञापयच्छत्रुहणं मुदा युक्तं मुदान्वितः । दैवतानि
च यावंति नगरे रघुनंदन ॥ ६७ ॥ नानोपहारबलिभिः पूजयंतु महाधियः ।
सूता वैतालिकाश्चैव बंदिनः स्तुतिपाठकाः ॥६८॥ वारमुख्याश्च शतशो निर्या-
त्वद्यैव संघशः । राजदारास्तथामात्याः सेनाहस्त्यश्वपत्तयः ॥ ६९ ॥
ब्राह्मणाश्च तथा पौरा राजानो ये समागताः । निर्यांतु राघवस्याद्य द्रष्टुं
शशिनिभाननम् ॥ ७० ॥ भरतस्य वचः श्रुत्वा शत्रुघ्नपरिचोदिताः ।
अलंचक्रुश्च नगरीं मुक्तारत्नमयोज्ज्वलैः ॥ ७१ ॥ तोरणैश्च पताका-
भिर्विचित्राभिरनेकधा । अलंकुर्वंति वेश्मानि नानाबलिविचक्षणाः
॥ ७२ ॥ निर्यांति वृंदशः सर्वे रामदर्शनलालसाः । हयानां शतसाहस्रं

तुझ्या बोलण्यावर माझा विश्वास आहे.' महोदार भरतानें असें विचारल्यावर मारुतीनें रामाचें सर्व चरित्र क्रमवार ( भरताला ) सांगितलें. त्या वायुपुत्राच्या तोंडून ती रामकथा ऐकून भरताला परम आनंद झाला. ६४,६५,६६ शत्रुघ्नालाही ती रामकथा ऐकून आनंद झाला. मग त्या भरतानें आनंदित अंतःकरणानें त्या (शत्रुघ्ना)ला आज्ञा दिली कीं, 'रघुनंदना ! नगरामध्यें जितकी म्हणून देवालयें आहेत, ६७ त्या सर्व ठिकाणीं बुद्धिमंत पुरुषांनीं नानाविध उपहार[1] आणि बलि[2] अर्पण करून पूजन करावें, सूत[3], वैतालिक, बंदी, स्तुतिपाठक, शेंकडो वारांगना, यांचे शतशः थव्यांचे थवे आज आधीं पुढें निघोत. राजस्त्रिया, अमात्य; हत्ती, घोडे, पायदळ मिळून सेना, ६८,६९ ब्राह्मण, पौरजन, आणि एकत्र जमलेले निरनिराळ्या देशांचे राजे, हे ( सर्व ) रामाचा मुखचंद्र अवलोकन करण्यास आतांच निघोत.' ७० भरताचें भाषण ऐकून शत्रुघ्नानें सर्वांस आज्ञा दिली. तीप्रमाणें सर्वांनी मोत्यांचीं आणि रत्नांचीं तोरणें लाविलीं; चित्रविचित्र अनेक प्रकारच्या पताका उभारिल्या; कलाकुशल लोकांनीं आपापलीं घरें शृंगारिलीं. ७१,७२ रामदर्शनलालसेनें सगळे लोक

१. पूजासाहित्य ( फुलें वगैरे ). २. नाना प्रकारच्या देणग्या आणि दानें. ३ सूत, वैतालिक, बंदी हे सर्व भाटांचे—स्तुतिपाठकांचे—भेद आहेत.

गजानामयुतं तथा ॥ ७३ ॥ रथानां दशसाहस्रं स्वर्णसूत्रविभूषितम् ।
पारमेष्ठीन्युपादाय द्रव्याण्युच्चावचानि च ॥ ७४ ॥ ततस्तु शिबिका-
रूढा निर्ययू राजयोषितः । भरतः पादुके न्यस्य शिरस्येव कृतांजलिः
॥ ७५ ॥ शत्रुघ्नसहितो रामं पादचारेण निर्ययौ । तदैव दृश्यते दूराद्वि-
मानं चंद्रसन्निभम् ॥ ७६ ॥ पुष्पकं सूर्यसंकाशं मनसा ब्रह्मनिर्मितम् ।
एतस्मिन् भ्रातरौ वीरौ वैदेह्या रामलक्ष्मणौ ॥ ७७ ॥ सुग्रीवश्च कपिश्रेष्ठो
मंत्रिभिश्च विभीषणः । दृश्यते पश्यत जना इत्याह पवनात्मजः ॥ ७८ ॥
ततो हर्षसमुद्भूतो निःस्वनो दिवमस्पृशत् । स्त्रीबालयुववृद्धानां रामोऽय-
मिति कीर्तनात् ॥ ७९ ॥ रथकुंजरवाजिस्था अवतीर्य महीं गताः ।
ददृशुस्ते बिमानस्थं जनाः सोममिवांबरे ॥ ८० ॥ प्रांजलिर्भरतो भूत्वा
प्रहृष्टो राघवोन्मुखः । ततो विमानाग्रगतं भरतो राघवं मुदा ॥ ८१ ॥

जुटीजुटीनी निघाले. एक लक्ष घोडे, अयुत[१] हत्ती, ७३ सुवर्णसूत्रांनी सुशोभित केलेले दहा हजार रथ बाहेर पडले. ईश्वराला अर्पण करण्यालायक लहानमोठ्या वस्तु घेऊन सर्व निघाले. ७४ नंतर पालख्यांत बसून राजस्त्रिया निघाल्या. भरतानें (रामाच्या) पादुका मस्तकावर घेतल्या आणि हात जोडून,७५ तो शत्रुघ्नासह पायांनीं रामाकडे जाण्यास निघाला. इतक्यांत लांबून चंद्रासारखें (शुभ्र) विमान दिसूं लागलें. ७६ 'हें सूर्यासमान तेजस्वी विमान ब्रह्मदेवानें मनःसंकल्पानें निर्माण केलें असून त्यांत जानकीसह दोघे वीरबंधु रामलक्ष्मण, ७७ कपिश्रेष्ठ सुग्रीव, आणि मंत्र्यांसह विभीषण (बसलेला) दिसत आहे, लोक हो, पहा,' असें मारुति बोलला. ७८ नंतर सर्वत्र स्त्रिया, मुलें, तरुण, वृद्ध यांच्या तोंडून आनंदांत 'हा राम (आला),' 'हा राम (आला),' अशी गर्जना होऊं लागून ती स्वर्गाला जाऊन पोंचली. ७९ रथ, हत्ती, घोडे यांवर बसून आलेले लोक खाली उतरून जमिनीवर उभे राहिले, इतक्यांत आकाशस्थ चंद्राप्रमाणें, विमानांत बसलेला राम त्यांच्या दृष्टीस पडला. ८० (या वेळीं) भरताला परम आनंद[२] झाला. त्यानें हात जोडिले, आणि पुढें रामाला सामोरा गेला. पुढें विमानाच्या अग्रभागीं बसलेल्या रामाला, मेरुपर्वतावरील सूर्याला वंदन करितात,

१ दहा हजार. २ रामागमनसमयीं भरताचा आनंदः—' रामसमागमसमयीं भरत प्रेमें-करूनियां नाचे । त्वरितहि येतां भावी, मंदचि ते वेग पुष्पयानाचे. ॥'—मोरोपंत, मंत्ररामायण.

ववंदे प्रणतो रामं मेरुस्थमिव भास्करम् । ततो रामाभ्यनुज्ञातं विमान-
मपतद्भुवि ॥ ८२ ॥ आरोपितो विमानं तद्भरतः सानुजस्तदा । राम-
मासाद्य मुदितः पुनरेवाभ्यवादयत् ॥ ८३ ॥ समुत्थाप्य चिराद्दृष्टं भरतं
रघुनंदनः । भ्रातरं स्वांकमारोप्य मुदा तं परिषस्वजे ॥ ८४ ॥ ततो
लक्ष्मणमासाद्य वैदेहीं नाम कीर्तयन् । अभ्यवादयत प्रीतो भरतः प्रेम-
विह्वलः ॥ ८५ ॥ सुग्रीवं जांबवंतं च युवराजं तथांगदम् । मैंदद्विवि-
दनीलांश्च ऋषभं चैव सस्वजे ॥ ८६ ॥ सुषेणं च नलं चैव गवाक्षं
गंधमादनम् । शरभं पनसं चैव भरतः परिषस्वजे ॥ ८७ ॥ सर्वे ते
मानुषं रूपं कृत्वा भरतमादृताः । पप्रच्छुः कुशलं सौम्याः प्रहृष्टाश्च
प्लवंगमाः ॥ ८८ ॥ ततः सुग्रीवमालिंग्य भरतः प्राह भक्तितः । त्वत्स-
हायेन रामस्य जयोऽभूद्रावणो हतः ॥ ८९ ॥ त्वमस्माकं चतुर्णां तु
भ्राता सुग्रीव पंचमः । शत्रुघ्नश्च तदा राममभिवाद्य सलक्ष्मणम्
॥ ९० ॥ सीतायाश्चरणौ पश्चाद्ववंदे विनयान्वितः । रामो मातरमासाद्य

त्याप्रमाणें भरतानें नम्रतापूर्वक आनंदानें वंदन केलें. नंतर रामाच्या अनुज्ञेनें तें विमान जमिनीवर उतरलें. ८१,८२ तेव्हां कनिष्ठ बंधूसह भरताला ( रामानें ) विमानांत घेतलें. रामाची भेट होऊन भरतानें रामाला पुनः आनंदपूर्वक वंदन केलें. ८३ फार दिवसांनी भेट झालेल्या बंधु भरताला रघुनंदना ( रामा ) नें उठवून मांडीवर घेतलें, आणि आनंदानें त्याला आलिंगन दिलें. ८४ नंतर लक्ष्मणाला भेटून आणि जानकीला स्तवून त्या प्रेमविह्वल भरतानें संतुष्ट मनानें तिला प्रणाम केला. ८५ पुढें त्यानें सुग्रीव, जांबवंत, युवराज अंगद, मैंद, द्विविद, नील, ऋषभ यांना आलिंगन दिलें. ८६ सुषेण, नळ, गवाक्ष, गंधमादन, शरभ, पनस यांनाही भरतानें आलिंगिलें. ८७ मग त्या सौम्य व आनंदित वानरांनीं मनुष्यरूप धारण करून भरताला आदरपूर्वक कुशलप्रश्न विचारिले. ८८ नंतर सुग्रीवाला आलिंगन देऊन भरत भक्तिपूर्वक त्याला म्हणाला, ‘तुझ्या साहाय्यानें रामाला जय मिळाला, आणि रावणाचा वध झाला. ८९ सुग्रीवा ! तूं आम्हां चौघांचा पांचवा भाऊ आहेस. नंतर शत्रुघ्नानें आधी रामाला आणि मग लक्ष्मणाला वंदन केलें,९० त्यानंतर त्यानें नम्रतापूर्वक सीतेच्या चरणांवर लोटांगण घातलें. पुढें राम आपल्या आईच्या

विवर्णां शोकविह्वलाम् ॥ ९१ ॥ जग्राह प्रणतः पादौ मनो मातुः प्रसादयन् । कैकेयीं च सुमित्रां च ननामेतरमातरः ॥ ९२ ॥ भरतः पादुके ते तु राघवस्य सुपूजिते । योजयामास रामस्य पादयोर्भक्तिसंयुतः ॥ ९३ ॥ राज्यमेतन्न्यासभूतं मया निर्यातितं तव । अद्य मे सफलं जन्म फलितो मे मनोरथः ॥ ९४ ॥ यत्पश्यामि समायातमयोध्यां त्वामहं प्रभो । कोष्ठागारं बलं कोशं कृतं दशगुणं मया ॥ ९५ ॥ त्वत्तेजसा जगन्नाथ पालयस्व पुरं स्वकम् । इति ब्रुवाणं भरतं दृष्ट्वा सर्वे कपीश्वराः ॥ ९६ ॥ मुमुचुर्नेत्रजं तोयं प्रशशंसुर्मुदान्विताः । ततो रामः प्रहृष्टात्मा भरतं स्वाङ्कगं मुदा ॥ ९७ ॥ ययौ तेन विमानेन भरतस्याश्रमं तदा । अवरुह्य तदा रामो विमानाग्र्यान्महीतलम् ॥ ९८ ॥ अब्रवीत्पुष्पकं देवो गच्छ वैश्रवणं वह । अनुगच्छानुजानामि कुबेरं धनपालकम्

भेटीस गेला. ती निस्तेज आणि शोकविव्हल झाली होती. ९१ नम्रपणें त्या मातेच्या पायांवर लोटांगण घालून रामानें तिचें समाधान केलें. पुढें त्यानें कैकेयी, सुमित्रा आणि इतर माता यांनाही प्रणाम केले. ९२ नंतर इतका कालपर्यंत आदरपूर्वक पूजन करून ठेवलेल्या रामाच्या पादुका त्यानें ( आणून ) रामाच्या पायांत भक्तिपुरस्सर घातल्या, ९३ ( आणि म्हटलें ) ‘ तुझी ठेव म्हणून हें राज्य मजकडे होतें, तें आज मी तुझ्या स्वाधीन केलें आहे. आज माझ्या जन्माची सफलता झाली असून माझे मनोरथ सिद्धीला गेले आहेत. ९४ कारण प्रभो ! अयोध्येला परत आलेल्या तुझी आज मला भेट होत आहे. तुझीं कोठारें, तुझें सैन्य, तुझा कोश हीं माझ्या हातीं दसपटीनें वाढली आहेत. ९५ जगन्नाथा ! आतां आपल्या तेजोबळानें स्वतःच्या नगरीचें पालन कर.’ असें भरत बोलत असतां त्या सर्व कपिश्रेष्ठांच्या डोळ्यांतून आनंदाश्रू आले. त्यांनीं आनंदित अंतःकरणानें ( भरताची ) प्रशंसा केली. रामानेंही संतुष्ट मनानें भरताला मांडीवर घेतलें, आणि मोठ्या आनंदानें त्या विमानांत बसून तो भरताच्या आश्रमाला आला. तेथें येतांच त्या उत्तम विमानांतून राम भूमीवर उतरला. ९६,९७,९८ मग प्रभु राम त्या पुष्पकाला म्हणाला, ‘ तूं आतां कुबेराकडे जा, आणि त्याचें वाहन हो. मी तुला ( जायाला ) अनुज्ञा देतों.

१. ‘ अद्य मे सफलं जन्म सफलश्च मनोरथ. । यत्त्वा पश्यामि राजानमयोध्या पुनरागतम् ॥’— भा. रामायण, युद्धकांड ८२.

॥९९॥ रामो वसिष्ठस्य गुरोः पदांबुजं नत्वा यथा देवगुरोः शतक्रतुः॥ दत्त्वा महार्हासनमुत्तमं गुरोरुपाविवेशाथ गुरोः समीपतः॥ १००॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकांडे चतुर्दशः सर्गः॥१४॥

## युद्धकांड, सर्ग पंधरावा.

॥ श्रीमहादेव उवाच॥ ततस्तु कैकयीपुत्रो भरतो भक्तिसंयुतः। शिरस्यंजलिमाधाय ज्येष्ठं भ्रातरमब्रवीत् ॥ १ ॥ माता मे सत्कृता राम दत्तं राज्यं त्वया मम। ददामि तत्ते च पुनर्यथा त्वमददा मम ॥ २ ॥ इत्युक्त्वा पादयोर्भक्त्या साष्टांगं प्रणिपत्य च। बहुधा प्रार्थयामास कैकेय्या गुरुणा सह ॥ ३ ॥ तथेति प्रतिजग्राह भरताद्राज्यमीश्वरः। मायामाश्रित्य सकलां नरचेष्टामुपागतः ॥ ४ ॥ स्वाराज्यानुभवो यस्य सुखज्ञानैकरूपिणः। निरस्तातिशयानंदरूपिणः परमात्मनः

तू त्या धनपालकाचा—कुबेराचा—सेवा कर.' ९९ देवगुरु बृहस्पतीला इंद्र प्रणाम करितो, त्याप्रमाणें वसिष्ठ गुरूच्या चरणकमलीं वंदन करून व त्यांना उत्तम आसनावर बसवून राम स्वतः गुरूच्या समीप बसला. १००"

**युद्धकांड, अध्याय चवदावा समाप्त.**

श्रीमहादेव म्हणाला, "त्या वेळी कैकयीपुत्र भरत मस्तकावर हातांची ओंजळ भक्तिपूर्वक धरून ज्येष्ठ बंधूला—रामाला—म्हणाला, १ 'रामा! तू माझ्या मातेचा सत्कार केलास, आणि मला राज्य दिलेंस. तू जसें तें मला दिलें होतेंस, तसेंच तें मी तुला परत देत आहें.' २ असें म्हणून (रामाच्या) पायांपुढें भरतानें भक्तिपूर्वक साष्टांग नमस्कार घातला. मग त्यानें, कैकेयीनें आणि वसिष्ठानेंही अनेक प्रकारें रामाची प्रार्थना केली. ३ 'बरें आहे,' असें म्हणून मायेचा आश्रय करून सकल मनुष्यलीला[1] करणाऱ्या त्या (रामरूप) ईश्वरानें भरतापासून राज्याचा स्वीकार केला. ४ ज्याचा नित्यशः अनुभव म्हणजे स्वाराज्याचा—आत्मसुखाचा, सुखमय ज्ञान हेंच ज्याचें एक रूप, ज्याच्या आनंदस्वरूपापलीकडे दुसरा कोणताही आनंद

१. जगृहे पौरुषं रूपं भगवान् महदादिभिः।'—भागवत १,२.

॥ ५ ॥ मानुषेण तु राज्येन किं तस्य जगदीशितुः । यस्य भ्रूभंग-
मात्रेण त्रिलोकी नश्यति क्षणात् ॥ ६ ॥ यस्यानुग्रहमात्रेण भवंत्या-
खंडलश्रियः । लीलासृष्टमहासृष्टेः कियदेतद्रमापतेः ॥ ७ ॥ तथापि
भजतां नित्यं कामपूरविधित्सया । लीलामानुषदेहेन सर्वमप्यनुवर्तते
॥ ८ ॥ ततः शत्रुघ्नवचनान्निपुणः श्मश्रुकृंतकः । संभाराश्चाभिषेकार्थ-
मानीता राघवस्य हि ॥ ९ ॥ पूर्वं तु भरते स्नाते लक्ष्मणे च महात्मनि ।
सुग्रीवे वानरेंद्रे च राक्षसेंद्रे विभीषणे ॥ १० ॥ विशोधितजटः स्नात-
श्चित्रमाल्यानुलेपनः । महार्हवसनोपेतस्तस्थौ तत्र श्रिया ज्वलन् ॥ ११ ॥
प्रतिकर्म च रामस्य लक्ष्मणश्च महामतिः । कारयामास भरतः सीताया
राजयोषितः ॥ १२ ॥ महार्हवस्त्राभरणैरलंचक्रुः सुमध्यमाम् । ततो
वानरपत्नीनां सर्वासामेव शोभना ॥ १३ ॥ अकारयत कौसल्या

नाही, अशा परमात्म्याला मानवी राज्याशी काय करावयाचें होतें ? ज्या जगन्नियं-त्याच्या केवळ भ्रूभंगानें त्रैलोक्याचा नाश होत असतो, ५,६ ज्याच्या कृपामात्रें-करून इंद्राचीं ऐश्वर्यें प्राप्त होतात, ज्यानें ही महासृष्टि लीलेनें निर्माण केली, त्या रमापतीला ह्या राज्याची किंमत ती काय ? ७ तथापि भक्तांच्या इच्छा तृप्त करण्या-साठीं लीलेनें मनुष्यदेह धारण करून ( हा देव ) नित्य तसातसा वर्तत असतो. ८ नंतर शत्रुघ्नाच्या सांगण्यावरून कुशल नापित आला. रामाच्या अभिषेकाकरितां ( सर्व प्रकारचें ) साहित्यही आणिलें. ९ सर्वांच्या पूर्वी भरतानें स्नान केलें, त्यामा-गून महात्म्या लक्ष्मणानें स्नान केलें. पुढें वानरराज सुग्रीव, आणि मग राक्षसेंद्र विभी-षण, या सर्वांनी स्नानें केलीं. १० मग ( रामानें ) जटा मोकळ्या केल्या, स्नान केलें, नाना पुष्पमाला धारण केल्या, अंगाला उटी लाविली, आणि उंची वस्त्रें धारण केली. अशा स्थितीत तेथें उभी असलेली ती राममूर्ति अत्यंत देदीप्यमान दिसत होती. ११ पुढें लक्ष्मणानें आणि भरतानें रामाला भूषणें लेवविली तसेंच राजस्त्रि-यांनीं सीतेला अलंकार लेववून सुशोभित केलें. १२ त्यांनीं त्या सिंहकटि जानकीला बहु-मोल वस्त्रें आणि अलंकार यांनी विभूषित केलें. नंतर त्या सुशील पुत्रवत्सल कौसल्येनें त्या सगळ्या वानरस्त्रियांनाही मोठ्या आनंदानें वस्त्रालंकारांनी शोभविलें. १३

१. सदृश उतारा:—' सुरास्ता तामृद्धिं दधति च भवद्भ्रूप्रणिहिता, न हि स्वात्मारामं विषय-मृगतृष्णा भ्रमयति ॥ '—महिम्न. स्तोत्रम्.

प्रहृष्टा पुत्रवत्सला । ततः स्यंदनमादाय शत्रुघ्नवचनात्सुधीः ॥ १४ ॥
सुमंत्रः सूर्यसंकाशं योजयित्वाग्रतः स्थितः । आरुरोह रथं रामः सत्य-
धर्मपरायणः ॥ १५ ॥ सुग्रीवो युवराजश्च हनुमांश्च विभीषणः । स्नात्वा
दिव्यांबरधरा दिव्याभरणभूषिताः ॥ १६ ॥ राममन्वीयुरग्रे च रथा-
श्वगजवाहनाः । सुग्रीवपत्न्यः सीता च ययुर्यानैः पुरं महत् ॥ १७ ॥
वज्रपाणिर्यथा देवैर्हरिताश्वरथे स्थितः । प्रययौ रथमास्थाय तथा रामो
महत्पुरम् ॥ १८ ॥ सारथ्यं भरतश्चक्रे रत्नदंडं महाद्युतिः । श्वेतातपत्रं
शत्रुघ्नो लक्ष्मणो व्यजनं दधे ॥ १९ ॥ चामरं च समीपस्थो न्यवीजय-
दरिंदमः । शशिप्रकाशं त्वपरं जग्राहासुरनायकः ॥ २० ॥ दिविजैः
सिद्धसंघैश्च ऋषिभिर्दिव्यदर्शनैः । स्तूयमानस्य रामस्य शुश्रुवे मधुर-
ध्वनिः ॥ २१ ॥ मानुषं रूपमास्थाय वानरा गजवाहनाः । भेरीशंख-
निनादैश्च मृदंगपणवानकैः ॥ २२ ॥ प्रययौ राघवश्रेष्ठस्तां पुरीं

मग शत्रुघ्नाच्या सांगण्यावरून बुद्धिमान् सुमंत्रानें सूर्यासमान तेजस्वी रथ जोडला, आणि तो घेऊन रामापुढें येऊन उभा राहिला. १४ सत्यधर्मपरायण श्रीराम त्या रथांत बसला. १५ सुग्रीव, युवराज ( अंगद ), हनुमंत, विभीषण या सर्वांनी स्नान करून उत्तम वस्त्रें परिधान केली, आणि दिव्यालंकार धारण केले. १६ ते, कोणी रथांत, कोणी घोड्यांवर, कोणी हत्तीवर बसून, कांही रामाच्या मागून, तर कांही रामाच्या पुढें, असे निघाले. सुग्रीवाच्या स्त्रिया आणि सीता पालख्यांत बसून त्या मोठ्या राजधानीला जाण्याकरितां निघाल्या. १७ हिरव्या घोड्यांच्या रथांत बसून देवांसह इंद्र जसा बाहेर पडतो, त्याप्रमाणें रथात बसून राम आपल्या राजधानीला निघाला. १८ सारथ्य भरतानें स्वीकारिलें, महातेजस्वी शत्रुघ्नानें रत्नांचा दांडा असलेलें शुभ्र छत्र धारण केलें, आणि लक्ष्मणानें पंखा धरिला. १९ जवळच उभा असलेला शत्रुमर्दन (सुग्रीव) एक चंवरी वारूं लागला, दुसरी (चवरी) असुरनायक विभीषणानें घेतली. त्या चवऱ्या चंद्रतेजाप्रमाणें प्रकाशत होत्या. २० देव, सिद्धसमुदाय, दिव्य-दर्शन ऋषि रामाची स्तुति करीत असून तो मधुरनाद सर्वत्र ऐकूं येत होता. २१ मनुष्यरूपें धारण करून वानर हत्तींवर बसले होते. भेरी, शंख वाजवीत, आणि मृदंग, पणव व टिमक्या यांचा गजर करीत ते चालले होते. २२ अशा रीतीनें रघुश्रेष्ठ

१. सुमंत्र–दशरथाचा सारथि. २. ज्यांचें दर्शन पुण्यकारक, असे.

**समलंकृताम् । ददृशुस्ते समायांतं राघवं पुरवासिनः ॥ २३ ॥ दूर्वा-दलश्यामतनुं महार्हकिरीटरत्नाभरणाचितांगम् । आरक्तकंजायतलो-चनांतं दृष्ट्वा ययुर्मोदमतीव पुण्याः ॥ २४ ॥ विचित्ररत्नांचितसूत्र-नद्धपीतांबरं पीनभुजांतरालम् । अनर्घ्यमुक्ताफलदिव्यहारैर्विरोचमानं रघुनंदनं प्रजाः ॥ २५ ॥ सुग्रीवमुख्यैर्हरिभिः प्रशांतैर्निषेव्यमाणं रवितुल्यभासम् । कस्तूरिकाचंदनलिप्तगात्रं निवीतकल्पद्रुमपुष्पमालम् ॥ २६ ॥ श्रुत्वा स्त्रियो राममुपागतं मुदा प्रहर्षवेगोत्कलिताननश्रियः । अपास्य सर्वं गृहकार्यमाहितं हर्म्याणि चैवारुरुहुः स्वलंकृताः ॥ २७ ॥ दृष्ट्वा हरिं सर्वदृगुत्सवाकृतिं पुष्पैः किरंत्यः स्मितशोभिताननाः । दृग्भिः**

त्या शृंगारलेल्या राजधानीत येऊन पाचला. श्रीरामचंद्र येताना पुरवासी जनांच्या दृष्टीस पडला, २३ तेव्हां त्याचें श्याम शरीर दूर्वादलाप्रमाणें शोभत होतें, त्याचे मस्तकावर महामूल्यवान् किरीट होता, व अंगावर रत्नालंकार घातले होते, नेत्रप्रांत आरक्त व कमळासारखे दीर्घ होते. अशा त्या रामाला पाहून पुण्यशाली अयोध्याजनांना पराकाष्ठेचा आनंद झाला. २४ रामानें पीतांबर परिधान केला असून, त्यावर चित्रविचित्र रत्नखचित कमरपट्टा घातला होता. त्याचें वक्षःस्थल विशाल असून त्यावर महामोल मुक्ताफळांचा हार विलसत होता. अशी ती रघुनंदनमूर्ति प्रजाजनांच्या दृष्टीस पडली. २५ सुग्रीवादि प्रशांत स्वभावाची वानरमंडळी त्याची सेवा करीत होती. त्याचें तेज सूर्यासारखें चकाकत होतें. त्याच्या अंगाला कस्तूरी आणि चंदन यांची उटी लाविली होती. त्याच्या कंठांत कल्पवृक्षपुष्पांची माळ घातली होती. २६ राम जवळ आल्याचें ऐकून ( अयोध्येंतील ) स्त्रियांना पराकाष्ठेचा आनंद वाटून त्यांच्या मुखावर अतिशय टवटवी दिसू लागली. अगत्याचीं सर्व कामें टाकून देऊन त्यांनीं अलंकार अंगावर घातले, आणि त्या वाड्यांच्या गच्च्यांवर जाऊन बसल्या. २७ सर्वांच्या दृष्टीला आनंद देणारी ती रामरूप ( हरि ) मूर्ति पाहून ( त्या स्त्रियांनीं ) त्याजवर पुष्पवृष्टि केली. या वेळीं त्यांच्या मुखावर ( आनंद ) स्मित झळकत होतें. नेत्रांना आणि मनाला

१. रामं दूर्वादलश्यामं पद्माक्षं पीतवाससम् । –रामरक्षा. २. हें वर्णन वाचून रघुवंश, सर्ग ७ श्लोक ६–१० याची आठवण होते. त्यांतील आठवा श्लोकः–' होती एक वधू घरांत बसली, घालावया अंजना, । घाली दक्षिण लोचनीं, मग दुज्या घालूं करी योजना ॥ तों दारीं वर पातला, ध्वनि तई त्याचा तिनें ऐकुनी । एके हातिं शलाकिका, तसिच ये धावोनि वातायनीं ॥ '—लेलेकृत भाषांतर.

पुनर्नेत्रमनोरसायनं स्वानंदमूर्तिं मनसाभिरेभिरे ॥ २८ ॥ रामः स्मित-स्निग्धदृशा प्रजास्तथा पश्यन्प्रजानाथ इवापरः प्रभुः । शनैर्जगामाथ पितुः स्वलंकृतं गृहं महेंद्रालयसन्निभं हरिः ॥ २९ ॥ प्रविश्य वेश्मांतरसंस्थितो मुदा रामो ववंदे चरणौ स्वमातुः । क्रमेण सर्वाः पितृयोषितः प्रभुर्ननाम भक्त्या रघुवंशकेतुः ॥ ३० ॥ ततो भरतमाहेदं रामः सत्यपराक्रमः । सर्वसंपत्समायुक्तं मम मंदिरमुत्तमम् ॥ ३१ ॥ मित्राय वानरेंद्राय सुग्रीवाय प्रदीयताम् । सर्वेभ्यः सुखवासार्थं मंदिराणि प्रकल्पय ॥ ३२ ॥ रामेणैवं समादिष्टो भरतश्च तथाकरोत् । उवाच च महातेजाः सुग्रीवं राघवानुजः ॥ ३३ ॥ राघवस्याभिषेकार्थं चतुःसिंधुजलं शुभम् । आनेतुं प्रेषयस्वाशु दूतांस्त्वरितविक्रमान् ॥ ३४ ॥ प्रेषयामास सुग्रीवो जांबवंतं मरुत्सुतम् । अंगदं च सुषेणं च ते गत्वा वायुवेगतः ॥ ३५ ॥ जलपूर्णान् शातकुंभकलशांश्च समानयन् । आनीतं तीर्थसलिलं शत्रुघ्नो

आनंदविषय होणाऱ्या त्या स्वानंदमूर्ति ( रामा ) ला पाहून त्यांनी त्याला मनांनी आलिंगन दिलें. २८ प्रभु रामचंद्रही सस्मित व प्रेमळ दृष्टीनें प्रजाजनांकडे पाहात पाहात हळू हळू पित्याच्या मंदिराकडे येऊन पोंचला. ह्या वेळी तो रामरूप हरि सर्वांचा पितामह, दुसरा ( ब्रह्मदेव )च आहे की काय, असें सर्वांस वाटलें. तें मंदिर ( आज ) महेंद्रभुवनासारखें अलंकृत केलें होतें. २९ राजवाड्यांत प्रवेश केल्यावर राम एका अभ्यंतरगृहांत थांबला. तेथें त्यानें प्रथमतः आपल्या मातेच्या चरणांना आनंदानें वंदन केलें. नंतर पित्याच्या सर्व स्त्रियांना-आपल्या सावत्र आयांना-क्रमवार त्या रघुकुलदीपकानें भक्तिपूर्वक प्रणाम केले. ३० नंतर त्या सत्यपराक्रमी रामानें भरताला सांगितलें कीं, 'सर्व संपत्तीनी भरलेलें माझें उत्तम मंदिर माझा मित्र वानरराज सुग्रीव, त्याला ( रहावयास ) दे. त्याचप्रमाणें दुसऱ्याही सर्वांना सुखानें राहतां येईल, अशी मंदिरांची व्यवस्था कर.' ३१, ३२ रामानें सांगितल्याप्रमाणें भरतानें व्यवस्था केली. तो महातेजस्वी रामाचा धाकटा बंधु (भरत) सुग्रीवाला म्हणाला, ३३ '( सुग्रीवा ! ) श्रीरामाच्या अभिषेकाकरितां चतुःसिंधूंचें पवित्र जल आणण्याकरितां तूं आपल्या दूतांना लवकर पाठीव. ते त्वरित गतीनें जाऊन येतील.' ३४ सुग्रीवानें जांबवंत, मारुति, अंगद आणि सुषेण अशा चौघांना जाण्याची आज्ञा करतांच ते वायुवेगानें निघून गेले, आणि ३५ उदकपूर्ण सुवर्णकलश घेऊन आले. आणिलेलें तीर्थोदक शत्रुघ्नानें मंत्र्यांसह

मंत्रिभिः सह ॥ ३६ ॥ राघवस्याभिषेकार्थं वसिष्ठाय न्यवेदयत् । ततस्तु प्रयतो वृद्धो वसिष्ठो ब्राह्मणैः सह ॥ ३७ ॥ रामं रत्नमये पीठे ससीतं संन्यवेशयत् । वसिष्ठो वामदेवश्च जाबालिर्गौतमस्तथा ॥ ३८ ॥ वाल्मीकिश्च तथा चक्रुः सर्वे रामाभिषेचनम् । कुशाग्रतुलसीयुक्तपुण्यगंधजलैर्मुदा ॥ ३९ ॥ अभ्यषिंचन् रघुश्रेष्ठं वासवं वसवो यथा । ऋत्विग्भिर्ब्राह्मणैः श्रेष्ठैः कन्याभिः सह मंत्रिभिः ॥ ४० ॥ सर्वौषधिरसैश्चैव दैवतैर्नभसि स्थितैः । चतुर्भिर्लोकपालैश्च स्तुवद्भिः सगणैस्तथा ॥ ४१ ॥ छत्रं च तस्य जग्राह शत्रुघ्नः पांडुरं शुभम् । सुग्रीवराक्षसेंद्रौ तौ दधतुः श्वेतचामरे ॥ ४२ ॥ मालां च कांचनीं वायुर्ददौ वासवचोदितः । सर्वरत्नसमायुक्तं मणिकांचनभूषितम् ॥ ४३ ॥ ददौ हारं नरेंद्राय स्वयं शक्रस्तु भक्तितः । प्रजगुर्देवगंधर्वा ननृतुश्चाप्सरोगणाः ॥ ४४ ॥ देवदुंदुभयो नेदुः पुष्पवृष्टिः पपात खात् । नवदूर्वादलश्यामं पद्मपत्रायतेक्ष-

रामाभिषेकाकरितां म्हणून वसिष्ठाकडे नेऊन दिलें. मग त्या परमशुद्ध वयोवृद्ध वसिष्ठ मुनीनें अनेक ब्राह्मण बरोबर घेऊन सीतेसह रामाला रत्नसिंहासनावर बसविलें. मग वसिष्ठ, वामदेव, जाबालि, गौतम आणि वाल्मीकि या सर्वांनी आनंदानें दर्भांचीं अग्रें आणि तुलसी यांनी युक्त अशा पवित्र गंधजलांनी रामाला अभिषेक केला. ३६,३७,३८,३९ ज्याप्रमाणें वसु इंद्राला अभिषेक करितात, त्याप्रमाणें त्या ऋषींनीं ऋत्विज, श्रेष्ठ ब्राह्मण, कन्या, मंत्रिजन, आकाशस्थ देवता, आणि स्तुति करणारे सपरिवार चार लोकपाल, यांसह सर्व औषधीच्या रसांनी रामाला अभिषेक केला. ४०,४१ रामाच्या मस्तकावर शुभ्र छत्र शत्रुघ्नानें धरिलें, व सुग्रीव आणि विभीषण या दोघांनीं दोन श्वेत चवऱ्या हातीं धारण केल्या. ४२ इंद्रप्रेरित वायूनें येऊन ( रामचंद्राला ) सुवर्णमाला दिली. इंद्रानें स्वतः सर्व रत्नांनी गुंफिलेला व मणिकांचनांनीं भूषित केलेला हार भक्तिपूर्वक ( राम )राजाला अर्पण केला. देवगंधर्व गाऊं लागले, व अप्सरांचे गणांनी नृत्याला आरंभ केला. ४३,४४ देवदुंदुभि वाजूं लागले, व आकाशांतून पुष्पवृष्टि झाली. रामाची मूर्ति नवदूर्वादलाप्रमाणें श्यामवर्ण दिसत होती. त्याचे नेत्र कमलपत्रासमान लांब

१. ' अमर कुसुमगण वर्षति, तननन करिती समस्त गंधर्व । सर्वत्रांला जालें आनंदाचेंचि तें महापर्व. ॥ '—मोरोपंतकृत मंत्ररामायण.

णम् ॥ ४५ ॥ रविकोटिप्रभायुक्तकिरीटेन विराजितम् । कोटिकंदर्पलावण्यं पीतांबरसमावृतम् ॥ ४६ ॥ दिव्याभरणसंपन्नं दिव्यचंदनलेपनम् । अयुतादित्यसंकाशं द्विभुजं रघुनंदनम् ॥ ४७ ॥ वामभागे समासीनां सीतां कांचनसन्निभाम् । सर्वाभरणसंपन्नां वामांके समुपस्थिताम् ॥ ४८ ॥ रक्तोत्पलकरांभोजां वामेनालिंग्य संस्थितम् । सर्वातिशयशोभाढ्यं दृष्ट्वा भक्तिसमन्वितः ॥ ४९ ॥ उमया सहितो देवः शंकरो रघुनंदनम् । सर्वदेवगणैर्युक्तः स्तोतुं समुपचक्रमे ॥ ५० ॥ श्रीमहादेव उवाच ॥ नमोऽस्तु रामाय सशक्तिकाय नीलोत्पलश्यामलकोमलाय । किरीटहारांगदभूषणाय सिंहासनस्थाय महाप्रभाय ॥ ५१ ॥ त्वमादिमध्यांतविहीन एकः सृजस्यवस्यात्सि च लोकजातम् । स्वमायया तेन न लिप्यसे त्वं यत्स्वे सुखेऽजस्रगतोऽ-

हात. ४५ कोटिसूर्यांसारख्या देदीप्यमान किरीटानें त्याला विशेषच शोभा आली होती. त्याचें लावण्य कोटिमदनांइतकें होतें. त्यानें पीतांबर परिधान केला होता. ४६ त्यानें अंगावर दिव्यालंकार धारण केले होते, व दिव्य चंदनाची उटी लाविलेली होती. तो दहाहजार सूर्यांप्रमाणें ( तेजानें ) शोभत होता. त्या रघुनंदनाला दोन हात होते. ४७ वामभागीं सीता बसली होती. तिची शरीरकांति सुवर्णासारखी होती. तिनें सर्वालंकार घातले असून ती रामाच्या डाव्या मांडीवर बसली होती. ४८ तिनें आपल्या करकमलांत रक्तकमल घेतलें होतें. राम आपला डावा हात तिच्या खांद्यावर टाकून बसला होता. अशा त्या परम दीप्तिमंत रघुनंदनाला पाहून सकल देवगणांना बरोबर घेऊन पार्वतीसह भगवान् शंकरांनी स्तुति करण्यास प्रारंभ केला. ४९,५० श्रीमहादेव म्हणाला, ‘ सीतेसह रामाला नमस्कार असो. हा राम नीलकमलाप्रमाणें श्याम आणि कोमल आहे. किरीट, हार आणि अंगदादि अलंकार अंगावर घालून तो सिंहासनावर बसला आहे. त्याची कांति महातेजस्वी आहे. ५१ रामा ! तूं आदिमध्यांतरहित आहेस.[1] तूं एक—अद्वितीय—आहेस. तूं आपल्या मायेनें[2] लोकसमूहांला निर्माण करितोस, रक्षण करितोस व त्यांचा नाशही करितोस. तरीही त्या कार्यांचा तुला लेप[3] लागत नाहीं. तूं निर्दोष होत्साता स्वस्वरूपसुखांत नित्य रममाण होत

१. ‘ अनादिमध्यान्तमनन्तवीर्यम् । ’—भ. गीता ११. २. ‘ स्वमायेचें आडवस्त्र । लावूनि एकला खेळवी सूत्र । बाहेरी नटी छाया विचित्र । चौऱ्याशीं लक्ष ॥ तया ब्रह्मादिकीटांता । अशेषांही भूतजाता । देहाकार योग्यता । पावोनि दावी ॥ ’—ज्ञानेश्वरी १८. ३. ‘ न करोति न लिप्यते ’ ।—भ. गीता १३.

नवद्यः ॥ ५२ ॥ लीलां निधत्से गुणसंवृतस्त्वं प्रपन्नभक्तानुविधान-
हेतोः । नानावतारैः सुरमानुषाद्यैः प्रतीयसे ज्ञानिभिरेव नित्यम् ॥५३॥
स्वांशेन लोकं सकलं विधाय तं बिभर्षि च त्वं तदधः फणीश्वरः । उप-
र्यधो भान्वनिलोडुपौषधीप्रवर्षरूपोऽवसि नैकधा जगत् ॥ ५४ ॥ त्वमिह
देहभृतां शिखिरूपः पचसि भुक्तमशेषमजस्रम् । पवनपंचकरूपसहायो
जगदखंडमयेन बिभर्षि ॥ ५५ ॥ चंद्रसूर्यशिखिमध्यगतं यत्तेज ईश
चिदशेषतनूनाम् । प्राभवत्तनुभृतामिव धैर्यं शौर्यमायुरखिलं तव सत्त्वम्
॥५६॥ त्वं विरिंचिशिवविष्णुविभेदात्कालकर्मशशिसूर्यविभागात् । वादिनां
पृथगिवेश विभासि ब्रह्मनिश्चितमनन्यादिहैकम् ॥ ५७ ॥ मत्स्यादिरूपेण
यथा त्वमेकः श्रुतौ पुराणेषु च लोकसिद्धः । तथैव सर्वं सदसद्विभाग-

असतोस. ५२ शरणागत भक्तांच्या इच्छा तृप्त करण्याकरितां गुणांनी आवृत होऊन अनेक लीला करितोस. देव, मनुष्यें इत्यादि अनेक अवतार तूं धारण करितोस. तुझें खरें स्वरूप ज्ञानिजनांला मात्र नित्य कळतें. ५३ तूं आपल्या अंशानें सकल जग निर्माण केलेंस, पुढें तूंच खाली फणीश्वर होऊन तें (मस्तकीं) धारण करितोस. त्याप्रमाणें वर सूर्य, वायु, चंद्र, ओषधि, पर्जन्य ह्या रूपांनी अनेक प्रकारें त्या जगताचें तूं रक्षण करितोस. ५४ प्राण्यांच्या शरीरांत तूं अग्निरूपानें राहून सर्वदा त्यांनी भक्षिलेलें सर्व ( अन्न ) पचवितोस. त्या कामी पंच प्राणवायूंचें त्याला-जठराग्नीला-साह्य होतें. तूं आपल्या अखंड रूपाच्या योगें जगाला धारण करितोस. ५५ ईशा ! चंद्रसूर्यामध्यें, अग्नीमध्यें जें तेज आहे, सर्व प्राण्यांमध्यें जें चैतन्य आहे, त्याचप्रमाणें ह्या जगांत जनांच्या अंगीं जें कांहीं धैर्य, शौर्य, आयुष्य म्हणून असतें, तें सर्व तुझ्याच सत्त्वांशापासून होय. ५६ तूंच विरिंचि, शिव, विष्णु ह्या भिन्न रूपांनी भासतोस, व काल, कर्म, चंद्र, सूर्य हे तुझ्याच रूपाचे विभाग दिसून येतात. ईशा ! नाना मतांच्या लोकांना तूं नाना रूपांनीं भासतोस, तरी तूं ह्या लोकीं एक परब्रह्मरूपच आहेस, ही निश्चित गोष्ट आहे. ५७ तूं मत्स्यादिरूपें घेऊन अवतरलास, ही गोष्ट श्रुतींत, पुराणांत आणि लोकांत प्रसिद्ध आहे, त्याचप्रमाणें सत् ( ब्रह्म ), आणि असत् ( विश्व ) हे तुझेच विभाग

१. ' लीलावतारानुरतो देवतिर्यङ्नरादिषु । '–भागवत १,२. २. ' यदादित्यगत तेजो जगद्भासयतेऽखिलम् । यच्चंद्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ॥ '–भ. गीता १५. ३. तुझ्या सत्तेपासून. ४. ब्रह्मदेव. ५. परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् । '–भ. गीता.

स्त्वमेव नान्यद्भवतो विभाति ॥ ५८ ॥ यद्यत्समुत्पन्नमनंतसृष्टावुत्पत्स्यते यच्च भवच्च यच्च । न दृश्यते स्थावरजंगमादौ त्वया विनातः परतः परस्त्वम् ॥ ५९ ॥ तत्त्वं न जानंति परात्मनस्ते जनाः समस्तास्तव माययातः । त्वद्भक्तसेवामलमानसानां विभाति तत्त्वं परमेकमैशम् ॥ ६० ॥ ब्रह्मादयस्ते न विदुः स्वरूपं चिदात्मतत्त्वं बहिरर्थभावाः । ततोऽबुधस्त्वामिदमेव रूपं भक्त्या भजन्मुक्तिमुपैत्यदुःखः ॥६१॥ अहं भवन्नाम गृणन्कृतार्थो वसामि काश्यामनिशं भवान्या । मुमूर्षमाणस्य विमुक्तयेऽहं दिशामि मंत्रं तव राम नाम ॥६२॥ इमं स्तवं नित्यमनन्यभक्त्या शृण्वंति गायंति लिखंति ये वै । ते सर्वसौख्यं परमं च लब्ध्वा भवत्पदं यांतु

आहेत. तुजहून वेगळें अस काहीं नाही. ५८ ह्या अनंत सृष्टींत जें जें कांहीं उत्पन्न झालें, पुढें उत्पन्न होणार, व सध्यां होत आहे, ह्याचा विचार केला असतां ह्या चराचरांत तुजहून भिन्न असें कांहींच दिसत नाहीं. म्हणून तूं सर्वांहून जो श्रेष्ठ, त्याहूनही श्रेष्ठ आहेस. ५९ हे सर्व लोक तुझ्या मायेनें मोहित झाल्यामुळें तुझ्या परमात्मस्वरूपाचें तत्त्वज्ञान त्यांना समजत नाही. तुझ्या भक्तांची सेवा करून ज्यांचें चित्त पवित्र झालें आहे, त्यांसच सर्वव्यापी अद्वितीय परमात्मस्वरूप कळून येतें ६० ब्रह्मदेवादिकही बाह्य विषयांवर मोहित होऊन जातात, त्यामुळें त्यांना तुझें स्वरूप-ज्ञानमय आत्मतत्त्व-कळून येत नाहीं. म्हणून अज्ञानी लोक तुझ्या ह्याच रूपाचें भक्तिपुरस्सर भजन करितील, तर त्यांची दुःखें नाहींशी होऊन त्यांना मुक्ति मिळेल. ६१ मी तुझ्या नामाचा जप करितों, त्यामुळें कृतार्थ होत्साता मी काशींत भवानीसह नित्य राहातों. जो कोणी मरणोन्मुख प्राणी असेल, त्याला मुक्तीकरितां हे रामा ! मी तुझ्याच नामाचा उपदेश देत असतों. ६२ जे कोणी हा स्तव अनन्यभक्तीनें ऐकतील, गातील, किंवा लिहितील, त्यांना सर्व सौख्य पूर्णपणें मिळून तुझ्या कृपेनें अंतीं

१. सदृश उतारा-' यालागीं एकिहेळा तुज । दावूं आता वर्म निज । तरी सर्वभूतांकुरें बीज । विरूढत असे तें मी ॥ म्हणोनि सानें थोर न म्हणावें । उंच नीच भाव साडावे । एक मीचि ऐसें मानावें । वस्तुजातातें ॥ '-ज्ञानेश्वरी १० २. ' मा हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्यु पापयोनयः । स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि याति परा गतिम् ॥ '-भ. गीता ९. ३ ' शृण्वंति गायंति गृणंत्यभीक्ष्णशः स्मरंति नंदंति तवेहितं जनाः । त एव पश्यंत्यचिरेण तावकं भवप्रवाहोपरमं पदाबुजम् ॥ '-भागवत १,८.

भवत्प्रसादात् ॥ ६३ ॥ इंद्र उवाच ॥ रक्षोधिपेनाखिलदेवसौख्यं हृतं च मे ब्रह्मवरेण देव । पुनश्च सर्वं भवतः प्रसादात्प्राप्तं हतो राक्षसदुष्टशत्रुः ॥ ६४ ॥ देवा ऊचुः ॥ हृता यज्ञभागा धरादेवदत्ता मुरारे खलेनादिदैत्येन विष्णो । हतोऽद्य त्वया नो वितानेषु भागाः पुरावद्भविष्यंति युष्मत्प्रसादात् ॥६५॥ पितर ऊचुः ॥ हतोऽद्य त्वया दुष्टदैत्यो महात्मन् गयादौ नरैर्दत्तपिंडादिकान्नः । बलादत्ति हत्वा गृहीत्वा समस्तानिदानीं पुनर्लब्धसत्त्वा भवामः ॥६६॥ यक्षा ऊचुः ॥ सदा विष्टिकर्मण्यनेनाभियुक्ता वहामो दशास्यं बलाद्दुःखयुक्ताः। दुरात्मा हतो रावणो राघवेश त्वया ते वयं दुःखजाताद्विमुक्ताः ॥ ६७ ॥ गंधर्वा ऊचुः ॥ वयं संगीतनिपुणा गायंतस्ते कथामृतम् । आनंदामृतसंदोहयुक्ताः पूर्णाः स्थिताः पुरा ॥ ६८ ॥ पश्चाद्दुरात्मना राम रावणेनाभिविद्रुताः । तमेव गायमानाश्च तदाराधनतत्पराः ॥ ६९ ॥ स्थितास्त्वया

तुझें पदही प्राप्त होईल.' ६३ इंद्र म्हणाला, ' देवा ! ब्रह्मदेवापासून वर मिळाल्यामुळे राक्षसाधिपतीनें माझें सारें देवसौख्य हरण करून नेले होतें. परंतु आतां तो राक्षसरूपी दुष्ट शत्रु मारला जाऊन तुझ्या कृपेनें तें सर्व सुख मला पुनः मिळालें आहे. ' ६४ देव म्हणाले, 'मुरारे[1] विष्णो ! ब्राह्मणांनी दिलेले यज्ञभाग हा दुष्ट दैत्याग्रणी घेत असे. त्याचा आज तूं वध केल्यानें ते आमचे यज्ञभाग पूर्वीप्रमाणे आम्हांला मिळतील. ' ६५ पितर म्हणाले, ' हे महात्मन् ! आज तुझ्या हातून जो दुष्ट दैत्य मारला गेला, तो गयादि[2] क्षेत्रांत लोकांनीं आम्हांला दिलेले पिंड खाऊन टाकीत असे. तो आम्हां सर्वांना बलात्कारानें धरून मारीत असे. आतां आम्हांला पहिल्यासारखें सामर्थ्य येईल. ' ६६ यक्ष म्हणाले, ' हा आम्हांला वेठीला लावीत असे. त्यामुळें निरुपायानें दुःखी अंतःकरणानें आम्ही त्याला ( पालखीत ) वाहून नेत होतों. राघवेशा ! तुझ्याकडून तो दुरात्मा मारला गेल्यामुळें आम्ही सर्व दुःखापासून मुक्त झालों आहों. ' ६७ गधर्व म्हणाले, ' आम्ही पूर्वी गायनकलेंत निपुण असून तुझ्या कथामृताचें गायन करीत आनंदामताच्या डोहांत पूर्णपणें मग्न होऊन राहात होतों. ६८ पुढें रामा ! त्या दुष्ट रावणानें आम्हांला जिंकून टाकल्यामुळें त्याचेंच गायन करून त्याच्या आराधनेंत ( आजवर ) तत्पर होऊन राहिलों होतों. तो

१. मुरदैत्याच्या शत्रो ! मुरनामक दैत्याचा कृष्णाने वध केला होता. २. गया—एक क्षेत्रस्थान. हें बिहारप्रांतात आहे.

परित्राता हतोऽयं दुष्टराक्षसः । एवं महोरगाः सिद्धाः किन्नरा मरुतस्तथा ॥७०॥ वसवो मुनयो गावो गुह्यकाश्च पतत्रिणः । सप्रजापतयश्चैते तथा चाप्सरसां गणाः ॥ ७१ ॥ सर्वे रामं समासाद्य दृष्ट्वा नेत्रमहोत्सवम् । स्तुत्वा पृथक् पृथक् सर्वे राघवेणाभिवंदिताः ॥ ७२ ॥ ययुः स्वं स्वं पदं सर्वे ब्रह्मरुद्रादयस्तथा । प्रशंसंतो मुदा रामं गायंतस्तस्य चेष्टितम् ॥ ७३ ॥ ध्यायंतस्त्वभिषेकार्द्रं सीतालक्ष्मणसंयुतम् । सिंहासनस्थं राजेंद्रं ययुः सर्वे हृदि स्थितम् ॥ ७४ ॥ खे वाद्येषु ध्वनत्सु प्रमुदितहृदयैर्देववृंदैः स्तुवद्भिर्वर्षद्भिः पुष्पवृष्टिं दिवि मुनिनिकरैरीड्यमानं समंतात् । रामः श्यामः प्रसन्नस्मितरुचिरमुखः सूर्यकोटिप्रकाशः सीतासौमित्रिवातात्मजमुनिहरिभिः सेव्यमानो विभाति ॥७५॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकांडे पंचदशः सर्गः ॥ १५ ॥

दुष्ट राक्षस तुझ्याकडून मारला गेल्यामुळें आमची आज मुक्तता झाली आहे.' अशा रीतीनें मोठमोठे सर्प, सिद्ध, किन्नर, देव, ६९, ७० त्याचप्रमाणें वसु, मुनि, गाई, गुह्यक, पक्षी, प्रजापति आणि अप्सरांचे गण, हे सर्व रामाकडे येऊन नेत्रांना परमोत्सव देणाऱ्या त्याच्या मूर्तीला पाहाते झाले. त्या सर्वांनी रामाची वेगवेगळ्या प्रकारें स्तुति केल्यावर रामानें त्याना वंदन केलें. ७१,७२ नंतर ते सर्व आपापल्या ठिकाणी गेले. तसेंच ब्रह्मदेव, शंकर वगैरे देवांनी आनंदानें रामाची स्तुति केली. नंतर त्याचे चरित्राचें गायन करीत ते स्वलोकी गेले. ७३ अभिषेकाचे योगें रामाचें शरीर आर्द्र झालें होतें; त्याच्या संगती सीता आणि लक्ष्मण होती. तो राजेंद्र (राम) सिंहासनावर बसला होता, तरी सर्वांच्या अंतःकरणांत वास करीत होता. अशा त्या राममूर्तीचें ध्यान करीत सर्व लोक निघून गेले. ७४ आकाशांत वाद्यें वाजत होती, आनंदित अंतःकरणांनी देवसमुदाय स्वर्गात स्तुति व पुष्पवृष्टि करीत होते, चारी बाजूंनी मुनिसमुदाय स्तुति करीत राहिला होता. श्यामवर्ण रामाच्या प्रसन्न मुखावर हास्य विलसत होतें, त्यामुळें तें विशेषच सुंदर दिसत होतें. त्याचें तेज कोटिसूर्यांप्रमाणें विलसत होतें. सीता, लक्ष्मण, मारुति, ऋषि आणि वानर त्याची सेवा करीत होते. असा तो राम ( सिंहासनावर ) शोभत होता. ७५ "

**युद्धकांड, सर्ग पंधरावा समाप्त.**

## युद्धकांड, सर्ग सोळावा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ रामेऽभिषिक्ते राजेंद्रे सर्वलोकसुखावहे । वसुधा सस्यसंपन्ना फलवंतो महीरुहाः ॥ १ ॥ गंधहीनानि पुष्पाणि गंधवंति चकाशिरे । सहस्रशतमश्वानां धेनूनां च गवां तथा ॥ २ ॥ ददौ शतवृषान्पूर्वं द्विजेभ्यो रघुनंदनः । त्रिंशत्कोटिं सुवर्णस्य ब्राह्मणेभ्यो ददौ पुनः ॥ ३ ॥ वस्त्राभरणरत्नानि ब्राह्मणेभ्यो मुदा तथा । सूर्यकांतिसमप्रख्यां सर्वरत्नमयीं स्रजम् ॥ ४ ॥ सुग्रीवाय ददौ प्रीत्या राघवो भक्तवत्सलः । अंगदाय ददौ दिव्ये ह्यंगदे रघुनंदनः ॥ ५ ॥ चंद्रकोटिप्रतीकाशं मणिरत्नविभूषितम् । सीतायै प्रददौ हारं प्रीत्या रघुकुलोत्तमः ॥ ६ ॥ अवमुच्यात्मनः कंठाद्धारं जनकनंदिनी । अवैक्षत हरीन्सर्वान् भर्तारं च मुहुर्मुहुः ॥ ७ ॥ रामस्तामाह वैदेहीमिंगितज्ञो विलोकयन् । वैदेहि यस्य तुष्टासि देहि तस्मै वरानने ॥ ८ ॥ हनूमते ददौ हारं पश्यतो राघवस्य च । तेन हारेण शुशुभे मारुति-

श्रीमहादेव म्हणाला, " सर्व लोकांना सुखदायक अशा श्रीरामाला राज्याभिषेक झाल्यावर पृथ्वीवर धान्यांची समृद्धि झाली. वृक्ष फलांनी संपन्न झाले. १ गंधहीन फुलें सुगंधित होऊन शोभूं लागलीं. रामानें दहा हजार घोडे, तितक्याच धेनुं व गाई ब्राह्मणांना दिल्या. प्रथमतः शेंकडो वृषभांची दानें करून मग पुनः तीस कोटि सुवर्णदान त्यानें ब्राह्मणांना केलें. २,३ वस्त्रें, अलंकार व रत्नेंही त्यानें ब्राह्मणांना आनंदानें दिलीं. त्या भक्तवत्सल रामानें सूर्यप्रभेसारख्या तेजानें शोभणारी, सर्व रत्नांची एक माळ प्रीतिपूर्वक सुग्रीवाला दिली. तशींच रघुनंदनानें दोन दिव्य बाहुभूषणें अंगदाला दिलीं. ४,५ कोटिचंद्रांप्रमाणें तेजस्वी, मणिरत्नांनीं विभूषित असा हार, त्या रघुकुलश्रेष्ठानें सीतेला दिला. ६ जानकीनें तो हार गळ्यांतून काढून घेतला, आणि त्या सर्व वानरांकडे आणि नंतर पतीकडे तिनें वरचेवर नजर टाकिली. ७ तें पाहून तिचा अंतर्हेतु जाणून राम म्हणाला, ' वरानने जानकि ! ज्याच्यावर तूं संतुष्ट झाली असशील, त्याला ( हा हार ) दे. ८ मग ( सीतेनें ) रामाच्या देखत तो हार हनुमंताला दिला. त्या हारानें आणि सीतेनें केलेल्या गौरवानें मारुति फारच

१. व्यालेल्या गाई. २. बैलाचीं. ३. सुवर्णाचीं नाणीं.

गौरवेण च ॥ ९ ॥ रामोऽपि मारुतिं दृष्ट्वा कृतांजलिमुपास्थितम् । भक्त्या परमया तुष्ट इदं वचनमब्रवीत् ॥ १० ॥ हनूमंस्ते प्रसन्नोऽस्मि वरं वरय कांक्षितम् । दास्यामि देवैरपि यद्दुर्लभं भुवनत्रये ॥ ११ ॥ हनूमानपि तं प्राह नत्वा रामं प्रहृष्टधीः । त्वन्नाम स्मरतो राम न तृप्यति मनो मम ॥ १२ ॥ अतस्त्वन्नाम सततं स्मरन् स्थास्यामि भूतले । यावत्स्थास्यति ते नाम लोके तावत्कलेवरम् ॥ १३ ॥ मम तिष्ठतु राजेंद्र वरोऽयं मेऽभिकांक्षितः । रामस्तथेति तं प्राह मुक्तस्तिष्ठ यथासुखम् ॥१४॥ कल्पांते मम सायुज्यं प्राप्स्यसे नात्र संशयः । तमाह जानकी प्रीता यत्र कुत्रापि मारुते ॥ १५ ॥ स्थितं त्वामनुयास्यंति भोगाः सर्वे ममाज्ञया । इत्युक्तो मारुतिस्ताभ्यामीश्वराभ्यां प्रहृष्टधीः ॥ १६ ॥ आनंदाश्रुपरीताक्षो भूयोभूयः प्रणम्य तौ । कृच्छ्राद्ययौ तपस्तप्तुं हिमवंतं

शोभूं लागला. ९ मग हात जोडून जवळ आलेल्या मारुतीला पाहून त्याच्या परमभक्तीनें संतुष्ट झालेला राम त्याला म्हणाला, १० ' हनमंना ! मी तुजवर संतुष्ट झालों आहें. तुला जो इच्छित असेल, तो वर माग. त्रैलोक्यांत देवांनाही दुर्लभ, अशी वस्तु मी तुला देईन.' ११ हनुमंताच्या देखील चित्ताला आनंद वाटला. त्यानें रामाला प्रणाम केला आणि म्हटलें, ' रामा ! तुझें नामस्मरण मी करीत असतांही तृप्ति म्हणून होत नाहीं. १२ म्हणून तुझें नामस्मरण करीत मी भूतलावर राहावें. तुझें नांव जोंपर्यंत या लोकांत राहील, तोंपर्यंत हें माझें शरीर राहो. हाच माझा राजेंद्रा ! इच्छित वर होय.' त्यावर ' बरें आहे, ' असें रामानें सांगितलें, आणि म्हटलें, ' तूं मुक्त होत्साता यथेच्छ सुखानें रहा. १३,१४ कल्पांतीं तू माझ्या रूपीं येऊन मिळशील, यांत संशय नाही. ' मग सीता त्या ( मारुती )ला प्रीतिपूर्वक म्हणाली, ' मारुते ! तूं कोठेंही असलास, तरी, माझ्या आज्ञेवरून, सर्व भोग तुला लाभतील.' त्या दोघां ईश्वरांनी—सीतारामचंद्रांनी—असें सांगितल्यावर मारुतीच्या अंतःकरणाला हर्ष वाटला. त्याच्या डोळ्यांतून आनंदाश्रू वाहूं लागले. त्यानें त्या दोघांना वरचेवर प्रणाम केला. मग मोठ्या संकटानें तो महाबुद्धिमान् ( मारुति ) तप आचरण करण्याकरितां

१. नामस्मरणमहिमा—' रामनामजपतां कुतोऽभयं सर्वतापशमनैकभेषजम् । पश्य तात मम गात्रसंगतः पावकोऽपि सलिलायतेऽधुना ॥'— नृसिंहपुराण.

महामतिः ॥ १७ ॥ ततो गुहं समासाद्य रामः प्रांजलिमब्रवीत् । सखे गच्छ पुरं रम्यं शृंगवेरमनुत्तमम् ॥ १८ ॥ मामेव चिंतयन्नित्यं भुंक्ष्व भोगान्निजार्जितान् । अंते ममैव सारूप्यं प्राप्स्यसे त्वं न संशयः ॥१९॥ इत्युक्त्वा प्रददौ तस्मै दिव्यान्याभरणानि च । राज्यं च विपुलं दत्वा विज्ञानं च ददौ विभुः ॥२०॥ रामेणालिंगितो हृष्टो ययौ स्वभवनं गुहः । ये चान्ये वानराः श्रेष्ठा अयोध्यां समुपागताः ॥२१॥ अमूल्याभरणैर्वस्त्रैः पूजयामास राघवः । सुग्रीवप्रमुखाः सर्वे वानराः सविभीषणाः ॥ २२ ॥ यथार्हं पूजितास्तेन रामेण परमात्मना । प्रहृष्टमनसः सर्वे जग्मुरेव यथागतम् ॥२३॥ सुग्रीवप्रमुखाः सर्वे किष्किंधां प्रययुर्मुदा । विभीषणस्तु संप्राप्य राज्यं निहतकंटकम् ॥ २४ ॥ रामेण पूजितः प्रीत्या ययौ लंकामनिंदितः । राघवो राज्यमखिलं शशासाखिलवत्सलः ॥ २५ ॥ अनिच्छन्नपि रामेण यौवराज्येऽभिषेचितः । लक्ष्मणः परया भक्त्या

म्हणून हिमालय पर्वतावर गेला. १५,१६,१७ मग हात जोडून असलेल्या गुहाकडे वळून राम म्हणाला, 'मित्रा ! तूं तुझ्या रम्य आणि उत्तमोत्तम अशा शृंगवेरपुराला जा. १८ माझें नित्य चिंतन करीत स्वसंपादित उपभोग भोगीत रहा. शेवटीं माझ्या सारूप्याला तूं पावशील, यांत संशय नाहीं.' १९ असें म्हणून ( रामानें ) त्याला दिव्य आभरणें दिलीं, व विपुल राज्यही देऊन त्या सर्वसमर्थानें त्याला आत्मज्ञानाचा उपदेश केला. २० नंतर रामानें आलिंगन दिल्यावर गुह आनंदित होऊन आपल्या घरीं गेला. दुसरे जे मोठमोठे वानर अयोध्येला आले होते, २१ त्यांचीही अमूल्य वस्त्राभरणें देऊन रामानें पूजा केली. सुग्रीव वगैरे सर्व वानर व विभीषण यांचाही त्यांच्या त्यांच्या योग्यतेनुसार त्या परमात्मा रामानें सत्कार केला. त्यामुळें ते सर्व आनंदित चित्तानें आल्या मार्गानें परत गेले. २२,२३ सुग्रीवादि सर्व मंडळी आनंदानें किष्किंधेला गेली. विभीषण निष्कंटक राज्य मिळवून, २४ व रामाकडून सत्कार पावून आनंदानें लंकेला गेला. आपल्या सद्वर्तनानें तो कोणालाही निंद्य झाला नाहीं. (इकडे) तो प्रजावत्सल राम सकल राज्याचें पालन करूं लागला. २५ लक्ष्मणाची इच्छा नसतांही रामानें त्याला यौवराज्याचा अभिषेक केला. तो रामसेवा अत्यंत प्रेमपूर्वक तत्परतेनें

**रामसेवापरोऽभवत् ॥ २६ ॥ रामस्तु परमात्माऽपि कर्माध्यक्षोऽपि निर्मलः । कर्तृत्वादिविहीनोऽपि निर्विकारोपि सर्वदा ॥ २७ ॥ स्वानंदेनापि तुष्टः सन् लोकानामुपदेशकृत् । अश्वमेधादियज्ञैश्च सर्वैर्विपुलदक्षिणैः ॥ २८ ॥ अयजत्परमानंदो मानुषं वपुराश्रितः । न पर्यदेवन्विधवा न च व्यालकृतं भयम् ॥ २९ ॥ न व्याधिजं भयं चासीद्रामे राज्यं प्रशासति । लोके दस्युभयं नासीदनर्थो नास्ति कश्चन ॥ ३० ॥ वृद्धेषु सत्सु बालानां नासीन्मृत्युभयं तथा । रामपूजापराः सर्वे सर्वे राघवचिंतकाः ॥ ३१ ॥ ववर्षुर्जलदास्तोयं यथाकालं यथारुचि । प्रजाः स्वधर्मनिरता वर्णाश्रमगुणान्विताः ॥ ३२ ॥ औरसानिव रामोऽपि जुगोप पितृवत्प्रजाः । सर्वलक्षणसंयुक्तः सर्वधर्मपरायणः ॥ ३३ ॥ दशवर्षसहस्राणि रामो राज्यमुपास्त सः ॥ ३४ ॥ इदं रहस्यं धनधान्यऋद्धिमद्दीर्घायुरारोग्य-**

करीत असे. २६ वस्तुतः राम हा परमात्मा, सर्व कर्मांचा साक्षी, निर्मल, कर्तृत्वादि धर्मरहित, नित्य निर्विकार, २७ स्वानंदतुष्ट असा होता, तरीही लोकांना (उद्धाराचा) मार्ग दाखवावा, या हेतूनें त्या परमानंदस्वरूप रामानें मनुष्यदेहाचा स्वीकार करून अश्वमेधादि सर्व यज्ञ केले, व विपुल दक्षिणा दिल्या. रामराज्यात वैधव्य पावून स्त्रिया रडल्या असें कधी झालें नाही. सर्पदंशाची भीति कोणाला नव्हती, किंवा रोगपीडाही कोणाला झाली नाही. लोकांना चोराचें भय नव्हतें, व कोणत्याही प्रकारचा अनर्थ उद्भवत नसे. २८,२९,३० तसच वृद्ध माणसें हयात असतां लहान मुलांना (कधीही) मृत्युभय वाटलें नाही. सर्व लोक रामपूजनांत तत्पर व रामचिंतनांत निमग्न असत. ३१ मेघही यथाकाली लोकांना पाहिजे तितकी वृष्टि करीत. प्रजा स्वधर्मनिरत राहून वर्णाश्रमगुणांनी संपन्न होत्या. ३२ सर्व प्रजांचें औरस पुत्रांप्रमाणें राम पालन करीत असे. तो (राम) सर्वलक्षणसंपन्न व सर्वधर्मपरायण होता. ३३ त्या (रामा)नें दहा हजार वर्षे राज्य केलें. ३४ हें गुप्त असलेलें अध्यात्म

१. 'त्वं ब्रह्म परमं धाम निरीहो निरहंकृतिः । निर्गुणश्च निराकारः साकारः सगुणः स्वयम् ॥ साक्षिरूपश्च निर्लिप्तः परमात्मा निराकृति । प्रकृतिः पुरुषस्त्वं च कारणं च तयोः परम् ॥' –कृष्णस्तोत्रम्. २. वर्ण–ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र. आश्रम–ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ, आणि सन्यास.

करं सुपुण्यदम् । पवित्रमाध्यात्मिकसंज्ञितं पुरा रामायणं भाषितमादि-
शंभुना ॥ ३५ ॥ शृणोति भक्त्या मनुजः समाहितो भक्त्या पठेद्वा
परितुष्टमानसः । सर्वाः समाप्नोति मनोगताशिषो विमुच्यते पातककोटिभिः
क्षणात् ॥ ३६ ॥ रामाभिषेकं प्रयतः शृणोति यो धनाभिलाषी लभते
महद्धनम् । पुत्राभिलाषी सुतमार्यसंमतं प्राप्नोति रामायणमादितः पठन्
॥ ३७ ॥ शृणोति योऽध्यात्मिकरामसंहितां प्राप्नोति राजा भुवमृद्धसं-
पदम् । शत्रून्विजित्यारिभिरप्रधर्षितो व्यपेतदुःखो विजयी भवेन्नृपः
॥३८॥ स्त्रियोऽपि शृण्वंत्यधिरामसंहितां भवंति ता जीवसुताश्च पूजिताः ।
वंध्यापि पुत्रं लभते सुरूपिणं कथामिमां भक्तियुता शृणोति या ॥३९॥
श्रद्धान्वितो यः शणुयात्पठेन्नरो विजित्य कोपं च तथा विमत्सरः ।

नांवाचें पवित्र रामायण पूर्वी आदिशंभु–शंकर–यांनीं सांगितलें. हें अत्यंत पुण्य-दायक असून ( त्याचें पठन करणाऱ्यांना ) धनधान्य, ऐश्वर्य, त्याचप्रमाणें दीर्घ आयुष्य व आरोग्य ही प्राप्त होतात. ३५ जो मनुष्य हें भक्तीनें लक्ष्यपूर्वक श्रवण करील, अगर आनंदित मनानें ह्याचें पठन करील, त्याचे सर्व वांछित हेतु परिपूर्ण होऊन तो क्षणांत कोट्यवधि पापांपासून मुक्त होईल. ३६ धनाभिलाषी मनुष्यानें शुद्ध होऊन हें रामाभिषेकवर्णन ऐकिलें असतां त्याला पुष्कळ धनप्राप्ति होईल. पुत्राची इच्छा असेल, त्यानें आरंभापासून रामायणाचें पठन करावें, म्हणजे त्याला विद्वन्मान्य पुत्र होईल. ३७ जो कोणी राजा या आध्यात्मिक राम-संहितेचें पठन करील, त्याला सर्ववैभवसंपन्न पृथ्वीचें राज्य मिळेल, तो शत्रूंना जिंकील, शत्रू त्याला भिवविणार नाहीत, त्याची सर्व दुःखें दूर होतील, व सर्वत्र त्या राजाला जय मिळेल. ३८ स्त्रिया ह्या रामसंहितेचें श्रवण करितील, तर त्यांची मुलें जगतील व सर्वत्र त्यांचा मान होईल. जी कोणी वंध्या स्त्री भक्तियुक्त होऊन या कथेचें श्रवण करील, तिला देखील सुरूपवान् पुत्राची प्राप्ति होईल. ३९ जो मनुष्य क्रोधाला जिंकून आणि मत्सर सोडून श्रद्धेनें

१. सदृश उतारा–'स्त्रीहंता बालघाती च सुरापो वृषलीपतिः । मुच्यते सर्वपापेभ्यो य पठेन्नात्र संशयः ॥ अपुत्रो लभते पुत्रं धनार्थी लभते धनम् । विद्यार्थी लभते विद्यां मोक्षार्थी लभते गतिम् ॥'–विष्णुपंजरस्तोत्र

दुर्गाणि सर्वाणि विजित्य निर्भयो भवेत्सुखी राघवभक्तिसंयुतः ॥ ४० ॥ सुराः समस्ता अपि यांति तुष्टतां विघ्नाः समस्ता अपयांति शृण्वताम् । अध्यात्मरामायणमादितो नृणां भवंति सर्वा अपि संपदः पराः ॥ ४१ ॥ रजस्वला वा यदि रामतत्परा शृणोति रामायणमेतदादितः । पुत्रं प्रसूते ऋषभं चिरायुषं पतिव्रता लोकसुपूजिता भवेत् ॥ ४२ ॥ पूजयित्वा तु ये भक्त्या नमस्कुर्वंति नित्यशः । सर्वैः पापैर्विनिर्मुक्ता विष्णोर्यांति परं पदम् ॥४३॥ अध्यात्मरामचरितं कृत्स्नं शृण्वंति भक्तितः । पठंति वा स्वयं वक्त्रात्तेषां रामः प्रसीदति ॥ ४४ ॥ राम एव परं ब्रह्म तस्मिंस्तुष्टेऽखिलात्मनि । धर्मार्थकाममोक्षाणां यद्यदिच्छति तद्भवेत् ॥४५॥ श्रोतव्यं नियमेनैतद्रामायणमखंडितम् । आयुष्यमारोग्यकरं कल्पकोट्यघनाशनम् ॥ ४६ ॥ देवाश्च सर्वे तुष्यंति ग्रहाः

ह्या ग्रंथाचें श्रवण आणि पठण करील, त्याच्या अंगीं रामभक्ति जडून तो सर्व संकटांतून पार पडेल, व निर्भय आणि सुखी होईल. ४० अध्यात्मरामायण ग्रंथ मूळापासून श्रवण करितील, त्यांच्यावर सकल देव प्रसन्न होतील, त्यांचीं सर्व विघ्नें दूर होतील, आणि सर्व प्रकारच्या श्रेष्ठ संपत्ति त्यांना प्राप्त होतील. ४१ रजस्वला स्त्रीनें देखील रामाच्या ठिकाणी मन ठेवून हें रामायण आरंभापासून ऐकिलें, तर तिला चिरायुषी उत्तम पुत्र होईल, आणि थोर पतिव्रता म्हणून तिचा लोकांत अत्यंत मान होईल. ४२ जे कोणी भक्तिपूर्वक पूजा करून या ग्रंथाला नित्य वंदन करितात, ते सर्व पापांपासून मुक्त होऊन विष्णूच्या परम पदाला पावतात. ४३ जे लोक सर्व अध्यात्मरामचरित भक्तिपूर्वक ऐकतात, किंवा स्वतः तोंडानें पठन करितात, त्यांना राम प्रसन्न होतो. ४४ राम हाच प्रत्यक्ष परब्रह्म होय. तो सर्वांतर्यामी ( राम ) संतुष्ट झाला असतां धर्म, अर्थ, काम, मोक्ष ह्यांपैकीं मनुष्याला ज्याची इच्छा असेल, तें प्राप्त होईल. ४५ हें रामायण नियमानें खंड पडूं न देतां ऐकावें. तेणेंकरून मनुष्याला आयुरारोग्य प्राप्त होतें, आणि कोटिकल्पांत त्याच्या हातून घडलेल्या पातकांचा नाश होतो. ४६ रामायण ऐकल्यानें सर्व देव. ग्रह आणि

१. रामायणमाहात्म्यः—रामायणाचा एक श्लोक । भवबंधच्छेदक समर्थ देख । कथून गेला वाल्मीक । शतकोटिसंख्या हो ॥ आदिपासोनी अंतींवरी । श्रीरामकथा अमृतलहरी । सादर जो श्रवण करी । तोचि संसारीं धन्य होय ॥ '—भा. रामायण, उत्तरकांड ७७.

सर्वे महर्षयः। रामायणस्य श्रवणे तृप्यंति पितरस्तथा ॥४७॥ अध्यात्मरामायणमेतदद्भुतं वैराग्यविज्ञानयुतं पुरातनम्। पठंति शृण्वंति लिखंति ये नरास्तेषां भवेऽस्मिन्न पुनर्भवो भवेत् ॥४८॥ आलोड्याखिलवेदराशिमसकृद्यत्तारकं ब्रह्म तद्रामो विष्णुरहस्यमूर्तिरिति यो विज्ञाय भूतेश्वरः। उद्धृत्याखिलसारसंग्रहमिदं संक्षेपतः प्रस्फुटं श्रीरामस्य निगूढतत्त्वमखिलं प्राह प्रियायै भवः ॥ ४९ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकांडे षोडशः सर्गः ॥ १६ ॥

॥ इति युद्धकांडं समाप्तम् ॥

सर्व महर्षि हे सर्वदा तृप्त होतात, तसेच पितरही तृप्त होतात. ४७ अध्यात्मरामायण हा अद्भुत ग्रंथ असून यांत वैराग्य व विज्ञान–तत्त्वज्ञान–यांसंबंधी गोष्टी सांगितल्या आहेत. हा ग्रंथ प्राचीन आहे. जे लोक या जन्मांत या ग्रंथाचें पठन, श्रवण अगर लेखन करितील, त्यांना पुनर्जन्म प्राप्त होणार नाहीं." ४८ समस्त वेदराशीचें वारंवार आलोडन करून भूतपति शंकरानें 'राम म्हणजेच तारक ब्रह्म'[1] व 'राम हा विष्णूची गूढ मूर्ति होय,' हें जाणिलें, आणि नंतर ज्यांत रामाचें गूढतत्त्व भरलेलें आहे, असें सर्व ज्ञानाचें सार शंकरानें एकत्र काढून तें त्यानें ह्या ग्रंथद्वारें आपल्या प्रिय पत्नीला सांगितलें. ४९

**युद्धकांड, सोळावा सर्ग समाप्त.**

**युद्धकांड समाप्त.**

१ 'रामः सत्यं परं ब्रह्म रामात् किंचिन्न विद्यते। तस्माद्रामस्वरूपं हि सत्यं सत्यमिदं जगत् ॥'–श्रीरामचंद्रस्तवराजस्तोत्रम्.

# अथ उत्तरकांडप्रारंभः ॥



## उत्तरकांड, सर्ग १ ला.



जयति रघुवंशतिलकः कौसल्याहृदयनंदनो रामः । दशवदननिधनकारी दाशरथिः पुंडरीकाक्षः ॥ १ ॥ पार्वत्युवाच ॥ अथ रामः किमकरोत्कौसल्यानंदवर्धनः । हत्वा मृधे रावणादीन् राक्षसान्भीमविक्रमः ॥ २ ॥ अभिषिक्तस्त्वयोध्यायां सीतया सह राघवः । मायामानुषतां प्राप्य कति वर्षाणि भूतले ॥ ३ ॥ स्थितवान् लीलया देवः परमात्मा सनातनः । अत्यजन्मानुषं लोकं कथमंते रघूद्वहः ॥ ४ ॥ एतदाख्याहि भगवन् श्रद्दधत्या मम प्रभो । कथापीयूषमास्वाद्य तृष्णा मेतीव वर्धते । रामचंद्रस्य भगवन् ब्रूहि विस्तरशः कथाम् ॥ ५ ॥ श्रीमहादेव उवाच ॥ राक्षसानां वधं कृत्वा राज्यं राम उपस्थिते । आययुर्मुनयः सर्वे श्रीराममभिवंदितुम् ॥ ६ ॥ विश्वामित्रोऽसितः कण्वो

कौसल्येच्या हृदयाला आनंदविणारा, दशवदना( रावणा )चा वध करणारा, असा जो कमलनयन रघुकुलतिलक दशरथपुत्र श्रीराम, त्याचा सर्वत्र जयजयकार होत आहे. १ पार्वती म्हणाली, '( शंकरा ! ) कौसल्यानंदवर्धक भीमपराक्रमी रामचंद्रानें युद्धांत रावणादिकांचा वध केल्यावर पुढें काय केलें? २ रामाला सीतेसह अयोध्येमध्यें अभिषेक झाला. पुढें मायेनें धारण केलेल्या मनुष्यदेहांत भूतलावर त्या परमात्मस्वरूप सनातन देवानें किती वर्षें लीलेनें वास केला, व अंतीं त्या रघुश्रेष्ठानें मनुष्यलोक कसा सोडिला, ३,४ हे प्रभो भगवंता! मला सांगा. माझी आपल्यावर फार श्रद्धा आहे. ह्या कथामृताचा आस्वाद घेतां घेतां माझी तृषा अधिकाधिक वाढत चालली आहे. भगवन् ! श्रीरामचंद्राची कथा विस्तारानें सांगा.' ५ श्रीमहादेव म्हणाला, 'राक्षसांचा वध करून राज्यावर श्रीराम बसला असतां त्याचें अभिवंदन करण्याकरितां सर्व मुनि आले. ६ ( ते मुनि म्हणजे ) विश्वामित्र, असित[1]

१. असित—एक ऋषि. देवल ऋषीचेंही हें नाव आहे.

दुर्वासा भृगुरंगिराः । कश्यपो वामदेवोऽत्रिस्तथा सप्तर्षयोऽमलाः ॥७॥ अगस्त्यः सहशिष्यैश्च मुनिभिः सहितोऽभ्यगात् । द्वारमासाद्य रामस्य द्वारपालमथाब्रवीत् ॥ ८ ॥ ब्रूहि रामाय मुनयः समागत्य बहिःस्थिताः । अगस्त्यप्रमुखाः सर्वे आशीर्भिरभिनंदितुम् ॥ ९ ॥ प्रतीहारस्ततो राममगस्त्यवचनाद्द्रुतम् । नमस्कृत्वाब्रवीद्वाक्यं विनयावनतः प्रभुम् ॥ १० ॥ कृतांजलिरुवाचेदमगस्त्यो मुनिभिः सह । देव त्वद्दर्शनार्थाय प्राप्तो बहिरुपस्थितः ॥ ११ ॥ तमुवाच द्वारपालं प्रवेशय यथासुखम् । पूजिता विविशुर्वेश्म नानारत्नविभूषितम् ॥ १२ ॥ दृष्ट्वा रामो मुनीन्‍ शीघ्रं प्रत्युत्थाय कृतांजलिः । पाद्यार्घ्यादिभिरापूज्य गां निवेद्य यथाविधि ॥१३॥ नत्वा तेभ्यो ददौ दिव्यान्यासनानि यथार्हतः । उपविष्टाः

कण्व, दुर्वासा, भृगु, अंगिरा, कश्यप, वामदेव, अत्रि, पुण्यसंपन्न सप्तर्षि, हे आले. ७ तसाच अगस्त्य ऋषिही आपल्या शिष्यमुनींसह तेथें आला. द्वाराजवळ आल्यावर त्यानें द्वारपाळाला सांगितलें, ८ ‘रामाला सांग की, अगस्त्यप्रभृति सर्व मुनि आशीर्वादपूर्वक तुझें अभिनंदन करण्यासाठीं आले असून बाहेर उभे आहेत.’ ९ अगस्त्याच्या बोलण्याप्रमाणें तो द्वारपाळ सत्वर ( आंत गेला, आणि ) नमस्कार करून व हात जोडून नम्रतापूर्वक प्रभु रामाला म्हणाला, ‘देवा! अगस्त्य ऋषि मुनिगणांसह आपल्या भेटीला आले असून बाहेर उभे आहेत. १०, ११ त्या द्वारपाळाला रामानें सांगितलें की, ‘त्यांना खुशाल आंत आणीव.’ नंतर सत्कार घेत घेत नानारत्नविभूषित अशा त्या ( राम ) मंदिरांत ( ते मुनि ) आले. १२ त्यांना पाहतांच राम तत्काळ उठला. त्यानें हात जोडले, पाद्य, अर्घ्य इत्यादिकांनी ( त्या मुनींची ) पूजा केली, आणि शास्त्रोक्त विधीनें ( मधुपर्कासाठी म्हणून ) वृषभ अर्पण केला, १३ व सर्वांना प्रणाम करून त्यांच्या त्यांच्या योग्यतेनुसार दिव्य आसनें दिलीं. त्यांवर ते मुनि बसले. रामानें केलेल्या सत्कारामुळें

१. एक प्रख्यात ऋषि. यानें भगवताच्या उरावर क्षमागुणपरीक्षणार्थ लाथ मारल्याची कथा प्रसिद्ध आहे. ‘उरीं भृगूची हरि लाथ सोसी । ऐसी क्षमेचीच सदा असोसी ॥ क्षमा धरूं वृत्ति अशी मनाची । प्रार्थी हरीतें मति वामनाची ॥’–हरिविलास, वामनपंडित २. मधुपर्क–अतिथीला सत्कारपूर्वक केलेले दान. ३. बैल विद्वान् ब्राह्मण गृहीं आला असतां त्याला बैल, वासरूं, अज इत्यादि अर्पण करून त्याचा सत्कार करण्याची पूर्वी चाल होती. ‘श्रोत्रियायाभ्यागताय वत्सतरीं महोक्ष महाजं वा निर्वपन्ति गृहमेधिनः.’

प्रहृष्टाश्च मुनयो रामपूजिताः ॥ १४ ॥ संपृष्टकुशलाः सर्वे रामं कुशल-
मब्रुवन् । कुशलं ते महाबाहो सर्वत्र रघुनंदन ॥ १५ ॥ दिष्ट्येदानीं
प्रपश्यामो हतशत्रुमरिंदम । न हि भारः स ते राम रावणो राक्षसेश्वरः
॥ १६ ॥ सधनुस्त्वं हि लोकांस्त्रीन् विजेतुं शक्त एव हि । दिष्ट्या
त्वया हताः सर्वे राक्षसा रावणादयः ॥१७॥ सह्यमेतन्महाबाहो रावणस्य
निबर्हणम् । असह्यमेतत्संप्राप्तं रावणेर्यन्निषूदनम् ॥१८॥ अंतकप्रतिमाः
सर्वे कुंभकर्णादयो मृधे । अंतकप्रतिमैर्बाणैर्हतास्ते रघुसत्तम ॥१९॥ दत्ता
चेयं त्वयास्माकं पुरा ह्यभयदक्षिणा । हत्वा रक्षोगणान्संख्ये कृतकृत्योऽद्य
जीवसि ॥ २० ॥ श्रुत्वा तु भाषितं तेषां मुनीनां भावितात्मनाम् ।
विस्मयं परमं गत्वा रामः प्रांजलिरब्रवीत् ॥ २१ ॥ रावणादीनतिक्रम्य
कुंभकर्णादिराक्षसान् । त्रिलोकजयिनो हित्वा किं प्रशंसथ रावणिम्
॥ २२ ॥ ततस्तद्वचनं श्रुत्वा राघवस्य महात्मनः । कुंभयोनिर्महातेजा

त्यांना अत्यंत हर्ष वाटला. १४ (रामानें) कुशलप्रश्न विचारिला असतां, त्या सर्वांनीं आपलें क्षेम कळविलें. ते म्हणाले, 'महाबाहो रघुनंदना! तुझ्या राज्यांत सर्वत्र कुशल आहे. १५ हे अरिंदमा! शत्रूचा वध करून आल्यावर तुझी आम्हांला भेट होत आहे, ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. रामा! हा राक्षसेश्वर रावण, (पाहिलें असतां) तुला भारी होता, असें नाहीं. १६ तूं एकदां धनुष्य हातीं धरिलेंस कीं, त्रैलोक्य देखील जिंकण्यास तूं समर्थ आहेस. तुझ्याकडून रावणादिक सर्व राक्षस मारिले गेले, ही उत्तम गोष्ट झाली. १७ महाबाहो! रावणाचा वध करणें तुला शक्य होतें, परंतु रावणि इंद्रजित्-याचा वध करणें अत्यंत कठीण असतांही तो तूं केलास! १८ कुंभकर्णादि सारे राक्षस रणांगणीं प्रत्यक्ष मृत्युच होते. रघुसत्तमा! मृत्युतुल्य बाणांच्या योगें तूं त्यांचा युद्धामध्यें वध केलास! १९ही अभयदक्षिणा पूर्वीच तूं आम्हांला दिली होतीस; त्याप्रमाणें युद्धांत राक्षससमुदायांचा वध करून आज तूं कृतकृत्य होऊन राहिला आहेस. २० परब्रह्मस्वरूपीं रममाण झालेल्या त्या मुनींचें असें भाषण ऐकून रामाला अत्यंत विस्मय वाटला. त्यानें हात जोडून विचारिलें, २१ 'त्रैलोक्य-विजयी रावण, कुंभकर्ण इत्यादि राक्षसांना सोडून तुम्ही इंद्रजिताची स्तुति करितां, हें कसें?' २२ महासमर्थ राघवाचें तें भाषण ऐकून तो महातेजस्वी कुंभयोनि-

रामं प्रीत्या वचोऽब्रवीत् ॥ २३ ॥ शृणु राम यथा वृत्तं रावणे राव-
णस्य च । जन्म कर्म वरादानं संक्षेपाद्वदतो मम ॥ २४ ॥ पुरा कृत-
युगे राम पुलस्त्यो ब्रह्मणः सुतः । तपस्तप्तुं गतो विद्वान्मेरोः पार्श्वं महा-
मतिः ॥ २५ ॥ तृणबिंदोराश्रमेऽसौ न्यवसन्मुनिपुंगवः । तपस्तेपे महा-
तेजाः स्वाध्यायनिरतः सदा ॥ २६ ॥ तत्राश्रमे महारम्ये देवगंधर्वक-
न्यकाः । गायंत्यो ननृतुस्तत्र हसंत्यो वादयंति च ॥२७॥ पुलस्त्यस्य
तपोविघ्नं चक्रुः सर्वा अनिंदिताः । ततः क्रुद्धो महातेजा व्याजहार वचो
महत् ॥२८॥ या मे दृष्टिपथं गच्छेत्सा गर्भं धारयिष्यति । ताः सर्वाः
शापसंविग्ना न तं देशं प्रचक्रमुः ॥ २९ ॥ तृणबिंदोस्तु राजर्षेः कन्या
तन्नाशृणोद्वचः । विचचार मुनेरग्रे निर्भया तं प्रपश्यती ॥ ३० ॥ बभूव
पांडुरतनुर्व्यंजितांतःशरीरजा । दृष्ट्वा सा देहवैवर्ण्यं भीता पितरमन्वगात्
॥ ३१ ॥ तृणबिंदुश्च तां दृष्ट्वा राजर्षिरमितद्युतिः । ध्यात्वा मुनिकृतं

अगस्त्य-प्रीतिपूर्वक रामाला म्हणाला, २३ ' रामा ! रावणाचें–इंद्रजिताचें, आणि रावणाचें चरित्र, त्यांचें जन्म, त्यांची कृत्यें, त्यांची वरप्राप्ति हें ( सर्व ) यथावृत्त मी संक्षेपानें सांगतों, ऐक. २४ रामा ! पूर्वीं कृतयुगामध्यें ब्रह्मदेवाचा महामति व विद्वान् पुत्र पुलस्त्य तप करण्याकरितां मेरुपर्वताच्या निकटभागीं गेला. २५ तेथें तो मुनिश्रेष्ठ तृणबिंदूच्या आश्रमांत राहून तपश्चर्या करूं लागला. तो सर्वदा वेदाध्ययनांत आसक्त असे. २६ त्या अत्यंत रमणीय आश्रमांत देवांच्या, गंधर्वांच्या कन्या ( येऊन ) गात असत, नाचत असत, हंसत असत, व वाद्यें वाजवीत असत. २७ त्या सर्व निखिललावण्यसंपन्न मुलींच्या क्रीडांनीं पुलस्त्याच्या तपाला विघ्न झाल्यामुळें तो महातेजस्वी मुनि क्रुद्ध झाला, आणि कठोर भाषण करून बोलला, २८ ' जी कोणी माझ्या दृष्टीच्या समोर येइल, ती गर्भ धारण करील.' त्या सर्व मुलींना त्या शापाची भीति वाटून त्या स्थळीं जाणें त्यांनीं सोडून दिलें. २९ परंतु तृणबिंदु राजर्षीच्या कन्येच्या कानी हें वचन आलें नव्हतें. ती निर्भय चित्तानें त्या मुनीकडे पाहात त्याच्या अग्रभागी गेली. ३० तोंच तिच्या पोटीं गर्भ राहून ( त्याच चिह्न ) शरीरावरील पांडुरता, ती दिसूं लागली. तें आपलें देहवैवर्ण्य पाहून ती भयभीत झाली, व पित्याकडे गेली. ३१ त्या महाप्रभाव तृणबिंदु राजर्षीनें तिजकडे पाहिलें. नंतर ( थोडा वेळ )

सर्वमवाद्बुद्धज्ञानचक्षुषा ॥ ३२ ॥ तां कन्यां मुनिवर्याय पुलस्त्याय ददौ पिता । तां प्रगृह्याब्रवीत्कन्यां बाढमित्येव स द्विजः ॥ ३३ ॥ शुश्रूषणपरां दृष्ट्वा मुनिः प्रीतोऽब्रवीद्वचः । दास्यामि पुत्रमेकं ते उभयोर्वंशवर्धनम् ॥ ३४ ॥ ततः प्रासूत सा पुत्रं पुलस्त्याल्लोकविश्रुतम् । विश्रवा इति विख्यातः पौलस्त्यो ब्रह्मविन्मुनिः ॥ ३५ ॥ तस्य शीलादिकं दृष्ट्वा भरद्वाजो महामुनिः । भार्यार्थे स्वां दुहितरं ददौ विश्रवसे मुदा ॥ ३६ ॥ तस्यां तु पुत्रः संजज्ञे पौलस्त्याल्लोकसंमतः । पितृतुल्यो वैश्रवणो ब्रह्मणा चानुमोदितः ॥ ३७ ॥ ददौ तत्तपसा तुष्टो ब्रह्मा तस्मै वरं शुभम् । मनोभिलषितं तस्य धनेशत्वमखंडितम् ॥ ३८ ॥ ततो लब्धवरः सोऽपि पितरं द्रष्टुमागतः । पुष्पकेण धनाध्यक्षो ब्रह्मदत्तेन भास्वता ॥ ३९ ॥ नमस्कृत्वाथ पितरं निवेद्य तपसः फलम् । प्राह मे

ध्यान केल्यावर ज्ञानदृष्टीनें त्या (पुलस्त्य) मुनीचें सर्व कृत्य त्याला कळून आलें. ३२ मग पित्यानें ती कन्या त्या मुनिश्रेष्ठ पुलस्त्याला दिली. त्या ब्राह्मणानें त्या कन्येचा स्वीकार केला व 'बरें आहे,' असें म्हटलें. ३३ पतिसेवेंत ती अत्यंत दक्ष असल्याचें पाहून त्या मुनीला—पुलस्त्याला—संतोष झाला, आणि तो तिला म्हणाला, 'उभयकुलांची कीर्ति वाढवील, असा एक पुत्र मी तुला देतों.' ३४ पुढें त्या पुलस्त्यापासून तिला एक पुत्र झाला. त्याची लोकांत फार प्रसिद्धि झाली. हा पौलस्त्य 'विश्रवा' या नांवानें प्रसिद्ध असून तो (पुढें) ब्रह्मवेत्ता मुनि झाला. ३५ त्याचें शील वगैरे पाहून महामुनि भरद्वाजानें त्या विश्रव्याला आनंदानें आपली कन्या भार्या करून दिली. ३६ तिच्या पोटीं त्या विश्रव्यापासून एक लोकविख्यात पुत्र जन्माला आला. त्याचें नांव वैश्रवण असून तो अगदीं पित्यासारखा होता. त्यावर ब्रह्मदेवाचें प्रेम होतें. ३७ त्याच्या तपानें संतुष्ट होऊन ब्रह्मदेवानें त्याला एक चांगला वर दिला. त्याच्या मनांतील हेतु असा होता कीं 'आपण सर्वदा धनाधिपति असावें.' ३८ नंतर त्याला पाहिजे तसा वर मिळाल्यावर ब्रह्मदेवानें दिलेल्या तेजस्वी पुष्पक विमानांत बसून तो बापाला भेटण्यास आला. ३९ त्यानें बापाला नमस्कार केला, आणि आपल्या तपश्चर्येचें फळ त्याला सांगून म्हणाला.

१. सदृश वर्णनः—' ससारसिंधुचें जळ केलें लंघूनें जीवें तृणबिंदु । त्या सत्तमासि मग दे कन्या राजर्षिनाथ तृणबिंदु. ॥ '—मंत्ररामायण, मोरोपंत. २. कुबेर.

भगवान् ब्रह्मा दत्वा वरमनिंदितम् ॥ ४० ॥ निवासाय न मे स्थानं दत्तवान्परमेश्वरः । ब्रूहि मे नियतं स्थानं हिंसा यत्र न कस्यचित् ॥ ४१ ॥ विश्रवा अपि तं प्राह लंकानाम पुरी शुभा । राक्षसानां निवासाय निर्मिता विश्वकर्मणा ॥ ४२ ॥ त्यक्त्वा विष्णुभयाद्दैत्या विविशुस्ते रसातलम् । सा पुरी दुष्प्रधर्षान्यैर्मध्ये सागरमास्थिता ॥४३॥ तत्र वासाय गच्छ त्वं नान्यैः साधिष्ठिता पुरा । पित्रादिष्टस्त्वसौ गत्वा तां पुरीं धनदोऽविशत् ॥ ४४ ॥ स तत्र सुचिरं कालमुवास पितृसंमतः । कस्यचित्त्वथ कालस्य सुमाली नाम राक्षसः ॥ ४५ ॥ रसातलान्मर्त्यलोकं चचार पिशिताशनः । गृहीत्वा तनयां कन्यां साक्षाद्देवीमिव श्रियम ॥ ४६ ॥ अपश्यद्धनदं देवं चरंतं पुष्पकेण सः । हिताय

'भगवान् ब्रह्मदेवानें मला उत्तम वर दिला. ४० परंतु त्या परमेश्वरानें मला निवासाला जागा दिली नाही. तर तुम्ही मला एखादें निश्चित स्थल सांगा, की जेथें कोणत्याही प्रकारची कोणालाही कोणापासून पीडा होणार नाहीं. ४१ विश्रव्यानेंही त्याला सांगितलें की, 'विश्वकर्म्यानें लंका नांवाची एक सुंदर नगरी राक्षसांना राहण्याकरितां म्हणून निर्माण केली आहे. ४२ विष्णूच्या भीतीमुळें त्या दैत्यांनीं हें स्थळ सोडून रसातलांत प्रवेश केला आहे. ती पुरी समुद्राच्या मध्यभागी वसली असल्याकारणानें दुसऱ्या कोणापासूहि तिला त्रास होण्याचा संभव नाहीं. ४३ तेथें तूं रहाण्याकरितां जा. बापानें असें सांगितल्यावर धनद—कुबेर—त्या नगरींत ( रहाण्याला ) गेला. ४४ तेथें पित्याच्या इच्छेप्रमाणें तो बरेच दिवस राहिला. अशा स्थितीत कांहीं काळ गेला. पुढें सुमाली नांवाचा एक राक्षस रसातलांतून येऊन पृथ्वीवर फिरत फिरत आला. त्या मांसभक्षका( राक्षसा ) नें आपल्याबरोबर आपली मुलगी आणिली होती. रूपगुणांनी ती साक्षात् लक्ष्मीदेवीच कीं काय, असें वाटत होतें. ४५,४६ कुबेर पुष्पक विमानांतून फिरतांना पाहून त्या

१. 'परासी न द्यावें दुःख । परपीडेपरीस नाहीं पातक । यालागीं साधु सज्ञान लोक । प्राणांतीं दुःख न देती ॥ याकारणें स्वामिनाथा । कृपाळुवा कृपानाथा । मज भोगार्थ नगर तत्त्वता । आपण आतां पैं द्यावें ॥ '—भा. रामायण, उत्तरकांड ३.

चिंतयामास राक्षसानां महामनाः ॥ ४७ ॥ उवाच तनयां तत्र कैकसीं नाम नामतः । वत्से विवाहकालस्ते यौवनं चातिवर्तते ॥ ४८ ॥ प्रत्याख्यानाच्च भीतैस्त्वं न वरैर्गृह्यसे शुभे । सा त्वं वरय भद्रं ते मुनिं ब्रह्मकुलोद्भवम् ॥ ४९ ॥ स्वयमेव ततः पुत्रा भविष्यंति महाबलाः । ईदृशाः सर्वशोभाढ्या धनदेन समाः शुभे ॥ ५० ॥ तथेति साश्रमं गत्वा मुनेरग्रे व्यवस्थिता । लिखंती भुवमग्रेण पादेनाधोमुखी स्थिता ॥ ५१ ॥ तामपृच्छन्मुनिः का त्वं कन्यासि वरवर्णिनि । साब्रवीत्प्रांजलिर्ब्रह्मन् ध्यानेन ज्ञातुमर्हसि ॥ ५२ ॥ ततो ध्यात्वा मुनिः सर्वं ज्ञात्वा तां प्रत्यभाषत । ज्ञातं तवाभिलषितं मत्तः पुत्रानभीप्स्यसि ॥ ५३ ॥ दारुणायां तु वेलायामागतासि सुमध्यमे । अतस्ते दारुणौ पुत्रौ राक्षसौ संभविष्यतः ॥ ५४ ॥ साब्रवीन्मुनिशार्दूल त्वत्तोऽप्येवंविधौ सुतौ ।

महाबुद्धिमान् सुमालीनें राक्षसाच्या हितासाठी म्हणून काही विचार मनांत योजिला. ४७ तो आपल्या कैकसीनामक मुलीला बोलावून म्हणाला, ‘ वत्से ! तुझा विवाहकाल येऊन ठेपला आहे तुझा यौवनकाल जात चालला आहे. ४८ हे कल्याणि ! तुजकडून मान्यता मिळणार नाही, ह्या भीतीनें तुझी मागणी कोणीही वर करीत नाही. म्हणून तूं ब्रह्मकुलांत जन्मलेल्या ह्या मुनीला विश्रव्याला-वर. तुझें कल्याण होवो. ४९ हे पुण्यशीले ' ( असें केल्यानें ) तुला अनायासें ह्या कुबेरासारखे महाबलाढ्य व सर्वसौंदर्यसंपन्न पुत्र होतील. ' ५० ‘ बरें आहे, ' असें म्हणून ती त्या आश्रमांत गेली, व खाली तोंड करून, पायाच्या अंगठ्यानें भूमीवर रेखा काढीत लज्जायमान होत्साती मुनीच्या पुढें उभी राहिली. ५१ तिला मुनीनें प्रश्न केला, ‘ सुंदरि ! तूं कोण मुलगी आहेस ? ' ती हात जोडून म्हणाली, ‘ब्रह्मन्, आपल्या ध्यानेंकरूनच केवळ आपण जाणूं शकाल. ' ५२ नंतर ध्यान करून मुनीनें सर्व जाणलें, आणि तो तिला म्हणाला, ‘ तुझा मनोदय मला कळून आला. माझ्यापासून तुला पुत्र व्हावे, अशी तुझी इच्छा आहे. ५३ सुंदरि ! तूं या भयंकर वेळी आली आहेस, म्हणून तुला दोन क्रूर राक्षसपुत्र होतील. ' ५४ ती ( कैकसी ) म्हणाली, ‘ मुनिश्रेष्ठ हो ! आपल्यापासूनही अशा प्रकारचे पुत्र होणार,

**तामाह पश्चिमो यस्ते भविष्यति महामतिः ॥ ५५ ॥ महाभागवतः श्रीमान् रामभक्त्यैकतत्परः । इत्युक्त्वा सा तथा काले सुषुवे दशकंधरम् ॥५६॥ रावणं विंशतिभुजं दशशीर्षं सुदारुणम् । तद्रक्षोजातमात्रेण चचाल च वसुंधरा ॥ ५७ ॥ बभूवुर्नाशहेतूनि निमित्तान्यखिलान्यपि । कुंभकर्ण-स्ततो जातो महापर्वतसन्निभः ॥ ५८ ॥ ततः शूर्पणखा नाम जाता रावणसोदरी । ततो विभीषणो जातः शांतात्मा सौम्यदर्शनः ॥ ५९ ॥ स्वाध्यायी नियताहारो नित्यकर्मपरायणः । कुंभकर्णस्तु दुष्टात्मा द्विजान् संतुष्टचेतसः ॥ ६० ॥ भक्षयन्नृषिसंघांश्च विचचारातिदारुणः । राव-णोऽपि महासत्त्वो लोकानां भयदायकः । ववृधे लोकनाशाय ह्यामयो देहिनामिव ॥ ६१ ॥ राम त्वं सकलांतरस्थमभितो जानासि विज्ञानदृक्**

हें कसें ?' त्यावर तो ( विश्रवा ) म्हणाला, 'तुला ह्यांमागून जो मुलगा होईल, तो महामति, परम भगवद्भक्त, ऐश्वर्यवान्, आणि रामभक्ति करण्यांत अत्यंत तत्पर असा होईल.' असें तिला त्या मुनीनें सांगितल्यावर तिला यथाकाळी दहा मानांचा, वीस भुजांचा, दहा मस्तकांचा, अत्यंत भयंकर असा मुलगा झाला. त्याचें नांव रावण हें होय. तो राक्षस जन्माला येतांच पृथ्वी थरथर कांपली. ५५,५६,५७ सर्व प्रकारचे अनिष्टसूचक अपशकुन झाले. पुढें महापर्वतासमान आकाराचा कुंभकर्ण जन्मला. ५८ त्यामागून रावणाची बहीण शूर्पणखा जन्माला आली. त्यानंतर शांत वभावाचा, सौम्यदर्शन, ५९ वेदाध्ययनशील, नियताहारी, आणि नित्यकर्मपरायण असा विभीषण पुत्र झाला. कुंभकर्ण दुष्ट अंतःकरणाचा होता. तो अतिदारुण राक्षस संतुष्ट अंतःकरणाच्या ब्राह्मणांना आणि ऋषिसमूहांला खाऊन भटकत असे. प्राण्यांच्या पोटांत रोग वाढतो, तो त्यांच्या नाशाकरितांच वाढतो, त्याप्रमाणें तो महापराक्रमी रावण लोकांच्या नाशासाठींच वाढत चालला. तो लोकांना भयप्रद वाटत असे.' ६०,६१ रामा ! तूं विज्ञानेंदृष्टि असून सर्व प्राण्यांच्या हृदयांत जें जें कांही चाललें आहे, तें तें पूर्णपणें ओळखतास. तू सर्वसाक्षी

१. 'तिसरा जो आत्मज तो विभीषणाख्येंकरूनि गौरविला, । तो परमपुण्यकर्मा, मतिमान्, धीर, प्रसिद्धकीर्ति, भला. ॥'—मोरोपंत, मंत्ररामायण. २. विज्ञान—साक्षात्कारजन्य-ज्ञान, अनुभवज्ञान.

साक्षी सर्वहृदि स्थितो हि परमो नित्योदितो निर्मलः । त्वं लीलामनुजाकृतिः स्वमहिमन् मायागुणर्नाज्यसे लीलार्थं प्रतिचोदितोऽद्य भवता वक्ष्यामि रक्षोद्भवम् ॥ ६२ ॥ जानामि केवलमनंतमचिंत्यशक्तिं चिन्मात्रमक्षरमजं विदितात्मतत्त्वम् । त्वां राम गूढनिजरूपमनुप्रवृत्तो मूढोऽप्यहं भवदनुग्रहतश्चरामि ॥ ६३ ॥ एवं वदंतमिनवंशपवित्रकीर्तिः कुंभोद्भवं रघुपतिः प्रहसन्बभाषे । मायाश्रितं सकलमेतदनन्यकत्वान्मत्कीर्तनं जगति पापहरं निबोध ॥ ६४ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे उत्तरकांडे प्रथमः सर्गः ॥ १ ॥

आहेस. तूं सर्वांच्या हृदयांत राहणारा आहेस. तं परम थोर, नित्य उदय पावणारा, निर्मल, लीलेनें मनुष्यरूप धारण करणारा आहेस. तुझा महिमा थोर आहे. मायागुणांनी तूं लिप्त होत नाहीस. तूं लीलेसाठी प्रश्न केलास, म्हणून तुला राक्षसाची जन्मकथा सांगतों. ६२ मी मूढ आहें, तरी तुझ्या कृपेच्या योगानें मी जाणतों की, तूं केवळ अनंत ( परब्रह्म ) आहेस; तुझी शक्ति अचिंत्य आहे, तं चिद्रूप आहेस; तूं अक्षर–विकाररहित–आहेस, तुला जन्म नाही. तं आत्मतत्त्व जाणतोस, तू आपलें रूप गुप्त करून ठेविलें आहेस, तरीही तूं धारण केलेल्या ( प्रवृत्ति )मार्गाचेंच अनुकरण करून मी वागत आहें. ६३ अगस्त्य मुनींनें असें सांगितलें असतां सूर्यवंशांतील परमकीर्तिशाली तो रघुपति रामचंद्र हंसत अगस्त्याला बोलला, 'हें सकल जग मायाश्रित आहे. तें परमेश्वरस्वरूपाहून–मजहून–वेगळें नाही. माझें कीर्तन जगांत सकल पापांचा संहार करणारें आहे, हें ओळख. ६४ "

**उत्तरकांड, प्रथम सर्ग समाप्त.**

---

१. 'अनंत देवेश जगन्निवास, त्वमक्षरं सदसत्तत्परं यत् ॥'–भ. गीता ११.
२. 'अव्यक्तोऽक्षर इत्युक्त. ।'–भ. गीता ८.

## उत्तरकांड, सर्ग दुसरा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ श्रीरामवचनं श्रुत्वा परमानंदनिर्भरः । मुनिः प्रोवाच सदसि सर्वेषां तत्र शृण्वताम् ॥ १ ॥ अथ वित्तेश्वरो देवस्तत्र कालेन केनचित् । आययौ पुष्पकारूढः पितरं द्रष्टुमंजसा ॥२॥ दृष्ट्वा तं कैकसी तत्र भ्राजमानं महौजसम् । राक्षसी पुत्रसामीप्यं गत्वा रावणमब्रवीत् ॥ ३ ॥ पुत्र पश्य धनाध्यक्षं ज्वलंतं स्वेन तेजसा । त्वमप्येवं यथा भूयास्तथा यत्नं कुरु प्रभो ॥ ४ ॥ तच्छ्रुत्वा रावणो रोषात् प्रतिज्ञामकरोद्द्रुतम् । धनदेन समो वापि ह्यधिको वा चिरेण तु ॥५॥ भविष्याम्यंब मां पश्य संतापं त्यज सुव्रते । इत्युक्त्वा दुष्करं कर्तुं तपः स दशकंधरः ॥ ६ ॥ अगमत्फलसिद्ध्यर्थं गोकर्णं तु सहानुजः । स्वं स्वं नियममास्थाय भ्रातरस्ते तपो महत् ॥ ७ ॥ आस्थिता दुष्करं घोरं

श्रीमहादेव म्हणाला, "श्रीरामाचे भाषण ऐकून ( अगस्त्य ) मुनीला परम आनंद झाला. त्या सभेंतील सर्व मंडळी ऐकत असतां तो म्हणाला, १ 'पुढें कांही काळ गेल्यावर वित्ताधिपति देव ( कुबेर ) पुष्पकांत बसून सहज आपल्या बापाला भेटण्याकरितां आला. २ त्या महातेजस्वी व सामर्थ्यवान् अशा ( कुबेरा ) ला पाहून कैकसी आपल्या पुत्रांजवळ जाऊन रावणाला म्हणाली, ३ 'पुत्रा ! आपल्या तेजानें झळकत असणाऱ्या ह्या कुबेराला पहा ! प्रभो ! तूंही असा होण्याविषयीं यत्न कर.' ४ तें ऐकून रावण क्रोधाला चढला, त्यानें तत्काल प्रतिज्ञा केली की, 'मी थोड्याच दिवसांत धनदासारखा किंवा त्याहूनही अधिक ( थोर ) होईन. ५ आई ! तूं व्रतनिष्ठ आहेस. माझ्यावर कृपादृष्टि ठेव, आणि काळजी सोडून दे.' असें बोलून तो दशानन ( रावण ) आपल्या फलसिद्ध्यर्थ दुष्कर तप करण्याकरितां बंधूंसह गोकर्णाला गेला. ६ आपापले नियम पाळून तिघेही मोठी तपश्चर्या करूं लागले. सर्व लोकांना अत्यंत तापदायक असें तें घोर आणि दुष्कर तप होतें ७

१ सुमालीची कन्या व रावणमाता २. हें दक्षिणेकडील एक पवित्र यात्रास्थान आहे. येथें शंकराचे प्रसिद्ध देवस्थान आहे.

सर्वलोकैकतापनम् । दशवर्षसहस्राणि कुंभकर्णोऽकरोत्तपः ॥ ८ ॥
विभीषणोऽपि धर्मात्मा सत्यधर्मपरायणः । पंचवर्षसहस्राणि पादेनैकेन
तस्थिवान् ॥ ९ ॥ दिव्यवर्षसहस्रं तु निराहारो दशाननः । पूर्णे वर्ष-
सहस्रे तु शीर्षमग्नौ जुहाव सः । एवं वर्षसहस्राणि नव तस्यातिचक्रमुः
॥ १० ॥ अथ वर्षसहस्रे तु दशमे दशमं शिरः । छेत्तुकामस्य धर्मात्मा
प्राप्तश्चाथ प्रजापतिः । वत्स वत्स दशग्रीव प्रीतोऽस्मीत्यभ्यभाषत ॥११॥
वरं वरय दास्यामि यत्ते मनसि कांक्षितम् । दशग्रीवोऽपि तच्छ्रुत्वा प्रहृ-
ष्टेनांतरात्मना ॥ १२ ॥ अमरत्वं वृणोमीश वरदो यदि मे भवान्
सुपर्णनागयक्षाणां देवतानां तथासुरैः । अवध्यत्वं तु मे देहि तृणभूता
हि मानुषाः ॥ १३ ॥ तथास्त्विति प्रजाध्यक्षः पुनराह दशाननम् ।
अग्नौ हुतानि शीर्षाणि यानि तेऽसुरपुंगव ॥ १४ ॥ भविष्यंति यथापूर्व-
मक्षयाणि च सत्तम ॥ १५ ॥ एवमुक्त्वा ततो राम दशग्रीवं प्रजापतिः ।
विभीषणमुवाचेदं प्रणतं भक्तवत्सलः ॥ १६ ॥ विभीषण त्वया वत्स

कुंभकर्णानें दशसहस्र वर्षें तप केलें. ८ धर्मात्मा सत्यधर्मपरायण विभीषणानें देखील पांच हजार वर्षे एका पायावर उभें राहून ( तप केलें ). ९ दशाननानें देवांची एक हजार वर्षे, इतका काळपर्यंत उपोषण करून ( तप केलें ). नंतर हजार वर्षें पूर्ण होतांच आपलें एक मस्तक तोडून तें त्यानें अग्नीला वहावें. ( असा क्रम ठेवला. ) अशा प्रकारें त्याचीं नऊ हजार वर्षे निघून गेली. १० दहावें वर्षसहस्र संपून दहावें मस्तक तोडण्यास ( रावण ) सिद्ध झाला असतां, धर्मात्मा प्रजापति-ब्रह्मदेव-तेथें आला, आणि म्हणाला, 'वत्सा ! वत्सा दशग्रीवा ! मी तुझ्या तपानें संतुष्ट झालों आहें. ११ जो तुला इच्छित वर असेल, तो माग. मीं देईन.' तें ऐकून रावणाच्या अंतःकरणाला परम हर्ष वाटला. १२ ( तो म्हणाला, ) 'जर आपण मला वर देणार आहां, तर मी अमरत्व मागणार आहें. गरुड, नाग, यक्ष, देवता, असुर यांपैकीं कोणाच्याही हातून माझा वध होऊं नये, हें मला दे. मनुष्यें मला तृणासारखीं आहेत.' १३ 'ठीक आहे,' असें म्हणून ब्रह्मदेव रावणाला पुनः म्हणाला, 'असुरश्रेष्ठा ! जी मस्तकें तूं अग्नींत हवन केली आहेस, ती पूर्व-वत् हे श्रेष्ठा ! तुला पुनः अक्षय अशीं प्राप्त होतील. १४,१५ रामा ! याप्रमाणें रावणाला सांगून तो भक्तवत्सल ब्रह्मदेव नम्र झालेल्या विभीषणाला म्हणाला, १६

कृतं धर्मार्थमुत्तमम् । तपस्ततो वरं वत्स वृणीष्वाभिमतं हितम् ॥ १७॥ विभीषणोऽपि तं नत्वा प्रांजलिर्वाक्यमब्रवीत् । देव मे सर्वदा बुद्धिर्धर्मे तिष्ठतु शाश्वती । मा रोचयत्वधर्मं मे बुद्धिः सर्वत्र सर्वदा ॥ १८ ॥ ततः प्रजापतिः प्रीतो विभीषणमथाब्रवीत् । वत्स त्वं धर्मशीलोऽसि तथैव च भविष्यसि ॥ १९ ॥ अयाचितोऽपि ते दास्ये ह्यमरत्वं विभीषण । कुंभकर्णमथोवाच वरं वरय सुव्रत ॥ २० ॥ वाण्या व्याप्तोऽथ तं प्राह कुंभकर्णः पितामहम् । स्वप्स्यामि देव षण्मासान्दिनमेकं तु भोजनम् ॥२१॥ एवमस्त्विति तं प्राह ब्रह्मा दृष्ट्वा दिवौकसः । सरस्वती च तद्वक्त्रान्निर्गता प्रययौ दिवम् ॥ २२ ॥ कुंभकर्णस्तु दुष्टात्मा चिंतयामास दुःखितः । अनभिप्रेतमेवास्याल्किं निर्गतमहो विधिः ॥ २३ ॥ सुमाली वरलब्धांस्तान ज्ञात्वा पौत्रान निशाचरान । पातालान्निर्भयः प्रायात प्रहस्तादि-

' वत्सा विभीषणा ! धर्माकरितां म्हणून तूं उत्तम तप केलें आहेस, तरी तुला इच्छित व कल्याणकारक वाटत असेल, तो वर माग.' १७ त्यावर विभीषणानें त्याला नमस्कार केला, आणि हात जोडून म्हटलें, ' देवा ! माझी बुद्धि सर्वदा धर्माच्या ठिकाणीं अढळ राहो. माझ्या बुद्धीला केव्हांही व कोठेंही अधर्म न आवडो. ' १८ नंतर प्रजापति संतुष्ट होऊन विभीषणाला म्हणाला, 'वत्सा ! तूं धर्मशील आहेस, तसाच तूं पुढेंही राहशील. १९ विभीषणा ! तूं मागितलें नाहीस, तरी तुला मी अमरत्व देत आहें.' नंतर ब्रह्मदेव कुंभकर्णाला म्हणाला, ' हे सुव्रता ! तूं वर माग. ' २० इकडे ( देवांच्या इच्छेवरून ) सरस्वतीनें कुंभकर्णाच्या वाणीवर अधिष्ठित होऊन त्याला मोह घातल्यामुळें तो ( कुंभकर्ण ) ब्रह्मदेवाला म्हणाला, ' देवा ! मला सहा महिने गाढ झोंप[1], व त्यानंतर एक दिवस भोजनाकरितां जागृति, इतकें दे.' २१ ब्रह्मदेवानें देवांकडे पाहिलें, आणि 'ठीक आहे,' असें त्या (कुंभकर्णा) ला म्हटलें. सरस्वतीही त्याच्या मुखांतून निघून स्वर्गाला गेली. २२ त्या दुष्ट हृदयाच्या कुंभकर्णाला वाईट वाटून तो आपल्याशीं म्हणाला, ' माझ्या तोंडांतून हें अनपेक्षित वचन निघालें तरी कसें ? काय दैवाचा चमत्कार ! ' २३ आपल्या राक्षसनातवांना वर मिळाल्याचें समजल्यावर निर्भय होत्साता सुमाली प्रहस्तादिकांना बरोबर घेऊन पातालांतून

१. ' दशवदनानुज तेव्हां व्यामोहदभारतीहतस्वांत । सर्वसुरेशासि म्हणे, 'निद्रा दे, जाहलों तपःश्रांत. ॥ '—मोरोपंत, मंत्ररामायण.

भिरन्वितः ॥ २४ ॥ दशग्रीवं परिष्वज्य वचनं चेदमब्रवीत् । दिष्ट्या ते पुत्र संवृत्तो वांछितो मे मनोरथः ॥ २५ ॥ यद्भयाच्च वयं लंकां त्यक्त्वा याता रसातलम् । तद्गतं नो महाबाहो महद्विष्णुकृतं भयम् ॥ २६ ॥ अस्माभिः पूर्वमुषिता लंकेयं धनदेन ते । भ्रात्राऽऽक्रांतामिदानीं त्वं प्रत्यानेतुमिहार्हसि ॥ २७ ॥ साम्ना वाथ बलेनापि राज्ञां बंधुः कुतः सुहृत् । इत्युक्तो रावणः प्राह नार्हस्येवं प्रभाषितुम् ॥ २८ ॥ वित्तेशो गुरुरस्माकमेवं श्रुत्वा तमब्रवीत् । प्रहस्तः प्रश्रितं वाक्यं रावणं दशकंधरम् ॥ २९ ॥ शृणु रावण यत्नेन नैवं त्वं वक्तुमर्हसि । नाधीता राजधर्मास्ते नीतिशास्त्रं तथैव च ॥ ३० ॥ शूराणां न हि सौभ्रात्रं शृणु मे वदतः प्रभो । कश्यपस्य सुता देवा राक्षसाश्च महाबलाः ॥ ३१ ॥ परस्परमयुध्यंत त्यक्त्वा सौहृदमायुधैः । नैवेदानींतनं राजन् वैरं देवैरनुष्ठितम् ॥ ३२ ॥ प्रहस्तस्य वचः श्रुत्वा दशग्रीवो दुरात्मनः । तथेति

वर आला. २४ त्यानें रावणाला आलिंगन दिलें, आणि म्हटलें, 'माझ्या मनोरथाप्रमाणेंच तुझें मनोगत होतें, ही मोठ्या आनंदाची गोष्ट होय. २५ महाबाहो ! ज्या भयास्तव लंका सोडून आम्ही रसातळाला गेलों, तें आम्हांला वाटणारें विष्णूचें मोठें भय आतां गेलें. २६ आम्ही ज्या लंकेंत पूर्वी राहात होतों, ती तुझ्या भावानें—कुबेरानें—बळकाविली आहे, ती तूं त्याजकडून परत घ्यावीस, हें तुला योग्य आहे. २७ ह्याकरितां सामाची किंवा शक्तीची वाटेल ती योजना कर. राजाला बंधु किंवा सुहृत् कुठून असणार ?' सुमालीनें असें सांगितल्यावर रावण म्हणाला, 'असें बोलणें आपणाला योग्य नाही.' २८ धनपति ( कुबेर ) हा आम्हांला ( ज्येष्ठ बंधु असल्यामुळें ) गुरूसारखा आहे.' हें ऐकून प्रहस्त नम्रपणें दशमुखी रावणाला म्हणाला, २९ 'रावणा ! ( माझें म्हणणें ) यत्नपूर्वक ऐक. तुला असें म्हणणें योग्य नाहीं. राजधर्म किंवा नीतिशास्त्र यांचें शिक्षण तुला मिळालें नाही. ३० शूर म्हणून जे आहेत, त्यांना बंधुप्रेम हें नाहीच. प्रभो ! माझ्या सांगण्याकडे लक्ष्य दे. महाबलिष्ठ देव आणि राक्षस हे दोघेही कश्यपाचेच मुलगे. ३१ त्यांनी आप्तपण सोडून आयुधानी परस्परांशी युद्ध केलें. राजा ! देवांशी आपलें असलेलें वैर आजच सुरू झालें आहे, अशांतला प्रकार नाहीं.' ३२ त्या दुष्टहृदय प्रहस्ताचें भाषण ऐकून 'ठीक आहे,' असें रावणानें म्हटलें. त्याचे

क्रोधताम्राक्षस्त्रिकूटाचलमन्वगात् ॥ ३३ ॥ दूतं प्रहस्तं संप्रेष्य निष्कास्य धनदेश्वरम् । लंकामाक्रम्य सचिवै राक्षसैः सुखमास्थितः ॥ ३४ ॥ धनदः पितृवाक्येन त्यक्त्वा लंका महायशाः । गत्वा कैलासशिखरं तपसाऽतोषयाच्छिवम् ॥३५॥ तेन सख्यमनुप्राप्य तेनैव परिपालितः । अलकां नगरीं तत्र निर्ममे विश्वकर्मणा ॥ ३६ ॥ दिक्पालत्वं चकारात्र शिवेन परिपालितः । रावणो राक्षसैः सार्धमभिषिक्तः सहानुजैः ॥३७॥ राज्यं चकारासुराणां त्रिलोकीं बाधयन्खलः । भगिनीं कालखंजाय ददौ विकटरूपिणीम् ॥ ३८ ॥ विद्युज्जिह्वाय नामासौ महामायी निशाचरः । ततो मयो विश्वकर्मा राक्षसानां दितेः सुतः ॥ ३९ ॥ सुतां मंदोदरीं नाम्ना ददौ लोकैकसुंदरीम् । रावणाय पुनः शक्तिममोघां प्रीतमानसः ॥ ४० ॥ वैरोचनस्य दौहित्रीं वृत्रज्वालेति विश्रुताम् । स्वयं

डोळे क्रोधाने लालभडक झाले, आणि तो त्रिकूट पर्वतावर गेला. ३३ त्यानें प्रहस्ताला आपला दूत म्हणून पुढें पाठविलें. पुढें कुबेराला ( लंकेंतून ) घालवून देऊन व ती ( लंका ) आपल्या ताब्यांत घेऊन ( रावण ) सचिव राक्षसांसह तेथें सुखानें राहूं लागला. ३४ परमकीर्तिशाली कुबेर पित्याच्या आज्ञेवरून लंका सोडून कैलासशिखरावर गेला, आणि तेथें तपश्चर्या करून त्यानें शंकराला संतुष्ट केलें, ३५ आणि त्याच्याशी सख्य जोडलें. त्यामुळें शंकरच त्याचें परिपालन करूं लागला. पुढें विश्वकर्म्याकडून अलका नगरी करवून, ३६ तेथें तो दिक्पाल होऊन राहिला. त्याचें रक्षण शंकराकडून होऊं लागलें. इकडे रावणाला त्याच्या धाकट्या बंधूंसह राक्षसांनी अभिषेक केला. ३७ तो दुष्ट ( रावण ) असुरांचें राज्य करूं लागल्यापासून त्रैलोक्याला पीडा देऊं लागला. त्यानें आपली विक्राळस्वरूपाची बहीण कालखंज कुलांतील विद्युज्जिव्ह नांवाच्या महाकपटी राक्षसाला दिली. नंतर राक्षसांचा शिल्पी व दितीचा पुत्र जो मय त्यानें आपली मंदोदरी नांवाची कन्या रावणाला दिली. ही सर्व लोकांत अत्यंत सुंदर मुलगी होती. ह्याशिवाय रावणाला त्या ( मयासुरा )नें संतुष्ट चित्तानें एक अमोघ शक्ति दिली. ३८,३९,४० वृत्रज्वाला नांवाची वैरोचनाची विख्यात नात मुलीची मुलगी होती, ती तिच्या पित्यानें आपण होऊन कुंभकर्णाकरितां देऊं

१. कैलास हें एक हिमालयाचें शिखर असून शंकर व कुबेर यांचें वसतिस्थान आहे. २. ही कुबेराची राजधानी असून यक्षराजाची निवासभूमि होती. ' गंतव्या ते वसतिरलका नाम यक्षेश्वराणाम् ' ।-मेघदूत. ३. व्यर्थ न जाणारी शक्ति-अस्त्र.

दत्तामुदवहत्कुंभकर्णाय रावणः ॥ ४१ ॥ गंधर्वराजस्य सुतां शैलूषस्य महात्मनः । विभीषणस्य भार्यार्थे धर्मज्ञां समुदावहत् ॥ ४२ ॥ सरमां नाम सुभगां सर्वलक्षणसंयुताम् । ततो मंदोदरी पुत्रं मेघनादमजीजनत् ॥ ४३ ॥ जातमात्रस्तु यो नादं मेघवत्प्रमुमोच ह । ततः सर्वेऽब्रुवन्मेघनादोऽयमिति चासकृत् ॥ ४४ ॥ कुंभकर्णस्ततः प्राह निद्रा मां बाधते प्रभो । ततश्च कारयामास गुहां दीर्घां सुविस्तराम् ॥४५॥ तत्र सुष्वाप मूढात्मा कुंभकर्णो विघूर्णितः । निद्रिते कुंभकर्णे तु रावणो लोकरावणः ॥ ४६ ॥ ब्राह्मणान् ऋषिमुख्यांश्च देवदानवकिन्नरान् । देवश्रियो मनुष्यांश्च निजघ्ने समहोरगान् ॥ ४७ ॥ धनदोऽपि ततः श्रुत्वा रावणस्याक्रमं प्रभुः । अधर्मं मा कुरुष्वेति दूतवाक्यैर्न्यवारयत् ॥ ४८ ॥ ततः क्रुद्धो दशग्रीवो जगाम धनदालयम् । विनिर्जित्य धनाध्यक्षं जहारोत्तमपुष्पकम् ॥ ४९ ॥ ततो यमं च वरुणं निर्जित्य समरेऽसरः ।

केली होती. ती मान्य करून रावणानें तिचें कुंभकर्णाशी लग्न लाविलें. ४१ महोदार गंधर्वराज शैलूष, याची कन्या रावणानें विभीषणाला पत्नी करून दिली. ती अत्यंत धर्मज्ञ होती. ४२ ती सर्वलक्षणसंपन्न असून थोर भाग्याची होती. तिचें नांव सरमा होतें. पुढें मंदोदरीला मेघनाद नांवाचा पुत्र झाला. ४३ जन्माला येतांच त्यानें मेघासारखी गर्जना केली. त्यामुळें सर्व लोक त्याला 'हा मेघनाद आहे', असें वारंवार म्हणूं लागले. ४४ पुढें कुंभकर्णानें म्हटलें, 'प्रभो ! मला निद्रा फार त्रासवून सोडते.' म्हणून रावणानें त्याच्याकरितां एक लांब विस्तीर्ण गुहा करविली. ४५ त्या गुहेंत तो मूढमति कुंभकर्ण निद्रावश होऊन घोरत पडलेला असे. अशा रीतीनें तो निजून राहिला असतां रावण सर्व लोकांना पीडा देऊं लागला. ४६ तो ब्राह्मण, मोठमोठे ऋषि, देव, दानव, किन्नर, देवांच्या संपत्ति, मनुष्यें, मोठाले सर्प यांचा घात करूं लागला. ४७ रावणानें चालविलेल्या अनर्थाची वार्ता कुबेराचे कानीं गेली, तेव्हां त्या प्रभूनें 'अधर्म करूं नकोस,' म्हणून दूतमुखानें कळवून त्याचें निवारण केलें. ४८ तेव्हां रावण क्रुद्ध होऊन कुबेराच्या नगरावर चालून आला, आणि कुबेराला जिंकून (त्या रावणानें) त्याचें उत्तम पुष्पक विमान हरून नेलें. ४९ पुढें यम व वरुण, यांना समरांगणीं जिंकून देवराजाला—इंद्राला—मार-

स्वर्गलोकमगात्तूर्णं देवराजजिघांसया ॥ ५० ॥ ततोऽभवन्महद्युद्धमिंद्रेण
सह दैवतैः । ततो रावणमभ्येत्य बबंध त्रिदशेश्वरः ॥ ५१ ॥ तच्छ्रुत्वा
सहसागत्य मेघनादः प्रतापवान् । कृत्वा घोरं महद्युद्धं जित्वा त्रिदश-
पुंगवान् ॥ ५२ ॥ इंद्रं गृहीत्वा बद्ध्वासौ मेघनादो महाबलः । मोच-
यित्वा तु पितरं गृहीत्वेंद्रं ययौ पुरम् ॥ ५३ ॥ ब्रह्मा तु मोचयामास
देवेंद्रं मेघनादतः । दत्त्वा वरान्बहूंस्तस्मै ब्रह्मा स्वभवनं ययौ ॥ ५४ ॥
रावणो विजयी लोकान्सर्वान् जित्वा क्रमेण तु । कैलासं तोलयामास
बाहुभिः परिघोपमैः ॥ ५५ ॥ तत्र नंदीश्वरेणैवं शप्तोऽयं राक्षसेश्वरः ।
वानरैर्मानुषैश्चैव नाशं गच्छेति कोपिना ॥ ५६ ॥ शप्तोऽप्यगणयन्
वाक्यं ययौ हैहयपत्तनम् । तेन बद्धो दशग्रीवः पुलस्त्येन विमोचितः
॥ ५७ ॥ ततोऽतिबलमासाद्य जिघांसुर्हरिपुंगवम् । धृतस्तेनैव कक्षेण
वालिना दशकंधरः ॥ ५८ ॥ भ्रामयित्वा तु चतुरः समुद्रान् रावणं

ण्याच्या इच्छेनें तो तावडतोब स्वर्गलोकाला गेला. ५० तेथें देवांसह त्याचें इंद्राशी युद्ध झालें. नंतर रावणावर चालून येऊन देवराजानें त्याला बांधून घातलें. ५१ तें ऐकून प्रतापवान् मेघनाद एकदम धांवून आला, आणि मोठें भयंकर युद्ध करून मोठमोठ्या देवांचा त्यानें पराभव केला. ५२ त्या महाबलिष्ठ मेघनादानें इंद्राला धरून बांधलें, आपल्या पित्याला सोडविलें, आणि त्या इंद्राला घेऊन तो आपल्या ( लंका ) नगरीला गेला. ५३ पुढें ब्रह्मदेवानें इंद्राला मेघनादाच्या हातून सोडविलें, आणि त्या ( मेघनादा )ला अनेक वर देऊन ब्रह्मदेव आपल्या लोकीं गेला. ५४ त्या विजयी रावणानें क्रमानें सर्व लोकांना जिंकून आपल्या परिघासमान बाहूंनी कैलास हालविला. ५५ ( तें पाहून ) तेथील नंदीश्वरानें क्रुद्ध होऊन ह्या राक्षस-राजा ( रावणा )ला शाप दिला कीं, 'नरवानरांच्या हातून तुझा नाश होईल.' ५६ असा शाप झाला, तरीही त्या शापवचनाची पर्वा त्यानें केली नाहीं. तो हैहयराजाच्या नगराला गेला. त्यानें रावणाला बांधून ठेविलें, परंतु पुलस्त्यानें तेथून त्याची सुटका केली. ५७ नंतर पूर्वीपेक्षांही अधिक बळ संपादून तो रावण वानरराजाला-वालीला-मारण्याच्या इच्छेनें त्याजवर धांवून गेला. परंतु वालीनें आपल्या कक्षेंत-बगलेंत-त्याला दाबून ठेविलें. ५८ नंतर रावणाला चारी समुद्रांवर गरगर फिरवून त्या

१. अडसराप्रमाणे. २. शंकरानें. ३. सहस्रार्जुनाच्या. ४. पुलस्त्य–रावणाचा आजा.

हरिः । विसर्जयामास ततस्तेन सख्यं चकार सः ॥ ५९ ॥ रावणः
परमप्रीत एवं लोकान्महाबलः । चकार स्ववशे राम बुभुजे स्वयमेव
तान् ॥ ६० ॥ एवंप्रभावो राजेंद्र दशग्रीवः सहेंद्रजित् । त्वया विनि-
हतः संख्ये रावणो लोकरावणः ॥ ६१ ॥ मेघनादश्च निहतो लक्ष्म-
णेन महात्मना । कुंभकर्णश्च निहतस्त्वया पर्वतसन्निभः ॥ ६२ ॥ भवा-
न्नारायणः साक्षाज्जगतामादिकृद्विभुः । त्वत्स्वरूपमिदं सर्वं जगत्स्थावर-
जंगमम् ॥ ६३ ॥ त्वन्नाभिकमलोत्पन्नो ब्रह्मा लोकपितामहः । अग्निस्ते
मुखतो जातो वाचा सह रघूत्तम ॥ ६४ ॥ बाहुभ्यां लोकपालौघाश्च-
क्षुर्भ्यां चंद्रभास्करौ । दिशश्च विदिशश्चैव कर्णाभ्यां ते समुत्थिताः
॥ ६५ ॥ घ्राणात्प्राणः समुत्पन्नश्चाश्विनौ देवसत्तमौ । जंघाजानूरुजघ-
नाद्भुवर्लोकादयोऽभवन् ॥ ६६ ॥ कुक्षिदेशात्समुत्पन्नाश्चत्वारः सागरा
हरेः । स्तनाभ्यामिंद्रवरुणौ वालखिल्याश्च रेतसः ॥ ६७ ॥ मेढ्राद्यमो

वानरानें—वालीनें—सोडून दिलें. नंतर त्याच्याशीं त्या ( रावणा )नें अत्यंत संतुष्ट होऊन सख्य केलें. रामा ! अशा रीतीनें तो महाबलिष्ठ ( रावण ) सर्व जगतांना वश करून स्वत.च त्यांचा उपभोग घेऊं लागला. ५९,६० राजेंद्रा ! असा प्रभाव रावणाचा होता, तरी इंद्रजितासह सर्व लोकांत गर्जत असणाऱ्या त्या रावणाचा समरांत तूं वध केलास. ६१ महात्म्या लक्ष्मणानें मेघनादाचा वध केला. पर्वतसमान कुंभकर्णही तूं मारिलास. ६२ जगांचा आदिकर्ता विभु नारायण तो तूंच साक्षात् आहेस. हें सर्व स्थावरजंगमात्मक जगत् तुझेंच[1] स्वरूप होय. ६३ लोकांचा पितामह तुझ्या नाभिकमळामध्यें उत्पन्न झाला आहे. हे रघूत्तमा ! वाग्देवी आणि अग्नि[2] तुझ्या मुखापासून झालीं आहेत. ६४ लोकपालांचे समुदाय तुझ्या बाहूंपासून झाले आहेत. तुझ्या चक्षूंपासून चंद्रसूर्य[3] झाले आहेत. दिशा आणि विदिशा तुझ्या कर्णांपासून[4] झाल्या आहेत. ६५ तुझ्या घ्राणापासून प्राण व देवश्रेष्ठ अश्विनी-कुमार जन्माला आले. तुझ्या जंघा, जानू, ऊरु, व कटिभाग यांपासून भुवर्लोक वगैरे झाले. ६६ हे हरे ! तुझ्या कुक्षीपासून चार समुद्र उत्पन्न झाले, स्तनद्वया-पासून इंद्रवरुण व रेतापासून वालखिल्य झाले. ६७ तुझ्या उपस्थांपासून[5] यम,

१. ‘ सर्व जगादिदं त्वत्तो जायते । ’—गणपत्यथर्वशीर्ष. २. ‘मुखादिंद्रश्चाग्निश्च ।’—पुरुषसूक्त. ३. ‘ चक्षोः सूर्योऽजायत ।’—पुरुषसूक्त. ४. ‘दिशः श्रोत्रात् ।’—पुरुषसूक्त. ५. जननेंद्रियापासून.

गुदान्मृत्युर्मन्यो रुद्रस्त्रिलोचनः । अस्थिभ्यः पर्वता जाताः केशेभ्यो मेघसंहतिः ॥ ६८ ॥ औषध्यस्तव रोमभ्यो नखेभ्यश्च खरादयः । त्वं विश्वरूपः पुरुषो मायाशक्तिसमन्वितः ॥ ६९ ॥ नानारूप इवाभासि गुणव्यतिकरे सति । त्वामाश्रित्यैव विबुधाः पिबंत्यमृतमध्वरे ॥ ७० ॥ त्वया सृष्टमिदं सर्वं विश्वं स्थावरजंगमम् । त्वामाश्रित्यैव जीवंति सर्वे स्थावरजंगमाः ॥ ७१ ॥ त्वद्रूक्तमखिलं वस्तु व्यवहारेऽपि राघव । क्षीरमध्यगतं सर्पिर्यथा व्याप्याखिलं पयः ॥ ७२ ॥ त्वद्भासा भासतेऽर्कादि न त्वं तेनावभाससे । सर्वगं नित्यमेकं त्वां ज्ञानचक्षुर्विलोकयेत् ॥७३॥ नाज्ञानचक्षुस्त्वां पश्येदंधदृक् भास्करं यथा । योगिनस्त्वां

गुदापासून मृत्यु व क्रोधापासून त्रिलोचन-शंकर-निर्माण झाले. अस्थीपासून पर्वत झाले व केसांपासून मेघसमुदाय उद्भवले. ६८ तुझ्या रोमांपासून औषधी व नखांपासून गर्दभादि प्राणी झाले. तूं विश्वात्मक विराट्स्वरूप असून मायाशक्तीला अंगी ठाव दिला आहेस. ६९ त्रिगुणांच्या कमीअधिक प्रमाणानें तूं नानारूपांनीं नटलेला दिसतोस. तुझाच आश्रय करून देव यज्ञांत अमृत प्राशन करीत असतात. ७० हें सर्व चराचरात्मक विश्व तूं निर्माण केलें आहेस; तुझा आश्रय करूनच सर्व स्थावरजंगम पदार्थ जीव धरितात. ७१ राघवा! व्यवहारांत देखील सर्व वस्तु त्वद्रूप आहेत. दुधामध्यें असलेलें तूप जसें दुधांत सर्वत्र व्यापून असतें, त्याचप्रमाणें ( तूं सर्वत्र ठायी व्यापून आहेस ). ७२ तुझ्याच तेजानें सूर्यादि प्रकाश पावत असतात; तूं त्यांच्या योगें प्रकाशतोस, असें नाहीं. सर्वव्यापी, नित्य, अद्वय अशा तुला ज्ञानदृष्टीचाच पुरुष पाहूं शकेल. ७३ आंधळे सूर्याला पाहूं शकत नाहींत, त्याचप्रमाणें अज्ञानदृष्टि लोक तुला ओळखत नाहीत. योगिजन (दिवसरात्र) आपल्या

१. रोम—अंगावरील बारीक केस. २. यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन । न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम् ॥ '—गीता १०. ३. 'आणि सृजिलिया भूतांतें मीचि धरीं । सकळां जीवनही मीचि अवधारीं । शेखीं सर्वांतें या संहारीं । तेव्हां मृत्युही मीचि ॥ '—ज्ञानेश्वरी १०. ४. सदृश उतारा—यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा । तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम् ॥ '—भ. गीता. १०.

विचिन्वंति स्वदेहे परमेश्वरम् ॥७४॥ अतन्निरसनमुखैर्वेदशीर्षैरहर्निशम् । त्वत्पादभक्तिलेशेन गृहीता यदि योगिनः ॥७५॥ विचिन्वंतो हि पश्यंति चिन्मात्रं त्वां न चान्यथा । मया प्रलपितं किंचित्सर्वज्ञस्य तवाग्रतः । क्षंतुमर्हसि देवेश तवानुग्रहभागहम् ॥ ७६ ॥ दिग्देशकालपरिहीनमनन्यमेकं चिन्मात्रमक्षरमजं चलनादिहीनम् । सर्वज्ञमीश्वरमनंतगुणं व्युदस्तमायं भजे रघुपतिं भजतामभिन्नम् ॥ ७७ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे उत्तरकांडे द्वितीयः सर्गः ॥ २ ॥

## उत्तरकांड, सर्ग तिसरा.

॥ श्रीराम उवाच ॥ वालिसुग्रीवयोर्जन्म श्रोतुमिच्छामि तत्त्वतः । रवींद्रौ वानराकारौ जज्ञात इति नः श्रुतम् ॥ १ ॥ अगस्त्य उवाच ॥

शरीरामध्ये तुला शोधीत असतात.७४ वेदशिरोभागीं शोभणाऱ्या उपनिषदांना 'नेति नेति' इत्यादि प्रकारच्या निरसनद्वारा केलेल्या बोधावरून ते अहर्निश तुझा शोध घेतात. त्या शोध घेणाऱ्या योग्यांच्या ठिकाणीं तुझ्याविषयी भक्तिलेश कां होईना, ७५ जर वसत असेल, तरच तुझ्या चिद्रूपाचें त्यांस दर्शन होईल, अन्यथा होणार नाही. देवेशा ! तूं सर्वज्ञ आहेस. तुझ्या अग्रभागी जी कांहीं बडबड केली, तीबद्दल तूं मला क्षमा करावी. माझ्यावर तुझी कृपादृष्टि असावी. ७६ ज्याला दिशा, देश किंवा काल यांकडून सीमा नाही, ज्याच्याहून वेगळा दुसरा कोणी नाही, जो एकीएक ज्ञानस्वरूप आहे, जो नाशरहित–शाश्वत–आहे, जो जन्मरहित आहे, ज्याला चलनादि–जाणें येणें–नाहीं, जो सर्वज्ञ आहे, जो सर्वसमर्थ आहे, ज्याचे गुणांना अंत नाही, ज्यानें माया दूर ठेविली आहे, जो भक्तांना आपल्याहून वेगळा भासत नाहीं, अशा त्या रघुपतीचें मी भजन करितों. ७७ ”

**उत्तरकांड, दुसरा सर्ग समाप्त.**

श्रीराम म्हणाला, ‘ ( मुने ! ) वाली आणि सुग्रीव यांचा जन्मवृत्तांत यथार्थ ऐकण्याची माझी इच्छा आहे. सूर्य आणि इंद्र हे वानराकार धारण करून जन्मास आले हें आम्ही ऐकिलें आहे, ती हकीगत आपण सांगावी.’ १ अगस्त्य म्हणाला

१. ( ब्रह्म ) असे नव्हे, असे नव्हे. २. सदृश उतारा–‘ अच्युतमादिमध्यातमनंत परमेश्वरम् । प्रकाशं दिव्यमानं च शाश्वतं चाचलं ध्रुवम् ॥ ’–सोहिरोबानाथ, सिद्धातसंहिता

मेरोः स्वर्णमयस्याद्रेर्मध्यशृंगे मणिप्रभे । तस्मिन्सभास्ते विस्तीर्णा ब्रह्मणः शतयोजना ॥ २ ॥ तस्यां चतुर्मुखः साक्षात्कदाचिद्योगमास्थितः । नेत्राभ्यां पतितं दिव्यमानंदसलिलं बहु ॥ ३ ॥ तद्गृहीत्वा करे ब्रह्मा ध्यात्वा किंचित्तदत्यजत् । भूमौ पतितमात्रेण तस्माज्जातो महाकपिः ॥ ४ ॥ तमाह द्रुहिणो वत्स किंचित्कालं वसात्र मे । समीपे सर्वशोभाढ्ये ततः श्रेयो भविष्यति ॥ ५ ॥ इत्युक्तो न्यवसत्तत्र ब्रह्मणा वानरोत्तमः । एवं बहुतिथे काले गते ऋक्षाधिपः सुधीः ॥ ६ ॥ कदाचित्पर्यटन्नद्रौ फलमूलार्थमुद्यतः । अपश्यद्दिव्यसलिलां वापीं मणिशिलान्विताम् ॥ ७ ॥ पानीयं पातुमागच्छत्तत्र छायामयं कपिम् । दृष्ट्वा प्रतिकपिं मत्वा निपपात जलांतरे ॥ ८ ॥ तत्रादृष्ट्वा हरिं शीघ्रं पुनरुत्प्लुत्य वानरः । अपश्यत्सुंदरीं रामामात्मानं विस्मयं गतः ॥ ९ ॥ ततः सुरेशो देवेशं पूजयित्वा चतुर्मुखम् । गच्छन्मध्याह्नसमये दृष्ट्वा नारीं मनोरमाम्

१ सुवर्णमय मेरुपर्वताचें रत्नांनीं देदीप्यमान असें एक मध्यशिखर आहे. त्यावर शंभर योजनें विस्तीर्ण अशी ब्रह्मदेवाची सभा आहे. २ त्या सभेमध्यें एके वेळीं साक्षात् ब्रह्मदेव ध्याननिष्ठ होऊन बसला होता. तेव्हां त्याच्या नेत्रांतून बरेचसे दिव्य आनंदाश्रू पडले. ३ ते हातांत घेऊन त्यानें कांहीं विचार केला व मग तें उदक त्यानें खालीं टाकिलें. भूमीवर जें उदक पडलें, त्यापासून एक मोठा कपि उत्पन्न झाला. ४ त्याला ब्रह्मदेव म्हणाला, ‘ कांहीं काल माझ्या समीप रहा. हें स्थल सर्व प्रकारच्या शोभेनें भरलेलें आहे. असें केल्यानें तुझें कल्याण होईल.’ ५ असें ( ब्रह्मदेवानें ) सांगितलें असतां तो वानरश्रेष्ठ तेथें राहिला. तेथें बराच काळ लोटल्यावर तो परम बुद्धिमान् ऋक्ष वानर-श्रेष्ठ कोणी एके वेळीं फलमूळांकरितां यत्नपूर्वक पर्वतावर फिरत असतां एक सुंदर पाण्याची विहीर त्याच्या दृष्टीस पडली. ती रत्नशिलांनीं बांधलेली होती. ६,७ तेथें तो ( वानर ) पाणी प्यावयास आला, तों ( पाण्यांत ) आपल्याच छायेनें—प्रतिबिंबानें—झालेला वानर त्याला दिसला. तो दुसरा कोणी वानर आहे, असें मानून त्यानें त्या पाण्यांत उडी घेतली. ८ त्या ठिकाणीं कपि नाहीं, असें आढळून येतांच पुनः तो उडी मारून बाहेर आला, तों आपण स्वतः सुंदर स्त्रीरूप झाल्याचें त्याला आढळून आलें ! ( तें पाहून ) त्याला आश्चर्य वाटलें. ९ पुढें सुरराज ( इंद्र ) त्या देवश्रेष्ठ ब्रह्मदेवाचें मध्याह्नसमयीं पूजन

॥ १० ॥ कंदर्पशरविद्धांगस्त्यक्तवान्वीर्यमुत्तमम् । तामप्राप्यैव तद्बीजं वालदेशेऽपतद्भुवि ॥ ११ ॥ वाली समभवत्तत्र शक्रतुल्यपराक्रमः । तस्य दत्त्वा सुरेशानः स्वर्णमालां दिवं गतः ॥ १२ ॥ भानुरप्यागतस्तत्र तदानीमेव भामिनीम् । दृष्ट्वा कामवशो भूत्वा ग्रीवादेशेऽसृजन्महत् ॥ १३ ॥ बीजं तस्यास्ततः सद्यो महाकायोऽभवद्धरिः । तस्य दत्त्वा हनूमंतं सहायार्थं गतो रविः ॥ १४ ॥ पुत्रद्वयं समादाय गत्वा सा निद्रिता क्वचित् । प्रभातेऽपश्यदात्मानं पूर्ववद्वानराकृतिम् ॥ १५ ॥ फलमूलादिभिः सार्धं पुत्राभ्यां सहितः कपिः । नत्वा चतुर्मुखस्याग्रे ऋक्षराजः स्थितः सुधीः ॥ १६ ॥ ततोऽब्रवीत्समाश्वास्य बहुशः कपिकुंजरम् । तत्रैकं देवतादूतमाहूयामरसन्निभम् ॥ १७ ॥ गच्छ दूत मयादिष्टो गृहीत्वा वानरोत्तमम । किष्किंधां दिव्यनगरीं निर्मितां विश्वकर्मणा ॥ १८ ॥ सर्वसौ-

करून जात असतां तो मनोरम स्त्री त्याच्या दृष्टीस पडला. १० तिला पाहून इंद्र कामशरपीडित झाला. स्त्रीसमागम न होतांही त्याचें उत्तम वीर्य तिच्या केशप्रदेशाला लागून खालीं जमिनीवर पडलें. ११ (त्यापासून) तेथें वाली उत्पन्न झाला. त्याचा पराक्रम इंद्रासारखा होता. त्या सुरेशानें त्या मुलाला एक सुवर्णमाला दिली, आणि तो स्वर्गाला गेला. १२ तितक्यांत सूर्यही तेथें आला. त्या स्त्रीला पाहून तोही कामवश झाला. त्यानें आपलें महाबीज तिच्या मानेवर टाकिलें. त्यापासून तिच्या पोटीं एक धिप्पाड वानर जन्माला आला. त्याच्या साहाय्यार्थ मारुतीला देऊन सूर्य तेथून निघून गेला. १३,१४ त्या दोघां पुत्रांना घेऊन ती स्त्री कोठें तरी एके ठिकाणी जाऊन निद्रित झाली. तों प्रभातसमयी आपला वानरदेह पूर्ववत् झाल्याचें तिला आढळून आलें! १५ पुढें तो महाबुद्धिमान् ऋक्षराज[1] कपि फळेंमूळें आणि आपले दोन पुत्र यांसह ब्रह्मदेवाकडे आला व त्याला नमस्कार करून (त्याजपुढें) उभा राहिला. १६ तेव्हां ब्रह्मदेवानें त्या कपिश्रेष्ठाचें अनेक प्रकारें आश्वासन केलें, आणि तेथें असलेल्या एका देवसदृश देवदूताला बोलावून त्याला तो (ब्रह्मदेव) म्हणाला, १७ 'दूता! माझ्या आज्ञेनें या वानरश्रेष्ठाला घेऊन विश्वकर्म्यानें निर्माण केलेली जी दिव्य नगरी किष्किंधा, तेथें जा. १८ ती

१. हा वानराधिपात असून 'ऋक्षराज'–अस्वलाचा राजा, असें म्हटलें आहे, त्यावरून त्याच्या हाताखालीं बरींच अस्वलें होतीं, असें अनुमान काढावें लागते.

भाग्यवलितां देवैरपि दुरासदाम् । तस्यां सिंहासने वीरं राजानमभि-
षेचय ॥ १९ ॥ सप्तद्वीपगता ये ये वानराः संति दुर्जयाः । सर्वे ते
ऋक्षराजस्य भविष्यंति वशेऽनुगाः ॥ २० ॥ यदा नारायणः साक्षा-
द्रामो भूत्वा सनातनः । भूभारासुरनाशाय संभविष्यति भूतले ॥ २१ ॥
तदा सर्वे सहायार्थे तस्य गच्छंतु वानराः । इत्युक्तो ब्रह्मणा दूतो
देवानां स महामतिः ॥ २२ ॥ यथाज्ञप्तस्तथा चक्रे ब्रह्मणा तं हरी-
श्वरम् । देवदूतस्ततो गत्वा ब्रह्मणे तन्निवेदयत् ॥ २३ ॥ तदादि वान-
राणां सा किष्किंधाऽभून्नृपाश्रयः । सर्वेश्वरस्त्वमेवासीरिदानीं ब्रह्मणा-
ऽर्थितः ॥ २४ ॥ भूमेर्भारो हृतः कृत्स्नस्त्वया लीलानृदेहिना । सर्वभू-
तांतरस्थस्य नित्यमुक्तचिदात्मनः ॥ २५ ॥ अखंडानंदरूपस्य कियानेष
पराक्रमः । तथाऽपि वर्ण्यते सद्भिर्लीलामानषरूपिणः ॥ २६ ॥ यशस्ते

नगरी सर्व ऐश्वर्यसंपन्न असून देवांना देखील ती दुष्प्राप्य आहे. ह्या वीर राजाला तेथील सिंहासनावर बसवून राज्याभिषेक करीव. १९ सप्तद्वीपां-मध्यें जे जे दुर्जय वानर आहेत, ते ते सर्व या ऋक्षराजाला वश होऊन त्याचे सेवक होतील. २० जेव्हां साक्षात् सनातन नारायण राम होऊन पृथ्वीला भारभूत झालेल्या राक्षसांच्या नाशासाठी भूतलावर येईल, २१ तेव्हां त्याच्या साहाय्याकरितां सर्व वानरांनी जावें.' असें ब्रह्मदेवानें सांगितल्यावर तो महामति देवदूत (निघाला), २२ आणि ब्रह्मदेवानें सांगितल्याप्रमाणें त्यानें त्या वानरश्रेष्ठाची व्यवस्था लाविली, आणि पुनः येऊन झालेलें सर्व वर्तमान त्यानें ब्रह्मदेवाला सांगितलें. २३ तेव्हांपासून ती किष्किंधा नगरी वानरांची राजधानी झाली. ( रामा ! ) तूंच सर्वेश्वर आहेस. सांप्रत तुझी ब्रह्मदेवानें प्रार्थना केली असल्यामुळें तूं लीलेनें मनुष्यदेह धारण करून पृथ्वीचा सर्व भार हरण केला आहेस. जो सर्व भूतांच्या हृदयांत वास करितो, जो नित्यमुक्त आहे, २४,२५ जो ज्ञानस्वरूप आहे, आणि जो अखंड आनंदरूप आहे, त्या तुला हा एवढासा पराक्रम काय होय ? ( कांहींच नाहीं. ) तरीही सर्व लोकांची पापें नाहीशीं व्हावी, आणि त्यांना सुख प्राप्त व्हावें, एवढ्याचकरितां तूं लीलेनें धारण केलेल्या मनुष्यदेहाचें साधुपुरुष वर्णन करीत असतात.

१. हीं द्वीप सात असून यातील मुख्य ' जबुद्वीप ' आहे.

सर्वलोकानां पापहत्यै सुखाय च। य इदं कीर्तयेन्मर्त्यो वालिसुग्रीवयो-
र्महत् ॥ २७ ॥ जन्म त्वदाश्रयत्वात्स मुच्यते सर्वपातकैः। अथान्यां
संप्रवक्ष्यामि कथां राम त्वदाश्रयाम् ॥ २८ ॥ सीता हृता यदर्थं सा
रावणेन दुरात्मना। पुरा कृतयुगे राम प्रजापतिसुतं विभुम् ॥ २९ ॥
सनत्कुमारमेकांते समासीनं दशाननः। विनयावनतो भूत्वा ह्यभिवाद्ये-
दमब्रवीत् ॥ ३० ॥ को न्वस्मिन्प्रवरो लोके देवानां बलवत्तरः।
देवाश्च यं समाश्रित्य युद्धे शत्रुं जयंति हि ॥ ३१ ॥ कं यजंति द्विजा
नित्यं कं ध्यायंति च योगिनः। एतन्मे शंस भगवन् प्रश्नं प्रश्न-
विदां वर ॥ ३२ ॥ ज्ञात्वा तस्य हृदिस्थं यत्तदशेषेण योगदृक्। दशा-
ननमुवाचेदं शृणु वक्ष्यामि पुत्रक ॥ ३३ ॥ भर्ता यो जगतां नित्यं यस्य
जन्मादिकं न हि। सुरासुरैर्नुतो नित्यं हरिर्नारायणोऽव्ययः॥३४॥ यन्नाभि-
पंकजाज्जातो ब्रह्मा विश्वसृजां पतिः। सृष्टं येनैव सकलं जगत्स्थावर-
जंगमम् ॥ ३५ ॥ तं समाश्रित्य विबुधा जयंति समरे रिपून्। योगिनो

(वालिसुग्रीवांना तुझाच आश्रय केल्यामुळे) जो कोणी ह्यांच्या महाजन्मकथेचें कीर्तन करील, तो सर्व पातकांपासून मुक्त होईल. २६,२७,२८ रामा! आतां आणखी एक तुझीच कथा सांगतों, की जेणेंकरून दुष्टान्तःकरणाच्या रावणानें सीतेचें हरण कां केलें (तें समजून येईल). रामा! पूर्वी कृतयुगामध्यें ब्रह्मदेवाचा (मानस) पुत्र परम-समर्थ सनत्कुमार एकांतांत बसला असतां रावणानें नम्रतापूर्वक त्याला वंदन केलें, आणि म्हटलें, २९,३० 'ज्याचा आश्रय करून देव युद्धांत शत्रूला जिंकितात, असा बलवत्तर श्रेष्ठ देव या लोकांत कोण आहे? ३१ ब्राह्मण सर्वदा कोणाची आराधना करितात? योगिजन कोणाचें ध्यान करितात? भगवन्! प्रश्नवेत्त्यामध्यें आपण श्रेष्ठ असल्यामुळें ह्या प्रश्नाचें उत्तर आपण मला सांगा.' ३२ त्या योगदृष्टि मुनीनें—सनत्कुमारानें—त्याच्या मनांतील आशय पूर्णपणें जाणून दशाननाला म्हटलें, 'पुत्रा! सांगतों, ऐक. ३३ जो जगाचें नित्य पोषण करितो, ज्याला जन्मादिक संबंध नाही, जो निर्विकार आहे त्याला 'हरि,' 'नारायण' ही नांवें आहेत. त्याची देवदैत्य सर्वदा स्तुति करितात. ३४ त्यानें हें सर्व स्थावरजंगमात्मक जगत् निर्माण केलें! तो सृष्टिकर्त्यांचा पति ब्रह्मदेव याच्याच नाभिकमलापासून झाला आहे. ३५ त्याचा आश्रय करून देव युद्धामध्यें शत्रूंला जिंकितात, आणि त्यालाच योगिजन

ध्यानयोगेन तमेवानुजपंति हि ॥ ३६ ॥ महर्षेर्वचनं श्रुत्वा प्रत्युवाच दशाननः । दैत्यदानवरक्षांसि विष्णुना निहतानि च ॥ ३७ ॥ कां वा गतिं प्रपद्यंते प्रेत्य ते मुनिपुंगव । तमुवाच मुनिश्रेष्ठो रावणं राक्षसाधिपम् ॥३८॥ देवतैर्निहता नित्यं गत्वा स्वर्गमनुत्तमम् । भोगक्षये पुनस्तस्माद्भ्रष्टा भूमौ भवंति ते ॥ ३९ ॥ पूर्वार्जितैः पुण्यपापैर्म्रियंते चोद्भवंति च । विष्णुना ये हतास्ते तु प्राप्नुवंति हरेर्गतिम् ॥ ४० ॥ श्रुत्वा मुनिमुखात्सर्वं रावणो हृष्टमानसः । योत्स्येऽहं हरिणा सार्धमिति चिंतापरोऽभवत् ॥ ४१ ॥ मनःस्थितं परिज्ञात्वा रावणस्य महामुनिः । उवाच वत्स तेऽभीष्टं भविष्यति न संशयः ॥ ४२ ॥ कंचित्कालं प्रतीक्षस्व सुखी भव दशानन । एवमुक्त्वा महाबाहो मुनिः पुनरुवाच तम् ॥४३॥ तस्य स्वरूपं वक्ष्यामि ह्यरूपस्यापि मायिनः। स्थावरेषु च सर्वेषु नदेषु च

ध्यानयोगानें चिंतीत असतात.' ३६ त्या महर्षीचें भाषण ऐकून दशानन–रावण-म्हणाला, 'हे मुनिश्रेष्ठा ! दैत्य, दानव आणि राक्षस यांचा विष्णूच्या हातून वध झाला असतां परलोकीं ते कोणत्या बरें गतीला जात असतात ?' तेव्हां त्या मुनिश्रेष्ठानें राक्षसाधिपति रावणाला सांगितलें, ३७,३८ '( इतर ) देवतांकडून नित्य मारले गेलेले ते अत्युत्तम स्वर्गाला जातात, परंतु भोगक्षयकालीं तेथून भ्रष्ट होऊन पुनः पृथ्वीवर जन्माला येतात, ३९ व पूर्वार्जित पुण्यपापांच्या योगेंकरून मरण पावतात व पुन्हां जन्माला येतात. परंतु विष्णूच्या हातून जे मारले जातात, ते विष्णूच्या पदीं पोंचतात.' ४० मुनीच्या तोंडून हें सर्व ऐकून रावणाच्या अंतःकरणाला हर्ष वाटला, आणि 'मी विष्णूबरोबर लढणार,' असें योजून त्यासंबंधीं उपाय तो शोधूं लागला. ४१ त्या महामुनीनें रावणाच्या मनांत काय आहे, हें जाणून त्याला सांगितलें, 'वत्सा ! तुझ्या इच्छेप्रमाणें घडून येईल, यांत संशय नाहीं. ४२ दशानना ! कांहीं काल वाट पाहा; तूं सुखी होशील.' महाबाहो ( रामा ) ! असें सांगून तो ( सनत्कुमार ) मुनि त्याला पुनः म्हणाला, ४३ 'तो (वस्तुतः) रूपाविहीन आहे, तरीही तो मायेच्या योगानें रूप धरीत असतो त्याचें स्वरूप मी तुला सांगतों. तो सर्व स्थावर पदार्था-

१. तधवा तयास सांगे मुनी । हरीनें वधिले समरांगणीं । ते मग त्या हरीच्याच ठिकाणीं । पावती जाऊन सुखातें ॥ परंतु आणिकीं देवीं समरीं । वधिले, ते मग स्वर्गावरी । जाऊन किंचित् काळवरी । सुखभोगातें सेविती ॥ मग भोगक्षय होतांच । भूलोकीं या येती साच । मग जन्ममृत्यु याची कांच । त्यांचिया मार्गे लागती ॥ '–अध्यात्मरामकथा.

नदीषु च ॥४४॥ आकारश्चैव सत्यं च सावित्री पृथिवी च सः । समस्त-
जगदाधारः शेषरूपधरो हि सः ॥ ४५ ॥ सर्वे देवाः समुद्राश्च कालः
सूर्यश्च चंद्रमाः । सूर्योदयो दिवारात्री यमश्चैव तथाऽनिलः ॥ ४६ ॥
अग्निरिंद्रस्तथा मृत्युः पर्जन्यो वसवस्तथा । ब्रह्मा रुद्रादयश्चैव ये चान्ये
देवदानवाः ॥ ४७ ॥ विद्योतति ज्वलत्येष पाति चात्तीति विश्वकृत् ।
क्रीडां करोत्यव्ययात्मा सोऽयं विष्णुः सनातनः ॥ ४८ ॥ तेन सर्व-
मिदं व्याप्तं त्रैलोक्यं सचराचरम् । नीलोत्पलदलश्यामो विद्युद्वर्णांबरावृतः
॥ ४९ ॥ शुद्धजांबूनदप्रख्यां श्रियं वामांकसंस्थिताम् । सदानपायिनीं
देवीं पश्यन्नालिंग्य तिष्ठति ॥ ५० ॥ द्रष्टुं न शक्यते कैश्चिद्देवदान-
वपन्नगैः । यस्य प्रसादं कुरुते स चैनं द्रष्टुमर्हति ॥ ५१ ॥ न च

मध्यें, नदामध्यें व नद्यांमध्यें व्यापून राहिला आहे, ४४ तोच ओंकार, तोच सत्य, तोच गायत्री आणि तोच पृथिवी आहे. समस्त जगतांचा आधार अशा शेष सर्पाच्या रूपानें तोच राहिला आहे. ४५ सर्व देव, समुद्र, काल, सूर्य, चंद्र, सूर्योदय, दिवसरात्री, यम, अनिल, अग्नि, इंद्र, मृत्यु, पर्जन्य, वसु, ब्रह्मा, रुद्रादिक आणि इतर देव, तसेच दैत्य हे सर्व तोच एकटा आहे. ४६,४७ तोच प्रकाशतो, पेटतो, रक्षण करितो, खातो; तो निर्विकार सनातन विष्णु हे सर्व व्यवहार क्रीडेप्रमाणें करितो. ४८ त्यानें हें सगळें स्थावरजंगमात्मक विश्व व्यापलें आहे. [1]नील कमलदलाप्रमाणें त्याची अंगकांति श्यामवर्णाची आहे. तो विद्युद्वर्णासमान वस्त्र धारण करीत असतो. ४९ त्याच्या डाव्या मांडीवर शुद्ध सुवर्णसमान तेजस्वी, नित्य निश्चल, अशी लक्ष्मी बसली आहे. तिला आलिंगन देऊन तो तिजकडे पहात असतो. ५० हा देव, दानव, सर्प इत्यादि कोणाच्याही दृष्टीस पडणें शक्य नाहीं ज्याच्यावर तो कृपा करितो, त्यालाच केवळ त्याचें दर्शन होतें. ५१

१. ' तयापरी श्रीहरी । तुझिया विश्वात्मकीं इये शरीरीं । स्वर्गु देखतसे अवधारीं । सुरगणेंसीं ॥ प्रभु महाभूतांचें पंचक । येथ देखत आहे अनेक । आणि भूतग्राम एकेक । भूतसृष्टीचे ॥ जी सत्यलोकु तुजमाजी आहे । देखिला चतुराननु हा नोहे । आणि येरीकडे जंव पाहें । तंव कैलासुही दिसे ॥ किंबहुना त्रैलोक्यपती । तुझिया एकेकाचि अवयवाचिये भिंती । इयें चतुर्दशभुवनें चित्राकृती । अकुरलीं जाणों ॥ '—ज्ञानेश्वरी ११. २. ' वामांकारूढ–सीतामुखकमलमिलल्लोचनं नीरदाभम् । '—रामरक्षा.

यज्ञतपोभिर्वा न दानाध्ययनादिभिः । शक्यते भगवान्द्रष्टुमुपायैरितरैरपि
॥ ५२ ॥ तद्भक्तैस्तद्गतप्राणैस्तच्चित्तैर्धूतकल्मषैः । शक्यते भगवान्विष्णु-
र्वेदांतामलदृष्टिभिः ॥ ५३ ॥ अथवा द्रष्टुमिच्छा ते शृणु त्वं परमेश्वरम् ।
त्रेतायुगे स देवेशो भविता नृपविग्रहः ॥ ५४ ॥ हितार्थं देवमर्त्याना-
मिक्ष्वाकूणां कुले हरिः । रामो दाशरथिर्भूत्वा महासत्त्वपराक्रमः ॥५५॥
पितुर्नियोगात्स भ्रात्रा भार्यया दंडके वने । विचरिष्यति धर्मात्मा
जगन्मात्रा स्वमायया ॥ ५६ ॥ एवं ते सर्वमाख्यातं मया रावण
विस्तरात् । भजस्व भक्तिभावेन सदा रामं श्रिया युतम् ॥ ५७ ॥
एवं श्रुत्वाऽसुराध्यक्षो ध्यात्वा किंचिद्विचार्य च । त्वया सह
विरोधेप्सुर्मुमुदे रावणो महान् ॥ ५८ ॥ युद्धार्थी सर्वतो लोकान्
पर्यटन् समवस्थितः । एतदर्थं महाराज रावणोऽतीव बुद्धिमान् । हतवान्

त्याचें दर्शन यज्ञांनी किंवा तपांनी होत नाही, दानानें किंवा अध्ययनादिकांनी होत नाहीं, दुसऱ्या कोणत्याही उपायांनी होणें शक्य नाही. ५२ परंतु जे त्याचे भक्त आहेत, ज्यांनी आपले प्राण आणि आपली चित्तवृत्ति त्याच्या ठिकाणी लावून आपली पापें नाहीशी केली आहेत, त्यांना वेदांतरूप निर्मल दृष्टि प्राप्त होऊन भगवंताचें दर्शन शक्य होत असतें. ५३ अथवा या परमेश्वराचें दर्शन प्राप्त व्हावें, अशी तुझी इच्छा असल्यास ऐक. त्रेतायुगामध्यें तो देवेश राजशरीर धारण करून ( अवतीर्ण होणार आहे ). ५४ देवांचें आणि मनुष्यांचें कल्याण करण्यासाठी श्रीहरि इक्ष्वाकुकुलामध्यें महाबलाढ्य व अत्यंत पराक्रमी असा दाशरथि राम होणार आहे. ५५ पित्याच्या आज्ञेनें तो धर्मात्मा, बंधु आणि जगन्माता व ईश्वरमाया अशी जी ( सीता ) भार्या तीसह दंडकारण्यांत फिरेल. ५६ रावणा ! अशा रीतीनें तुला मी सर्व विस्तारानें सांगितलें आहे. तर मग भक्तिभावानें सीतेसह रामाला भज.' ५७ हें ऐकून त्या राक्षसराजानें कांहीं चिंतन केलें. मग विचार करून 'तुझ्याबरोबर विरोधच करावयाचा,' असा निश्चय ठरून त्या पराक्रमी रावणाला परमानंद झाला. ५८ तुझ्याशीं युद्ध करण्याची इच्छा धारण करून तो सर्वत्र फिरला. महाराजा रामा ! ह्याच उद्देशानें तुझ्या हातीं वध व्हावा, म्हणून

१. सूर्यवंशी राजाचा मूळ पुरुष. २. दशरथ राजाच्या.

जानकीं देवीं त्वयात्मवधकांक्षया ॥ ५९ ॥ इमां कथां यः शृणुयात्पठेद्वा संश्रावयेद्वा श्रवणार्थिनां सदा । आयुष्यमारोग्यमनंतसौख्यं प्राप्नोति लाभं धनमक्षयं च ॥ ६० ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वर-संवादे उत्तरकांडे तृतीयः सर्गः ॥ ३ ॥

## उत्तरकांड, सर्ग चवथा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ एकदा ब्रह्मणो लोकादायांतं नारदं मुनिम् । पर्यटन् रावणो लोकान्दृष्ट्वा नत्वाब्रवीद्वचः ॥ १ ॥ भगवन्ब्रूहि मे योद्धुं कुत्र संति महाबलाः । योद्धुमिच्छामि बलिभिस्त्वं ज्ञातासि जगत्त्रयम् ॥ २ ॥ मुनिर्ध्यात्वाह सुचिरं श्वेतद्वीपनिवासिनः । महाबला महाकायास्तत्र याहि महामते ॥ ३ ॥ विष्णुपूजारता ये वै विष्णुना

त्या अतिबुद्धिमान् रावणानें जानकी देवीचें हरण केलें. ५९ जो कोणी ही कथा ऐकेल, पठण करील, अगर श्रवण करण्याची इच्छा करणाऱ्यांना सदा ऐकवील, त्याला आयुष्य, आरोग्य, अपरिमित सौख्य, ( सर्वत्र ) लाभ, आणि अक्षय धन, यांची प्राप्ति होईल. ६० ”

**उत्तरकांड, तिसरा सर्ग समाप्त.**

महादेव म्हणाला, “एकदां रावण लोकांत फिरत असतां, ब्रह्मलोकांतून नारद मुनि येत आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्यानें ( मुनीला ) नमस्कार केला, आणि म्हटलें, १ ‘ भगवन् ! त्रिभुवनांतील सर्व कांहीं आपल्याला विदित आहे. तरी युद्ध करण्यालायक असे अतिबलाढ्य ( वीर ) कोठें आहेत, तें मला सांगा. बलिष्ठांशीं युद्ध करावें, अशी माझी इच्छा आहे. ’ २ मुनीनें बराच वेळ विचार केला, आणि म्हटलें, ‘ महामते ( रावणा ) ! श्वेतद्वीपांत राहणारे लोक अत्यंत बलवान् असून शरीरानेंही धिप्पाड आहेत. तूं तेथें जा. ३ ( पूर्वी ) विष्णुपुज-

१. सदृश वर्णनः—‘ इमं स्तवं नित्यमनन्यभक्त्या शृण्वंति गायंति लिखंति ये वै। ते सर्व-सौख्यं परमं च लब्ध्वा भवत्पदं यांतु तव प्रसादात् ॥ ’–रामस्तोत्र.

निहताश्च ये । त एव तत्र संजाता अजेयाश्च सुरासुरैः ॥ ४ ॥ श्रुत्वा
तद्रावणो वेगान्मंत्रिभिः पुष्पकेण तान् । योद्धुकामः समागत्य श्वेतद्वीप-
समीपतः ॥ ५ ॥ तत्प्रभाहततेजस्कं पुष्पकं नाचलत्ततः । त्यक्त्वा
विमानं प्रययौ मंत्रिणश्च दशाननः ॥ ६ ॥ प्रविशन्नेष तद्द्वीपं धृतो हस्तेन
योषिता । पृष्टश्च त्वं कुतः कोऽसि प्रेषितः केन वा वद ॥ ७ ॥ इत्युक्तो
लीलया स्त्रीभिर्हसंतीभिः पुनः पुनः । कृच्छ्राद्धस्ताद्विनिर्मुक्तस्तासां
स्त्रीणां दशाननः ॥ ८ ॥ आश्चर्यमतुलं लब्ध्वा चिंतयामास दुर्मतिः ।
विष्णुना निहतो यामि वैकुंठमिति निश्चितः ॥ ९ ॥ मयि विष्णुर्यथा
कुप्येत्तथा कार्यं करोम्यहम् । इति निश्चित्य वैदेहीं जहार विपिनेऽसुरः
॥ १० ॥ जानन्नेव परात्मानं स जहारावनीसुतां । मातृवत्पालयामास

नांत सर्वदा रममाण असणारे, अगर विष्णूच्या हातीं वध पावलेले, असेच तेथें जन्म पावले असून ते सुरासुरांना देखील अजिंक्य आहेत.' ४ हें ऐकून तो रावण मंत्र्यांसह पुष्पक विमानांत बसला, व लागलाच त्या( विष्णुभक्तां )शीं लढण्याची इच्छा धारण करून श्वेतद्वीपाजवळ आला. ५ त्या ठिकाणच्या प्रभेनें पुष्पक विमानाच तेज नष्ट होऊन तें पुढें चालेनासें झालें. त्यामुळें मंत्र्यांना आणि विमानाला तेथेंच सोडून ( रावण ) पुढें चालला. ६ त्या द्वीपांत त्यानें प्रवेश केला, तोंच एका स्त्रीनें त्याला हातीं धरिलें आणि विचारिलें, 'तूं कुठून आलास ? तूं कोण आहेस ? तुला कोणी पाठविलें, बोल.' ७ ( असें ) अनेक स्त्रियांनीं त्याला विचारिलें, आणि पुनः पुनः हंसून त्याची चेष्टा केली. त्या स्त्रियांच्या हातून तो दशानन ( रावण ) मोठ्या कष्टानें सुटला. ८ त्याला पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें. मग त्या दुष्टानें मनांत आणिलें, 'विष्णूच्या हातीं मरण पावून मी वैकुंठाला जावें.' आणि तसा त्यानें आपला निश्चयही केला. ९ 'जेणेंकरून मजवर विष्णु कोपेल, असें कांहींतरी कर्म केलें पाहिजे,' असा निश्चय त्या असुरानें केला, आणि जानकीला अरण्यांतून हरण करून नेलें. १० तूं परात्मा आहेस, हें जाणूनच त्यानें भूमि-सुतेचें–जानकीचें–हरण केलें. तुझ्या हातून आपला वध व्हावा, एवढ्याच त्याची

१. विष्णुपुराणात भारतवर्ष नऊ द्वीपें मिळून बनल्याचा उल्लेख आहे. त्यापैकीं हें एक द्वीप असावें. श्वेतद्वीपाची बरोबर माहिती मिळत नाहीं.

त्वत्तः कांक्षन्वधं स्वकम् ॥ ११ ॥ राम त्वं परमेश्वरोऽसि सकलं जानासि विज्ञानदृक् भूतं भव्यमिदं त्रिकालकलनासाक्षी विकल्पोज्झितः। भक्तानामनुवर्तनाय सकलां कुर्वन् क्रियासंहतिं त्वाशृण्वन्मनुजाकृतिर्मुनिवचो भासीश लोकार्चितः ॥ १२ ॥ स्तुत्वैवं राघवं तेन पूजितः कुंभसंभवः। स्वाश्रमं मुनिभिः सार्धं प्रययौ हृष्टमानसः ॥ १३ ॥ रामस्तु सीतया सार्धं भ्रातृभिः सह मंत्रिभिः। संसारीव रमानाथो रममाणोऽवसद्गृहे ॥ १४ ॥ अनासक्तोऽपि विषयान्बुभुजे प्रियया सह। हनुमत्प्रमुखैः सद्भिर्वानरैः परिवेष्टितः ॥ १५ ॥ पुष्पकं चागमद्राममेकदा पूर्ववत्प्रभुम्। प्राह देव कुबेरेण प्रेषितं त्वामहं ततः ॥ १६ ॥ जितं त्वं रावणेनादौ पश्चाद्रामेण निर्जितम्। अतस्त्वं राघवं नित्यं वह यावद्-

इच्छा होता. त्यानें जानकीचें मातृवत् पालन केलें ११ रामा! तूं परमेश्वर आहेस. तूं सकल जाणतोस. तूं विज्ञानदृष्टि असल्याकारणानें भूत, भविष्य, वर्तमान या तिन्ही कालीं होणाऱ्या गोष्टींचा तूं साक्षी आहेस. तूं सर्व विकल्पांपासून दूर आहेस. भक्तांच्या अनुरंजनाकरितां मनुष्यरूप धारण करून तूं अनेक कर्मे करितोस. सकल लोक ज्याची पूजा करितात, तो तूं मुनींचें—माझें—भाषण ऐकत बसला आहेस. त्यामुळें तूं विशेषच शोभत आहेस.'[1] १२ अशी अगस्त्यानें रामाची स्तुति केल्यावर रामानें त्याची पूजा केली. नतर आनंदित अंतःकरणानें मुनीसहवर्तमान तो आपल्या आश्रमाला गेला. १३ इकडे तो रमानाथ राम सीता, भाऊ आणि मंत्रिजन यांसह एकाद्या संसारी पुरुषाप्रमाणें आपल्या गृहामध्यें आनंद करीत राहिला. १४ विषयांवर अनासक्त असूनही तो प्रियेसह विषयांचा भोग घेत असे. हनुमंत वगैरे श्रेष्ठ वानर त्याच्या सभोंवती सदा असत. १५ एकदां पुष्पक विमान पूर्वीप्रमाणें प्रभु रामाकडे येऊन त्याला म्हणालें, 'देवा! कुबेरानें ( मी तेथें गेल्यावर ) तेथून मला परत तुजकडे पाठविलें आहे. १६ त्यानें सांगितलें की, 'तुला प्रथमतः ( मजकडून ) रावणानें जिंकिलें, नंतर रामानें त्याजपासून जिंकून तुला घेतलें. म्हणून राम पृथ्वीवर वसेल, तोंपर्यंत त्यालाच

१. 'राघवा! तूंचि परमेश्वर। जाणसी भूतभविष्यसार। सर्व विकल्पापासून दूर। विज्ञानमूर्ति हरी तूं॥ भक्तजनांच्या बोधासाठीं। कर्मे तूं करिसी हें जगजेठी। मजकरवीं या ऐकसी गोष्टी। मनुष्यभावानुसारें॥'—अध्यात्मसार.

सेद्भुवि ॥ १७ ॥ यदा गच्छेद्रघुश्रेष्ठो वैकुंठं याहि मां तदा । तच्छ्रुत्वा राघवः प्राह पुष्पकं सूर्यसन्निभम् ॥ १८ ॥ यदा स्मरामि भद्रं ते तदागच्छ ममांतिकम् । तिष्ठांतर्धाय सर्वत्र गच्छेदानीं ममाज्ञया ॥ १९ ॥ इत्युक्त्वा रामचंद्रोऽपि पौरकार्याणि सर्वशः । भ्रातृभिर्मंत्रिभिः सार्धं यथान्यायं चकार सः ॥ २० ॥ राघवे शासति भुवं लोकनाथे रमापतौ । वसुधा सस्यसंपन्ना फलवंतश्च भूरुहाः ॥ २१ ॥ जना धर्मपराः सर्वे पतिभक्तिपराः स्त्रियः । नापश्यत्पुत्रमरणं कश्चिद्राजनि राघवे ॥ २२ ॥ समारुह्य विमानाग्र्यं राघवः सीतया सह । वानरैर्भ्रातृभिः सार्धं संचचारावनिं प्रभुः ॥ २३ ॥ अमानुषाणि कार्याणि चकार बहुशो भुवि । ब्राह्मणस्य सुतं दृष्ट्वा बालं मृतमकालतः ॥ २४ ॥ शोचंतं ब्राह्मणं चापि ज्ञात्वा रामो महामतिः । तपस्यंतं वने शूद्रं हत्वा ब्राह्मणबालकम्

तूं वहा. १७ जेव्हां रघुश्रेष्ठ वैकुंठाला जाईल, तेव्हां तूं मजकडे ये.' तें ऐकून सूर्यासारख्या त्या पुष्पक( विमाना )ला राम म्हणाला, १८ 'तुझें कल्याण असो. जेव्हां मी तुझें स्मरण करीन, तेव्हां तूं मजजवळ यावें. तूं सर्वत्र गुप्त होऊन रहावें, आतां जा, अशी माझी तुला आज्ञा आहे.' १९ असें म्हणून तो राम, भाऊ आणि मंत्री यांच्या साह्यानें सर्व पौरकार्यें यथान्याय करूं लागला. २० लोकनाथ रमापति राम पृथ्वीतलावर राज्य करीत असतां पृथ्वी सर्व प्रकारच्या धान्यांनी संपन्न असे. वृक्ष फळांनीं लगटलेले असत. २१ सर्व लोक नित्य स्वधर्मतत्पर असत. स्त्रिया पतिसेवेंत दक्ष असत. श्रीराम राजा असतां पुत्रमरण कोणीही पाहिलें नाही. २२ त्या श्रेष्ठ विमानांत आरूढ होऊन प्रभु राम सीता, वानर, आणि भाऊ यांना बरोबर घेऊन पृथ्वीवर संचार करीत असे. २३ त्या ( श्रीरामा )नें पृथ्वीवर अनेक अमानुष कार्यें केलीं. ( एकदां ) एक ब्राह्मणाचा मुलगा अकालीं मृत झाल्याचें व ब्राह्मण–त्याचा पिता–शोक करीत असल्याचें त्याच्या दृष्टीला आलें. त्यावरून त्या महाबुद्धिमान् रामानें कोणी शूद्र[1] वनांत तप करीत असल्याचें जाणून त्याचा–त्या शूद्राचा–वध केला. आणि त्या ब्राह्मणबालकाला जिवंत केलें.

१. हा तप करणारा शूद्र शबूक नावाचा होता. शूद्राला तपाचा अधिकार नसता त्यानें तप केले, त्यामुळें अधर्म होऊन ब्राह्मणपुत्र अकालीं मेला म्हणून रामानें त्याचा वध केला, व मृत ब्राह्मणपुत्राला सजीव केले, अशी कथा आहे.

॥ २५ ॥ जीवयामास शूद्रस्य ददौ स्वर्गमनुत्तमम् । लोकानामुपदेशार्थं परमात्मा रघूत्तमः ॥ २६ ॥ कोटिशः स्थापयामास शिवलिंगानि सर्वशः । सीतां च रमयामास सर्वभोगैरमानुषैः ॥ २७ ॥ शशास रामो धर्मेण राज्यं परमधर्मवित् । कथां संस्थापयामास सर्वलोकमलापहाम् ॥ २८ ॥ दशवर्षसहस्राणि मायामानुषविग्रहः । चकार राज्यं विधिवल्लोकवंद्यपदांबुजः ॥ २९ ॥ एकपत्नीव्रतो रामो राजर्षिः सर्वदा शुचिः । गृहमेधीयमखिलमाचरन् शिक्षयन् जनान् ॥ ३० ॥ सीता प्रेम्णाऽनुवृत्त्या च प्रश्रयेण दमेन च । भर्तुर्मनोहरा साध्वी भावज्ञा सा ह्रिया भिया ॥ ३१ ॥ एकदाऽऽक्रीडविपिने सर्वभोगसमन्विते । एकांते दिव्यभवने सुखासीनं रघूत्तमम् ॥ ३२ ॥ नीलमाणिक्यसंकाशं दिव्याभरणभूषितम् । प्रसन्नवदनं शांतं विद्युत्पुंजनिभांबरम् ॥ ३३ ॥ सीता

व त्या शूद्रालाहा उत्तमोत्तम स्वर्गप्राप्ति करून दिली. लोकांना उपदेश करण्याकरितां—सन्मार्ग दाखविण्याकरितां—त्या परमात्म्या रघूत्तमानें सर्वत्र कोट्यवधि शिवलिंगांची स्थापना केली. सर्व प्रकारच्या दिव्य भोगांनी तो सीतेला रमवीत असे. २४, २५, २६, २७ त्या परम धर्मज्ञ रामानें धर्माला अनुसरून राज्य चालविलें, आणि सर्व लोकांची पापें दूर होतील, अशी पवित्र कथा—कीर्ति—चिरस्थायी करून ठेविली. २८ ज्याच्या चरणकमलाला त्रैलोक्य वंदन करितें, अशा त्या मायामानुषदेहधारी रामचंद्रानें दहा हजार[1] वर्षेपर्यंत यथान्याय राज्य केलें. २९ राजर्षि राम एकपत्नीव्रत असून त्याचें आचरण अत्यंत शुद्ध होतें. गृहस्थाश्रमांतील सर्व धर्म तो स्वतः आचरीत असून जनांनाही उत्तम शिक्षण देत असे. ३० सीता आपल्या अंगच्या प्रेमानें, सेवेनें, नम्रतेनें, इंद्रियनिग्रहानें, लज्जेनें, आणि भीतीनें पतीचें मन हरण करीत असे. ती पतीचा अभिप्राय तेव्हांच ओळखीत असे. ३१ एकदां सर्व उपभोगसाहित्यांनीं संपन्न अशा क्रीडोद्यानांतील दिव्य मंदिरांत एकांतस्थानीं सुखासनीं राम बसला होता. ३२ त्याची अंगकांति नीलवर्ण माणिक्याप्रमाणें होती. अंगावर दिव्य अलंकार शोभत होते. त्याचें मुख प्रसन्न असून मूर्ति शांत दिसत होती. विद्युत्पुंजच की काय, असें तेजःपुंज वस्त्र—पीतांबर—त्यानें परिधान केलें होतें. ३३ सीतेचे

१. ‘ प्रभु अयुतहायनं तो राज्य करी भूमिनंदिनीसहित । महितचरित्रें त्याच्या लाभे अत्यंत मेदिनीस हित ॥ ’—मोरोपंत, मंत्ररामायण.

कमलपत्राक्षी सर्वाभरणभूषिता । राममाह कराभ्यां सा लालयंती पदांबुजे ॥ ३४ ॥ देवदेव जगन्नाथ परमात्मन्सनातन । चिदानंदादिमध्यांतरहिताशेषकारण ॥ ३५ ॥ देवदेवाः समासाद्य मामेकांतेऽब्रुवन्वचः । बहुशोऽर्थयमानास्ते वैकुंठागमनं प्रति ॥ ३६ ॥ त्वया समेतश्चिच्छक्त्या रामस्तिष्ठति भूतले । विसृज्यास्मान्स्वकं धाम वैकुंठं च सनातनम् ॥ ३७ ॥ आस्ते त्वया जगद्धात्रि रामः कमललोचनः । अग्रतो याहि वैकुंठं त्वं तथा चेद्रघूत्तमः ॥ ३८ ॥ आगमिष्यति वैकुंठं सनाथान्नः करिष्यति । इति विज्ञापिताहं तैर्मया विज्ञापितो भवान् ॥ ३९ ॥ यद्युक्तं तत्कुरुष्वाद्य नाहमाज्ञापये प्रभो । सीतायास्तद्वचः श्रुत्वा रामो ध्यात्वाऽब्रवीत्क्षणम् ॥४०॥ देवि जानामि सकलं तत्रोपायं वदामि ते । कल्पयित्वामिषं देवि लोकवादं त्वदाश्रयम् ॥४१॥

नेत्र कमलपत्रांसमान असून तिनें सर्व अलंकार शरीरावर धारण केले होते. ती रामाचें चरणकमलयुगल हातांनी चुरीत असतां त्याला म्हणाली, ३४ ‘ ( रामा ! ) तूं देवाधिदेव आहेस, तूं जगतांचा नाथ आहेस, तूं सनातन परमात्मा आहेस, तूं ज्ञानानंदरूप आहेस, तूं आदिमध्यांतरहित आहेस, तूं सर्व जगताचें कारण आहेस. ३५ ( इंद्रादिक ) देवश्रेष्ठ मला एकांती भेटून त्यांनीं अनेक प्रकारें विनंति करून मला असें सांगितलें आहे कीं, ‘ आपण ( दोघांनीं ) वैकुंठाला यावें. ३६ ( देवि ! ) तूं चिच्छक्ति असून तुजसह राम आम्हांला आणि आपलें सनातन निवासस्थान जें वैकुंठ, त्याला सोडून भूतलावर राहिला आहे. ३७ हे जगन्माते ! तुझ्यामुळेंच कमलनयन श्रीराम येथें राहात आहे. तूं पुढें वैकुंठाला चल, कीं मग रघूत्तम राम वैकुंठाला येऊन आम्हांला सनाथ करील.’ अशी त्यांनीं माझी प्रार्थना केली, व मीं तें त्यांचें म्हणणें विज्ञापनापूर्वक आपल्या कानीं घातलें आहे. ३८,३९ आतां आपणाला जें योग्य वाटत असेल, तें आपण करावें. प्रभो ! मी आपणाला आज्ञा करित्यें, असें आपण समजूं नये ? ’ सीतेचें तें भाषण रामानें ऐकिल्यावर त्यानें क्षणभर विचार केला, आणि म्हटलें, ४० ‘ देवि ! मला सर्व ठाऊक आहे. ह्याविषयीं उपायही मी तुला सांगतों. देवि ! तुझ्या संबंधी कांहीं लोकापवाद उत्पन्न झाला आहे, असें मिष करून, ४१

१. ‘ भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते ! ॥’—भ. गीता १०.

त्यजामि त्वां वने लोकवादाद्भीत इवापरः । भविष्यतः कुमारौ द्वौ वाल्मीकेराश्रमांतिके ॥ ४२ ॥ इदानीं दृश्यते गर्भः पुनरागत्य मेंऽतिकम् । लोकानां प्रत्ययार्थं त्वं कृत्वा शपथमादरात् ॥ ४३ ॥ भूमेर्विवरमात्रेण वैकुंठं यास्यसि द्रुतम् । पश्चादहं गमिष्यामि एष एव सुनिश्चयः ॥ ४४ ॥ इत्युक्त्वा तां विसृज्याथ रामो ज्ञानैकलक्षणः । मंत्रिभिर्मंत्रतत्त्वज्ञैर्बलमुख्यैश्च संवृतः ॥ ४५ ॥ तत्रोपविष्टं श्रीरामं सुहृदः पर्युपासत । हास्यप्रौढकथासुज्ञा हासयंतः स्थिता हरिम् ॥ ४६ ॥ कथाप्रसंगात्पप्रच्छ रामो विजयनामकम् । पौरा जानपदा मे किं वदंतीह शुभाशुभम् ॥ ४७ ॥ सीतां वा मातरं वा मे भ्रातॄन्वा कैकयीमथ । न भेतव्यं त्वया ब्रूहि शापितोऽसि ममोपरि ॥ ४८ ॥ इत्युक्तः प्राह

त्या लोकापवादाच्या भीतीनें एकाद्या सामान्य मनुष्याप्रमाणें मी तुला वनांत नेऊन टाकतों. तेथें वाल्मीकी( मुनी )च्या आश्रमाजवळ तुला दोन मुलगे होतील. ४२ सांप्रत तूं गर्भवती असल्याचें दिसून येत आहे. पुढें तू पुनः मजजवळ येशील, आणि लोकांचा विश्वास पटावा, म्हणून तूं आदरपूर्वक शपथ वाहशील. ४३ नंतर भूमीच्या उदरांत प्रवेश करून त्या द्वारें वैकुंठाला लवकर जाशील. तुझ्या पाठीमागून मीही येईन. हाच माझा पक्का निश्चय होय ' ४४ असें बोलून त्या ज्ञानैकरूप रामानें सीतेला पाठवून दिलें. पुढें एकदां प्रधान, गूढमंत्रज्ञ, आणि सेनापति यांसह राम सभेंत बसला होता. ४५ तेथें श्रीराम बसला असतां, अनेक मित्र त्याचें रंजन करीत होते. कोणी विनोदांच्या गोष्टीत, तर कोणी प्रौढ कथा सांगण्यांत, कुशल होते. आपापल्या ( विनोदादि ) कथांनी त्या रामरूप हरीला हांसवीत ते सभोंवती बसले होते. ४६ बोलतां बोलतां विजयनामक एका( दूता )ला रामानें विचारिलें, ' नगरवासी अगर देशवासी लोक मजसंबंधी बरेंवाईट काय बरें बोलत असतात ? ४७ तसेंच सीता, माता कौसल्या, माझे बंधु, अगर कैकेयी, यांजसंबंधी ते काय म्हणतात ? तुला भिण्याची जरूरी नाहीं. तुला माझी शपथ आहे. सांग ( काय म्हणतात तें ). ' ४८ असें रामानें सांगितलें असतां, विजय

१. ' तत्रोपविष्ट राजानमुपासते विचक्षणाः । कथयंतः कथा नानाहास्यकाराः समततः ॥ विजयो मधुमंत्रश्च कश्यपो मंगलाकुलः । पुराजित्कालियो भद्रो दंतवक्रः सुमागधः ॥'—भा. रामायण, उत्तरकांड ४३.

विजयो देव सर्वे वदंति ते । कृतं सुदुष्करं सर्वं रामेण विदितात्मना ॥ ४९ ॥ किंतु हत्वा दशग्रीवं सीतामाहृत्य राघवः । अमर्षं पृष्ठतः कृत्वा स्वं वेश्म प्रत्यपादयत् ॥ ५० ॥ कीदृशं हृदये तस्य सीतासंभोगजं सुखम् । या हृता विजनेऽरण्ये रावणेन दुरात्मना ॥ ५१ ॥ अस्माकमपि दुष्कर्म योषितां मर्षणं भवेत् । यादृशो भवति वै राजा तादृश्यो नियतं प्रजाः ॥ ५२ ॥ श्रुत्वा तद्वचनं रामः स्वजनान्पर्यपृच्छत । तेऽपि नत्वाऽब्रुवन् राममेवमेतन्न संशयः ॥ ५३ ॥ ततो विसृज्य सचिवान्विजयं सुहृदस्तथा । आहूय लक्ष्मणं रामो वचनं चेदमब्रवीत् ॥ ५४ ॥ लोकापवादस्तु महान्सीतामाश्रित्य मेऽभवत् । सीतां प्रातः समानीय वाल्मीकेराश्रमांतिके ॥ ५५ ॥ त्यक्त्वा शीघ्रं रथेन त्वं

म्हणाला, 'देवा ! ते सर्व असे म्हणतात की, आत्मज्ञानसंपन्न रामानें फार दुष्कर कर्म हातीं घेऊन तें सर्व समाप्तीला नेलें. ४९ परंतु दशग्रीवा ( रावणा )चा वध केल्यावर रामानें सीतेला घेऊन आणि क्रोधाकडे पाठ फिरवून–कांहींएक संशय न घेतां–तिला घरात आणिलें ! ५० ( अशा ) सीतेच्या समागमसुखापासून त्याच्या मनाला कसलें सुख मिळणार ? दुष्ट रावणानें कोणाचीही जाग नाही, अशा अरण्यांत तिला चोरून नेलें ! ( आणि राम तिला खुशाल घरांत घेतो ! ) ५१ आतां आमच्या बायकांनीं कांहीं दुष्कर्म केल्यास आम्हांला देखील तें सहन करावें लागेल. ज्या प्रकारचा राजा असेल, तशाच प्रकारच्या प्रजा होतात.' ५२ तें भाषण ऐकून रामानें आपल्या आप्तजनांकडे त्यासंबंधी चौकशी केली असतां, त्यांनी प्रणामपूर्वक रामाला सांगितलें कीं, 'असेंच तें (लोकांचें म्हणणें) आहे, यांत कांहीं संशय नाही.' ५३ नंतर सचिवांना, त्या विजयाला आणि आप्तजनांना निरोप देऊन रामानें लक्ष्मणाला बोलाविलें, आणि सांगितलें, ५४ 'लक्ष्मणा ! सीतेच्या संबंधानें माझ्यावर मोठाच लोकापवाद आला आहे; तरी प्रभातकालीं सीतेला वाल्मीकीच्या आश्रमाजवळ घेऊन जा. ५५ आणि तेथें तिला सोडन देऊन रथांत बसन

१. सदृश वर्णनः–'वधिले रावण कुंभकर्ण । राज्यीं स्थापिला विभीषण । सीता सोडवोनी अयोध्ये गमन । प्रतापें पूर्ण तुम्ही ॥ ऐशा तुमच्या कीर्तीसी । रावणें कळक लाविला हरून सीतेसी । तिसी न पुसता गृहीं कैसी । एकाएकीं घातली ॥ आमच्या स्त्रिया ऐसें करिती । उचकर्णे सीतेचे आम्हा देती । याकारणें लोक ऐसें बोलती । श्रीरघुपते सत्य जाण ॥'– भा. रामायण, उत्तरकांड ४३.

पुनरायाहि लक्ष्मण । वक्ष्यसे यदि वा किंचित्तदा मां हतवानसि ॥५६॥
इत्युक्तो लक्ष्मणो भीत्या प्रातरुत्थाय जानकीम् । सुमंत्रेण रथे कृत्वा
जगाम सहसा वनम् ॥ ५७ ॥ वाल्मीकेराश्रमस्यांते त्यक्त्वा सीतामु-
वाच सः । लोकापवादभीत्या त्वां त्यक्तवान् राघवो वने ॥ ५८ ॥
दोषो न कश्चिन्मे मातर्गच्छाश्रमपदं मुनेः । इत्युक्त्वा लक्ष्मणः शीघ्रं
गतवान् रामसन्निधिम् ॥ ५९ ॥ सीताऽपि दुःखसंतप्ता विललापाति-
मुग्धवत् । शिष्यैः श्रुत्वा च वाल्मीकिः सीतां ज्ञात्वा स दिव्यदृक् ॥६०॥
अर्घ्यादिभिः पूजयित्वा समाश्वास्य च जानकीम् । ज्ञात्वा भविष्यं सक-
लमार्पयन्मुनियोषिताम् ॥ ६१ ॥ तास्तां संपूजयंति स्म सीतां भक्त्या
दिने दिने । ज्ञात्वा परात्मनो लक्ष्मीं मुनिवाक्येन योषितः । सेवां चक्रुः
सदा तस्या विनयादिभिरादरात ॥६२॥ रामोऽपि सीतारहितः परात्मा

पुनः लवकर ये. यासंबंधी मला कांहीं बोलशील, तर तें माझे तुझ्या हातीं मरण होईल, असें समज'. ५६ इतकें सांगितल्यावर लक्ष्मण भिऊन गेला. तो प्रभात-कालीं उठला, आणि सुमंत्राच्या साह्यानें जानकीला रथांत बसवून एकदम अरण्यांत गेला. ५७ वाल्मीकीच्या आश्रमाजवळ सीतेला सोडून तो तिला म्हणाला, 'राघ-वानें लोकापवादभीतीस्तव तुला वनांत टाकिलें. ५८ माते ! यांत माझा कोण-त्याही प्रकारें दोष नाहीं. आतां तूं मुनीच्या आश्रमस्थानी जा.' असें बोलून लक्ष्मण तावडतोब तेथून निघून रामाकडे आला. ५९ सीता देखील अत्यंत दुःखसंतप्त होऊन वेड्यासारखी रडूं लागली. शिष्यांच्या तोंडून ( तिची हकीगत ) ऐकतांच दिव्य दृष्टीनें ती स्त्री सीता आहे, असें जाणून, ६० अर्घ्यादिक उपचारांनी त्यानें जानकीचें पूजन केलें, आणि तिला आश्वासन दिलें. पुढें काय होणार, हें सगळें त्याला कळलें होतें, म्हणून त्यानें तिला मुनिपत्न्यांच्या स्वाधीन केलें. ६१ मुनीच्या ( वाल्मीकीच्या सांगण्यावरून ) त्या स्त्रिया प्रत्येक दिवशीं भक्तिपूर्वक तिची पूजा करीत असत. सीता म्हणजे प्रत्यक्ष परमात्म्याची लक्ष्मीच होय, असें जाणून त्या मोठ्या आदरानें आणि नम्रतादि गुणांनीं तिची सेवा करीत असत. ६२

१. 'गुर्वाज्ञाभंगभयत्रस्तसुमित्रासुते धरा-कन्या । वाल्मीक्याश्रमविपिनीं नेउनिया टाकिली जशी वन्या ॥ 'अपवादभये जननि ! त्यजिले तुजला जगन्निवासानें' । ऐसें सांगुनि लक्ष्मण रडता झाकी मुखासि वासानें ॥'–मोरोपंत, मन्त्ररामायण.

विज्ञानदृक्केवल आदिदेवः । संत्यज्य भोगानखिलान्विरक्तो मुनिव्रतोऽभून्मुनिसेवितांघ्रिः ॥ ६३ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे उत्तरकांडे चतुर्थः सर्गः ॥ ४ ॥

## उत्तरकांड, सर्ग पांचवा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ ततो जगन्मंगलमंगलात्मना विधाय रामायणकीर्तिमुत्तमाम् । चचार पूर्वाचरितं रघूत्तमो राजर्षिवर्यैरभिसेवितं यथा ॥ १ ॥ सौमित्रिणा पृष्ट उदारबुद्धिना रामः कथाः प्राह पुरातनीः

राम म्हणजे केवळ आदिदेव होय. मुनि त्याच्या चरणांची सेवा करितात. ( असा ) तो परात्मा विज्ञानदृष्टि श्रीराम सीतावियोग प्राप्त होताच सर्व उपभोगांचा त्याग करून वैराग्यवृत्तीनें मुनिव्रत धारण करून राहूं लागला. ६३ ”

**उत्तरकांड, अध्याय चवथा समाप्त.**

श्रीमहादेव म्हणाला, “ ( पार्वति ! ) रघूत्तम राम म्हणजे जगतांत ज्या कांहीं मंगलरूप—कल्याणरूप—गोष्टी आहेत, त्या सर्वांस मंगलत्व देणारी प्रत्यक्ष ब्रह्मानंदमूर्तिच होय. अशा त्या श्रीरामानें आपल्या चरित्राचे आधारावर अनेक रामायणें होतील, अशी उत्तम कीर्ति संपादन केली. ( सीतात्यागानंतर ) तो ( राम ) आपल्या पूर्वजांनी व इतर राजर्षींनीं आदरपूर्वक स्वीकारिलेल्या आचारांच्या अनुरोधानें वागत असे. १ उदार मनाच्या लक्ष्मणानें विचारल्यावरून प्राचीन काळीं घडलेल्या कित्येक पुण्यकथा राम त्याला सांगत असे. ( एका प्रसंगीं )

१. ‘ पवित्राणां पवित्रं यो मंगलानां च मंगलम् । दैवतं देवतानां च भूतानां योऽव्ययः पिता ॥’—महाभारत. २. ब्रह्मानंदाच्या एका अंशावर इतर सर्व ( भूतें ) आनंद पावतात, अशी श्रुति आहे.—‘ तस्यैवानंदस्यान्यानि मात्रामुपजीवंतीति.’ ३. उत्तम कीर्ति—मोक्ष प्राप्त करून देणारी ( कीर्ति ). ४. आचार—प्रजापालन, साधूंच्या कथांचें श्रवण, इत्यादि.

शुभाः । राज्ञः प्रमत्तस्य नृगस्य शापतो द्विजस्य तिर्यक्त्वमथाह राघवः ॥२॥ कदाचिदेकांत उपस्थितं प्रभुं रामं रमालालितपादपंकजम् । सौमित्रिरासादितशुद्धभावनः प्रणम्य भक्त्या विनयान्वितोऽब्रवीत् ॥ ३ ॥ त्वं शुद्धबोधोऽसि हि सर्वदेहिनामात्माऽस्यधीशोऽसि निराकृतिः स्वयम् । प्रतीयसे ज्ञानदृशां महामते पादाब्जभृंगाहितसंगसंगिनाम् ॥ ४ ॥ अहं प्रपन्नोऽस्मि पदांबुजं प्रभो भवापवर्गं तव योगिभावितम् । यथांजसा ज्ञानमपारवारिधिं सुखं चरिष्यामि तथानुशाधि माम् ॥ ५ ॥ श्रुत्वाऽथ

न कळत अपराध घडून शाप पावलेल्या नृगं राजाला क्षुद्र प्राण्याचा सरड्याचा—जन्म कसा प्राप्त झाला, ती कथा रामानें ( लक्ष्मणाला ) सांगितली. २ एकदां, ज्याच्या पदकमलाची सेवा लक्ष्मी करीत असते, असा तो प्रभु राम एकांतात बसला असतां लक्ष्मण ( तेथें ) आला. नंतर त्यानें भक्तिपूर्वक रामाला नमस्कार केला, आणि ( जिज्ञासूला योग्य अशा ) शुद्ध भावानें नम्रतापूर्वक विचारिलें, ३ ' महामते ( रामा ) ! तूं निर्मल ज्ञानस्वरूप आहेस. तू सर्वांचा अंतर्यामी आत्मा आहेस. तूं स्वतः निराकार असूनही सर्वांचा नियंता आहेस. ज्ञानाच्या दिव्य दृष्टीला तूं प्रतीत होणारा आहेस. कमलाचे ठायीं रुंजी घालणाऱ्या भ्रमराप्रमाणें ज्याची अंतःकरणें तुझ्या चरणीं आसक्त होतात, त्यांनाच ही दिव्य दृष्टि प्राप्त होते. ४ प्रभो ! संसाराची निवृत्ति करणारें, योगिजनांनीं ध्याइलेलें, असें जें तुझें पदकमल, त्याला मी शरण आलों आहें. जेणेंकरून अज्ञानरूप समुद्र मी सुखानें आणि लवकर तरून जाईन, असा कांहीं उपदेश मला कर. ५ श्रीरामाचें ब्रीद म्हणजे शरणागतांची दुःखें हरण करणें,

१. फार प्राचीन काळीं नृग नावाचा एक प्रख्यात राजा होऊन गेला. तो नित्य ब्राह्मणाना शेंकडो गाई दान देत असे. एकदा त्याच्या गाईच्या कळपात एका ब्राह्मणाची गाय चुकून आली. ही गोष्ट राजाला ठाऊक नसल्यामुळे इतर गाईबरोबर हीही गाय त्याने ब्राह्मणाला दान दिली. पुढें ज्या ब्राह्मणाची गाय हरवली होती, त्याला आपली गाय राजानें दुसऱ्या ब्राह्मणास दिल्याचें कळून आलें. त्यामुळे क्रुद्ध होऊन त्या ब्राह्मणानें नृग राजाला ' तूं सरड्याचा जन्म घेशील, ' असा शाप दिला. न कळता देखील ब्रह्मस्वहरण केल्याने परम धार्मिकाचीही कशी स्थिति होते, हें येथे दाखविलें आहे. २. सदृश उतारा—' यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥'—भ. गीता २. ( २ ) ' तरी श्रीकृष्ण तुवां जाणावें । निकें तें आम्हा सांगावें । जे सखा सर्वस्व आघवें । आम्हांसि तूं ॥ तूं गुरु बंधु पिता । तूं आमुची इष्ट देवता । तूंचि सदा रक्षिता । आपदीं आमुतें ॥ तरी उचित काई आम्हा । जे व्यभिचरेना धर्मा । तें झडकरी पुरुषोत्तमा । सांगें आतां ॥'—ज्ञानेश्वरी २.

सौमित्रिवचोऽखिलं तदा प्राह प्रपन्नार्तिहरः प्रसन्नधीः । विज्ञानमज्ञानत-
मोपशांतये श्रुतिप्रपन्नं क्षितिपालभूषणः ॥६॥ आदौ स्ववर्णाश्रमवर्णिताः
क्रियाः कृत्वा समासादितशुद्धमानसः । समाप्य तत्पूर्वमुपात्तसाधनः
समाश्रयेत्सद्गुरुमात्मलब्धये ॥ ७ ॥ क्रिया शरीरोद्भवहेतुरादृता प्रिया-
प्रियौ तौ भवतः सुरागिणः । धर्मेतरौ तत्र पुनः शरीरकं पुनः क्रिया
चक्रवदीर्यते भवः ॥ ८ ॥ अज्ञानमेवास्य हि मूलकारणं तद्धानमेवात्र
विधौ विधीयते । विद्यैव तन्नाशविधौ पटीयसी न कर्म तज्जं सविरोध-

हे असे. लक्ष्मणाचे समस्त भाषण ऐकून त्या राजशिरोमणि रामाला परम संतोष झाला. ( जनांच्या ) अज्ञानतमाचा नाश जेणेंकरून होईल, असें वेदांनाही संमत जें आत्मतत्त्वज्ञान तें त्यानें लक्ष्मणाला सांगितलें. ६ ( राम म्हणाला, ) ‘ प्रथमतः मनुष्यानें स्ववर्णाश्रमानुसार ( नित्यनैमित्तिक ) कर्में करावी. त्या योगे अंतःकरण-शुद्धि होईल. पुढें त्या ( अंतःकरणशुद्धी )मुळें शमदमादि साधनें प्राप्त झालीं असतां, कर्माचरण सोडून द्यावें, व आत्मज्ञानासाठीं सद्गुरूचा आश्रय करावा. ७ ह्या शरीराच्या जन्माला कारण म्हटलें म्हणजे पूर्वजन्मीं ( प्राण्यानें ) आदर-पूर्वक केलेली कर्मे हेंच होय. ह्या जन्मांतही तो विषयांवर प्रेम करूं लागला, म्हणजे त्याच्या हातून धर्म व अधर्म घडतात, व ते ( धर्माधर्म ) त्याला सुख-दुःखजनक असे होतात. पुढें तें कर्मच मूळ होऊन प्राण्याला पुनः जन्म घ्यावा लागतो. त्या जन्मांतही तो पुनः कर्म करितो. अशा रीतीनें कर्मापासून जन्म व जन्मांतून कर्म, हें संसारचक्र सारखें चालत असतें, असें म्हणतात. ८ ह्या संसा-राला मूळ कारण म्हटलें म्हणजे अज्ञानच होय. आणि त्याला दूर करणें हें ( प्राण्याचें ) अवश्य कर्तव्य होय. अज्ञानाचा नाश करण्यास समर्थ म्हणजे एक ज्ञानच—आत्म-तत्त्वज्ञानच—होय. अज्ञानोत्पन्न कर्मापासन त्याचा अज्ञानाचा—नाश—होणें शक्य

१. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, आणि शूद्र या चार वर्णांपैकीं ज्या वर्णांत जन्मला असेल, तसेंच ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ आणि सन्यास या चार आश्रमांपैकी जो आश्रम धारण केला असेल, त्या वर्णाश्रमास जीं नित्यनैमित्तिक—यज्ञदानादि—कर्में सांगितलीं आहेत, तीं. २. शम—शांति, दम—इंद्रियनिग्रह. हीं साधनें सहा आहेत—शम, दम, उपरति, तितिक्षा, समाधान आणि श्रद्धा ३. सद्गुरु-ब्रह्मज्ञानी, वेदवेत्ता गुरु सद्गुरूचीं लक्षणें—‘ जो ब्रह्मज्ञान उपदेशी । अज्ञान अंधारें निरसी । जीवात्मा परमात्मयासी । ऐक्यता करी ॥ × × विघडले देव आणि भक्त । जीव-शिवपणें द्वैत । तया देवभक्ता एकात । करी तो सद्गुरु ॥ प्राणी मायाजाळीं पडले । संसारदुःखें दुखवले । ऐसे जेणें मुक्त केले । तो सद्गुरु जाणावा ॥ ’—दासबोध.

**मीरितम् ॥ ९ ॥ नाज्ञानहानिर्न च रागसंक्षयो भवेत्ततः कर्म सदोषमुद्भवेत् । ततः पुनः संसृतिरप्यवारिता तस्माद्बुधो ज्ञानविचारवान्भवेत् ॥ १० ॥ ननु क्रिया वेदमुखेन चोदिता यथैव विद्या पुरुषार्थसाधनम् । कर्तव्यता प्राणभृतः प्रचोदिता विद्यासहायत्वमुपैति सा पुनः ॥ ११ ॥ कर्माकृतौ दोषमपि श्रुतिर्जगौ तस्मात्सदा कार्यमिदं मुमुक्षुणा । ननु स्वतंत्रा ध्रुवकार्यकारिणी विद्या न किंचिन्मनसाऽप्यपेक्षते ॥ १२ ॥ न सत्यकार्योऽपि हि यद्वदध्वरः प्रकांक्षतेऽन्यानपि कारकादिकान । तथैव**

नाही. ( कारण ), जें सविरोध[१] असतें, तेंच नाशक होतें, असें म्हटलें आहे. ९ कर्माच्या योगें अज्ञानाचाही नाश होत नाहीं, आणि विषयासक्तिही क्षय पावत नाहीं. त्यापासून सदोष ( नवें ) कर्म मात्र उत्पन्न होतें. त्यापासून पुनः संसार मागे लागतो. त्या संसारास टाळतां येणें शक्य नाही. म्हणून सुज्ञ मनुष्यानें ( सदैव ) आत्मज्ञानविचार करावा. १० ( यावर असा आक्षेप आहे की, ) वेदानें आपल्या मुखानें ज्ञान हें जसें पुरुषार्थाचें[२] साधन म्हणून सांगितलें आहे, तसेंच कर्म—नित्यनैमित्तिक कर्मे—प्राण्यानें अवश्य केली पाहिजेत, असेंही सांगितलें आहे. कर्म हें ज्ञानास पुष्टि करणारें आहे. ११ कर्म न केलें असतां दोष लागतो, असेंही श्रुतीनें सांगितलें आहे. म्हणून मुमुक्षूनें कर्म अवश्य केलें पाहिजे.' ( या आक्षेपावर असें म्हणणें आहे की, ) 'ज्ञान हेंच स्वतंत्रपणानें निश्चित कार्य करणारें—मोक्ष पावविणारें—आहे. तें कोणाचें साह्य घेण्याचें मनातही आणीत नाहीं. ' १२ ( यावर ते आक्षेपक म्हणतात कीं, ) ' असें नाहीं. यज्ञाचें फल सत्यपणें मिळायाचें असतें, तरीही त्याला सिद्धीकरितां इतर अंगांची साधनांची—अपेक्षा करावी लागते. त्याचप्रमाणें ज्ञानास शास्त्रविहित कर्मांची जोड

१. सविरोध—विरोधयुक्त. कोणाचाही नाश करणे म्हणजे प्रथमतः विरोधाची आवश्यकता असते. अज्ञानाचा नाश करणे म्हणजे त्याचे विरोधी जे ज्ञान तें पाहिजे. २. पुरुषार्थ—धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष. ३. मोक्षप्राप्त्यर्थ ज्ञान व कर्म या दोहोचीही जरूर आहे एकटे ज्ञान किंवा एकटे कर्म मोक्षदायक नाहीं, अशा मताचे जे लोक आहेत, त्यांस 'समुच्चयवादी' असे नाव आहे. ह्याच्या उलट मताचे आहेत, त्यास ' सिद्धांती ' म्हणतात.

विद्या विधितः प्रकाशितैर्विशिष्यते कर्मभिरेव मुक्तये ॥१३॥ केचिद्वदंतीति वितर्कवादिनस्तदप्यसद्दृष्टविरोधकारणात् । देहाभिमानादभिवर्धते क्रिया विद्या गताहंकृतितः प्रसिद्ध्यति ॥ १४ ॥ विशुद्धविज्ञानविरोचनांचिता विद्याऽऽत्मवृत्तिश्चरमेति भण्यते । उदेति कर्माखिलकारकादिभिर्निहंति विद्याऽखिलकारकादिकम् ॥ १५ ॥ तस्मात्त्यजेत्कार्यमशेषतः सुधीर्विद्याविरोधान्न समुच्चयो भवेत् । आत्मानुसंधानपरायणः सदा निवृत्तसर्वेंद्रियवृत्तिगोचरः ॥१६॥ यावच्छरीरादिषु माययाऽऽत्मधीस्तावद्विधेयो विधिवादकर्मणाम् । नेतीति वाक्यैरखिलं

मिळेल, तरच तें ज्ञान मोक्ष देण्यास समर्थ होईल.' १३ कित्येक वितर्कवाद्यांचें असें जें म्हणणें आहे, तेंही सत्यास सोडून आहे. कारण कर्म आणि ज्ञान ह्यांचा उघड उघड विरोध आहे. देहाभिमान ठेविल्यानें प्राण्याच्या ठिकाणी क्रिया वाढत जाईल; तो देहाभिमान जाईल, तेव्हांच त्याला ज्ञान प्राप्त होईल. १४ परम निर्मल आत्मज्ञान करून देणाऱ्या वेदांतवाक्यांच्या आलोचनानें जी शेवटी अंतःकरणाची ब्रह्माकार वृत्ति होते, तिलाच विद्या-तत्त्वज्ञान-असें (विद्वान् लोक) म्हणतात. सकल कारकांच्या-अंगांच्या-योगें कर्म उदयाला येते. उलट ज्ञान सर्व कारकांचा—कर्तृत्वादि बुद्धीचा—नाश करितें. १५ म्हणून मुमुक्षु पुरुषानें कर्मांचा पूर्णपणें त्याग करावा. कारण कर्मांचा ज्ञानाशीं विरोध आहे, आणि म्हणून (कर्म आणि ज्ञान) या दोघांचा समुच्चय-एकत्र रहाणें-शक्य नाही याकरितां सर्व इंद्रियांच्या वृत्तीचे विषय नित्य सोडून द्यावे, आणि आत्मानुसंधानपरायण होऊन रहावें. १६ जोंपर्यंत प्राणी शरीरादि (जड) वस्तूंवर अज्ञानानें अहंभाव—मी म्हणजे शरीर ही बुद्धि—ठेवितो, तोंपर्यंत वेदांतील कर्मबोधक विधि त्याला पाळावे लागतात. परंतु 'नेति नेति' हें असें नव्हे. हें असें नव्हे. ह्या वचनांनी सर्व जगत मिथ्या आहे. असें पक्कें समजून

१ सदृश उतारा—उभाभ्यामेव पक्षाभ्यां यथा खे पक्षिणा गतिः । तथैव ज्ञानकर्मभ्यां प्राप्यते ब्रह्म शाश्वतम् ॥'—योगवासिष्ठ (अर्थ'—जसे पक्षी दोनी पंखांच्या योगें उडतात, एकाच पंखानें त्यास उडता येणें शक्य नाहीं, त्याचप्रमाणे ज्ञान आणि कर्म हीं दोन्ही साधने शाश्वत ब्रह्मपदप्राप्तीस आवश्यक आहेत. २. 'ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात् कुरुते तथा ॥' —भ० गीता ४. (२) 'कीं जसा पेटला अग्नी काष्ठें जाळी जशीं तशीं । ज्ञानाग्नि करितो भस्म सर्वेही पुण्यपातकें ॥'—वामनपंडितकृत समश्लोकी. ३. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, हे इंद्रियवृत्तींचे विषय होत. ४. आत्मरूपीं लय लावणे, हीच श्रेष्ठ गोष्ट मानून राहणारा.

निषिध्य तज्ज्ञात्वा परात्मानमथ त्यजेत्क्रियाः ॥ १७ ॥ यदा परात्मात्मविभेदभेदकं विज्ञानमात्मन्यवभाति भास्वरम् । तदैव माया प्रविलीयतेऽजसा सकारका कारणमात्मसंसृतेः ॥ १८ ॥ श्रुतिप्रमाणाभिविनाशिता च सा कथं भविष्यत्यपि कार्यकारिणी । विज्ञानमात्रादमलाद्वितीयतस्तस्मादविद्या न पुनर्भविष्यति ॥ १९ ॥ यदि स्म नष्टा न पुनः प्रसूयते कर्ताऽहमस्येति मतिः कथं भवेत् । तस्मात्स्वतंत्रा न किमप्यपेक्षते विद्या विमोक्षाय विभाति केवला ॥ २० ॥ सा तैत्तिरीयश्रुतिराह सादरं न्यासं प्रशस्ताखिलकर्मणां स्फुटम् । एतावदित्याह च वाजिनां श्रुतिर्ज्ञानं विमोक्षाय न कर्म साधनम् ॥ २१ ॥ विद्यासमत्वेन

आलें, आणि परमात्मा त्या जगाहून वेगळा, अर्थात् सत्य आहे, हें ज्ञान झालें, म्हणजे सर्व कर्म मुमुक्षूनें सोडावी. १७ जेव्हां आत्मा आणि परात्मा हा भेद दूर करणारें प्रकाशमय आत्मज्ञान अंतःकरणात उत्पन्न होतें, तेव्हां माया आपल्या कारकांसह—कारणासह—तत्काल लयाला जाते. जीवाला संसारांत पाडण्याचें कारण म्हटलें म्हणजे ही मायाच होय. १८ श्रुतिप्रमाणोत्पन्न ज्ञानाच्या योगें ही माया एकदां नष्ट केली, म्हणजे मग ती पुनः आपलें कार्य—संसार—कसें बरें करील ? निर्मळ व द्वैतरहित आत्मतत्त्वज्ञानानें ती नष्ट झाली असतां पुनः उत्पन्नच होणार नाही. १९ ती माया नष्ट होऊन पुनः उत्पन्न होत नाही, असें झाल्यावर 'मी कर्ता' हा अभिमान तरी कसा उत्पन्न होईल ? म्हणून ज्ञान हेंच एकटें स्वतंत्र असें मोक्षाचें साधन असून त्याला दुसऱ्या कोणाच्याही साह्याची अपेक्षा नाही. २० त्या तैत्तिरीय उपनिषदांत आदरपूर्वक स्पष्ट सांगितलें आहे कीं, वेदांत ( अर्थवाद³वाक्यांनी ) कर्मांची प्रशंसा केली असली, तरी ती सर्व कर्मे सोडून द्यावी. वाजसनेयी शाखेच्या 'एतावत्' ह्या श्रुतीनेंही हेंच सांगितलें आहे की, ज्ञान हें मोक्षाचें ( साधन ) आहे, कर्म साधन नाही. २१ (हे समुच्चयवाद्या !)

१ 'इंद्रियग्रामींचे राजबिदी । अहंममतेचिया जल्पवादीं । विकारातराची मादी । मेळवूनिया ॥ दुःखशोकाच्या घाई । मारिलियाची सोयच नाहीं । हे सागावया कारण कायी । जे ग्रासिले माया ॥'—ज्ञानेश्वरी ७. २. 'न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनैके अमृतत्वमानशुः ।' ३. एखाद्या देवतेची किंवा कर्माची स्तुति किंवा निंदा करणारीं जीं वचनें वेदामध्यें आहेत, त्याना 'अर्थवादवाक्यें' म्हणतात.

तु दर्शितस्त्वया क्रतुर्न दृष्टांत उदाहृतः समः । फलैः पृथक्त्वाद्बहुकारकैः क्रतुः संसाध्यते ज्ञानमतो विपर्ययम् ॥ २२ ॥ सप्रत्यवायो ह्यहमित्यनात्मधीरज्ञप्रसिद्धा नतु तत्त्वदर्शिनः । तस्माद्बुधैस्त्याज्यमपि क्रियात्मभिर्विधानतः कर्म विधिप्रकाशितम् ॥ २३ ॥ श्रद्धान्वितस्तत्त्वमसीति वाक्यतो गुरोः प्रसादादपि शुद्धमानसः । विज्ञाय चैकात्म्यमथात्मजीवयोः सुखी भवेन्मेरुरिवाप्रकंपनः ॥२४॥ आदौ पदार्थावगतिर्हि कारणं वाक्यार्थविज्ञानविधौ विधानतः । तत्त्वंपदार्थौ परमात्मजीवकावसीति चैकात्म्यमथानयोर्भवेत् ॥ २५ ॥ प्रत्यक्परोक्षादिविरोधमात्मनोर्विहाय

यज्ञ ज्ञानासारिखा आहे, हें तूं दाखविलेंस, परंतु त्याला योग्य असा दृष्टांत सांगितला नाहीस. यज्ञांची फळें वेगवेगळी असल्यामुळें त्यांच्या सिद्धतेस विपुल साधनें लागतात. ज्ञान ह्याच्या उलट आहे. २२ ' कर्मत्यागानें मी दोषी होईन, ' हा जडधर्माचा आरोप अज्ञानी–तत्त्वज्ञान नसलेल्या–जनांच्या ठिकाणीं आढळून येतो. परंतु जे तत्त्वज्ञानी आहेत, त्यांना तसें वाटत नसतें. म्हणून सुज्ञ पुरुषांनीं शास्त्रांतील विहितें कर्में देखील सोडून द्यावी. २३ श्रद्धायुक्त होऊन आणि मन निर्मळ करून गुरुकृपेनें ' तत्त्वमसि ' इत्यादि वाक्यांनी परात्मा आणि जीवात्मा यांचें एकरूपत्व जाणावें, आणि मेरूप्रमाणें निश्चल सुखरूप होऊन रहावें. २४ ( लक्ष्मणा ! ) वाक्याचा बरोबर–भ्रमरहित–अर्थ कळण्याकरितां प्रथमतः त्यांतील पदांचा अर्थ समजून घेणें आवश्यक आहे. महावाक्यांतील–'तत्त्वमसि'–यांतील 'तत्' आणि ' त्वं ' या दोन पदांचे अर्थ ' परमात्मा ' आणि ' जीव ' हे आहेत. ' असि ' हें पद उभयांचें ऐक्य दाखवितें. २५ ( आतां परमात्मा सर्वज्ञ आहे, आणि जीव किंचिज्ज्ञ आहे, यामुळें दोघांचें ऐक्य होणें विरुद्ध होय. या आशंकेला उत्तर असें कीं, ) जीवाच्या ठिकाणी अहंबुद्धिवेद्यत्वं आहे. ईश्वराच्या ठिकाणी तें नाहीं. अर्थात् अंतःकरणांतील अहंभावनेनेंच समजून येणारा जीव, आणि अहंभाव नष्ट झाल्यावर समजून येणारें ईशस्वरूप, यांमधील

१. दशकाल, प्रयाज, अनुयाज, इत्यादि. २. विहित कर्में=वेदानीं–ब्राह्मण ग्रंथांनीं सांगितलेलीं कर्में. ३. अंतःकरण विषयेच्छांनीं क्षुब्ध होऊं देऊं नये. ४. ममत्वबुद्धि उत्पन्न झाल्यावर जीवाचे स्वरूप कळणें हा धर्म.

**संगृह्य तयोश्चिदात्मताम् । संशोधितां लक्षणया च लक्षितां ज्ञात्वा स्वमात्मानमथाद्वयो भवेत् ॥ २६ ॥ एकात्मकत्वाज्जहती न संभवेत्तथाऽजहल्लक्षणता विरोधतः । सोऽयंपदार्थाविव भागलक्षणा युज्येत तत्त्वंपद-**

प्रत्यक्षत्वपरोक्षत्वाचा विरोध काढून टाकावा, आणि लक्षणेनें विचार करून ते दोघेही चैतन्यरूपानें एक आहेत, हें जाणावें. मग आपण जीव–आपला आत्मा–तसाच चैतन्यमय आहे, हें समजून तद्रूप व्हावें. २६ जीवात्मा व परमात्मा यांचें स्वरूप एकच असल्यामुळें येथें ( 'तत्त्वमसि'चा अर्थ करितांना ) 'जहत्स्वार्थलक्षणा'–मूळचा अर्थ सोडून धोरणानें दुसरा स्वीकारणें–संभवत नाहीं. तसेंच 'अजहत्स्वार्थलक्षणा'–मूळचा अर्थ न सोडतां धोरणानें दुसरा भरीला घालणें–हीही संभवत नाही कारण तेथें या दोघांचा विरोध आहे आतां राहिलेली 'जहदजहत्स्वार्थलक्षणा' किंवा 'भागलक्षणा'–मूळचा कांहीं अर्थ सोडणें, व कांहीं न सोडणें–ती येथें जुळते. कारण, 'सोऽयं'–'तो हा' या पदांप्रमाणें 'तत् त्वं'–'तें तूं'–या पदांतील अनुक्रमें सर्वज्ञत्व व अल्पज्ञत्व सोडून दोघांचें चिदात्मकत्व–ब्रह्मरूपत्व–घ्यावयाचें आहे. अशा रीतीनें 'तत्त्वं'

१. जीवात्म्याचा परमात्म्याशीं विरोध २. वाच्यार्थ सोडून लक्ष्यार्थानें घ्यावयाचा अर्थ. लक्षणा तीन प्रकारच्या आहेत. ( १ ) जहत्स्वार्थलक्षणा ( २ ) अजहत्स्वार्थलक्षणा, आणि ( ३ ) जहदजहत्स्वार्थलक्षणा. जीमध्ये मूळचा अर्थ सोडला जातो, ती जहत्स्वार्थलक्षणा. उदाहरण–'गंगायां घोषः.' ह्या वाक्यांत 'गंगायां' याचा मूळचा अर्थ 'गंगाप्रवाहांत' हा सोडून देऊन 'गंगेच्या तीरावरील गौळवाडा' असा धरितात. आतां 'अजहत्स्वार्थलक्षणा,' हींत मूळचा अर्थ सोडला जात नाहींच, परंतु धोरणानें त्यासारिखा दुसराही अर्थ भरीला घ्यावयाचा असतो. उदाहरणार्थ–'काकेभ्यो दधि रक्ष्यताम्.' याचा अर्थ कावळ्यांपासून दधि-दहीं–राखा, एवढाच न करितां, कावळ्यांशिवाय मांजरें, कुत्री, ह्यापासूनही दहीं राखा, असा धोरणानें आणखीही अर्थ घ्यावा लागतो. आतां तिसरी जी 'जहदजहत्स्वार्थलक्षणा,' तींत मूळचा काहीं अर्थ सोडला जातो, व काहीं सोडला जात नाहीं. उदाहरणार्थ 'सोऽयं देवदत्तः'–तो हा ( बऱ्याच वर्षांपूर्वी पाहिलेला ) देवदत्त. लहानपणीं पाहिलेला देवदत्त आणि आता पुढें उभा असलेला देवदत्त, यामध्ये स्वरूपासंबंधानें विचार केला असतां कितीतरी बदल झाला आहे. तरी काहीं लक्षणावरून–न बदलणाऱ्या सामान्य खाणाखुणांवरून–ओळख पटत आहे. यावरून काहीं मूळचा अर्थ सोडायाचा, व काहीं न सोडावयाचा, यास 'जहदजहत्स्वार्थलक्षणा' म्हणतात. याला 'भागलक्षणा' असेंही नाव आहे.

**योरदोषतः ॥ २७ ॥ रसादिपंचीकृतभूतसंभवं भोगालयं दुःखसुखादिकर्मणाम् । शरीरमाद्यंतवदादिकर्मजं मायामयं स्थूलमुपाधिमात्मनः ॥ २८ ॥ सूक्ष्मं मनोबुद्धिदशेंद्रियैर्युतं प्राणैरपंचीकृतभूतसंभवम् । भोक्तुः सुखादेरनुसाधनं भवेच्छरीरमन्यद्विदुरात्मनो बुधाः ॥ २९ ॥ अनाद्यनिर्वाच्यमपीह कारणं माया प्रधानं तु परं शरीरकम् । उपाधिभेदात्तु यतः पृथक् स्थितं स्वात्मानमात्मन्यवधारयेत्क्रमात ॥ ३० ॥ कोशेष्वयं**

या पदांचा अविरोधाने अर्थ लावावा. २७ हें शरीर पृथ्व्यादि एकवटलेल्या पंचभूतांच्या योगें उत्पन्न झालेलें असून सुखदुःखादि प्राप्त करून देणाऱ्या कर्मांचें भोगस्थान आहे. ह्याला उत्पत्ति व नाश हीं आहेत. हें पूर्वजन्मार्जित कर्मापासून उत्पन्न झालेलें आहे. हें परंपरेनें मायेचें कार्य आहे. असें हें शरीर म्हणजे जीवाचा स्थूल उपाधि होय. २८ विद्वान् लोक, मन, बुद्धि, दहा इंद्रियें, आणि पंचप्राण यांनी युक्त, असें दुसरें एक सूक्ष्म शरीर जीवाचा उपाधि आहे, असें मानितात. ह्याची उत्पत्ति अपंचीकृत–मिश्र न झालेल्या–पांच भूतांपासून होते. भोक्त्याला सुखदुःखादि भोग मिळण्याचें साधन म्हणजे हेंच होय. २९ ( आतां ईश्वराचा उपाधि कोणता, तें सांगतों. ) अनादि, अनिर्वचनीय, सकल जगताच्या उत्पत्तीचें कारण अशी माया म्हणजे ईश्वराचें परम प्रधान शरीर आहे. मूळ आत्मा एक आहे, तरी या उपाधिभेदामुळें तो जीव आणि ईश्वर असा वेगळा होऊन राहिला आहे. म्हणून ( श्रवण, मनन, निदिध्यासन या ) क्रमानें जीवात्म्याचें परमात्म्याशीं ऐक्य आहे असें जाणावें. ३० हा आत्मा शरीरामध्यें असणाऱ्या अन्नमय, प्राण-

१. महावाक्यातील तत् ( मायोपाधे चैतन्य–ईश्वर ) व त्व ( अंतःकरण उपाधि ज्याचा असे चैतन्य–जीव ) याचा विचार केला असता, येथें जहदजहत्स्वार्थलक्षणाच घेणे भाग आहे. कारण या लक्षणेत मूळच्या पदातील सगळा अर्थ न सोडतां काहीं सोडायाचा असतो. दोनी पदांतील चैतन्य एवढा अर्थ ठेवून बाकीचा सोडावा. २. पृथ्वी, आप् , तेज, वायु, आकाश, या पाच एकत्र झालेल्या भूतांपासून शरीर झाले आहे. हें पाच भूतांचें जें एकीकरण त्याला पंचीकरण म्हणतात. ३. माया, महत्तत्त्व, अहंकार, भूतें, शरीर या क्रमाने. ४. उपाधि–निराकाराला साकार, अमर्यादाला समर्याद, निर्गुणाला सगुण करणारी वस्तु. ५. ' आत्मत्वीं नसे विकारवार्ता । स्वयें चेष्टेना चेष्टविता । चचल स्वभावे न चले स्वतां । आणि चळण तरी झाले ॥ आता चालकाचा सकल्प । कोठें करावा आरोप । यास्तव प्रेरक आत्मस्वरूप । उपाधियोगें बोलिलें ॥ '–सदाचार.

**तेषु तु तत्तदाकृतिर्विभाति संगात्स्फटिकोपलो यथा । असंगरूपोऽयमजो यतोऽद्वयो विज्ञायतेऽस्मिन्परितो विचारिते ॥३१॥ बुद्धेस्त्रिधा वृत्तिरपीह दृश्यते स्वप्नादिभेदेन गुणत्रयात्मनः । अन्योऽन्यतोऽस्मिन्व्यभिचारतो मृषा नित्ये परे ब्रह्मणि केवले शिवे ॥३२॥ देहेंद्रियप्राणमनश्चिदात्मनां संघादजस्त्रं परिवर्तते धियः । वृत्तिस्तमोमूलतयाऽज्ञलक्षणा यावद्भवेत्तावदसौ भवोद्भवः ॥ ३३ ॥ नेतिप्रमाणेन निराकृताखिलो हृदा समास्वादितचिद्घना-**

मय, मनोमय, विज्ञानमय आणि आनंदमय अशा पांच कोशांच्या संबंधामुळें त्या त्या आकारानें भासूं लागतो. स्फटिकाच्या खड्याच्या संगती जशी वस्तु असेल, तसा त्या स्फटिकाला रंग येतो. ( हें येथें उदाहरण होय. ) ( महावाक्याचा ) सम्यक् रीतीनें विचार केला असतां हा आत्मा असंग, अज, अद्वितीय आहे, अशी प्रतीति येते. ३१ ह्या ( आत्म्याच्या ) ठिकाणी स्वप्न, जागृति आणि सुषुप्ति अशा तीन प्रकारच्या अवस्था भासतात. त्या रज, सत्त्व आणि तम या त्रिगुणात्मक बुद्धीचे धर्म होत. ( आत्म्याचे नव्हत. ) आत्मा नित्य, तिन्ही गुणांवेगळा, व्यापक, असंग आणि आनंदरूप आहे. अशा आत्म्यावर हें अनित्य, मिथ्या अवस्थात्रय आरोपिलें जातें. बुद्धीच्या अध्यासामुळें तसा भास होतो. ह्या तीन अवस्थांपेकी एक अनुभवीत असतां दुसऱ्या दोन हातच्या जातात, म्हणून या तीन अवस्था क्षणिक अतएव अनित्य आहेत. ३२ देहें, इंद्रियें, प्राण आणि मन यांपैकी प्रत्येकाचा आत्म्यावर अध्यास झाल्यामुळें बुद्धीचा तमोमूल आणि अज्ञानजन्य प्रवाह सर्वदा चालू राहातो. आणि हा जोंपर्यंत वाहात राहील, तोंपर्यंत संसाराचें रहाटगाडगें चालू असायाचेंच. ३३ 'नेति नेति' ह्या प्रमाणावरून दृश्य हें सारें खोटें आहे, असें कळलें. आणि सत्त्वगुणप्रधान हृदयांत चिद्घनामृताचा—ज्ञानमय सुखाचा—अनुभव

१. 'तत्त्वमसि'—तें तूं आहेस, हें महावाक्य. २. बुद्धि ही रज, सत्त्व, आणि तम या तीन गुणांची झाली आहे. ३. अध्यास—अवस्तूच्या ठिकाणी वस्तूचा आरोप. 'अवस्तुन्यवस्त्वारोपोऽध्यासः.' रात्रिसमयीं दोरीला साप समजणें हा अध्यास होय. ४. स्वप्न, जागृति, सुषुप्ति, या अवस्थाही त्रिगुणाचीं कार्यें होत स्वप्न रजोगुणाचें कार्य, जागृति सत्त्वगुणाचें व झोंप हें तमोगुणाचे कार्य होय. ५. देह हाच आत्मा, इंद्रियें हाच आत्मा, प्राण हाच आत्मा किंवा मन हाच आत्मा असे मानल्याचे योगानें बुद्धीला भ्रम पडतो. या ठिकाणीं चार्वाक, नैयायिक, इत्यादि दर्शनाचा उल्लेख आहे.

मृतः । त्यजेदशेषं जगदात्तसद्रसं पीत्वा यथाऽम्भः प्रजहाति तत्फलम्
॥ ३४ ॥ कदाचिदात्मा न मृतो न जायते न क्षीयते नापि विवर्धतेऽ-
नवः । निरस्तसर्वातिशयः सुखात्मकः स्वयंप्रभः सर्वगतोऽयमद्वयः ॥३५॥
एवंविधे ज्ञानमये सुखात्मके कथं भवो दुःखमयः प्रतीयते । अज्ञानतोऽ-
ध्यासवशात्प्रकाशते ज्ञाने विलीयेत विरोधतः क्षणात् ॥ ३६ ॥ यदन्य-
दन्यत्र विभाव्यते भ्रमादध्यासमित्याहुरमुं विपश्चितः । असर्पभूतेऽहि-
विभावनं यथा रज्ज्वादिके तद्वदपीश्वरे जगत् ॥ ३७ ॥ विकल्पमाया-
रहिते चिदात्मकेऽहंकार एष प्रथमः प्रकल्पितः । अध्यास एवात्मनि
सर्वकारणे निरामये ब्रह्मणि केवले परे ॥ ३८ ॥ इच्छादिरागादिसुखा-

आला, म्हणजे कोंवळ्या नारळांतील मधुर रस पिऊन ती करवंटी जशी फेकून दिली जाते, त्याप्रमाणें निखिल जगताचा त्याग करावा. ( त्याविषयीं उदासीन रहावें. ) ३४ हा आत्मा कधीं मेला नाहीं, उत्पन्न होत नाहीं, क्षीण होत नाहीं, वाढत नाहीं, किंवा नवा होत नाहीं. त्यानें देहेंद्रियादि सर्वांचें महत्व नाहींसें केलें आहे. हा सुखरूप, स्वयंप्रभ, सर्वव्यापी व द्वैतविहीन आहे. ३५ ( यावर शंका ) अशा प्रकारचा ज्ञानस्वरूप आणि सुखमय आत्मा आहे, तर त्याच्यावर दुःखात्मक संसार कसा बरें प्रत्ययाला-अनुभवाला–येतो ? ( याला उत्तर. ) अज्ञानामुळें आत्म्यावर ( देहेंद्रियांचा ) अध्यास केल्यानें हा संसार अनुभवास येतो. परंतु एकदां स्वरूपज्ञान झालें कीं, तो क्षणांत नाश पावतो. कारण अज्ञान आणि ज्ञान यांचा विरोध आहे. ३६ पदार्थ वेगळाच असून त्यावर भलत्याच पदार्थाचा भ्रमामुळें आरोप केला जातो, याला विद्वान् लोक 'अध्यास' असें म्हणतात. उदाहरणार्थ, वस्तुतः सर्प नव्हे, अशा दोरी वगैरे पदार्थांवर अध्यासानें सर्पाचा आरोप करितात, त्याचप्रमाणें ईश्वरावर जगाचा अध्यास ( लोकांकडून ) केला जातो. ३७ ज्ञानस्वरूप आत्म्याचे ठिकाणीं विकल्पांचें कारण जी माया ती नाहीं. आत्मा हा सर्वांचें कारण, दुःखरहित, सर्वव्यापी, सर्व-विकारशून्य, दिसणाऱ्या सृष्टीहून वेगळा, असा आहे. त्याच्यावर प्रथमतः अहंकार कल्पिता गेला. हाच अध्याय होय. ३८ इच्छा–उपेक्षा. प्रीति-द्वेष. सुख-दुःख

१. न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः । अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥'–भ. गीता. २. एकदा ज्ञानाचे योगानें अज्ञानाचा नाश झाला कीं, त्यामुळें उत्पन्न झालेला संसार नाहींसा होतोच. ३. उदासीनत्व.

दिधर्मिकाः सदा धियः संसृतिहेतवः परे । यस्मात्प्रसुप्तौ तदभावतः परः सुखस्वरूपेण विभाव्यते हि नः ॥ ३९ ॥ अनाद्यविद्योद्भवबुद्धिबिंबितो जीवः प्रकाशोऽयमितीर्यते चितः । आत्मा धियः साक्षितया पृथक् स्थितो बुद्ध्याऽ परिच्छिन्नपरः स एव हि ॥ ४० ॥ चिद्बिंबसाक्षात्मधियां प्रसंगतस्त्वेकत्रवासादनलाक्तलोहवत् । अन्योन्यमध्यासवशात्प्रतीयते जडाजडत्वं च चिदात्मचेतसोः ॥ ४१ ॥ गुरोः सकाशादपि वेदवाक्यतः संजातविद्यानुभवो निरीक्ष्य तम् । स्वात्मांनमात्मस्थमुपाधिवर्जितं त्यजेदशेषं जडमात्मगोचरम् ॥४२॥ प्रकाशरूपोऽहमजोऽहमद्वयोऽसकृद्विभातोऽ-

हीं ज्यांचे गुणधर्म, ती संसाराची कारणें परमेश्वरावर आरोपिली जातात, वस्तुतः तीं बुद्धीवर राहणारी होत. झोपेमध्ये[1] ह्या भावनांचा लोप होत असल्यामुळें सुखस्वरूप आत्मप्रत्यय येत असतो. ३९ अनादि अविद्येपासून जी बुद्धि उत्पन्न होते, तिच्यामध्यें चैतन्याचे प्रकाशाचें प्रतिबिंब पडलें असतां, त्या प्रतिबिंबाला ' जीव ' असें म्हणतात. तेथें आत्मा बुद्धीचा साक्षी होऊन वेगळा राहात असतो. बुद्धीला त्याचा परिच्छेद[2] करितां येत नाहीं. ( तो व्यापक आहे. ) ४० लोखंड अग्नीत घालून तप्त केलें असतां, एकत्र सहवासामुळें, त्याला अग्नि हें नांव प्राप्त होतें, व लोखंडाचाही गुण अग्नीवर दिसतो, त्याप्रमाणें चैतन्याचें प्रतिबिंब ( जीव ), आणि इंद्रियांसहित मन, ह्यांच्या सान्निध्यानें परस्पर अध्यास होऊन आत्म्याचा धर्म चेतनत्व मनावर, व मनाचा धर्म जडत्व आत्म्यावर होतो. ४१ म्हणून गुरूपासून अगर वेदवचनांकडून ज्ञानरूप आत्मानुभव प्राप्त करून घ्यावा, त्याचें नीट चिंतन करावें, आणि आपला आत्मा उपाधिवर्जित असून हृदयांत राहात असतो, हें जाणून आत्म्यावर दृश्य होणाऱ्या सर्व जड देहेंद्रियादिकांस टाकून द्यावें. ( त्यांविषयीं उदासीन राहावें. ) ४२ मी प्रकाशरूप आहें, मी अज आहें, मी अद्वय

१. झोंपेंत बुद्धीची वृत्ति नसल्यामुळे अर्थातच सुखदुःख, प्रीतिद्वेष हे धर्म नसतात. २ मोज माप. ३. ' ऐसें असून सर्वथा । कर्मे स्थापिती आत्मयामाथा । तें तें निर्फळ गा वृथा । आत्मत्वीं नलगे ॥ मेघ गतीनें चंद्रासी । चंद्र धांवतो कल्पना ऐसी । या आरोपें काय तयासी । धावणें खरें ॥ असो या विकारासरिसा । आत्मा नव्हे विकाराऐसा । असंग पूर्ण जैसा तैसा । केवळपणे ॥ '—सदाचार.

हमतीव निर्मलः । विशुद्धविज्ञानघनो निरामयः संपूर्ण आनंदमयोऽहमक्रियः ॥ ४३ ॥ सदैव मुक्तोऽहमचिंत्यशक्तिमानतींद्रियज्ञानमविक्रियात्मकः । अनंतपारोऽहमहर्निशं बुधैर्विभावितोऽहं हृदि वेदवादिभिः ॥ ४४ ॥ एवं सदात्मानमखंडितात्मना विचारमाणस्य विशुद्धभावना । हन्यादविद्याम- चिरेण कारकै रसायनं यद्वदुपासितं रुजः ॥ ४५ ॥ विविक्त आसीन उपारतेंद्रियो विनिर्जितात्मा विमलांतराशयः । विभावयेदेकमनन्यसाधनो विज्ञानदृक्केवल आत्मसंस्थितः ॥४६॥ विश्वं यदेतत्परमात्मदर्शनं विला- पयेदात्मनि सर्वकारणे । पर्णश्चिदानंदमयोऽवतिष्ठते न वेद बाह्यं न च

आहे, मी नित्य प्रतीत आहे, मी अत्यंत निर्मल आहें, मी शुद्धज्ञानानें भरलेला आहें, मी दुःखरहित, व्यापक व आनंदमय आहें, मी अक्रिय आहें, ४३ मी नित्यमुक्त आहें, माझ्या शक्तीला पार नाही, अतींद्रियज्ञान हें माझें रूप आहे, मी परिणामहीन आहें, मी अनंत, अपार आहें, वेदवेत्ते विद्वान् लोक अह- र्निश माझें अंतःकरणांत चिंतन करितात, ४४ असें चिंतन करीत पुरुष चित्ताला विषयांकडे जाऊं न देतां स्वरूपविचार करीत राहील, तर त्याची अंतःकरणवृत्ति ब्रह्माकार होऊन जाईल, आणि मग त्या योगें अविद्या सर्व कारकां- सह—देहांतराला कारण अशा कर्मांसह—तत्काल लयाला जाईल. रसायन घेतलें असता रोगाचा तत्क्षणी नाश होतोच. ( तद्वतच ह्या वृत्तीनें अज्ञानाचा नाश होतो. ) ४५ पुरुषानें विजनस्थानीं आसनांवर बसावें, इंद्रियें आटोक्यांत ठेवावी, प्राणाया- मादि साधनानी मन जिंकावें, चित्त शुद्ध करावें, आत्मज्ञानावांचून ( मोक्षाचें ) दुसरें कोणतेंच साधन नाही, हा निश्चय करावा, आत्मज्ञानाकडेच दृष्टि लावावी, आणि मग असंग होऊन आत्मस्वरूपी लीन व्हावें. ४६ ह्या सगळ्या जगताला प्रकाशित करणारा म्हटला म्हणजे परमात्मा होय. तो जगाचें सर्व कारण—उपादान— कारण आहे. तरी अशा आत्मरूपी सर्व जगताचा लय करावा. असा पुरुष पूर्ण चिदानंदमय होऊन राहातो. त्याला बाह्य किंवा आंतर विषयांचें ज्ञानच राहात नाहीं.

१. अनुभवास आलेला. २. माया मोह घालूं शकणार नाहीं, असा. ३. इंद्रियांना न होणारें ज्ञान. ४. रूपांतर नाहीं, असा. ५. योगशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें पद्मासन अगर दुसरें एखादें आसन घालून बसावें. ६. शमदमादिसंपन्न व्हावें. ७. दृश्य आणि द्रष्टा ही वेगळीं आहेत, हेंही भान राहूं नये. ८. कार्याबरोबर असणारें. उदाहरणार्थ मृत्तिकेचा घट, येथें मृत्तिका ही घटाचें उपादानकारण आहे.

किंचिदांतरम् ॥ ४७ ॥ पूर्वं समाधेरखिलं विचिंतयेदोंकारमात्रं सचराचरं जगत् । तदेव वाच्यं प्रणवो हि वाचको विभाव्यतेऽज्ञानवशान्न बोधतः ॥ ४८ ॥ अकारसंज्ञः पुरुषो हि विश्वको ह्युकारकस्तैजस ईर्यते क्रमात् । प्राज्ञो मकारः परिपठ्यतेऽखिलैः समाधिपूर्वं न तु तत्त्वतो भवेत् ॥ ४९ ॥ विश्वं त्वकारं पुरुषं विलापयेदुकारमध्ये बहुधा व्यवस्थितम् । ततो मकारे प्रविलाप्य तैजसं द्वितीयवर्णं प्रणवस्य चांतिमे ॥ ५० ॥ मकारमप्यात्मनि चिद्घने परे विलापयेत्प्राज्ञमपीह कारणम् । सोऽहं परं ब्रह्म सदा विमुक्तिमद्विज्ञानदृङ्मुक्त उपाधितोऽमलः ॥५१॥ एवं सदा जातपरात्मभावनः स्वानंदतुष्टः परिविस्मृताखिलः । आस्ते स

४७ त्यानें समाधीच्या पूर्वीं सर्व स्थावरजंगमात्मक जगत् ओंकारमात्र आहे, असें मानावें. जग हें प्रणवाचें–ओंकाराचें–वाच्य आहे, व प्रणव हा जगताचा वाचक आहे, हें प्रसिद्ध आहे. जगत् ओंकाररूप पाहाणें, हा देखील अज्ञानाचा प्रकार होय. ज्ञान झालें असतां ही वृत्ति राहात नाहीं. ४८ ‘ ओम् ’ हा शब्द अ, उ, म अशी तीन अक्षरें मिळून झाला आहे. जागृतावस्थेचा साक्षी जो ‘ विश्व ’ त्याचीच ‘ अ ’ ही संज्ञा आहे. क्रमानें दुसरा वर्ण ‘ उ ’ हा स्वप्नावस्थेचा साक्षी असून त्याला ‘ तैजस ’ असें म्हणतात, आणि तिसरा ‘ म् ’ हा सुषुप्त्यवस्थेचा साक्षी असून त्याला ‘ प्राज्ञ ’ असें सगळे लोक म्हणतात. हा विचार समाधिपूर्वींचा होय. तत्त्वज्ञान झाल्यावर हा विचारच राहात नाहीं ४९ जागृतावस्थेचा अभिमानी असलेला ‘ विश्व ’ पुरुष, व त्याचा वाचक ‘ अ ’ वर्ण यांना उकारामध्यें विलीन करावें; नंतर स्वप्नावस्थेचा अभिमानी ‘ तैजस ’ आणि त्याचा वाचक ‘ उ, ’ ह्यांना प्रणवाच्या शेवटच्या वर्णांत–‘ म् ’ वर्णांत–लीन करावें. ५० नंतर त्या मकाराला आणि त्याचा वाच्य आणि कारणाभिमानी प्राज्ञ पुरुष यांना चिदात्मरूपावर विलीन करावें. आणि मग विज्ञानदृष्टि होऊन आणि सर्व उपाधींपासून मुक्त, अर्थात् रागद्वेषादि मलरहित होऊन, तें नित्यमुक्त परब्रह्म मी आहें, अशी भावना करावी. ५१ अशा प्रकारें परमात्मरूपी ऐक्यस्थिति झाली असतां तो सर्व–पुत्रगेहादि–विसरून जातो, आणि स्वरूपानंदानेंच तुष्ट होतो. नित्य आत्मसुखाचा

१. समाधि–सगळ्या विषयाचे उद्योग सुटून ब्रह्माकारवृत्ति होणे, ती समाधि.

नित्यात्मसुखप्रकाशकः साक्षाद्विमुक्तोऽचलवारिसिंधुवत् ॥ ५२ ॥ एवं
सदाऽभ्यस्तसमाधियोगिनो निवृत्तसर्वेंद्रियगोचरस्य हि । विनिर्जिताशे-
षरिपोरहं सदा दृश्यो भवेयं जितषड्गुणात्मनः ॥ ५३ ॥ ध्यात्वैवमा-
त्मानमहर्निशं मुनिस्तिष्ठेत्सदा मुक्तसमस्तबंधनः । प्रारब्धमश्नन्नभिमान-
वर्जितो मय्येव साक्षात्प्रविलीयते ततः ॥ ५४ ॥ आदौ च मध्ये च
तथैव चांततो भवं विदित्वा भयशोककारणम् । हित्वा समस्तं विधिवा-
दचोदितं भजेत्स्वमात्मानमथाखिलात्मनाम् ॥ ५५ ॥ आत्मन्यभेदेन
विभावयन्निदं भवत्यभेदेन मयात्मना तदा । यथा जलं वारिनिधौ यथा
पयः क्षीरे वियद्व्योम्न्यनिले यथानिलः ॥ ५६ ॥ इत्थं यदीक्षेत हि

प्रकाश हेंच त्याचें रूप होय; असा तो पूर्ण निर्मुक्त–जीवन्मुक्त–पुरुष निश्चल उद-कानें भरलेल्या समुद्रासारखा स्थिर असतो. ५२ अशा रीतीनें जो सर्वदा समाधि-योगाचा अभ्यास करितो, सर्व इंद्रियविषयांपासून दूर राहातो, सर्व कामक्रोधादिक रिपूंना जिंकितो, षड्गुणसंपन्न आत्म्याला स्वाधीन करून घेतो, त्यालाच माझें दर्शन होतें. ५३ मुनीनें अशा रीतीनें अहर्निश आत्मस्वरूपीं आपलें ध्यान लावावें, आणि समस्त बधांतून मुक्त होऊन रहावें. प्रारब्ध कर्मेंकरून जें प्राप्त होईल, तें अभिमान सोडून भोगावें, म्हणजे तो माझ्याच स्वरूपीं लय पावेल. ५४ हा संसार म्हणजे प्रारंभीं, मध्यें व अंतींही भय आणि शोक यांचें कारण आहे, असें जाणून विधि-वाक्यांनी सांगितलेली सर्व कर्में सोडून द्यावी, सर्वांतरी असणारा आत्मा–परमेश्वर–जो मी त्या माझीच भक्ति करावी. ५५ माझ्या स्वरूपीं जीव अभेदानें आहे, असें चिंतन करीत जो राहातो, तो माझ्याशीं ऐक्य पावतो. समुद्राला पाणी जाऊन मिळालें की, तें समुद्ररूप होतें; दुधांत दूध मिळालें कीं एकरूप होतें, घट फुटला असतां त्यांतील आकाश मोठ्या आकाशांत मिळतें; ( बाहेरील ) वातावरणांत ( भात्यां-तील ) वायु एकवटून जातो. त्याचप्रमाणें जीवात्मा परमात्म्याशीं तद्रूप होतो ५६

१. ' यापरी स्वरूप वैभव थोर । अतरी ध्यात जो निरंतर । त्यास मग नेणवे आपपर । परमानदीं स्वभावें ॥ मग तो सागराऐसा स्थिर । गंभीर, पूर्ण निर्मुक्त नर । तो नित्य स्वात्मसुख अपार । सेवीत निश्शंक राहातो ॥ '–अध्यात्मरामकथा. २. षड्गुण–सर्वज्ञत्व, नित्यत्व, नित्यतृप्तत्व, ज्ञानरूपत्व, स्वतंत्रत्व, आणि नित्यस्फूर्ति. ३. प्रारब्ध कर्में तीन प्रकारचीं आहेतः–( १ ) संचित–साचवून बाजूला ठेवलेलें. ( २ ) क्रियमाण–सध्यां आपणाकडून केलें जातें तें, आणि ( ३ ) प्रारब्ध–ज्याचें फल आपण सांप्रत भोगीत आहों तें.

लोकसंस्थितो जगन्मृषैवेति विभावयन्मुनिः। निराकृतत्वाच्छ्रुतियुक्तिमानतो यथेंदुभेदो दिशि दिग्भ्रमादयः॥ ५७॥ यावन्न पश्येदखिलं मदात्मकं तावन्मदाराधनतत्परो भवेत्। श्रद्धालुरत्यूर्जितभक्तिलक्षणो यस्तस्य दृश्योऽहमहर्निशं हृदि॥ ५८॥ रहस्यमेतच्छ्रुतिसारसंग्रहं मया विनिश्चित्य तवोदितं प्रिय। यस्त्वेतदालोचयतीह बुद्धिमान्स मुच्यते पातकराशिभिः क्षणात्॥ ५९॥ भ्रातर्यदीदं परिदृश्यते जगन्मायैव सर्वं परिहृत्य चेतसा। मद्भावनाभावितशुद्धमानसः सुखी भवानंदमयो निरामयः॥ ६०॥ यः सेवते मामगुणं गुणात्परं हृदा कदा वा यदि वा

अशा रीताने लौकिक व्यवहार करीत असतांही मुनि ' जग खोटेंच आहे, ' असा सतत विचार करीत राहील, तर त्याला ऐक्यज्ञान होईल, आणि त्याची जगतावरील सत्यपणाची भ्रांति दूर होईल. कारण श्रुति आणि युक्ति या दोन्ही प्रमाणांनी दृश्य–जगत्–हें सारें खोटें ठरवून त्याचा निरास केला आहे. ज्याप्रमाणें मनुष्याला कधी एका चंद्राचे दोन चंद्र दिसतात, किंवा दिशाभूल होते, परंतु सत्यज्ञान झालें असतां हे भ्रम दूर होतात, त्याचप्रमाणें आत्मतत्त्वज्ञान झाल्यानें सर्व जगत् मद्रूप आहे, असें दिसून येतें. ५७ जोंपर्यंत हें सर्व जगत् मद्रूप आहे, ही गोष्ट दृष्टीला समजून येत नाहीं, तोंपर्यंत मनुष्यानें माझें आराधन करण्यांत तत्पर रहावें. ज्या श्रद्धाळू पुरुषाच्या हृदयांत मजविषयीं अत्यंत भक्ति असल्याचें चिन्ह दिसून येतें, त्याच्याच हृदयांत मी दृश्य होतों.[3] ५८ हे प्रिय (लक्ष्मणा)! सर्व वेदांचा सारसंग्रह म्हणून निश्चित केलेला असा जो अत्यंत गुप्त तत्त्वविचार तो मी तुला सांगितला. जो बुद्धिमान् पुरुष ह्याचा नीट विचार करील, तो क्षणामध्यें पातकाच्या अनेक राशींपासून मुक्त होईल. ५९ बंधो! हें जें सर्व जगत् दिसत आहे, ती सर्व मायाच आहे, असें समज, आणि अंतःकरणांतून तिचा त्याग कर. मग माझ्या चिंतनानें तुझें मन शुद्ध होईल, आणि तूं आनंदमय, निरामय आणि सुखी असा होशील. ६० मी सत्त्वादि गुणांनी रहित आहें, मी गुणातीत–त्रिगुणात्मक मायेच्या

१. पित्तादि विकारांनीं एका चंद्राच्या ठिकाणीं दोन दिसतात. २. पूर्व दिशा दक्षिण वाटते, किंवा दक्षिण उत्तर वाटते. ३. ' नाहं वसामि वैकुंठे योगिनां हृदये रवौ। मद्भक्ता यत्र गायति तत्र तिष्ठामि नारद॥ ' ४. दुःखरहित.

गुणात्मकम् । सोहं स्वपादांचितरेणुभिः स्पृशन् पुनाति लोकत्रितयं यथा रविः ॥ ६१ ॥ विज्ञानमेतदखिलं श्रुतिसारमेकं वेदांतवेद्यचरणेन मयैव गीतम् । यः श्रद्धया परिपठेद्गुरुभक्तियुक्तो मद्रूपमेति यदि मद्वचनेषु भक्तिः ॥६२॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे उत्तरकांडे श्रीरामगीतानाम पंचमः सर्गः ॥ ५ ॥

## उत्तरकांड, सर्ग सहावा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ एकदा मुनयः सर्वे यमुनातीरवासिनः । आजग्मू राघवं द्रष्टुं भयाल्लवणरक्षसः ॥१॥ कृत्वाग्रे तु मुनिश्रेष्ठं भार्गवं च्यवनं द्विजाः । असंख्याताः समायाता रामादभयकांक्षिणः ॥ २ ॥ तान्पूजयित्वा परया भक्त्या रघूकुलोत्तमः । उवाच मधुरं वाक्यं

पलाकड आहे, मी कधीकाळी गुणांनी युक्त असे-सगुण-रूपही धारण करितों. अशा माझी निर्मल अंतःकरणानें जो सेवा करितो, तो मद्रूप होऊन जातो. जसा सूर्य आपल्या किरणांनी जगत्रयाला पवित्र करितो, त्याचप्रमाणें तो भक्तही आपल्या चरणधूलीच्या स्पर्शानें त्रैलोक्याला शुद्ध-पवित्र-करितो. ६१ वेदांतरहस्य समजल्यानेंच ज्याचे चरित्राचें यथार्थ आकलन होऊं शकतें, तो मी आहें. सगळ्या श्रुतीच जणूं काय एकच सार, असलें हें विज्ञान-तत्त्वज्ञान-मी तुला सांगितलें. त्याचें जो श्रद्धेनें आणि गुरुभक्तिपूर्वक पठण करील, आणि माझ्या वचनावर भक्ति ठेवून राहील, त्याला माझ्या स्वरूपी गति मिळेल. ६२ ”

**उत्तरकांड, सर्ग पांचवा समाप्त.**

श्रीशंकर म्हणाला, “ एकदां यमुनातीरावरील सर्व मुनि लवणनामक राक्षसाच्या भीतीनें रामाला भेटण्याकरितां म्हणून ( अयोध्येला ) आले. १ रामापासून आपणाला अभय मिळावें, ह्या इच्छेनें च्यवनभार्गवनामक मुनिश्रेष्ठाला आपला मुख्य करून ते सर्व असंख्यात ब्राह्मण ( रामाकडे ) आले. २ त्या रघुकुलोत्तमानें परम भक्तिपूर्वक त्यांचें पूजन केलें; मग त्या मुनिजनांना आनंद देण्यासाठीं तो गोड

हर्षयन्मुनिमंडलम् ॥ ३ ॥ करवाणि मुनिश्रेष्ठाः किमागमनकारणम् । धन्योऽस्मि यदि यूयं मां प्रीत्या द्रष्टुमिहागताः ॥ ४ ॥ दुष्करं चापि यत्कार्यं भवतां तत्करोम्यहम् । आज्ञापयंतु मां भृत्यं ब्राह्मणा दैवतं हि मे ॥ ५॥ तच्छ्रुत्वा सहसा हृष्टश्च्यवनो वाक्यमब्रवीत् । मधुनामा महादैत्यः पुरा कृतयुगे प्रभो ॥ ६ ॥ आसीदतीव धर्मात्मा देवब्राह्मणपूजकः । तस्य तुष्टो महादेवो ददौ शूलमनुत्तमम् ॥ ७ ॥ प्राह चानेन यं हंसि स तु भस्मीभविष्यति । रावणस्यानुजा भार्या तस्य कुंभीनसी श्रुता ॥ ८ ॥ तस्यां तु लवणो नाम राक्षसो भीमविक्रमः । आसीद्दुरात्मा दुर्धर्षो देवब्राह्मणहिंसकः ॥ ९ ॥ पीडितास्तेन राजेंद्र वयं त्वां शरणं गताः। तच्छ्रुत्वा राघवोऽप्याह मा भीर्वो मुनिपुंगवाः ॥ १० ॥

शब्दांनी म्हणाला, ३ ' मुनिश्रेष्ठ हो, मी आपली कोणती कामगिरी केली पाहिजे ? आपण काय निमित्तानें आलां आहां ? माझ्या भेटीला आपण प्रीतिपूर्वक आलांत, याबद्दल मला मोठी धन्यता वाटत आहे. ४ आपलें कार्य कितीही दुष्कर असलें, तरी मी तें करीन. मी आपला सेवक आहें. ब्राह्मण माझें दैवत होत. आपण आज्ञा करावी.' ५ तें ऐकून च्यवनमुनीला हर्ष झाला. तो लागलेंच म्हणाला, ' प्रभो ! पूर्वी कृतयुगामध्यें मधु नांवाचा एक मोठा दैत्य होऊन गेला तो अत्यंत धर्मात्मा असून देवब्राह्मणांचें पूजन करणारा होता. त्याजवर प्रसन्न होऊन शंकरांनी त्याला एक अत्युत्तम शूल दिला, ६,७ आणि सांगितलें की, 'याच्या योगें ज्यावर तूं प्रहार करिशील, त्याचें भस्म होईल.' रावणाची धाकटी बहीण कुंभीनसी ती त्याची पत्नी, ही गोष्ट ( सर्वांना ) श्रुत आहेच. ८ तिच्या पोटीं त्या ( मधू )ला लवण नांवाचा एक राक्षसपुत्र झाला. तो महापराक्रमी निघाला. हा अत्यंत दुष्ट, कोणालाही न आंवरणारा व देवब्राह्मणांची हिंसा करणारा आहे. ९ राजेंद्रा ! त्यापासून आम्हांला पीडा होत असल्यामुळें आम्ही तुला शरण आलों आहों.' तें ऐकून राम म्हणाला. ' मुनिश्रेष्ठ हो ! आपणाला भिण्याचें कारण नाहीं. १०

१. समानार्थक उतारा–'श्रीराम म्हणे जी ऋषि । तुमचें दर्शन अभीष्ट आम्हासी । तरी कोण कार्याचे उद्देशीं । तुम्हीं आगमन पैं केलें ॥ मी तुमचा आज्ञाधर । आणि सेवकाचा किंकर । तुमच्या कार्यालागीं अवतार । सूर्यवंशीं धरिलासे ॥ राज्य आणि सकळ जीवित । हें वेंचीन प्रियकार्यार्थ । माझें वचन मानावें सत्य । कायावाचामानसें ॥'–भावार्थरामायण ५७.

लवणं नाशयिष्यामि गच्छंतु विगतज्वराः । इत्युक्त्वा प्राह रामोऽपि भ्रातॄन् को वा हनिष्यति ॥११॥ लवणं राक्षसं दद्याद्ब्राह्मणेभ्योऽभयं महत् । तच्छ्रुत्वा प्रांजलिः प्राह भरतो राघवाय वै ॥ १२ ॥ अहमेव हनिष्यामि देवाज्ञापय मां प्रभो । ततो रामं नमस्कृत्य शत्रुघ्नो वाक्यमब्रवीत् ॥ १३ ॥ लक्ष्मणेन महत्कार्यं कृतं राघव संयुगे । नंदिग्रामे महाबुद्धिर्भरतो दुःखमन्वभूत् ॥ १४ ॥ अहमेव गमिष्यामि लवणस्य वधाय च । त्वत्प्रसादाद्रघुश्रेष्ठ हन्यां तं राक्षसं युधि ॥१५॥ तच्छ्रुत्वा स्वांकमारोप्य शत्रुघ्नं शत्रुसूदनः । प्राहाद्यैवाभिषेक्ष्यामि मथुराराज्यकारणात् ॥ १६ ॥ आनाय्य च सुसंभाराँल्लक्ष्मणेनाभिषेचने । अनिच्छंतमपि स्नेहादभिषेकमकारयत् ॥ १७ ॥ दत्वा तस्मै शरं दिव्यं रामः

मी लवणाचा नाश करावता. त्यासंबंधी चिंतारहित होऊन आपण जावें.' असें ( ऋषींना ) सांगून राम आपल्या बंधूंना म्हणाला, '(तुमच्यांमध्यें) ह्या लवण राक्षसाला मारून ब्राह्मणांना मोठें अभय देईल, असा कोण बरें आहे ?' तें ऐकून भरतानें हात जोडून रामाला म्हटलें, ११, १२ 'प्रभो देवा ! मला आज्ञा दे. मीच त्याचा वध करितों.' नंतर रामाला नमस्कार करून शत्रुघ्न म्हणाला, १३ 'राघवा ! युद्धामध्यें लक्ष्मणानें मोठें कार्य केलें आहे. तसेंच महाबुद्धिमान् भरताला नंदिग्रामांत कितीतरी दुःख सोसावें लागलें आहे. १४ म्हणून लवणाच्या वधाकरितां मीच जातों. रघुश्रेष्ठा ! तुझ्या प्रसादानें मी त्या राक्षसाचा युद्धांत वध करीन.' १५ त्या शत्रुमर्दन रामानें तें ( शत्रुघ्नाचें ) भाषण ऐकिल्यावर शत्रुघ्नाला मांडीवर घेतलें, आणि म्हटलें, 'मी तुला आजच मथुराराज्याचा अभिषेक करितों.' १६ ( रामानें ) लक्ष्मणाकडून सर्व अभिषेकाचें साहित्य आणविलें, आणि शत्रुघ्नाची इच्छा नसतांही परम प्रीतिपूर्वक त्याला अभिषेक करविला. १७ नंतर एक दिव्य बाण

१. यमुनेच्या तीरावर लवणासुराचा वध करून शत्रुघ्नाने वसविलेली नगरी, तीच ही मथुरा होय. श्रीकृष्णाचा जन्म ह्याच ठिकाणीं झाला. सात परमपवित्र पुण्यक्षेत्रें सांगितलीं आहेत, त्यापैकीं हें एक आहे. 'अयोध्या मथुरा माया काशी कांचीरवंतिका । पुरी द्वारावती चैव सप्तैता मोक्षदायिकाः' ॥

शत्रुघ्नमब्रवीत् । अनेन जहि बाणेन लवणं लोककंटकम् ॥ १८ ॥ स तु संपूज्य तच्छूलं गेहे गच्छति काननम् । भक्षणार्थं तु जंतूनां नानाप्राणिवधाय च ॥ १९ ॥ स तु नायाति सदनं यावद्वनचरो भवेत् । तावदेव पुरद्वारि तिष्ठ त्वं धृतकार्मुकः ॥ २० ॥ योत्स्यते स त्वया क्रुद्धस्तदा वध्यो भविष्यति । तं हत्वा लवणं क्रूरं तद्वनं मधुसंज्ञितम् ॥ २१ ॥ निवेश्य नगरं तत्र तिष्ठ त्वं मेऽनुशासनात् । अश्वानां पंचसाहस्रं रथानां च तदर्धकम् ॥ २२ ॥ गजानां षट् शतानीह पत्तीनामयुतत्रयम् । आगमिष्यति पश्चात्त्वमग्रे साधय राक्षसम् ॥२३॥ इत्युक्त्वा मूर्ध्न्यवघ्राय प्रेषयामास राघवः । शत्रुघ्नं मुनिभिः सार्धमाशीर्भिरभिनंद्य च ॥ २४ ॥ शत्रुघ्नोऽपि तथा चक्रे यथा रामेण चोदितः । हत्वा मधुसुतं युद्धे मथुरामकरोत्पुरीम् ॥ २५ ॥ स्फीतां जनपदां चक्रे मथुरां दानमानतः । सीतापि सुषुवे पुत्रौ द्वौ वाल्मीकेरथाश्रमे ॥ २६ ॥

शत्रुघ्नाला देऊन राम त्याला म्हणाला, 'लोकांना कंटकाप्रमाण—शत्रुसमान-वाटणाऱ्या लवणाचा ह्या बाणानें वध कर.' १८ तो (लवण) त्या (शंकरानें दिलेल्या) शूलाची पूजा करून तो (शूल) घरी ठेवितो, आणि जंतूंचें भक्षण करण्याकरितां आणि अनेक प्राण्यांच्या वधाकरितां अरण्यात जातो. १९ घरी न येतां तो वनांतच फिरत राहील, अशी संधि साधून तूं नगराच्या द्वारांत धनुष्य घेऊन उभा राहा. २० तो क्रुद्ध होऊन तुजशी लढेल, आणि तुझ्या हातीं मरण पावेल.[1] त्या क्रूर लवणाचा वध केल्यावर तूं त्याचें मधुनामक वन आहे, २१ त्या ठिकाणी एक नगरी वसवून तेथें तूं माझ्या आज्ञेनें रहा. पांच हजार घोडे, त्याच्या निमे—अडीच हजार—रथ, २२ सहाशें हत्ती, आणि तीस हजार पायदळ, इतकी सेना मागाहून येईल. तूं पुढें जाऊन त्या राक्षसाचा वध कर.' २३ असें बोलून शत्रुघ्नाला मस्तकाच्या ठिकाणीं रामानें हुंगिलें, त्याचें अनेक आशीर्वाद देऊन अभिनंदन केलें, आणि मुनीबरोबर त्याला पाठविलें. २४ शत्रुघ्नानेंही जसें रामानें सांगितलें होतें, त्याप्रमाणें केलें. त्यानें मधुसुताचा—लवणाचा—युद्धांत वध केला, आणि मथुरा नगरी वसविली. २५ तसेंच दान, मान, धनधान्यसमृद्धि, यांच्या योगें तेथील लोकांना सुखी केलें. इकडे वाल्मीकीच्या आश्रमांत सीतेला दोन पुत्र झाले. २६

१. मरण पावेल, कारण, ह्या वेळीं त्याजवळ शूळ असणार नाही.

मुनिस्तयोर्नाम चक्रे कुशो ज्येष्ठोऽनुजो लवः । क्रमेण विद्यासंपन्नौ सीतापुत्रौ बभूवतुः ॥ २७ ॥ उपनीतौ च मुनिना वेदाध्ययनतत्परौ । कृत्स्नं रामायणं प्राह काव्यं बालकयोर्मुनिः ॥ २८ ॥ शंकरेण पुरा प्रोक्तं पार्वत्यै पुरहारिणा । वेदोपबृंहणार्थाय तावग्राहयत प्रभुः ॥२९॥ कुमारौ स्वरसंपन्नौ सुंदरावश्विनाविव । तंत्रीतालसमायुक्तौ गायंतौ चेरतुर्वने ॥३०॥ तत्र तत्र मुनीनां तौ समाजे सुररूपिणौ । गायंतावभितो दृष्ट्वा विस्मिता मुनयोऽब्रुवन् ॥ ३१ ॥ गंधर्वेष्विव किन्नरेषु भुवि वा देवेषु देवालये पातालेष्वथवा चतुर्मुखगृहे लोकेषु सर्वेषु च । अस्माभिश्चिरजीविभिश्चिरतरं दृष्ट्वा दिशः सर्वतो नाज्ञायीदृशगीतवाद्यगरिमा नादर्शि नाश्रावि च ॥ ३२ ॥ एवं स्तुवद्भिरखिलैर्मुनिभिः प्रतिवासरम् । आसाते सुखमेकांते वाल्मीकेराश्रमे चिरम् ॥ ३३ ॥ अथ रामोऽ-

( वाल्मीकि ) मुनीनें त्यांतील ज्येष्ठाचें कुश, आणि धाकट्याचें लव, अशी नांवें ठेविली. पुढें हळू हळू ते सीतेचे मुलगे विद्यासंपन्न झाले. २७ त्या मुलांचे ( वाल्मीकीनें ) उपनयनविधि केले, त्यांजकडून वेदाध्ययन करविलें, आणि मग त्या मुलांना सगळें रामायण शिकविलें. २८ हें रामायण त्रिपुरासुराचा नाश करणाऱ्या शंकरानें पार्वतीला वेदांचा गुह्य अर्थ कळावा, म्हणून सांगितलें. तेंच ( आतां ) त्या मुलांकडून वाल्मीकीनें पाठ करविलें. २९ ते अश्विनीकुमारांसारखे सुंदर कुमार तालसुरांत अत्यंत प्रवीण झाले. त्यांचा स्वरही अत्यंत मधुर होता. असे ते अरण्यांत सर्वत्र रामायणकथा गात फिरत असत. ३० देवांसारख्या मनोहर स्वरूपांचे ते ( दोन कुमार ) मुनींच्या समाजांत सर्वत्र रामकथा गातांना पाहून मुनींना आश्चर्य वाटे व ते म्हणत, ३१ 'आम्हीं येथें चिरकाल राहत आहों, दिशादिशांच्या ठायीं पुष्कळ वेळां आम्ही प्रवासही केला, तरी गंधर्वकिन्नरांत, भूलोकांत, देवांत, स्वर्गलोकांत, पातालांत, ब्रह्मसदनी अथवा सर्व लोकांत असल्या प्रकारचें गायनवादनकौशल्य आम्हांला कोठेंही आढळून आलें नाहीं, दिसलें नाहीं, किंवा ऐकायालाही मिळालें नाहीं.' ३२ अशा रीतीनें ते मुनि त्यांची प्रतिदिवशीं स्तुति करीत. तीं मुलें वाल्मीकीच्या आश्रमांत चिरकाल एकांतांत सुखानें राहिलीं. ३३ इकडे त्या अति-

श्वमेधादींश्चकार बहुदक्षिणान् । यज्ञान् स्वर्णमयीं सीतां विधाय विपुलद्युतिः ॥ ३४ ॥ तस्मिन्विताने ऋषयः सर्वे राजर्षयस्तथा । ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याः समाजग्मुर्दिदृक्षवः ॥ ३५ ॥ वाल्मीकिरपि संगृह्य गायंतौ तौ कुशीलवौ । जगाम ऋषिवाटस्य समीपं मुनिपुंगवः ॥ ३६ ॥ तत्रैकांते स्थितं शांतं समाधिविरमे मुनिम् । कुशः पप्रच्छ वाल्मीकिं ज्ञानशास्त्रं कथांतरे ॥ ३७ ॥ भगवन् श्रोतुमिच्छामि संक्षेपाद्भवतोऽखिलम् । देहिनः संसृतिर्बन्धः कथमुत्पद्यते दृढः ॥ ३८ ॥ कथं विमुच्यते देही दृढबंधाद्भवाभिधात् । वक्तुमर्हसि सर्वज्ञ मह्यं शिष्याय ते मुने ॥ ३९ ॥ वाल्मीकिरुवाच ॥ शृणु वक्ष्यामि ते सर्वं संक्षेपाद्बंधमोक्षयोः । स्वरूपं साधनं चापि मत्तः श्रुत्वा यथोदितम् ॥ ४० ॥ तथैवाचर भद्रं ते जीवन्मुक्तो भविष्यसि । देह एव महागेहमदेहस्य चिदात्मनः ॥४१॥

तेजस्वी रामानें अनेक अश्वमेधादि यज्ञ करून त्यांत मोठमोठ्या दक्षिणा (ब्राह्मणांना) दिल्या. (त्या यज्ञांत) स्वर्णमयी सीता—सीतेची सुवर्णप्रतिमा—रामानें (पत्नीस्थानीं) योजिली.[1] ३४ तो यज्ञसमारंभ पाहण्याकरितां अनेक ऋषि, राजर्षि, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आले होते. ३५ मुनिश्रेष्ठ वाल्मीकिही त्या गायन करणाऱ्या कुशलवांस बरोबर घेऊन (त्या प्रसंगाला) तेथें येऊन ऋषींकरितां योजिलेल्या मंडपाजवळ उतरला होता. ३६ एकदां समाधि उतरून (वाल्मीकि) मुनि एकांतांत शांतपणें बसले होते. तेथें अनेक प्रकारच्या गोष्टी चालल्या असतां कुशानें ज्ञानशास्त्राविषयीं प्रश्न केला. ३७ (तो म्हणाला,) 'भगवन्! आपल्या मुखानें सर्व गोष्टी थोडक्यांत ऐकाव्या, अशी माझी इच्छा आहे. देह्याला हें दृढ संसारबंधन कसें उत्पन्न होतें? ३८ तो देही ह्या संसारनामक दृढ बंधनांतून कसा सुटतो? मुने! आपण सर्वज्ञ आहां, तरी मला हें सांगावें. मी आपला शिष्य आहें.' ३९ वाल्मीकि म्हणाला, 'तुला बंधमोक्षांचें स्वरूप व संसारांतून मुक्त होण्याचें साधन थोडक्यांत सांगतों. तें मजकडून ऐकून घे व मी सांगितल्याप्रमाणें आचरण ठेव, म्हणजे तुझें कल्याण होईल, व तूं जीवन्मुक्त होशील. हा आत्मा चैतन्यरूपी असून हा अदेह आहे. देह

१. यज्ञकर्मांत पत्नीची आवश्यकता असल्यामुळें, सीतेच्या अभावीं, रामानें सीतेची सुवर्णप्रतिमा करून जवळ बसविली.

तस्याहंकार एवास्मिन्मंत्री तेनैव कल्पितः । देहगेहाभिमानं स्वं समारोप्य चिदात्मनि ॥ ४२ ॥ तेन तादात्म्यमापन्नः स्वचेष्टितमशेषतः । विदधाति चिदानंदे तद्भासितवपुः स्वयम् ॥ ४३ ॥ तेन संकल्पितो देही संकल्पनिगडावृतः । पुत्रदारगृहादीनि संकल्पयति चानिशम् ॥ ४४ ॥ संकल्पयन्स्वयं देही परिशोचति सर्वदा । त्रयस्तस्याहमो देहा अधमोत्तममध्यमाः ॥ ४५ ॥ तमःसत्त्वरजःसंज्ञा जगतः कारणं स्थितेः । तमोरूपाद्धि संकल्पान्नित्यं तामसचेष्टया ॥ ४६ ॥ अत्यंतं तामसो भूत्वा कृमिकीटत्वमाप्नुयात् । सत्त्वरूपो हि संकल्पो धर्मज्ञानपरायणः ॥४७॥ अदूरमोक्षसाम्राज्यः सुखरूपो हि तिष्ठति । रजोरूपो हि संकल्पो लोके

हें त्याचें मोठें गृह आहे. ४०,४१ ह्या देहामध्यें त्यानेंच—आत्म्यानें—कल्पिलेला एक मंत्री आहे. तो मंत्री म्हणजे अहंकार[2] हा होय. हा मंत्री स्वतांचा देहगेहाभिमान चिदात्म्यावर लादतो. ४२ मग त्याच्याशीं तादात्म्य पावून हा आपण स्वतः जें जें करितो, तें तें सर्व त्या चिदानंदरूप आत्म्यावर आरोपितो. अहंकाराचें शरीर आत्म्याकडूनच प्रकाशित होतें. ४३ आत्मा हा सगळे संकल्प त्याला करूं देतो, आणि आपण स्वतः त्या संकल्पशृंखलांनीं बांधला जाऊन पुत्र, स्त्रिया, गृहें इत्यादिकांचें चिंतन करीत राहतो. ४४ अशा चिंतनानेंच देह्याला सर्वदा शोक करीत राहाणें भाग होतें. या अहंकाराचे अधम, उत्तम आणि मध्यम असे तीन देह आहेत. ४५ त्यांचीं क्रमानें तम, सत्त्व आणि रज अशीं तीन नांवें आहेत. हे तीन देह ह्या जगताच्या स्थितीचें कारण आहेत. संकल्प तमोरूप असला, तर मनुष्याच्या हातून तामस कर्मे होऊं लागतात, आणि तो अत्यंत तमोगुणी होऊन कृमिकीटकयोनींत जन्म घेतो. सत्त्वगुणरूप संकल्पानें मनुष्य धर्मज्ञानपरायण होतो. ४६, ४७ ( त्यामुळें ) त्याला मोक्षसाम्राज्य दूर नसतें. तो सुखरूप होऊन राहातो. राजस संकल्पानें प्राणी लोकांमध्यें व्यवहारी

१. घर म्हणजे घरांत राहणारा मनुष्य नव्हे, त्याचप्रमाणें देह म्हणजे देही नव्हे. घरांत राहूं लागला म्हणजे त्याला ज्याप्रमाणे घरवाला म्हणतात, त्याचप्रमाणे जीव देहात राहूं लागला म्हणजे त्याला देही म्हणतात. वस्तुतः तो अदेह आहे. २. अहंकार—' किंबहुना काष्ठीं। वन्हि जेविं किरीटी । तेंवि प्रकृतीचिया पोटीं । गोप्यु जो असे ॥ जैसा ज्वरु धातुगतु । अपथ्याचें मिष पहातु । मग जालिया आतु । बाहेरी व्यापील ॥ नवल अहंकाराची गोठी । विशेषें न लगे अज्ञानापाठीं । सज्ञानाचे झोंबे कंठीं । तो अहंकारु गा ॥ '—ज्ञानेश्वरी १३.

स व्यवहारवान् ॥ ४८ ॥ परितिष्ठति संसारे पुत्रदारानुरंजितः । त्रिविधं तु परित्यज्य रूपमेतन्महामते ॥ ४९ ॥ संकल्पः परमाप्नोति पदमात्मपरिक्षये । दृष्टीः सर्वाः परित्यज्य नियम्य मनसा मनः । सबाह्याभ्यंतरार्थस्य संकल्पस्य क्षयं कुरु ॥ ५० ॥ यदि वर्षसहस्राणि तपश्चरसि दारुणम् । पातालस्थस्य भूस्थस्य स्वर्गस्थस्यापि तेऽनघ ॥ ५१ ॥ नान्यः कश्चिदुपायोऽस्ति संकल्पोपशमादृते । अनाबाधेऽविकारे स्वे सुखे परमपावने ॥ ५२ ॥ संकल्पोपशमे यत्नं पौरुषेण परं कुरु ॥ ५३ ॥ संकल्पतंतौ निखिला भावाः प्रोक्ताः किलानघ । छिन्ने तंतौ न जानीमः क्व यांति विभवाः पराः ॥ ५४ ॥ निःसंकल्पो यथाप्राप्तव्यवहारपरो भव । क्षये संकल्पजालस्य जीवो ब्रह्मत्वमाप्नयात ॥ ५५ ॥ अधिगत-

होतो. ४८ तो संसारांत पुत्र, स्त्रिया, यांशी क्रीडा करीत राहातो. हे महामते (कुशा)! ज्याचा संकल्प ही तीन्ही रूपें सोडून देतो, ४९ त्याला तो संकल्पच आत्मनाशांतून परम पदाची प्राप्ति करून देतो. म्हणून विषयावरील दृष्टि सोडून दे, मनानें मनाचें नियमन कर, आणि बाह्य आणि आभ्यंतर विषयसंकल्पांचा नाश कर. ५० हे अनघा! हजारों वर्षे जरी तूं भयंकर तप केलेंस, पाताळांत राहिलास, पृथ्वीवर वसती केलीस, अगर स्वर्गलोकीं वास केलास, ५१ तरी दुःखरहित, विकाररहित, आणि परम पावन अशा आत्मसुखाच्या प्राप्तीचा उपाय संकल्पाचा क्षय करण्याशिवाय दुसरा कोणताही आढळणार नाही. ५२ म्हणून संकल्पाचा नाश करण्याचे कामी धैर्यानें मोठा यत्न कर. ५३ हे निष्पापा! या संकल्परूप तंतूच्या आधारानें सर्व भाव–विकार–असतात, असें म्हटलें आहे. तो तंतूच छिन्न झाला असतां ह्या मोठमोठ्या विषयभावना कोठें जातील, हें समजत नाही. ५४ म्हणून संकल्प सोडून यथाप्राप्त व्यवहार करीत रहा. संकल्पजाळें क्षयाला गेलें असतां जीव ब्रह्मत्वाला पावतो. ५५ ब्रह्मस्वरूपी प्राप्त झालेल्याची वृत्ति धारण

१ मनाला विषयावर जाऊं देऊं नकोस. २ 'म्हणून निर्बाध निर्विकारी। सुख तें यावयालागीं करीं। सर्व संकल्प तूं वेगें हरीं। थोर प्रयत्ने कुमारा॥'–अध्यात्मरामकथा

परमार्थतामुपेत्य प्रसभमपास्य विकल्पजालमुच्चैः । अधिगमय पदं तदद्वितीयं विततसुखाय सुषुप्तचित्तवृत्तिः ॥ ५६ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे उत्तरकांडे षष्ठः सर्गः ॥ ६ ॥

## उत्तरकांड, सर्ग सातवा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ वाल्मीकिना बोधितोऽसौ कुशः सद्यो गतभ्रमः । अंतर्युक्तो बहिः सर्वमनुकुर्वंश्चचार सः ॥ १ ॥ वाल्मीकिरपि तौ प्राह सीतापुत्रौ महाधियौ । तत्र तत्र च गायंतौ पुरे वीथिषु सर्वतः ॥ २ ॥ रामस्याग्रे प्रगायेतां शुश्रूषुर्यदि राघवः । न ग्राह्यं वै युवाभ्यां तद्यदि किंचित्प्रदास्यति ॥ ३ ॥ इति तौ चोदितौ तत्र गायमानौ विचेरतुः । यथोक्तं ऋषिणा पूर्वं तत्र तत्राभ्यगायताम् ॥४॥ तां स शुश्राव

कर, विकल्पांचें मोठें जाळें बलात्कारें दूर टाकून दे, सुषुप्तिकाळीं असते, तशी चित्तवृत्ति धारण कर, आणि नित्यसुखासाठी त्या अद्वितीय पदाची प्राप्ति करून घे. ५६ ”

**उत्तरकांड, सर्ग सहावा समाप्त**

श्रीमहादेव म्हणाला, “ वाल्मीकीनें उपदेश केला असतां कुशाची भ्रांति तत्क्षणीं दूर झाली. त्या वेळेपासून तो बाह्यतः सर्व व्यवहार करीत होता, तरी अंतर्यामीं योगीच बनला होता. १ वाल्मीकीनेंही त्या महाबुद्धिमान् सीतेच्या पुत्रांना सांगितलें कीं, ‘नगरामध्यें सर्वत्र रस्त्यारस्त्यांतून ( रामायणाचें ) गायन करीत फिरा. २ रामानें तुमचें गायन ऐकण्याची इच्छा प्रदर्शित केल्यास त्याच्या पुढेंही तुम्ही गावें. जर तो तुम्हांला कांही देईल, तर तें तुम्ही घेऊं नये.’ ३ अशी मुनीनें प्रेरणा दिल्यावरून, तीं मुलें–कुश व लव–गात फिरूं लागलीं. ऋषीनें पूर्वी सांगितल्याप्रमाणें त्यांनीं सर्वत्र गायन सुरू केलें. ४ आपलें पूर्वचरित्र सर्वत्र गाइलें जात आहे, म्हणण्याची पद्धति

१. योगी–‘आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ! । सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः–॥’ भ. गीता ६.

काकुत्स्थः पूर्वचर्यां ततस्ततः। अपूर्वपाठजातिं च गेयेन समभिप्लुताम्
॥ ५ ॥ बालयो राघवः श्रुत्वा कौतूहलमुपेयिवान्। अथ कर्मांतरे राजा
समाहूय महामुनीन् ॥ ६ ॥ राज्ञश्चैव नरव्याघ्रः पंडितांश्चैव नैगमान्।
पौराणिकान्शब्दविदो ये च वृद्धा द्विजातयः ॥ ७ ॥ एतान्सर्वान्समाहूय
गायकौ संप्रवेशयत्! ते सर्वे हृष्टमनसो राजानो ब्राह्मणादयः ॥ ८ ॥
रामं तौ दारकौ दृष्ट्वा विस्मिता ह्यनिमेषणाः। अवोचन् सर्व एवैते पर-
स्परमथागताः ॥ ९ ॥ इमौ रामस्य सदृशौ बिंबाद्बिंबमिवोदितौ। जटिलौ
यदि न स्यातां न च वल्कलधारिणौ ॥ १० ॥ विशेषं नाधिगच्छामो
राघवस्यानयोस्तदा। एवं संवदतां तेषां विस्मितानां परस्परम् ॥ ११ ॥
उपचक्रमतुर्गातुं तावुभौ मुनिदारकौ। ततः प्रवृत्तं मधुरं गांधर्वमतिमानु-
षम् ॥ १२ ॥ श्रुत्वा तन्मधुरं गीतमपराह्णे रघूत्तमः। उवाच भरतं चाभ्यां
दीयतामयुतं वसु ॥ १३ ॥ दीयमानं सुवर्णं तु न तज्जगृहतुस्तदा। किमनेन

अपूर्व आहे, आणि गायनही मधुर आहे, असे श्रीरामाच्या काना आलं. ५ हं गायन करणारीं दोन लहान मुलें आहेत, हें ऐकून रामाला मोठें कौतुक वाटलें. मग यज्ञकर्मांच्या मधल्या विश्रांतीच्या वेळीं रामानें मोठमोठ्या मुनींना बोलाविलें. ६ तसेंच, त्या नरश्रेष्ठानें अनेक राजे, पंडित, वैदिक, पौराणिक, वैयाकरण, वृद्ध द्विजाति[1], या सर्वांनाही बोलावून त्या गायन करणाऱ्या (मुलां)ना आणविलें. त्या सर्व राजांना आणि ब्राह्मणादिकांना (ती मुलें पाहून) परम आनंद वाटला. ७,८ रामाला आणि त्या दोन मुलांना पाहून तेथें आलेल्या सर्व मंडळीची अनिमेष[2] दृष्टि त्यांवर जडली. त्या जमलेल्या सर्वांना मोठा विस्मय वाटला. ते आपसांत बोलूं लागले, ९ ‘हे दोघे कुमार थेट रामासारखे दिसत आहेत. जणूं काय, ही बिंबाचीं प्रतिबिंबेंच पडलीं आहेत. ह्यांच्या मस्तकीं जर जटा नसत्या व अंगावर वल्कलें नसतीं, १० तर रामामध्यें आणि ह्यांच्यामध्यें कांहींच फरक आम्हांला दिसून आला नसता. विस्मयपूर्वक आपसांत ते असें बोलत आहेत, ११ इतक्यांत त्या दोघां मुनिकुमारांनीं गाण्यास प्रारंभ केला. मनुष्यलोकीं कधींही ऐकूं यावयाचें नाहीं, असें तें गायन चालू झालें. १२ तें मधुर गाणें ऐकिल्यावर तिसरे प्रहरीं रघुश्रेष्ठ राम भरताला म्हणाला, ‘ह्यांना दहासहस्र द्रव्य द्यावें.’ १३ त्याप्रमाणें (भरत) त्यांना द्रव्य देऊं लागला, परंतु तें त्यांनीं घेतलें नाहीं. ते म्हणाले,

१. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य. २. डोळ्याची उघडझाप बंद ठेवलेली.

सुवर्णेन राजन्नौ वन्यभोजनौ ॥१४॥ इति संत्यज्य संदत्तं जग्मतुर्मुनिस-
न्निधिम् । एवं श्रुत्वा तु चरितं रामः स्वस्यैव विस्मितः ॥१५॥ ज्ञात्वा
सीताकुमारौ तौ शत्रुघ्नं चेदमब्रवीत् । हनूमंतं सुषेणं च विभीषणमथांग-
दम् ॥ १६ ॥ भगवंतं महात्मानं वाल्मीकिं मुनिसत्तमम् । आनयध्वं
मुनिवरं ससीतं देवसंमितम् ॥ १७ ॥ अस्यास्तु पर्षदो मध्ये प्रत्ययं
जनकात्मजा । करोतु शपथं सर्वे जानंतु गतकल्मषाम् ॥ १८ ॥ सीतां
तद्वचनं श्रुत्वा गताः सर्वेऽतिविस्मिताः । ऊचुर्यथोक्तं रामेण वाल्मीकिं
रामपार्षदाः ॥ १९ ॥ रामस्य हृद्गतं सर्वं ज्ञात्वा वाल्मीकिरब्रवीत् । श्वः
करिष्यति वै सीता शपथं जनसंसदि ॥ २० ॥ योषितां परमं दैवं पति-
रेव न संशयः । तच्छ्रुत्वा सहसा गत्वा सर्वे प्रोचुर्मुनेर्वचः ॥ २१ ॥
राघवस्यापि रामोऽपि श्रुत्वा मुनिवचस्तथा । राजानो मुनयः सर्वे शृणु-
ध्वमिति चाब्रवीत् ॥ २२ ॥ सीतायाः शपथं लोका विजानंतु शुभाशु-

'राजा ! ह्या सुवर्णाचा आम्हाला काय उपयोग ? अरण्यांतील फळमूळें खाऊन आमचा उदरनिर्वाह होतो !' १४ अशा रीतीनें तें दिलेलें द्रव्य ( तेथेंच ) टाकून ते कुमार ( वाल्मीकि ) मुनीजवळ गेले. तें ( त्या मुलांनी गाइलेलें ) स्वतःचें चरित्र ऐकून रामाला फार आश्चर्य वाटलें. १५ त्यानें हे सीतेचे पुत्र आहेत, असें जाणलें, आणि शत्रुघ्न, हनुमान्, सुषेण, विभीषण आणि अंगद यांना सांगितलें, १६ 'त्या महोदार, मुनिश्रेष्ठ, देवसदृश भगवान् वाल्मीकि मुनीना सीतेसह घेऊन या. १७ लोकांचा विश्वास बसावा, म्हणून ह्या सभेमध्यें जानकीनें शपथ घ्यावी. सर्व लोकांना ( सीता ) निष्पाप असल्याचें कळून यावें.' तें भाषण ऐकून सर्वांना अत्यंत आश्चर्य वाटलें. रामाच्या सेवकांनी रामानें सांगितल्याप्रमाणें, वाल्मीकीकडे जाऊन त्याला सर्व निवेदन केलें. १८,१९ रामाचें सर्व हृद्गत जाणून वाल्मीकि म्हणाला, 'उद्यां सभेमध्यें सर्व लोकांसमक्ष सीता शपथ करणार आहे. २० स्त्रियांचें परम दैवत म्हटलें म्हणजे पतिच होय, यांत संशय नाही.' तें ऐकून ते सर्व ( दूत ) तसेच गेले, आणि त्यांनीं मुनीचें म्हणणें रामाला कळविलें. तें मुनीचें भाषण ऐकून राम देखील म्हणाला, 'सकल राजे आणि मुनि हो ! ऐका. २१,२२ ( उद्यां येथें ) सीता शपथ करणार आहे. आपण त्यावरून खऱ्याखोट्याचा निर्णय ठरवावा.'

भम् । इत्युक्ता राघवेणाथ लोकाः सर्वे दिदृक्षवः ॥ २३ ॥ ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याः शूद्राश्चैव महर्षयः । वानराश्च समाजग्मुः कौतूहलसमन्विताः ॥ २४ ॥ ततो मुनिवरस्तूर्णं ससीतः समुपागमत् । अग्रतस्तमृषिं कृत्वाऽऽयांती किंचिदवाङ्मुखी ॥२५॥ कृतांजलिर्बाष्पकंठी सीता यज्ञं विवेश तम् । दृष्ट्वा लक्ष्मीमिवायांतीं ब्रह्माणमनुयायिनीम् ।२६॥वाल्मीकेः पृष्ठतः सीतां साधुवादो महानभूत् । तदा मध्ये जनौघस्य प्रविश्य मुनिपुंगवः ॥ २७ ॥ सीतासहायो वाल्मीकिरिति प्राह च राघवम् । इयं दाशरथे सीता सुव्रता धर्मचारिणी ॥ २८ ॥ अपापा ते पुरा त्यक्ता ममाश्रमसमीपतः । लोकापवादभीतेन त्वया राम महावने ॥२९॥ प्रत्ययं दास्यते सीता तदनुज्ञातुमर्हसि । इमौ तु सीतातनयाविमौ यमलजातकौ ॥ ३० ॥ सुतौ तु तव दूर्धर्षौ तथ्यमेतद्ब्रवीमि ते । प्रचेतसोऽहं दशमः

रामानें असें सांगितल्यावर ते सर्व लोक सीतेला पाहण्याच्या इच्छेनें, २३ ( दुसरे दिवशीं ) तेथें आले. त्यांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, मोठमोठे ऋषि, आणि वानर मोठ्या कौतुकानें तेथें जमले होते. २४ नंतर मुनिश्रेष्ठ वाल्मीकि सीतेला बरोबर घेऊन तेथें आले. सीता वाल्मीकीच्या मागून तोंड किंचित् खालीं घालून आली. २५ तिनें हात जोडले होते. तिचा कंठ बाष्पानीं दाटून आला होता. अशा स्थितींत ती त्या यज्ञमंडपांत आली. ब्रह्मदेवाच्या मागून ज्याप्रमाणें लक्ष्मी चालत यावी, त्याप्रमाणें ती सीता ( वाल्मीकि ) मुनीच्या मागून येतांना पाहून सर्वत्र साधुवाद–सीतेविषयीं गौरवपर शब्द–निघूं लागले. मग तो मुनिश्रेष्ठ ( वाल्मीकि ) सीतेसह सभास्थानीं आला, आणि रामाला म्हणाला कीं, 'दाशरथे ( रामा )! ही सीता परम पतिव्रता आहे. ती धर्मचारिणी–धर्मानुसार वागणारी–आहे. २६,२७,२८ ती निष्पाप आहे. तरीही लोकापवादाला भिऊन, हे रामा! तिला तूं मोठ्या वनांत माझ्या आश्रमाजवळ बरेच दिवसांपूर्वीं आणून सोडलेंस. २९ आपल्या पातिव्रत्याविषयीं लोकांचा विश्वास पटावा, म्हणून ती कांहीं प्रत्यय दाखविणार आहे. तरी तिला परवानगी दे. हे दोघे ( कुश-लव ) सीतेचे पुत्र असून जुळे जन्मलेले आहेत. ३० हे तुझे पुत्र असून ( कोणालाही ) दुर्धर्ष-अजिंक्य-असे आहेत. हे रघुकुल-

१. 'सती ती अतरीं सद्गदित । होऊन, जोडून दोनी हात । मुनीमागून पद क्रमीत । सभांगणातें पातली ॥ '–अध्यात्मरामकथा. २. प्रत्यय दाखविणार–खात्री पटविणार आहे.

पुत्रो रघुकुलोद्वह ॥ ३१ ॥ अनृतं न स्मराम्युक्तं यथेमौ तव पुत्रकौ । बह्वन्वर्षगणान् सम्यक्तपश्चर्या मया कृता ॥ ३२ ॥ नोपाश्नीयां फलं तस्या दुष्टेयं यदि मैथिली । वाल्मीकिनैवमुक्तस्तु राघवः प्रत्यभाषत ॥३३॥ एवमेतन्महाप्राज्ञ यथा वदसि सुव्रत । प्रत्ययो जनितो मह्यं तव वाक्यैरकिल्बिषैः ॥३४॥ लंकायामपि दत्तो मे वैदेह्या प्रत्ययो महान् । देवानां पुरतस्तेन मंदिरे संप्रवेशिता ॥३५॥ सेयं लोकभयाद्ब्रह्मन्नपापापि सती पुरा । सीता मया परित्यक्ता भवांस्तत्क्षंतुमर्हति ॥ ३६ ॥ ममैव जातौ जानामि पुत्रावेतौ कुशीलवौ । शुद्धायां जगतीमध्ये सीतायां प्रीतिरस्तु मे ॥ ३७ ॥ देवाः सर्वे परिज्ञाय रामाभिप्रायमुत्सुकाः । ब्रह्माणमग्रतः कृत्वा समाजग्मुः सहस्रशः ॥ ३८ ॥ प्रजाः समागमन्हृष्टाः सीता कौशेयवासिनी । उदङ्मुखी ह्यधोदृष्टिः प्रांजलिर्वाक्यमब्रवीत ॥ ३९ ॥

श्रेष्ठा ! मी प्रचेतसाचा[१] दहावा पुत्र आहें. ३१ मी कधी असत्य बोलल्याचें मला स्मरत नाहीं. सत्य आहे, तेंच मी सांगतों कीं, हे तुझे पुत्र आहेत. अनेक वर्षें मी उत्तम तपश्चर्या केली आहे. ३२ जर सीतेच्या हातून दुराचरण घडलें असेल, तर त्या माझ्या सर्व तपश्चर्येच्नें फळ मला न मिळो. वाल्मीकीनें असें सांगितल्यावर राम बोलला, ३३ ' हे सुव्रता ! आपण महाज्ञानी आहां. आपण म्हणतां, तें सर्व सत्य आहे. आपल्या पवित्र शब्दांनीच मला ( सीताविषयीं ) प्रत्यय आला आहे. ३४ लंकेमध्येंही जानकीनें देवांसमक्ष शपथपूर्वक खात्री पटविल्यामुळें, मी तिला मंदिरांत घेतलें ३५ ब्रह्मन् ! सीता ही अपाप असतांही लोकभयास्तव मी हिचा कांहीं वर्षांपूर्वी त्याग केला, ह्याबद्दल आपण मला क्षमा करावी. ३६ हे दोघे पुत्र कुशलव मजपासूनच झाले आहेत, हें मी जाणतों. सीतेच्या शुद्धतेविषयीं जगतांत सर्वत्र प्रसिद्धि आहेच, तरी तिजवर माझी प्रीति असो. ३७ सर्व देवाना रामाचा अभिप्राय कळला असल्यामुळें, सहस्रशः देव ब्रह्मदेवाला आपला पुढारी करून मोठ्या उत्सुकतेनें तेथें आले. ३८ सर्व प्रजाजन आनंदित होऊन त्या स्थली प्राप्त झाले. सीतेनें रेशमी वस्त्र परिधान केलें होतें. उत्तरेकडे तोंड करून व भूमीकडे दृष्टि लावून ती उभी होती. हात जोडून ती म्हणाली, ३९

१ प्रचेतानामक प्रजापतीचा. एकंदर प्रजापति दहा आहेत.

रामादन्यं यथाहं वै मनसापि न चिंतये । तथा मे धरणी देवी विवरं दातुमर्हति ॥४०॥ तथा शपंत्याः सीतायाः प्रादुरासीन्महाद्भुतम् । भूतलाद्दिव्यमत्यर्थं सिंहासनमनुत्तमम् ॥ ४१ ॥ नागेंद्रैर्ध्रियमाणं च दिव्यदेहै रविप्रभम् । भूदेवी जानकीं दोर्भ्यां गृहीत्वा स्नेहसंयुता ॥४२॥ स्वागतं तामुवाचैनामासने संन्यवेशयत् । सिंहासनस्थां वैदेहीं प्रविशंतीं रसातलम् ॥ ४३ ॥ निरंतरा पुष्पवृष्टिर्दिव्या सीतामवाकिरत् । साधुवादश्च सुमहान् देवानां परमाद्भुतः ॥४४॥ ऊचुश्च बहुधा वाचो ह्यंतरिक्षगताः सुराः । अंतरिक्षे च भूमौ च सर्वे स्थावरजंगमाः ॥ ४५ ॥ वानराश्च महाकायाः सीताशपथकारणात् । केचिच्चिंतापरास्तस्याः केचिद्ध्यानपरायणाः ॥ ४६ ॥ केचिद्रामं निरीक्षंतः केचित्सीतामचेतसः । मुहूर्तमात्रं तत्सर्वं तूष्णींभूतमचेतनम् ॥ ४७ ॥ सीताप्रवेशनं दृष्ट्वा सर्वं संमोहितं

'रामावांचून अन्य कोणाही पुरुषाचे मी अतःकरणात चितन केले नसेल, तर पृथ्वी देवी आपल्या पोटांत मला स्थल देवो.' ४० सीतेनें अशी शपथ घेतांच पृथ्वीतलातून एक अत्यंत आश्चर्यावह, अतिदिव्य, अत्युत्तम सिंहासन प्रकट झालें. ४१ तें सूर्यासारखें तेजस्वी असून दिव्यदेही अशा मोठमोठ्या नागांनी उचलून धरिलें होतें. भूदेवीनें आपल्या दोन्ही बाहूंनी जानकीला प्रेमपूर्वक आलिंगन दिलें, आणि तिचें स्वागत करून तिला त्या सिंहासनावर बसविलें. सिंहासनावर बसून ती जानकी रसातलात प्रवेश करूं लागली, तेव्हा ४२,४३ तिजवर सारखी दिव्य पुष्पवृष्टि झाली. देवांच्या मुखांतून 'शाबास, शाबास,' अशा प्रकारचे सारखे अद्भुत स्तुतिवाद निघूं लागले. ४४ आकाशांत असलेल्या देवांत, अंतरिक्षातील आणि पृथ्वीतलावरील सर्व स्थावरजंगम भूतात, तसेंच मोठमोठ्या धिप्पाड शरीरांच्या वानरांत, सीतेच्या शपथेसंबंधानें अनेक उद्गार निघूं लागले. कोणाला तिजविषयी चिंता वाटूं लागली, तर कोणी सीतेच्या मूर्तीचें ध्यान करूं लागले. ४५,४६ कोणी रामाकडे दृष्टि लावून राहिले, तर कोणी सीतेसंबंधी विचार मनांत आणून दिङ्मूढ होऊन राहिले. कांही काळपर्यंत ती सर्व जागा अगदी अचेतन—शांत—होऊन गेली. ४७ सीता पृथ्वीच्या उदरांत प्रविष्ट झाली, हें पाहून सर्व जगताला मोठा मोह पडला.

१. 'मग भूदेवीने स्वकराहा । जानकी उचलूनिया लवलाहीं । सिंहासनीं बसविली पाहीं । मातृस्नेहेंकरोनी ॥'—अध्यात्मरामकथा. २ भूगर्भांत.

जगत् । रामस्तु सर्वं ज्ञात्वैव भविष्यत्कार्यगौरवम् ॥ ४८ ॥ अजानान्निव
दुःखेन शुशोच जनकात्मजाम् । ब्रह्मणा ऋषिभिः सार्धं बोधितो रघु-
नंदनः ॥ ४९ ॥ प्रतिबुद्ध इव स्वप्नाच्चकारानंतराः क्रियाः । विससर्ज
ऋषीन् सर्वानृत्विजो ये समागताः ॥ ५० ॥ तान् सर्वान् धनरत्नाद्यै-
स्तोषयामास भूरिशः । उपादाय कुमारौ तावयोध्यामगमत्प्रभुः ॥५१॥
तदादि निःस्पृहो रामः सर्वभोगेषु सर्वदा । आत्मचिंतापरो नित्यमे-
कांते समुपस्थितः ॥ ५२ ॥ एकांते ध्याननिरते एकदा राघवे सति ।
ज्ञात्वा नारायणं साक्षात्कौसल्या प्रियवादिनी ॥ ५३ ॥ भक्त्यागत्य
प्रसन्नं तं प्रणता प्राह हृष्टधीः । राम त्वं जगतामादिरादिमध्यांतवर्जितः
॥ ५४ ॥ परमात्मा परानंदः पूर्णः पुरुष ईश्वरः । जातोऽसि मे गर्भगृहे
मम पुण्यातिरेकतः ॥ ५५ ॥ अवसाने ममाप्यद्य समयोऽभद्रघूत्तम ।

रामाला हें सर्व ठाऊक होतेच, तरी पुढील कार्याचें महत्व लक्ष्यांत आणून तो अज्ञान्या-सारखा मोठ्या दुःखानें सीतेबद्दल शोक करूं लागला. ब्रह्मदेवानें आणि अनेक ऋषींनी त्या रघुनंदना ( रामा )ला उपदेश केला, ४८,४९ तेव्हां स्वप्नांतून जागा झाल्याप्रमाणें राम देहभानावर आला, आणि त्यानें बाकीची सर्व यज्ञकर्मे शेवटास नेलीं, आणि आलेल्या सर्व ऋषींची आणि ऋत्विजांची रवानगी केली. ५० त्या सर्वांना विपुल धन ( रत्नें, वगैरे ) दिलें, आणि त्या दोन मुलांना घेऊन प्रभु ( रामचंद्र ) अयोध्येला आला ५१ तेव्हांपासून राम सर्व प्रकारच्या उपभोगांविषयीं निरिच्छ होऊन सर्वदा आत्मचिंतनांत निमग्न होऊन एकांतांत राहूं लागला.५२ कोणी एके वेळीं राम एकांतांत आत्मध्याननिमग्न होऊन बसला होता. मधुरभाषिणी कौसल्या राम म्हणजे प्रत्यक्ष नारायणच होय, असें समजत होती. ५३ म्हणून ती एकदां भक्तिपूर्वक (रामाकडे) आली, आणि नम्रतापूर्वक नमस्कार करून मोठ्या आनंदानें त्या प्रसन्नमुख ( रामाला ) म्हणाली, ' हे रामा ! तं सर्व जगतांचा जनिता आहेस, तूं आदिमध्यांतरहित आहेस, ५४ तूं परमात्मा, सच्चिदानंदस्वरूप, पूर्ण, सर्वांतर्यामी असणारा, असा ईश्वर आहेस. तरी तूं माझ्या गर्भगृहीं जन्म घेतलास, हें माझ्या मोठ्या पुण्याचेंच फल होय. ५५ हे रघूत्तमा ! माझ्या म्हातारपणांत कां होईना, पण आज तुला प्रश्न करण्याला वेळ मिळाला

१. उत्पन्नकर्ता. २. सर्वव्यापक.

नाद्याप्यबोधजः कृत्स्नो भवबंधो निवर्तते ॥ ५६ ॥ इदानीमपि मे ज्ञानं भवबंधनिवर्तकम् । यथा संक्षेपतो भूयात्तथा बोधय मां विभो ॥ ५७॥ निर्वेदवादिनीमेवं मातरं मातृवत्सलः । दयालुः प्राह धर्मात्मा जराजर्जरितां शुभाम् ॥ ५८ ॥ मार्गास्त्रयो मया प्रोक्ताः पुरा मोक्षाप्तिसाधकाः । कर्मयोगो ज्ञानयोगो भक्तियोगश्च शाश्वतः ॥५९॥ भक्तिर्विभिद्यते मातस्त्रिविधा गुणभेदतः । स्वभावो यस्य यस्तेन तस्य भक्तिर्विभिद्यते ॥६०॥ यस्तु हिंसां समुद्दिश्य दंभं मात्सर्यमेव वा । भेददृष्टिश्च संरंभी भक्तो मे तामसः स्मृतः ॥ ६१ ॥ फलाभिसंधिर्भोगार्थी धनकामो यशस्तथा । अर्चादौ भेदबुद्ध्या मां पूजयेत्स तु राजसः ॥ ६२ ॥ परस्मिन्नर्पितं यस्तु कर्म निर्हरणाय वा । कर्तव्यमिति वा कुर्याद्भेदबुद्ध्या स सात्त्विकः ॥ ६३ ॥ मद्गुणाश्रयणादेव मय्यनंतगुणालये । अवि-

आहे. हें अज्ञानापासून उत्पन्न झालेलं संसारबंधन अजून समूळ नाहींसें होत नाहीं ५६ हे विभो ! जेणेंकरून संसारबंधन नष्ट होईल, असा उपदेश सध्याच्या स्थितीतही मला कर. ५७ (विषयोपभोगासंबंधीं) वैराग्य धारण करून त्या मातेनें असा प्रश्न केला असता त्या मातृवत्सल, दयाळू व धर्मशील (रामानें) त्या जरेनें जीर्ण झालेल्या आपल्या सुचरित मातेला म्हटलें, ५८ 'पूर्वीं मोक्ष प्राप्त करून देणारे असे तीन मार्ग मीं सांगितले. ते कर्मयोग, ज्ञानयोग, आणि अखंड भक्तियोग हे होत. ५९ आई ! त्रिगुणभेदांनीं भक्तीचेही तीन प्रकार झाले आहेत. ज्या ज्या स्वभावाचा मनुष्य असेल, त्या त्याप्रमाणें त्याची भक्ति भिन्न असते. ६० जो मनुष्य हिंसा, दंभ—ढोंग—अगर मात्सर्य हीं साधण्याच्या उद्देशानें भेददृष्टि[1] ठेवून त्या आग्रहानें माझी भक्ति करितो, त्याला 'तामस' म्हणतात. ६१ जो कोणी कांहीं विशिष्ट फलप्राप्तीकरितां, भोगसुखाकरितां[2], धन अगर कीर्ति ह्याकरितां 'मी पूजक वेगळा व पूज्य ईश्वर वेगळा,' अशा भेदबुद्धीनें मूर्ति इत्यादिकाच्या ठिकाणीं माझें पूजन करितो तो राजस होय. ६२ आचरिलेलें कर्म पापनाशाकरितां जो ईश्वराला—मला—समर्पण करितो, अथवा कर्तव्य असें समजून तें कर्म, भेदबुद्धीनें कां होईना, पण करितो, तो भक्त सात्त्विक होय. ६३ गंगेचें पाणी समुद्रांत मिळालें असतां तें जसें एकरूप होतें, त्याप्रमाणेंच अनंत गुणांचा आधार असा जो मी, त्या माझ्या गुणांचाच आश्रय[3] करून अवि-

१. हा माझा मित्र, हा माझा शत्रु अशा प्रकारची भेददृष्टि. २ स्वर्गादि सुखें प्राप्त व्हावीं म्हणून. ३. माझे कीर्तन, चिंतन, स्मरण इत्यादि गोष्टींनीं.

च्छिन्ना मनोवृत्तिर्यथा गंगांबुनोऽबुधौ । तदेव भक्तियोगस्य लक्षणं निर्गुणस्य हि ॥ ६४ ॥ अहैतुक्यव्यवहिता या भक्तिर्मयि जायते । सा मे सालोक्यसामीप्यसार्ष्टिसायुज्यमेव वा ॥ ६५ ॥ ददात्यपि न गृह्णंति भक्ता मत्सेवनं विना । स एवात्यंतिको योगो भक्तिमार्गस्य भामिनि ॥ ६६ ॥ मद्भावं प्राप्नुयात्तेन अतिक्रम्य गुणत्रयम् । महता कामहीनेन स्वधर्माचरणेन च ॥ ६७ ॥ कर्मयोगेन शस्तेन वर्जितेन विहिंसनम् । मद्दर्शनस्तुतिमहापूजाभिः स्मृतिवंदनैः ॥ ६८ ॥ भूतेषु मद्भावनयाऽसंगेनासत्यवर्जनैः । बहुमानेन महतां दुःखिनामनुकंपया ॥ ६९ ॥ स्वसमानेषु मैत्र्या च यमादीनां निषेवया । वेदान्तवाक्यश्रवणान्मम नामानुकीर्तनात् ॥ ७० ॥ सत्संगेनार्जवेनैव ह्यहमः परिवर्जनात् । कांक्षया मम धर्मस्य परिशुद्धांतरो जनः ॥ ७१ ॥ मद्गुणश्रवणादेव याति मामंजसा

च्छिन्न अंतःकरणवृत्ति माझ्या स्वरूपी लावणें, हेंच निर्गुण भक्तियोगाचें लक्षण होय. ६४ फलेच्छा टाकून माझी अखंड भक्ति मनांत उत्पन्न झाली, म्हणजे ती भक्ताला सालोक्य, सामीप्य, स्वरूपता किंवा सायुज्य, यांपैकी पाहिजे ती मुक्ति देत्ये. परंतु माझे भक्तजन माझ्या सेवेवांचून अन्य कशाचाही स्वीकार करीत नाहीत आणि हे स्त्रिये ! अत्युत्तम भक्तियोग म्हटला म्हणजे सालोक्यादि मुक्तींचा त्याग–हाच होय. ६५,६६ ह्याच्या योगानें मनुष्य त्रिगुणांचें उल्लंघन करून मत्स्वरूपीं प्राप्त होतो. ( आतां कर्मयोगाचा विचार सांगतों. ) कोणतीही फलेच्छा मनांत न धरितां स्वधर्माचरण करावें. ६७ ज्यांत हिंसा नाही, अशा प्रकारची शास्त्रांनी सांगितलेली कर्मे करावी. माझें दर्शन घ्यावें. माझी स्तुति करावी, माझ्या महापूजा कराव्या, माझें स्मरण व वंदन करावें ६८ सर्व भूतांच्या ठिकाणी मद्भाव ठेवावा, कोठेंही आसक्ति ठेवूं नये, असत्याचा त्याग करावा, मोठ्यांना पुष्कळ मान द्यावा, दुःखितांवर दया करावी, ६९ समान योग्यतेच्या मनुष्याशी मैत्री धरावी, यमनियमादि पाळावे, वेदांतवाक्यांचें श्रवण करावें, माझें नामकीर्तन करावें, ७० सत्संगति धरावी, सर्वांशी सरळपणानें वागावें, अहंकाराचा त्याग करावा, माझ्या धर्मावर आदरपूर्वक निष्ठा धरावी. असें वर्तन ठेविल्यानें मनुष्याचें चित्त शुद्ध होतें. ७१ ज्याप्रमाणें वायुवशेंकरून गंध

१. अखंड. २. येथपासून भक्तियोगाचे उपाय सांगितले आहेत.

**जनः । यथा वायुवशाद्गंधः स्वाश्रयाद्घ्राणमाविशेत् ॥ ७२ ॥ योगाभ्यासरतं चित्तमेवमात्मानमाविशेत् । सर्वेषु प्राणिजातेषु ह्यहमात्मा व्यवस्थितः ॥ ७३ ॥ तमज्ञात्वा विमूढा मां कुरुते केवलं बहिः । क्रियोत्पन्नैर्नैकभेदैर्द्रव्यैर्मे नांब तोषणम् ॥ ७४ ॥ भूतावमानिनार्चायामर्चितोऽहं न पूजितः ॥ ७५ ॥ तावन्मामर्चयेद्देवं प्रतिमादौ स्वकर्मभिः । यावत्सर्वेषु भूतेषु स्थितं चात्मनि न स्मरेत् ॥ ७६ ॥ यस्तु भेदं प्रकुरुते स्वात्मनश्च परस्य च । भिन्नदृष्टेर्भयं मृत्युस्तस्य कुर्यान्न संशयः ॥ ७७ ॥ मामतः सर्वभूतेषु परिच्छिन्नेषु संस्थितम् । एकं ज्ञानेन मानेन मैत्र्या चार्चेदभिन्नधीः ॥ ७८ ॥ चेतसैवानिशं सर्वभूतानि प्रणमेत्सुधीः । ज्ञात्वा मां चेतनं शुद्धं जीवरूपेण संस्थितम् ॥ ७९ ॥ तस्मात्कदाचिन्नेक्षेत भेदमीश्वर-**

आश्रयभूत पदार्थांवरून नाकांत शिरतो, त्याचप्रमाण असा मनुष्य माझ्या गुणश्रवणाच्या योगेंकरून माझ्या स्वरूपी तत्काल प्राप्त होतो ७२ ह्या रीतीनें योगाभ्यासांत चित्त आसक्त झालें, म्हणजे तें आत्मस्वरूपात प्रवेश करतें मातें! मी सर्व प्राणिमात्रामध्यें आत्मरूपानें राहात आहें, हें न ओळखतां, बाहेरून मूर्ख लोक मोठ्या श्रमांनी संपादिलेल्या अनेक प्रकारच्या ( गंधपुष्पादि ) द्रव्यांनी–पदार्थांनी–माझे पूजन करितील, त्यापासून मला संतोष होणार नाही. ७३,७४ जो भूताचा–प्राण्यांचा–अपमान करितो, अशा मनुष्यानें माझी पूजा केली, तरी ती न केल्यासारखीच होय. ७५ जोंपर्यंत मी सर्वभूतस्थित आहें, अशी प्रतीति अंतःकरणांत येत नाही, तोंपर्यंत मनुष्यानें कर्मानुष्ठानेंकरून प्रतिमादिकांच्या ठिकाणी माझी पूजा करावी. ७६ जीवात्मा आणि परमात्मा हे भिन्न आहेत, अशी भावना ज्याच्या अंतःकरणात वसत असते, अशा भिन्नदृष्टि मनुष्याला मृत्यु भय घालणार, यांत संशय नाही. ७७ म्हणून वेगवेगळ्या सर्व भूतांमध्यें मी वास करीत असतों, अशी भावना ठेवून, आणि भेदबुद्धि टाकून देऊन ज्ञानानें, प्रेमानें आणि गौरवानें माझी एकट्याची आराधना करावी. ७८ बुद्धिमान् पुरुषानें मी चैतन्यरूप शुद्ध आत्मा जीवरूपानें सर्व भूतांचे ठिकाणी राहात असतों, अशी भावना ठेवून सर्व प्राण्यांना अंतःकरणपूर्वक नित्य वंदन करावें. ७९ म्हणून ईश्वर आणि जीव हे निराळे आहेत, अशी

१ गंधाला आश्रयस्थान अशा पुष्पादिकावरून २ सर्व भूतामध्ये राहणारा ( ईश्वर ).

जीवयोः । भक्तियोगो ज्ञानयोगो मया मातरुदीरितः ॥ ८० ॥ आलंब्यैकतरं वापि पुरुषः शममृच्छति । ततो मां भक्तियोगेन मातः सर्वेहृदि स्थितम् ॥ ८१ ॥ पुत्ररूपेण वा नित्यं स्मृत्वा शांतिमवाप्स्यसि । छित्वा रामस्य वचनं कौसल्यानंदसंयुता ॥ ८२ ॥ रामं सदा हृदि ध्यात्वा श्रुत्त्वा संसारबंधनम् । अतिक्रम्य गतीस्तिस्रोऽप्यवाप परमां गतिम् ॥८३॥ कैकेयी चापि योगं रघुपतिगदितं पूर्वमेवाधिगम्य श्रद्धाभक्तिप्रशांता हृदि रघुतिलकं भावयंती गतासुः । गत्वा स्वर्गं स्फुरंती दशरथसहिता मोदमानावतस्थे माता श्रीलक्ष्मणस्याप्यतिविमलमतिः प्राप भर्तुः समीपम् ॥ ८४ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे उत्तरकांडे मातॄणां स्वर्गप्रस्थानं नाम सप्तमः सर्गः ॥ ७ ॥

भेदबुद्धि कधींही मनांत आणू नये[१]. माते ! मी तुला भक्तियोग आणि ज्ञानयोग सांगितला. ८० ह्यांपैकीं कोणत्याही एका मार्गाचा अवलंब केल्यानें मनुष्याला शांति प्राप्त होते. म्हणून माते ! 'सर्वांच्या अंतर्यामी राहणारा,' अशा भक्तियोगानें, अगर 'मी तुझा पुत्र आहें,' अशा भावनेनें नित्य माझें स्मरण करीत जा. अशा योगानें तुला शांति प्राप्त होईल.' रामाचें ( हें ) भाषण ऐकून कौसल्येला ( परम ) आनंद वाटला. ८१,८२ अंतःकरणांत सर्वदा रामाचें ध्यान करीत राहिल्यानें तिचीं सर्व संसारबंधनें तुटून गेलीं, आणि तिन्हीही–सात्त्विक, राजस आणि तामस ह्या गतींना उल्लंघून ती परम पदाला प्राप्त झाली. ८३ कैकेयीला रामानें पूर्वींच योगाचा उपदेश केला होता. त्यामुळें रामाच्या वचनावर तिची श्रद्धा व भक्ति होती. शांतचित्तानें रघुवीरतिलकाचे ती चिंतन करीत असे. शेवटीं मृत्यु आल्यावर स्वर्गलोकीं जाऊन दशरथासह तीही आनंदांत राहिली. तेथें तिला दिव्य कांति प्राप्त झाली. तसेंच, लक्ष्मणाची माता ( सुमित्रा ) निर्मलमति पावून पतीच्या सन्निध पोंचली. ८४"

**उत्तरकांड, सर्ग सातवा समाप्त.**

१. सर्वत्र एकच चैतन्यरूप परमात्मा व्यापून आहे असें समजून वागावें.

## उत्तरकांड, सर्ग आठवा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ अथ काले गते कस्मिन् भरतो भीमविक्रमः । युधाजिता मातुलेन ह्याहूतोऽगात्ससैनिकः ॥ १ ॥ रामाज्ञया गतस्तत्र हत्वा गंधर्वनायकान् । तिस्रः कोटीः पुरे द्वे तु निवेश्य रघुनंदनः ॥ २ ॥ पुष्करं पुष्करावत्यां तक्षं तक्षशिलाह्वये । अभिषिच्य सुतौ तत्र धनधान्यसुहृद्वृतौ ॥ ३ ॥ पुनरागत्य भरतो रामसेवापरोऽभवत् । ततः प्रीतो रघुश्रेष्ठो लक्ष्मणं प्राह सादरम् ॥ ४ ॥ उभौ कुमारौ सौमित्रे गृहीत्वा पश्चिमां दिशम् । तत्र भिल्लान्विनिर्जित्य दुष्टान् सर्वापकारिणः ॥५॥ अंगदश्चित्रकेतुश्च महासत्त्वपराक्रमौ । द्वयोर्द्वे नगरे कृत्वा गजाश्वधनरत्नकैः ॥६॥ अभिषिच्य सुतौ तत्र शीघ्रमागच्छ मां पुनः ।

श्रीशंकर म्हणाले, " अशा रीतीने ( राम राज्य करीत असतां ) कांहीं काळ गेल्यावर एकदां महापराक्रमी भरताला त्याच्या युधाजित् मामाकडून बोलावणें आलें. त्यावरून तो तिकडे सैन्यासह गेला. १ रामाच्या आज्ञेनें तेथें जाऊन तीन कोटि गंधर्वनायकांचा त्या रघुनंदना (भरता)नें वध केला, आणि तेथें दोन नगरें वसविलीं. २ पुष्करावतीत पुष्कराला, व तक्षशिलानामक नगरांत तक्षाला अभिषेक करून व तेथें त्या राजपुत्रांस द्रव्य, धान्य, मित्र यांची जोड मिळवून देऊन, ३ भरत पुन. परत आला, आणि रामसेवा तत्परतेनें करूं लागला. तेव्हां रघुश्रेष्ठ रामाला अत्यंत आनंद झाला, आणि तो आदरपूर्वक लक्ष्मणाला म्हणाला, ४ ' लक्ष्मणा ! तूं आपल्या दोन्ही पुत्रांना घेऊन पश्चिमदिशेकडे जा, आणि तेथें सर्वांना अपकार करणाऱ्या दुष्ट भिल्लांना जिंकून टाक. ५ अंगद आणि चित्रकेतु हे दोघेही मोठे बुद्धिमान् तसेच पराक्रमीही आहेत. त्या दोघांच्या नावें दोन नगरें वसवून व त्यांत त्यांस हत्ती, घोडे, द्रव्य आणि रत्नें यांचा पुरवठा करून देऊन, ६ त्या ठिकाणीं त्या पुत्रांना राज्याभिषेक कर, आणि पुनः लवकर मजकडे ये. '

१. आपल्या देशांतील लोकांस, जवळचे गंधर्व लोक पीडा देतात, त्यांचा बंदोबस्त करण्याकरितां युधाजितानें भरताला बोलाविलें होतें. २ पुष्कर व तक्ष हीं भरताच्या पुत्रांचीं नावें होतीं. ह्यांच्याच नावावरून नवीन वसविलेल्या नगरास ' पुष्करावती ' व ' तक्षशिला ' हीं नावें ठेवण्यांत आलीं. ३. अंगद आणि चित्रकेतु हीं लक्ष्मणाच्या मुलांचीं नावें होत.

रामस्याज्ञां पुरस्कृत्य गजाश्वबलवाहनः ॥ ७ ॥ गत्वा हत्वा रिपून्
सर्वान् स्थापयित्वा कुमारकौ । सौमित्रिः पुनरागत्य रामसेवापरोऽभवत्
॥ ८ ॥ ततस्तु काले महति प्रयाते रामं सदा धर्मपथे स्थितं हरिम् ।
द्रष्टुं समागादृषिवेषधारी कालस्ततो लक्ष्मणमित्युवाच ॥ ९ ॥ निवेद-
यस्वातिबलस्य दूतं मां द्रष्टुकामं पुरुषोत्तमाय । रामाय विज्ञापनमस्ति
तस्य महर्षिमुख्यस्य चिराय धीमन् ॥ १० ॥ तस्य तद्वचनं श्रुत्वा
सौमित्रिस्त्वरयान्वितः । आचचक्षेऽथ रामाय स संप्राप्तं तपोधनम् ॥ ११ ॥
एवं ब्रुवंतं प्रोवाच लक्ष्मणं राघवो वचः । शीघ्रं प्रवेश्यतां तात मुनिः
सत्कारपूर्वकम् ॥ १२ ॥ लक्ष्मणस्तु तथेत्युक्त्वा प्रावेशयत तापसम् ।
स्वतेजसा ज्वलंतं तं घृतसिक्तं यथानलम् ॥ १३ ॥ सोऽभिगम्य रघुश्रेष्ठं
दीप्यमानः स्वतेजसा । मुनिर्मधुरवाक्येन वर्धस्वेत्याह राघवम् ॥ १४ ॥

रामाची आज्ञा मान्य करून हत्ती, घोडे, सैन्य व वाहनें यांसह ( लक्ष्मण ) तिकडे गेला, आणि सर्व शत्रूंचा वध करून व तेथें आपल्या दोघां पुत्रांची स्थापना करून तो लक्ष्मण मागें परतला, व रामसेवेंत पूर्ववत् तत्पर राहिला. ७,८ यानंतर बराच काळ निघून गेल्यावर एकदां त्या सतत धर्ममार्गानें चालणाऱ्या रामरूपी हरीला भेटण्याकरितां म्हणून ऋषिरूप धारण करून काल[1] आला, आणि तो लक्ष्मणाला म्हणाला, ९ ‘ हे बुद्धिमंता ( लक्ष्मणा ) ! मी अतिबलनामक ऋषीचा दूत असून पुरुषोत्तमा-( रामा )ला भेटण्याची माझी इच्छा आहे. त्या श्रेष्ठ महर्षीला बरेच दिवसांपासून रामाला कांहीं विज्ञापना करावयाची आहे. तरी ही गोष्ट रामाला कळीव.’ १० तें त्याचें भाषण ऐकून लक्ष्मण त्वरेनें रामाकडे गेला, आणि त्यानें कोणी तपस्वी आल्याचें रामाला सांगितलें. ११ लक्ष्मणाच्या तोंडचे हे शब्द ऐकून राम त्याला म्हणाला, ‘ बा ( लक्ष्मणा ) ! सत्कारपूर्वक मुनीला लवकर घेऊन ये. ’ १२ ‘ ठीक आहे, ’ असें म्हणून लक्ष्मणानें त्या तपस्व्याला आंत आणिलें. घृतानें प्रज्वलित झालेल्या अग्नी-प्रमाणें त्याची अंगकांति दिसत होती. १३ स्वतःच्या तेजानें प्रकाशमान अशा त्या मुनीनें रघुश्रेष्ठ रामाजवळ जाऊन गोड शब्दांनी ‘ तुझा उत्कर्ष होवो, ’ असा त्याला

१. मृत्युदेवता–यम.

तस्मै स मुनये रामः पूजां कृत्वा यथाविधि । पृष्टानामयमव्यग्रो रामः
पृष्टोऽथ तेन सः ॥ १५ ॥ दिव्यासने समासीनो रामः प्रोवाच ताप-
सम् । यदर्थमागतोऽसि त्वमिह तत्प्रापयस्व मे ॥१६॥ वाक्येन चोदि-
तस्तेन रामेणाह मुनिर्वचः । द्वंद्वमेव प्रयोक्तव्यमनालक्ष्यं तु तद्वचः
॥ १७ ॥ नान्येन चैतच्छ्रोतव्यं नाख्यातव्यं च कस्यचित् । शृणुयाद्वा
निरीक्षेद्वा यः स वध्यस्त्वया प्रभो ॥ १८ ॥ तथेति च प्रतिज्ञाय रामो
लक्ष्मणमब्रवीत् । तिष्ठ त्वं द्वारि सौमित्रे नायात्वत्र जनो रहः
॥ १९ ॥ यद्यागच्छति को वापि स वध्यो मे न संशयः । ततः प्राह
मुनिं रामो येन वा त्वं विसर्जितः ॥ २० ॥ यत्ते मनीषितं वाक्यं तद्व-
दस्व ममाग्रतः । ततः प्राह मुनिर्वाक्यं शृणु राम यथातथम् ॥ २१ ॥
ब्रह्मणा प्रेषितोऽस्मीश कार्यार्थे तेऽतिकं प्रभो । अहं हि पूर्वजो देव तव
पुत्रः परंतप ॥ २२ ॥ मायासंगमजो वीर कालः सर्वहरः स्मृतः । ब्रह्मा

आशीर्वाद दिला १४ त्या मुनीची रामानें यथाविधि पूजा केली. रामानें स्वस्थ मनानें त्याला कुशलप्रश्न केले. व मुनीनें रामाला खुशाली विचारिली १५ दिव्यासनीं अधिष्ठित झालेल्या रामानें त्या ऋषीला म्हटलें, 'ज्याकरिता आपण येथें आला आहां, तें मला आतां आपण निवेदावें, ' १६ असें बोलून रामानें प्रेरणा दिली असतां, तो मुनि म्हणाला, ' आम्ही दोघांनीच येथें असावें. तें भाषण दुसऱ्या कोणाला कळतां नये. १७ ( मी सांगणार ) ती गोष्ट दुसऱ्या कोणी ऐकू नये, आणि कोणा दुसऱ्याला सांगूंही नये कोणी ही गोष्ट ऐकेल, किंवा बोलत असता पाहील, तर हे प्रभो ! त्वां त्याचा वध करावा. ' १८ ' ठीक आहे, ' असें प्रतिज्ञापूर्वक म्हणून रामानें लक्ष्मणाला सांगितलें, ' लक्ष्मणा ! तू द्वारावर उभा रहा कोणीही मनुष्यानें ह्या आमच्या एकांतांत येऊं नये १९ जर कोणी येईल, तर मी त्याचा वध करीन, यांत संशय नाही ' नंतर राम त्या मुनीला म्हणाला, 'ज्या कोणी आपणाला पाठविलें असेल, २० त्याच्या अथवा आपल्या स्वतःच्या मनात जें कांही सांगावयाचें असेल, तें सर्व आपण माझ्यापुढें सांगावें. ' नंतर मनि बोलला, ' रामा ! मी तुला सर्व इत्थंभूत सांगतों. २१ सर्वसमर्थ ईश्वरा ! ब्रह्मदेवानें आपल्या कार्याकरिता मला तुजकडे पाठविलें आहे. हे परतपा—शत्रुमर्दना—देवा ! मी प्रारंभीचा तुझा पुत्र आहें. २२ हे वीरा ! तूं मायेचा समागम केल्यानें मी जन्मास आलों. माझें नांव काल असून मी

त्वामाह भगवान् सर्वदेवर्षिपूजितः ॥ २३ ॥ रक्षितुं स्वर्गलोकस्य सम-
यस्ते महामते । पुरा त्वमेव एवासीर्लोकान् संहृत्य मायया ॥ २४ ॥
भार्यया सहितस्त्वं मामादौ पुत्रमजीजनः । तथा भोगवतं नागमनंतमु-
दकेशयम् ॥ २५॥ मायया जनयित्वा त्वं द्वौ ससत्त्वौ महाबलौ । मधु-
कैटभकौ दैत्यौ हत्वा मेदोऽस्थिसंचयम् ॥ २६ ॥ इमां पर्वतसंबद्धां
मेदिनीं पुरुषर्षभ । पद्मे दिव्यार्कसंकाशे नाभ्यामुत्पाद्य मामपि ॥ २७ ॥
मां विधाय प्रजाध्यक्षं मयि सर्वं न्यवेदयत् । सोऽहं संयुक्तसंभारस्त्वा-
मवोचं जगत्पते ॥ २८ ॥ रक्षां विधत्स्व भूतेभ्यो ये मे वीर्यापहा-
रिणः । ततस्त्वं कश्यपाज्जातो विष्णुर्वामनरूपधृक् ॥ २९ ॥

सकलांचा 'संहार करणारा' अशी माझी ख्याति आहे. सर्व देवर्षींना पूज्य, अशा भगवान् ब्रह्मदेवानें तुला सांगितलें आहे की, २३ 'हे महामते! स्वर्गलोकाचें रक्षण करण्यासाठी म्हणून परत येण्याची तुझी वेळ आली आहे. पूर्वी मायेच्या योगानें सर्वांचा संहार करून तूं एकटाच राहिला होतास. २४ पत्नीचा स्वीकार केल्यावर तूं ज्या प्रथम पुत्राला जन्म दिलास, तो पुत्र मीच होय. तसाच एक मोठ्या शरीराचा, उदकांत शयन करणारा, अनंत नांवाचा, नाग तूं निर्माण केलास. २५ तूं (त्याच) मायेच्या योगें महापराक्रमी व अत्यत बलवान् असे मधुकैटभ नांवाचें दोन दैत्य उत्पन्न केलेस. हे पुरुषश्रेष्ठा पुढें त्यांना मारून त्यांच्या मेदाच्या-चरबीच्या-व हाडांच्या राशीपासून ही पर्वतवेष्टित पृथ्वी तूं निर्माण केलीस. यापुढें तूं आपल्या नाभीमध्यें दिव्य सूर्यासारखें तेजस्वी असें कमळ निर्माण करून त्यामध्यें मला उत्पन्न केलेंस. २६,२७, तूं मला प्रजाध्यक्ष करून सव अधिकार दिलेस. हे जगत्पते! तेव्हांपासून सर्व भार अंगावर घेऊन मीं तुझी प्रार्थना केली की, २८ 'माझ्या वीर्याचा अप-हार करणारे-माझ्या प्रजांना दुःख देणारे-जे कोणी असतील, त्यांपासून भूतांचें रक्षण कर. नंतर तं विष्णूनें कश्यपऋषीच्या पोटीं वामनावतार धारण केलास. २९

१. मधु आणि कैटभ या नावाचे दोन अत्यत पराक्रमी दैत्य होते. ते विष्णु निजला असतां त्याच्या कर्णांपासून उत्पन्न झाले. पुढें ते ब्रह्मदेवाला खाऊन टाकण्याकरिता म्हणून त्याजवर धावून गेले असता विष्णूनें त्याचा वध केला अशी कथा आहे. २. प्रजापालनकर्ता.

हृतवानसि भूभारं वधाद्रक्षोगणस्य च । सर्वासूत्सार्यमाणासु प्रजासु धरणीधर ॥३०॥ रावणस्य वधाकांक्षी मर्त्यलोकमुपागतः । दश वर्षसहस्राणि दश वर्षशतानि च ॥३१॥ कृत्वा वासस्य समयं त्रिदशेष्वात्मनः पुरा । स ते मनोरथः पूर्णः पूर्णे चायुषि ते नृषु ॥ ३२ ॥ कालस्तापसरूपेण त्वत्समीममुपागमम् । ततो भूयश्च ते बुद्धिर्यदि राज्यमुपासितुम् ॥३३॥ तत्तथा भव भद्रं ते एवमाह पितामहः । यदि ते गमने बुद्धिर्देवलोकं जितेंद्रिय ॥ ३४ ॥ सनाथा विष्णुना देवा भवंतु विगतज्वराः । चतुर्मुखस्य तद्वाक्यं श्रुत्वा कालेन भाषितम् ॥ ३५ ॥ हसन् रामस्तदा वाक्यं कृत्स्नस्यांतकमब्रवीत् । श्रुतं तव वचो मेऽद्य ममापीष्टतरं तु तत् ॥ ३६ ॥ संतोषः परमो ज्ञेयस्त्वदागमनकारणात् । त्रयाणामपि लोकानां कार्यार्थं मम संभवः ॥ ३७ ॥ भद्रं तेऽस्त्वागमिष्यामि यत एवाहमागतः । मनोरथस्तु संप्राप्तो न मेऽत्रास्ति विचारणा ॥ ३८ ॥

हे पृथ्वीधारका ! सर्व प्रजांना पीडा होऊं लागली असतां, राक्षससमुदायांचा नाश करून तूं पृथ्वीचा भार हरण केलास ३० रावणाचा वध करण्याची इच्छा धारण करून तूं पृथ्वीवर अकरा सहस्र वर्षे राहण्याचें देवाजवळ प्रतिज्ञापूर्वक ठरवून मृत्युलोकीं आलास. तुझा मृत्युलोकची आयुष्यमर्यादा संपली असून तो तुझा मनोरथ पूर्ण झाला आहे.' ३१,३२ मी काल, ऋषिवेष घेऊन, तुजकडे आलों आहें. 'आतां अजूनही राज्याचा उपभोग घेण्याची तुझी इच्छा असेल, ३३ तर तसा तूं[1] हो. तुझें कल्याण होवो.' असें ब्रह्मदेवानें तुला सांगितलें आहे. हे जितेंद्रिया[2] ! (उलट) देवलोकीं तुझी जाण्याची इच्छा असेल, ३४ तर तुझ्या-विष्णूच्या-समागमानें देवांचे ताप नाहींसे होतील.' ब्रह्मदेवाचा निरोप त्या कालमुखानें ऐकून, ३५ हंसत हंसत श्रीराम सर्वांचा अंत करणाऱ्या त्या (काला)ला म्हणाला, 'तुझें म्हणणें मी ऐकिलें. मला देखील तेंच[3] इष्ट वाटत आहे. ३६ तूं आल्याकारणानें मला परम संतोष वाटला पाहिजे. तिन्ही लोकांच्या कार्यासाठीं म्हणून माझा अवतार आहे. ३७ तुझें कल्याण असो. मी जेथून येथें आलों, तेथें परत येणार आहें. माझा मनोरथ परिपूर्ण झाला आहे, ह्यांत संशय नाहीं. ३८

१. पृथ्वीवर राज्य करीत रहा. २. इंद्रियवृत्ति स्वाधीन ठेवणाऱ्या. ३. देवलोकीं जाणें.

**मत्सेवकानां देवानां सर्वकार्येषु वै मया। स्थातव्यं मायया पुत्र यथा चाह प्रजापतिः ॥ ३९ ॥ एवं तयोः कथयतोर्दुर्वासा मुनिरभ्यगात्। राजद्वारं राघवस्य दर्शनापेक्षया द्रुतम् ॥ ४० ॥ मुनिर्लक्ष्मणमासाद्य दुर्वासा वाक्यमब्रवीत्। शीघ्रं दर्शय रामं मे कार्यं मेऽत्यंतमाहितम् ॥ ४१ ॥ तच्छ्रुत्वा प्राह सौमित्रिर्मुनिं ज्वलनतेजसम्। रामेण कार्यं किं तेऽद्य किं तेऽभीष्टं करोम्यहम् ॥ ४२ ॥ राजा कार्यांतरे व्यग्रो मुहूर्तं संप्रतीक्ष्यताम्। तच्छ्रुत्वा क्रोधसंतप्तो मुनिः सौमित्रिमब्रवीत् ॥ ४३ ॥ अस्मिन् क्षणे तु सौमित्रे न दर्शयसि चेद्विभुम्। रामं सविषयं वंशं भस्मीकुर्यां न संशयः ॥ ४४ ॥ श्रुत्वा तद्वचनं घोरमृषेर्दुर्वाससो भृशम्। स्वरूपं तस्य वाक्यस्य चिंतयित्वा स लक्ष्मणः ॥४५॥**

पुत्रा ! ब्रह्मदेवानें सांगितलें आहे, त्याप्रमाणें माझी सेवा करणाऱ्या देवांच्या सर्व कार्यांत मीं मायेच्या योगें साहाय्य करावें, हेंच ( आतां ) योग्य आहे.’ ३९ अशा प्रकारें त्या दोघांचें भाषण चाललें आहे, तों दुर्वास ऋषि कांहीं महत्वाचें कार्य योजून रामाची भेट घेण्याच्या इच्छेनें त्वरित राजद्वारी आला. ४० दुर्वास मुनि लक्ष्मणाजवळ येऊन त्याला म्हणाला, ‘ माझी रामाशी लवकर भेट करीव. माझें अत्यंत जरूरीचें काम आहे. ’ ४१ तें ऐकून लक्ष्मण त्या अग्नीप्रमाणें तेजस्वी मुनीला–दुर्वासाला–म्हणाला, ‘ आपलें आज रामाशी काय कार्य आहे ? आपली जी कांही इच्छा असेल, ती मी परिपूर्ण करीन. ४२ राजा ( राम ) दुसऱ्या कांहीं कामामध्यें गुंतला असल्यामुळें थोडा वेळ आपण थांबावें. ’ तें ऐकून ( दुर्वास ) मुनि क्रोधसंतप्त होऊन लक्ष्मणाला म्हणाला, ४३ ‘ ह्या क्षणीं, हे लक्ष्मणा ! जर प्रभु ( रामचंद्रा )ची भेट करविली नाहीस, तर मी तुझ्या सर्व कुळास्थळाचें भस्म करून टाकीन, यांत संशय नाहीं. ४४ दुर्वास ऋषीचें तें अत्यंत भयंकर भाषण ऐकून आणि त्या वाक्याच्या स्वरूपाचा विचार करून लक्ष्मणानें ( मनांत म्हटलें ), ४५

१. दुर्वास ऋषि हा अत्रि आणि अनसूया याचा पुत्र होय. जमदग्नीप्रमाणेच अत्यंत संतापी स्वभावाबद्दल याची ख्याति आहे. २. बोलल्याप्रमाणें दुर्वासानें शाप दिल्यास केवढा मोठा अनर्थ कोसळेल, हें मनात आणून. ह्या वेळच्या लक्ष्मणाच्या मनःस्थितीचें वर्णन मोरोपंतानीं केलें आहे तें—‘ ऐसें ऐकुनि नयपटु सौमित्रि म्हणे मनीं ‘ स्वनाश घडो; । परि मुनिकोपाभिमुखीं शलभासम सर्व लोक हा न पडो. ॥ ’

सर्वनाशाद्वरं मेऽद्य नाशो ह्येकस्य कारणात् । निश्चित्यैवं ततो गत्वा रामाय प्राह लक्ष्मणः ॥ ४६ ॥ सौमित्रेर्वचनं श्रुत्वा रामः कालं व्यसर्जयत् । शीघ्रं निर्गम्य रामोऽपि ददर्शात्रेः सुतं मुनिम् ॥ ४७ ॥ रामोऽभिवाद्य संप्रीतो मुनिं पप्रच्छ सादरम् । किं कार्यं ते करोमीति मुनिमाह रघूत्तमः ॥ ४८ ॥ तच्छ्रुत्वा रामवचनं दुर्वासा राममब्रवीत् । अद्य वर्षसहस्राणामुपवाससमापनम् ॥ ४९ ॥ अतो भोजनमिच्छामि सिद्धं यत्ते रघूत्तम । रामो मुनिवचः श्रुत्वा संतोषेण समन्वितः ॥ ५० ॥ स सिद्धमन्नं मुनये यथावत्समुपाहरत् । मुनिर्भुक्त्वान्नममृतं संतुष्टः पुनरभ्यगात् ॥ ५१ ॥ स्वमाश्रमं गते तस्मिन् रामः सस्मार भाषितम् । कालेन शोकदुःखार्तो विमनाश्चातिविह्वलः ॥५२॥ अवाङ्मुखो दीनमना न शशाकाभिभाषितुम् । मनसा लक्ष्मणं ज्ञात्वा हतप्रायं रघूद्वहः ॥ ५३ ॥ अवाङ्मुखो बभूवाथ तूष्णीमेवाखि-

ह्या दुर्वासाच्या मुळें सर्व ( कुटुंबाचा ) नाश होण्यापेक्षा माझा एकट्याचाच आज नाश होणें अधिक चांगलें.' असा निश्चय करून लक्ष्मण रामाकडे गेला, आणि त्याला (दुर्वास आल्याचें) त्यानें सांगितलें. ४६ सौमित्राचें भाषण ऐकिल्यावर रामानें कालाला निरोप दिला, आणि सत्वर बाहेर येऊन त्यानें त्या अत्रिसुत मुनीची भेट घेतली. ४७ रामानें संतुष्ट चित्तानें त्या मुनीला वंदन केलें, आणि आदरपूर्वक प्रश्न केला. तो रघुश्रेष्ठ मुनीला म्हणाला, 'मुने! आपलें कोणतें कार्य मीं केलें पाहिजे?' ४८ तें वचन ऐकून दुर्वास रामाला म्हणाला, 'हजारों वर्षे केलेल्या उपोषणाची आज मला समाप्ति करावयाची आहे. ४९ म्हणून रघूत्तमा! (घरांत) जें सिद्ध असेल, त्याचें भोजन करण्याची माझी इच्छा आहे.' मुनीचें भाषण ऐकून रामाला संतोष झाला. ५० त्यानें मुनीला यथेच्छ सिद्ध अन्न घातलें तें अमृतासारखें अन्न सेवून संतुष्ट चित्तानें तो (मुनि) तेथून गेला. ५१ (मुनि) आश्रमाला गेल्यावर रामाला कालाच्या भाषणाची आठवण झाली दुःख आणि शोक यांहीं त्याचें मन उद्विग्न झालें तो अत्यंत विव्हळ झाला. ५२ दीनचित्त होऊन त्यानें तोंड खालीं घातलें त्याच्या तोंडांतून शब्द निघेना. लक्ष्मणाचा घात झाल्याचें त्या रघुश्रेष्ठाला कळून आलें. ५३ सर्व प्राणिमात्रांचा स्वामी तो ( राम )

लेश्वरः । ततो रामं विलोक्याह सौमित्रिर्दुःखसंप्लुतम् ॥ ५४ ॥ तूष्णींभूतं चिंतयंतं गर्हंतं स्नेहबंधनम् । मत्कृते त्यज संतापं जहि मां रघुनंदन ॥ ५५ ॥ गतिः कालस्य कलिता पूर्वमेवेदृशी प्रभो । त्वयि हीनप्रतिज्ञे तु नरको मे ध्रुवं भवेत् ॥५६॥ मयि प्रीतिर्यदि भवेद्यद्यनुग्राह्यता तव । त्यक्त्वा शंकां जहि प्राज्ञ मा मा धर्मं त्यज प्रभो ॥५७॥ सौमित्रिणोक्तं तच्छ्रुत्वा रामश्चलितमानसः । आहूय मंत्रिणः सर्वान् वसिष्ठं चेदमब्रवीत् ॥५८॥ मुनेरागमनं यत्तु कालस्यापि हि भाषितम् । प्रतिज्ञामात्मनश्चैव सर्वमावेदयत्प्रभुः ॥ ५९ ॥ श्रुत्वा रामस्य वचनं मंत्रिणः सपुरोहिताः । ऊचुः प्रांजलयः सर्वे राममक्लिष्टकारिणम् ॥६०॥ पूर्वमेव हि निर्दिष्टं तव भूभारहारिणः । लक्ष्मणेन वियोगस्ते ज्ञातो विज्ञानचक्षुषा ॥ ६१ ॥ त्यजाशु लक्ष्मणं राम मा प्रतिज्ञां त्यज प्रभो । प्रतिज्ञाते

दुःखानें तोंड खाली घालून स्वस्थ बसला मग राम दुःखमग्न होऊन सचिंत स्वस्थ बसला आहे, आणि प्रेमपाशाची निंदा करीत आहे, असें पाहून लक्ष्मण त्याला म्हणाला, ‘ रघुनंदना ! हा माझ्यामुळें उत्पन्न झालेला संताप सोडून दे. माझा वध कर. ५४,५५ प्रभो ! अशा प्रकारें कालाची गति होणार, हें पूर्वींच ठरलेलें आहे. तुझ्या हातून प्रतिज्ञाभंग झाल्यास मला नरकांत जावें लागेल ! ५६ जर तुझी मजवर प्रीति असेल, आणि मी जर तुझ्या अनुग्रहास पात्र असेन, तर शंका सोड, आणि माझा वध कर. प्रभो ! तूं सर्व जाणता आहेस, तरी धर्माचा त्याग करूं नकोस.’ ५७ लक्ष्मणाचें तें भाषण ऐकून रामाचें मन फिरलें. त्यानें आपल्या सर्व प्रधानांना आणि वसिष्ठाला बोलावून आणिलें, आणि त्यांना सर्व वर्तमान सांगितलें. ५८ प्रभु रामानें मुनीचें आगमन, कालाचें भाषण आणि आपली प्रतिज्ञा हें सर्व त्यांना सांगितलें. ५९ रामाचें भाषण ऐकून ते सर्व मंत्री आणि उपाध्याय हात जोडून क्लेशांवांचून कोणतेंही कार्य तडीस नेणाऱ्या त्या रामाला म्हणाले, ६० ‘ पृथ्वीचा भार हरण करण्यासाठीं आपण जेव्हां अवतार घेतला, तेव्हां आपला लक्ष्मणाशी वियोग होणार, हें पूर्वींच ठरलेलें होतें, व ती गोष्ट ज्ञानदृष्टीच्या योगें आपणांस कळलेलीही होती. ६१ रामा ! लक्ष्मणाचा त्याग सत्वर कर, पण प्रभो ! प्रतिज्ञेचा भंग करूं नकोस. प्रतिज्ञेचा त्याग केला असतां, धर्म

परित्यक्ते धर्मो भवति निष्फलः ॥६२॥ धर्मे नष्टेऽखिले राम त्रैलोक्यं नश्यति ध्रुवम् । त्वं तु सर्वस्य लोकस्य पालकोऽसि रघूत्तम ॥ ६३ ॥ त्यक्त्वा लक्ष्मणमेवैकं त्रैलोक्यं त्रातुमर्हसि । रामो धर्मार्थसहितं वाक्यं तेषामनिंदितम् ॥ ६४ ॥ सभामध्ये समाश्रुत्य प्राह सौमित्रिमंजसा । यथेष्टं गच्छ सौमित्रे माभूद्धर्मस्य संशयः ॥६५॥ परित्यागो वधो वापि सतामेवोभयं समम् । एवमुक्ते रघुश्रेष्ठे दुःखव्याकुलितेक्षणः ॥६६॥ रामं प्रणम्य सौमित्रिः शीघ्रं गृहमगात्स्वकम् । ततोऽगात्सरयूतीरमाचम्य स कृतांजलिः ॥६७॥ नव द्वाराणि संयम्य मूर्ध्नि प्राणमधारयत् । यदक्षरं परं ब्रह्म वासुदेवाख्यमव्ययम् । पदं तत्परमं धाम चेतसा सोऽभ्यचिंतयत् ॥ ६८ ॥ वायुरोधेन संयुक्तं सर्वे देवाः सहर्षयः । साग्नयो लक्ष्मणं पुष्पैस्तुष्टुवुश्च समाकिरन ॥ ६९ ॥ अदृश्यं त्रिदशैः कैश्चित्सशरीरं

निष्फल होतो. ६२ रामा ! धर्माचा नाश झाला की, सर्व त्रैलोक्य निःसंशय नाशाला जातें. हे रघूत्तमा ! तूं तर सर्व लोकांचा पालक आहेस. ६३ एका लक्ष्मणाचा त्याग करून त्रैलोक्याचें रक्षण करणें, हें तुला योग्य आहे.' धर्माला आणि अर्थाला अनुसरून त्यांनीं केलेलें पवित्र भाषण सभेमध्यें ऐकून लागलेंच रामानें लक्ष्मणाला सांगितलें, 'लक्ष्मणा ! तुला वाटेल, तिकडे निघून जा. धर्माचा लोप होऊं नये. ६४,६५ चांगल्या मनुष्याचा त्याग करणें, किंवा वध करणें, ह्या दोनी गोष्टी सारख्याच होत. असें त्या रघूत्तमा ( रामा )नें सांगितलें असतां, लक्ष्मणाचे डोळे दुःखाश्रूंनी भरून आले. ६६ रामाला नमस्कार करून, लक्ष्मण तावडतोब आपल्या गृही गेला. तेथून तो सरयू नदीच्या तीरावर गेला. तेथें आचमन करून लक्ष्मणानें हात जोडिले, ६७ नऊही द्वारें[1] बंद केलीं, मस्तकीं प्राण नेला, आणि नाशरहित, निर्विकार, सर्वांचें आश्रयस्थान वासुदेवनामक परब्रह्मपदाचें त्यानें अंतःकरणपूर्वक ध्यान चालविलें. ६८ पुढें लक्ष्मणानें प्राणवायूचा निरोध केल्यावर अग्नीसह सर्व देवांनीं आणि ऋषींनी त्याजवर पुष्पवृष्टि केली, आणि त्याची स्तुति केली[2] ६९ लक्ष्मणाला शरीरासह उचलून घेऊन इंद्र स्वर्गलोकाला गेला. इतर देवाना तें लक्ष्मणाचें शरीर

१. नऊ द्वारें —दोन नाकपुड्या, दोन डोळे, दोन कान, मुख, शिश्न, गुद २. सदृश उतारा—'करुनि प्राणायाम त्यजिलें सरयूतटांतरां काय । स्वर्गप्रयाण केलें श्रीशाशाल अशक्य तें काय ? ॥ '—मोरोपंत, मंत्ररामायण.

स वासवः । गृहीत्वा लक्ष्मणं शक्रः स्वर्गलोकमथागमत् ॥ ७० ॥ ततो विष्णोश्चतुर्भागं तं देवं सुरसत्तमाः । सर्वे देवर्षयो दृष्ट्वा लक्ष्मणं समपूजयन् ॥ ७१ ॥ लक्ष्मणे हि दिवमागते हरौ सिद्धलोकगतयोगिनस्तदा । ब्रह्मणा सह समागमन्मुदा द्रष्टुमाहितमहाहिरूपकम् ॥ ७२ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे उत्तरकांडे अष्टमः सर्गः ॥ ८ ॥

## उत्तरकांड, सर्ग नववा.

॥ श्रीमहादेव उवाच ॥ लक्ष्मणं तु परित्यज्य रामो दुःखसमन्वितः । मंत्रिणो नैगमांश्चैव वसिष्ठं चेदमब्रवीत् ॥ १ ॥ अभिषेक्ष्यामि भरतमधिराज्ये महामतिम् । अद्य चाहं गमिष्यामि लक्ष्मणस्य पदानुगः ॥ २ ॥ एवमुक्ते रघुश्रेष्ठे पौरजानपदास्तदा । द्रुमा इव छिन्नमूला दुःखार्ताः पतिता भुवि ॥ ३ ॥ मूर्च्छितो भरतो वापि श्रुत्वा रामाभिभाषितम् । गर्हयामास राज्यं स प्राहेदं रामसन्निधौ ॥ ४ ॥ सत्येन च

( कांही काळ ) अदृश्य होतें. ७० पुढे लक्ष्मण हा विष्णूचा चतुर्थांश आहे, असे मोठमोठ्या देवांना आणि सर्व देवर्षींना दिसून आल्यावरून, त्यांनी लक्ष्मणाची पूजा केली. ७१ लक्ष्मणरूपी हरि—विष्णूचा अंश असा लक्ष्मण-स्वर्गाला गेला, आणि त्याचें पूर्वीचें मोठें सर्परूप त्याला प्राप्त झालें, तेव्हां सिद्ध लोकांतील योगी आणि ब्रह्मदेव मोठ्या आनंदानें त्याच्या दर्शनास आले. ७२ ”

**उत्तरकांड, सर्ग आठवा समाप्त.**

श्रीशंकर म्हणाला, “ लक्ष्मणाचा त्याग केल्यावर रामाला ( फार ) दुःख झालें. तो आपले मंत्री, व्यापारी, आणि वसिष्ठ ह्यांना म्हणाला, १ ‘ महाबुद्धिमान् भरताला राज्याभिषेक करून लक्ष्मणाच्या मागें जावें, अशी आतां मला इच्छा झाली आहे.’ २ असें त्या रघुश्रेष्ठानें सांगितलें असतां, नगरवासी आणि देशवासी अशा सकल जनांनी दुःखपीडित होऊन, मुळें तुटून पडलेल्या वृक्षांप्रमाणें जमिनीवर लोळण घेतली. ३ रामाच्या तोंडून निघालेले शब्द ऐकून भरतालाही मूर्च्छा आली. त्यानें राज्याचा तिरस्कार केला. तो रामाजवळ (येऊन) म्हणाला, ४ ‘ हे प्रभो !

शपे नाहं त्वां विना दिवि वा भुवि । कांक्षे राज्यं रघुश्रेष्ठ शपे त्वत्पादयोः प्रभो ॥ ५ ॥ इमौ कुशलवौ राजन्नभिषिंचस्व राघव । कोशलेषु कुशं वीरमुत्तरेषु लवं तथा ॥ ६ ॥ गच्छंतु दूतास्त्वरितं शत्रुघ्नानयनाय हि । अस्माकमेतद्गमनं स्ववासाय शृणोतु सः ॥ ७ ॥ भरतेनोदितं श्रुत्वा पतितास्ताः समीक्ष्य तम् । प्रजाश्च भयसंविग्ना रामविश्लेषकातराः ॥ ८ ॥ वसिष्ठो भगवान् राममुवाच सदयं वचः । पश्य तातादरात्सर्वा पतिता भूतले प्रजाः ॥ ९ ॥ तासां भावानुगं राम प्रसादं कर्तुमर्हसि । श्रुत्वा वसिष्ठवचनं ताः समुत्थाप्य पूज्य च ॥ १० ॥ सस्नेहो रघुनाथस्ताः किं करोमीति चाब्रवीत् । ततः प्रांजलयः प्रोचुः प्रजा भक्त्या रघूद्वहम् ॥ ११ ॥

रघुश्रेष्ठा ! मी सत्यपूर्वक तुझ्या पायांची शपथ घेऊन सांगतों की, 'तुजवांचून पृथ्वीवरील राज्याची काय, किंवा स्वर्गीय राज्याची काय, मला बिलकुल इच्छा नाही. ५ राजा राघवा ! ह्या कुशलवांना राज्याभिषेक कर. ह्या कुशवीराला कोसलदेशी अभिषेक कर. तसेंच लवाला उत्तरेचें राज्य दे, ६ व शत्रुघ्नाला आणण्याकरितां दूत लवकर जावोत. आमचें स्वर्गवासाला जाणें त्याला कळूं द्या.' ७ भरताचें हें भाषण ऐकून रामाच्या वियोगानें विह्वल होऊन सर्व प्रजाजन अत्यंत भयभीत झाले. त्यांनी त्याच्या मुखाकडे पाहिलें, आणि जमिनीवर देह टाकिले. ८ भगवान् वसिष्ठांना तें पाहून करुणा आली, आणि ते रामाला म्हणाले, 'बापा ( रामा ) ! हे सर्व प्रजाजन जमिनीवर पडून राहिले आहेत, त्यावरून त्यांच्या मनांत तुजविषयीं किती आदर वसत आहे, त पहा. ९ रामा ! त्यांच्या भावानुरूप तूं त्यांजवर अनुग्रह करावास, हें योग्य आहे. वसिष्ठाचें भाषण ऐकून रामानें त्या लोकांना उठविलें, त्यांचा गौरव केला, १० आणि स्नेहपूर्वक म्हटलें, 'मी ( तुमच्याकरितां ) काय करूं ?' त्यावर त्या सर्व प्रजाजनांनी हात जोडले, आणि भक्तिपूर्वक रघुश्रेष्ठाला म्हटले, ११

१ उत्तरेचें राज्य-उत्तर कोशलदेशाचें राज्य कोशलदेश म्हणजे 'अयोध्या' प्रांत होय. २. कृपा-तुजबरोबर येण्याची कृपापूर्वक परवानगी ३. सदृश वर्णन-'होता स्वर्गमनमना करिती येऊनिया प्रजा नमना, । म्हणती नाकीं गमना करिता आम्हांसि ने विपच्छमना !'-मोरोपंतकृत मंत्ररामायण.

गंतुमिच्छसि यत्र त्वमनुगच्छामहे वयम् । अस्माकमेषा परमा प्रीतिर्ध-
र्मोऽयमक्षयः ॥ १२ ॥ तवानुगमने राम हृद्गता नो दृढा मतिः । पुत्र-
दारादिभिः सार्धमनुयामोऽद्य सर्वथा ॥ १३ ॥ तपोवनं वा स्वर्गं वा पुरं
वा रघुनंदन । ज्ञात्वा तेषां मनोदार्ढ्यं कालस्य वचन यथा ॥ १४ ॥
भक्तं पौरजनं चैव बाढमित्याह राघवः । कृत्वैव निश्चयं रामस्तस्मिन्नेवा-
हनि प्रभुः ॥ १५ ॥ प्रस्थापयामास च तौ रामभद्रः कुशीलवौ । अष्टौ
रथसहस्राणि सहस्रं चैव दंतिनाम् ॥ १६ ॥ षष्टिं चाश्वसहस्राणामेकैकस्मै
ददौ बलम् । बहुरत्नौ बहुधनौ हृष्टपुष्टजनावृतौ ॥ १७ ॥ अभिवाद्य गतौ
रामं कृच्छ्रेण तु कुशीलवौ । शत्रुघ्नानयने दूतान्प्रेषयामास राघवः ।
ते दूतास्त्वरितं गत्वा शत्रुघ्नाय न्यवेदयन् ॥ १८ ॥ कालस्यागमनं
पश्चादत्रिपुत्रस्य चेष्टितम् । लक्ष्मणस्य च निर्याणं प्रतिज्ञां राघवस्य च
॥ १९ ॥ पुत्राभिषेचनं चैव सर्वं रामचिकीर्षितम । श्रुत्वा तद्दूतवचनं

‘(रामा !) जेथे तूं जावयाची इच्छा करीत अससील, तेथें तुझ्या मागून आम्ही सर्व येणार. याचीच आम्हांला मोठी आवड आहे, व हाच आम्हांला मोठा धर्म वाटत आहे. १२ रामा ! तुझ्या मागून येण्याचा आमचा मनापासून दृढसंकल्प झाला आहे. मुलें, बायका, या सर्वांना घेऊन आम्ही आज तुझ्या मागून येणार, हें खास. १३ रघुनंदना ! मग त तुझें जाणें स्वर्गलोकी असो, किंवा तपोवनी असो, अगर दुसऱ्या एखाद्या नगराला असो.’ त्यांचा दृढनिश्चय, त्याचप्रमाणें कालाचें भाषण, यांचा विचार करून, १४ त्या भक्तिपूण पौरजनांला ‘ठीक आहे,’ असें राम बोलला, आणि त्याच दिवशी ता निश्चय रामानें अमलांत आणिला. १५ रामचंद्रानें ( लागलेंच ) कुश आणि लव यांना त्यांच्या त्यांच्या राज्यावर पाठविलें. त्यानें प्रत्येकाबरोबर आठ हजार रथ, एक हजार हत्ती, आणि साठ हजार घोडे, इतकें सैन्य दिलें. त्याशिवाय पुष्कळ रत्न, पुष्कळ धन, आणि आनंदी व सामर्थ्यवान् असे अनेक सेवकही बरोबर दिले. १६, १७ त्या ( कुशलवांनी ) रामाला वंदन केलें, आणि मोठ्या कष्टानें तेथून त्यांनी प्रयाण केलें. नंतर श्रीरामानें शत्रुघ्नाला आणण्याकरितां दूत पाठविले. त्याप्रमाणें त्या दूतांनी सत्त्वर जाऊन शत्रुघ्नाला कालमुनीचें आगमन, अत्रिपुत्र दुर्वासाच्या कृति, लक्ष्मणाचें निर्याण, रामाची प्रतिज्ञा, पुत्रांचे—कुशलवांचे—राज्याभिषेक, आणि

शत्रुघ्नः कुलनाशनम् ॥ २० ॥ व्यथितोऽपि धृतिं लब्ध्वा पुत्रावाहूय सत्वरः । अभिषिच्य सुबाहुं वै मथुरायां महाबलः ॥ २१ ॥ यूपकेतुं च विदिशानगरे शत्रुसूदनः । अयोध्यां त्वरितं प्रागात्स्वयं रामदिदृक्षया ॥ २२ ॥ ददर्श च महात्मानं तेजसा ज्वलनप्रभम् । दुकूलयुगसंवीतं ऋषिभिश्चाक्षयैर्वृतम् ॥ २३ ॥ अभिवाद्य रमानाथं शत्रुघ्नो रघुपुंगवम् । प्रांजलिर्धर्मसहितं वाक्यं प्राह महामतिः ॥ २४ ॥ अभिषिच्य सुतौ तत्र राज्ये राजीवलोचन । तवानुगमने राजन्विद्धि मां कृतनिश्चयम् ॥२५॥ त्यक्तुं नार्हसि मां वीर भक्तं तव विशेषतः । शत्रुघ्नस्य दृढां बुद्धिं विज्ञाय रघुनंदनः ॥ २६ ॥ सज्जीभवतु मध्याह्ने भवानित्यब्रवीद्वचः । अथ क्षणात्समुत्पेतुर्वानराः कामरूपिणः ॥ २७ ॥ ऋक्षाश्च राक्षसाश्चैव गोपु-

रामाचे सर्व उद्देश कळविले. ती कुलनाशाची कथा शत्रुघ्नानें दूताच्या तोंडून ऐकिल्यावर, १८, १९, २० त्याला फार वाईट वाटलें. तरी त्या महाबलवान् शत्रुघ्नानें धैर्य धरून आपल्या पुत्रांना सत्वर जवळ बोलाविलें, आणि मथुरेंत सुबाहूला राज्याभिषेक केला. २१ नंतर त्या शत्रुनाशना ( शत्रुघ्ना )नें विदिशानगरीं यूपकेतूला अभिषेक केला. ( इतकें झाल्यावर ) रामाला भेटण्याच्या इच्छेनें तो स्वतः त्वरेनें अयोध्येला गेला. २२ तेजानें अग्नीसमान शोभणाऱ्या महात्म्या रामाची त्यानें भेट घेतली. रामानें दोन रेशमी वस्त्रें परिधान केली होती त्याच्या सभोंवती अनेक चिरजीवी ऋषि बसले होते २३ त्या रघुश्रेष्ठ लक्ष्मीपति रामाला महामति शत्रुघ्नानें प्रणाम केला, व हात जोडून धर्मयुक्त भाषण केलें २४ तो म्हणाला, 'कमलनयन रामा ! तिकडे राज्यांवर पुत्रांची स्थापना करून तुझ्याबरोबर येण्याचा दृढनिश्चय करून मी आलों आहें, हें समज. २५ वीरा ! माझा, विशेषतः तुझ्या भक्ताचा, त्याग करणें तुला योग्य नाही.' शत्रुघ्नाची दृढभक्ति लक्षांत आणून रघुनंदन ( राम ) त्याला म्हणाला, 'मध्यान्हीच्या समयीं तूं सिद्ध होऊन रहा.' नंतर क्षणांत तेथें इच्छेनुसार रूप धारण करणारे वानर उड्या मारीत आले २६, २७ त्याचप्रमाणें ऋषि आणि देव यांचे अंश

१. मथुरा–शत्रुघ्नानें यमुनेच्या काठीं वसविलेलें नगर. २. विदिशा–दशार्णनामक देशाची राजधानी. ' तेषां ( दशार्णानां ) दिक्षु प्रथितविदिशालक्षणां राजधानीम् । '–मेघदूत.

च्छाश्च सहस्रशः । ऋषीणां देवतानां च पुत्रा रामस्य निर्गमम् ॥२८॥
श्रुत्वा प्रोचू रघुश्रेष्ठं सर्वे वानरराक्षसाः । तवानुगमने विद्धि निश्चिता-
र्थान्हि नः प्रभो ॥ २९ ॥ एतस्मिन्नंतरे रामं सुग्रीवोऽपि महाबलः ।
यथावदभिवाद्याह राघवं भक्तवत्सलम् ॥ ३० ॥ अभिषिच्यांगदं राज्ये
आगतोऽस्मि महाबलम् । तवानुगमने राम विद्धि मां कृतनिश्चयम्
॥ ३१ ॥ श्रुत्वा तेषां दृढं वाक्यं ऋक्षवानररक्षसाम् । विभीषणमुवाचेदं
वचनं मृदु सादरम् ॥ ३२ ॥ धरिष्यति धरा यावत्प्रजास्तावत्प्र-
शाधि मे । वचनाद्राक्षसं राज्यं शापितोऽसि ममोपरि ॥ ३३ ॥ न
किंचिदुत्तरं वाच्यं त्वया मत्कृतकारणात् । एवं बिभीषणं तूक्त्वा
हनूमंतमथाब्रवीत् ॥३४॥ मारुते त्वं चिरं जीव ममाज्ञां मा मृषा कृथाः ।
जांबवंतमथ प्राह तिष्ठ त्वं द्वापरांतरे ॥ ३५ ॥ मया सार्धं भवेद्युद्धं

असे हजारों ऋक्ष, राक्षस आणि गोपुच्छें तेथें आले. राम जाणार, ह वर्तमान ऐकिल्यावर ते सर्व वानर आणि राक्षस रघुश्रेष्ठा ( रामा )ला म्हणाले, 'प्रभो ! तुझ्या मागून येण्याचा आम्ही दृढनिश्चय केला आहे, हें लक्ष्यांत घे.' २८, २९ इतक्यांत महाबलवान् सुग्रीवही रामाकडे आला, आणि त्यानें गौरवपूवक त्या भक्तवत्सल रामाला वंदन केलें. ३० ( तो म्हणाला, ) 'महाबलवान् अंगदाला राज्यावर अभिषेक करून मी आलों आहें. रामा ! तुझ्या मागोमाग येण्याचा माझा दृढनिश्चय आहे, हें जाण. ३१ त्या ऋक्ष, वानर, आणि राक्षसांची निश्चयपूर्वक भाषणें ऐकून रामानें विभीषणाला आदरपूर्वक मृदु शब्दांनी सांगितलें, ३२ विभीषणा ! जोंपर्यंत पृथ्वी या भूतमात्राला आपल्या पाठीवर धारण करील, तोंपर्यंत तूं राक्षसांच राज्य चालवावें, असें माझें तुला शपथपूर्वक सांगणें आहे. ३३ आतां मी केलेल्या ह्या व्यवस्थेसंबंधानें तूं कांहींही ( उलट ) बोलतां नये. असें विभीषणाला सांगितल्यावर तो ( राम ) हनुमंताला बोलला, ३४ 'मारुते ! तूं चिरंजीव होऊन रहा. माझी आज्ञा व्यथ करूं नकोस.' नंतर राम जांबवंताला म्हणाला, 'तूंही असाच भूतलावर रहा. पुढें द्वापरँयुगामध्यें कांहीं कारणावरून तझें माझ्याशी यद्ध होणार आहे. नंतर त्या सर्व

१. अस्वले. २. एका जातीचे वानर. ३. द्वापर–तिसरें युग. 'द्वाभ्या सत्यत्रेतयुगाभ्या परः.'

यत्किंचित्कारणांतरे । ततस्तान् राघवः प्राह ऋक्षराक्षसवानरान् । सर्वा-
नेव मया सार्धं प्रयातेति दयान्वितः ॥ ३६ ॥ ततः प्रभाते रघुवंशनाथो
विशालवक्षाः सितकंजनेत्रः । पुरोधसं प्राह वसिष्ठमार्यं यांत्वग्निहोत्राणि
पुरो गुरो मे ॥ ३७ ॥ ततो वसिष्ठोऽपि चकार सर्वं प्रास्थानिकं
कर्म महद्विधानात् । क्षौमांबरो दर्भपवित्रपाणिर्महाप्रयाणाय गृहीतबुद्धिः
॥ ३८ ॥ निष्क्रम्य रामो नगरात्सिताभ्राच्छशीव यातः शशिकोटि-
कांतिः । रामस्य सव्ये सितपद्महस्ता पद्मागता पद्मविशालनेत्रा ॥३९॥
पार्श्वेऽथ दक्षेऽरुणकंजहस्ता श्यामा ययौ भूरपि दीप्यमाना । शास्त्राणि
शस्त्राणि धनुश्च बाणा जग्मुः पुरस्ताद्धृतविग्रहास्ते ॥ ४० ॥ वेदाश्च सर्वे
धृतविग्रहाश्च ययुश्च सर्वे मुनयश्च दिव्याः । माता श्रुतीनां प्रणवेन साध्वी
ययौ हरिं व्याहृतिभिः समेता ॥ ४१ ॥ गच्छंतमेवानुगता जनास्ते

ऋक्ष, राक्षस आणि वानरांना दयावंत होऊन श्रीराम म्हणाला, 'माझ्या बरोबर चला.' ३५, ३६ नंतर प्रभातकाल झाल्यावर त्या विशालवक्ष आणि श्वेतकमलनयन रामानें आपला उपाध्याय जो वसिष्ठ त्याला म्हटलें, 'गुरो ! माझी अग्निहोत्रें घेऊन पुढें निघा.' ३७ वसिष्ठ मुनींनेंही महाप्रस्थानकालाला योग्य असें सर्व महत्वाचें कर्म यथाशास्त्र केलें. रामानें रेशमी वस्त्र परिधान केलें, हातांत दर्भाचें पवित्र धारण केलें, आणि महाप्रयाणाविषयीं निश्चित बुद्धि करून, ३८ तो नगरातून बाहेर पडला. त्याची अंगकांति कोटयवधि चंद्रांप्रमाणे दिसत होती. शुभ्र मेघमडळांतून चंद्र बाहेर पडावा, तसा राम नगरांतून बाहेर पडला. रामाच्या डाव्या बाजूस हातात पांढरें कमळ घेऊन लक्ष्मी ( लक्ष्मीरूपात सीता ) तेथें आली तिच्या हातात पांढरें कमळ असून डोळे कमळासारखे विशाल होते. ३९ त्याच्या उजव्या बाजूला हातांत तांबडें कमल धारण करून तेजस्वी श्यामवर्ण भू-पृथ्वी-चालत होती. शास्त्र, शस्त्रें, धनुष्यें, बाण, हीं सर्व देहधारी होऊन रामापुढें चालत होतीं. ४० सर्व वेद शरीरें धारण करून आणि सर्व दिव्य मुनिही रामाबरोबर निघाले श्रुतीची-वेदांची-साध्वी माता प्रणवाला आणि व्याहृतींना बरोबर घेऊन रामाबरोबर जाण्यास निघाली. ४१ राम जात असतां सव

१ घरात दीक्षापूर्वक सतत प्रदीप्त ठेवलेला पवित्र अग्नि. अग्निहोत्र नित्य व काम्य अशा दोन प्रकारचें असते. २ मरण्याच्या निश्चयानें बाहेर निघणें तें महाप्रयाण, त्याला अनुसरून. ३. वेदाची माता-गायत्री. ४. ओंकार. ५. भूर्, भुवस्, स्वस् इत्यादि संध्यासमयीं उच्चारले जाणारे मंत्रोच्चार ह्या व्याहृति सात आहेत.

सपुत्रदाराः सह बंधुवर्गैः । अनावृतद्वारमिवापवर्गं रामं व्रजंतं ययुराप्तकामाः ॥ ४२ ॥ सांतःपुरः सानुचरः सभार्यः शत्रुघ्नयुक्तो भरतोऽनुयायात् । गच्छंतमालोक्य रमासमेतं श्रीराघवं पौरजनाः समस्ताः । सबालवृद्धाश्च ययुर्द्विजाग्र्याः सामात्यवर्गाश्च समंत्रिणो ययुः ॥ ४३ ॥ सर्वे गताः क्षत्रमुखाः प्रहृष्टा वैश्याश्च शूद्राश्च तथा परे च । सुग्रीवमुख्या हरिपुंगवाश्च स्नाता विशुद्धाः शुभशब्दयुक्ताः ॥ ४४ ॥ न कश्चिदासीद्भवदुःखयुक्तो दीनोऽथवा बाह्यसुखेषु सक्तः । आनंदरूपानुगता विरक्ता ययुश्च रामं पशुभृत्यवर्गैः ॥ ४५ ॥ भूतान्यदृश्यानि च यानि तत्र ये प्राणिनः स्थावरजंगमाश्च । साक्षात्परात्मानमनंतशक्तिं जग्मुर्विरक्ताः परमेकमीशम् ॥ ४६ ॥ नासीदयोध्यानगरे तु जंतुः कश्चित्तदा राममना न यातः । शून्यं बभूवाखिलमेव तत्र पुरं गते राजनि रामचंद्रे ॥४७॥ ततोऽतिदूरं नगरात्स गत्वा दृष्ट्वा नदीं तां हरिनेत्रजाताम् । ननंद रामः

जन पुत्र, स्त्रिया, बंधुवर्ग या सर्वांना बरोबर घेऊन त्याच्या मागून निघाले. कारण, आज आपल्या सर्व ऐहिक इच्छा तृप्त झाल्या आहेत, तसेंच सांप्रत मोक्षाचें द्वार खुलें झालें असून, राम तिकडेच चालला आहे, असें त्यांस वाटत होतें. भरत आपल्या अंतःपुरवासी स्त्रिया, सेवक, भार्या, आणि शत्रुघ्न यांसह निघाला. ४२ श्रीराम लक्ष्मीसह चालला आहे, असें पाहून लहानांपासून थोरांपर्यंत समस्त पौरजन, तसेच सर्व अमात्य, मंत्री, मोठमोठे ब्राह्मण ( रामामागून ) निघाले. क्षत्रियप्रभृति जाति–क्षत्रिय, वैश्य, शूद्र व दुसऱ्याही-संतुष्ट मनानें रामामागून जाण्यास निघाल्या. ४३ स्नानें करून शुद्ध झालेले सुग्रीव वगैरे मोठमोठे वानर मंगलशब्दांचा उच्चार करीत निघाले. ४४ संसारदुःखानें पीडलेला, दीन अथवा बाह्य सुखाच्या ठिकाणी आसक्त झालेला असा एकही इसम त्यांत नव्हता. सर्व लोक विरक्त होऊन पशूंचे कळप, आणि सेवकांचे समुदाय, यांसह आनंदरूप रामाच्या मागून निघाले. ४५ तेथील अदृश्य जीव आणि स्थावरजंगमात्मक प्राणी विरक्त होऊन त्या साक्षात् अनंतशक्ति, अद्वितीय, परमसमर्थ, परमात्म्याच्या मागून निघाले. अयोध्येंत असा एकही प्राणी नव्हता की, जो रामाच्या ठिकाणी मन ठेवून त्याच्या मागून निघाला नाही. रामचंद्र निघून गेला असतां तें सर्व नगर शून्य होऊन गेलें. ४६,४७ नगराच्या बाहेर बरेंच लांब

स्मृतपावनाऽता ददर्श चाशेषमिदं हृदिस्थम् । अथागतस्तत्र पितामहो महान् देवाश्च सर्वे ऋषयश्च सिद्धाः ॥ ४८ ॥ विमानकोटीभिरपारपारं समावृतं खं सुरसेविताभिः ॥४९॥ रविप्रकाशाभिरभिस्फुरत्स्वं ज्योतिर्मयं तत्र नभो बभूव । स्वयंप्रकाशैर्महतां महद्भिः समावृतं पुण्यकृतां वरिष्ठैः ॥५०॥ ववुश्च वाताश्च सुगंधवंतो ववर्ष वृष्टिः कुसुमावलीनाम् । उपस्थिते देवमृदंगनादे गायत्सु विद्याधरकिन्नरेषु ॥ ५१ ॥ रामस्तु पद्भ्यां सरयूजलं सकृत्स्पृष्ट्वा परिक्रामदनंतशक्तिः ॥ ५२ ॥ ब्रह्मा तदा प्राह कृतांजलिस्तं रामं परात्मन् परमेश्वरस्त्वम् । विष्णुः सदानंदमयोऽसि पूर्णो जानासि तत्त्वं निजमेशमेकम । तथापि दासस्य ममाखिलेश कृतं

गेल्यावर विष्णूच्या नेत्रापासून उगम पावलेली सरयू नदी रामाच्या दृष्टीस पडली. (तिला) पाहून रामाला आनंद वाटला. तेथें त्याला आपल्या पवित्र विराट्स्वरूपाचें स्मरण होऊन आपल्या हृदयांतच सर्व जगत् आहे, अशी भावना त्याच्या अंतःकरणांत उत्पन्न झाली. इतक्यांत त्या ठिकाणीं श्रेष्ठ पितामह-ब्रह्मदेव, सर्व देव, तसेंच सर्व ऋषि, आणि सिद्ध प्राप्त झाले. ४८ आकाश एवढें अपरंपार, तरी तेंही देव बसले आहेत, अशा कोट्यवधि विमानांनी गच्च भरून गेलें होतें. ४९ विमानांच्या सूर्यसदृश तेजामुळें आकाश प्रकाशमय होऊन गेलें होतें. मोठमोठ्या स्वयंप्रकाश व अत्यंत पुण्यवान् अशा लोकांची आकाशांत एकच गर्दी उडून गेली होती. ५० सुगंधयुक्त वारे वाहूं लागून पुष्पावलीची वृष्टि होत होती. देवांच्या मृदंगाचे ध्वनि चालू होते विद्याधर, किन्नर यांची गायनें सुरू झाली. ५१ इतक्यांत सर्वशक्तिमान् रामानें एकवार पायांनी त्या सरयूच्या उदकाला स्पर्श केला, आणि नंतर त्या उदकावरून तो चालूं लागला. ५२ त्या वेळीं ब्रह्मदेवानें हात जोडले, आणि रामाला म्हटलें, 'हे परमात्मन्! तूं परमेश्वर आहेस; तूं सदा आनंदमय असा पूर्ण-सर्वत्र व्यापून राहाणारा-विष्णु आहेस. स्वतःचें

१. 'हरिविधिशक्रयमार्यमविधुवसुवरुणाग्निसर्पगंधर्व, । चारणकिन्नरसिद्धत्रिदशापसमाज पातले सर्व. ॥'-मोरोपंत २ समानार्थक वर्णन-'तूं वैकुंठाचा नायक । तुज नेणती मतिमंद लोक । तू यज्ञभोक्ता पुण्यश्लोक । अचिंत्य अव्यक्त स्वरूप तुझें ॥ तूं गुणातीत निर्विकार । तूं निष्कर्म निरुपचार । श्रुतिशास्त्रासी न कळे पार । तू अगोचर निजवेदा ॥ तुज नाहीं जन्ममरणवार्ता । तूं सर्वसाक्षी सर्वभर्ता । तुझें ध्यान कैलासनाथा । रात्रंदिवस होंचि पैं ॥-भा रामायण, उत्तरकांड ७७.

वचो भक्तपरोऽसि विद्वन् ॥ ५३ ॥ त्वं भ्रातृभिर्वैष्णवमेकमाद्यं प्रविश्य देहं परिपाहि देवान् । यद्वा परो वा यदि रोचते तं प्रविश्य देहं परिपाहि नस्त्वम् ॥५४॥ त्वमेव देवाधिपतिश्च विष्णुर्जानंति न त्वां पुरुषा विना माम् । सहस्रकृत्वस्तु नमो नमस्ते प्रसीद देवेश पुनर्नमस्ते ॥५५॥ पितामहप्रार्थनया स रामः पश्यत्सु देवेषु महाप्रकाशः । मुष्णंश्च चक्षूंषि दिवौकसां तदा बभूव चक्रादियुतश्चतुर्भुजः ॥ ५६ ॥ शेषो बभूवेश्वरतल्पभूतः सौमित्रिरत्यद्भुतभोगधारी । बभूवतुश्चक्रदरौ च दिव्यौ कैकेयिसूनुर्लवणांतकश्च ॥५७॥ सीता च लक्ष्मीरभवत्पुरैव रामो हि विष्णुः पुरुषः पुराणः । सहानुजः पूर्वशरीरकेण बभूव तेजोमयदिव्यमूर्तिः ॥५८॥ विष्णुं समासाद्य सुरेंद्रमुख्या देवाश्च सिद्धा मुनयश्च यक्षाः । पितामहाद्याः परितः परेशं स्तवैर्गृणंतः परिपूजयंतः ॥ ५९ ॥ आनंदसंप्लावित-

अद्वितीय ईश्वरा तत्त्व तूंच जाणतोस. तथापि हे अखिलशा ! मज दासाचें इच्छित कार्य तूं शेवटास नेलेंस हे ज्ञानरूपा ! तूं भक्तवत्सल आहेस. ५३ तूं बंधूंसह आपल्या आद्य व अद्वितीय विष्णुस्वरूपांत प्रवेश कर, व देवांचें रक्षण कर. किंवा दुसऱ्या एखाद्या देहाचा अंगीकार करावा, अशी तुझी इच्छा झाल्यास त्या देहांत प्रवेश करून आमचें पालन कर. ५४ तूंच देवाधिपति विष्णु आहेस. माझ्यावांचून दुसऱ्या कोणालाही तुझे स्वरूपाचें यथार्थज्ञान नाहीं. देवेशा ! तुला सहस्र वेळां नमस्कार करितों. प्रसन्न हो. मी तुला पुनः नमस्कार करितों.' ५५ ब्रह्मदेवाच्या प्रार्थनेवरून महाप्रकाशमान रामचंद्रानें सर्व देव पहात असतां, चतुर्भुज रूप धारण केलें. त्याच्या हातांत चक्र, शंख इत्यादि आयुधें होतीं. त्याचे तेजानें सर्व देवांचे डोळे दिपून गेले. ५६ लक्ष्मण अत्यद्भुत सर्पदेह धारण करून विष्णूचा शय्यारूपी शेष झाला. कैकेयीपुत्र भरत आणि लवणांतक[२] ( शत्रुघ्न ) हे दोघेही विष्णूचीं चक्र आणि शंख आयुधें झाले. ५७ सीता ही पूर्वींच लक्ष्मी झाली होती. अशा प्रकारें रामाचें पुराणपुरुष असें विष्णुरूप प्रकट झालें. कनिष्ठ बंधूसह आपलें पूर्वस्वरूप–विष्णुरूप–धारण करून राम तेजोमय दिव्यदेही असा शोभूं लागला. ५८ या वेळीं इंद्रादिक देव, सिद्ध, मुनि, यक्ष ब्रह्मदेवादिकांसह विष्णूकडे आले, आणि त्यांनीं त्या ईश्वराची सर्वत्र स्तोत्रें गाऊन स्तुति केली, व

१. सर्व चराचराचा मालक, अशा. २ लवणासुराचा नाशकर्ता ( शत्रुघ्न ).

पूर्णचित्ता बभूविरे प्राप्तमनोरथास्ते । तदाह विष्णुर्द्रुहिणं महात्मा एते हि भक्ता मयि चानुरक्ताः ॥ ६० ॥ यांतं दिवं मामनुयांति सर्वे तिर्यक्शरीरा अपि पुण्ययुक्ताः । वैकुंठसाम्यं परमं प्रयांतु समाविशस्वाशु ममाज्ञया त्वम् ॥ ६१ ॥ श्रुत्वा हरेर्वाक्यमथाब्रवीत्कः सांतानिकान्यांतु विचित्रभोगान् । लोकान्मदीयोपरि दीप्यमानांस्त्वद्भावयुक्ताः कृतपुण्यपुंजाः ॥ ६२ ॥ ये चापि ते राम पवित्रनाम गृणंति मर्त्या लयकाल एव । अज्ञानतो वापि भजंतु लोकांस्तानेव योगैरपि चाधिगम्यान् ॥६३॥ ततोऽतिहृष्टा हरिराक्षसाद्याः स्पृष्ट्वा जलं त्यक्तकलेवरास्ते । प्रपेदिरे प्राक्तनमेव रूपं यदंशजा ऋक्षहरीश्वरास्ते ॥ ६४ ॥ प्रभाकरं प्राप हरिप्रवीरः सुग्रीव आदित्यजवीर्यवत्त्वात् ॥ ६५ ॥ ततो विमग्नाः सरयूज-

पूजा केली. त्यांची चित्तें आनंदपूर्ण होऊन त्यांचे मनोरथही सफल झाले. मग त्या महोदार विष्णूनें ब्रह्मदेवाला म्हटलें, 'हे माझे भक्त मजवर अत्यंत प्रेम करणारे आहेत. ५९,६० मी स्वर्गाला येण्याला निघालों असतां हे सर्व मजमागून आले आहेत. हे जरी क्षुद्र[1] योनींत जन्माला आले आहेत, तरी ते ( आपल्या कृतीनें ) पुण्यवंत झाले आहेत. ह्यांना वैकुंठसमान लोक प्राप्त व्हावा, हें योग्य आहे. तरी माझ्या आज्ञेनें त्यांना ( वैकुंठलोकीं ) ने.' ६१ विष्णूचें भाषण ऐकून ब्रह्मदेव म्हणाला, 'नाना प्रकारचे सुखोपभोग प्राप्त करून देणारे असे सांतानिकनामक दिव्य लोक आहेत. ते लोक माझ्या ब्रह्मलोकापेक्षां श्रेष्ठ आहेत. तुझ्या ठिकाणीं निष्ठा ठेवून ज्यांनी महत् पुण्य संपादन केलें आहे, अशा तुझ्या भक्तांना त्या लोकांची प्राप्ति होईल. ६२ त्याचप्रमाणें हे रामा ! जे कोणी मर्त्य तुझे पवित्र नाम अंतकालीं उच्चारतील, त्यांनाही हे लोक प्राप्त होतील. अज्ञानानें कां होईना, जे कोणी तुला भजतील, त्यांनाही योग्यांनींच केवळ साध्य, असे हे लोक, साध्य होतील ६३ ( हें ऐकून ) अत्यंत आनंदित झालेल्या वानरांनीं आणि राक्षसादिकांनीं ( शरयूच्या ) जलाला स्पर्श केला. त्याबरोबर त्या ऋक्ष आणि मोठमोठ्या वानरांनीं आपले देह टाकिले, आणि पूर्वी ज्या देवतांचे ते अंश होते, त्या देवतांचीं रूपें त्यांनी धारण केलीं. ६४ वानरश्रेष्ठ सुग्रीव सूर्याच्या वीर्यामुळें झाला असल्यामुळें तो सूर्यरूपीं मिळाला. ६५

१. 'त्यां सांतानाख्य बरा विधिलोकसमीप लोक शुभ केला । क्रममुक्तिप्रद तो त्या स्थानां जन सर्व उत्सवें नेला. ॥'—मोरोपंत, बालमंत्ररामायण.

लेषु नराः परित्यज्य मनुष्यदेहम् । आरुह्य दिव्याभरणा विमानं प्रापुश्च ते सांतनिकाख्यलोकान् ॥ ६६ ॥ तिर्यक्प्रजाता अपि रामदृष्टा जलं प्रविष्टा दिवमेव याताः । दिदृक्षवो जानपदाश्च लोका रामं समालोक्य विमुक्तसंगाः ॥ ६७ ॥ स्मृत्वा हरिं लोकगुरुं परेशं स्पृष्ट्वा जलं स्वर्गमवापुरंजः । एतावदेवोत्तरमाह शंभुः श्रीरामचंद्रस्य कथावशेषम् । यः पादमप्यत्र पठेत्स पापाद्विमुच्यते जन्मसहस्रजातात् ॥ ६८ ॥ दिने दिने पापचयं प्रकुर्वन्पठेन्नरः श्लोकमपीह भक्त्या । विमुक्तसर्वाघचयः प्रयाति रामेऽतिसालोक्यमनन्यलभ्यम् ॥ ६९ ॥ आख्यानमेतद्रघुनायकस्य कृतं पुरा राघवचोदितेन । महेश्वरेणाप्तभविष्यदर्थं श्रुत्वा तु रामः परितोषमेति ॥ ७० ॥ रामायणं काव्यमनंतपुण्यं श्रीशंकरेणाभिहितं

( अवशिष्ट ) जनांनीं त्या शरयूच्या जलांत प्रवेश करून स्नान केलें, तोंच त्यांचे मनुष्यदेह नाहींसे होऊन त्यांना दिव्य देह प्राप्त झाले. दिव्याभरणांनी मंडित होऊन ते विमानांत बसले, आणि त्या सांतानिक लोकी प्राप्त झाले. ६६ श्रीरामाचें दर्शन झालेले तिर्यक्[1]योनीत जन्मास आलेले जीव देखील सरयूनदींत स्नान करतांच देवलोकी गेले. रामदर्शनाच्या इच्छेनें जे लोक आले होते, त्यांना रामदर्शन होतांच विरक्ति उत्पन्न झाली. ६७ नंतर त्यांनी त्या लोकगुरु परमेश रामाचें स्मरण केलें, आणि सरयूला स्पर्श केला, तोंच त्यांना स्वर्गलोकाची प्राप्ति झाली. (अशा रीतीनें) श्रीशंकरांनी श्रीरामाच्या उत्तरकथेचा इतका भाग ( पार्वतीला ) सांगितला. जो मनुष्य ह्या ग्रंथाचा एक पाद–चौथा भाग–पठण करील, तो सहस्र जन्मींच्या पातकांपासून मुक्त होईल. ६८ मनुष्य प्रतिदिनीं कितीही मोठीं पापें करणारा असो, तो जर भक्तिपूर्वक एक श्लोक पठण करील, तर त्याच्या त्या सर्व पापराशि नाहींशा होऊन, इतर साधनांनीं अप्राप्य अशा रामलोकीं तो जाईल. ६९ पूर्वी श्रीरामानें प्रेरणा केल्यामुळें श्रीशंकरांनी रघुनायकाचें, भविष्यकाळच्या गोष्टींनीं भरलेलें हें आख्यान रचिलें. ह्याच्या श्रवणानें श्रीरामाला मोठा संतोष होत असतो. ७० रामायण नांवाचें हें अत्यंत पुण्यकारक

१. पशुपक्ष्याच्या योनीत. २. सदृश वर्णन–'ते जन सर्व दयानिधिनें, त्यजुनि स्वपुरी, सरयूप्रति नेले, । मज्जन तीर्थवरी करवूनि, सुराधिक दिव्य खरादिहि केले ॥ दिव्यविमानसहस्रशतस्थित गाजत वाजत साजत गेले, । पावुनि उत्तम लोक, सदा प्रभुदर्शन हर्षितमानस ठेले. ॥ '–मोरोपंत सवयारामायण.

भवान्यै। भक्त्या पठेद्यः शृणुयात्स पापैर्विमुच्यते जन्मशतोद्भवैश्च॥७१॥ अध्यात्मरामं पठतश्च नित्यं श्रोतुश्च भक्त्या लिखितुश्च रामः। अतिप्रसन्नश्च सदा समीपे सीतासमेतः श्रियमातनोति ॥ ७२ ॥ रामायणं जनमनोहरमादिकाव्यं ब्रह्मादिभिः सुरवरैरपि संस्तुतं च। श्रद्धान्वितः पठति यः शृणुयात्तु नित्यं विष्णोः प्रयाति सदनं स विशुद्धदेहः॥७३॥ इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे उत्तरकांडे नवमः सर्गः ९.

॥ समाप्तमिदमुत्तरकांडम् ॥

अध्यात्मोत्तरकांडे सर्गा ग्रहसंख्या परिक्षिप्ताः।
[illegible]शतसंख्याः श्लोकाः पराणसंख्याश्च पुरहरेणोक्ताः ॥ १ ॥

काव्य शंकरानी पार्वतीला सांगितलें. त्याचें जो पठण करील, अगर श्रवण करील, तो शेंकडो जन्मांच्या पापांपासून मुक्त होईल. ७१ जो कोणी अध्यात्मरामायणाचें भक्तिभावानें पठण करील, श्रवण करील, अगर लेखन करील, त्यावर राम प्रसन्न होऊन त्याजवळ सीतेसह नित्य राहील, आणि त्याची संपत्ति वाढवील. ७२ हें रामायणनामक आदिकाव्य सकल जनांचें मन रमविणारें आहे. ब्रह्मदेवादि मोठमोठ्या देवांनीं देखील ह्याची प्रशंसा केली आहे. जो श्रद्धापूर्वक ह्याचें नित्य पठण अगर श्रवण करील, तो विशुद्धदेह होऊन विष्णुलोकाला प्राप्त होईल. ७३ "

**उत्तरकांड, सर्ग नववा समाप्त.**

